"ॐ"

# ज्योतिष-शिक्षक

अथवा

# जातक केसरी

लेखक व प्रकाशक

ज्योतिपरत्न, ज्योतिर्भूपण, ज्योतिपसुधाकर

पंडित रघुनाथशास्त्री मोरेश्वर पटवर्धन,

ज्योतिपी. मुख्य चिटणीस शुद्धपंचांग प्रवर्तक मंडळ.

चालकः—भारतीय ज्योतिर्मंडळ व ज्योतिप-शिक्षणक्रम

शुक्रवार पेठ, घ. नं १४०, शिंदेआळी, पुणें २

शके १८५९ ] आवृत्ति दुसरी [ सन १९३८



किंमत २० रु.

# ज्योतिषशिक्षक अथवा जातककेसरी

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| भाग १ ला, | पृष्ठ | १ ते १०० | भाग ४ था, | पृष्ठ | ३१३ ते ४१८ |
| भाग २ रा, | पृष्ठ | १०१ ते २०६ | भाग ५ वा, | पृष्ठ | १ ते १०० |
| भाग ३ रा, | पृष्ठ | २०७ ते ३१२ | भाग ६ वा, | पृष्ठ | १ ते १९२ |
| | | | आणि | पृष्ठ | १ ते १३६ |

एकूण सर्व भागांचीं पृष्ठें ८५०

## शुद्ध पंचांगाचे मुख्य प्रवर्तक

ज्योतिष-शास्त्राच्या प्रगतीचें व संशोधन कार्याचे
आचार्य, स्वातंत्र्याचे कणखर पुरस्कर्ते, खऱ्या
राजकारणाचे धुरंधर पुढारी, प्राचीन
शास्त्रांचे कट्टे अभिमानी, प्रचंड
बुद्धिमत्तेचे सागर, राष्ट्रसिंह

**कै. लोकमान्य बाळ गंगाधर टिळक.**

यांच्या पुण्यस्मृतीस अत्यंत आदरपूर्वक
हा ग्रंथ अर्पण केला आहे.

लेखक व प्रकाशक—ज्योतिषरत्न पंडित रघुनाथशास्त्री मोरेश्वर पटवर्धन,
ज्योतिर्भूषण कचेरी, १४० शुक्रवार पेठ, पुणें २
मुद्रक:—ग. का. गोखले, श्रीगणेश प्रिं. वर्क्स ४९५-९६ शनवार, पुणें
" म भा. फाळे मॅ. प्रतिभा प्रेस, ३३५ शनवार, पुणें

# आत्मनिवेदन

यथाशिखामयूराणां नागानांमणयोयथा । तद्वद्वेदांगशास्त्राणांज्योतिषं मूर्धनिस्थितम् ॥
वेदांगज्योतिष.

श्रीशालिवाहन शके १८३४ मिति चैत्र शु १ (सन १९१२) रोजीं ज्योतिषशास्त्राच्या संशोधनाकरिता व विचार-विनिमयाकरिता ज्योतिर्विचारिणी सभा स्थापन करून तिच्याद्वारें हें कार्य करावयाचें आणि ज्योतिषशास्त्राच्या बाबतींत अत्यंत उदास, हट्टक, निरुत्साही, हीनबल व हतबुद्ध झालेल्या ज्योतिष्याना, ज्योतिषज्ञानेच्छूना आणि जनतेंतील विचारप्रवण व कार्यप्रवण लोकाना आपल्या शक्तीप्रमाणें ज्योतिषशास्त्राचें शिक्षण देऊन ज्योतिषशास्त्राच्या संशोधनाचा व प्रचाराचा भगीरथ प्रयत्न करावयाचा ही आमची मनीषा व महत्वाकांक्षा योग्य रीतीनें पूर्ण झाल्याबद्दल आम्ही परमेश्वराचे कृतज्ञ आभार मानतो आणि फलज्योतिषशास्त्राचा व त्याला आधारभूत अशा शुद्धपंचांग व शुद्ध ग्रहस्थितीच्या चळवळीचा व कार्याचा असाच सतत आणि अधिकाधिक प्रचार होऊन शुद्धपंचांगाचा अखिल *भारतात जयजयकार होवो अशी परमेश्वराची प्रार्थना करतो.*

शके १८३४ या वर्षी म्हणजे सव्वीस वर्षांपूर्वी (प्रत्यक्ष आणि ३० वर्षांपूर्वी योजनात्मक) ज्योतिषशास्त्र सेवेचें, *संशोधनाचें, पंचांगशुद्धीचें आणि ज्योतिषशास्त्र प्रसाराचें जें खडतर कार्य आम्ही आंगिकारलें, स्वीकारलें व सुरू केलें* त्या कार्यांत हिंदुस्थानचे तेजस्वी पुढारी, राष्ट्रसिंह लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांचें नेतृत्वच सर्वतोपरी साह्यकारी व यशस्वीततेस पोषक झालें आहे. ह्या निमित्तानें लोकमान्य टिळकांसारख्या अलौकिक विभूतीशीं संबंध येणें हें आम्ही आपलें सुदैवच समजतो. ज्योतिषशास्त्र सेवेचें आमचें कार्य यथाशक्ति चालू असता सन १९१४ मध्यें लो. टिळक मंडालेहून सुटून आले. त्याना आम्ही केलेलें कार्य दाखविलें. तें त्याना पूर्ण पसंत पडून त्या बाबतींत फार महत्वाच्या सूचना त्यानीं केल्या व पुढील कार्याची दिशा दाखविली. अर्थातच त्यामुळें आम्हाला अनुपमेय आनंद झाला. **लो० टिळकांनीं स्पष्ट सांगितलें कीं, "कोणत्याही प्राचीन शास्त्राच्या उत्कर्षाकरितां झटणें व त्यासाठीं सतत दीर्घोद्योग करणें हें प्रत्येक विचारी मनुष्याचें आद्यकर्तव्य आहे. फलज्योतिषशास्त्राच्या उत्कर्षाकरितां व संशोधनाकरितां चाललेला तुमचा उद्योग प्रशंसनीय आहे. पण फलज्योतिषशास्त्राचा मूळपाया म्हणजे आकाशस्थ शुद्ध ग्रहस्थिति व शुद्ध पंचांग हा होय. याकरितां प्रथम अखिल भारतवर्षांत सर्वत्र शुद्ध पंचांग प्रचारांत आलें पाहिजे व त्याकरितां उद्योग केला पाहिजे".** हें कार्य अवघड आहे, कठीण आहे, अत्यंत परिश्रमाचें आहे. पण शास्त्रसेवेच्या दृढनिश्चयानें आणि अखिल भारतवर्षांत शुद्ध पंचांग प्रचार करून तद्द्वारा आपलीं सर्व धर्मकृत्यें शुद्धकालींच व्हावींत ह्या सत्यतत्त्वाच्या स्वाभिमानानें व सद्बुद्धीनें हें महत् कार्य करणारास मी सर्वतोपरी साह्य करीन. कार्य अत्यंत मोठें आहे आणि म्हणूनच तें झालें पाहिजे. यासाठीं जाणतीं माणसेंहि तयार केलीं पाहिजेत. त्याप्रमाणें लोकमान्याचें निश्चित व निर्णायक मत व कार्याची दिशा ऐकून आम्ही तसें कार्य करण्याचें ठरविलें. पुण्यास व सांगलीस लोकमान्याच्या नेतृत्वाखालीं ज्योतिष परिषद होऊन त्यातील निर्णयाप्रमाणें शुद्धपंचांग लो० टिळकानीं सुरू केलें, तें सतत चालू आहे. इंदूरच्या अखिल भारतीय ज्योतिष परिषदेंतही सांगली संमेलनासारखाच निर्णय झाला. तात्पर्य, लो. टिळकांच्या नेतृत्वाखालीं झालेला शास्त्रशुद्ध पंचांगनिर्णयच दुटुरास कायम झाला व सत्यतत्त्व विजय पावलें.

ज्योतिष विषयात जाणते लोक तयार करण्याची लोकमान्याची अगदीं आरंभींची सूचना. त्यास अनुसरून कोणासही घरबसल्या आपला व्यवसाय सभाळून ज्योतिषशास्त्राचें शिक्षण घेता येईल असा ज्योतिषशिक्षणक्रम आम्ही तांबडतोब सुरू केला आणि त्याचीं शिक्षणपत्रकें लोकमान्याना सादर केलीं. इतक्या सपाट्यानें आम्ही केलेले हें कार्य आणि ज्योतिष-शिक्षणक्रमाची सुलभ रचना याबद्दल त्याना फार समाधान वाटलें. अनेक प्रकारच्या

राजकीय कामात अत्यंत व्यग्र असताही ज्योतिष शिक्षणक्रमाची पत्रकें त्यांनी अतिशय बारकाईनें वाचून पाहिली व जो अभिप्राय दिला तो येणेंप्रमाणें —

**लोकमान्य टिळक लिहितात —**

**पंडित रघुनाथशास्त्री यांनी सुरू केलेल्या ज्योतिष शिक्षणकोर्सचीं शिक्षणपत्रकें आम्हीं वाचून पाहिलीं कुंडलीवरून ग्रहांचीं शुभाशुभ फलें थोडक्यांत समजण्यास हा कोर्स उपयोगी पडून सामान्य लोकांसही आपल्या कुंडलीचीं फलें कळून येतील फलज्योतिषाचें शिक्षण देण्याची सोय व सहज ज्ञान होईल असे ग्रंथ फारच कमी आहेत ती अडचण ह्या शिक्षणक्रमाच्या योगानें दूर होईल असें आम्हास वाटतें, व अशा दृष्टीनें हा शिक्षणक्रम अत्यंत उपयुक्त व संग्राह्य आहे यात संशय नाहीं**

**बाळ गंगाधर टिळक.**

ज्योतिषविषयात जाणते असें कमीतकमी निदान १००० लोक तरी तयार करावयाचे असा आमचा निश्चय होता तो निश्चय परमेश्वरकृपेनें ह्यावर्षी पूर्णत्वास जात आहे याबद्दल आम्हास अत्यंत संतोष वाटतो ह्या १००० जाणत्या, ज्योतिषज्ञांनी प्रत्येकीं १०–२० लोकात जरी ह्या विद्येचा प्रसार केला तरी १० ते २० हजार लोक तयार होतील आणि ह्या शास्त्राचा अव्याहत प्रचार व सवर्धन चालू राहील गेल्या ३०वर्षांच्या आमच्या यथाशक्ति व यथामति प्रयत्नाचें, लो० टिळकाच्या नेतृत्वाच्या, मार्गदर्शकत्वाच्या व पुण्याईच्या सहाय्याचे व परमेश्वरा कृपाप्रसादाचेंच हें फल होय

कोणीकडे सन १९१२ हें वर्ष आणि कोणीकडें सन १९३८ साल! ह्या २६ वर्षांच्या कालावधीत किती भयंकर फेरफार झाले आहेत! सन १९१२ साली ज्योतिषशास्त्र, फलज्योतिष, पचाग हे विषय म्हणजे अगदीं टाकाऊ व बिलकूल दुर्लक्ष करण्यासारखें विषय! अर्थात त्याच्याकडे ढुंकूनही पाहण्याचें कारण नाहा अशा प्रकारची सार्वत्रिक प्रवृत्ति होती. व त्यामुळें उपहासाला भिऊन या शास्त्राचें निश्चयानें व धडाडीनें कार्य करावयास कोणी धजावेना! जो तो काय करावें, कसें करावें अशी जपमाळ घेऊन बसला होता कोणाकडून द्रव्याचे तर साह्य नाहींच पण नुसतें सहानुभूतीचें फुकाचें बोल बोलण्यासही कोणी तयार नव्हता! अशा बिकट परिस्थितींत व बिकट काळात ज्योतिषशास्त्र संशोधनाचें कार्य आम्ही सुरू केलें आणि सुदैवानें लोकमान्यांनी पुढारीपणानें व अलौकिक कर्तृत्वानें हे कार्य अगावर घेऊन यशस्वी केलें ह्या २६ वर्षांच्या गतकालात परिस्थितात इतका जमीनअस्मानाचा फरक पडला कीं, तो फरक पाहून कोणीही चकितच होईल! येवढ्या काळात केसरीच्या शुद्धपचागविषयक व फलज्योतिषविषयक लेखाच्या दणदणाटानें, लो० टिळकाच्या अध्यक्षतेखाली व नेतृत्वाखालीं भरलेल्या पुणें व सागलीच्या ज्योतिष परिषदाच्या पायानें, खुद्द स्वत लोकमान्य टिळकाच्या तेजस्वी लेखानें आणि शुद्धपचाग प्रवर्तक मडळाच्या कै. प्रो वि व नाईक, प्रिन्सिपाल गो स आपटे श्री शि ग पवार, श्री रा वि पटवर्धन, श्री ज स करदीकर, कै रावसाहेब वि य आगाशे, कै ज्यो श्री कृ कोल्हटकर व ज्योतिर्भूषण मासिक यातील अन्यत उत्कृष्ट, शास्त्रशुद्ध व समर्पक लेखानीं ज्योतिषशास्त्र संशोधनाचें बाबतींत अखिल हिंदी जनता आणि ज्योतिषी खडबडून जागें झालें व प्रत्येक जण शुद्धपंचाग आणि फलज्योतिषशास्त्राचे संशोधनाबाबत साधकबाधक विचार व चर्चा करू लागला सन १९२१मध्यें पुण्यास फलज्योतिष परिषद भरविण्यात आली व तिचें काम यशस्वीरीतीनें पार पडलें अशा रीतानें जनतेंत व ज्योतिष्यात प्रचंड जागृति निर्माण झाली जी वर्तमानपत्रें ह्या विषयाला अगदीं बहिष्कृत समजत होती त्याच वर्तमानपत्रातून १० १० स्तंभाचे विस्तृत लेख प्रसिद्ध होऊ लागले! उत्तरें, प्रतिउत्तरें, टीका, समर्थन, आक्षेप प्रत्याक्षेप, संशोधन इत्यादि प्रकारानें सर्वत्र ज्योतिषविषय दुमदुमून राहिला आणि त्याचा परिणाम असा झाला कीं अनेक लोकांनीं स्वत ज्योतिष शिक्षण घेतले व ह्या शास्त्राचा सेवा करू लागले व कमालीचा प्रचार झाला भविष्याबाबत टवाळी करणारे काहीं वर्तमानपत्रकार आपल्या पत्रात भविष्यें देऊ लागलें आणि ज्या दिवशीं भविष्य असेल तो अक १५ ते २० हजारावर खपू लागला येथपर्यंत प्रगति झाली!

राजकीय चळवळीच्या जगड्व्याळ कामाचा भयंकर व्याप चालू असता केवळ, सत्य, शास्त्रशुद्ध व सिद्धातसमत शुद्धपंचाग प्रचारात यावें ह्याच सात्त्विक व प्राचीन शास्त्राच्या कणखर अभिमानी वृत्तीनें लोकमान्यांनीं ज्योतिष विषयात लक्ष घातलें, परिश्रम केले, स्वत च्या पदराला खार लावून घेतला आणि अशा ह्या निष्कामकर्मयोगानें शुद्धपंचागाचा व फलज्योतिष संशोधन कार्याचा प्रचंड कल्पवृक्ष तयार करून तो जनतेच्या स्वाधान केला गेल्या

२६ वर्षांत झालेल्या प्रगतीचें व प्रचाराचें सर्व श्रेय लोकमान्य टिळक व त्यांच्या नेतृत्वाखालीं कार्य करणाऱ्या कार्यप्रवण व कर्तबगार अशा रा. सा. आगाशे, प्रो. नाईक, प्रि. आपटे, श्री. रा. वि. पटवर्धन, वे. शा. स. मोघे शास्त्री, ज्यो. शि. ग. पवार, श्री. ज. स. करंदीकर, इत्यादि विद्वान् व्यक्तींना आहे व याबद्दल त्यांना सहस्रश: धन्यवाद दिले पाहिजेत.

फलज्योतिषशास्त्र म्हणजे भविष्यदिग्दर्शनशास्त्र होय. ह्या एकाच शास्त्राचें आधारानें पुढील गोष्टी वर्तविता येतात. बाकीचीं सर्व शास्त्रें हीं वर्तमानशास्त्रें किंवा भूतशास्त्रें होत. भविष्यकथनशास्त्राचें संशोधन विविध प्रकारानें व्हावयास पाहिजे व त्याला प्रत्यक्षाची, अनुभवाची आणि परिस्थित्यनुरूप होणाऱ्या फेरफाराची जोड दिली पाहिजे, तेव्हांच ते सर्वांशीं व सर्वतोपरी उपयुक्त होईल. पण ह्या सर्व गोष्टी होइपर्यंत आज उपलब्ध असलेले शास्त्रनियम आणि मूलतत्त्वें यांच्या आधारावरच कार्य केलें पाहिजे. स्वस्थ बसून चालणार नाहीं. शिवाय गेल्या २—३ हजार वर्षांतील कोणत्याही शास्त्राच्या प्रगतीकडे पाहिल्यास असेंच दिसून येईल कीं, त्या त्या शास्त्राची प्रगति संथपणें व क्रमाक्रमानेंच झाली आहे. राजसत्ता पूर्णपणें अनुकूल असलेल्या शास्त्राची ही गोष्ट, मग ज्या फलज्योतिषशास्त्राला कोणत्याही राजसत्तेचा आधार नाहीं, साह्य नाहीं त्या शास्त्राच्या संशोधनास व प्रगतीस किती कष्ट पडत असतील याची कल्पना करणेंच बरें ! तथापि अशाही बिकट परिस्थितींत फलज्योतिषशास्त्राचें संशोधन अत्यंत नि:स्वार्थ बुद्धीनें व खरोखरीच पोटाला चिमटा बांधून ज्योतिर्विदलोक करीत आहेत. यांतील धन्यतेचें समाधान आणि ज्योतिषशास्त्रसेवेची निरहंकारी, सात्त्विक आत्मतुष्टी 'जावें त्यांच्या वंशा' तेव्हांच कळणारी आहे, इतरांस त्याची कल्पनाही करता येणार नाहीं.

गेल्या २६ वर्षांत झालेल्या ज्योतिषशास्त्रसंशोधनाचें सर्व श्रेय लो० टिळकांना, शुद्धपंचांगप्रवर्तनाचें श्रेय लो० टिळकांना आणि फलज्योतिष व भविष्यकथनशास्त्राचा मूळ पाया किंवा मुख्य आधार अशा शुद्ध ग्रहस्थितीचें, आकाशस्थ प्रत्यक्ष दृक्प्रत्ययाशीं अगदीं तंतोतंत जमणाऱ्या ग्रहस्थितीचें आणि विशेषत: सूर्यसिद्धांतादि प्राचीन अलौकिक सिद्धांतांतील मुख्य व मूलभूत सिद्धांत कायम ठेवून ज्योतिषशास्त्राचें संशोधन, संवर्धन आणि प्रवर्तन करण्याचें सर्व श्रेय एकट्या लोकमान्य टिळकांनाच आहे.

शुद्ध पंचांगाच्या प्रवर्तनानें त्यांनीं फलज्योतिषशास्त्राचा पाया खंबीर केला आहे आणि ज्योतिषशास्त्राची व सिद्धांताची परंपरा कायम ठेवून प्राचीन अशा वेदांग ज्योतिषाचा अव्ययावत् सूक्ष्म संबंध कसा दृढ आहे हें निश्चित केलें आहे. हीच अव्याहत चाललेली वैदिक शुद्ध परंपरा व व्यवस्था पुढेंही चालली पाहिजे, हे स्पष्ट व सिद्ध केलें आहे.

लो० टिळकांनीं ज्योतिषसंशोधन कार्यांत पुढाकार घेतला नसता तर आज जी प्रगति झाली आहे ती होणें शक्यच नव्हतें. यांच्यापूर्वी ५० वर्षांत अनेक मोठमोठ्या व प्रसिद्ध व्यक्तींनीं ज्योतिषसंशोधनाचे प्रयत्न केले पण ते जागच्याजागींच राहिले ! त्यांनीं प्रगतिपथ गाठला नाहीं. सन १९०५ सालीं द्वारकापीठाच्या जगद्गुरु श्रीशंकराचार्यांच्या अध्यक्षतेखालीं अखिल भारतीय ज्योतिष महापरिषदेंत मुंबईस ज्यावेळीं कोणताही निर्णय न होता परिषद समाप्त होण्याचा प्रसंग आला त्यावेळीं श्रींच्या आग्रहावरून लो० टिळकांनीं पुढाकार घेऊन सुमार २००—२५० ज्योतिषांशीं शास्त्रोक्त चर्चा व विचारविनिमय केला. पंचांगांत शुद्धि पाहिजे ह्या तत्त्वावर ठराव घडवून, सर्वांच्या सह्यानिशीं श्रींना निर्णय सादर केला व मुंबई परिषद यशस्वी रीतीनें पार पाडली. श्रींनीं लो० टिळकांचा परिषदेंत जाहीर सत्कार व अभिनंदन करून परमसंतोष व्यक्त केला.

लो० टिळकांच्यावर १९०८ सालीं राजद्रोहाचा खटला होऊन त्यांत त्यांना ६ वर्षांची शिक्षा झाली. ते १९१४ सालांत बंधमुक्त झाले. मुंबई परिषदेंतील ठरावाप्रमाणें कार्य घडवून आणण्याकरितां एक मोठमोठ्या बड्या लोकांचें एक मंडळ नेमलें होतें. पण समेलन झाल्यापासून त्या मंडळानें यत्किंचितही कार्य केलें नाहीं. इतकेंच नव्हे तर त्या मंडळाचें अस्तित्व नाममात्र देखील राहिलें नाहीं !

सन १९१४ मध्यें लो० टिळक सुटून आल्यानंतर कांहीं दिवसांनीं ही सर्व परिस्थिति, ज्योतिष संशोधनाची आवश्यकता व त्या बाबतींतील पुढील प्रत्यक्ष कार्याची रूपरेषा व आमची संपूर्ण योजना आम्ही त्यांच्यापुढें मांडली. ह्या योजनेकरितां व फल ज्योतिष संशोधनाकरितां सन १९१२ सालीं ज्योतिर्विचारिणी सभा ह्या नांवाची संस्था स्थापन करून तें कार्य आम्ही यथाशक्ति चालविलें होतें व संशोधनाची योजना केली होती, तीच योजना लो० टिळकांना सादर केली व त्यांना पूर्णपणें पसंत पडली. सन १९१४ ते १९१७ पर्यंत जनतेंत व ज्योतिष्यांत प्रचार व

जागृति करण्याचें कार्य झालें १९१७ मध्यें लो० टिळकांच्या अध्यक्षतेखालीं ज्योतिष परिषद भरून ठराव करण्यात आले आणि त्याप्रमाणें पंचांगही प्रसिद्ध केलें गेलें सन १९१७ ते १९२० पर्यंत पंचांगविषयक चर्चा व वादविवाद यांना पूर आला होता पुन सन १९२० मध्यें सांगली येथें रा श्री कृ. कोल्हटकर यांच्या अध्यक्षतेखालीं ज्योतिष परिषद झाली. ह्या परिषदेस लोकमान्य टिळक उपस्थित होते २ ३ दिवस सर्व प्रकारें वादविवाद होऊन अखेर सर्वानुमतें शुद्ध पंचांगाचा अखेरचा निर्णय करण्यात आला

ह्या निर्णयानुसार शुद्ध पंचांगाची व्यवस्था व प्रचार करण्यासाठीं सांगलीच्या ज्योतिष परिषदेंत, लो० टिळकांच्या अध्यक्षतेखालीं जें मंडळ स्थापन करण्यात आलें तें मंडळ म्हणजेच "शुद्धपंचांग प्रवर्तक मंडळ" होय ह्या मंडळानें सतत १७ वर्षेपर्यंत शुद्ध पंचांगाचें कार्य अव्याहत व उत्कृष्टपणें चालविलें आहे हें जनतेच्या समोर आहेच

शुद्ध पंचांग प्रवर्तक मंडळानें हें कार्य अत्यंत नि स्वार्थ बुद्धीनें व शास्त्रसंशोधनाच्या आत्मीयतेनेंच केलेलें आहे. इतकेंच नव्हे तर प्रसंगीं स्वत:च्या पदरचे पैसे खर्च करून व दिवस रात्र न पाहता किंवा क्षुधा, तृषा यांचा पर्वा न करता अहोरात्र हाडाची काडें करून हे कार्य केलें आहे शास्त्र संशोधनाची आत्मीयता, तळमळ, प्राचीन परंपरेचा दृढ अभिमान, आणि शुद्ध तत्त्वाच्या प्रवर्तनाची आस्था जर ह्या कार्याच्या मुळाशीं नसती तर विद्वत्तेच्या, निरपेक्षतेच्या व नि स्वार्थतेच्याच केवळ जोरावर झालेलें हें कार्य, लाखो रुपये खर्च करूनही झालें नसतें अर्थात् झालेल्या कार्याचें महत्त्व अत्यंत अमूल्य असें आहे

लो० टिळकांच्या अचाट कार्यकर्तृत्वानें शुद्धपंचांगाचें म्हणजे फलज्योतिष शास्त्राचा आणि भविष्य कथन विद्येचा जो पाया तो खंबीर व स्थिर करण्याचें कार्य केले, यामुळें फलज्योतिष शास्त्राचें अर्धे कार्य झालें आहे बाकी राहिलेलें कार्य करण्याचे प्रयत्न व उद्योग चालू आहेत लोकमान्यांच्याच तोडीचा एखादा पुरुष निर्माण होईल तेव्हांच तें कार्य पूर्ण होईल. ज्या प्राचीन ज्योतिषाचार्यांनीं आपल्या तप सामर्थ्यानें ( दैवी सामर्थ्यानें ) सपक्ष व सिद्ध असा निकाल झाली दैवी पुरुषानीं, ज्योति शास्त्र प्रणेत्यानीं अखिल जगतावर उपकार करण्याकरिता जें ज्योतिषशास्त्र व फलज्योतिषशास्त्र निर्माण केलें, सिद्धांत प्रस्थापित केले, त्या ज्योतिष शास्त्राची थोरवी आणि शास्त्रकर्त्या प्राचीन आचार्यांचे उपकार कोणत्या शब्दांनीं वर्णन करावें। त्यांनीं लावलेले शोध, त्यांचे सिद्धांत आणि मूलभूत तत्त्वें इतकीं अचाट व अबाधित आहेत कीं, त्यांच्या कालांतल्या अत्यंत अपुऱ्या साधन सामुग्रीच्या साधनानेंही त्यांनीं लावलेले शोध व केलेलें कार्य म्हणजे खरोखर अलौकिक असेंच आहे

सांप्रत सूक्ष्म ग्रहगति गणितानें येणारी दृक्प्रत्ययात्मक ग्रहस्थिति आणि जुन्या ग्रंथावरून केलेल्या गणितानें येणारी स्थिति या दोहोंत बराच फरक येतो हें सर्व जनतेला स्पष्ट दिसत आहे पण हा दोष प्राचीन आचार्यांचा किंवा शास्त्रकर्त्यांचा मुळींच नाहीं ग्रहगति स्थितीमध्यें शेंकडों, हजारों वर्षांच्या कालदूरत्वानें व दीर्घ कालांतरानें पडणारा फरक व येणारी कसर हीं काढून टाकलीच पाहिजे पूर्वींच्या सिद्धांतग्रंथांतही याचा अवलंब केलेला आहे, अर्वाचीन लोकांनीं गेल्या ४००-५०० वर्षांत ह्या गोष्टीकडे लक्ष दिलें नाहीं व त्यापूर्वींही लोकविद्वेषाच्या भीतीनें वर्षमान व अयनगति यांतील कसर काढून टाकली नाहीं हा अलीकडच्याच लोकांचा दोष आहे. प्राचीनांचा नव्हे " शुद्ध सूर्यसिद्धांतात सांगितलें आहे कीं,

" शास्त्रमाद्यं तदेवेदं यत्पूर्वं प्राह भास्कर । युगानां परिवर्तेन काल भेदोऽत्र केवलं "

अनादि व प्राचीन शास्त्र तेंच, सिद्धांत तेंच, प्रमेयें तींच, पूर्वींच्या आचार्यांनीं सांगितलें आहे तसेंच पण त्याशिवाय युगाच्या परिवर्तनात घडणारा कालभेद मात्र ( म्हणजे कालांतरानें साचणारी कसर ) यात स्पष्टपणें दुरुस्त केला आहे

" ज्योतिषामयनं चक्षु " " सूर्य आत्मा जगत " " प्रत्यक्षं ज्योतिषं शास्त्रं चन्द्रार्कौ यत्र साक्षिणौ " " वेदाहि यज्ञार्थं मभिप्रवृत्ता कालानुपूर्वा विहिताश्च यज्ञा । तस्मादिदं काल विधानशास्त्रं यो ज्योतिषं वेद स वेद यज्ञान । " वेदस्य निर्मलं चक्षु ज्योति शास्त्रमनुत्तमम् " इत्यादि [illegible] ज्योतिषशास्त्राचें व कालनिर्णय शास्त्राचें महत्त्व स्थापन करणारीं वचनें अनेक आहेत आणि हा [illegible] आजतागायत अबाधित कायम आहे सर्व जगाचे व्यवहार ह्या काल [illegible] सर्व [illegible] प्राणिमात्रांची उत्पत्ति, स्थिति आणि लय [illegible] गतीशीं आधीन आहेत.

**ज्योतिःशास्त्र म्हणजे आकाशांतील तेजस्वी ज्योतींचें, प्रकाशमान व देदीप्यमान ताऱ्यांचें शास्त्र.** सूर्यादि प्रचंड ग्रहगोल, भौमादि ग्रह आणि अश्विन्यादि नक्षत्रतारे यांच्या गतिस्थितींचें प्रत्यक्ष प्रमाणपत्रक म्हणजे सिद्धांतज्योतिष, गणितज्योतिष किंवा कालनिर्णयज्योतिष ज्योतिषशास्त्राचा अत्यंत महत्त्वाचा असा हा पूर्वार्ध होय ह्यानें ग्रहांची आकाशस्थ स्थिति निश्चित करावयाची ज्योतिषशास्त्राचा दुसरा महत्त्वाचा व सर्वोपयोगी भाग किंवा उत्तरार्ध म्हणजे होराशास्त्र, फलज्योतिषशास्त्र किंवा भविष्यनिर्णयशास्त्र हा होय हे दोन विभाग मिळून एक संपूर्ण ज्योतिषशास्त्र होतें यांपैकीं कोणत्याही एका विभागाला संपूर्ण ज्योतिषशास्त्र असें म्हणता येणार नाहीं

अनादिकालापासून ह्या महत्वाच्या दोन्ही विभागांवर अत्यंत अपूर्व असे ज्योतिग्रंथ प्राचीन आचार्यांनीं करून ठेवले आहेत वेदकालांतील वेदांगज्योतिष आणि त्यानंतरचे सिद्धांत, तंत्र आणि करणग्रंथ हे सर्वांच्या चिरपरिचयाचे आहेत ह्या ग्रंथकर्त्यांच्या वेळची परिस्थिति आणि **सध्याची** सर्व सूक्ष्म साधनयुक्त असलेली परिस्थिती ह्या दोन्हींचा तुलनात्मक रीतीनें विचार केला असता ही गोष्ट कोणाच्याही सहज लक्षांत येईल कीं संशोधनाच्या साधनांचा सर्वस्वीं अभाव असतांना, सध्याच्या सुधारलेल्या सूक्ष्म वेध साधनासारखें कोणतेंही साधन उपलब्ध नसतांना, केवळ आपल्या अचाट बुद्धिमत्तेच्या जोरावर सिद्धांत ग्रंथ निर्माण करण्याचे त्यांनीं केलेलें कार्य अत्यंत उज्वल, उच्च दर्जाचें व भारतीयांना सर्वस्वी अभिमानास्पद असेंच आहे आणि याबद्दल अखिल भारतीय जनता व ज्योतिषी प्राचीन आचार्यांचे अत्यंत ऋणी आहेत सूर्यसिद्धांत, ब्रह्मसिद्धांत, आर्यसिद्धांत सिद्धांतशिरोमणि इत्यादि सिद्धांताचे कर्ते आणि ग्रहलाघवासारख्या करणग्रंथाचे कर्ते यांच्या त्या त्या काळास अनुसरून केलेल्या अप्रतीम कामगिरीबद्दल व शास्त्रसेवेबद्दल ज्याला आदर व आनंद वाटणार नाहीं असा मनुष्य सापडणें शक्य नाहीं

पण, कोणासही हा आनंद व अभिमान वाटतो त्याचें कारण त्यांनी ज्योतिषशास्त्रांत केलेली प्रगति व सुधारणा हेंच आहे पूर्वीच्या ग्रंथावरून केलेल्या गणिताचा दृक्प्रत्ययाशीं फरक पडूं लागला व गणितागत स्थिति एका प्रकारची तर प्रत्यक्ष दृक्प्रत्यय त्याच्या उलट असलें चमत्कारिक दृश्य दिसूं लागलें असें पाहताच सूर्यसिद्धांतादि सिद्धांतकर्त्यांनीं व प्रत्यक्ष ग्रहलाघवकार गणेश दैवज्ञांनीं त्या चुका व तो फरक बऱ्याच अशीं काढून टाकून आकाशस्थ स्थितीशीं जमतील असें आपलें ग्रंथ निर्माण केलें व अखिल भारतवर्षांत त्याचा प्रचार केला **ग्र. लाघवकारांनीं त्यावेळीं दृक्प्रत्यय साधला पण वर्षमान व अयनगति यातील चूक तशीच कायम ठेवली** त्यांनीं जे केलें तें हेंच होय त्यांचें हें कृत्य किंवा कृति पुढें चालवावयाची म्हणजे पंचांगस्थ ग्रहस्थिति आणि आकाशस्थ ग्रहस्थिति व दृक्प्रत्यय यांचा तंतोतंत मेळ पाहिजे भारतीय प्राचीन राशिचक्रारंभस्थान व राशिचक्र स्थिर व कायम राहिलें पाहिजे, गति स्थिति सूक्ष्म व वेधसिद्ध पाहिजेत आणि ह्या सर्व गोष्टी निरयन पाहिजेत ह्या सर्व गोष्टी लो० टिळकांच्या अध्यक्षतेखालीं स्थापन झालें या शुद्धपंचांग प्रवर्तक कमिटीनें अमलांत आणून नवीन करण ग्रंथाची सिद्धी केली सारण्या कोष्टकें केलीं, स्वतंत्र रातीही बसवल्या शुद्धपंचांग सुरू झालें आणि गणितशुद्धतेचा हा योग पूर्ण झाला पंचांगांत सर्वस्वी शुद्धता फक्त टिळक पंचांगानेंच आणली

ज्योतिष शास्त्राचा दुसरा विभाग हाच खरोखर जनतेचें आकर्षण करणारा व जनतेच्या उपयोगाचा भाग होय भविष्य कालाच्या उदरांत कोणत्या गूढ गोष्टी साठवून ठेवलेल्या आहेत हें जाणण्याची तीव्र इच्छा प्रत्येक व्यक्तींत साहजिक असते ती इच्छा पूर्ण करण्याचें आज तरी उपलब्ध साधन म्हणजे फलज्योतिषशास्त्र हें एकच होय ह्या शास्त्राच्या योगानेंच भविष्यकालीन शुभाशुभपरिस्थितीचा बोध होऊं शकतो

फलज्योतिष विभागावर मोठमोठ्या प्राचीन ज्योतिषाचार्यांचें महत्त्वाचें ग्रंथ आहेत वराहमिहिराचार्य, कल्याणवर्मा, केशव दैवज्ञ यांनीं होरा विभागावर ग्रंथ केलेले आहेत, बृहत्संहिता बृहज्जातक, सारावली, जातकपद्धति, अर्थात केशवीजातक, सर्वार्थ चिंतामणि इ० ग्रंथांना या शास्त्रांत मिळालेलें प्राधान्य हें यथायोग्य असेंच आहे.

कोणत्याहि काळांत व कोणत्याहि वेळीं, कोणत्याही शास्त्राची मूलभूत तत्त्वें किंवा मूलभूत सिद्धांत हे एकच असावयाचे व असतात पण ते सिद्धांत किंवा तत्त्वें देशकाल, वर्तमान परिस्थितीप्रमाणें कशी लागू करावयाची हाच कायतो मुख्य प्रश्न असतो ह्या प्रश्नाची संगति जुळविता आली म्हणजे ह्या शास्त्राचा उलगडा सहज होतो.

सारांश, अशाप्रकारें दोन विभागात्मक असें हें ज्योतिषशास्त्र आहे ह्या शास्त्राच्या शिक्षणाचा प्रसार जास्तींत जास्त जितका करता येईल तितका करावा, ह्या शास्त्राचे जाणते लोक निर्माण करावे, (तयार करावे) अगदीं सुलभ रीतीनें सहज कळेल अशा भाषेंत स्पष्ट मराठींतून छापील "पाठ" पाठवून शिक्षण द्यावें, आणि अशा तऱ्हेनें विचारवंत, नियमावंत, व

ज्ञानवत लोकांची संघटना घडवून आणून फलज्योतिष व शुद्धपंचांग प्रसाराचें, जागृतीचें व संशोधनाचें कार्य चालावें, ह्या मुख्य उद्देशानें व हेतूनेंही ज्योतिष शिक्षण देण्याची योजना आम्ही केली ही कल्पना, योजना व कार्य यशस्वी रीतीनें पार पडून " जितुकें काहीं आपणास ठावें । तितुकें हळूहळू शिकवावें । शाहणे करुनि सोडावें । सकल जन । ह्या उक्तीला अनुसरून जनतेची सेवा आमच्या हातून परमेश्वरानें घडवून आणली याबद्दल जगत्पालकाचें आभार कोणत्या शब्दांनीं मानावें ? तो दयाघन प्रभू सर्वसमर्थ आहे त्याची कृपादृष्टि आमच्यावर सदैव अशीच असो.

ह्या ग्रंथाच्या प्रथमावृत्तीपेक्षा द्वितीयावृत्तींत माहितीचा व विषय विवेचनाचा व्याप किती वाढला आहे हें कोण त्याही वाचकास सहज कळून येईल. सांगोपांग आणि अतिशय विस्तृत अशा विवेचनाचा व्याप जर अनेक प्रकारच्या उदाहरणासह (समूल) वाढला तर खरोखर या विषयावर चार पांचशें पानांचे १२-१४ ग्रंथ तरी सहज होतील व मागें पुढें जर कोणी असा दीर्घोद्योगी व धन साहाय्य असलेला कर्तबगार संशोधक पुरुष निर्माण झाला तर तो हें कार्य करीलही ज्योतिष ज्ञानकोश निर्माण होऊन सर्व साधन युक्त हिंदी वेधशाळेंत भारतीय नाटिकल तयार होणें व ज्योतिष शास्त्राची ध्वजा अखिल जगात व भारतवर्षांत फडकत राहणें ही ह्या शास्त्राच्या उन्नतीची परम सीमा होय

वास्तविक ह्या कार्यास द्रव्यदृष्ट्या सर्वतोपरी साह्य करणें आणि तें साह्यही आपण होऊन करणें हें धनिकाचें, श्रीमान् लोकाचें व ज्यांच्याजवळ कुबेरासमान संपत्ति नांदत आहे, त्यांचें कर्तव्य आहे, आमच्या राष्ट्रांतील ज्ञान संपत्ति वाढविण्याचें हें योग्य व पवित्र कार्य पूर्वीचे राजे रजवाडे व राष्ट्राधिपती मोठ्या आनंदानें व अहमहमिकेनें करीत असत आणि त्यामुळेंच प्राचीन शास्त्राचें संरक्षण, संवर्धन, व संशोधन झालें आजच्या काळातही पाश्चिमात्य राष्ट्रें शास्त्र संशोधनाकरिता कोट्यावधी रुपये प्रत्यही खर्च करीत आहेत पण आमच्या देशांत पहावें तर निकडे तिकडे स्वस्थता, चैनबाजी आणि नाटकं व रेसेस बाजीकडे सर्व व्यय अशा स्थितींत ज्योतिषशास्त्रसंशोधनाचें, व प्रसाराचें कार्य किती दुर्घट होत असेल त्याची कल्पनाच करावी

वर वर्णन केलेल्या विकट परिस्थितींतही स्वावलंबनाच्या, हिंमतीच्या आणि शास्त्रसेवेच्या-दृढनिश्चयाच्या जोरावर फलज्योतिष संशोधनाचें व शास्त्रशुद्धप्रचाराचें कार्य अखंड रीतीनें परमेश्वर कृपेनें चालू आहे ही खरोखरच समाधानाची गोष्ट होय व याबद्दल ज्योतिषशास्त्र सेवकाचें मन पूर्वक अभिनंदन केलें पाहिजे

ज्योतिष शिक्षण क्रमाची अर्थात् ज्योतिषशिक्षक व जातककेसरीचा सुरवात **" विद्यातुराणां न सुखं न निद्रा " अशा आतुर** ज्ञानग्राही करता झाली असून ज्यो शि क्रमाच्या सर्व शिक्षणपत्रकाचें एकत्रीकरण म्हणजे हा **ज्योतिष शिक्षक अथवा जातक केसरी** ग्रंथ होय

ह्या ग्रंथाच्या कामीं ज्या ज्या विद्वान् लोकांनीं सूचनाच्या रूपानें साह्य केलें त्या सर्वांचें आणि ज्या प्राचीन व अर्वाचीन ग्रंथाचा उपयोग ह्या ग्रंथाचे कामीं झाला त्या सर्वांचे आम्ही अत्यंत आभारी आहों

हा ग्रंथ शास्त्रीय, परिभाषिक शब्दयुक्त आणि गणिताच्या आकडेमोडीचें व निरनिराळ्या कोष्टकाचें खडतर काम यामुळें क्वचित् एखाद्या स्थळीं हस्तदोष, दृष्टिदोष, मुद्रणदोष राहण्याचा संभव आहे करिता असा मुद्रणदोष कोणांस आढळल्यास तो आमच्याकडे कळविण्याची तसदी घ्यावी व अशा मुद्रणदोषाबद्दल विद्वज्जनांना क्षमा करावी अशी प्रार्थना आहे

प्राचीन ज्योतिषाचार्यांनीं फलज्योतिषशास्त्राचा जो तत्त्वरूप व सिद्धांतरूप मजबूत पाया घातला आहे, त्या पायाच्या आधारावरच ग्रंथरूपी आमची ही इमारत उभारली आहे अर्थात् ह्या इमारतीचे धनी व मूळ पुरुष प्राचीन ज्योतिषाचार्य हेंच होत त्यांचींच तत्त्वें विशद रीतीनें आम्ही यांत सांगितलीं आहेत

जे ज्ञानार्थी, आर्त व जिज्ञासू आहेत, ज्यांना ज्ञान मिळवावयाचें आहे, त्यांना गुरूभरीतीनें ज्ञान होण्यासाठीं आणि जे तज्ज्ञ व ज्ञानी आहेत त्यांच्या संतोषार्थ, रंजनार्थ व समाधानार्थ हा ग्रंथ लिहिला आहे

जगांत कोणतीही गोष्ट सर्वांशीं निर्दोष असी नाहीं करिता ह्या ग्रंथांत जे काहीं न्यूनाधिक्य दिसेल, त्याबद्दल विद्वज्जनांनीं क्षमा करून हंसक्षीर न्यायानें यांतील गुणग्रहण करावें व दोष टाकून द्यावे अशी सर्वांस सप्रेम प्रार्थना आहे

मिति पौष शु १ रविवार शके १८०९<br>तारीख २ जानेवारी १९३८

ज्योतिषशास्त्राचा नम्र सेवक,<br>**पंडित रघुनाथशास्त्री मोरेश्वर पटवर्धन.**

हिंदुस्थानचे अनभिषिक्त भूपति.

## लोकमान्य बाळ गंगाधर टिळक.

" पंडित रघुनाथशास्त्री यांचा ज्योतिषशिक्षणक्रम ( कोर्स ) घरच्या-घरीं ज्योतिषशिक्षण घेण्यास अत्यंत उपयुक्त व संग्राह्य आहे.

# ज्योतिषशिक्षक अथवा जातककेसरी ग्रंथाची अनुक्रमणिका.

पंचांग चिंतामणि

## (शुद्धपंचांग सारणी)



## कुंडलीसंग्रह भाग १.



## कुंडलीसंग्रह भाग २.



---

ज्योतिषशिक्षक अथवा जातककेसरी ग्रंथांचे कर्ते

# पंडित रघुनाथशास्त्री मोरेश्वर पटवर्धन

ज्योतिर्वि.

ज्योतिषरत्न——श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्य, करवीर–संकेश्वर.

ज्योतिर्भूषण——श्रीमत् अनंताचार्य महाराज श्री. प्रतिवादी भयंकर मठ, काशी

ज्योतिषसुधाकर——भारतधर्म महामंडळ, काशी.

# ज्योतिषशास्त्र–संशोधनाचें, व
# शुद्धपंचांग प्रवर्तनाचे प्रमुख कार्यकर्ते.

कै. प्रोफेसर विश्वनाथ बळवंत नाईक,
एम्. ए., पुणें
मुख्य गणिताध्यापक, फर्ग्युसन कॉलेज.
अध्यक्ष, शुद्धपंचांग प्र. मंडळ.

कै. प्रिन्सिपाल गोविंद सदाशिव आपटे,
एम्. ए., बी. एस्. सी.
सुपरिंटेंडेंट, शिवाजी वेधशाळा, उज्जनी
का. सभासद शु. प. मंडळ

ज्योतिर्भूषण व गणकचूडामणि
शिवराम गणपत पवार
सर्डे, जि. अहमदनगर
का. सभासद, शुद्धपंचांग मंडळ.

श्री. रामचंद्र विनायक पटवर्धन
बी. ए. एल. एल. बी. पुणें.
भारतीय वेधपद्धति ग्रंथाचे कर्ते
का. सभासद, शुद्धपंचांग मंडळ

# ज्योतिषशास्त्र–संशोधनाचें, व शुद्धपंचांग प्रवर्तनाचे प्रमुख कार्यकर्ते.

साहित्याचार्य, श्री. न. चिं. केळकर,
बी. ए., एल. एल. बी. पुणें
निवृत्त संपादक, केसरी
उपाध्यक्ष, शुद्धपंचांग मंडळ

श्री जनार्दन सखाराम करंदीकर
बी. ए. एल. एल. बी. पुणें
संपादक—केसरी
का. सभासद शुद्धपंचांग मंडळ

कै. विनायक त्र्यंबक आगाशे
एम्. ए. एल. सी. ई.
मा. सुपरिंटेंडिंग इंजिनियर पुणें
उपाध्यक्ष, शुद्धपंचांग मंडळ

कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर,
बी. ए. एल. एल. बी. जळगाव-जामोद
उपाध्यक्ष, शुद्धपंचांग मंडळ

# ज्योतिषशास्त्र संशोधनाचें व शुद्धपंचांग प्रवर्तनाचे प्रमुख कार्यकर्ते.

ज्योतिर्विद्याभूषण कै०
विनायकशास्त्री खानापूरकर,
शुद्धपचागाचे कर्ते पुरस्कर्ते

के नीळकठ विनायक ऊर्फ कोंडोपंत छत्रे
एल्. सी ई पुणें.
पटवर्धनी पचाग चालक

श्रीमंत सरदार कै
आबासाहेब पटवर्धन, पुणें.
पटवर्धनी पंचाग प्रवर्तक

कै रा ब प्रोफेसर केरोपत छत्रे,
मुख्य गणिताध्यापक, डेक्कन कॉलेज पुणे.
पटवर्धनी पंचाग प्रवर्तक

# ज्योतिषशास्त्र संशोधनाचें व शुद्धपंचांग प्रवर्तनाचें

## प्रमुख कार्यकर्ते.

ज्योतिषसुधाकर
रामचंद्र पांडुरंगशास्त्री मोघे
वसईकर ज्योतिषी मु. वसई
सभासद, शुद्ध पं. मंडळ

पंडित दत्तात्रय तुकारामशास्त्री
पणशीकर, गोवें
सहा. सभासद, शु. पं. मंडळ

कै. श्री सद्गुरु विनायक रामचंद्र उर्फ
अण्णासाहेब पटवर्धन, पुणें
पटवर्धनी पंचांगाचे कर्ते पुरस्कर्ते

श्रीमत् अनंताचार्य महाराज
प्रतिवादी भयंकर मठ, कांची
शुद्धपंचांगाचे कट्टे सहाय्यक

# ज्योतिषशास्त्र-संशोधनाचें व
# शुद्धपंचांग प्रवर्तनाचे प्रमुख कार्यकर्ते.

पंडित वीरेश्वरशास्त्री द्रवीड
प्रोफेसर, संस्कृत कॉलेज, जयपूर
शुद्धपंचांगाचे सहाय्यक

ज्योतिर्विद पुरुषोत्तम रामचंद्र मोघे
वसईकर मु. वसई
सभासद, शुद्ध प. मंडळ

महामहोपाध्याय पंडित श्रीधरशास्त्री पाठक
माजी सं. अध्यापक, डेक्कन कॉलेज
का. सभासद, शु प. मंडळ

पंडित कृष्णशास्त्री घुले
नागपूर
शुद्धपंचांगाचे सहाय्यक

# ज्योतिषशिक्षक अथवा जातककेसरी

( प्रथमावृत्ति )

ह्या ग्रंथाबद्दल

# अखिल हिंदुस्थानांतील तज्ज्ञांचे

# अभिप्राय

सोईकरिता पंडित रघुनाथशास्त्री यानीं हा ज्योतिषशिक्षणक्रम तयार केला असल्यानें जिज्ञासूंस या पुस्तकाच्या साह्यानें घरच्या घरीं फलज्योतिषाचें बरेंच ज्ञान संपादन करता येईल हा शिक्षणक्रम कै० लो. टिळक यानीं स्वत वाचून पाहून "हा शिक्षणक्रम उपयुक्त व सग्राह्य आहे" असा अभिप्राय दिला आहे या शिक्षणक्रमात ( पुस्तकात ) जन्मकुंडली तयार कशी करावी येथपासून तों कुंडलींतील सर्व प्रकारची फलें वर्तविण्याविषयीची सर्व भागाची सोदाहरण माहिती दिली आहे. याखेरीज, प्रश्न कुंडली, स्पष्ट ग्रह करण्याची माहिती, मुहूर्तपत्रिका वगैरे माहिती पुस्तकात आहे

## ज्योतिषशिक्षण कोर्सबद्दल "केसरी" चा अभिप्राय.

### ज्योतिषशिक्षक अथवा जातककेसरी

( ५ ) लें०—( प रघुनाथशास्त्री, भारतीय ज्योतिर्विद् मंडळ, शुक्रवार पेठ, पुणें.) फलज्योतिष विषयाच्या जिज्ञासूंना घरच्याघरीं ज्योतिषशिक्षण देण्याची सोय करण्यासाठीं प रघुनाथशास्त्री यानीं लेखी शिक्षणक्रम सुरू केला. त्यात पंचाग कसें पहावें येथपासून तों कोणत्याहि ठिकाणचें शुद्ध पंचाग तयार करण्यापर्यंत, कुंडली माडण्यापासून तों कुंडलीरहस्यापर्यंत आणि साध्या मुहूर्तापासून तों लग्न मुजीच्या अशात्मक मुहूर्तांपर्यंत सर्व विषय विस्तारपूर्वक या ग्रंथात दिले आहेत. त्यामुळें **हा ग्रंथ एकांगी नसून त्यांत गणितज्योतिष, मुहूर्तज्योतिष आणि फलज्योतिष या तीनहि भागांचा अपूर्व असा त्रिवेणी संगम झाला आहे**

विद्यार्थ्यांच्या सोईकरता एकदर अभ्यासक्रमाचे पाच भाग केले होते ते सर्व आता एकत्र करुन प्रस्तुतचें सुमारें ६५० पृष्ठांचें हें पुस्तक प्रसिद्ध झालें आहे. **एवढ्या पुस्तकाचें अध्ययन केल्यास कोणीही उत्तम ज्योतिषी बनूं शकेल.** या पुस्तकात सायन निरयन, नक्षत्रें, अयनाश किती घ्यावे वगैरे चर्चा बरीच मार्मिक आहे. **जन्मकुंडलीसंबंधाची इतकी माहिती इतरत्र एकाच ग्रंथांत क्वचितच सांपडेल**

आकाशज्योतिष, नक्षत्रांचें ध्रुवाभिमुख व कदंबाभिमुख भोग आणि शर वगैरे माहिती गणित करण्यास महत्त्वाची आहे यातच कुंडलीसंग्रह दिला असून त्यावरुन भाग्यवान पुरुषाच्या कुंडलींत कोणते योग असतात ते सहज प्रत्ययास येत आहेत. यातील आयुर्दायविचार, मातृपितृसुख, बुद्धि, विद्या, संततीयोग, विवाह व स्त्रीसौख्य वगैरे माहितीहि महत्त्वाची आहे अशा रीतीनें **एकंदर ग्रंथ विविध माहितीनें परिपूर्ण असून ज्याला ज्योतिषशास्त्राचें सांग अध्ययन करावयाचें असेल त्याला हा ग्रंथासारखें एकत्र साधन निदान मराठींत तरी आज उपलब्ध नाहीं** अनेक विद्वानांनीं हा ग्रंथावर अनुकूल अभिप्राय दिले आहेत. त्यांत लंडनच्या ॲस्ट्रॉलॉजिकल सोसायटीचे उपाध्यक्ष डॉ व्ही व्ही. रमणशास्त्री याचा अभिप्राय फारच उत्कृष्ट आहे. त्यावरुन या ग्रंथाची योग्यता महाराष्ट्राला पूर्णपणें पटेल.

( ६ ) **महाराष्ट्राचा अभिप्राय**—ज्योतिषशिक्षक अथवा 'जातक केसरी' हें पुस्तक पुण्याच्या पचाग संशोधन कमिटीचे चिटणीस पं. रघुनाथशास्त्री यानीं फलज्योतिष शिकणाऱ्या विद्यार्थ्यांच्या सुलभशिक्षणासाठीं लिहून प्रसिद्ध केलें आहे ज्यास गुरुगृहीं राहून गुरुमुखानें फलज्योतिषाचें शिक्षण घेण्याची सोय नाहीं अशा विद्यार्थ्यांस व जिज्ञासूंस घरबसल्या स्वत सच फलज्योतिष वर्तविता यावें अशी या पुस्तकाची रचना केली आहे

ग्रहांच्या उदयास्ताचा मनुष्याच्या आयुष्यावर परिणाम घडत असेल हें शक्य आहे, पण हा परिणाम काय होतो, व कोणत्या स्थळीं किती होतो, त्याला अपवाद काय आहेत इ० सर्व गोष्टी मानवजातीच्या तर्काच्या कक्षात आल्या आहेत कीं नाहींत व आल्या असतील तर त्या कितपत सच्या आहेत याविषयीं अजून ठाम मत देता येत नाहीं. तरी महाडकर ज्योतिषी कै० बाबाजीराव पटवर्धन किंवा गोविंद चेट्टियर यांच्यासारखे ज्योतिषी जेव्हा कधीं कधीं नजरेस पडतात, तेव्हां फल-ज्योतिषाच्या सत्यत्वाबद्दल क्षणभर खात्री पटल्याशिवाय रहात नाहीं. पण त्यावरुन ज्योतिषशास्त्राचें अस्तित्व जरी सिद्ध होतें तरीच दुर्दैवानें एक गोष्ट सिद्ध होते कीं, गांवोगांव आपणास ज्योतिषी म्हणून येणारे जे लोक बुद्ध्या भोंदित बसलेले आढळतात, त्यांच्या हातांत मात्र फल-ज्योतिषाचें कांहींच ज्ञान लागलेलें नसतें ! महाडकर ज्योतिषासारख्या एखाद्यालाच ती स्थिती प्राप्त झालेली असते आणि म्हणूनच ते एखाद्या माणसाचें तोंड पाहून केवळ त्याचीच नव्हे तर त्याच्या एखाद्या मित्राचीहि जन्मकुंडली बरोबर मांडू शकतात ! तेव्हां ज्योतिषशास्त्राचें रहस्य जरी निदान अजून फारच थोड्यांस कळलें आहे तथापि हें रहस्य

आपणास कळावें अशाबद्दल उत्कंठा असणारे लोक आहेत अशा लोकांत आजपर्यंत हिंदुस्थानात या शास्त्राची जी प्रगति झाली आहे व ज्या पद्धति अनुभवानें शास्त्रशुद्ध म्हणून ठरल्या आहेत त्या पद्धति व प्रगति या सर्वांची माहिती सुलभ व बालबोधरीतीनें, खुलासेवार व उदाहरणासहित एकत्र करून या पुस्तकात संकलित करण्याचें काम पं रघुनाथशास्त्री यांनी उत्तम बजाविलें आहे. हें पुस्तक वाचून सामान्य बुद्धीच्या माणसासहि फलज्योतिषाचे सामान्य आडाखे समजू लागतील व तो ज्योतिषी बनेल

पं. रघुनथशास्त्री हे नव्या शास्त्रशुद्ध व सचारित ( टिळक ) पंचागाचे आधारें भविष्यकथन शिकवीत असल्या कारणानें त्याचीं फलें जास्त बरोबर उतरण्याचा संभव फार आहे सुमारें ६५० पृष्ठाच्या या पुस्तकात ' ज्योतिषी ' म्हणविणारास लागणारी सर्व माहिती संकलीत केली आहे ज्योतिष शिकणाऱ्या विद्यार्थ्यांची ही उत्कृष्ट सोय पं. रघुनाथशास्त्री यांनीं करून दिली याबद्दल आम्ही त्याचें अभिनंदन करितों.

## ब्रिटिश ॲस्ट्रॉलॉजिकल सोसायटीचे उपाध्यक्ष डॉक्टर रमणशास्त्री यांचा अभिप्राय.

**Mabasay Panditji, Your two astrological books in Mahrathi-**

The *Jyotisaniksak* and *Sachitrakundalisangraha* are well conceived and excellently executed, and reveal your profoundity of knowledge in the mathematics and prognostics of Hindu astrology. The illustrative themes included in the second work, are sufficiently varied, but I should have been gladder if you had added to them those of Mahatma Gandhi ( whose picture you however publish ) and the late Shankar Balakrisna Diksit, the talented author of the *Bharatiya-Jyotissastra* in Mahrathi Theme No 32 of Prof Paranjpe is a rare datum, for which the student of astrology must thank you

You have evidently adopted the analytical method in your *Jyotisaniksak* which deserves high commendation for its quality of clarity, comprehensiveness of grasp, and edifying method You seem to have done for the exposition of the theory and art of Hindu astrology, what the late Sudhakara Dvivedi and the late Sankar Balakrisna Diksit did, in their respective *Ganakatarangini* and *bharatiya-Jyotisastra*, for the history of Hindu astronomy and astrology If the comparison be not invidious or odious, I will say that the only astrological compilation with which yours may bear *comparison*, is the "Jataka-Bhaskara", in Tamil, of the late V Sabhapati Aiyyar of Jaffna, published in 1909. But, in two respects, your *Jyotisniksak* decidedly eclipses the " Jataka-Bhaskara, " to wit, in the luminous treatment you accord to *Bhavasphuta* and in your inclusion of *yatra muhurta* and *dampatya-yoga* G. H Keskar's " Combined Introductory Astrology " endeavours to present a summary outline of both the *sayana* and the nirayana systems of genethiacal prediction Though the last book makes an honest attempt to estimate the utilitarian values of the two systems the net impression it leaves upon the mind of the serious student, is that neither system is handled with the ripe empirics of an expert By the side of your Jyotisaniksak, Keskar's book sinks to the level of a mediocrity. Mr. B Suryanarayana Rao's books on the *nirayana* system of prediction, have been before the Hindu public for nearly a quarter of a

century now, but in none of them does he deal with the mathematics of astrology, with that thoroughness, insight or limpid quality which I notice in yours.

I think, you will permit me to point out that, at least, a "table of contents" should be prefixed to your *Jyotisasikshak*, to facilitate quick reference. It is indeed a matter for poignant regret that the illustrious gentleman, Bal Gangadhar Tilak, under whose inspiration you commenced to write your valuable book, did not live to see its completion, and write the long-expected Introduction which should certainly have added considerably to the worth and lustre of your already meritorious piece of work. How undaunted and pure-hearted he was, among the sons of India, will be patent to any one who looks at the theme you have already furnished. Your book may, in sense, be said to be a posthumous spiritual child of his, since it is possessed of all the merits to vindicate such a kinship.

Dr. V. V. Raman Sastrin,
Ph. D. F. R. A. S. M. R. A. S.
Member of the London Mathematical Society and Hon. Vice-President of the British Astrological Society, London.

Yours very sincerely

**V. V. Ramana Sastrin**

(७) **महाशय पण्डितजी**—" फलज्योतिषविषयक तुमचीं दोन पुस्तकें—**ज्योतिषशिक्षक** आणि कुण्डलीसंग्रह ह्यांतील विषयाची आखणी आणि त्याची माण्डणी किंवा रचना हीं दोन्ही उत्तम साधलीं आहेत, त्यामुळें गणितज्योतिषांतील आणि भारतीय फलज्योतिषांतील तुमचें प्रगाढनैपुण्य ह्याची प्रचीति तात्काळ पटते. कुण्डलीसंग्रहांतील विवरण तर नानाप्रकारच्या कुण्डल्यांचें केलेलें आहे. परंतु त्यांत महात्मा गांधी आणि ज्यो. शंकर बाळकृष्ण दीक्षित ह्यांच्या कुण्डल्यांचें विवेचन असतें तर फारच उत्तम झालें असतें. तथापि प्रो. परांजपे ह्यांची कुण्डलि जी दुर्मिळच असावयाची ती तुम्हीं उपलब्ध करून दिली ह्याबद्दल फलशास्त्रजिज्ञासू तुमचे आभारीच राहतील.

" **ज्योतिषशिक्षकांतील** विषयचर्चेमध्यें तुम्हीं पृथक्करण पद्धतीचा अवलंब केला आहे हें उघड दिसतें. त्यायोगानें विषयाची छाननी करण्याची हातोटी, त्याचें संपूर्ण आकलन करण्याची शक्ति आणि उदात्त विचारसरणी ह्या तुमच्या गुणांचा जो प्रत्यय येतो त्याबद्दल तुमचें कितीतरी गौरव केलें पाहिजे मला तर असें वाटतें कीं, कै॰ महामहोपाध्याय सुधाकर द्विवेदी ह्यांनीं **गणकतरंगिणीमध्यें** आणि ज्यो॰ शंकर बाळकृष्ण दीक्षित ह्यांनीं भारतीय ज्योतिषशास्त्राचा इतिहास ह्या ग्रंथामध्यें विवेचन आणि उदाहरणयुक्त स्पष्टीकरण ह्या दिशेनें जें कार्य केलें त्याच दिशेनें तुम्हीं आपल्या ग्रंथांत फलज्योतिषाची उपपत्ति आणि उदाहरणपूर्वक रहस्य याचा खुलासा केला आहे. इतका कीं, तामीळ भाषेंत **जातकभास्कर** हा जो प्रसिद्ध ग्रंथ आहे त्याच्याशींच तुमच्या ग्रंथाची उत्तम तुलना करता येईल. परंतु तुलना करणें हें काम कटुकर्तव्य आहे. त्यांत कोणाकडे तरी थोडा दोष येतोच, पण हा आक्षेप पत्करूनहि मी म्हणतों कीं, **जातकभास्कर ग्रंथापेक्षां** सुद्धा सुबोध विवेचनाच्या दृष्टीनें **तुमचाच ग्रंथ सरस आहे.** अर्थात्‌च "Combined Introductory Astrology" या नांवाचें जें एक पुस्तक अलिकडे प्रसिद्ध झालें आहे तें इतकें सामान्य प्रतीचें आहे कीं, तुमच्या ग्रंथापुढें त्याचें नांवच नको. फार काय आज २८ वर्षेपर्यंत **सूर्यनारायणराव** ह्यांचे ग्रंथ ह्या प्रांतांत गाजत आहेत. परंतु त्यांत फलज्योतिषाला लागणारें गणित नाहीं, ही जी उणीव भासत होती ती हे तुमच्या ग्रंथांत नाहीं, **इतक्या परिपूर्णतेनें, भेदक दृष्टीनें आणि निर्दोष पद्धतीनें तुम्हीं जो ग्रंथ लिहिला आहे त्यांतील हे अनेक गुण मला इतरत्र कोठेंच आढळले नाहींत.**

आतां खेदाची गोष्ट अशी कीं लोकमान्य **बाळ गंगाधर टिळक** ह्या ज्या लोकोत्तर विभूतीच्या प्रोत्साहनानें तुम्हीं ग्रंथास आरंभ केला तो महापुरुष तुमचें कार्य पूर्ण झालेलें पाहण्यास आणि कबूल केल्याप्रमाणें त्याची प्रस्तावना

( १३ ) अनेका नतयः सन्तु भवत्सु ज्योतिर्वित्सु, अयि विद्वांसः भवाद्भिः प्रेषितं पुस्तकद्वयं ज्योतिषशिक्षकश्च सचित्रः कुंडलीसंग्रहश्चेति सामोदं सधन्यवादं च लब्धवानस्मि । भवत्प्रणीतं पुस्तकं तावत्प्रथमं श्रमसाध्यं च प्रयत्नसाध्यं चेति किं पुनरुक्त्या । लोकेषु नूनमिदं नितांतमुपकारकं स्पष्टतया च उपयुक्तसर्वार्थदर्शकमिति मोदवहमेतदिति मे मनीषा, उत्तमस्य किमधिकया स्तुत्येत्यलं क्रियते ।

**पंडित नारायणशास्त्री मराठे,** प्राज्ञपाठशाळा, वाई.

( १४ ) नैकाः प्रणतयः भवदीयम् ६।१२।२१ दिने लिखितेन पत्रेण " ज्योतिषशिक्षक " पुस्तकं च सचित्र " कुंडली " संग्रहपुस्तकं द्वित्रिदिनात्पूर्वंलब्धम् । न वयं ज्योतिषशास्त्रकृतपरिश्रमाः । नाप्यस्माभिस्तद्विषये किमप्यधीतम् । अतो न भवाद्विहितपुस्तकविषये तद्विषयालोचने नाभिप्रायदाने समर्थाः वयम्, तथापि भवाद्भिः श्रमबाहुल्यमुरीकृत्य विहितेनानेन ग्रंथेन ज्योतिषविषयजिज्ञासूनां महोपकारो भविष्यति इति ज्ञापयितुं प्रमोदो भवतीति । किं बहुनालेखनी व्यापारेणेति शम् ।

**बाळाचार्य गजेंद्रगडकर, सातारा.**

( १५ ) ज्योतिषशिक्षक व कुंडलीसंग्रह ही महत्त्वाचीं पुस्तकें येऊन बरेच दिवस झाले. मलिन झालेल्या भारतीय ज्योतिषशास्त्राचें सम्यक् शोधनपूर्वक संवर्धन करण्याचें महत्कार्य आपण स्वीकारलें आहे हे भारतीयांवर मोठे उपकार आहेत. आपलें ज्योतिषशिक्षक पुस्तक तर फारच उपयोगी झालें आहे. ज्योतिष विषयाची आवड असलेल्या लहान मोठ्यांस व विद्वान अविद्वानांस आपला ज्योतिषशिक्षक घरबसल्या पत्रिकेचें व फलदेशाचें सांगोपांग शिक्षण देईल यांत संशय नाहीं. तिथि म्हणजे काय हें शेंकडा फार थोड्यांस माहीत असेल. शास्त्री, ज्योतिषि म्हणविणारांचा देखील आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ चालतो. मग इतर जनांची कथा काय ? या बाबतींत आपण तिथ्यादि पंचांगाची आपल्या ज्योतिषशिक्षकांत उपपत्ति दिली व इतरहि पुष्कळ माहिती दिली आहे. यामुळें हें पुस्तक बहुत उपयोगी झालें आहे.

**दत्तात्रय तुकारामशास्त्री पणशीकर, गोवें.**

( १६ ) नतिपूर्वकमाविदयति यत्किल पंचपोवादिनेभ्यः प्राक् प्राहिण्वं तत्रभवन्तो मत्सविधे पुस्तकद्वयं यज्ज्योतिषशिक्षकमेकं अपरं च चित्रैश्चित्रितः कुंडलीनां संग्रह इति तत्पुस्तकद्वयविषयेऽपि याथातथ्यतो वक्तुमहमसमर्थः तथाविधविषयानभिज्ञत्वात् दुरधिगमः खलु कार्तान्तिकराद्धांताः परं प्रजिजाने अस्मिन्पुस्तके यद्विषयजातं प्रत्यपादि तत्र भवाद्भिः कार्तान्तिकचूडामणिभिः भविष्यकथनं ग्रहाणां मित्रारित्वं फलज्योतिषं तेन गृह एवोपविश्य सर्वं दैवभागधेयं ज्ञातुं सुलभं भवेदिति ।

संपदां आगमाः विपदा निर्गमाः खलु ग्रहाधीना एव अतोऽवश्यं ग्रहादिज्ञानं तदर्थमस्ति च ग्रन्थापेक्षा सा चानेन ग्रन्थेन परिपूरितेति मन्ये । यद्यपि वासिष्ठे पौरुषमेव बलीय इति अभाणीत् भगवान् वसिष्ठस्तथापि तस्मिन्नेवाग्रे द्वे चक्रे किल व्यवहितिशकटिकायाः पौरुषं दैवं च तत्रनैकेन चक्रेण शकटिका गन्तुं शक्नोति अतः दैवमपि शरणीकरणीयम् अत एव भवभूतिराह ।

अद्वैतं सुखदुःखयोरनुगुणं सर्वास्ववस्थासु यत् । विश्रामो हृदयस्य यत्र जरसा यस्मिन्नहार्यो रसः ॥ कालेनावरणात्ययात् परिणते यत्स्नेहसारे स्थितं । भद्रं तस्य सुमानुषस्य कथमप्येकं हि तं तत्प्राप्यते ॥ अस्मिन्पद्ये भगवतो रामचंद्रस्यापि कर्थकार इति हंत आस्तामेवंविधानि वचनानि बहुशः उद्धतानि श्रीमाद्भिः स्वग्रन्थ इति तस्मादेवविदां कुर्वन्तु सुधिय इत्युपरम्यत ।

अनेन ग्रन्थेन बह्वी लोकोपकृतिर्भूयात् जना अपि प्रतिपदं दैवमेव शरणं मन्यमानाः पुरुषकाराद्विरताः सन्तोऽन्यत्र शरणमलभमानाः दैवमनुगन्तारोऽनेन ग्रन्थेन दैवं याथातथ्यतो जानीयुरिति विश्वसिमि ।

ये केचन ज्योतिःशास्त्रं वेदमूलम् अस्ति वानवेति मन्यते तेऽत्र सावधाना भवन्तु ज्योतिषशास्त्रेऽपि युगपरिमाणद्वारेण चंद्रादित्यादिग्रनिविभागेन तिथिनक्षत्रज्ञानमविच्छिन्नसंप्रदायगणितानुमानमूलम् ग्रहसौस्थ्य दौःस्थ्यनिमित्तपूर्वक. कृतशुभाशुभकर्मफलविपाकसूचनम् तद्गतशांत्यादिविधानद्वारेण वेदमूलम् ज्योतिषशास्त्रमित्यत्रः ।

**( सरस्वतीभूषण ) वामनशास्त्री किंजवडेकर, पुणें**

संस्कृत मुख्याध्यापक, न्यू पूना कॉलेज.

( १७ ) रा. रा. पंडित रघुनाथशास्त्री पटवर्धन ज्योतिषी यांनीं हे ज्योतिषशिक्षक या नांवाचें पुस्तक निर्माण केलें. यांतले कांहीं विषय आम्हीं पाहिले. यांत कुंडलीवरून ग्रहांचीं फलें काढण्याचा प्रकार बालबोध आहे. तेव्हां ज्योतिषशास्त्राचा स्वतंत्र अभ्यास करूं इच्छिणाऱ्या लोकांस हा ग्रंथ बहु उपयोगी आहे असें आम्हांस वाटतें करितां

आमची उक्त शास्त्रीबुवांना ही विनती आहे कीं,या पुस्तकाचा अनुवाद हिंदी भाषेंत झाल्यास बहुत देशात याचा उपयोग होईल. अशा प्रकारचा ग्रंथ आमचे पाहण्यात कमी आला आहे आता आम्ही विश्वनाथाची हीच प्रार्थना करीत आहो कीं, शास्त्रीबोवानीं हें कार्य हातीं घेतलें आहे, त्याची उत्तरोत्तर वृद्धी करून त्याचें मनोरथ सिद्ध करो

**महादेवशास्त्री घाटे, काशी.**

( १८ ) पंडित रघुनाथ शास्त्री ज्योतिषी यानीं लिहिलेला ज्योतिषशिक्षकग्रंथ सर्वांग सुंदर आणि श्रेष्ठ दर्ज्याचा आहे या ग्रंथाखेरीज फलज्योतिष विवेचनाचा सोपपत्तिक असा दुसरा ग्रंथ उपलब्ध नसून यावरून प्रत्येकास ज्योतिषज्ञान सहज होईल

**( महामहोपाध्याय ) पंडित रघुपतीशास्त्री, अध्यक्ष ज्योतिर्विन्महामंडळ ग्वाल्हेर**

( १९ ) पंडित रघुनाथ शास्त्री यास —

आपण केलेला ज्योतिष शिक्षक ग्रंथ पाहून अत्यंत आनंद झाला. इतक्या महत्वाचा व भरपूर शास्त्रीय विवेचक माहितीचा आणि सर्व संग्राहक ग्रंथ ज्योतिष वाङ्मयांत हा पहिलाच होय

**( ज्योतिषसुधाकर ) रामचंद्र पांडुरंगशास्त्री मोघे, वसईकर ज्योतिषी.**

**( २० ) नामदार दादासाहेब खापर्डे, बी ए. एल् एल बी स्टेट कौन्सिलचे सभासद उमरावती हे लिहितात —**

मित्रवर्य वेदशास्त्र संपन्न रा रा पंडित रघुनाथ शास्त्री ज्योतिषी पुणें, स्वामीचे सेवेशी पोष्य गणेश श्रीकृष्ण खापर्डे कृ सा न वि वि आपण ज्योतिष शिक्षक पुस्तक लिहून माझे सारखें अनभिज्ञ लोकांवर फार मोठा उपकार केला आहे फलज्योतिषाची माहिती सुलभ भाषेंत सहज समजेल अशी दिली आहे आणि ती मी वाचीत असतां बऱ्याच गोष्टी ज्या पूर्वी कळत नव्हत्या त्या लक्षांत आल्या विद्यार्थी मंडळीला हें पुस्तक फारच फार उपयोगी पडेल यांत शंका नाहीं

**( २१ ) श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर ( चीफ ऑफ् इचलकरंजी )** लिहितात —आपला ज्योतिष शिक्षक ग्रंथ वाचून पाहण्यात आला सनातन हिंदुधर्म व ज्योतिषशास्त्र यांचा निकट संबंध असल्यामुळें नेहमीच्या व्यवहारात व धार्मिक गोष्टीबद्दल जुन्या मतानें वागणारे लोकांना ज्योतिषशास्त्राची माहिती असणें अवश्य आहे आणि या दृष्टीनें पाहतां सदरहु ग्रंथ फार उपयुक्त आहे.

**( २२ ) डॉ० सर भालचंद्र कृष्ण लिहितात** —आपला ज्योतिषशिक्षक ग्रंथ पोंचला पुस्तकांत ग्रथित केलेली माहिती चांगली असून ज्योतिषाचा अभ्यास करणारांस याचा विशेष उपयोग होईल

**( २३ ) प्रोफेसर रघुनाथराव आपटे एम् ए एल् एल बी कोल्हापूर लिहितात** —ज्योतिष शिक्षक ग्रंथ पोंचला विषयाची मांडणी साधी व सोपी असून अगदीं सामान्य व अनभिज्ञ मनुष्यासही माहिती होण्या करिता या ग्रंथाचा चांगला उपयोग होईल

( २४ ) पंडित रघुनाथशास्त्री ज्योतिषी यानीं लिहिलेलें “ ज्योतिष शिक्षक ” या नांवाचें पुस्तक मजकडे अभिप्रायार्थ आलें तें मी समग्र फार बारकाईनें वाचून पाहिलें पुस्तकाचें बाह्य स्वरूप व अंतरंग उत्तम प्रकारचें आहे

या पुस्तकांत फलज्योतिष शास्त्राच्या बहुतेक भागांचा विचार शिक्षणरूपानें सरळ व सोप्या मराठी भाषेमध्यें केला आहे विषयाचें स्पष्टीकरण जितकें विस्तृत करावयास पाहिजे तितकें विस्तृत केलें आहे जागजागी उदाहरणें देऊन वाचकवर्गाची जेणेंकरून समजूत होईल असा प्रयत्न केला आहे ज्योतिषशास्त्राचें ज्ञान आपणास असावें अशी इच्छा पुष्कळ जिज्ञासू माणसांना असते परंतु साधनाभावी त्यांना आपली इच्छा दाबून ठेवावी लागते अशा जिज्ञासूंना हें पुस्तक उत्तम साधन आहे असें मी खात्रीनें म्हणतो

**शिवराम गणपत पवार ( करण कौमुदीकार )**

**( २५ ) ज्योति शास्त्रमार्तंड प अमृतराम नारायणशास्त्री राजज्योतिषी बडोदा-ज्योतिष शिक्षक ग्रंथ** वाचून पाहिला फलज्योतिषविषयक सर्व माहिती या ग्रंथांत उत्तम रीतीनें ग्रथित केली असून या पुस्तकावरून ज्योतिषशास्त्राची व्युत्पत्ति व इतर माहिती सहज करून घेतां येईल

**( २६ ) महामहोपाध्याय ज्योतिर्विद पंडित दुर्गाप्रसाद द्विवेदि, मुख्याध्यापक संस्कृत कॉलेज संस्थान जयपूर** —सारल्येन विशदो सामंजस्येन मंदिहानानाम् । एष ज्योतिषशिक्षक उपकर्तुं भजन जीयात् ॥ सैषाति फलितज्योतिषशास्त्रलब्धिमानमागतं त । मन्ये भवाद्दशानां सुयोगैः सम्यक्पूर्वम ॥

**( २७ ) ज्योतिर्विद् पंडित गोकुलचंद भावन, राजज्योतिषी, संस्थान जयपूर —** ज्योतिषशिक्षककुंडलीसंग्रहेतिग्रथद्वय समीचीनमिति पठनेन संतोषो जात । भवतामुद्यमो जगदुपकाराय प्राचीनार्षविद्यासरक्षणायास्तीति ज्ञेयम् । भवता कार्येषु प्रतिक्षणमुन्नतिर्भूयात् इति भगवत प्रार्थये ।

**( २८ ) महामहोपाध्याय पंडित वामाचरणभट्टाचार्य, राजकीय संस्कृत पाठशालेचे मुख्य अध्यापक, काशी**--श्रीमत्सु पटवर्धन रघुनाथशास्त्री महोदयेषु सप्रणाम निवेदयते, भवद्भि. प्रेषित ज्योतिषशिक्षक नामक पुस्तक वीक्ष्याह पर संतोषमुपागतः । मन्ये पुस्तकमिद ज्योतिषशिक्षणे-छूना महातमुपकार जनयिष्यतीति ।

**( २९ ) विद्वद्रत्न पंडित वीरेश्वरशास्त्री द्रविड, संस्कृत प्रोफेसर, महाराजा कॉलेज, संस्थान जयपूर.**— पचागमात्र जानानामपि ज्योतिषे शास्त्रे व्युत्पित्सूना भाषाया सर्वविद्याणा विशद व्याख्यानेन समीचीनतया ते ते विषया अवगता भवेयुरनेन ज्योतिषशिक्षकग्रथेन यथोपक्रम च फलितग्रथाना तत्तद्देशप्रचलित- भाषाया लिखित्वा प्रकाशयिष्यति विद्वद्वरा इति आशासे । अनेन च युष्माक यत्नेन सर्व एव ज्योतिषेऽनायासेनैवास्मद्ग्रथादेव विद्वांसो भविष्यति रहस्य च ज्ञातुमधिकृताश्चेति । यदि हिंदीभाषायामपि स्यात्तर्हि उत्तरे देशेपि साधारणानामपि महोपयोगी भवेदिति मन्यते ।

**( ३० ) प्रो. शि. म परांजपे, एम् ए, संपादक स्वराज्य, पुणें** --ज्योतिषशिक्षक पुस्तकात पचाग, कुडली, महादशा, अतर्दशा, ग्रहबल, द्वादशभावविचार, भविष्यकथन, स्पष्ट ग्रह सूक्ष्मदशा, वगैरे सविस्तर विवेचन करण्यात आलें असून सचित्रकुंडलीसग्रहात प्रसिद्ध लोका या कुडल्या व त्यावद्दलची मीमांसा देण्यात आली आहे पुस्तक सग्राह्य आहे

**( ३१ ) रा वि गो नवाथे--संपादक कुंडलीविज्ञान, मुंबई** —प. रघुनाथशास्त्री ज्योतिषी यानीं केलेल्या " ज्योतिषशिक्षक " पुस्तकात पचाग पाहण्यापासून पत्रिका करण्यापर्यंतची सर्व माहिती सगतवार दिली असल्यानें एखाद्या सामान्य मनुष्यासही या पुस्तकावरून पाहिजे त्या मनुष्याची पत्रिका तयार करता येईल.

**( ३२ ) महामहोपाध्याय पं नित्यानंदशास्त्री, बनारस ( काशी )**— आपले ज्योतिषशिक्षक नावाचें पुस्तक आम्ही समालोचनपूर्वक पाहिलें पुस्तकातील माहिती फार उपयुक्त असून सुलभ व सोदाहरण दिली आहे. अशा ग्रथाची साप्रतकाळीं फार आवश्यकता असल्यानें हें पुस्तक प्रत्येकास अत्यत उपयोगी व सग्राह्य आहे

**( ३३ ) महामहोपाध्याय केशव रावजी ताह्मन, एम् ए. प्रिन्सिपाल संस्कृत महाविद्यालय, नागपूर सी पी** --ज्योति शास्त्रविशारदेषु पटवर्धनोपाव्ह रघुनाथशास्त्रि महोदयेषु प्रणामपुरःसर निवेदयते " ज्योतिषशिक्षकाख्य " श्रीमत्प्रणीत पुस्तक पर्यालोच्यानाघ्रात ज्योति शास्त्रकुसुमगधोप्येतावान्नि संदेहवक्तुमुत्सहे । यत् संस्कृतभाषानभिज्ञाना ज्योति शास्त्रप्रमेयेषु गुरूपदेशमतरेण व्युत्पत्तिमभिल्पता मध्यमदर्शानामपि मादृशाना परमोपकारकोयं भाषाया निबद्धो ग्रथ । एव च महता क्लेशेनैतादृश ग्रथ विरचयन्तोऽत्र भवतः शतशो धन्यवादानर्हति इति ।

( ३४ ) घरच्या घरीं सर्वप्रकारें ज्योतिषशिक्षण घेता यावें या हेतूनें जातककेसरी हा प्रचड ग्रथ तयार करण्यात आला असून सर्वसाधारण त्याचप्रमाणें गूढ अशा ज्योतिषप्रमेयाची भरपूर माहिती करून देण्याच्या दृष्टीनें चागला साधला आहे वर्षफल, दशाफल, जन्मपत्रिका, मुहूर्त वगैरे सर्व ज्योतिषविषयक गोष्टी या ग्रथानें तद्विषयक शास्त्राची माहिती करून घेणाऱ्यांसाठीं सुलभ केलेल्या आहेत

**सपादक नवाकाळ**

( ३५ ) पंडित रघुनाथशास्त्री यांनीं ज्योतिषशिक्षक अथवा जातककेसरी हा ग्रथ लिहून ज्योतिषशास्त्रासारखा अत्यत गूढ व दुर्घट विषय सामान्य वाचकाच्या आटोक्यात सविस्तर आणला आहे ग्रथ फार उपयुक्त व संग्राह्य आहे

सपादक-**विविधज्ञानविस्तार**

( ३६ ) ज्ञानकोशकर्ते डॉ. श्री व्य केतकर, एम् ए पी.एच् डी चालक विद्यासेवक पुणें -- पचाग प्रवर्तन कमिटीचे उत्साही सेक्रेटरी पंडित रघुनाथशास्त्री पटवर्धन ज्योतिषी यानीं, ज्योतिषशास्त्राचें अध्ययन करू इच्छिणारांसाठीं हा ग्रंथ तयार केला आहे त्यामध्यें पचाग म्हणजे काय व तें कसें पहावें, असल्या व्यावहारिक माहितीपासून जन्मपत्रिका तयार करता देण्यापर्यंत व या पत्रिकेवरून ग्रहाच्या स्थितीमुळें आयुष्यात भविष्यकाळीं घडून येणाऱ्या परिवर्तनाचें ज्ञान होण्यापर्यंतची सपूर्ण माहिती, सोपपत्तिक, सोदाहरण व फारच सुलभ पद्धतीनें दिला

आहे. नवग्रहांचें व राशींचे प्रभाव, निरनिराळ्या ठिकाणच्या अक्षांशांचें सूक्ष्मगणित, ग्रहांचे उदयास्त, अनेक प्रसिद्ध पुरुषांच्या कुंडल्या यांच्या समावेशानें फलज्योतिषाच्या अभ्यासकांस हा ग्रंथ विशेष उपयुक्त झाला आहे.

( ३७ ) राजमान्य राजश्रियाविराजित वेदशास्त्रसंपन्न रघुनाथशास्त्रिन् पटवर्धनोपाव्ह तत्र भवता भवता लिखितं पुस्तकं अब्दशः अभ्यासं विनापि शब्दशः ज्ञातुं क्षमं इदमीदृगनीदृगाशयःप्रसभं वक्तुमुपक्रमेतकः ॥ तत्र लिखिताः विषयाः ईदृक् स्पष्टाः यत् किंचित् परिशीलनेनापि बह्वर्थं जनयन्ति दुर्विगाह्य ज्योतिषाब्धौ सेतु हेतु पटवर्धन-कुलकेतुरेव तत्र भवान् चिरंजयतात् । अहं ज्योतिष शास्त्रानभिज्ञोपि भवत्कृत ग्रंथ निरीक्षणेन क्षणं विचक्षणं आत्मानं मन्ये।

**कृष्णशास्त्री तेलंग, नागपूर.**

( ४१ ) **प्रो. गो. स. आपटे, एम्. ए. बी एस्. सी. प्रिन्सिपॉल, माधव कॉलेज, व वेधशाळा उज्जनीः**—ज्योतिषशिक्षक—कुंडलीसंग्रहश्चेति ग्रंथद्वयं श्रीमता कृपया प्रागेव मन्निकटे प्रेषितं तदंतरेण *ममाभिप्रायोऽनुकूल एव वर्तत इति सानंदं निवेदयितुमुत्सहे । ज्योतिषविषये ये नव्यच्छात्रा परिचयं चिकीर्षवस्तेषा-* मनेन ग्रंथद्वयेन लाभ एव संजनिष्यतीत्यत्र न कोपि संदेह यतो ह्येतत्सुंदरैरायसाक्षरैरङ्कितं सुगमपदैग्रथितं च प्रतिभाति ।

# Astrology

## *Jyotish Shikshak or Jatak Kesari*

BY

## Pandit Raghunath Shastri Patwardhan, Poona city.

*Mr. Patwardhan has rendered a distinct service by presenting* the public with an easy course of Astrotogy. It will enable many to learn astrology at home without the assistance of a teacher. It is written in an easy and lucid style, and it will be useful not merely to learners.

Even advanced Students will learn much from it. The idea of writing such a course was approved by the late Lokmanya Tilak, and he even intended writing an introduclion to it. In a short compass the book gives a *great deal of useful information.* ***Bombay Chronicle***

## Jyotish Shikshak or Jatak Kesari

*( by Pandit Raghunath Shastri, Poona. )*

The book deals with the jatak branch but has some chapters on Muhurta. Also the first step is, however, the calculation of sidereal time and the computation of the places of the planets, for which astrologers usually depend upon the Almanacs. The Author has, however, tried to make them independent *by furnishing rules for computing* them and Ephemeries for a certain number of years. This has considerably enhanced the usefuluess of the book. The book is well written and as far as we can judge, shows ripe scholarship in the treatment of the subject.

**Modern Review, Calcutta.**

**श्रीमज्जगद्गुरु श्री. अनंताचार्य महाराज, प्रतिवादी भयंकर मठ,**
**कांजीवरम् यांचा अभिप्राय.**

**पंडित रघुनाथशास्त्री यांस**—" ज्योतिषशिक्षक अथवा जातककेसरी हा ग्रंथ आपणांकडून अभिप्रायार्थ आला, त्याचें समालोचन यथासांग आणि चिकित्सापूर्वक करण्यांत आलें.

ह्या ग्रथाची योग्यता अखिल भारतोपयोगी स्वरूपाची असून ह्या ग्रथाइतका अपूर्व आणि भारतीय ज्योतिष शास्त्राची शास्त्रोक्त माहिती सागोपाग दिलेला अतएव ज्योतिषशास्त्राच्या परमोत्कर्षाची आणि कालसाधन शास्त्राच्या अग्रेसरत्वाची महती पूर्णपणें पटविणारा असा हा अद्भुत ग्रथ आहे ह्या ग्रथात गणितज्योतिष आणि फलज्योतिष अशा दोन्ही महत्त्वाच्या विभागाची सर्व माहिती सगतवार व ह्या शास्त्रातील गूढ गोष्टींचे रहस्य स्पष्टपणें उकलून दाखविणारी असून "ह्या ग्रथात जें आहे तें इतर सर्व ग्रथात आहे पण इतर ग्रथात जे नाहीं तें सर्व ह्या ग्रथात आहे" अशी ह्या अद्भुत व रम्य ग्रथाची अलौकिक महती आहे

ह्या ग्रथाच्या अध्ययनानें कोणत्याही लिहिता वाचता येणाऱ्या सामान्य माणसासही घरच्याघरीं ज्योतिष ज्ञान मिळविता येईल इतक्या सुलभ तऱ्हेची सोपपत्तिक व सोदाहरण अशी ह्या ग्रथाची शास्त्रशुद्ध रचना आहे गुरु-गृहीं राहून सतत १२-१२ वर्षें अध्ययन करूनही ज्या कठीण विषयाचें आकलन होत नाहीं व रहस्य कळत नाहीं, असें सर्व महत्त्वाचे विषय ह्या ग्रथाच्या योगानें चटकन लक्षात येतात हा ग्रथ म्हणजे प्राचीन व अर्वाचीन ज्योतिष विषयक ग्रथातील तत्त्वमयरहस्याची फोड करणारा सिद्धात ग्रथ आहे असेंच ह्या ग्रथाबद्दल म्हणता येईल. अशा प्रकारचा आश्चर्यकारक व तज्ज्ञानाही दिपवून टाकणारा ग्रथ निर्माण केल्याबद्दल आणि आपल्या अलौकिक बुद्धि-मत्तेच्या जोरावर असला अप्रतिम ग्रथ जनतेला सादर केल्याबद्दल ज्योतिषाचार्य पडित रघुनाथशास्त्री यांचें आम्हीं आशीर्वादपूर्वक अभिनदन करतो.

## महामहोपाध्याय पंडित श्रीधरशास्त्री पाठक, माजी संस्कृत मुख्याध्यापक, डेक्कन कॉलेज, पुणें.

पुण्याच्या शुद्धपचाग प्रवर्तन मंडळाचे मुख्य चिटणीस पडित रघुनाथशास्त्री पटवर्धन ज्योतिषी यानीं लिहिलेले व प्रसिद्ध केलेले दोन महत्त्वाचे व अपूर्व ज्योतिष ग्रथ-ज्योतिष शिक्षक अथवा जातककेसरी व कुडली संग्रह आम्ही अत्यत परिशीलनपूर्वक आणि सूक्ष्म दृष्टीनें आपातत वाचून पाहिलें ग्रथातील प्रतिपाद्यविषय अत्यत गूढ अशा ज्योतिषशास्त्राचा असतांही विषयाची माडणी सोपपत्तिक, सुसगत आणि ज्योतिषशास्त्र ज्ञानेच्छूस सहज पटणारी अतएव चित्ताकर्षक आहे. शास्त्रीय ग्रथ म्हटला म्हणजे त्यात पारिभाषिक सज्ञाची रेलचेल, समजण्यास कठीण, आणि दुर्बोधत्व हें असावयाचेच अशा तऱ्हेची समजूत प्रचलित आहे व ती काहीं अशीं खरीही आहे. तथापि ज्योतिष विषय कितीही कठीण असला तरीहि तो अगदीं सहज सुलभ भाषेंत सोदाहरण दर्शवून, सशयास जागा न राहू देता विद्यार्थ्यास त्याचें आकलन अतिशय सुगमतेनें व्हावें व करता यावें अशा पद्धतीची पद्धतशीर व विद्वत्ताप्रचुर रचना हे ह्या ग्रथाचें मुख्य आणि अत्यत अभिनदनीय असें वैशिष्ट्य आहे

प्रगल्भ आणि प्रतिष्ठित विचारसरणी, प्रत्येक विषयाची, सुस्पष्ट व असदिग्ध माडणी, शास्त्रीय गूढ प्रमेयाची चिकित्सक पद्धतीची छाननी, ज्योतिशास्त्रातील अतरगाचें रहस्य उकलन दाखविण्याची नैपुण्यपूर्ण हातोटी, थोड-क्यात पण अर्थपूर्ण विवेचनपद्धति, प्राचीन आणि अर्वाचीन पद्धतीचा सुदर मिलाफ, तसेंच प्राचीन ज्योतिषा चार्यांची मूलतत्त्वें व सिद्धाततत्त्वें कायम ठेवून ज्योतिषशास्त्राचा परमोत्कर्ष होण्यासाठीं करावयाच्या सुधारणाचें प्रतिपादन, इत्यादि इत्यादि अनेक गुणसमुच्चयाच्या सुभूषणानें अथाग अलकृत झालेला महनीय व अपूर्व असा ज्योतिषशिक्षक अथवा जातककेसरी हा एकच ग्रथ आहे

ह्या ग्रंथाच्या वाचनानें व अभ्यासानें ज्योतिषशास्त्राची अथपासून इतिपर्यंत सर्व माहिती सिद्धातोक्त व शास्त्र-शुद्ध अशी मिळणारी असल्याकारणानें ह्या ग्रथकर्त्यानें अत्यत परिश्रमपूर्वक तयार केलेल्या ह्या ग्रथानें अखिल जनते वर अपरंपार असें उपकार केले आहेत ज्योतिषज्ञान घेऊ इच्छिणारास तर हा ग्रथ म्हणजे एक कामधेनूच आहे.

यातील गणितविषय जसा सुगम व सुलभ आहे तसाच फलज्योतिष व भविष्यकथन हा विषयही कल्पना-तीत सोपा व कोणासही सहजासहजीं आकलन करता येण्यासारखा दिला आहे यामुळें अगदीं अल्प शिक्षण झालेल्या व्यक्तीपासून तो तहत पूर्ण शिक्षण झालेल्या व्यक्तीपर्यंत सर्वास ह्या ग्रथावरून ज्योतिषशिक्षण अल्पकाळांत व घरच्याघरीं घेता येईल. अशा अपूर्व आणि अलौकिक ग्रथनिर्मितिबद्दल ज्योतिषरत्न पडित रघुनाथशास्त्री यांचें आम्ही मन पूर्वक अभिनंदन करतो शेवटीं इतकेंच म्हणावयाचे कीं,

विद्वानेव विजानाति विद्वज्जनपरिश्रमं। नहि वंध्या विजानाति गुर्वी प्रसववेदनाम् ॥
ह्या ग्रंथाची प्रचंड योजना, योग्यता, कर्तृत्व, अलौकिकत्व आणि संशोधन प्रमुख ह्या सर्व गोष्टी जो विद्वान असेल त्यालाच कळतील व ह्या विद्वत्तापूर्ण ग्रंथाची योग्यता तोच जाणू शकेल.

ज्योतिषशास्त्राच्या सांगोपांग विवेचनाचा अद्भूत आणि रम्य असा अलौकिक बुद्धिमत्तेचा ग्रंथ फक्त हा एकच आहे असें आमचें स्पष्ट मत आहे

**ज्योतिषशिक्षक** अथवा **जातककेसरी**—( लेखक—पंडित रघुनाथशास्त्री, सेक्रेटरी प. प्र कमिटी, शुक्रवार पेठ घ न १४० पुणें नं. २ ) पंडित रघुनाथशास्त्री पटवर्धन, ज्योतिषी ह्यांनीं फलज्योतिषाच्या जिज्ञासू लोकांच्या उपयोगाकरता एक शिक्षणक्रम तयार केला आहे व त्यास अनुसरून त्यांनीं आकाश ज्योतिष, विवाह ज्योतिष, मुहूर्तदीपिका, हर्शल, नेपच्यून, ग्रहयोग इत्यादि पत्रकें प्रसिद्ध केलीं आहेत, शिवाय ह्या सर्व पत्रकांचें एकत्र ग्रथन करून व इतर विषयाचें भरपूर विवेचन करून ‘ ज्योतिषशिक्षक ’ नांवाचा ग्रंथही तयार केला आहे. सदर ग्रंथानें पंडितजींचा उद्देश पुष्कळ अंशानें सिद्धीस गेला आहे असें आम्हास वाटतें. फलज्योतिषावर श्रद्धा असणाऱ्यांस ह्या ग्रंथाच्या अभ्यासानें आपल्या श्रद्धेची छाननी करण्यास मदत होईल व नुसत्या कोटिक्रमावर भर देणाऱ्या अश्रद्धाळू लोकांनाहि आपलीं मतें तपासून पहाण्यास या ग्रंथाच्या अवलोकनानें मदत होईल. ग्रंथातील फलविषयक विवेचन बहुतांशी जुन्या ग्रंथाच्या आधारें केलें असल्यानें सदर विषयावर जुने ग्रंथ कशी विचारसरणी योजितात हेंहि कळून येणार आहे प्रत्यक्ष वधूवराच्या गुणापेक्षां त्यांच्या पत्रिकातील गुणाचा मेळ पाहण्यात विशेष दक्षता राखणाऱ्यास या पुस्तकात मनाजोगें विवेचन आढळेल. सारांश हा ग्रंथ आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी, अशा त्रिविध लोकांच्या आश्रयास पात्र असा झाला आहे.

सपादक प्रबोध, धुळें.

## भविष्य सिद्धांत ग्रंथावरील तज्ज्ञांचे अभिप्राय

### श्रीमत् जगद्गुरु श्रीरामानुज सम्प्रदायाचार्य श्रीमद् अनन्ताचार्य महाराज

श्रीप्रतिवादि भयङ्कर मठ, श्रीकांची.

( १ ) ज्योतिषरत्नेन श्रीमता पण्डित रघुनाथशास्त्रिणा पटवर्धनेन रचितो महाराष्ट्र भाषामयो भविष्य-सिद्धान्तनामा ग्रन्थोस्माभिर्दृष्ट । सांगली नगरे श्रीमत परलोकवासीनो बाल गङ्गाधर तिलक महोदयस्याधिपत्येन प्रवर्तिताया सभायां निर्णीत क्रममनुसृत्य शुद्धग्रहस्थित्यादिक प्रत्यक्षानुकूल निर्णीतमत्रग्रंथे लिखितमस्ति। अतीत षष्टिवर्षाणा भावि पंचाशद्वर्षाणाच ग्रहस्थितयोऽत्र लिखितास्सन्ति। जातक फल वस्तूणां शुद्ध ग्रहस्थिति परिज्ञान मत्यन्ता वश्यकमिति को वा न जानाति। तदभावादेव चाधप्रायो दैवज्ञे कथ्यमानानि फलानि नानुसरानुगुणानि भवन्ति। शुद्धपंचाङ्गीय ग्रहस्थित्यादिक प्रत्यक्षानुगुणाभवतीति स्वयमनुभवेन वयं जानीम । अतश्च ग्रंथेनानेन न केवलं दैवज्ञानामेव, अपितुसर्वेषामेव ज्योतिषशास्त्राभिमानिनां महान् लाभो भविष्यती त्यत्रनास्ति सन्देह । सर्वत्रैव भारते शुद्ध पंचाङ्गस्यप्रवर्तन आवश्यक मितिचास्माक मभिप्राय । ग्रन्थोयंसर्वेषामपि विद्वत्सहृदयैः संग्राह्य इति ग्रन्थस्य कर्ता सर्वथापि प्रोत्साहनार्हइतिच वयम्मन्यामहे इतिशुभम्।

### प्रिन्सिपॉल गो. स. आपटे एम्. ए बी. एस. सी.; यांचा अभिप्राय

#### ज्योतिषरत्न पं रघुनाथशास्त्री पटवर्धनकृत “ भविष्य सिद्धांता ”चें परीक्षण

( २ ) हें पुस्तक मुख्यत्वें फलज्योतिष्यांकरितां लिहिलें आहे गणितस्कंध हाच या शास्त्राचा पाया असल्यामुळें तो पाया मजबूत करण्याच्या हेतूनें ग्रंथकर्त्यानें हा ग्रंथ लिहिला आहे हें उघड आहे अहर्गणावरून सूर्यचंद्र यांचें गणित साधलें आहे भुजज्यासाधन मंदफलसाधन व त्यावरून चंद्रसूर्यांचें स्पष्टीकरण सोपें व मनोरंजक केलें आहे. तथापि हर चंद्र व स्प गृ हे कोष्टकावरून आयतेही मिळू शकतात पृ ६३ पासून १४० पर्यंत शके १७८७ ते १८८८ चे दर पक्षाचे स्प प्र हर्शल नेपच्यूनसह (पृ २३७–२०७ पर) दिले आहेत. चंद्र मात्र दररोजचा दिला आहे त्यामुळें जोशांचे पुष्कळ श्रम वाचतील [illegible] ग्रहलाघवी व प्र. ल. चे [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] प्रमाण १ अन व २ [illegible] [illegible]

काढण्याचें काम सुलभ व्हावे एवढ्याकारिता ( पृ, १५९ ते १८८ ) कोष्टकें दिली आहेत शुद्धपचाग म्हणजे काय, त्याचें आधारें व प्र. ला पचांगावरूनही कारक ग्रह कसें ठरवावें व त्याचेवरून भाग्योदय काळ, आयुष्यांत घडणाऱ्या बऱ्यावाईट गोष्टी, ग्रहाचे योग व गोचर प्रकरण याविषयीं प्रतिपादन केलें आहे मथुनमथुन भविष्य वर्तविण्यासबंधीं ठोकळ नियम दिले आहेत व सूचना केल्या आहेत दशाचा उपयोग कसा करून घ्यावयाचा यांविषयीं बोध प्रद रीतीनें माहिती दिली आहे मागचे व पुढचे ग्रह समजल्याशिवाय खात्रीलायक असें भूत व भविष्य ठरविता येत नाहीं त्यामुळें फार अडचण पडते असं स्वानुभवानें जाणून पं रघुनाथशास्त्री यांनीं श्रमपूर्वक या पुस्तकात जी भरपूर माहिती दिली आहे तिचें महत्व प्रत्यक्ष काम करणाऱ्याचेच चागले लक्षात येईल, व त्यावद्दल जुने व नवे जोशी त्यांना फार धन्यवाद देतील यात शका नाहीं पृ १४६ ते १४८ पर्यंत गेल्या ६० वर्षांतील ग्रहणें याच्या स्पर्श मोक्ष कालासह दिलीं आहेत तीं फलज्योतिष्यास फार महत्त्वाचीं आहेत प्र ला प्रमाणें व शुद्धपंचागामध्यें गणित दिलें असल्याकारणानें खरोखर ग्रहणकाळ केव्हापासून केव्हापर्यंत होतें हें स्पष्टपणें कळतें त्यापासून फलितामध्यें अतर येतें. उदाहरणार्थ शके १७८७ आश्विन शुद्ध १५ चें चद्रग्रहण खरोखर ता ४ मि ३२ यावेळीं सुटलें असल्यामुळें ५ घानतां ज्या बालकाचा जन्म जाहला तो ग्रहणात जाहला नाहीं हें खरें तथापि प्र ला प्रमाणें ५ ता २९ मि हा त्या ग्रहणाचा मोक्षकाल असल्याकारणानें त्या जातकास ग्रहणदोष आहे असे प्र ला प्रमाणें चालणारे ज्योतिषी खचित म्हणतील अर्थात् अशा प्रकारचे दोषापासून शुद्धपंचागाप्रमाणें गणित करणारे जोशी अलिप्त आहेत हें उघड आहे पृ २१० पासून दिलेली लग्नसारिणी व पुढें पृ २१६ पासून दिलेली सारणी या फलज्योतिष्यास फारच महत्त्वाच्या आहेत. त्याचेयोगानें जुन्या व नव्या पद्धतीप्रमाणें वाटेल त्या अक्षाशावरील वाटेल त्या वेळचें स्पष्टलग्न काढता येतें तात्कालिक लग्न हे सर्वजातक, ताजक व प्रश्न या गणितांचें सुकाणू आहे त्याचें गणित मोठ्या खुबीनें या कोष्टकात दिलें आहे तसेंच सुमारें ९०० गांवाचे व शहराचे अक्षाश, रेखाश व पलभा पृ २५८ पासून १० पृष्टावर दिलल्या आहेत यामुळें सदर कोष्टकाचा कोणत्या गावीं कसा उपयोग करावयाचा तें कळण्यास अडचण पडणार नाहीं नक्षत्र काळावरून स्पष्ट सूर्य व स्प सू वरून नाक्षत्रकाळ व इष्टकाळ साधण्याकरिता जीं कोष्टकें दिलीं आहेत त्यात जसा नवीनपणा आहे तशी उपयुक्तताही आहे अक्षाश ६३ पर्यंत प्रत्येक अक्षाशाचे राश्युदय दिले आहेत त्यावरून स्वतन्त्र त्न्हेनेंही लग्नसाधन करता येतें हिंदुस्थानातील कोणत्याहि स्थळाचे शुद्धपचाग करण्याची माहिती या पुस्तकाचे शेवटीं दिली आहे तिच्या योगानें प्रत्येक ठिकाणचें शुद्धपचाग थोड्या श्रमानें तयार करता येतें

या गणितभागाशिवाय दशमभाव व द्वादशभाव साघन, त्रिंशाश नवमाश, द्वादशाश याची व विंशोत्तरी अष्टोत्तरी कोष्टकें वगैरे फलज्योतिष्यास लागणारी अवश्यक माहिती उत्तम प्रकारें या पुस्तकात दिली आहे उदयांतर कोष्टक, राश्यादिकाचे सावनमान, क्रांति, चर, अधिकमास, अयनाश, घटकापळावरून तास, मिनीटें व तास मिनिटावरून घटकापळें अशाप्रकारची बारीक सारीक माहिती देऊन विषुवांशक्रांति काढण्याचीही सोपी रीति दिली आहे जोशाची नेहमीं घटकापळावरून इष्टकाळ ठरविण्यामध्यें चूक होत असते व चुकीमुळें शेंकडों पत्रिका चुकीच्या जाहलेल्या मला माहित आहेत या चुकीचें कारण इतकेंच कीं उदयातर, देशातर व चर याचा उपयोग कसा करावा व स्टँडर्ड टाइम हें काय गूढ आहे याचें बऱ्याच जुन्या ज्योतिष्याना अज्ञान असतें या गोष्टींचें स्पष्टतेनें विवरण करून अशा चुका जोशानीं कशा टाळाव्यात याबद्दलचें ज्ञान या पुस्तकाच्या आधारें प्रत्येकास करून घेता येण्यासारखें आहे आपल्या पचागातील रवींच्या उदयास्त काळावरून इतर ठिकाणच्या स्पष्टोदयास्ताचे स्टँडर्ड टाईम कसें साधावें याबद्दल विवेचन चागलें केलें आहे

एकंदरींत पुस्तक अत्यंत उपयुक्त असून फार श्रम घेऊन तयार केलें आहे प्रत्येक प्रकरणाचे सविस्तर व बालबोध रीतीनें विवेचन केलें आहे नवशिक्याला पुनरुक्ति पत्करते परंतु अतिसंक्षेपरूप कधींहि पत्करत नाहीं हा प्रत्येकाचाच अनुभव आहे मला जर ज्योतिष्याचा धंदा करण्याचा असता तर बृहज्जातक, प्रारब्धयोग, ताजिक नीलकठी, जैमनीय सूत्रपद्धती, केशवी या प्रथाप्रमाणें हा भविष्यसिद्धांतहि नेहमीं अवश्य जवळ बाळगिला असता व त्याचा परिचय कायम ठेविला असता कारण त्या योगानें गणितातील स्थूलता नाहींशी होऊन थोडक्या वेळात सूक्ष्म गणिताच्या आधारें मुहूर्तपत्रिका वगैरे शास्त्रोक्त रीतीनें वर्तावल्याचें मनास समाधान वाटलें असतें या प्रथात शुद्धपंचांगाचें महत्व दाखविलें आहे तथापि जुन्या प्रथाविषयीं अनादर नाहीं ही गोष्ट सहज लक्षात यते

गोविंद सदाशिव आपटे, एम् ए बी एस् सी प्रिन्सपॉल " माधव कॉलेज "
सुपरिंटेंडट श्रीजिवाजी वेधशाळा उज्जनी

## केसरी — पुणें.

( ३ ) भविष्यसिद्धान्त—( *लेखक व प्रकाशक ज्योतिपरत्न पंडित रघुनाथशास्त्री पटवर्धन, पंचाग-प्रवर्तन कमिटी शुक्रवार पेठ पुणें कि. १० रु.* ) *सांगलीसमेलनात ठरलेल्या शुद्ध व शास्त्रोक्त अयनांशास अनुसरून नवीं पंचांगें होऊं लागलीं परंतु जुनीं पंचांगें व जुन्या कुंडल्या पूर्वीच्या पद्धतीनें केलेल्या असल्यामुळें भविष्य वर्तविण्यास* अडचण भासत असे ती दूर करण्याच्या हेतूनें पंडित रघुनाथशास्त्री यांनीं हा ग्रंथ तयार केला आहे यांत पंचांगातील ग्रहादिकांचें साधन कसें करावें तें सोदाहरण दिलें असून मागील ६० वर्षांतले पौर्णिमा व अमावास्या या तिथींचे हर्शल नेपच्युनासुद्धां सर्व स्पष्ट ग्रह दिले आहेत. त्याचप्रमाणें कुंडली तयार करण्यास लागणारी सर्व साधनें व कोष्टकें तयार करून दिलीं असून कुंडलीवरून भविष्यनिर्णय कसा करावा याचीहि समग्र व साधार माहिती दिली आहे रविचंद्र स्पष्टीकरण, तिथिसाधन, नक्षत्रसाधन ग्रहविचार, ग्रहाच्या दृष्टी व त्यांची फलें, द्वादश स्थानांचे गुण-धर्म, गोचर ग्रहांचीं शुभाशुभ फलें, महादशा व अंतर्दशा, कुंडलीचें विशेषत्व, आयुर्दायकोष्टक, विशेष लाभ, राज-सन्मान इत्यादि प्रकरणें फारच महत्त्वाचीं आहेत. कोष्टकविभागात शके १७८७ ते शके १८४७ पर्यंत अवधिस्थ ग्रह, दररोजचा स्पष्ट चंद्र सन १९२५ ते १९७५ पर्यंतचे प्रत्येक महिन्याचे अंशात्मक ग्रह, वर्षध्रुवक चक्र, दशमभावसाधनकोष्टक, लग्नसाधनसारिणी निरनिराळे ठिकाणचे अक्षांश, रेखांश व पलभा, नाक्षत्र कालसाधन, इष्ट स्थलाचा सूर्योदय व सूर्यास्त, ग्रहणें, अधिकमास, इष्टस्थलाचें दिनमान व रात्रिमान, नाक्षत्र कालावरून सायनसूर्यसाधन इत्यादि विविध व जरूरीची माहिती भरपूर दिली आहे या पुस्तकाच्या आधारानें गणित वर्तविणें आणि भविष्य वर्तविणें या दोनहि गोष्टी साध्य करून घेता येतात या प्रधानें शुद्धपंचाग वापरणारांची तर मोठी गैरसोय दूर झाली आहेच. पण ज्याला पंचांगसाधनाची अथवा फलज्योतिषाची विद्या हस्तगत करून घ्यावयाची असेल त्यालाहि या ग्रंथावरून घरच्या घरीं या विषयाचा अभ्यास करण्यास हें एक सुलभ साधन झालें आहे या एका पुस्तकावरून गेल्या ६० वर्षांतील आणि पुढील ५० वर्षांतील कोणत्याहि दिवसाच्या कोणत्याहि वेळेची कुंडली अल्प श्रमानें मांडतां येऊन शुभाशुभ फलाचा निर्णय करिता येतो

असला हा सर्वोपयोगी ग्रंथ अत्यंत परिश्रमानें पंडित रघुनाथशास्त्री यांनीं तयार करून शुद्ध पंचांगाच्या व फलज्योतिषाच्या प्रसारास अमूल्य मदत केली आहे ग्रंथाच्या विस्ताराच्या व उपयुक्ततेच्या मानानें दहा रुपये किंमत अल्पच वाटेल.

## महाराष्ट्र—नागपूर

( ४ ) **भविष्य-सिद्धांत**—( प्र पं रघुनाथशास्त्री पटवर्धन, शुक्रवार पेठ, पुणें ) पुण्याच्या पंचाग-प्रवर्तन-कमिटीचे सेक्रेटरी पंडित रघुनाथशास्त्री पटवर्धन यांनीं हा बहुमोल ग्रंथ प्रसिद्ध केला आहे रविचंद्र स्पष्टीकरण, पंचाग करण्याची माहिती, ग्रहविचार, ग्रहांचे उदयास्त, ग्रहयोग आणि त्यांचे परिणाम, रोजचा स्पष्ट चंद्र, भारतीय लग्नसाधनसारिणी, नाक्षत्र ज्योतिष, जगांतील प्रमुख स्थलांचें अक्षांश व रेखांश इत्यादि ज्योतिषांना व सामान्य जिज्ञासु लोकांनाहि अत्यंत उपयुक्त असलेल्या सर्व प्रकारच्या माहितीचा संग्रह पं० रघुनाथशास्त्री पटवर्धन यांनीं या सुमारें पांचशें पानांच्या प्रचंड ग्रंथांत केला आहे ग्रंथाचा जवळजवळ निम्मा भाग कोष्टकांनीं व्यापला आहे. या ग्रंथांत दिलेल्या रविचंद्र स्पष्टीकरणाध्याय या प्रकरणांतील रीतीनें येणारे रविचंद्र सूक्ष्म येऊन, शुद्धपंचांगाप्रमाणें येतात व गुणाकार भागाकाराशिवाय गणितहि करावें लागत नाहीं हें या ग्रंथाचें वैशिष्ट्य आहे मागील ६० वर्षांची पंचांगें या ग्रंथावरून फारच थोड्या वेळांत तयार होतात व पुढील ५० वर्षांचे ग्रह प्रत्येक महिन्याचे स्पष्ट दिले असल्यामुळें, पुढील ५० वर्षांची ग्रहस्थितीहि चटकन कळते

## सामगार —युगांतर

( ५ ) **भविष्य-सिद्धांत**— सदरील ग्रंथ आमचेकडे येऊन बरेच दिवस झाले पंडित रघुनाथशास्त्री यांची ज्योतिषशास्त्रांतील प्रगति महाराष्ट्रमान्य असून त्यांच्या हातून जी आज ज्योतिषशास्त्रसेवा होत आहे ती सर्वतोपरीच अनुकरणीय आहे साधारण मनुष्याच्या दृष्टीच्या टप्प्यांत जे विषय सुलभतेनें आपून त्याचा उपयोग म्हणून पंचांग इतकी प्रगती शास्त्रीबोवांनी सामान्यजनांत उत्पन्न करून ठेविली भविष्य-सिद्धांत हा एक श्रेष्ठ दर्जाचा ग्रंथ निर्माण करून त्यांनी महाराष्ट्र वाङ्मयांत फारच अमूल्य भर टाकली आहे

## ज्ञानप्रकाश–पुणें

शुद्धपचाग प्रवर्तक कमिटीचे सेक्रेटरी प रघुनाथशास्त्री पटवर्धन यानीं तयार केलेला **भविष्य सिद्धांत** नावाचा ज्योतिषविषयक ग्रथ आमच्याकडे अभिप्रायार्थ आला आहे सदर विषयाचा अभ्यास ज्यानीं बरेच दिवस केला आहे अशा आमच्या एका तज्ज्ञ मित्राकडून सदर पुस्तकावर लिहून आलेला अभिप्राय यापुढें दिला आहे.

भविष्यसिद्धात या ग्रथात फलज्योतिषापेक्षा पचागासबधीं गणितविषयक अशी अत्यत उपयुक्त माहिती पुष्कळशीं दिलेली आहे ग्रथकार हे टिळक पचागाचे प्रवर्तक आहेत ही गोष्ट सर्वविश्रुत आहेच अर्थात् त्या साप्रदायानुसार प्रकृत ग्रथाचा पुष्कळसा भाग निरयन पद्धतीच्या गणितानें व्यापलेला आहे. हें निराळें सागावयास नकोच, पुस्तकाच्या पहिल्या ३० पानात पचागाच्या साधनासंबधी माहिती निरनिराळ्या प्राचीन ग्रथाच्या आधारें मूळ श्लोकासह देऊन ती मराठींत सुगम रीतीनें सागितलेली आहे यानतरचा भाग फलज्योतिषासबधीं आहे यात विशेष लक्षात घेण्याजोगी गोष्ट अशी कीं, पाश्चात्य ज्योतिषाप्रमाणें हर्षल व नेपच्युन ( प्रजापति आणि वरुण ) याच्या सबधानें या भागात बरेंचसें तपशीलवार विवेचन सोदाहरण केलें आहे तें अभ्यासू जनास मार्गदर्शकच होईल निश्चित कालनिर्णयपद्धति या प्रकरणातील काल निर्णय साधनाचें कोष्टक जिज्ञासूनी अवश्य अनुभव घेऊन पाहाण्यासारखे आहेत फलज्योतिषाच्या या भागात उदाहरणार्थ म्हणून कुडल्या देऊन त्यातील ग्रहाच्या शुभाशुभ फलाचें स्पष्टीकरण केलें आहे तेंहि सदर विषय विशद करून देण्यास सहाय्यभूत होईल यात शका नाहीं यानंतर शके १७८७ पासून १८४७ पर्यंतची पचागासबधीं तारीख व तिथिवार माहिती, त्याविषयाचा व्यवसाय व व्यासग असणाराना बहुमोल व उपयुक्त होईल असें म्हणण्यास हरकत नाहीं यापुढील काही कोष्टकें प रघुनाथशास्त्री यानीं फार परिश्रमपूर्वक तयार केलेली असून तीं पचागकर्ते व फलज्योतिषी या दोघाना सारखींच महत्वाची वाटतील यानतर निरनिराळ्या ठिकाणाचे अक्षाश व रेखाश देऊन तत्सबधीं इतर साधनें म्हणजे लग्नसारिण्या, भावसारिण्या वगैरे दिल्या आहेत, तसेंच अक्षाश शून्य ते त्रेसष्ट याच्या पलभा, चरखडे व मेषादि राशीं स्वोदय वगैरे निरनिराळ्या ठिकाणची पचागें बिनचूक तयार करण्यास आधारभूत होतील असेंच कोणीहि म्हणेल पुस्तकाचा शेवटचा भाग विविध माहितीनें भरलेला असून त्यातील कोष्टकें ही स्थूलमानानें ज्योतिष गणित करण्याचें एक सुलभ साधनच प रघुनाथशास्त्री यानीं निर्माण केलें आहे एवच ग्रथकर्त्यानीं ज्योतिषवाङ्मयात या सुगम माहितीनें भरलेल्या ग्रथाची भर घालून मराठी भाषेची व ज्योतिषशास्त्राची अमोल्कि सेवा केली आहे ही गोष्ट कोणीही प्राजलपणें कबूल करील

## ‘ बलवंत ’ रत्नागिरी

**( ७ ) भविष्य सिद्धात –** ( लेखक व प्रकाशक–पाडत रघुनाथशास्त्री पटवर्धन सपादक ज्योतिर्भूषण, शुक्रवार पुणें, किं रु १० ) सदरहू पुस्तकात फलज्योतिष व भविष्यकथन शास्त्राचा सिद्धातात्मक मूळ पाया सूक्ष्म व प्रत्यक्ष ग्रहस्थिति व भविष्य निर्णयाची सपूर्ण माहिती दिलेली आहे शुद्ध टिळक पचाग सुरू झाल्यापासून व दृक्प्रत्ययाबद्दल लोकाचा खात्री पटल्यामुळें जुन्या पचागावरून केलेली जन्मटिपणें, किंवा जन्मकुडल्या अर्थातच चुकीच्या ठरल्या व शुद्धपचाग सुरु होण्यापूर्वीच्या शुद्धपचागाची विशेष अडचण भासू लागली ती अडचण, गेल्या साठ वर्षाचे पौर्णिमा व आमावास्या या तिथींचे सर्व ग्रह–हर्षल नेपचूनसुद्धा स्पष्ट दिलेले असल्यामुळें दूर झाली आहे. त्याचप्रमाणें सन १९२५ पासून तों सन १९७५ पर्यंतचे दर महिन्याचे स्पष्ट ग्रह दिलेले असल्यामुळें पुढील पन्नास वर्षांचें भविष्य कथन करणें सुकर झालेलें आहे त्याचप्रमाणें कुडली तयार करण्यास लागणारीं सर्व साधनें व कोष्टकें तयार करून दिलेलीं असून कुडलीवरून भविष्य निर्णय कसा करावा हें उदाहरणासह दाखविलें आहे. शिवाय रवि चद्र स्पष्टिकरण, पचाग करण्याची माहिती स्पष्टग्रहसाधन, निरयन व सायन पक्षाची माहिती वगैरे गणित विषयक माहिती दिली असून, भविष्य निर्णयासबंधाची सपूर्ण माहिती दिलेली आहे शिवाय दशमभावसाधन कोष्टक, लग्न साधन सारणी निरनिराळे प्रमुख शहराचे अक्षाश रेखाश व पलभा, इष्ट स्थलाचा सूर्योदय व सूर्यास्त, दिनमान व रात्रिमान काढण्याची रीती वगैरे संबधींची भरपूर माहिती दिलेली असून या पुस्तकावरून गल्या साठ वर्षांतील व पुढील पन्नास वर्षांतील कोणत्याही वेळची कुडली अल्पश्रमानें माडिता येऊन भविष्य निर्णयही करिता येईल गणित ज्योतिष व फलज्योतिष यासबंधीं इतकी विस्तृत माहिती एकेठिकाणीं दिलेला ग्रथ हिंदुस्थानात नाहीं पुस्तकाचा

आकार रॉयल अष्टपत्री असून पृष्ठ संख्या ५०० आहे असून ग्रंथाच्या विस्ताराच्या व उपयुक्ततेच्या मानानें किंमत रु. १० जास्त नाहीं.

**( ८ ) भविष्यसिद्धांत** ( लेखक— ज्योतिद्रत्न पंडित रघुनाथशास्त्री पटवर्धन, पुणें, किं १० रुपये ) — फलज्योतिषानुसार चालणारेच आपल्या समाजात बहुतेक लोक आहेत अशा स्थितीत त्या शास्त्राला आधार भूत असें जें खगोलज्योतिषाचें गणित तें सूक्ष्म, बिनचूक, व दृक्प्रत्ययसिद्ध असल्याशिवाय ह्या शास्त्रानुसार वागणें म्हणजे अधळ्यानें अधळ्याची काठी घेऊन चालण्याप्रमाणेंच आहे । ह्याचसाठीं लोकमान्य टिळकांच्या व इतरांच्या प्रयत्नामुळें पुणें, सांगली वगैरे ज्योतिषसमेलनें भरलीं जें दृक्प्रत्ययसिद्ध गणित आज अवलंबावें, व तसें तें अवलंबण्यासाठी आपल्या जुन्या चालत असलेल्या परपरांना व सारिणींनाच काय व कसें चालन व रूप द्यावें, ह्याविषयीं त्या समेलनातून जे ठराव विद्वानाच्या वादविवादानतर व त्याच्या समतीनें मजूर करण्यात आले, त्यानाच अनुसरून फलज्योतिषाला लागणारी सर्वप्रकारची, व प्रत्येक बाबीसंबधाची, तपशीलवार व सविस्तर माहिती ह्या ग्रथात आयती काढून कोष्टकरूपानें उत्तमपणें माडून दिली आहे हें काम अत्यत श्रमाचें होतें यात शका नाहीं, पण ते चिकाटीनें पार पाडून मराठींत हा प्रमाणभूत असा उत्तम शास्त्रीय ग्रंथ निर्माण केल्याबद्दल प रघुनाथशास्त्री ह्याचें करावें तितकें अभिनदन थोडेंच आहे *असा ग्रथ मराठीतच नव्हे, तर कोणत्याहि देशी भाषेंत हिंदुस्थानात* अद्यापि झालेला ऐकिवात नाहीं ह्या अपूर्वतेवरूनच त्याची किंमत कळून येईल हा ग्रथ डबलरॉयल षोडशपत्री सुमारें पाचशें पानाचा असा प्रचंड आहे असला ग्रथ तयार करण्याची मेहनत, त्याचा प्रचड आकार, जाडा कागद, व इतकी मजबूत बाधणी, ह्या मानानें पुस्तकाची दहा रुपये किंमत खचित फार नाहीं. **उदय—उमरावती,**

## श्री. रा. रा. दाजी नागेश आपटे B A LL B. हायकोर्ट वकील, वडोदे. फलज्योतिष परिषदेचे अध्यक्ष

**( ९ ) भविष्यसिद्धांत** —( लेखक व प्रकाशक प रघुनाथशास्त्री पटवर्धन, शुक्रवार पेठ, पुणें शहर पृ स १४+३५६+८, किं रु १०-०-० )

गणित व फलित अशा उभयविध ज्योतिषशास्त्राचा अभ्यास फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानात चालत आला आहे प्रथमत. यज्ञयाग दि कर्में यथाकालीं आचरण्यासाठीं खगोल ज्योतिषाची आर्यांना जरूर पडल्यानें त्यांनी आकाशातील तेजोगोलाचें व त्याच्या गतीचें अध्ययन करण्यास सुरवात केली पुढें त्या अभ्यासाचा विकास झाल्या वर त्यांनीं ' आचार प्रभवो धर्म ' । असें ठरवून त्या धर्माचे सर्व आचार कालदृष्टया ज्योतिष स्थितीशीं निगडित करून टाकल्यानें धर्मशास्त्राशीं ज्योतिषशास्त्राचा संबंध जडला गेला दुसऱ्या मार्गानें फलज्योतिषाच्या साधनानें मानवी बुद्धी या शास्त्राशीं दृढसबद्ध झाली अशा रीतीचा ज्योतिषशास्त्राचा संबध असल्यानें व इतर प्राचीन शास्त्रें लुप्तप्राय झालीं असता अथवा होत चाललीं असतांहि हे ज्योतिषशास्त्र अबाधित राहिलें आहे इतकेंच नव्हे तर आज पर्यंत केवळ धंदेवाइकाच्याच हातात असलेलें हें शास्त्र उत्तरोत्तर सुशिक्षितांच्या व्यवसायास अधिकाधिक पात्र होत चाललें आहे. असें असूनहि या शास्त्रावरील सर्व आधार ग्रथ सस्कृत भाषेंतच असल्यानें मराठी वाचकांना दुर्लभ व दुर्बोध असल्यानें या विषयावर मराठींत चागले अधिकारी ग्रथ असण्याची फार आवश्यकता आहे. अशा स्थितींत पडित रघुनाथशास्त्री याचा हा प्रस्तुत ग्रथ प्रसिद्ध झाला आहे भविष्यसिद्धातात फलज्योतिषाला अधिक महत्व दिलें आहे *शिवाय या ग्रंथातील फलिताच्या विवेचनात पाश्चात्य फलज्योतिषाची पुष्कळशी विवेचन पद्धति उचलेली आहे* हाहि त्यांत विशेष आहे १-३० पृष्ठापर्यंत सर्वसाधारण सिद्धातगणिताची माहिती पृ ३० ते ९४ पर्यंत फलिताची माहिती पुन्हा १-२४ पृष्ठापर्यंत भविष्यकालनिर्णयात्मक माहिती नंतर पुन्हा पृ १-३५६, कोष्टक, विभाग, येणें प्रमाणें ग्रथ विभाग केले आहेत कोष्टक भागात सर्व प्रकारचें गणित कोष्टक रूपानें तयार करून ठेवल्यानें अभ्यासूची फार उत्कृष्ट सोय केलेली आहे हर्शल, नेपच्यूनसारख्या नूतन शोधित ग्रहाचाहि निर्देश शोधक बुद्धिनें व प्राचीन दुराग्रहरहित दृष्टीनें केला आहे व त्यांची दृश्य तिर्थी माहतीही दिली आहे एकदरीत हा ग्रथ वाचनीय, संग्राह्य व अभ्यसनीय झाला आहे व तो पुष्कळ प्रयत्नानें व कष्टानें प्रसिद्ध केल्याबद्दल पंडित रघुनाथशास्त्री हे अभिनंदनास पात्र आहेत

# ज्योतिष-शिक्षक.

( लेखकः—ज्योतिषरत्न पंडित रघुनाथशास्त्री पटवर्धन. )

श्रीगणेशायनमः

श्रीसरस्वत्यैनमः

वागीशाद्याः सुमनसः सर्वार्थानामुपक्रमे । यं नत्वा कृतकृत्याः स्युस्तं नमामि गजाननम् ॥ १ ॥
यस्य निःश्वसितं वेदा यो वेदेभ्योऽखिलं जगत् । निर्ममे तमहं वन्दे विद्यातीर्थं महेश्वरम् ॥२॥
मातरं पितरं वन्दे वन्दे श्रीकुलदैवतम् । ज्ञानदीप प्रदातारं वंदे ज्ञानगुरुं परम् ॥
नारायण नमस्कृत्य नरंचैव नरोत्तमम् । देवीं सरस्वतींचैव ततोजय मुदीरयेत् ॥ ३ ॥
अचिंत्याव्यक्त रूपाय निर्गुणाय गुणात्मने । समस्त जगदाधार मूर्तये ब्रम्हणे नमः ( सू. सि. )

अणोरणुतरः साक्षादीश्वरो महतो महान् । आत्मा गुहायांनिहितो जंतोर्जयत्यतींद्रियः ॥ ४ ॥
ब्रह्माचार्यो वसिष्ठोऽत्रिर्मनुः पौलस्त्यलोमशौ । मरीचिरंगिरा व्यासो नारदः शौनकोभृगुः ॥५ ॥
च्यवनो यवनो गर्गः कश्यपश्च पराशरः । अष्टादशैते गंभीरा ज्योतिः शास्त्रप्रवर्तकाः ॥ ६ ॥

वेदाहि यज्ञार्थमभिप्रवृत्ताः कालानुपूर्वा विहिताश्चयज्ञाः
तस्मादिदं कालविधानशास्त्रं यो ज्योतिषंवेद सवेद यज्ञान् ॥७॥ वेदांग ज्योतिष

यथा शिखा मयूराणां नागानां मणयो यथा । तद्वद्वेदांगशास्त्राणां ज्योतिषं मूर्धनिस्थितम् ॥ ८ ॥
सिद्धांतसंहिता होरा रूपं स्कंधत्रयात्मकम् । वेदस्य निर्मलं चक्षुर्ज्योतिःशास्त्र मनुत्तमम् ॥ ९ ॥
अस्यशास्त्रस्य संबंधो वेदांगमिति कथ्यते । अभिधेयंच जगतः शुभाशुभ निरूपणम् ॥ १० ॥
वराहश्च नृसिंहश्च श्रीपतिः सत्यभास्करौ । ब्रह्मगुप्तो यवनाद्यो लल्लश्रीधररेणुकाः ॥११सि. मु॥

वेदेषु विद्यासुच ये प्रतिष्ठा धर्मादयः कालविशेषतोऽथ
ते सिद्धिमायां त्यखिलाश्च येन तद्वदनेत्रं अपतीह लोके ॥१२॥

दिव्यज्ञान मतींद्रियं पदविभि र्प्राप्तं वसिष्ठादिभिःपारंपर्यवशाद्रहस्य मयनीं नीतं प्रकाश्यं ततः ।

**Prof N. K Behre, M. A., Nagpur.**

Dear Pandit Raghunath Shastry

Many thanks for your Copy of the भविष्य-सिद्धांत. It is an excellent production and will help anyone interested in astrology to cast an horoscope of anyoneborn in the last 60 years and also of one who may be born in the next 50 years, and to predict his future. The tables are very well arranged and can easily be understood by a layman.

The book will also prove very useful as a reference book to astrologers by profession *I believe it is the best book of the century on This subject in Marathi.*

श्रीविश्वनाथः शरणम् ॥

अयि ज्योतिर्विदः !

भविष्यसिद्धान्तमिमं समस्त-सुसारणीभूषित सर्वदेशम् ।
उदाहृतिव्याहृतिभिश्च युक्तं विलोक्य चेतो मम मोदमेति ॥ १ ॥
फलविवेचनरीति दशायुता विषयरत्नभरैस्सु विभूषिता ।
नवनवा तिथिपत्र विकासिका सु"पटवर्धन" निर्मित पुस्तिका ॥ २ ॥
सकल लोकहिताय सुसङ्गता सुललिता बहुभाङ्गि विभाविता ।
विविध भावयुता जनरञ्जिका सुघटिताऽस्ति नवोक्तिरियंभुवि ॥ ३ ॥

इति चन्द्रपञ्चाङ्ग सम्पादकः पूर्णचन्द्र त्रिपाठी
ज्यौतिषाचार्य, तीर्थः वाराणसियः ।

**श्री. रा. रा. श्री. कृ. कोल्हटकर, बी. ए. एल्. एल्. बी., जळगांव**
**सांगली ज्योतिष परिषदेचे अध्यक्ष**

कृ. सा. न. वि. वि. आपण आपला विस्तृत व सर्वांग सुंदर 'भविष्यसिद्धांत' नांवाचा ग्रंथ अभिप्रायार्थ पाठविला तो पोंचला. शके १७८७ ते १८४८ पावेतोंचे स्पष्टचंद्र व इतर स्पष्टग्रह ग्रंथांत दिलेले असल्यामुळें कुंडली तावडतोब तयार करण्याची मोठी सोय झाली आहे. फलज्योतिषासंबंधींचीही आवश्यक तितकी सर्व माहिती दिल्यामुळें जोश्यांना या ग्रंथाचा फारच उपयोग होण्यासारखा आहे. पुनः एकदा आपलें मनःपूर्वक आभार मानून पत्र पुरें करितों.

**महामहोपाध्याय केशव गोपाळ ताम्हन, एम. ए., प्रिन्सिपाल संस्कृत महाविद्यालय, नागपूर.**

सा. न. वि. वि आपण पाठविलेला 'भविष्यसिद्धांत' ग्रंथ पोंचला. आपल्या ग्रंथाच्या योगानें इतका गहन विषय सामान्य जनासही सुलभ रीतीनें बोध होण्यास उत्तम साधन झाले आहे याबद्दल संशय नाहीं.

या दृष्टीनें पाहिलें असता अशा ग्रंथाची सध्याचे कालात फार उणीव भासत असे, ती आपण बऱ्याच अंशानें दूर केली ही जनतेवर आपला फार उपकार आहे, यांत संदेह नाहीं.

हिंदुस्थानचे अनभिषिक्त भूपति नृसिंह

## लोकमान्य बाळ गंगाधर टिळक.

पंडित रघुनाथ शास्त्री यांचा ज्योतिष-शिक्षणक्रम अत्यंत उपयुक्त व संग्राह्य आहे यांत शंका नाहीं.

—लो० टिळक.

( १२ ) ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वणवेद हे चार मुख्य वेद, त्याचप्रमाणें आयुर्वेद, धनुर्वेद, गांधर्ववेद व अर्थशास्त्र असे चार उपवेद आणि शिक्षा, व्याकरण, निरुक्त, कल्पसूत्रें, ज्योतिष व छंदशास्त्र हीं सहा वेदाचीं अंगें आहेत तसेंच मामांसाशास्त्र, न्यायशास्त्र, पुराणें व स्मृती, अशा अठरा विद्या-यामध्यें ( वसंतादि विशेष कालात करण्यास ) सांगितलेले धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे सर्वही ज्योतिषशास्त्राचे योगानें सांगितलेल्या कालात अनुष्ठान केल्यानेंच यथेक्त फल देतात याकरितां वेदाचे नेत्रभूत असें जें ज्योतिषशास्त्र, तें लोकामध्यें इतर शास्त्रापेक्षा अधिक श्रेष्ठ आहे.

( १३ ] सूर्य, चंद्रादि आकाशस्थ ज्योतींचें प्रत्यक्ष ज्ञान करून देणारें, सूक्ष्मबुद्धीच्या योगानें अत्यंत विचारणीय व रहस्यमय आणि मनुष्यमात्रास आवश्यक असें जें ज्योतिषविषयक दिव्य ज्ञान प्रत्यक्ष ब्रह्मदेवापासून वसिष्ठादिकास मिळालें ते वसिष्ठादिकापासून शिष्यपरंपरेनें पृथ्वीवर आलें ( आणिलें ) म्हणून हें गुप्त ज्योतिषज्ञान, द्वेष करणारे, कृतघ्न, दुर्जन, दुराचारी व गुरुसेवेपासून पराङ्मुख असे जे कोणी असतील त्यास सांगू नये., ह्या नियमाचे जो उल्लंघन करील त्याच्या आयुष्याचा व पुण्याचा क्षय होईल.

( १४ ) व्याकरणादि शास्त्राचा प्रत्यक्ष अनुभव कांहींच नाहीं, त्यात केवळ विवादच आहे. पण ज्योतिष शास्त्र हें प्रत्यक्ष प्रमाण असें शास्त्र असून चंद्र व सूर्य हे त्याचे साक्षीभूत होत

( १५ ) न्याय, व्याकरणादि शास्त्रें केवळ मनाची करमणूक करणारी व घटपटादि शास्त्रें आहेत व त्यामध्यें प्रत्यक्ष अनुभवास येण्यासारखें कांहींच नाहीं. वैद्यक, ज्योतिष व मंत्रविद्या हीं तीन शास्त्रें मात्र क्षणोक्षणीं प्रत्यक्ष अनुभवास येतात.

( १६ ) विद्वानाच्या अंतःकरणास समाधान व संतोष देण्याकरिता व ज्योतिषशास्त्र (व त्याची व्युत्पत्ति ) ज्ञान घ्यावें अशी इच्छा असणाऱ्या लोकाकरितां शास्त्रोक्त रीतीनें या ग्रंथात ज्योतिषशास्त्राची माहिती व विषय सांगितला आहे. याचे योगानें कोणत्याहि प्रकारें कष्ट न होता ज्योतिषज्ञान घेता येईल.

(१७,१८,१९) सिद्धान्त आणि जातक शास्त्र जाणणारें, बुद्धिमान्, निरलस आणि ज्योतिषशास्त्रातील तज्ज्ञ व आजन्म ज्योतिषशास्त्राची सेवा करणारे, असे अलौकिक विद्वान लोक, पंडित व महनीय विद्वानांनीं केलेले प्राचीन ग्रंथ अवलोकन करून संतोष पावतात व कृतकार्य होतात. अर्थात् आमचा हा ज्योतिष शिक्षणात्मक ग्रंथ करण्याचा प्रयत्न त्याच्या करिता नाहीं ज्याना पुष्कळ अध्ययन करण्यास सवड नाहीं, तसेंच अल्पबुद्धि, आलस्ययुक्त व या शास्त्रातील संपूर्ण रहस्य आमूलाग्र ग्रहण करण्यास असमर्थ आहेत पण थोडक्यात ज्योतिष-शास्त्राची माहिती असावी अशी ज्याची तीव्र इच्छा आहे त्याच्याच करिता मुख्यत हा सुलभ शिक्षण देण्याचा उद्योग असून हा ग्रंथ मी केला आहे. या ग्रंथानें जगचालक परमेश्वर संतुष्ट होवो.

( २० ) सिद्धान्त, संहिता, करण व जातक ग्रंथाचा योग्य प्रकारें विचार करून व ज्योतिषग्रंथकाराच्या तत्वाचे रहस्य लक्षात घेऊन मोरेश्वर पुत्र रघुनाथ असा जो मी तो यथामति शिक्षण देण्यास ग्रंथरूपानें प्रारंभ करितों.

## वर दिलेले श्लोक प्राचीन आचार्यांच्या ग्रंथांतीलच आहेत.

शके १८५१ अधिक वैशाख शु ११ भृगौ
सूर्योदयात् प्राक् घ. १ पळे ३५

शके १८५१ अधिक वैशाख शु १३ रवौ
सूर्योदयात् गत घ. १८ पळे १०

नैतद्देषिकृतप्रदुर्जनदुराचाराचिरावासिनां
स्यादायुः सुकृतक्षयो मुनिकृतां सीमा मिमामुज्झतः ॥ १३ सिद्धांत शिरोमणी ॥
अप्रत्यक्षाणि शास्त्राणि विवादास्तेषु केवलम्
प्रत्यक्षं ज्योतिषंशास्त्रं चंद्रार्कौ यत्र साक्षिणौ ॥ १४ व्यासः ॥
अन्यानि शास्त्राणि विनोद मात्रं न किंचिदेषांतु विशिष्टमस्ति
चिकित्सितज्योतिषमंत्रवादाः पदे पदे प्रत्ययमावहंति ॥ १५ व्यास ॥
कृत्स्नोपि ज्योतिषार्थश्च संक्षेपेणात्र निर्मितः। विबुधानांच बालानां तुष्टये कष्टहानये ॥ १६ ॥
होरा सिद्धांतशास्त्रज्ञाः सुधियोऽनलसा बुधाः
कृतकार्याः प्राङ्निबंधैस्तदर्थं नायमुद्यमः ॥ १७ ॥
ये पुनर्मंदमतयोऽलस्या शास्त्राश्च ज्योतिषः। रहस्यं वेत्तुमिच्छंति रचितस्तदपेक्षया ॥ १८ ॥
ज्योतिर्ज्ञानप्रदो ग्रंथः रचितोयं सुबोधनः
अमुना प्रीयतां श्रीमान् परमात्मा सदाशिवः ॥ १९ ॥
सिद्धांतजातकमतं प्रविचार्य सम्यगालोच्य तत्वमथ-
तीर्थकृतां परेषाम्। मोरेश्वरस्य तनयो रघुनाथशर्मा
काले यथामति सुशिक्षणमातनोति ॥ २० ॥

(१) कोणत्याही कार्याचे प्रसंगीं ज्यांचे स्मरण केलें असतां सर्व गोष्टींत यश मिळून मनुष्य कृतकृत्य होतो अशा त्या श्रीसिद्धिविनायक गजाननास मी अंतःकरणपूर्वक वंदन करितो.

(२) ज्यानें वेद निर्माण केले, त्याचप्रमाणें ज्यानें अखिल जगत् निर्माण केलें त्या परमात्म्यास आमचें शतशः वंदन असो. उत्तमांत उत्तम असा जो भगवान् नारायण व त्याचप्रमाणें विद्यारूपी देवी सरस्वती यांस आमचा प्रणिपात असो.

(३) माता, पिता, कुलदैवत, ज्ञान देणारे महान् गुणवान् असे ज्ञानगुरु यांस मी वंदन करतो.

(४) सूक्ष्मांत सूक्ष्म आणि मोठ्यांत मोठा असा जो अतींद्रिय परमात्मा तो मनुष्यमात्राचे अंतःकरणांत वसत असतो.

(५) अचिंत्य, अव्यक्त, निर्गुण निराकार असा ( समस्त जगतास मुख्य आधार असलेल्या ) परब्रह्मास आमचा नमस्कार असो.

(६) ब्रह्मा, आचार्य, वसिष्ठ, अत्रि, मनु, पौलस्त्य, लोमश, मरीचि, अंगिरा, वेदव्यास, नारद, शौनक, भृगु, च्यवन, यवनाचार्य, गर्ग, कश्यप, पराशर, हे १८ ज्योतिषशास्त्रप्रवर्तक महान् आचार्य होत.

(७) वेद यज्ञाकरितां, व यज्ञ कालावलंबी असें असल्यानें त्याच्याकरितां हे कालविधानशास्त्र सांगितलें. जो ज्योतिषशास्त्र जाणतो तो यज्ञासही जाणतो असें समजावें.

(८) मोराच्या मस्तकावर ज्याप्रमाणें तुरा असतो, नागाच्या मस्तकावर ज्याप्रमाणें मणि त्याप्रमाणें वेदांग व शास्त्रामध्यें ज्योतिषशास्त्र हें अग्रभागीं किंवा शिरोभागीं शोभतें व राहतें.

(९) सिद्धांत, संहिता, होरा, असे, ज्योतिषशास्त्राचे तीन निरनिराळे स्कंध किंवा भाग असून ज्योतिषशास्त्र म्हणजे वेदाचे निर्मल डोळे, अशा प्रकारचे महत्त्व ग्रंथांत सांगितलें आहे.

(१०) हे ज्योतिषशास्त्र वेदांग म्हणुन प्रमुख मानलें असून जगाच्या शुभाशुभ गोष्टींचा निर्णय करणारें आहे.

(११) वराह, वृद्धिह, श्रीपती, सत्यभास्कर, महागुप्त, वैद्यनाथ, लल्ल, श्रीधर, रेणुका हे ह्या शास्त्राचे आणखी प्रवर्तक आहेत.

सूचना केल्या व त्याप्रमाणें आम्हीं त्याची अंमलबजावणी केली आणि अशा रीतीनें हे शिक्षणकार्य सन १९१८ पासून सुरू आहे.

कोणतीही विद्या, ज्ञान अगर गोष्ट साध्य होण्यास त्याचा सतत अभ्यास व चिंतन केलें पाहिजे ही गोष्ट ज्योतिषविद्येलाही लागू असणार याबद्दल वाद नाहीं. अशा रीतीनें सतत अभ्यास केला असतां कोणतेंही ज्ञान प्राप्त झाल्याखेरीज राहणार नाहीं.

ज्योतिष शिक्षकांत आम्ही शक्य तितका प्रत्येक महत्त्वाचा विषय सविस्तर व सोदाहरण देऊं व खुलासा करूं, पण त्याचा सतत विचार व चिंतन केल्याखेरीज त्यांतील सर्व रहस्य व मतलब एकदम-ऐकतां वाचतांच— कळणें व मनाला पूर्णपणें बोध होणें शक्य नाहीं. याचा अनुभव व्यवहारांत देखील वारंवार येतो. मनांतून तर ज्योतिष शिकण्याची अत्यंत उत्सुकता व आस्था परंतु उद्योगधंद्यामुळें, परिस्थितीमुळें अगर अन्य कांहीं कारणानें ज्यांना गुरुगृहीं राहून शिक्षण घेतां येत नाहीं अशा लोकांकरितांच विशेषतः हा उपक्रम करण्यांत येत आहे. यांत प्रथम मूळ श्लोक आणि त्यानंतर त्याचें विवरण अशा पद्धतीनें विषय दिला आहे.

प्राचीनकाळीं ज्योतिषशास्त्राची अतिशय प्रगति व अत्यंत उन्नतावस्था होती. श्रीब्रह्मगुप्त, वराहमिहिर श्रीमद्भास्कराचार्य व श्रीगणेशदैवज्ञासारखे वंदनीय निष्णात ज्योतिर्षी व सूर्यसिद्धान्तभृगुसंहितेसारखे असामान्य ज्योतिष ग्रंथ आपल्या कर्तृत्वानें सर्व देशास ललामभूत होऊन राहिले होते व आजही आहेत. इतक्या उच्च तऱ्हेचें ज्ञान प्रत्येकास मिळणें दुरापास्त आहे, तथापि आपल्या शक्तीप्रमाणें ज्ञान प्राप्त करून घेणें हें प्रत्येकाचें आद्य कर्तव्य होय. कारण " नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते " असें प्रत्यक्ष भगवंतांनीं सांगितलें आहे. हिंदु-धर्मांतील पुष्कळशा गोष्टी ज्योतिषशास्त्रावर अवलंबून आहेत. इतकेंच नव्हे तर हिंदुधर्माचा व ज्योतिषशास्त्राचा इतका निकट व परस्पर संबंध आहे कीं, एकावांचून दुसऱ्याचें चालणारच नाहीं. आणि म्हणूनच ज्योतिष शास्त्राचें सामान्य ज्ञान तरी मनुष्यमात्रास अवश्य पाहिजे.

हल्लींच्या स्थितीकडे थोडेंसें लक्ष दिल्यास असें उघड दिसून येतें कीं, सुशिक्षित समाजांतील पुष्कळ लोकांस आज तिथी, नक्षत्र व चालू मराठी महिना कोणता हें दुसऱ्या मनुष्यास विचारावें लागतें. शिकलेल्या लोकाची जर ही अवस्था तर अशिक्षित समाज कोणत्या स्थितींत असेल ! ही स्थिती इष्ट आहे काय ! केव्हांही नाहीं. ती अंशतः तरी सुधारणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे.

पाश्चिमात्य सुधारलेल्या देशांत आमच्या ज्योतिष ग्रंथांचीं भाषांतरें होऊन त्यांनीं नवीन शोध लावून ते सप्रमाण सिद्ध करावे. व आमच्याकडे इतकें अमूल्य ग्रंथभांडार असतांना- नवीन शोध लावणें दूरच राहिलें. पण आम्हांस पंचांगसुद्धा पाहतां येऊं नये; यापेक्षां चमत्कार तो कोणता ! ही स्थिती सुधारण्यास एकच मार्ग आणि तो हाच कीं, सामान्य शिक्षण झालेल्यास सुद्धां सहज व बिनचूक समजेल अशा रीतीनें ज्योतिष शिक्षण देणें व त्याचा प्रसार करणें. याच विशिष्ट हेतूनें (उद्देशानें) हा शिक्षणक्रम आम्ही सुरू केला असून यांतील मुख्य ध्येय हेंच कीं, " जितुकें कांहीं आपणास ठावें, तितुकें हळूं हळूं शिकवावें, शाहणें करूनि सोडावें, सकलजन "

आमच्या या प्रयत्नास परमकारुणिक व परम दयाळू अशा जगन्नियंत्यानें यश द्यावे अशी त्याजपाशीं अनन्यभावानें प्रार्थना आहे.

ह्या ज्योतिषशिक्षकांत प्रथमतः कालविभाग, कालाचे प्रकार व कालाच्या मर्यादा दिल्या आहेत व नंतर भविष्य विभागांतर्गत गोष्टींचा संग्रह केला आहे. कारण, कालनिर्णय हा फलज्योतिषाचा मुख्य आधार होय. ग्रहांची राश्यात्मक व नक्षत्रात्मक स्थिति किंवा युति प्रतियुति इत्यादि गोष्टी कळतील, तेव्हांच त्याच्यावरून भविष्य वर्तवितां येईल, एरव्हीं नाहीं. शिवाय " कालः सर्वस्य कारणम् " असें असल्यानें प्रथम कालनिर्णयच झाला पाहिजे. कालाचे मुख्य भाग म्हणजे कल्प, युग, वर्ष अयन, ऋतु, मास, पक्ष, तिथि, वार, नक्षत्र, योग, करण आणि ग्रहांची राश्यात्मक व नक्षत्रात्मक स्थिति हे होत. ते आतां संवत्सरा ( वर्षा ) पासून अनुक्रमानें सांगतों. कारण पंचांगांत संवत्सरापासूनचा कालनिर्णय असतो.

अंश लग्न

अंश लग्न

ज्ञानासारखी परमपवित्र व परमपुण्यकारक अशी जगांत दुसरी कोणतीही गोष्ट नाहीं. ज्ञान हेंच सुबुद्ध व सुविचारी मनुष्याचें जीवन. ज्ञानाशिवाय मनुष्य म्हणजे जिवंतपणीं अस्तित्वाचा अभाव. पशु आणि मनुष्य यांत फरक हाच कीं, मनुष्यास ज्ञानप्राप्तीचा मार्ग मोकळा व पशूस ज्ञानप्राप्तीची अशक्यता. अशा प्रकारचें जें अभूतपूर्व व अलौकिक ज्ञानरूप साधन व त्या साधनाची माता किंवा जननी म्हणजे विद्या. अविद्यात्मक किंवा अज्ञानीपणाच्या अंधःकाराचा नाश करणारें जें ज्ञान त्याचेंच नांव विद्या. विद्या आणि ज्ञान अशा वस्तुतःदोन भिन्न भिन्न गोष्टी नसून विद्या म्हणजेच ज्ञान होय. ज्ञानाच्या योगानें मनुष्याच्या विचारांत व आचारांत प्रगल्भता येते आणि विद्येच्या योगानें कोणत्याही मनुष्यास कसल्याही परिस्थितींत एकप्रकारचा मनाचा खंबीरपणा राहतो. ज्ञानी मनुष्यास कोणत्या वेळीं व कोणत्या तऱ्हेनें त्याच्या ज्ञानाचा व विद्येचा उपयोग करतां येईल हें सांगतां येणार नाहीं. परंतु ज्ञान व विद्या म्हणजे मनुष्याचें जीवन असा खरा प्रकार आहे. मग ता विद्या किंवा तें ज्ञान कोणत्याही शास्त्राचें असो, अन्य कलेचें असो अगर दुसरें कोणतें असो. ज्ञानाचें महत्त्व सर्वांपेक्षां जास्त असल्या कारणानेंच भगवान् श्रीकृष्णांनीं श्रीद्भगवद्गीतेंत असें स्पष्ट लिहून ठेविलें आहे कीं, **"नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते"** ज्ञानासारखी पवित्र दुसरी कोणतीही गोष्ट नाहीं. देवगुरु बृहस्पति यांचा पुत्र कच यानें विद्येकरितां, शुक्राचार्यापासून संजीवनी मंत्रविद्येचें ज्ञान मिळविण्याकरितां आपल्या देहाचें पीठ करविलें पण विद्या व ज्ञान प्राप्त करून घेतलें ही गोष्ट आबालवृद्धांस माहीत आहे.

सांप्रत हिंदुस्थान देशाची परिस्थिति इतकी बिकट व खडतर झालेली आहे कीं, प्राचीन शास्त्रें व प्राचीन विद्या यास कोणाचेंही साह्य नाहीं. इतकेंच नव्हे तर प्राचीन शास्त्रांच्या उत्कर्षाकरितां संशोधनाच्या दृष्टीनें कोणी प्रयत्न करीत असल्यास त्यास विरोध करून त्या कार्याचा नाश करण्याकडेच बहुतांची प्रवृत्ति आढळते. फलज्योतिषासारखा गहन विषय कीं, ज्या विषयाच्या संशोधनाकरितां व प्रगतीकरितां हजारों मनुष्यांचे प्रयत्न आणि लाखों रुपये सतत खर्च व्हावयास पाहिजेत. पण प्रत्यक्ष स्थिति मात्र अगदीं याच्या उलट आहे व या शास्त्रावर सतत आघात मात्र जोरानें चालू आहेत. अशा वेळीं शास्त्राच्या व विद्येच्या संरक्षणाचा उपाय एक आणि तो हाच कीं, त्या शास्त्राचें शिक्षण सर्वांना देणें आणि ज्योतिषशिक्षणाचा शक्य तितका जास्तींत जास्त प्रसार करून ह्या शास्त्रांतील रहस्य व मूलतत्त्वें सर्वांच्या पुढें मांडणें.

अत्यंत गहन व अत्यंत गूढ अशा ज्योतिषशास्त्राची जरुरी प्रत्येकांस क्षणोक्षणीं लागते. आणि जोंपर्यंत प्रत्येक मनुष्यांत भावी गोष्टींची जिज्ञासा व भविष्यकालीन शुभाशुभफलें आगाऊ कळावीं अशी इच्छा जागृत आहे. (ही इच्छा जगाच्या अंतापर्यंत प्रत्येकांत कायम राहणार याबद्दल शंकाच नको) तोंपर्यंत प्रत्येकास ज्योतिषशास्त्राची जरुरी आहेच. कारण भविष्यकालीन गोष्टी आगाऊ वर्तविणारें फलज्योतिष हें फक्त एकच शास्त्र होय. या शास्त्राची माहिती व ज्ञान प्रत्येकांस असणें अगत्याचें आहे इतकेंच नव्हे तर मार्गदर्शक व भावी गोष्टींची आगाऊ इशारत देणारें असून मनुष्य दैववादी असो अगर अट्टल प्रयत्नवादी असो त्यास याचा उपयोग आहे. प्रयत्नवाद्यांस जास्त प्रयत्न करण्यास उत्तेजन देणारें व दैववाद्यांस कोणता काल अनुकूल आहे हें सांगणारें असें हें महत्त्वाचें कालविधानतत्त्व, कालज्ञान व भविष्यज्ञानशास्त्र आहे.

ह्या शास्त्राचें शिक्षण सर्वांस सुलभ रीतीनें देण्याची योजना आम्ही सन १९१६ पासून केली. व या बाबतींत लोकमान्य टिळक यांच्याशीं प्रथम पुष्कळ वाटाघाट होऊन लोकमान्य टिळकांनीं या कार्यांत फार महत्त्वाच्या

सूचना केल्या व त्याप्रमाणें आम्हीं त्याची अमलबजावणी केली आणि अशा रीतीनें हे शिक्षणकार्य सन १९१८ पासून सुरू आहे.

कोणतीही विद्या, ज्ञान अगर गोष्ट साध्य होण्यास त्याचा सतत अभ्यास व चिंतन केलें पाहिजे ही गोष्ट ज्योतिषविद्येलाही लागू असणार याबद्दल वाद नाहीं. अशा रीतीनें सतत अभ्यास केला असता कोणतेंही ज्ञान प्राप्त झाल्यावांचून राहणार नाहीं.

ज्योतिष शिक्षकात आम्ही शक्य तितका प्रत्येक महत्वाचा विषय सविस्तर व सोदाहरण देऊ व खुलासा करू, पण त्याचा सतत विचार व चिंतन केल्याशिवाय त्यातील सर्व रहस्य व मतलब एकदम ऐकता वाचताच— कळणें व मनाला पूर्णपणें बोध होणें शक्य नाहीं. याचा अनुभव व्यवहारात देखील वारंवार येतो मनातून तर ज्योतिष शिकण्याची अत्यंत उत्सुकता व आवडा परंतु उद्योगधंद्यामुळें, परिस्थितीमुळें अगर अन्य काहीं कारणानें ज्याना गुरुगृहीं राहून शिक्षण घेता येत नाहीं अशा लोकांकरिताच विशेषत हा उपक्रम करण्यात येत आहे. यात प्रथम मूळ श्लोक आणि त्यानंतर त्याचें विवरण अशा पद्धतीनें विषय दिला आहे

प्राचीनकाळीं ज्योतिषशास्त्राचा अतिशय प्रगति व अत्यंत उन्नतावस्था होती आर्यभट्ट, वराहमिहिर श्रीमद्भास्कराचार्य व श्रीगणेशदैवज्ञाप्रारखे वंदनीय निष्णात ज्योतिषी व सूर्यसिद्धान्तभृगुसंहितेसारखे असामान्य ज्योतिष ग्रंथ आपल्या कर्तृत्वानें सर्व देशास ललामभूत होऊन राहिले होते व आजही आहेत इतक्या उच्च तऱ्हेचें ज्ञान प्रत्येकास मिळणें दुरापास्त आहे, तथापि आपल्या शक्तीप्रमाणें ज्ञान प्राप्त करून घेणें हें प्रत्येकाचें आद्य कर्तव्य होय कारण " नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते " असें प्रत्यक्ष भगवतानीं सांगितलें आहे. हिंदुधर्मातील पुष्कळशा गोष्टी ज्योतिषशास्त्रावर अवलंबून आहेत. इतकेंच नव्हे तर हिंदुधर्माचा व ज्योतिषशास्त्राचा इतका निकट व परस्पर संबंध आहे कीं, एकावाचून दुसऱ्याचें चालणारच नाहीं आणि म्हणूनच ज्योतिष शास्त्राचें सामान्य ज्ञान तरी मनुष्यमात्रास अवश्य पाहिजे

हल्लींच्या स्थितीकडे थोडेंसें लक्ष दिल्यास असें उघड दिसून येतें कीं, सुशिक्षित समाजातील पुष्कळ लोकास आज तिथि, नक्षत्र व चालू मराठी महिना कोणता हें दुसऱ्या मनुष्यास विचारावें लागतें शिकलेल्या लोकांची जर ही अवस्था तर अशिक्षित समाज कोणत्या स्थितींत असेल ! ही स्थिति इष्ट आहे काय ! केव्हाही नाहीं ती अंशत तरी सुधारणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे.

पाश्चिमात्य सुधारलेल्या देशात आमच्या ज्योतिष ग्रंथाचीं भाषांतरें होऊन त्यानीं नवीन शोध लावून ते सप्रमाण सिद्ध करावें. व आमच्याकडे इतके अमूल्य ग्रंथभांडार असताना नवीन शोध लावणें दूरच राहिलें. पण आम्हास पंचांगसुद्धा पाहतां येऊ नये, यापक्षां चमत्कार तो कोणता ! ही स्थिती सुधारण्यास एकच मार्ग आणि तो हाच कीं, सामान्य शिक्षण झालेल्यास सुद्धा सहज व बिनचूक समजेल अशा रातीनें ज्योतिष शिक्षण देणें व त्याचा प्रसार करणें याच विशिष्ट हेतूनें (उद्देशानें) हा शिक्षणक्रम आम्ही सुरू केला असून यातील मुख्य ध्येय हेंच कीं, " जितुकें काहीं आपणास ठावें, तितुकें हळू हळू शिकवावें, शहाणें करूनि सोडावें, सकलजन "

आमच्या या प्रयत्नास परमकारुणिक व परम दयाळू अशा जगन्नियंत्यानें यश द्यावें अशी त्याजपाशीं अनन्यभावानें प्रार्थना आहे

ह्या ज्योतिषशिक्षकात प्रथमत कालविभाग, कालाचे प्रकार व कालाच्या मर्यादा दिल्या आहेत व नंतर भविष्य विभागांतर्गत गोष्टींचा संग्रह केला आहे कारण, कालनिर्णय हा फलज्योतिषाचा मुख्य आधार होय. ग्रहांची राश्यात्मक व नक्षत्रात्मक स्थिति किंवा युति प्रतियुति इत्यादि गोष्टी कळतील, तेव्हाच त्याच्यावरून भविष्य वर्तविता येईल, एरव्हीं नाहीं शिवाय " काल सर्वस्य कारणम् " असें असल्यानें प्रथम कालनिर्णयच झाला पाहिजे. कालाचे मुख्य भाग म्हणजे कल्प, युग, वर्ष अयन, ऋतु, मास, पक्ष, तिथि, वार, नक्षत्र, योग, करण आणि ग्रहांची राश्यात्मक व नक्षत्रात्मक स्थिति हे होत. ते आता संवत्सर ( वर्ष ) पासून अनुक्रमानें सांगतों. कारण पंचांगात संवत्सरापासूनचा कालनिर्णय असतो.

# अथ संवत्सरप्रकरणम्

सार्कः शाकः षष्टिहृन्मानवोऽब्दः सोऽयं ख्यातो दक्षिणे नर्मदायाः ॥
सोऽयं रव्यब्दान्वितो जैत्र संज्ञो यस्मिन देशे वत्सरः संप्रदिष्टः ॥ १ ॥

( संवत्सर कल्पलता )

अर्थः—इष्ट शकाची जी संख्या त्यांत बारा मिळवून साठानीं भागावें, जी बाकी राहील त्या संख्येशीं तुल्य अनुक्रमानें जो प्रभवादिकांतील संवत्सर येईल तो मानव संवत्सर जाणावा. ह्या नांवाचा संवत्सर नर्मदेच्या दक्षिणमार्गी प्रसिद्ध असतो. शेष राहिलेल्या संख्येत बारा मिळविलें असतां जी संख्या येते त्या संख्येशीं तुल्य जो प्रभवादिकांतील संवत्सर तो नर्मदेच्या उत्तरमार्गांत मानला जाणारा बार्हस्पत्य संवत्सर म्हणजे संवत् समजावा.

## संवत्सरनामसाधन.

अभीष्ट शाकोऽर्क युतो खपद् संख्या विभाजितः
शेषाः संवत्सराह्वेया प्रभवादिरनुक्रमात् ॥

अर्थः—शालिवाहन शकापैकीं ज्या शकाचें संवत्सर नांव पहावयाचे असेल तो इष्ट शक घेऊन त्यांत १२ मिळवावे आणि त्यांस ६० नीं भागावें. बाकी राहील तो संवत्सर प्रभवादि संवत्सरांच्या नांवाच्या अनुक्रमानें जाणावा.

शके १८५१चें संवत्सरनांव काढूं—१८५१+१२=१८६३÷६० बाकी ३ म्हणून शुक्लनाम संवत्सर हे १८५१ या शकाचें संवत्सरनांव आहे.

## संवत्नामसाधन.

शाको पंचाग्निभूयुक्तः संवताख्यो भवेत् ध्रुवम्
संवन्नंद युतो, हृत्वा खरसैः प्रभवादयः ॥ १ ॥
( अन्येतु ) शकनाम रविर्युक्तः संवन्नामंच निर्दिशेत् ॥ २ ॥

अर्थः—इष्ट शकांत १३५ मिळवावे म्हणजे संवत् वर्ष येतें. संवत् वर्षांत ९ मिळवून ६० नीं भागावें. बाकी येईल त्या संख्येचे प्रभवादि ६० नांवापैकीं नांव हे त्या संवताचे ( म्हणजे कार्तिकापासून सुरू होणाऱ्या वर्षाचें ) नांव समजावें.

( २ ) शकाचें जें नांव येईल त्यांत १२ मिळवावें म्हणजे येणाऱ्या संख्येइतकें संवताचे नांव असेल.

शके १८५१ चा संवत व संवताचे नांव पाहूं. १८५१+१३५=१९८६+९=१९९५÷६० बाकी १५ म्हणजे वृषनाम संवत्सर.

शके १८५१ या शकाचें नांव शुक्लनाम त्याच्यापुढें १२ वें नांव वृषनाम हेंच आहे.

संवतासंबंधीं हें लक्षांत ठेवावें कीं, संवताचा आरंभ दरवर्षी कार्तिक शु. १ पासून होतो, व शालिवाहन शकवर्षाचा आरंभ चैत्र शु. १ पासून होतो. म्हणजे एका शकांत दोन संवत् येतात. इंग्रजी सन देखील प्रत्येक शकांत दोन दोन येतात.

प्रभवो विभवः शुक्लः प्रमोदो थ प्रजापतिः ॥
अंगिराः श्रीमुखो भावो युवा धाता तथैवच ॥ १ ॥
ईश्वरो बहुधान्यश्च प्रमाथी विक्रमो वृषः ॥
चित्रभानुः सुभानुश्च तारणः पार्थिवो व्ययः ॥ २ ॥

सर्वजित् सर्वधारीच विरोधी विकृतिः खरः
नंदनो विजयश्चैव जयो मन्मथ दुर्मुखौ ॥ ३ ॥
हेमलंबी विलंबीच विकारी शार्वरी प्लवः ॥
शुभकृच्छोभनः क्रोधी विश्वावसु पराभवौ ॥ ४ ॥
प्लवंगः कीलकः सौम्यः साधारण विरोधकृत् ॥
परिधावी प्रमादीस्या दानंदो राक्षसा नलौ ॥ ५ ॥
पिंगळः कालयुक्तश्च सिद्धार्थी रौद्रदुर्मती ॥
दुंदुभी रुधिरोद्गारी रक्ताक्षीः क्रोधन क्षयें ॥ ६ ॥ ( गर्ग आणि नारद )

१ प्रभव, २ विभव, ३ शुक्ल, ४ प्रमोद, ५ प्रजापति, ६ अंगिरा, ७ श्रीमुख, ८ भाव, ९ युवा, १० धातृ, ११ ईश्वर, १२ बहुधान्य, १३ प्रमाथी, १४ विक्रम, १५ वृष १६ चित्रभानु, १७ सुभानु, १८ तारण, १९ पार्थिव, २० व्यय.

२१ सर्वजित्, २२ सर्वधारी, २३ विरोधी, २४ विकृति, २५ खर, २६ नंदन, २७ विजय, २८ जय, २९ मन्मथ, ३० दुर्मुख.

३१ हेमलंबी, ३२ विलंबी, ३३ विकारी, ३४ शार्वरि, ३५ प्लव, ३६शुभकृत्, ३७ शोभन, ३८ क्रोधी, ३९ विश्वावसु, ४० पराभव.

४१ प्लवंग, ४२ कीलिक, ४३ सौम्य, ४४ साधारण, ४५ विरोधकृत्, ४६ परिधावी, ४७ प्रमादी, ४८ आनंद, ४९ राक्षस, ५० अनल.

५१ पिंगल, ५२ कालयुक्त, ५३ सिद्धार्थि, ५४ रौद्र, ५५ दुर्मति, ५६ दुंदुभि, ५७ रुधिरोद्गारी, ५८ रक्ताक्षी, ५९ क्रोधन, ६० क्षय.

टीपः—ह्या वाक्यांत मूळचा 'आनंदो राक्षसोनलः' असा पाठ जरी आहे आणि त्यापासून अनलः असा किंवा नलः असा पदच्छेद करावा हें स्पष्ट कळत नाहीं तरी नारद संहितेंत संवत्सरांची फलें सांगण्याचे वेळेस 'अनलाब्दे नलमय' असा व वराहसंहितेंत "रुयाद्राक्षसंवानल संज्ञितंच" असा अनल शब्द स्पष्ट घातला आहे. ह्या दोन प्रमाणावरून अनलः असा पदच्छेद केला पाहिजे हें स्पष्ट समजण्यासाठीं '**आनंदो राक्षसानलौ**' असाच पाठ ह्या ग्रंथात घातला आहे. "आनंदो राक्षसो नलः" असाही पाठ असून नलः असा पदच्छेद क्वचित् आढळतो. तो वर लिहिलेलीं दोन प्रमाणें न पाहिल्यामुळें असेल (तथापि अनल हेंच संवत्सराचें नांव प्रचारांत आहे.)

युगं भवेद्वत्सर पंचकेन युगानि तु द्वादश वर्षषष्ठ्या ॥
भवंति तेषामधिदेवताश्च क्रमेण वक्ष्यामि मुनिप्रणीताः ॥ ७ ॥
विष्णुर्जीवः शक्रो दहनस्त्वष्टा चाहिर्बुध्न्यः पितरः ॥
विश्वे सोमश्चेंद्रज्वलनौ नासत्याख्या वंरयश्च भगः ॥ ८ ॥

अर्थः—पांच वर्षांचें एकयुग याप्रमाणें साठ वर्षांत बारा युगें होतात. त्या युगांच्या अधिदेवता ऋषींनीं सांगितल्या आहेत. त्या क्रमानें अशा कीं, १ विष्णु २ बृहस्पति, ३ इंद्र ४ अग्नि, ५ त्वष्टा ६ अहिर्बुध्न्य, ७ पितर, ८ विश्वदेव, ९ सोम, १० इंद्राग्नि, ११ अश्विनीकुमार १२ भग, ह्या देवता १२ युगांच्या अनुक्रमानें समजाव्या.

संवत्सरः प्रथमकः परिवत्सरोन्य स्तस्मा दिदान्विदिति पूर्वपदाः परे स्युः ॥
एवं युगेषु सकलेषु तदीयनाथा वन्ह्यर्क शीतगुविरिंचि शिवाः क्रमेण ॥ ९ ॥

अर्थ —पहिल्याचें संवत्सर, दुसऱ्याचें परिवत्सर, तिसऱ्याचे इदावत्सर, चौथ्याचे अनुवत्सर आणि पाचव्याचें इद्वत्सर अशीं क्रमानें पाच नांवें आहेत. याप्रमाणें बाराही युगात जाणावीं व संवत्सराची अग्नि, परिवत्सराची सूर्य, इदावत्सराची चंद्र, अनुवत्सराची ब्रह्मा, आणि इद्वत्सराची शिव ह्याप्रमाणें देवता समजाव्या.

## संवसत्राचे ( वर्षाचें ) पांचभेद.

संवत्सराः सावनजैव सौरनाक्षत्र चांद्राः क्रमतो दिनैःस्युः ॥
खांगाग्निभि स्तैःसकुभिः सवाणै वेंदाश्विरामैः श्रुतिवाणलोकैः ॥ १० ॥
कदाचि च्चांद्रवर्षस्य संख्यैकेनाधिका भवेत् ॥
मासेधिके तु गोदोर्भिः खाग्निभिर्वा धिकातुसा ॥ ११ ॥

अर्थ — सावन, बार्हस्पत्य, सौर, नाक्षत्र, आणि चांद्र असे पाच प्रकारचे संवत्सर आहेत. त्याचे दिवसाची संख्या अशी कीं, सावनाची संख्या तीनशें साठ, बाहस्पत्याची संख्या तीनशें एकसष्ट, सौराची संख्या तीनशें पासष्ट, नाक्षत्राची संख्या तीनशें चोवीस आणि चांद्राची संख्या तीनशें चोपन याप्रमाणें आहे. कदाचित् चांद्राचा संख्या तीनशें पचावन येतें ज्यावर्षी अधिकमास पडतो त्यावर्षी एकुणतीस किंवा तीस दिवस वरील संख्येपेक्षा चांद्र वर्षाचें अधिक होतात.

चांद्र श्चैत्रमुखो थ सौर उदितो मेषादिकः सावनो
व्योमांगत्रादिनः कुपद् त्रिदिवसः संवत्सरो गौरवः ॥
चांद्रो द्वो विगुरुः स्फुटेन मलिनो मध्यात्तु मानादयं
व्याचार्यो यदि सोधिको गुरुसवं यागं प्रतिष्ठां हरेत् ॥ १२ ॥

अर्थ—चांद्र ( वर्षाचा ) संवत्सराचा चैत्रशुक्ल प्रतिपदेपासून प्रारंभ होतो. सौर ( वर्षाचा ) संवत्सराचा मेषसंक्रांत झाल्यापासून प्रारंभ होतो. मीन संक्रांत झाल्यापासून सौर सवत्सरास प्रारंभ होतो असें ही कांचित् मतांतर आहे. पण ते ठीक नव्हेत. सावन सवत्सर पाहिजे त्या दिवसापासून तीनशें साठ दिवसाचा होतो. बार्हस्पत्य सवत्सर तीनशें एकसष्ट दिवसाचा होतो. ज्या चांद्र सवत्सरात स्पष्टगतीनें बृहस्पतीचें दुसरें राशीस गमन होत नाहीं त्यास मलिन संवत्सर असें समजावें तसेंच ज्या सवत्सरात मध्यमगतीनें बृहस्पतीचे दुसरे राशीस गमन होत नाहीं तो अधिक संवत्सर जाणावा. त्या अधिक सवत्सरात बृहस्पतीसव या नावाचा यज्ञ आणि देवाचा स्थापना करू नये

द्वादश मासा संवत्सरः ( श्रुति )

चांद्रसावनसौराणां मासानां तु प्रभेदतः
चांद्रसावन सौरास्तु त्रयः संवत्सरा अपि ॥ ब्रह्मसिद्धांत ( चिं. पु. ९ )

( १ ) चांद्र संवत्सर म्हणजे चैत्र शु० १ पासून फाल्गुन कृ० ३० पर्यंत. ( २ ) ३६० अहोरात्राचा म्हणजे दिवसाचा जो सवत्सर त्याचे नाव सावनसवत्सर. ( ३ ) सूर्य मेष राशींत आल्यापासून पुनः मेषराशींत येईपर्यंत लागणारा जो काल तो सौरसवत्सर किंवा सूर्याचें वर्ष अर्थात् सौरवर्ष (या शिवाय ३६१ दिवसाचा) ( दिवस म्हणजे एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंतचा काल ) बार्हस्पत्य सवत्सर आणि ३२४ दिवसाचा नाक्षत्रसंवत्सर असे आणखी दोन सवत्सर ज्योतिषकालगणनेंत आहेत पण प्रचारांत नाहीत.

## अयन, ऋतु, मास, पक्ष प्रकरणम् ॥

तस्मादादित्यः षण्मासान् दक्षिणेनैति षडुत्तरे ॥ श्रुति ॥
कर्कि मृगादिषट्के नैवायने दक्षिणसौम्यकेस्तः ॥ भास्कराचार्य ॥

कर्कारंभापासून ६ महिने दक्षिणायन व मकरारंभापासून ६ महिने उत्तरायण याप्रमाणें सूर्य असतां अयनें समजावीं

सौम्यायनं मासषट्कं मृगाद्यं भानुभुक्तितः
अहःसुराणां तद्रात्रिः कर्काद्यं दक्षिणायनम् ॥१५॥ नारदसंहिता ७८

अर्थः—मकर राशींत सूर्य आल्यापासून कर्क राशींत प्रवेश करीपर्यंतच्या कालास उत्तरायण किंवा उदगयन म्हणतात. कर्क राशींत सूर्यानें प्रवेश केल्यापासून मकर राशींत प्रवेश करीपर्यंतच्या कालास दक्षिणायन म्हणतात. उत्तरायण म्हणजे देवांचा दिवस व दक्षिणायन म्हणजे देवांची रात्र असें शास्त्रकार सांगतात.

निरयन संक्रांतीच्या पूर्वी ( इष्ट कालीं जितके शुद्ध अयनांश असतील तितके दिवस ) सायन संक्रांति होतात.

रविर्यदास्यान्नव (९) राशितुल्यःसौम्यायनादेः समयः स एव
यदाच सूर्यो गुण (३) राशितुल्यः याम्यायनादेः समयः सच स्यात्॥क. क.

ज्यावेळीं रविबरोबर ९ राशी ( २७० अंश ) असतो त्यावेळीं उत्तरायणास प्रारंभ होतो. व जेव्हां सूर्य बरोबर ३ राशी (९० अंश) असतो त्यावेळीं दक्षिणायनाचा आरंभ होतो.

मध्ये भचक्रस्य मुखेऽथवाचेत् सूर्यस्तदास्या द्विषुवं सु पुण्यम्
रात्रिः समाऽन्हा विषुवेऽयनस्य मुखेऽति दीर्घा रजनी दिनंवा ॥ क. क.

ज्यावेळीं सूर्य, वसंत संपातावर म्हणजे ० रा. ० अं. असतो किंवा संपातापासून १८० अंश असतो त्यावेळीं विषुव नावाचा पुण्यकाल होतो. यालाच विषुवदिवस म्हणतात. विषुव दिवशीं चोहोंकडे (सर्वत्र) दिवस व रात्र सारखी म्हणजे ३०।३० घटिका असते. **उत्तरायणाच्या आरंभीं रात्र फार मोठी व दक्षिणायनाच्या आरंभीं दिवस फार मोठा असतो.**

शिशिरोऽथ वसंतश्च ग्रीष्मो वर्षा शरद्धिमाः
रात्रिक्षयर्द्धिजाह्येतेऽयनयोर्ऋतवः क्रमात् ॥ १८॥ क. क.

*शिशिर, वसंत, ग्रीष्म, वर्षा शरद् व हेमंत, याप्रमाणें अनुक्रमानें ६ ऋतु आहेत.*

द्वयं द्वयं हि राशीनां यावदर्कोधितिष्ठति
एक एक ऋतुस्तावत् प्रमाणेन भवेत् खलु ॥ १९ ॥ क. क.

*सूर्याच्या दोन दोन राशी मिळून एक एक ऋतु होतो.*

तपस्तपस्यौ मधुमाधवौच शुक्रःशुचिश्चाथ नभौनभस्यौ
ततो ह्यथेषोर्ज सहःसहस्याः चांद्रर्तुमासा मकरादिगेऽर्के ॥२०॥ क. क.

तपस, तपस्य, मधु, माधव, शुक्र, शुचि, नभस्, नभस्य, इष, ऊर्ज, सहस्, सहस्य हे आर्तव चांद्र मास होत. याचा स्पष्ट अर्थ असा कीं, संपातानुवर्ती अशा तऱ्हेचे हे मास आहेत. सायन सूर्य बरोबर २७०अंश पूर्ण होतो तेव्हां तपस मासारंभ, ३०० अंश पूर्ण करतो तेव्हां तपस्य मासारंभ याप्रमाणेंच १२ ही मास समजावें. मधुमाधव इत्यादि नांवें ही वैदिक नावें होत.

**रवि**—वसंत संपातीं आल्यापासून मधु मासारंभ धरावा असाही कांहीं तज्ज्ञांचा मतभेद आहे.

" **वसंत ग्रीष्म वर्षाच शरत् हेमंत शैशिराः** ज्यो. सू.—वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरत, हेमंत शिशिर याप्रमाणें ऋतूंचा क्रम आहे. "

शिशिरपूर्वं मृतुत्रयमुत्तरं त्वयन माहु रहश्च तदाऽमरं ॥
भवति दक्षिण मन्य दृतुत्रयं निगदिता रजनी मरुतांचसा ॥ २१ ॥

अर्थ—सौर मानानें जे शिशिर, वसंत आणि ग्रीष्म हे तीन ऋतु म्हणजे मकरापासून सहा संक्रांतींचा काळ त्याला उत्तरायण असें नांव आहे. त्यालाच देवांचा दिवस असें ऋषि म्हणतात. तसेंच वर्षा, शरद आणि हेमंत हे तीन ऋतु म्हणजे कर्कापासून सहा संक्रांतीचा काल त्याला दक्षिणायन असें नांव असून त्यालाच देवांची रात्रि असें ऋषि म्हणतात.

कालतत्वविवेचनांतील व्यासभागुरिवाक्यानुसारी स्फुट खालील प्रमाणेः—

वसंतश्चैत्र वैशाखौ ग्रीष्मःशुक्रशुची उभौ ॥
.......................ज्येष्ठाषाढौच ग्रीष्मकौ ॥
वर्षर्तुः श्रावणो भाद्र आश्विनः कार्तिकः शरत् ॥ २२ ॥
मार्गपौषौ च हेमंतः शिशिरो माघ फाल्गुनौ ॥
सौरचांद्रमसै र्मासैः सौरचांद्रर्तवः स्मृताः ॥ २३ ॥

अर्थः—चैत्र आणि वैशाख हे दोन महिने वसंत ऋतु, ज्येष्ठ व आषाढ हे दोन मास ग्रीष्म ऋतु, श्रावण आणि भाद्रपद हे दोन मास वर्षाऋतु, आश्विन व कार्तिक हे दोन मास शरद् ऋतु, मार्गशीर्ष आणि पौष हे दोनमास हेमंत ऋतु, माघ व फाल्गुन हे दोन मास शिशिर ऋतु, ह्या क्रमानें साहा ऋतु चैत्रादि मासपरत्वें मानण्यांत येतात. सौर मासाप्रमाणें सौर ऋतु आणि चंद्रमासांनीं चांद्रऋतु समजावे. **फाल्गुन चैत्र वसंतऋतु, वैशाख ज्येष्ठ ग्रीष्म ऋतु याप्रमाणेंही पाठ आहे. तसाच रवि मीन व मेष राशींत असतां वसंतऋतु याप्रमाणें पुढें दोन राशींचा एक ऋतु असाही पाठ आहे.**

सौरंच संक्रांतिवशा द्दिनस्य नाक्षत्रमिंदो र्भगणभ्रमा च्च ॥ रत्नमाला
त्रिंशद्दिनं सावनसंज्ञ माद्यादिनाद्यमांतं खलु चांद्रमासं ॥ २४ ॥ आणि कल्पद्रुम

अर्थः—सूर्याच्या कोणत्याही संक्रांतिप्रवेशापासून समाप्तिपर्यंत जो काळ त्यास **सौरमास** असें म्हणतात. चंद्राचा आश्विनीनक्षत्रावर प्रवेश होतो त्यापासून रेवती नक्षत्राच्या समाप्तीस चंद्र जाईपर्यंत जो काळ तो **नक्षत्रमास** असें समजावें. तीस वारांचा ( दिवसांचा ) **सावन मास** जाणावा. प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत **चांद्रमास** असें समजावें.

चांद्रोपि शुक्लपक्षादिः कृष्णादि र्वेति च द्विधा ॥ निर्णयसिंधूंत
दर्शांतो वैदिको मासो राकांतः स्मार्त उच्यते ॥ २५ ॥ त्रिकांडमंडन

अर्थ :—शुक्ल प्रतिपदेच्या प्रारंभापासून अमावास्येच्या अंतापर्यंत किंवा कृष्ण प्रतिपदेच्या प्रारंभापासून पौर्णिमेच्या अंतापावेतों असा दोन प्रकारचा चांद्र मास आहे. त्यांत शु. १ पासून अमावास्यांता पर्यंतच्या मासाला **वैदिक मास** असें नांव आहे आणि पौर्णिमांत मासाला **स्मार्त** असें नांव आहे.

कृष्णपक्षादिकं मासं नांगी कुर्वंति केचन ॥
ये पीच्छंति न तेषां वै इष्टो विंध्यस्य दक्षिणे ॥ २६ ॥

अर्थ—कृष्ण प्रतिपदेपासून आरंभलेला जो मास त्याचा कांहीं पंडित मुळींच अंगीकार करीत नाहींत. दुसरे कांहीं पंडित त्याचा स्वीकार करावा असें म्हणतात. पण तो विंध्याद्रीच्या ( सातपुड्या डोंगराच्या ) उत्तर भागीं घ्यावा, दक्षिण भागांत घेऊं नये असें ते म्हणतात. ह्यावरून कृष्णप्रतिपदेपासून आरंभलेला जो चांद्रमास तो विवादग्रस्त असल्यामुळें गौण आहे. आणि शुक्ल प्रतिपदेपासून आरंभलेला चांद्रमास मुख्य आहे हें सिद्ध.

मीनादिस्थो रविर्येषामारंभ प्रथमक्षणे ॥ कालतत्वविवेचनांत

भवेत्तेद्रे चांद्रमासाश्चैत्राद्या द्वादश स्मृताः ॥ २७ ॥ ( व्यासांचें मत )

अर्थः—ज्या मुख्य चांद्रमासाच्या आरंभकाळीं ( शुक्लप्रतिपदेच्या प्रारंभीं ) मीन, मेष, वृषभ, इत्यादि राशीवर सूर्य असतो त्या मासांस अनुक्रमानें चैत्र वैशाख इत्यादि नांवें येतात. असे बारा मास एका संवत्सरांत होतात. ( मीन राशीस सूर्य असतां ज्या मासाची शुक्लप्रतिपदा लागते त्याला चैत्र असें नांव येतें. मेष राशीस सूर्य असतां ज्याची शुक्लप्रतिपदा चालू होते त्यास वैशाख असें नांव येतें. असेंच अनुक्रमानें पुढेंही समजावें.

चैत्रादिसंज्ञाः सौराणां मासानां मीनमूर्यतः बौधायनानुसारी

मेषार्को द्वे ति तु प्राह बौधायनमहामुनिः ॥ २८ ॥ स्फुट.

अर्थ—सौरमासांत चैत्र वैशाख इत्यादि संज्ञा मीन संक्रांतीपासून किंवा मेषसंक्रांतीपासून अनुक्रमानें जाणाव्या, असें बौधायन ऋषिचें मत आहे.

मासांत चैत्रादि नांवें येण्याचें कारण ज्योतिर्निबंधांत नारद सांगतातः—

यस्मिन् मासे पौर्णमासी येन धिष्ण्येन संयुता ॥

तन्नक्षत्राह्वयो मासः पौर्णमासी तदाह्वया ॥ २९ ॥

अर्थः—ज्या मासांतील पौर्णिमेचा अंत ज्या नक्षत्रानें युक्त असतो त्या नक्षत्राचें नांव पौर्णिमेस आणि त्या मासास येतें. म्हणजे चित्रा नक्षत्रानें ज्या पौर्णिमेचा अंत युक्त असेल त्या पौर्णिमेला चैत्री असें नांव व त्या पौर्णिमेनें युक्त जो मास त्याला चैत्र असें नाव येतें. याप्रमाणें अनुक्रमानें विशाखादि नक्षत्रांच्या योगानें वैशाखी पौर्णिमा आणि वैशाखमास इत्यादिक समजावें. केव्हां केव्हां रवि चंद्रांची गति विचित्र झाल्यामुळें वर लिहिलेलीं नक्षत्रें एक दोन संख्येनें उणीं किंवा अधिकही होतात.

टीपः—मराठी महिन्याचीं चैत्रादि नांवें त्या महिन्याच्या पौर्णिमेस जें नक्षत्र असेल त्यावरून ठरविलेलीं दिसतात. अशा नक्षत्रांना मास नक्षत्रें म्हणतात. उदाहरणार्थः—चैत्र शु० १५ स चित्रा नक्षत्र म्हणून चैत्रमास. वैशाख शु० १५ विशाखा नक्षत्र म्हणून वैशाखमास इत्यादि. त्यांचा क्रम पुढीलप्रमाणें १ चित्रा ( चैत्र ), २ विशाखा ( वैशाख ), ३ ज्येष्ठा ( ज्येष्ठ ), ४ पूर्वाषाढा ( आषाढ ), ५ श्रवण ( श्रावण ), ६ पूर्वाभाद्रपदा ( भाद्रपद ), ७ अश्विनी ( आश्विन ), ८ कृत्तिका ( कार्तिक ), ९ मृग ( मार्गशीर्ष ), १० पुष्य ( पौष ), ११ मघा ( माघ ) १२ पूर्वाफाल्गुनी ( फाल्गुन ).

वर दिलेलीं मासनक्षत्रें बहुतकरून त्या महिन्याच्या पौर्णिमेस असतात. केव्हां केव्हां एखाद्या नक्षत्राचा फरक पडतो. या संबंधांत सूर्यसिद्धान्तांत दिलेलें वचन खालीं देत आहे.

कार्तिक्यादिषु संयोगे कृत्तिकादि द्वयं द्वयं ॥

अंत्योपांत्यौ पंचमश्च त्रिधामासत्रयं स्मृतम् ॥३०॥ सू. सि.

अर्थः—कार्तिक महिन्यापासून चार महिने प्रत्येक पौर्णिमेस क्रमानें कृत्तिका, रोहिणी ( कार्तिक ) मृग, आर्द्रा ( मार्गशीर्ष ), पुनर्वसु पुष्य ( पौष ), आश्लेषा, मघा ( माघ ), अशीं नक्षत्रें येतात. कार्तिकापासून पांचवा महिना फाल्गुन. त्या पौर्णिमेस पूर्वा, उत्तरा, हस्त (फाल्गुन) चित्रा, स्वाती (चैत्र). विशाखा, अनुराधा, ( वैशाख ), ज्येष्ठा, मूळ ( ज्येष्ठ ), पूर्वाषाढा, उत्तराषाढा ( आषाढ ), श्रवण, धनिष्ठा (श्रावण), कार्तिकापासून उपांत्य म्हणजे भाद्रपद मास या महिन्याच्या पौर्णिमेस शततारका, पूर्वाभाद्रपदा उत्तराभाद्रपदा ( भाद्रपद ), तसेंच कार्तिकापासून शेवटचा म्हणजे आश्विन महिना. याला रेवती, अश्विनी, भरणी (आश्विन) याप्रमाणें प्रत्येक मासाचे पौर्णिमेचे नक्षत्रांत क्वचित् फरक पडतो. ( जो मास त्याचेंच नक्षत्र पौर्णिमेस निश्चितपणें असतें असें नाहीं केव्हां केव्हां त्याच्या अलीकडील अगर पलीकडील नक्षत्रेंही असतात. ज्या वर्षी अधिकमास असतो त्या वर्षी असा फरक नेहमीं येतो. )

मासशब्दश्चांद्र एव मुख्यस्तत्राप्यमांतके ॥
सौरसावननाक्षत्र कृष्णादिषु यतः कुतः ॥ ३१ ॥
त्रिंशत्तिथिसमूहे च गौणो मध्वादयोपि च ॥
चैत्रादयश्च तद्भेदवाचकत्वात्तथा विधाः ॥ ३२ ॥ कालतत्त्वविवेचन.

अर्थः—अमावास्येस संपणारा जो चांद्रमास त्याचेंच मास हें नांव मुख्यत्वें करून आहे. सौर, सावन, नाक्षत्र व वद्य प्रतिपदेपासून चालू होणारा जो चांद्र आणि ज्या कोणत्या तिथीपासून तीस तिथीपर्यंत जो चांद्रमास ह्या पांचांवर मास हें नांव गौणत्वें करून राहतें. याप्रमाणेंच ज्या वसंत, ग्रीष्म इत्यादिक ऋतूंच्या संज्ञा आणि ज्या चैत्र, वैशाख इत्यादिक मासांच्या संज्ञा त्याही अमावास्यांत चांद्रमासावर मुख्य व इतर पांचांवर गौण आहेत असें जाणावें.

चांद्रादिभिर्द्वादशभिर्मासैश्चांद्रादिवत्सराः ॥
पंचप्रकारा मुनिभि र्नाक्षत्रेण विनोदिताः ॥ ३३ ॥ कालनिर्णयदीपिकानुसारी स्फुट.

अर्थः—बारा चांद्रमासांनीं एक चांद्र संवत्सर होतो. याप्रमाणेंच नाक्षत्र मानावांचून इतर चार मानांचे संवत्सरांचें स्वरूप समजावें असें हेमाद्रीचें मत आहे. नाक्षत्र मानाचे बारा मासांनीच संवत्सर होतो असें मतांतरही आहे.

## कोणतें मान केव्हां घ्यावें

दिनप्रमाणं त्वयनादि सर्व संक्रांति कालस्य विनिर्णयश्च ॥
कृतादिमानं निखिलग्रहाणां यत् कर्मसौरेण विगृह्यमेतत् ॥ ३४॥

अर्थः—दशेच्या वगैरे दिवसांचे मान, अयन, ऋतु, संक्रांतिकालाचा निर्णय, कृत, त्रेता इत्यादि युगाचें मान आणि ग्रहसाधन करण्याचा प्रकार हें सर्व सौर मानानें करावें.

जीमूतगर्भं निखिलं तु सम्यक्तज्ज्ञस्य मानेन निरीक्षितव्यं ॥
नृगर्भवृद्धिः प्रसवस्य कालो यत् सूतकाद्यं खलु सावनेन ॥ ३५ ॥

अर्थः—मेघांचे गर्भधारण नक्षत्र मानानें पहावें. मनुष्याच्या गर्भाची वृद्धि, प्रसूतीचा काल, सूतक आणि कृच्छ्र चांद्रायणादिक हें सर्व सावन मानानें घ्यावें.

उद्वाहयज्ञोपनयप्रतिष्ठा तिथिव्रतक्षौरमहोत्सवाद्यं ॥
सर्वक्रिया वास्तु गृहप्रवेशः पूर्वं च चांद्रेण विगृह्यमेतत् ॥ ३६ ॥

अर्थः—विवाह, यज्ञ, उपनयन, देवस्थापना, प्रतिपदादि तिथींचीं व्रतें, चौल, नवरात्रादिक उत्सव, वास्तु करण आणि गृहप्रवेश इत्यादि सकल कर्में चांद्रमानानें करावीं.

## अधिकमास व क्षयमामास.

असंक्रांति मासोधिमासः स्फुटं स्याद्द्विसंक्रांतिमासः क्षयाख्यः कदाचित् ॥
क्षयः कार्तिकादित्रये नान्यतः स्यात्तदा वर्षमध्येधिमासद्वयं च ॥ ३७ ॥ सि. शि.

अर्थ—ज्या मासांत सूर्याची संक्रांति नाहीं तो अधिक मास जाणावा. ज्या मासांत दोन संक्रांती होतात त्याला क्षयमास असें नांव आहे. पण तो बहुत दिवसांनीं कदाचित् येतो. क्षयमास हा कार्तिकापासून तीन मासांत येतो. आणि त्याच्यापूर्वीं एक व पश्चात् एक असे दोन अधिकमास बारा मासांचे आंत पडतात. क्षयमास कार्तिकापासून पांच मासांत येतो असेंही क्वचित् सांगितलें आहे.

सूर्यसिद्धान्तप्रमाणें **सौरवर्ष** ३६५ दि. १५घ. ३१ पळें ३० वि. आहे. व शुद्धगणितानें **सौरवर्ष** ३६५ दि. १५घ २२ पळें ५८वि. असें आहे. या ३६५ दिवसांत बारा वेळ सूर्य व चंद्र एके ठिकाणीं येऊन आणखी ११ दिवस शिल्लक राहतात, त्यामुळें सुमारें तीन वर्षांनीं एक अधिकमास येतो.

## ग्रहलाघवाप्रमाणें अधिकमास.

शाकोऽर्कघ्नोऽक भूतघ्नोऽक्षाप्तो भूनो दशाल्पकः ॥
द्व्यूनश्चैत्रात्स एवाधिमासो नैवान्यथा भवेत् ॥ ३८ ॥

अर्थः—कोणत्याही शकास १२ नीं गुणून १९ या संख्येनें भागावें. बाकी ९ आंकड्यापर्यंत राहिल्यास त्या वर्षी अधिकमास आहे असें समजावें. बाकी राहिलेला अंक ५पर्यंत असेल तर त्यांत १ किंवा २ वजा करावे. व बाकी ६ पासून ९ पर्यंत राहील तर त्यांत २ वजा करावे. याप्रमाणें वजाबाकी करून जो आंकडा राहील तो महिना त्या शकांत अधिकमास आहे असें समजावें. मात्र ही रीत स्थूलमानाची आहे.

द्वात्रिंशद्भिर्गतैर्मासैर्दिनैःषोडशभिस्तथा ॥
घटिकानां चतुष्केण पतत्यधिक मासकः ॥ ३९ ॥

अर्थः—एकदां अधिक महिना झाल्यापासून बत्तीस महिने, सोळा दिवस, चार घटका इतक्या कालानंतर पुन्हा अधिकमास येतो असा सामान्य नियम आहे.

अधिक मासासंबंधीं आणखी एक श्लोक उपलब्ध आहे तो गालॅलप्रमाणेंः—

एकत्रिंशतिभिर्मासैर्मध्यमान प्रमाणतः ।
प्राक् पश्चात् युगमासेषु मलमासो भवेत्खलु ॥ ४० ॥

अर्थः—मध्यम मानानें ३१ महिन्यांनीं अगर त्याच्यापूर्वी आणि नंतर ४ महिन्यांत म्हणजे २७ महिन्यापासून ३५ महिन्यापर्यंतच्या कालांत एका अधिकमासानंतर दुसरा अधिकमास येतो.

## शुद्धपंचांगाप्रमाणें अधिकमास काढण्याची रीतः—

इष्टाच्छकादष्ट द्विनंदहीनात् हृताग्नवैको गृहितं च शेषः ।
द्विचाब्धि त्रिश्चित्र शरः श्रवण्यां चाष्टस्य ज्येष्ठः विशिखाच रुद्रः ॥
त्रिरेक भाद्रो ख विशेष ज्येष्ठौ चाषाढ मासौ यदि षोडषःस्यात् ॥ ४१ ॥

अर्थः—इष्ट शकांतून ९२८ वजा करावे व बाकीस १९ ने भागावें बाकी २ राहिल्यास आश्विन, ३ राहिल्यास चैत्र, ५ राहिल्यास श्रवण, ८ राहिल्यास ज्येष्ठ, ११ राहिल्यास वैशाख, १३ राहिल्यास भाद्रपद, ० राहिल्यास ज्येष्ठ,१६ राहिल्यास आषाढ याप्रमाणें त्यावर्षी अधिकमास आहे असें समजावें. ही स्थूलमानाची मध्यम प्रमाणाची रीति आहे. या रीतीनें शके १८४०पर्यंत ज्या वर्षी बाकी २ येईल त्या वर्षी व शके १८४१ ते १९०० पर्यंत ज्या वर्षी बाकी ३ राहील त्या वर्षी अधिकमास नाहीं असें समजावें.

मासस्य कृष्णपंचम्यां रविः संक्रमते यदि ॥
अधिमासः स विज्ञेयः परवर्षेण योजयेत् ॥ ४२ ॥

अर्थ—ज्या महिन्याच्या कृष्ण पक्षांतील पंचमी तिथीस सूर्यसंक्रांत असेल तोच महिना पुढील वर्षी अधिक महिना असतो असा एक स्थूल नियम आहे. ॥ ८ ॥ हा नियम स्थूल असल्यानें कधीं केव्हां कृष्ण चतुर्थीस अगर षष्ठीस सूर्यसंक्रांत असतां तोच मास पुढील वर्षांत अधिकमास येतो.

## चांद्रमासांचीं नांवें.

चैत्रवैशाखज्येष्ठश्च आषाढः श्रावणस्तथा ॥
ततो भाद्रपदाश्विन्यः कृत्तिका मार्गशीर्ष च ॥
पौषमाघश्च फाल्गुन्यश्चांद्रमासान्यनुक्रमात् ॥ ४३ ॥

चैत्र, वैशाख, ज्येष्ठ, आषाढ, श्रावण, भाद्रपद, आश्विन, कार्तिक, मार्गशीर्ष, पौष, माघ, फाल्गुन, याप्रमाणें अनुक्रमानें चांद्रमासांचीं नांवें आहेत.

## अमांतं पौर्णिमांतं च मासभेदं विशेषतः

शुक्लप्रतिपदेपासून अमावास्यांतापर्यंतचा जो मास त्यास अमांतमास म्हणतात. कृष्णप्रतिपदेपासून पौर्णिमा समाप्तिपर्यंतचा जो मास त्यास पौर्णिमांतमास म्हणतात. अमांतमास महाराष्ट्रांत आणि इतर सर्वत्र प्रचारांत असून उत्तरहिंदुस्थानांत पौर्णिमांतमासाचा प्रचार आहे.

ह्या सर्व मासांच्या दोन पद्धतीमुळें दोघांचा मास शुक्लपक्षीं एकच येतो, पण कृष्णपक्षांत मात्र त्यांच्या मासाचें नांव निराळें म्हणजे अमांत मासाच्या पुढील महिन्याचें नांव असतें.

## मासांचीं नांवें, सूर्य, देवता वगैरे.

चैत्रमासेतु वेदांगो भानुर्वैशाखएव च ॥
ज्येष्ठ मासे तपेदिंद्र आषाढे तपते रविः ॥
गभस्तिः श्रावणे मासे यमो भाद्रपदे तथा ॥
सुवर्णरेताऽश्वयुजिकार्तिके च दिवाकरः ॥
मार्गशीर्षे तपेन्मित्रः पौषे विष्णुःसनातनः ॥
अरुणो माघमासे तु सूर्यो वै फाल्गुने तथा ॥
इत्येते द्वादशादित्या मासनामान्यनुक्रमात् ॥
चैत्रे विष्णुं तथा विंद्याद्वैशाखे मधुसूदनम् ॥
त्रिविक्रमंतथाज्येष्ठे आषाढे वामनंविदुः ।
श्रावणेश्रीधरं विद्धिहृषीकेशंतुभाद्रके ।
आश्विने पद्मनाभं च ऊर्जे दामोदरं विदुः ।
केशवं मार्गशीर्षे तु पौषे नारायणं विदुः ॥
माधवं माघमासेतु गोविंदमथ फाल्गुने ॥
चैत्रमासे रमादेवी वैशाखे मोहिनी तथा ॥
पद्माक्षी ज्येष्ठमासे तु आषाढे कमलेति च ॥
कांतिमती श्रावणे च भाद्रे तु अपराजिता ॥
पद्मावती आश्विने तु राधा देवी तु कार्तिके ॥
मार्गशीर्षे विशालाक्षी पौषे लक्ष्मीश्च देवता ॥
माघे तु रुक्मिणी प्रोक्ता फाल्गुने धात्रिनामिका ॥ ४४ ॥

## मासांची नांवें, सूर्य, देवता वगैरे यांचे कोष्टक रूपानें दिग्दर्शन.

| अ | मासनाम | माससंज्ञा | सूर्य | पुरुष देवता | स्त्री देवता |
|---|---|---|---|---|---|
| १ | चैत्र | मधु | वेदांग | विष्णु | रमा |
| २ | वैशाख | माधव | भानु | मधुसूदन | मोहिनी |
| ३ | ज्येष्ठ | शुक्र | इंद्र | त्रिविक्रम | पद्माक्षी |
| ४ | आषाढ | शुचि | रवि | वामन | कमला |
| ५ | श्रावण | नभ | गभस्ति | श्रीधर | कांतिमती |
| ६ | भाद्रपद | नभस्य | यम | हृषीकेश | अपराजिता |
| ७ | आश्विन | इष | सुवर्णरेता | पद्मनाभ | पद्मावती |
| ८ | कार्तिक | ऊर्ज | दिवाकर | दामोदर | राधा |
| ९ | मार्गशीर्ष | सह | मित्र | केशव | विशालाक्षी |
| १० | पौष | सहस्य | विष्णु | नारायण | लक्ष्मी |
| ११ | माघ | तप | अरुण | माधव | रुक्मिणी |
| १२ | फाल्गुन | तपस्य | सूर्य | गोविंद | धात्री |

### प्रत्येक मासांतील २ पक्ष.

**पूर्वापरेमास दलेहिपक्षौ पूर्वापरौतौ सित कृष्ण संज्ञौ ।**

कोणत्याही महिन्याचे २ भाग असतात. एक पूर्वार्ध आणि दुसरा उत्तरार्ध. पूर्वार्ध म्हणजे प्रतिपदे-पदेपासून पौर्णिमेपर्यंत ह्या भागास शुक्लपक्ष असें म्हणतात. उत्तरार्ध म्हणजे पौर्णिमेच्या दुसऱ्या दिवशीं अर्थात् कृ. प्रति पदेपासून अमावास्येपर्यंत ह्या भागास कृष्णपक्ष असें म्हणतात.

एके दर्शांतो त्र मासः प्रदिष्टस्त्व न्यैर्भानोर्मंडलांतः प्रदिष्टः ॥ ४५ ॥
चेत् संक्रांतिः स्या न्मतद्वंद्वकोपिमूढो मासो ब्रह्मसिद्धांत एवं ॥—मुहूर्तकल्पद्रुम.

अर्थः—कांहीं ऋषि म्हणतात, कीं अमावास्येचा अंत झाला, म्हणजे चांद्रमासाची समाप्ती होते. आणि दुसरे कांहीं ऋषि असें म्हणतात कीं, अमावास्येचा अंत झाला तरी पुढें रविमंडल म्हणजे रवीच्या व चंद्राच्या मंडलाचा वियोग होईतोंपर्यंतचा काळ पूर्वमासच जाणावा. ह्या दोन्हीं प्रकारांतून जो प्रकार जेथें चालत असेल त्या प्रकाराच्या मासांत पूर्वोक्त प्रकारें अगदीं संक्रांति नसेल किंवा दोन संक्रांति होतील तर अधिकमास आणि क्षयमास समजावें. याप्रमाणें ब्रह्मसिद्धान्त मत आहे.

( वरील दोन प्रकारांपैकीं अमावास्येचा अंत झाला म्हणजे माससमाप्ती होते हाच प्रकार सांप्रत चोहोकडे प्रचारांत आहे. )

चंद्रार्कयो स्तु विवैक्यं प्रतिपद्दर्शसंधिषु ॥
तिथ्यंतात् स्या दुभयतो रसनाड्योर्कमंडलं ॥४६॥ —शार्गीय पटलांत.

अर्थः—अमावास्या आणि प्रतिपदा यांच्या संधिकालीं अमावास्येच्या अंतापासून पूर्वी व पुढें सहा घटिका रविमंडल ह्या नांवाचा सूर्य आणि चंद्र ह्यांच्या बिंबाचा संयोग असतो. ( वर दिलेल्या मासप्रकाराकरितांच अमावास्या व प्रतिपदा यांच्या संधिकालीं अलीकडे व पलीकडे किती घटिका बिंबसंयोगाच्या असतात. हें या श्लोकांत सांगितलें आहे.)

एकत्र वर्षेधिकमास युग्मं यत् कार्तिकादि त्रितये क्षयाख्यः ॥ ४७ ॥
तद्वर्जनीयं त्रितयंप्रयत्ना द्विवाहयज्ञोत्सवमंगलेषु ॥–कालदर्शविवेचनांत बृहस्पति.

अर्थः—ज्या वर्षी कार्तिकादि तीन मासांत क्षयमास येतो त्या वर्षांत बारा मासाच्या आंत दोन अधिक मास येतात तेव्हां क्षयमास आणि दोन अधिकमास असे तिन्ही मास विवाह, यज्ञ, उत्सव व मंगलकार्ये याविषयीं प्रयत्नानें वर्ज्य करावे. ( कार्तिक, मार्गशीर्ष, पौष व माघ हे मास केव्हांही अधिकमास होत नाहीत. हे मास फक्त क्षयमासच होतात याचें विवेचन पुढें अधिकमास स्पष्टीकरणांत येईल. )

तुल्य कलाधर कलयो र्न विशेषः शुक्लकृष्णयोः कोपि ॥
तदापि कलोपचयत्वा च्छुक्लः श्रेयान्न तादृशः कृष्णः ॥ ४८ ॥ मुहूर्तमाला.

अर्थः—शुक्लपक्षाच्या अनुक्रमानें आणि कृष्णपक्षाच्या व्युत्क्रमानें कोणत्याही तिथीस चंद्र पाहिला असतां त्याच्या कला समानच असतात. तत्रापि त्यास समानता नाहीं. शुक्लपक्षांत चंद्राच्या कालांची वृद्धि असते म्हणून तो श्रेष्ठ व कृष्णपक्षात कलांचा क्षय असतो यास्तव तो गौण असें समजावें. ( शुक्लपक्षांत चंद्र कलेकलेनें वाढत जातो व कृष्णपक्षांत कलेकलेनें कमी होतो त्यामुळें शुक्लपक्षीं सूर्यास्तानतर दररोज सुमारें २॥२ घटिका चंद्र जास्त राहतो व कृष्णपक्षीं दररोज दोन घटिकांनीं कमी दिसतो. )

आपूर्यमाणो मुख्यः स्यात् सर्वस्मिन् शुभकर्मणि ॥ ४९ ॥
कृष्णो गौणो दशांतःस्या आगांतो व्रतबंधने ॥ पराशर पुरुषार्थ चिंतामणी.

अर्थः– सर्व शुभकर्म करण्याविषयीं शुक्लपक्ष मुख्य आहे. आणि व्रतबंधास कृष्णपक्ष पचमीपर्यंत गौण आहे. त्यावांचून इतर शुभकार्यांस कृष्णपक्ष दशमीपर्यंत गौण आहे. व्रतबंधास कृष्णपंचमीपुढें व इतर सर्व कर्मांस कृष्णदशमीपुढें निषिद्ध अर्थात् वर्ज्य आहे.

पक्षस्य मध्ये द्वितिथी पतेतां तदा भवेद्रौरवकालयोगः॥
पक्षे विनष्टे सकलं विनष्ट मित्याहुराचार्यवराः समस्ताः ॥ ५० ॥
—संस्कारकौस्तुभांत मदनरत्नांतील.—

अर्थः—एका पक्षामध्यें जर दोन तिथींचा क्षय होईल तर तो योग फार अरिष्ट करणारा आहे कारण संपूर्ण ज्योतिषाचे आचार्य असें म्हणतात कीं, वर लिहिल्यप्रमाणें पक्ष विनष्ट झाला असतां सर्वांचा विनाश होतो. ( दोन तिथींचा क्षय एका पंध्रवड्यांत येणें हा अनिष्ट योग आहे. असा योग असून त्या पंध्रवड्याचे आरंभीं व अंतीं ग्रहणयोग आले असतां देशांत अत्यंत भयंकर स्थिति उद्भवते. )

## पंचांगाच्या पांच अंगांचा विचार.

तिथिवासरनक्षत्रयोगानां करणस्य च ॥
शुद्धिः पंचांगशुद्धिस्तां सर्वत्रादौ विचिंतयेत् ॥ मु. मा.
तिथिर्वारश्च नक्षत्रं योगःकरणमेव च ।
एतैः पंचभिरंगैः संयुतं पंचांगमुच्यते ॥ ५१ ॥

अर्थः—(१) तिथी, (२) वार, (३) नक्षत्र, (४) योग, (५) करण हीं पांच अंगें ज्यांत आहेत त्यास पंचांग म्हणतात. या पांचापैकीं तिथी हें पहिलें अंग असून तेंच मुख्य असल्याने त्याचा पहिल्यानें विचार करूं.

## तिथी म्हणजे काय ?

अर्काद्विनिसृतःप्राचीं यद्यात्यहरहः शशी ॥
तच्चांद्रमानमंशैस्तु ज्ञेया द्वादशभिस्तिथिः ॥ ५२ ॥

अर्थः—सूर्याच्यापुढें चंद्र १२ अंश गेला म्हणजे एक तिथि होतें. याप्रमाणें ३६० अंशात ३० तिथि पूर्ण होतात. रवि व चंद्र, राशि, अंश, कलाविकलात्मक अगदीं समान स्थितींत असतात अशा कालास अमावास्येचा अंत म्हणतात व सूर्यापासून चंद्र बरोबर १८० अंश म्हणजे ६ राशि असतो त्यावेळीं पौर्णिमांत होतो.

तिथि म्हणजे रविचंद्रामध्यें १२ अंश अंतर. अर्थात् दर १२ अंश अंतरास १।१ तिथि वाढत जाऊन ३६० अंशांत ३० तिथि पूर्ण होतात हें उघड आहे.

# तिथिप्रकरणम्

प्रतिपच्च द्वितीया च तृतीया च ततः परं ॥ चतुर्थी पंचमी षष्ठी सप्तमी चाष्टमी ततः ॥
नवमीच दशम्येकादशीच द्वादशी ततः ॥ त्रयोदशी चतुर्दश्यौ तिथयः पक्षयोः समाः ॥
शुक्ला पंचदशी पूर्णा पौर्णमासी च पूर्णिमा ॥ कृष्णासाऽमा त्वमावास्या दर्शः सूर्येंदुसंगमः॥

अर्थः—प्रतिपदा, द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी, सप्तमी, अष्टमी, नवमी, दशमी, एकादशी, द्वादशी, त्रयोदशी व चतुर्दशी, अशा चवदा तिथि शुक्लपक्षांत आणि कृष्णपक्षांत सारख्या असतात. शुक्लपक्षांतील पंधराव्या तिथीला पंचदशी, पूर्णा, पौर्णमासी व पूर्णिमा हीं नांवें आहेत. कृष्णपक्षांतील पंधरावे तिथीस, अमा, अमावास्या, दर्श आणि सूर्येंदुसंगम अशा संज्ञा आहेत. शुक्लपक्षांतील पंधराव्या तिथीस पूर्णिमा अशी संज्ञा येण्याचे कारण त्या दिवशी चंद्र पूर्ण असतो हें होय. अमावास्या संज्ञेचें कारणही रविचंद्र एकत्र येतात. हेंच होय.

राकानुमत्या विति पौर्णमास्यौ रात्रियुदष्टेंदुवशाद्भवेताम् ॥
कुहूः सिनीवाल्यपि नष्टदृष्टचंद्रे स्मृतेचासितपंच दर्श्यौ ॥५४॥ रत्नमाला

अर्थ—ज्या पौर्णिमेस रात्रीं चंद्रोदय होतो तिला राका हें नांव आणि ज्या पौर्णिमेस दिवसास चंद्रोदय होतो तिला अनुमति असें नांव असतें. तसेंच ज्या अमावास्येंत चंद्रदर्शन होत नाहीं तिला कुहू अशी संज्ञा व ज्या अमावास्येंत चद्रदर्शन होतें तिला सिनीवाली अशी संज्ञा आहे.

नेहमींच पौर्णिमेचे दिवशीं चंद्रोदय सूर्यास्ताचे वेळीं होतो असें नाहीं. अंशात्मक कमजास्त स्थितीप्रमाणें पौर्णिमेस दिवसां अगर रात्रीं चंद्रोदय होतो, त्यांच्या संज्ञा वर दिल्या आहेत.

क्रमा त्तिथीशा ब्रह्माग्नी विरंचिर्विष्णुशैलजे ॥ विनायकयमौ नागचंद्रौ स्कंदोर्के वासवौ ॥
महेशवसवो नागदुर्गेदंडधराव्हयः ॥ शिवविश्वेहरिरवी कामः शर्व कलीततः ॥
शशिविश्वेदर्शसंज्ञतिथीशाः पितरः स्मृताः॥त्रयोदश्यास्तृतीयायाः केचिदूचुर्धनाधिपः ॥५५॥
ज्योतिर्निबंधांत नारद

अर्थः—प्रतिपदेचा स्वामी ब्रम्हा किंवा अग्नि, द्वितीयेचा ब्रम्हा, तृतीयेचा विष्णु किंवा पार्वती, चतुर्थीचा गणपति किंवा यम, पंचमीचा नाग किंवा चंद्र, षष्ठीचा स्कंद, सप्तमीचा सूर्य किंवा इंद्र, अष्टमीचा शिव किंवा अष्टवसु, नवमीचा नाग किंवा दुर्गा, दशमीचा यम, एकादशीचा शिव किंवा विश्वेदेव, द्वादशीचा विष्णु किंवा सूर्य, त्रयोदशीचा काम, चतुर्दशीचा शिव किंवा कलि, याप्रमाणें स्वामी दोन्ही पक्षांत तुल्य ( सारखेच ) जाणावें. पूर्णिमेचा चंद्र किंवा विश्वेदेव, अमावास्येचे पितर असे स्वामी समजावे. कोणी ऋषी म्हणतात कीं, त्रयोदशी आणि तृतीया यांचा स्वामी कुबेर आहे.

नंदा च भद्रा च जया च रिक्तापूर्णेतिसर्वास्तिथयः क्रमात्स्युः ॥
कनिष्ठमध्येष्टफलास्तु शुक्ले कृष्णे भवंत्युत्तममध्यहीनाः ॥५६॥ रत्नमाला

अर्थः—प्रतिपदेस नंदा, द्वितीयेस भद्रा, तृतीयेस जया, चतुर्थीस रिक्ता, आणि पंचमीस पूर्णा अशीं पांच नावें क्रमानें आहेत. याप्रमाणेंच क्रमानें षष्ठीपासून व एकादशीपासून हींच नावें जाणावीं. म्हणजे षष्ठी आणि एकादशी ह्यांस नंदा असें नाव आहे. सप्तमी व द्वादशी ह्यांस भद्रा अशी संज्ञा आहे इत्यादि क्रमानें समजावें शुक्लपक्षांतील प्रतिपदेपासून पांच तिथि कनिष्ठ फल देणाऱ्या, षष्ठीपासून पांच मध्यम, एकादशीपासून पांच उत्तम. कृष्णपक्षांत प्रतिपदेपासून पांच उत्तम, षष्ठीपासून पांच मध्यम आणि एकादशीपासून पांच कनिष्ठ अशा प्रकारें सर्व मासांत तिथींचें इष्टानिष्ट समजावें.

स्युस्तिस्रस्तिथयो वारे एकस्मिन्नवमो तिथिः ॥
तिथिर्वार त्रये चैका त्रिद्युस्पृग्द्वेति निंदिते ॥५७॥ पीयूषधारेंत–वसिष्ठ

अर्थः—एका अहोरात्रांत तीन तिथि शिरल्या म्हणजे तिला अवमतिथि असें नांव आहे. एक तिथि तीन अहोरात्रांत शिरली म्हणजे तिला त्रिद्युस्पृक् असें नांव आहे. ह्या दोन्ही फार निंदित आहेत. तात्पर्य, असें कीं, जी तिथि सूर्याच्या उदयकालीं नसते ती आणि ज्या तिथींत दोन सूर्योदय होतात त्या दोन्ही तिथि शुभकर्मास वर्ज्य कराव्या. दोन वाईट आहेत असें म्हटल्यामुळें त्या दोहोंच्या पूर्वतिथीस व उत्तर तिथीस दोष नाहीं हें अर्थसिद्धच होतें. अवमतिथीला क्षयतिथि आणि त्रिद्युस्पृक् तिथीला वृद्धितिथि अशीं नांवें दुसऱ्या वचनांत आहेत.

( क्षयतिथि सुरू होण्याचे पूर्वी व वृद्धितिथि संपल्यानंतर कोणत्याही शुभकार्यास हरकत नाहीं असा याचा अर्थ आहे. पण क्षयतिथिचा सबंध दिवस सोडण्याचा कांहींचा प्रघात आहे.

सूर्योदये यथा तारा विलयं याति खस्थिताः ॥
तथा शुभानि कर्माणि क्षयवृद्धि तिथौध्रुवं ॥
दोषद्वयमिदं जातु गुणैरन्यैर्नहन्यते ॥
तथापि सबले भानौ लाभस्ते वा तथा विधौ ॥५८॥ ज्योतिर्निबंधांत गर्ग

अर्थः—सूर्याचा उदय झाल्यावर जशीं आकाशांतील नक्षत्रें प्रकाशहीन होतात त्याप्रमाणें क्षयतिथींत आणि वृद्धितिथींत केलेलीं शुभकर्में फलहीन होतात हें निश्चित आहे. क्षयतिथि आणि वृद्धितिथि हे दोन्ही दोष पुढें सांगावयाचे जे गुण त्याशिवाय इतर गुणांनीं कधींही बाधित होत नाहींत. तर बलवान सूर्य किंवा बलिष्ठ चंद्र एकादशस्थानीं असेल तर क्षयतिथींचा आणि वृद्धितिथींचा दोष नष्ट होतो.

( क्षयतिथि आणि वृद्धितिथि शुभकार्यास वर्ज्य सांगितल्या आहेत पण त्या कोणती ग्रहस्थिति असतां घ्याव्या हें वरील श्लोकांत गर्गवचनाधारें दिलें आहे. )

अवमाख्यतिथेर्दोषं केंद्रगो देवपूजितः ॥
त्रिद्युस्पृगाव्हयं दोषं सौम्यः केंद्रगतोजयेत् ॥५९॥ पीयूषधारेंत–वसिष्ठ

अर्थः—बृहस्पति केंद्रांत म्हणजे लग्नापासून प्रथम, चतुर्थ, सप्तम आणि दशम ह्यांपैकीं कोणत्याही एका स्थानांत असेल तर अवम (क्षय) तिथीचा दोष नष्ट होतो. तसाच बुध केंद्रांत असेल तर त्रिद्युस्पृक् म्हणजे वृद्धि तिथीचा दोष नष्ट होतो.

तिथेः पंचदश भागाः क्रमात् प्रतिपदादयः ॥
क्षणसंज्ञा स्तदर्धानि तासामर्धं प्रमाणतः ॥६०॥ ज्योतिर्निबंधांत–नारद

अर्थः—तिथीच्या ज्या एकंदर घटका असतील त्यास पंधरांनीं भागून जो भाग येईल तितक्या प्रमाणानें तिथीच्या प्रारंभापासून प्रतिपदा, द्वितीया इत्यादि नांवाचे क्षण मोजावे. आणि त्या क्षणांच्या अर्धप्रमाणानें बव, बालव इत्यादि पुढें सांगण्याचीं जीं करणें आहेत तीं समजावीं. हें सांगण्याचें कारण इतकेंच कीं, ज्या कर्मास ज्या तिथि आणि करणें सांगितलीं आहेत तीं अडचणीमुळें न सांपडतील तर याप्रमाणें घेऊन कार्य करावें.

पर्वाणि सूर्यसंक्रांतिरमावास्या च पूर्णिमा ॥
चतुर्दश्यष्टमीकृष्णा पंचैतानित्यजेच्छुभे ॥६१॥ मुहूर्तमाळा.

अर्थः—सूर्यसंक्रांतीचा दिवस, पर्वकाळ, अमावास्या, पूर्णिमा, कृष्णपक्षांतील चतुर्दशी आणि अष्टमी ह्या पांचास पर्व अशी संज्ञा आहे. यास्तव ह्या पांच तिथि शुभ कार्यांत वर्ज्य कराव्या.

युगादयो राधासिते तृतीया नवम्यसौ कार्तिक शुक्ल पक्षे ॥
नभस्यमासस्य तमिस्रपक्षे त्रयोदशी पंचदशीच माघे ॥६२॥ विष्णुपुराण.

अर्थः—वैशाख शुक्ल तृतीया, कार्तिक शुक्ल नवमी, भाद्रपद कृष्ण त्रयोदशी आणि माघ कृष्ण अमावास्या ह्या चार युगांच्या आदितिथि आहेत.

मन्वादयो मधुमुखेषुवलक्ष पक्षे वह्निस्तिथी न तिथयः ककुभस्तिथीभिः ॥
कृष्णाष्टमी गुणमितो नवमोर्क तिथ्यो नोईश्वराश्च मुनयोप्यथ पंचदश्यौ॥६३॥मूळानुसारी

अर्थः—चैत्र शुक्लांत तृतीया आणि पूर्णिमा, न म्हणजे वैशाखांत नाहीं, ज्येष्ठांत पूर्णिमा, आषाढशुक्लांत दशमी व पूर्णिमा, श्रावण कृष्णांत अष्टमी, भाद्रपद शुक्लांत तृतीया, आश्विन शुक्लांत नवमी, कार्तिक शुक्लांत द्वादशी आणि पूर्णिमा, नो म्हणजे मार्गशीर्षांत नाहीं, पौष शुक्लांत एकादशी, माघ शुक्लांत सप्तमी, फाल्गुनांत पूर्णिमा व अमावास्या, ह्या चवदा मन्वंतरांच्या आदितिथि आहेत.

मन्वाद्याश्च युगाद्याश्च गदिता या मुनीश्वरैः ॥
आसु श्राद्धं प्रकुर्वीत नैव मंगळ माचरेत् ॥६४॥ मूळानुसारी स्फुट.

अर्थः—ज्या मन्वादि आणि युगादि तिथि ऋषींनीं सांगितल्या आहेत त्यांचे ठायीं श्राद्ध करावें. शुभकर्म कधींही करूं नये. ह्या तिथींवर विवाह, उपनयनादि वर्ज्य आहेत.

कृष्णे एकादशी पट्कं निंद्यं निंद्यतरं तु यत् ॥
द्वादश्यादि चतुष्कंतत् भूतानिंद्य तमं द्वयं ॥६५॥ मूळानुसारी स्फुट.

अर्थः—कृष्णपक्षांत एकादशीपासून शुक्ल प्रतिपदेपर्यंत सहा तिथि शुभकार्यास निंद्य आहेत. द्वादशीपासून चार तिथि फार निंद्य आहेत. चतुर्दशीपासून दोन तिथि तर अतिशय निंद्य आहेत.

सावनंस्यादहोरात्रमुदयादोदयाद्रवेः ।
रवेस्त्रिंशस्तुराश्यंशास्तिथिसंभोगऐंदवः ॥ ६६ ॥ ( पु. चिं. २ ) ब्रह्मसिद्धांते

अहोरात्रस्यचातुर्विध्यमुक्तं-तिथिनैकेनादिवसश्चांद्रमानेन कीर्तितः । अहोरात्रेण चैकेन सावनो दिवसः स्मृतः । आदित्यभागभोगेन सौरो दिवस उच्यते । चंद्रनक्षत्रभोगेन नाक्षत्रो दिवसः स्मृतः । तिथि भागयोर्लक्षणं तत्रैव—चंद्रार्कगत्या कालस्य परिच्छेदो यदा भवेत् । तदानयोः प्रवक्ष्यामि गतिमाश्रित्य निर्णयं । भगणेन सम्येन ज्ञेया द्वादश राशयः । त्रिंशांशश्च तथा राशेर्भाग इत्यभिधीयते । आदित्या द्विप्रकृष्टस्तु भागद्वादशकं यदा । चंद्रमाः-स्यात्तदाराम तिथिरित्यभि धीयते । इति विष्णु धर्मोत्तरे ( पु. चिंतामणी २।३)

आवश्यके प्रथमजा घटिकास्तिथीषु ॥ वेदांगहस्ति नवसूर्य मनून्मितासु ॥
वस्यंक शक्र शरवर्ग दिशः शराश्च वर्ज्याः परैर्दशमिता अपराः शुभाः स्युः॥६७॥मु.क.

अर्थः—प्रत्येक महिन्यांतील शुक्ल आणि कृष्ण या दोन्ही पंधरवड्यांत चतुर्थी, षष्ठी, अष्टमी, नवमी, द्वादशी आणि चतुर्दशी ह्या सहा तिथींस पक्षरंध्र असें म्हणतात, त्यामुळें या मंगलकार्यास वर्ज्य कराव्या. अडचणीचे प्रसंगीं तिथि येणेंच असेल तर त्या तिथीच्या कांहीं घटका सोडाव्या. त्या अशा.—चतुर्थीच्या आठ, षष्ठीच्या नऊ, अष्टमीच्या चवदा, नवमीच्या पंचवीस, द्वादशीच्या दहा, आणि चतुर्दशीच्या पांच. याप्रमाणें घटिका सोडून

बाकीच्या घेण्यास हरकत नाहीं. कांहीं ग्रंथकारांचें मत सर्वच पक्षरंध्र तिथींच्या प्रारंभीं दहा घटिका टाकाव्या जास्त टाकण्याचें कारण नाहीं.

## वारप्रकरणम्

### " उदयात् उदयं वारः "

रविश्चंद्रो भौम बुधौ गुरु शुक्र शनैश्चराः ॥
वाराधिशाःसप्त राहु केतुर्म्यांते नवग्रहाः ॥६८॥ मू. स्फु.

अर्थः—रवि, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र आणि शनि हे सातच ग्रह अनुक्रमानें वारांचे स्वामी आहेत. आणि राहु व केतु यांच्यासह ते नवग्रह आहेत.

( वार म्हणजे एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंतचा काल. हा काल सामान्यतः २४ तासांचा असतो असें समजतात, पण प्रत्यक्ष सूक्ष्म वस्तुस्थिति पाहतां १ मिनिटाचा कमजास्तपणा यांत बहुधां असतो.)

सोमसौम्यगुरुशुक्रवासराः सर्वकर्मसु भवंति सिद्धिदाः ॥
भानुभौमशनिवासरेषु च प्रोक्तमेव खलु कर्मसिध्यति ॥६९॥ र. मा.

अर्थ—सोमवार, बुधवार, गुरुवार, शुक्रवार, हे वार सर्व कर्मांस शुभ फलदायी आहेत. रविवार, मंगळवार व शनिवार या दिवशीं जें कर्म अवश्य करण्यास सांगितलें आहे तेंच कर्म सिद्ध होतें.

न वार दोषः प्रभवंति रात्रौ देवेज्य दैत्येज्य दिवाकराणी ॥
दिवा शशांकार्कजभूसुतानां सर्वत्र निंद्यो बुधवार दोषः ॥७०॥ मतांतर

अर्थः—गुरु, शुक्र आणि रवि यांच्या वारदोषाचें सामर्थ्य रात्रीं नसतें. चंद्र, शनि व मंगळ यांच्या वारदोषाचें सामर्थ्य दिवसां नसतें. बुधवारचा दोष दिवसां आणि रात्रीं सारखाच असतो ॥१॥

वारे ग्रहस्योपचयावहस्य कार्यं यथोद्दिष्टमुपैति सिद्धिं ॥
भवेत्तदेवापचयावहस्य प्रयत्नतो निर्मितमप्यसाध्यं ॥७१॥ रत्नमाला (मु. सिं.)

अर्थः—ज्या कालीं जो ग्रह आपल्यास बलिष्ठ असेल त्या ग्रहाच्या वारीं केलेलें कार्य आपल्या इच्छेप्रमाणें सिद्ध होतें आणि जो ग्रह निर्बल आहे त्याच्या वारीं अतिशय प्रयत्नानें केलेलें कार्यही सिद्ध होत नाहीं.

भृगुः शशीसिते हितोऽरुणेऽरुणः कुजस्तथा ॥
समेचके शनिर्हितः परौ परत्र कीर्तितौ ॥७२॥ मुहूर्तकल्पद्रुम (मु. सिं. ४१)

अर्थः—पांढऱ्या रंगाच्या संबंधाचें जें कार्य असेल त्याविषयीं शुक्र आणि चंद्र हे दोन वार प्रशस्त आहेत. तांबड्या रंगाच्या संबंधाचें जें कार्य त्याविषयीं रवि व मंगळ हे दोन वार प्रशस्त जाणावे. काळ्या रंगाच्या संबंधाचें जें कार्य त्याविषयीं शनिवार प्रशस्त आहे. हा तीन रंगाहून इतर रंगांच्या संबंधाचे कार्याविषयीं बुध आणि गुरु हे दोन वार प्रशस्त समजावे.

गर्गमांडव्यवचनात् ज्ञेयौ कांचन भूषणे ॥
प्रशस्तौ भौम मार्तंडौ शनिर्लोहाश्मनोर्मतः॥७३॥ मूळानुसारी स्फुट (मु.सिं. ४२)

अर्थः—गर्ग आणि मांडव्य यांच्या मतानें सुवर्णाचे अलंकार धारण करण्याविषयीं मंगळवार व रविवार हे प्रशस्त आहेत. लोखंडाच्या कार्यास आणि दगडी कामास शनिवार प्रशस्त आहे असें समजावें.

वारोक्त काल होरायां कार्यमावश्यकेथवा ॥
वारांशगेर्के चंद्रे वा कार्यमित्यृपयोजगुः ॥७४॥ मुहूर्तमाळा (मु. सिं. ४२)

अर्थः—ज्या वारीं जें कर्म करण्यास सांगितलें आहे तो वार अडचणीमुळें त्या कर्मास जर न सांपडेल तर त्या वाराच्या कालहोऱ्यामध्यें तें कर्म करावें किंवा त्या वाराच्या अंशांत सूर्य अथवा चंद्र असेल तेव्हां तें कर्म करावें, असें ऋषींनीं सांगितलें आहे.

सूर्यभौमशनिराहुकेतवः पापसंज्ञखचराः क्षयिचंद्रः ॥
तैर्युतोविधुसुतोप्यथसौम्याः पूर्णचंद्रगुरुशुक्र सोमजाः ॥७५॥
पीयूषधारेंत वसिष्ठ ( मु. सिं. ४२ )

अर्थः—सूर्य, मंगळ, शनि, राहु, केतु, क्षीण चंद्र आणि ह्या सहा ग्रहांतून कोणी एकानें युक्त झालेला बुध हे पापग्रह आहेत. पूर्ण चंद्र, बृहस्पति, शुक्र व बुध हे चार शुभ ग्रह जाणावे.

वागीश शुक्रा वथभानुभौमौ शीतद्युतिश्चांद्रमसायनिश्च ॥
द्विजादिकानामधिपा भवंति शनैश्चरः संकर संभवानां ॥ ७६ ॥
होरामकरंद ( मुहूर्तसिंधु ४३ )

अर्थः—ब्राह्मणांचे स्वामी गुरु आणि शुक्र आहेत. क्षत्रियांचे स्वामी सूर्य व मंगळ आहेत. वैश्यांचा स्वामी चंद्र आहे. शूद्रांचा स्वामी बुध आहे. संकरजातीचा स्वामी शनि आहे.

साम्नां महीजोयजुषांसितः स्याहचांचजीवोविदथर्वणांच ॥
नपुंसकौसौरबुधौ सितेंदू योषित्ग्रहौ स्युस्त्वपरेनराख्याः ॥ ७७ ॥
होरामकरंद ( मुहूर्तसिंधु ४३ )

अर्थः—सामवेदाचा स्वामी मंगळ, यजुर्वेदाचा स्वामी शुक्र, ऋग्वेदाचा स्वामी गुरु आणि अथर्वण वेदाचा स्वामी बुध याप्रमाणें वेदाधिपति जाणावे. शनि व बुध हे नपुंसक संज्ञक, शुक्र आणि चंद्र हे स्त्रीसंज्ञक व शेष राहिले जे रवि, मंगळ आणि गुरु हे तीन पुरुषसंज्ञक आहेत.

तमस्विनी गंधमुपेत्यवारदोपास्तथा शक्तिमनाप्नुवंतः ॥
अंधंसमासाद्य विलासिनीनां कटाक्षबाणा इवनिष्फलाःस्युः ॥७८॥
ग्रंथांतरांतील ( मुहूर्तसिंधु ४३ )

अर्थः—रात्रीची प्रवृत्ति झाल्यावर वाराच्या दोषांचें सामर्थ्य दिवसाप्रमाणें असत नाहीं. याच दृष्टांत, जसे विलासिनी स्त्रियांचे कटाक्षरूप जे बाण ते आंधळ्याजवळ आले असतां निष्फल होतात तद्वत्—

वारप्रवृत्तिं मुनयोवदंति सूर्योदयाद्रावणराजधान्यां ॥ रत्नमाला
ऊर्ध्वंतथाधोप्य परत्र तस्माच्चरार्ध देशांतर नाडिकाभिः ॥७९॥ (मुहूर्तसिंधु ४८)

अर्थः—लंकेमध्यें सर्वकाल सूर्योदयापासून वाराची प्रवृत्ति होते. लंकेशिवाय अन्य देशांत कदाचित् सूर्योदयानंतर आणि कदाचित् सूर्योदयाच्या पूर्वी, पुढें सांगितलेल्या प्रकारानें चरार्ध व देशांतर यांपासून उत्पन्न झालेली जी पळें तितक्या पळांनीं वारप्राप्ति होते असें मुनि म्हणतात.

वर सांगितलेली पळें उत्पन्न होण्याचा प्रकार सांगण्यासाठीं शिद्धांतांत वर्णिलेली भूमीची मध्यरेषा देतोंप्रमाणें.

पुरी रक्षसां देवकन्याथकांची सितः पर्वतः पर्यळी वत्सगुल्मं ॥
पुरी चोज्जयिन्याव्हयागर्गराटं कुरुक्षेत्रमेरू भुवो मध्यरेखा ॥८०॥

सिद्धांतशिरोमणी (मु. सि. ४९)

अर्थः—राक्षसांची नगरी ( लंका ) देवकन्या ( दक्षिणसमुद्राजवळ असलेली ) कांची, श्वेत पर्वत ( हा वाशीम आणि उज्जनी यांच्यामध्यें आहे. ) पर्यळी ( परळी ) वत्सगुल्म ( वाशीम ) उज्जनी नगरी, गर्गराट ( हें उज्जनी व कुरुक्षेत्र यांच्यामध्यें आहे. ) कुरुक्षेत्र आणि मेरुपर्वत या स्थानांस अनुलक्षून भूमीच्या मध्यभागीं रेखा कल्पिली आहे.

## वार प्रवृत्तीचीं पळें समजण्याचा प्रकार.

पादोन रेखा परपूर्व योजनैः पलैर्युतो नास्तिथयोदिनार्धतः ॥
हीनाधिकास्तद्विवरोद्भवेः पलैरूर्ध्वंतथाधोदिनपप्रवेशनं ॥८१॥

मुहूर्तचिंतामणि ( मु. सि. ४९ )

अर्थः—वर सांगितलेल्या रेखेच्या पश्चिमेस किंवा पूर्वेस जेथें आपण आहों त्या स्थानापासून रेखेपर्यंत जितकीं योजनें ( चार कोस लांबीचें क्षेत्र ) असतील त्यांच्या संख्येंत चतुर्थांश कमी करून जी संख्या राहील तितकीं पळें आपण रेखेच्या पश्चिमभागीं असल्यास पंधरा घटकेंत मिळवावीं आणि पूर्वभागांत असल्यास पंधरा घटकेंत कमी करावीं मग जितकी घटका व पळें होतील त्यांची आणि दिनमानाच्या अर्धाचीं जीं घटका व पळें असतील त्यांची वजाबाकी करून जीं घटका आणि पळें शिल्लक राहातील तितक्या घटकापळांनीं रेखेच्या पश्चिमेस सूर्योदयानंतर व रेखेच्या पूर्वेस सूर्योदयाच्या पूर्वी वाराची प्रवृत्ति होते.

वारप्रवृत्तिविज्ञानं क्षणवारार्थमेवाहि ॥ अखिलेष्वन्य कार्येषु दिनादिरुदयाद्भवेत् ॥८२॥

पीयुषधारेंत वसिष्ठ ( मु. सि. ५१ )

वर लिहिलेप्रमाणें वारप्रवृत्ति, होऱ्याची प्रवृत्ति पाहण्यासाठीं मात्र घ्यावी. याखेरीज सर्व कार्यांविषयीं सूर्योदयापासून वाराची प्रवृत्ति जाणावी.

वारप्रवृत्तेर्घटिका द्विनिघ्नाः कालाख्यहोरा पतयःशराप्ताः
दिनाधिपाद्या रविशुक्रसौम्य शशांकसौरेज्यकुजाः क्रमेण ॥ ८३ ॥

रत्नमाला ( मु. सि. ५१ )

अर्थः—होऱ्याच्या वारप्रवृत्तीपासून जितक्या घटका आणि पळें गेलीं असतील त्यांच्या संख्येला दोहोंनीं गुणून पांचानीं भागावें; मग जो भाग येईल तितक्या ग्रहांचे काल होरे गेल्यावर पुढील ग्रहाचा काल होरा चालू आहे असें जाणावें. त्याचा क्रम असा कीं, जो वाराचा स्वामी तोच प्रथम काल होऱ्याचा स्वामी असतो. दुसऱ्या कालहोऱ्यापासून क्रमानें रवि, शुक्र बुध, चंद्र, शनि, गुरु आणि मंगळ हे कालहोरापति असतात. याप्रमाणेंच पुनःपुन्हा आवृत्ति करीत जावी.

गणिताशिवाय होरापति समजण्याचा प्रकारः—

वारप्रवृत्तेर्घुरिसार्धनाडिद्वयंतुतद्वासरकालहोरा ॥
षष्ठस्य षष्ठस्य ततः क्रमेणस्यात् कालहोरा गणितं विनैव ॥८४॥

स्फुट ( मु. सि. ५२ )

अर्थः—होऱ्याचा वारप्रवृत्तीपुढें अडीच घटकांपर्यंत वारप्रवृत्तीचा कालहोरा असतो. नंतर त्यापासून सहाव्या ग्रहाचा कालहोरा येतो. तिसरा कालहोरा त्यापासून सहाव्याचा असतो. याप्रमाणेंच पुढेंही समजावें. त्यांचा क्रम आणि पुनरावृत्ती वर लिहिलेप्रमाणेंच जाणावी. याप्रमाणें गणितावांचूनच कालहोऱ्याचें ज्ञान होतें.

क्रूरवारे क्रूरहोरा न शस्ता इति मंगले ॥ नाति दुष्टा शुभे वारे रात्रौ स्वल्पफलामता ॥८५॥
ज्योतिर्निबंधांत गर्ग ( मु. सिं. ५२ )

अर्थः—पापग्रहांच्या वारीं पापग्रहाचा होरा मंगलकार्यांस वर्ज्य करावा. शुभग्रहाच्या वारीं पापग्रहाचा होरा फार दुष्ट नाहीं. वास्तव मध्यम होय. कालहोऱ्याचें फल रात्रौ फार अल्प असतें.

## अथ नक्षत्रप्रकरणम्

सर्वेषु कार्येषु हि शोभनेषु नक्षत्रशुद्धिं मृगयंति पूर्वं ॥
यत्कर्म यस्मिन्करणीय मुक्तं तत्तत्रदेयं विदुषाविदित्वा ॥८६॥ ज्यो. सं. प्र.

अर्थः—सर्व मंगलकार्यांस प्रथम नक्षत्राची शुद्धि पाहिली पाहिजे. याकरितां जें कर्म ज्या नक्षत्रावर करण्यास सांगितलें आहे ते नक्षत्र निर्दोष आहे किंवा नाहीं याचा विचार करून निर्दोष असल्यासच विद्वानांनीं त्या नक्षत्रावर मुहूर्तादि द्यावें ॥ ४ ॥

आश्विनीभरणी चैव कृत्तिकारोहिणी तथा ॥
मृगशीर्षमथार्द्रा च पुनर्वसुरतः परं ॥
पुष्यआश्लेषा च मघापूर्वाः फल्गुन्यउत्तराः ॥
फल्गुन्यो हस्तचित्रे च ततः स्वातीविशाखिका ॥
अनुराधा ततो ज्येष्ठामूलंपूर्वाअषाढकाः ॥
उत्तराख्या अषाढाश्च श्रवणं च धनिष्ठिका ॥
ततस्तु शततारास्यात्पूर्वाभाद्रपदास्ततः ॥
उत्तराख्या भाद्रपदा रेवतीमानिमानिहि ॥८७॥
मूलानुसारीण स्फुट ( मु. सिं. ५३ )

अर्थः—१ आश्विनी २ भरणी ३ कृत्तिका ४ रोहिणी ५ मृगशीर्ष ६ आर्द्रा ७ पुनर्वसु ८ पुष्य ९ आश्लेषा १० मघा ११ पूर्वाफल्गुनी १२ उत्तरा फल्गुनी १३ हस्त १४ चित्रा १५ स्वाति १६ विशाखा १७ अनुराधा १८ ज्येष्ठा १९ मूळ २० पूर्वाषाढा २१ उत्तराषाढा २२ श्रवण २३ धनिष्ठा २४ शततारका २५ पूर्वाभाद्रपदा २६ उत्तराभाद्रपदा २७ रेवती अशीं सत्तावीस नक्षत्रें आहेत.

वैश्वांत्यपादः श्रुत्याद्यतिथ्यंशश्चाभिजिद्भवेत् ॥
यत्राष्टा विंशतिर्भानां गण्योयंतत्रनान्यथा ॥८८॥ मुहूर्तमाला (मु. सिं ९३)

अर्थः—वैश्व म्हणजे उत्तराषाढा ह्यांचा शेवटचा चतुर्थांश आणि श्रवणाचा प्रथम, पंधरावा भाग, इतकें अभिजित् नक्षत्राचें स्वरूप आहे. परंतु जेथें अठ्ठावीस नक्षत्रें घ्यावीं लागतात तेथेंच ह्याचें ग्रहण करावें अन्यथा करूं नये.

भेशा दस्रयमाग्निधातृशशिनः शर्वोदितिर्वाक्पतिः
फद्रूजाः पितरोभगोर्यमरवी त्वष्टा समीरः क्रमात् ॥

इंद्राग्नी अथ मित्र इंद्र निर्ऋती नीरं च विश्वेविधिर्गोविंदो--
वसवोंबुपाजचरणाहिर्बुध्न्यपूपाभिधाः ॥८९॥ रत्नमाला (मु. सिं. ५४)

अर्थः—१ अश्विनी कुमार २ यम ३ अग्नि ४ ब्रम्हा ५ चंद्र ६ शिव ७ आदिति ८ बृहस्पति ९ सर्प १० पितर ११ भग १२ अर्यमा १३ सूर्य १४ त्वष्टा १५ वायु १६ इंद्राग्नि १७ मित्र १८ इद्र १९ निर्ऋति २० उदक २१ विश्वेदेव २२ विधि २३ विष्णु २४ वसु २५ वरुण २६ अजैकपात् २७ अहिर्बुध्न्य २८ पूषा ह्या अठ्ठावीस क्रमानें नक्षत्रांच्या देवता आहेत तेथें अठ्ठावीस संख्या आहे. यास्तव बाविसावी विधि ही देवता अभिजित् नक्षत्राची आहे असें जाणावें. ह्या देवता सांगण्याचा उपयोग असा आहे कीं, जेथें जेथें नक्षत्रें सांगण्याचे वेळेस देवतेचें नांव सांगितलें असेल तेथें तेथें देवतेच्या नांवानें त्या त्या देवतेचें नक्षत्र घेत जावें.

वन्हित्र्यृत्विषु गुणेंदुकृताग्निभूतबाणाश्विनेत्र शरभूकुयुगाब्धिरामाः ॥
रुद्राब्धिरामगुणवेदशरद्वियुग्मादंता बुधैर्निगदिताः क्रमशोभतारा: ॥९०॥

रत्नमाला ( मु. सिं. ५४ )

अर्थः—३।३।६।५।३।१।४।३।५।५।२।२।५।१।१।४।४।३।११।४।३।३।३।४।१००।२।२।३२ ह्या-प्रमाणें क्रमानें आश्विन्यादिक नक्षत्रांच्या ताराची संख्या समजावी. येथेंही अठ्ठावीस संख्या आहे. यास्तव बाविसावी ३ ही संख्या अभिजित् नक्षत्राच्या तारांची आहे असें जाणावें.

नक्षत्ररूपाण्यधुना वदामि तारात्रयेणाश्वमुखं भमाद्यं ॥
त्रिभिर्भगयाम्यमथो खुराभं षड्भिः शरैः स्याच्छकटं विधेर्भं ॥९१॥
त्रिभिर्मृगास्यं मणि रूपमेकं हर्म्यं चतुर्भिस्त्रितयेन बाणः ॥
चक्रं शरैः पंचमितैस्तु शाला द्वंद्व द्वयेनोत्तरयोस्तु शय्या ॥९२॥
हस्तःशरैर्मौक्तिकमेकमेकं प्रवालवत्तोरणमाब्धिसंख्यैः ॥
वेदैर्बलिः कुंडलवत्त्रयंस्यात् सिंहोथरुद्रैः श्रुतिभिस्तु मंचः ॥९३॥
ऋक्षैस्त्रिप्रमितैरिभस्य रदनः शृंगाटकं स्यात्त्रिभिः स्ताराभिस्तिसृभिस्त्रिविक्रमनिभं-स्यान्मर्दलाभं कृतैः ॥ वृत्तं स्याच्छतसंमितैः शताभिपक् द्वंद्वद्वये नोभयोः खट्वा-योरदनोन्मितर्क्षं निचये नांत्यं मृदंगाकृति ॥९४॥

मूळानुसारि स्फूट ( मु. सिं. ५५ )

अर्थः—आतां नक्षत्रांचीं स्वरूपें सांगतों. १ अश्विनी नक्षत्र तीन तारांनीं घोड्याच्या मुखासारखें आहे. २ भरणी तीन तारांनीं योनीसारखें आहे. ३ कृत्तिका सहा तारानीं घोड्याच्या खुरासारखी आहे. ४ रोहिणी पांचांनी गाड्यासारखी आहे. ५ मृगशीर्ष तिहींनीं हरणाच्या तोंडाप्रमाणें आहे. ६ आर्द्रा एक तारा मण्यासारखा आहे. ७ पुनर्वसु, चार तारानीं गृहाकार आहे. ८ पुष्य तिहींनीं बाणाकार आहे. ९ आश्लेषा पांचांनीं चक्राकार आहे. १० मघा पांचांनीं शाळेसारखी आहे. ११।१२ पूर्वाफाल्गुनी आणि उत्तराफाल्गुनी ह्या दोहोंच्या दोन दोन तारा मिळून चार तारांनीं पलंगासारखा आकार आहे. त्यांत पश्चिमेकडील दोन पूर्वाफाल्गुनी व पूर्वेकडील दोन उत्तराफल्गुनी असा विभाग समजावा. १३ हस्त पांचांनीं पंजासारखा आहे. १४ चित्रा, एक तारा मोत्यासारखा उळक आहे. १५ स्वाती, एक तारा पोंवळ्यासारखी किंचित् तांबडी आहे. १६ विशाखा, चार तारांनीं तोरणाकार आहे. १७ अनुराधा, चार तारांनीं राशिसारखी आहे. १८ ज्येष्ठा, तीन तारांनीं कुंडलाकार आहे. १९ मूल, अकरा तारांनी सिंहासारखें आहे. २० पूर्वाषाढा, चार तारांनीं पलंगासारखी आहे. २१ उत्तराषाढा, तीन तारांनी गजदंताकार आहे. २२ अभिजित्, तीन तारानीं शिंगाड्यासारखें आहे. २३ श्रवण तीन तार्‍यांनीं

विक्रमाकार आहे. २४ धनिष्ठा, चहूंनीं ढोलकासारखी आहे. २५ शततारका, शंभरांनीं वर्तुलाकार आहे. २६।२७ पूर्वाभाद्रपदा, आणि उत्तराभाद्रपदा ह्या दोहोंच्या दोन दोन तारा मिळून चार तारांनीं मंचकाकार आहे. त्यांत पश्चिमेकडील दोन तारा पूर्वाभाद्रपदा व पूर्वेकडील दोन तारा उत्तरा भाद्रपदा असा विशेष समजावा. २८ रेवती बत्तीस तारांनीं मृदंगाकार आहे.

## बऱ्याच ग्रंथांत रेवतीचा फक्त १ ताराच सांगितला आहे.

संख्याकृतिश्चाभिजितायुतानांभानांनिरुक्ताश्विनि पूर्वकाणां
तारोक्तसंख्यैर्दिनमासवर्षपर्यंतैरमीषां फलपाकमाहुः ॥९५॥

दैवज्ञ वल्लभ ग्रंथ ( मु. सि. ५६ )

अर्थः—अभिजितासहवर्तमान अश्विन्यादि सत्तावीस नक्षत्रांची संख्या आणि आकार वर सांगितले आहेत.ज्या नक्षत्राच्या संबंधानें जें फल सांगितलें आहे तें फल त्या नक्षत्राच्या जितक्या तारा असतील तितकें दिवस किंवा महिने अथवा वर्षांनीं मिळतें असें ऋषि म्हणतात.

नक्षत्रजमुद्वाहे फलमब्दैस्तारकामितैः सदसत् ॥
दिवसैर्ज्वरस्यनाशो व्याधेरन्यस्य वा वाच्यः ॥९६॥ वराहसंहिता (मु.सि.५६)

अर्थः—विवाहकाळच्या नक्षत्रांचें जें फल चांगलें किंवा वाईट सांगितलें आहे तें त्या नक्षत्राच्या जितक्या तारा असतील तितक्या वर्षांनीं होतें. आणि ज्या नक्षत्रावर ज्वर अगर दुसरा रोग उत्पन्न झाला असेल त्याचा नाश त्या नक्षत्राच्या तारा इतक्या दिवसांनीं होईल असें समजावें.

ब्रह्माहिमूलादिति भस्य पूर्वे याम्यांत्यपित्र्यानलभस्य याम्ये ॥
हस्तश्रविष्ठाख्यभयोस्तु पश्चाद्धस्तस्यतत्रोत्तरगा च किंचित् ॥९७॥
पूर्वोत्तराश्वींदुविशाखिकानांस्फुटोत्तरस्यांदिशियोगतारा ॥
मित्रेज्यशक्रश्रवसांतुमध्ये स्थूलापरेषांचकटैकिकैव॥९८॥ मुहूर्तमाला(मु सि.५६)

अर्थः—रोहिणी, आश्लेषा, मूल आणि पुनर्वसु ह्या नक्षत्रांची योगतारा पूर्वेस आहे. भरणी, रेवती, मघा व कृत्तिका ह्यांची योगतारा दक्षिणेस आहे. हस्त आणि धनिष्ठा ह्या दोन नक्षत्रांची योगतारा पश्चिमेस आहे. त्यांतही हस्ताची योगतारा किंचित् उत्तरेस आहे. पूर्वाफल्गुनी, पूर्वाषाढ आणि पूर्वाभाद्रपदा असा तीन पूर्वा, उत्तराफल्गुनी, उत्तराषाढा व उत्तराभाद्रपदा अशा तीन उत्तरा याप्रमाणेंच जेथें जेथें सामान्य रूपानें पूर्वा किंवा उत्तरा असा शब्द येईल तेथें तेथें वर लिहिल्याप्रमाणें तिहींचें ग्रहण करावें. पूर्वा, तीन उत्तरा, अश्विनी, मृगशीर्ष आणि विशाखा ह्या पांचांची योगतारा उत्तरेस स्पष्ट आहे. अनुराधा. पुष्य, ज्येष्ठा व श्रवण ह्या चहूंची योगतारा मध्यें आहे. शेष राहिली जीं पांच नक्षत्रें त्यांत शततारका आणि अभिजित् ह्या दोहोंची जी मोठी तारा ती योगतारा जाणावी. आर्द्रा, चित्रा व स्वाती ह्या तिहींची तर एकेकच तारा आहे. योगतारेच्या ज्ञानाचा उपयोग असा आहे कीं, ती आकाशाच्या मध्यमार्गी आली म्हणजे तें नक्षत्र मध्यभागी आलें असें जाणावें. कांहीं नक्षत्र तारा विशेष प्रकाशमान असतात पण कांहीं तारा अंधुक असूनहीयोग तारा आहेत.

रेवतीची योगता रा वास्तविक क्रांतिवृत्ताच्या अतिसन्निध असून दक्षिण अगर उत्तरेस म्हणतांच येत नाहीं. पण अति सूक्ष्म वेधानें ती दक्षिणेस फक्त १३ कला आहे असें मोठ्या मोठ्या विद्वानांचे एकमत आहे. ह्या तारेचे नांव ," झीटा " ऊर्फ जयंती. हेंच सिद्धांतोक्त आरंभस्थान होय.

प्राग्लग्नस्य लवाः खमध्यमगतेदास्ने द्विदिग्भिमिता याम्ये सूर्यभुवोऽग्निभेऽष्टमिहरा ब्राह्मे खशक्रोन्मिताः ॥ चांद्रेत्र्यक्ष भुवो भवेंऽगतिथयस्त्र्यष्टेंद्रवः सप्तमे पुष्येंऽगांक भुवोऽहिभेऽद्रिगविलाः पित्र्येऽद्रि भूपाद्रवः ॥ ९९ ॥ भाग्ये दंतदशोऽर्यमोद्दतिनभः सिद्धाः करे क्षद्दक्त्वाष्ट्रे त्र्यंगदशोऽनिलेऽग्यगदशो द्वीशेकुनंदाश्विनः ॥ मित्रेंऽक्षाभ्रगुणाः परे रविगुणा-मूलेऽद्रिदंता जले पंचाब्ध्यग्नय उत्तरे द्विपुगुणा ब्राह्मेऽब्धिबाणाग्नयः ॥ १०० ॥ श्रीपेऽर्का-वसुभे गजाश्विन इहांऽब्धीशोडुनी ऌर्तवोऽजांघ्रौ पट्पडु पांतिमेऽब्धितुरगाः पौष्णेऽब्धि नंदा इमे ॥ प्रोक्ताः केशवदैवचित्तनुभुवा श्रीमद्गणेशेन वै यद्देशे पलभायुगांगुलमिताऽन्यत्र त्वि-मेऽल्पांतराः ॥ १०१ ॥ ग्रहलाघवकार गणेशदैवज्ञ.

अर्थः—अश्विनी नक्षत्राचा तारा आकाशाच्या मध्यमार्गी आला असतां पूर्वेस (क्षितिज) उदयस्थानीं राशि-चक्राचे एकशे दोन भाग उदय पावतात. म्हणजे प्रत्येक राशिचे तीस भाग याप्रमाणें मेष, वृषभ आणि मिथुन ह्या तीन राशींचे नव्वद भाग भुक्त होऊन कर्कराशीपैकीं बारा भाग भुक्त होतात. म्हणजे त्या वेळीं पूर्व क्षितिजावर कर्क राशीचा बारावा अंश उदित असतो. ह्याप्रमाणेंच पुढें भरण्यादि प्रत्येक नक्षत्राचा तारा ख मध्यावर म्हणजे आकाशाचे मध्यमार्गी आला असतां त्या वेळीं पूर्व क्षितिजावर कोणत्या राशीचा कितवा अंश उदित असतो हें अनुक्रमानें खालीं दिलें आहे.

भरणी ११२ = ३ राशी २२ अंश.
कृत्तिका १२८ = ४ ,, ८ अंश.
रोहिणी १४० = ४ ,, २० अंश.
मृगशीर्ष १५२ = ५ ,, २ अंश.
आर्द्रा १५६ = ५ ,, ६ अंश.
पुनर्वसु १८३ = ६ ,, ३ अंश
पुष्य १९६ = ६ ,, १६ अंश.
आश्लेषा १९७ = ६ ,, १७ अंश.
मघा २१७ = ७ ,, ७ अंश.
पूर्वा २३२ = ७ ,, २२ अंश.
उत्तरा २४० = ८ ,, ० अंश.
हस्त २५१ = ८ ,, ११ अंश.
चित्रा २६३ = ८ ,, २३ अंश.

स्वाती २७७ = ९ राशी ७ अंश.
विशाखा २९१ = ९ ,, २१ अंश.
अनुराधा ३०५ = १० ,, ५ अंश.
ज्येष्ठ ३१२ = १० ,, १२ अंश.
मूळ ३२७ = १० ,, २७ अंश.
पूर्वाषाढा ३४५ = ११ ,, १५ अंश.
उत्तराषाढा ३५१ = ११ ,, २१ अंश.
अभिजित् ३५४ = ११ ,, २४ अंश.
श्रवण ११ = ० ,, ११ अंश.
धनिष्ठा २८ = ० ,, २८ अंश.
शततारका ६१ = २ ,, १ अंश.
पूर्वाभाद्रपदा ६६ = २ ,, ६ अंश.
उत्तराभाद्रपदा ७४ = २ ,, १४ अंश.
रेवती ९४ = ३ राशी ४ अंश.

परकृतमखिलं निहंति पुष्यो न खलु परस्तु निहंति पुष्यदोषं ॥
ध्रुवममृतखरेऽष्टमेपि पुष्ये विहितमुपैति सदैव कर्मसिद्धिं ॥ १०२ ॥ (रत्नमाला मु. सिं. ५९)

अर्थः—विष्यादिकांचे दोष पुष्य नक्षत्र असतां नाहींसे होतात पण पुष्य नक्षत्र दोषोत्पन्न असलें तर त्या दोषाचें निवारण दुसऱ्या गुणानें होत नाहीं. उदाहरणार्थः—चंद्र आठवा असला तरी पुष्य नक्षत्रावर कार्य केलें असतां सिद्ध होतें ॥ १०२ ॥

सिंहो यथा सर्व चतुष्पदानां तथैव पुष्यो बलवानुडूनां ॥
चंद्रे विरुद्धेप्यथ गोचरेपि सिध्यंति कार्याणि कृतानि पुष्ये ॥ १०३ ॥ (रत्नमाला मु. सिं. ५९)

अर्थः—ज्याप्रमाणें सर्व जनावरात सिंह बलवान आहे त्याप्रमाणें सर्व नक्षत्रात पुष्य नक्षत्र बलवान आहे. म्हणून जन्म राशीपासून किंवा लग्नापासून चंद्र प्रतिकूल असला तरी पुष्य नक्षत्रावर केलेली कार्यें सिद्धीस जातात ॥ २३ ॥

ग्रहेण विद्धोऽप्यशुभान्वितोपि विरुद्धतारोऽपि विलोमगोपि ॥
करोत्यवश्यं सकलार्थसिद्धिं विहाय पाणिग्रहमेव पुष्यः ॥ १०४ ॥

अर्थः—पुष्य नक्षत्र ग्रहानें विद्ध झालें किंवा पापग्रहानें युक्त असलें, ताराबल नसलें, जन्म नक्षत्रामुळें वर्ज्य असलें तरी विवाहाखेरीज इतर सर्व कार्यांत सिद्धी मिळते. ॥ २४ ॥ ( रत्नमाला मु. चिं. ६० )

रोहिण्युत्तरभं स्थिरं गिरिशमूलेंद्रोरगा दारुणं क्षिप्रं दस्रदिनेश पुष्य मनलेंद्राग्नी तु साधारणं ॥ उग्रं पूर्व मघांतकं मृदुमृगत्वाष्ट्रांत्यमित्रं चरं विष्णुस्वातिशतोडुवस्वदितयः कुर्युः स्वसंज्ञा फलं ॥ १०५ ॥

अर्थः—रोहिणी, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तरा भाद्रपदा या चार नक्षत्रांस स्थिर नक्षत्रें म्हणतात. आर्द्रा, मूळ, ज्येष्ठा आश्लेषा या चार नक्षत्रांस दारुण नक्षत्रें म्हणतात. अश्विनी, हस्त व पुष्य या तीन नक्षत्रास क्षिप्र नक्षत्रें म्हणतात. कृत्तिका व विशाखा या नक्षत्रास साधारण नक्षत्रें म्हणतात. पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, मघा व भरणी ही पांच नक्षत्रें उग्र नक्षत्रें आहेत. मृगशीर्ष, चित्रा, रेवती व अनुराधा ही चार मृदु नक्षत्रें आहेत. श्रवण, स्वाती, शततारका, धनिष्ठा व पुनर्वसु या पाच नक्षत्रास चर नक्षत्रें म्हणतात. अशी हीं सर्व नक्षत्रें आपआपल्या नावाप्रमाणें फल देतात.

चरं चलं क्रूरमुशंति चोग्रं ध्रुवं स्थिरं दारुणभं च तीक्ष्णं ॥
क्षिप्रं लघूक्तं मृदुमैत्र संज्ञं साधारणं मिश्रमिति ब्रुवंति ॥ १०६ ॥

अर्थः—चरास–चल. उग्रास–क्रूर. स्थिरास–ध्रुव. दारुणास–तीक्ष्ण. क्षिप्रास–लघु. मृदुस–मैत्र. साधारणास–मिश्र या प्रमाणें दुसरींही नावें त्या त्या नक्षत्रास आहेत असें ऋषि म्हणतात. ( रत्नमाला )

यत्कार्यं नक्षत्रे तद्दैवत्यासु तिथिषु तत्कार्यं ॥
करणमुहूर्तेष्वपितत्सिद्धिकरं देवतानां च ॥ १०७ ॥

अर्थः—जे कार्य ज्या नक्षत्रावर करावयास सांगितलें तेंच नक्षत्र जर ज्या कार्यास सांपडत नसेल तर त्या नक्षत्राच्या देवतेची जी तिथी किंवा करण अथवा मुहूर्त सापडेल त्याजवर तें कार्य करावें म्हणजे सिद्धीस जातें ॥ १०७ ॥

यस्मिन्भे यच्च कर्मोक्तं कार्यं तस्योदये च तत् ॥
वारोक्तं कालहोरायां लग्नोक्तं तन्नवांशके ॥ १०८ ॥ ज्यो. नि. ज्यो. प्र. ( ६१ )

अर्थः—ज्या नक्षत्रावर जें कर्म करण्यास सांगितलें तें नक्षत्र त्या कार्यास न मिळेल तर तें नक्षत्र सबध दिवसात ज्या वेळीं उदयास येईल त्या वेळीं तें कार्य करावें. नक्षत्राचा उदय–लग्नावरून पाहावा. ज्या वारीं जे कार्य करण्यास सांगितलें तें कार्य करण्यास तो वार न मिळेल तर तें कर्म त्या वाराच्या काळ होऱ्यात करावें. ज्या लग्नावर जें कर्म करावयास सांगितलें त्या कर्मास तें लग्न मिळत नसेल तर दुसऱ्या लग्नात त्या लग्नाचा नवांश पाहून त्यावर ते कार्य करावे ॥ १०८ ॥ ज्यो. नि. ज्यो. प्र. मु. चिं. ६१

उग्रं साधारणे कार्यं मृदुक्तं स्थिरभेचरे ॥
लघूक्तं दारुणोक्तं स्यादुग्रे क्षिप्रे चरोदितं ॥१०९॥ पीयूप० वसिष्ठ० स्फुट० मु. सिं. ६१

अर्थः—उग्र नक्षत्रावर करण्यास सांगितलेलें कार्य, साधारण–नक्षत्रावर करावें. मृदु नक्षत्रावरील कर्म स्थिर नक्षत्रावर करावें. लघु नक्षत्राचें कृत्य चर नक्षत्रावर करावें. दारुण नक्षत्रावरील कर्म उग्र नक्षत्रावर करावें. चर नक्षत्राचें कार्य क्षिप्र नक्षत्रावर करावें ॥ १०९ ॥ पीयूषधारेंतील वसिष्ठानुसारी स्फुट.

यस्मिन्धिष्ण्ये यच्च कर्मोपदिष्टं तद्दैवत्ये तन्मुहूर्तेपि कार्यं ॥
दिक्शूलाद्यं चिंतनीयं समस्तं तद्वद्दंडः परिघश्च क्षणेषु ॥ ११० ॥

अर्थः—जें कर्म ज्या नक्षत्रास सांगितलें त्या कर्मास तें नक्षत्र घाईमुळें सांपडत नसेल तर त्या नक्षत्राची जी देवता असेल त्या देवतेचा जो मुहूर्त दिवसा किंवा रात्रीं येईल त्या मुहूर्तावर तें कर्म करावें या प्रमाणें नक्षत्राचें कार्य मुहूर्तावर करणें असेल तर त्या वेळीं परिघ, दंड व दिशाशूल वगैरे जें वर्ज्य करण्यास सांगितलें आहे तें सर्व वर्ज्य केलेंच पाहिजे. ॥ ११० ॥

क्रूराक्रांतं क्रूरमुक्तं च राहुसहितं भंकेतुयुग्धूमितं लत्तोपग्रहभैरवाख्यसहितं भिन्नं च विद्धं खगैः ॥ यद्वैकार्गलवेधितं ग्रहणभं संध्योदितं नो शुभं वेधोत्पातहतं हतं च शिखिना भं खेटयुद्धेस्थितं ॥ १११ ॥ मुहूर्ततत्व

अर्थः—जें नक्षत्र पापग्रहानें ( सूर्य, मंगळ व शनि ) युक्त तें, ज्या नक्षत्रावर पापग्रह येणार तें, ज्या नक्षत्रास पापग्रह सोडून गेला तें, राहूनें युक्त, ज्या नक्षत्रावर केतू आहे तें, जें ग्रहाच्या संबंधानें धूमयुक्त झालें तें ग्रहाच्या लत्तेनें ताडित, उपग्रहानें युक्त, ज्यावर चंडायुध पडलें आहे तें, ज्याचा ग्रहानें भेद किंवा वेध केला आहे तें, जें एकार्गल दंडानें वेधित, ज्या नक्षत्रावर सूर्यग्रहण अगर चंद्रग्रहण झालें तें, ज्या नक्षत्रावर सूर्य आहे त्या नक्षत्रापासून चवदावें नक्षत्र, भूमिकंपादि पृथ्वीवरील उत्पात व तारापातादिक जे आकाशांतील उत्पात अगर रक्त वृष्टि इत्यादि जे दिव्य उत्पात या सर्व प्रकारच्या उत्पातांनीं दूषित झालेलें नक्षत्र केतूनें ताडित व ज्यावर ग्रहांचे युद्ध होतें तें अशी एकोणीस प्रकारचीं नक्षत्रें मंगल कार्यास वर्ज्य करावीं. ॥ १११ ॥ मुहूर्ततत्व ॥

लत्तयंति भृगुराहु कुजेज्यज्ञार्कपूर्ण विधुसूर्यतनूजाः ॥
अग्रतो जिन नखाग्निपडाकृत्यर्क सप्तवसुसंमितभानि ॥ ११२ ॥

अर्थः—जो ग्रह ज्या नक्षत्रावर असेल तेथपासून पुढें दिलेल्या संख्येच्या नक्षत्रास लत्तादोष आहे असें जाणावें. यास्तव तें नक्षत्र दूषित होतें. शुक्र २४, राहू २०, मंगळ ३, गुरु ६, बुध २२, रवि १२, पूर्णचंद्र ७, शनि ८ राहूची गती नेहेमींच वक्री असते त्यामुळें तो ज्या नक्षत्रावर असेल तेथपासून मागील जें विसावें नक्षत्र येईल त्यास लत्तादोष आहे असें समजावें. ॥ ११२ ॥ मूलानुसारी स्फुट ॥ मू. चिं. ६२ ॥

उपग्रहोर्क भात्पंच नागदिङ्मनु सप्तमं ॥
अतिधृत्यास्तिथिर्धृत्यः प्रकृतेः पंच भानिच ॥११३॥ मुहूर्तमाला ॥ मु. सिं. ६३॥

अर्थः—रवि ज्या नक्षत्रावर असेल तेथपासून ५।८।१०।१४।७।१९।१५।१८।२१।२२।२३।२४।२५ इतक्या नक्षत्रास उपग्रह नांवाचा दोष असतो. ॥ ११३ ॥

## वरच्या श्लोकांतील दोषांचीं नांवें.

विद्युत्पंचमभे क्षितेश्च चलनं स्यात्सप्तमे सूर्यभाच्छूलश्चाष्टमभे शनिश्चदशमे केतुस्तथाष्टादशे ॥ दंडः पंचदशे चतुर्दश इहप्रोक्तो निपातो बुधैस्तूल्का कालविदागशोनिगदिता चैकोन विंशेर्कभात् ॥११४॥ भादेक विंशतिमितात्कथितास्तुमोहनिर्घातकंपकुलिशाः परिवेषयुक्ताः॥ एष्विदुगेषु न शुभं खलु कर्म कार्यं सिद्धिं प्रयाति दहनाख्य विपादिसाध्यं ॥११५॥
ज्योतिर्निबंधांत लल्ल ॥ ६३ ॥

अर्थः—रवी ज्या नक्षत्रावर असेल त्यापासून पांचवे नक्षत्रावर विद्युत् ( वीज ) सातव्यावर भूमिकंप, आठव्यावर शूल, दहाव्यावर वज्र, अठराव्यावर केतु, पंधराव्यावर दंड, चौदाव्यावर पात, एकोणिसाव्यावर

उल्का याप्रमाणें काळवेत्ते ऋषिनीं सांगितले आहे ॥ ११४ ॥ एकविसाव्यावर मोह, बाविसाव्यावर निर्घात, तेविसाव्यावर कंप, चोविसाव्यावर वज्र, आणि पंचविसाव्यावर परिवेष याप्रमाणें योगऋषीनीं सांगितले आहेत. ह्या नक्षत्रावर चांगले काम केले असता सिद्धीस जात नाहीं. अभिसंबंधीं शस्त्रप्रयोग, विषप्रयोग इत्यादि कर्में करावीं ॥ ११५ ॥ ज्यो. निं. लल्ल ॥ ६३ ॥ मु. सि. ॥

वैधृति गंडकहर्षणशूल व्यतिपात साध्यानां ॥
यदुडु स्पृशतिविरामं तदशेषं पातदूषितं त्याज्यं ॥११६॥ मुहूर्तमाला मु. सिं. ६४

अर्थः—वैधृति, गंड, हर्षण, शूल, व्यतिपात व साध्य या सहा योगाच्या समाप्तिकालीं जें नक्षत्र असेल तें पातानें म्हणजे चंडायुधानें दूषित होतें याकरता अशा दूषित नक्षत्रांचा त्याग करावा ॥११६॥

विष्कंभादि निषिद्धेष्वपि चेद्योगेषु मंगलं तत्र ॥
रविभाद्विषमंचांद्रं खार्जूरं तत्सहाभिजित्याज्यं ॥११७॥ मुहूर्तमाला मु.सिं. ६४

अर्थः—विष्कंभ, अतिगंड, शूल, गंड, व्याघात, वज्र, व्यतिपात, परिघ आणि वैधृति या नऊ योगापैकीं योग ज्या दिवशीं असेल त्या दिवशींचें चंद्रनक्षत्र रविनक्षत्रापासून मोजावें. जर विषम संख्या येईल तर त्या नक्षत्रावर खार्जूर म्हणजे एकार्गल दद्ययोग असतो. यास्तव त्या नक्षत्राचा त्याग करावा. येथें नक्षत्रें मोजतांना अभिजित नक्षत्रही मोजावे. ॥ ११७ ॥

## लत्तादि दोषांचे परिहार किंवा अपवाद.

लत्तितांघ्रिंत्यजेत्तुल्यं लत्तयद्ग्रहभांघ्रिणा ॥
पातोपग्रह खार्जूरभांघ्रिंचर विभांघ्रिणा ॥ ११८ ॥ मुहूर्तमाला मु. सिं. ६४

अर्थः—लत्ताप्रहार दोष उत्पन्न करणारा ग्रह नक्षत्राच्या ज्या चरणात असेल तो चरण ज्या नक्षत्रास लत्तादोष येतो त्याचा वर्ज्य करावा. रवि ज्या चरणात असेल तो चरण चंडायुध, उपग्रह आणि एकार्गल हे दोष ज्या नक्षत्रास उत्पन्न होत असतील त्या नक्षत्राचा वर्ज्य करावा ॥ ११८ ॥

## नक्षत्रास ग्रहांचा वेध पाहण्याचें सप्तशलाका चक्र.

ऊर्ध्वं तिर्यग्रेखिकाः सप्तसप्त लेख्या लेख्या न्यग्निभात्साभिजिति ॥
भानि त्याज्यं यत्तु विद्धं ग्रहेण चक्रे सुष्मिन्नेकरेखास्थितेन ॥ ११९ ॥

अर्थः—सप्तशलाका चक्राप्रमाणें कोणत्या नक्षत्राचा कोणत्या नक्षत्राशीं वेध होतो अर्थात् ग्रह ज्या नक्षत्रावर असेल त्या नक्षत्राचा (ग्रहाचा) कोणत्या नक्षत्राशीं वेध होतो हें नक्षत्रानुक्रमानें खालीं दिलें आहे.

| | |
|---|---|
| कृत्तिका—श्रवण | मघा—भरणी |
| रोहिणी—अभिजित | पूर्वा—अश्विनी |
| मृग—उत्तराषाढा | उत्तरा—रेवती |
| आर्द्रा—पूर्वाषाढा | हस्त—उत्तराभाद्रपदा |
| पुनर्वसु—मूळ | चित्रा—पूर्वाभाद्रपदा |
| पुष्य—ज्येष्ठा | स्वाती—शततारका |
| आश्लेषा—अनुराधा | विशाखा—धनिष्ठा |

वर दिलेली परस्परविरुद्ध नक्षत्रें खालील श्लोकांत सांगितलीं आहेत.

शाक्रेज्ये शतभानिले शिवजले पौष्णार्यमर्क्षेवसुद्वीशेवैश्वसुधांशुभे इयभगे सार्पानुराधं तथा ॥ हस्तोपांतिमभे विधातृविधिभे मूलादितीत्वाप्रमाजांघ्री याम्यमघे कृशानुहरिभं विद्धेद्रि रेखे मिथः ॥ १२० ॥ मुहूर्तचिंतामणी मु. सिं. ६५

अर्थः—ज्येष्ठा आणि पुष्य, शततारका-स्वाती, आर्द्रा-पूर्वाषाढा-रेवती-उत्तरा. धनिष्ठा-विशाखा. उत्तराषाढा-मृग. अश्विनी पूर्वा. आश्लेषा-अनुराधा. हस्त-उत्तरा-भाद्रपदा, रोहिणी-अभिजित. मूळ-पुनर्वसु, चित्रा-पूर्वाभाद्रपदा. भरणी-मघा. कृत्तिका-श्रवण. यांचा परस्पर वेध सप्तशलाका चक्रात येतो.

## पंचशलाका चक्राप्रमाणें वेध पाहाण्याचें कोष्टक.

याम्योत्तराः प्रागपराश्च पंच द्वे द्वे च रेखे रचये द्विदिक्षु ॥
विदिग्द्वितीयार्गंकिताग्नितारः सहाभिजित्तत्र भवेद्भवर्गः ॥१२१॥ विवाहवृंदावन मु. सिं.

अर्थः—पंचशलाका चक्राप्रमाणें कोणत्या नक्षत्राचा कोणत्या नक्षत्राशीं वेध होतो अर्थात ग्रह ज्या नक्षत्रावर असेल त्या नक्षत्राचा ( ग्रहाचा ) कोणत्या नक्षत्राशी वेध होतो हें नक्षत्रानुक्रमानें खालीं दिलें आहे.

भरणी—अनुराधा
कृत्तिका—विशाखा
रोहिणी—अभिजित
मृग—उत्तराषाढा
आर्द्रा—पूर्वाषाढा
पुनर्वसु—मूळ
पुष्य—ज्येष्ठा

आश्लेषा—धनिष्ठा.
मघा—श्रवण.
पूर्वा—अश्विनी.
उत्तरा—रेवती.
हस्त—उत्तराभाद्रपदा.
चित्रा—पूर्वाभाद्रपदा.
स्वाती—शततारका.

वर दिलेली परस्पर विरुद्ध नक्षत्रें खालील श्लोकांत सांगितली आहेत व तीं अति संकट कालीं कोणता योग असतां अपवादानें घ्यावीं तेही सांगितलें आहे.

विश्वेंद्वोर्यम मित्रयोर्द्विकभयोः पित्र्यर्क्षहर्योर्मिथोंत्यार्यम्णोः पुनरस्त्रपोर्वरुणभ स्वात्योरुभा हस्तयोः ॥ लग्नेशेभवगेथवा शशिनि सदृष्टे शुभे वांगगे होरायांच शुभस्य वा व्यध भयं नास्तीति पूर्वे जगुः ॥ १२२ ॥ मुहूर्तमार्तंड मु. सिं. ६६

अर्थः—उत्तराषाढा-मृग, भरणी-अनुराधा, रोहिणी-अभिजित, मघा-श्रवण. उत्तरा-रेवती, पुनर्वसु-मूळ, शततारका-स्वाती, उत्तराभाद्रपदा-हस्त ह्याचा परस्पर वेध पंचशलाका चक्रात येतो. यांत आणखी सहा युग्मांचा परस्पर वेध येत असून तो न सांगण्याचें कारण ह्या चक्रावरून वेध विवाहासच पहावयाचा आहे. जी विवाहाचीं नक्षत्रें आहेत तीं या आठ युग्मातच असल्यानें तेवढीच फक्त सांगितलीं आहेत. लग्नाधिपती एकादश स्थानीं अगर लग्नावर चंद्रादि शुभग्रहांची दृष्टी किंवा लग्नीं शुभग्रह अथवा शुभग्रहाचा होरा असेल तर ग्रहवेधाचा दोष नाहीं असें प्राचीन ऋषींचें मत आहे. ॥ १२२ ॥

वर दिलेले वेध कोणत्या कार्यास कोणते वर्ज्य करावे हें खालील श्लोकांत दिलें आहे.

वधुप्रवेशने दाने वरणे पाणिपीडने ॥
वेधः पंचशलाकाख्येऽन्यत्र सप्तशलाकके ॥१२३॥ रत्नमाला मु. सिं. ६७

अर्थः—वधु प्रवेश, कन्यादान, वाग्निश्चय, आणि पाणिग्रहण इत्यादि कार्यास पंचशलाका चक्रावरून विद्ध नक्षत्र वर्ज्य करावे. व इतर जी चौलादि कर्में आहेत त्यास सप्तशलाका चक्रावरून विद्ध नक्षत्र वर्ज्य करावे.

पंचशलाकाचक्रे पाणिग्रहणे भवेध विधिरुक्तः ॥
शस्तः शुभ मित्रकृतः सप्तशलाकात इतरत्र ॥ १२४ ॥ पियूषधारा

अर्थ—विवाहकर्मांत पंचशलाका चक्रावरून वेध पहावा व इतर कर्मांत सप्तशलाका चक्रावरून पहावा. जर वेध करणारा शुभग्रह असून चंद्राचा मित्र असेल तर त्यानें केलेला वेध बाधक नाहीं.

विवाहासही सप्तशलाका चक्रावरून वेध पाहावा असे कांहींचे मत आहे ते खालील श्लोकांत दिले आहे.

यस्याःशशी सप्तशलाकभिन्नः पापैरपापैरथवाविवाहे ॥
उद्वाहवस्त्रेणतु संवृतांगी स्मशानभूमिं रुदती प्रयाति ॥१२५॥पीयूषधारेंत दीपिका

अर्थ—ज्या वधूच्या विवाहाच्या वेळीं सप्तशलाका चक्रांत पापग्रहानें अगर शुभग्रहानें चंद्रास ( चंद्र-युक्त नक्षत्रास ) वेध केला असेल ती विवाह झाल्याबरोबर रोदन करीत स्मशानभूमीवर जाते. यांत शुभ-ग्रहाच्या वेधाचें फळ वाईट असें जरी सामान्यतः आहे तरी मागील श्लोकावरून तो शुभग्रह—चंद्राचा मित्र असल्यास बाध नाहीं असें स्पष्ट दिसतें. यावरून चंद्राचा मित्र नसेल तरच वाईट फळ मिळेल असें समजावें ॥ १२५ ॥ पीयूषधारे० दीपिका ॥ मु. चिं. ॥ ६८ ॥

विवाहाच्या वेळीं सप्तशलाका चक्रावरून वेध पाहण्याचा आचार ज्या देशांत आहे तेथेंच पहावा यास प्रमाण खालीं दिलें आहे.

देशाचारस्तावदादौ विचिंत्यो देशे देशे या स्थितिः सैवकार्या ॥
लोके दुष्टं पंडिता वर्जयंति दैवज्ञोऽतो लोकमार्गेण यायात् ॥ १२६ ॥

अर्थः—पहिल्यानें आपल्या देशांत ही पद्धत आहे अगर कसें ते पहावें. आपल्या देशांत ही पद्धत नसल्यास पाहूं नये. कारण जो आचार नाहीं तो विद्वान लोक पाहात नाहींत. तरी ज्योतिषांनीं त्या त्या देशांतील पद्धतीप्रमाणें वागावें. ॥ वराहसंहिता ॥ १२६ ॥ मु. चिं. ॥ ६८ ॥

कांहीं वेळा शास्त्र विरोध असला तरी रूढीप्रमाणें वागावें यास प्रमाण खालील श्लोकांत दिलें आहे.

कुलस्य देशस्य च चित्तवृत्तिर्न खंडनीया विदुषा कदाचित् ॥
यो लोकशास्त्रानुमतः सधर्मो लोको बलीयाननयोर्विरोधे ॥ १२७ ॥
ज्यो. नि. स्मृत्यंतर मु. सिं. ६८

अर्थः—विद्वान मनुष्यानें कुलाच्या व शिष्टांच्या मनाच्या विरुद्ध कधींही बोलूं नये. ज्या देशांत जी रूढी असेल त्याप्रमाणेंच चालावें. कदाचित शास्त्र व रूढी यांचा विरोध असला तर रूढी असेल त्याप्रमाणेंच चालावें ॥ १२७ ॥ ज्यो. नि. स्मृत्यंतर ॥ मु. चिं.

खरा शास्त्रार्थ सोडून केवळ लोकांकरितां किंवा शिष्टांकरितां रूढीचा मार्ग पत्करण्या-बद्दलचे वरील मत सर्व संमत होणार नाहीं. कारण शास्त्रशुद्ध मार्ग हाच खरा धर्म मार्ग होय.

## वेध कसें पहावें.

स किल वेधविधिर्द्वितृतीययोश्चरणयोर्मिथ आदिमतुर्ययोः ॥
अशुभविद्धमशेषमुडु त्यजेच्चरणकं शुभविद्धमसंपदि ॥१२८॥ विवाहवृंदावन मु. सिं. ६९

अर्थः—नक्षत्राच्या द्वितीयचरणाचा आणि तृतीय चरणाचा परस्पर वेध होतो. त्याचप्रमाणें प्रथम चरणाचा व चतुर्थ चरणाचा परस्पर वेध होतो. याप्रमाणें कोणतेही ग्रहानें विद्ध झालेलें नक्षत्र मंगलकार्यांत वर्ज्य करावें. पापग्रहानें विद्ध झालेलें नक्षत्र सर्वच वर्ज्य करावें. व शुभग्रहानें विद्ध झालेला चरण फक्त सोडून इतर तीन चरणावर कार्य केले तरी हरकत नाहीं. ॥ १२८ ॥

वेधमाद्यांत्ययोरंघ्र्योरन्योन्यं द्वितृतीययोः ॥
क्रूरैरपि त्यजेत्पादं केचिदूचुर्महर्षयः ॥१२९॥ ज्यो. नि. वै. ना. मु. सिं. ६९

अर्थः—पहिल्या चरणाचा अर्थ वरील श्लोकाचे पूर्वार्धाप्रमाणें आहे. दुसऱ्या चरणाचा अर्थ असा कीं, फार अडचण असल्यास क्रूरग्रहानें विद्ध झालेल्या नक्षत्राचा विद्ध झालेला चरण सोडून इतर तीन चरणावर कार्य केलें तरी हरकत नाहीं असें कांहीं ऋषींचें मत आहे. ॥ १२९ ॥

## लत्ता इत्यादि दोष कोणत्या देशांत कोणते मानतात

ते खालील श्लोकात सांगितलें आहे.

लत्तां मागधके देशे पातं कोसलदेशके ॥
एकार्गलंतुकाश्मीरे वेधं सर्वत्र वर्जयेत् ॥१३०॥ मुहूर्तमार्तंडटीका सत्यसूरि

अर्थः—ग्रहाचा लत्तादोष मागधदेशात, चबायुधदोष कोसल देशात आणि एकार्गल दोष काश्मिर देशात अवश्य वर्ज्य करावे. ग्रहाचा वेध मात्र सर्व देशात वर्ज्य करावा ॥ १३० ॥

लत्तां सौराष्ट्र शाल्वेपूपग्रहं कुरुबाल्हिके ॥
कलिंगवंगयोः पातं वेधं सर्वत्र वर्जयेत् ॥१३१॥ मुहूर्तमाला मु. सिं. ७०

अर्थः—लत्ता दोष सौराष्ट्र व शाल्व देशात वर्ज्य करावा. उपग्रह दोष कुरु व बाल्हिक देशात वर्ज्य करावा. पातदोष कलिंग व वग देशात वर्ज्य करावा व वेधदोष सर्व देशात वर्ज्य करावा ॥ १३१ ॥

दोषैरथैभिर्यदुपद्रुतं तन्मांगल्य कृत्येषु भवेन्नचेष्टं ॥
यावन्नभुक्का शशिना विमुक्तं ततो भवेन्मंगल कर्मणीष्टं ॥ १३२ ॥

अर्थः—वर दिलेल्या लत्तादि दोषामुळें दूषित झालेलें नक्षत्र त्यावरून चंद्र येऊन गेल्याशिवाय तें मंगल कार्यास योग्य होत नाहीं. चंद्र त्या नक्षत्रावर येऊन गेल्यावर तें नक्षत्र मंगल कार्यास घेणें चांगलें.

नक्षत्र विद्ध होऊन त्यातून मुक्त झाल्यावर त्यावरून चंद्र गेला म्हणजे ते पुनः शुद्ध व निर्दोष होते. यास दृष्टांतासह खालील श्लोकांत आधार दिला आहे.

स्पष्ट्वा गते तु चांडाले शुद्धिराप्लावनाद्यथा ॥ तथा भुक्त्वागते क्रूरे चंद्रभोगो विशोधनं ॥१३३॥

अर्थः—ज्याप्रमाणें चांडाळाचा स्पर्श झाला असता तो दूर गेल्यावर स्नान केले असतां दोष जातो. त्याप्रमाणें नक्षत्र दोषमुक्त झाल्यावर चंद्राचा भोग झाल्यानें शुद्ध होते. ॥ १३३ ॥

कोणत्या नक्षत्राच्या दोषाची शुद्धी किती चंद्र भोगानीं होते. तें खालील श्लोकात सांगितलें आहे.

पश्चात् संध्यासंस्थितं खेटयुद्धोत्पातैर्दुष्टं धूमितं केतुनाच ॥
उल्कापाता दुष्ट मुल्काहतं वा भिन्नं चैषां चंद्रभोगेन शुद्धिः ॥ १३४ ॥

अर्थः—सूर्यास्ताचे वेळीं उदयास येणारे म्हणजे सूर्य नक्षत्रापासून चौदावें, ग्रहयुद्धानें किंवा उत्पातानें दुष्ट झालेलें, ग्रहाच्या योगानें धूमयुक्त झालेलें, केतुयुक्त, उल्कापातानें दूषित, उल्केनें ताडित व ग्रहानें भेद केलेलें इतक्या नक्षत्रांची एकदा चंद्रभोगानें शुद्धी होते ॥ १३४ ॥

सकृद्धं चंद्रभोगेन शुद्धमुत्पात दूषितं ॥ सूर्य भुक्तंसदा शुद्धं धिष्ण्य भोग विना विधीः ॥१३५॥

अर्थः—उत्पातानें दूषित झालेले नक्षत्र एकदां चंद्रभोग झाला म्हणजे शुद्ध होतें. सूर्यानें भुक्त झालेलें नक्षत्र त्यावरून दुसऱ्या नक्षत्रावर सूर्य गेला कीं, ते शुद्ध होते त्यांस चंद्रभोगाची गरज नाहीं ॥ १३५ ॥

द्वाभ्यांधरित्रीतनयेन दुष्टं त्रिभिः सराहुग्रहणोपयातं ॥ षड्भिश्चतुर्भिः शनिभोगयुक्तं शुद्धं भवेद्धेतुहिनांशुभोगैः ॥ १३६ ॥

अर्थः—मंगळानें दूषित झालेलें नक्षत्र दोन चंद्रभोगानीं, राहूयुक्त नक्षत्र तीन चंद्रभोगानीं, ग्रहण नक्षत्र सहा चंद्रभोगानीं व शनीनें सोडलेलें नक्षत्र चार चंद्रभोगानीं शुद्ध होतें ॥ १३६ ॥

ग्रहण नक्षत्राविषयीं खालील श्लोकांत खुलासा केला आहे.

यस्मिन्विधुं राहु रिनं च धिष्ण्ये गृण्हाति तत्त्याज्यमृतुत्रयं स्यात् ॥ पाणिग्रहे पुंमरणं विधत्ते द्वयोर्भयोश्चेद्द्वयमेव जह्यात् ॥ १३७ ॥ पीयूष धारेत शार्ङ्गधर ॥ मु. सिं. ७१

अर्थः—ज्या नक्षत्रावर चंद्रग्रहण किंवा सूर्यग्रहण होतें तें नक्षत्र सहा महिनेपर्यंत मंगल कार्यांस घेऊं नये. त्या नक्षत्रावर सहा महिन्याचे आंत विवाहादि मंगलकार्य केलें तर पुरुषास मरण येतें. जर ग्रहण दोन नक्षत्रावर असेल म्हणजे एका नक्षत्रावर स्पर्शकाल व दुसऱ्या नक्षत्रावर मोक्षकाल तर दोन्ही नक्षत्रें मंगलकार्यांस वर्ज्य करावी ॥ १३७ ॥ पी. धा. शा. मु. सिं. ७१

पक्षांतरेण ग्रहणद्वयं वा यदा तदादि ग्रहणोपगं भं ॥
पक्षाद्विशुद्धं भवति द्वितीयं पाणिग्रेहशुध्यति भोगषट्कात् ॥ १३८ ॥

अर्थः—ज्या वेळीं पंधरा दिवसांचे अंतरानें दोन ग्रहणें येतील तेव्हां पहिल्या ग्रहणाचें नक्षत्र विवाहादि मंगलकार्यांविषयीं १५ दिवसांनीं शुद्ध होतें व दुसऱ्या ग्रहणाचे नक्षत्र ६ महिन्यांनीं शुद्ध होतें ॥ १३८ ॥

नेष्टं ग्रहर्क्षं सकलार्धपादग्रासे क्रमात्तर्कगुणेंदुमासान् ॥
ग्रस्तोदयेचोर्ध्वमनिष्ट मादौ ग्रस्तास्तकेऽल्पे प्यहु मासषट्कं ॥ १३९ ॥

मुहूर्तचिंतामणी व पीयूष धारेंत काश्यप ॥ मु. सिं. ७२

अर्थः—खग्रास ग्रहण असेल तर सहा महिने, अर्धग्रास असल्यास तीन महिने व एकचतुर्थांश ग्रास झाला तर एक महिना ग्रहण नक्षत्र वर्ज्य करावें. ग्रहण लागूनच सूर्य किंवा चंद्र उदय होईल तर ग्रहणानंतर सहा महिने ग्रहण नक्षत्र वर्ज्य करावें. जर ग्रहण थोडें राहून सूर्य किंवा चंद्राचा अस्त होईल तर ग्रहणाचे पूर्वींचे सहा महिने ग्रहण नक्षत्र मंगलकार्यांस वर्ज्य करावें. ग्रहणानंतर वर्ज्य करण्याचें कारण नाहीं ॥ १३९ ॥

नक्षत्र पापग्रहयुक्त असलें तरी तें खालील आधारानें घेतां येतें.

एकस्मिन्नपि धिष्ण्ये भिन्नेराशौसखग्रहे शशिनि ॥
तच्चंद्रर्क्षे कुर्या द्विवाह यात्रादिकं सर्व ॥ १४० ॥ ज्यो. नि. सं. प्र.

अर्थः—नक्षत्र एक असून त्यांत राशिभेद असल्यास पापग्रह ज्या राशीवर असेल त्याहून अन्य राशीवर जर चंद्र असेल तर चंद्र जो त्या नक्षत्राचा भाग त्यावर विवाहादि सर्व मंगलकार्यें करावीं. उदाहरणः—मृगनक्षत्राचे पूर्वार्धांत पापग्रह असल्यास उत्तरार्धांत कार्य करण्यास हरकत नाहीं. याप्रमाणेंच इतर चित्रादिलंक नक्षत्रांचे समजावें ॥ १४० ॥ ज्योतिर्निबंधांत सांहिता प्रदीप ॥ मु. सिं. ७२

मागें जे नक्षत्रदोष सांगितले आहेत. ते कशामुळें शुद्ध होतात तें खालीं दिलें आहे.

दोषैर्मुक्तं तु नक्षत्रं कर्मयोग्यं च तद्भवेत् ॥
भानुना शशिना वापि युक्तं सौम्यग्रहैरपि ॥ १४१ ॥ ज्यो. नि. ज्यो. प्र.

अर्थः—मागें सांगितलेल्या दोषांतून मुक्त झालेल्या नक्षत्रावरून रवि, चंद्र अगर शुभग्रह यांपैकीं कोणीही गेले म्हणजे तें नक्षत्र मंगलकार्यांस घ्यावें ॥ १४१ ॥ ज्यो. नि. ज्यो. प्र. ॥

याम्यं चित्रोत्तराषाढा धनिष्ठोत्तरफाल्गुनी ॥
ज्येष्ठा च रेवती चैव जन्मर्क्षं भानुतः क्रमात् ॥ १४२ ॥
जन्मर्क्षग्रहसंयोगे न कुर्याच्छोभनं नर ॥
पाणिग्रहणयात्रादि विनाशमुपयात्यतः ॥ १४३ ॥ ल्ल मु सिं ७२-७३

अर्थ —भरणी, चित्रा, उत्तराषाढा, धनिष्ठा, उत्तराफल्गुनि, ज्येष्ठा व रेवती हीं सात नक्षत्रें अनुक्रमानें सूर्यादिग्रहांचीं जन्मनक्षत्रें आहेत याकरिता ज्यावेळीं ग्रहांचा आपापल्या जन्मनक्षत्राशीं समागम असतो, त्यावेळीं विवाहादि मंगलकार्यें व यात्रादि शुभकृत्यें करू नयेत ॥१४३॥ ल्ल मु. सिं. ७२।७३ ॥

अंधकं तदनु मंदलोचनं मध्यलोचनमतः सुलोचनं ॥
रोहिणी प्रभृतिभं चतुर्विधं साभिजिच्च गणयेत्पुनः पुनः ॥१४४॥ रत्नमाला मु सिं

अर्थ —रोहिणी नक्षत्रापासून आरंभ करून अनुक्रमानें अभिजित् नक्षत्रासह अठ्ठावीस नक्षत्रें प्रथम अंधक दुसरें मंदलोचन, तिसरें मध्यलोचन, आणि चवथें सुलोचन याप्रमाणें पुनः पुन सात वेळ मोजावी. म्हणजे रोहिणी अंधक, मृग मंदलोचन, आर्द्रा मध्यलोचन व पुनर्वसु सुलोचन याप्रमाणेंच पुढेंही अनुक्रमानें मोजावें ॥ १४४ ॥

अंधेषु नष्टं धनमाशुलभ्यं प्रयत्नतः केकरसंज्ञकेषु ॥ मुहूर्तमाला
दूराच्छ्रुतिः स्याच्चिपिटेषु भेषु स्वक्षेषु नैव श्रवणं न लाभ ॥१४५॥ मु सिं ७३

अर्थ —अंधनक्षत्रावर हरवलेलें द्रव्य लौकर मिळतें मंदलोचनावर हरवलेलें द्रव्य प्रयत्नानें मिळतें मध्यलोचनावर हरवलेल्या द्रव्याची फक्त बातमी कळते पण हस्तगत होत नाहीं. आणि सुलोचनावर हरवलेलें द्रव्य सापडत नाहीं व त्याची बातमीही कळत नाहीं ॥ १४५ ॥ मु मा मु सिं. ॥ ७३ ॥

प्रयाति पूर्वां दिशमंधकर्क्षैस्तद्दक्षिणां केकरसंज्ञकैर्भैः ॥
दिशं प्रतीचीं चिपिटैश्च धिष्ण्यैः स्वक्षैरुदक्तत्र गवेषणीयं ॥ १४६ ॥

अर्थ —अंधनक्षत्रावर हरवलेलें द्रव्य पूर्वेस आहे असें समजावें मंदलोचनावर हरवलेले द्रव्य दक्षिणेस आहे असें समजावें मध्यलोचनावर हरवलेलें द्रव्य पश्चिमेस आहे असें समजावें व सुलोचनावर हरवलेलें द्रव्य उत्तरेस आहे असें समजावें ॥ १४६ ॥ ह्यावरून नक्षत्र दिशा कळतील.

जन्मर्क्षमाद्यं दशमं च कर्मभं सांघातिकं षोडशभं च मानसं ॥
स्यात्पंचविंशं समुदायमष्टादशं त्रयोविंशतिभं विनाशकं ॥ १४७ ॥
एवं षड्भोजनः सर्वोदेशजात्यभिषेकभैः ॥
नवमोनृपतिर्ज्ञेयो नाडी तारा स्मृताअमूः ॥ १४८ ॥
एतासु नवसु प्राप्तैः क्रूरैरशुभसंभवः ॥
सौम्यग्रहेण युक्तिश्चे द्विपरीतं फलं भवेत् ॥ १४९ ॥ मु मा दी

अर्थ—ज्या नक्षत्रावर जन्म होतो तें जन्मनक्षत्र त्यापासून दाहावें कर्मनक्षत्र, सोळावें संघात नक्षत्र, अठरावें समुदायनक्षत्र, तेविसावें विनाशनक्षत्र, पंचविसावें मानसनक्षत्र, ॥१४७॥ या प्रमाणें या सहा नक्षत्रावरून शुभ किंवा अशुभकाळ आहे तें पहावें मात्र राजानें या सहानक्षत्राखेरीज, देशनक्षत्र, जातिनक्षत्र व अभिषेक नक्षत्र हीं तीन जास्त पहावीं हीं नऊ नाडीनक्षत्रें आहेत ॥१४८॥ या नऊ नक्षत्रावर पापग्रह आला म्हणजे दुःख प्राप्त होतें व शुभग्रह आला म्हणजे सुख प्राप्त होते ॥ १४९ ॥ मुहूर्तमालेच्या टीकेंत दीपिका. वरील नऊ नक्षत्रें मंगलकार्यांत वर्ज्य करावी असें खालील श्लोकांत सांगितलें आहे.

आद्यदिक् नृपधृति त्रिविंशकं तत्वसंख्यमपिभं तु मंगले ॥
निंदितं जनिभतस्तु भूपतेर्देश जात्याभिषवोडु चाहितं ॥ १५० ॥

*अर्थः*—स्वत:चें जन्मनक्षत्र व त्यापासून १०वें, १६वें, १८वें, २३ वें व २५ वें हीं सहा नक्षत्रें सर्व लोकांनीं मंगलकार्यांस वर्ज्य करावीं आणि देशनक्षत्र, जातिनक्षत्र व अभिषेकनक्षत्र व वरील सहानक्षत्रें अशीं नऊनक्षत्रें राजानें मंगलकार्यांस वर्ज्य करावीं. ॥ १५० ॥ मुहूर्तकल्पद्रुम. मु. सिं. ॥ ७४ ॥

प्रत्येक जातीस नक्षत्रें वाटून दिलेलीं आहे० तीं खालील श्लोकांत सांगितलीं आहेत.

पूर्वात्रयं सानलमग्रजानां राज्ञां च पुष्येण सहोत्तराणि ॥
सपौष्णमैत्रं पितृदैवतंच प्रजापतेर्भं च कृषीवलानां ॥ १५१ ॥
आदित्यहस्ताभिजिदाश्विनानि वणिग्जनः स्वाम्यमुपागतानि ॥
मूलाग्नि नेत्रानिल वारुणानि भान्युग्रजातेः प्रभविष्णुतायाः ॥ १५२ ॥
सौम्यैंद्र चित्रावसु दैवतानि सेवानरस्त्वाम्यमुपागतानि ॥
सार्पं विशाखाश्रवणौ भरण्यश्चंडाल जातेरभि निर्दिशंति ॥ १५३ ॥

मुहूर्त माळेच्या टीकेंत वराह मु. सिं. ७५

*अर्थ*—पूर्वाफाल्गुनी, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा व कृत्तिका या चार नक्षत्रांवर ब्राह्मणाचें स्वामित्व आहे. उत्तराफाल्गुनी, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा व पुष्य या चार नक्षत्रांवर क्षत्रियांचे स्वामित्व आहे. रेवती, मघा, अनुराधा व रोहिणी या चार नक्षत्रांवर शेतकऱ्यांचें स्वामित्व आहे. ॥१५१॥ पुनर्वसु, हस्त अभिजित व अश्विनी या चार नक्षत्रांवर वाणी लोकांचें स्वामित्व आहे. मूळ, आर्द्रा, स्वाती आणि शततारका या चार *नक्षत्रांवर यवनादि क्रूर जातींचें स्वामित्व आहे. ॥ १५२ ॥ मृगशीर्ष, ज्येष्ठा, चित्रा व धनिष्ठा या चार* नक्षत्रांवर चाकर लोकांचे स्वामित्व आहे. आश्लेषा, विशाखा, श्रवण आणि भरणी या चार नक्षत्रांवर चंडाळ जातीचे स्वामित्व आहे या करतां या नक्षत्रांवर शुभग्रह आला असतां त्या त्या जातीस शुभकारक व पापग्रह आल्यास अशुभकारक असें समजावें ॥ १५३ ॥ मुहूर्तमालेच्या टीकेंत वराह ॥ मु. सिं. ॥ ७५ ॥

खालीं अ व क ह डा चक्राचे श्लोक नक्षत्र नावाकरितां दिले आहेत.

चू चे चो लाऽश्विनी प्रोक्ता ली लू ले लो भरण्यथ ॥
आ ई ऊ ए कृत्तिका स्यादो वा वी वू तु रोहिणी ॥ १५४ ॥
वे वो का की मृगशिरः कु घ ङ छार्द्रिका तथा ॥
के को हा ही पुनर्वसु हू हे हो डा तु पुष्यभं ॥ १५५ ॥
डी डू डे डो तथाश्लेषा मा मी मू मे मघा स्मृता ॥
मो टा टी टू तु पूर्वा स्यात् टे टो पा प्युत्तराफभं ॥ १५६ ॥
पू षा णा ठा हस्ततारा पे पो रा री तु चित्रिका ॥
रू रे रो ता स्मृता स्वाती ती तू ते तो विशाखिका ॥ १५७ ॥
ना नी नू ने ऽनुराधा च ज्येष्ठा नो या यि यू स्मृता ॥
ये यो भा भी मूलतारा पूर्वाषाढा भु धा फ ढा ॥ १५८ ॥
भे भो जा ज्युत्तराषाढा जू जे जो खा ऽभिजिद्भवेत् ॥
खी खू खे खो श्रवणभं गा गी गू गे धनिष्ठिका ॥ १५९ ॥

गो सा सी सू शतभिषा से सो दा दी तु पूर्वभा ॥
दु ज्ञा झा थोत्तराभाद्रा दे दो चा ची तु रेवती ॥ १६० ॥ मु. मा.

अर्थः—अश्विनी नक्षत्राच्या प्रथम चरणास चू हें अक्षर, द्वितीय चरणास चे, तृतीय चरणास चो आणि चतुर्थ चरणास ला अशी चार चरणांस चार अक्षरें आहेत. तीं श्लोकांत सांगितलीं आहेत. या प्रमाणेंच बाकीच्या नक्षत्रांचें समजावें ॥ १५४ ते १६० ॥ मुहूर्तमाला. मु. चिं. ७५।७६

नक्षत्रमित्थं चतुरंघ्रिकं भवे न्नामाक्षरं जन्मनि तस्य युज्यते ॥
राशिस्तथैको नवभिस्तदंघ्रिभिर्नवांशसंज्ञैरजतो विनाभिजित् ॥ १६१ ॥

अर्थः—वर सांगितलेल्या श्लोकाप्रमाणें प्रत्येक नक्षत्राचें चार चरण समजावे. जो मनुष्य ज्या नक्षत्राच्या ज्या चरणावर जन्मास येईल त्या नक्षत्राच्या त्या चरणाचें अक्षर त्याच्या नांवाचे पहिले अक्षर असावें. उदाहरणार्थः—अश्विनी नक्षत्राच्या प्रथम चरणावर ज्याचा जन्म झाला त्याचें नाव चूडामणि ठेवावें. नक्षत्राच्या चरणास नवांश असें नाव आहे त्या नवांशाच्या नऊ चरणांनीं एक राशि होतो त्यास मेष, वृषभ अशीं नांवें आहेत. त्यांत अभिजित नक्षत्र मोजावयाचें नाहीं. ॥ १६१ ॥

## अथ योगप्रकरणम्

निष्कंभः प्रीतिरायुष्मान्सौभाग्यः शोभनस्तथा ॥
अतिगंडः सुकर्मा च धृतिः शूलः तथैव च ॥ १६२ ॥
गंडो वृद्धिर्ध्रुवश्चैव व्याघातो हर्षण स्तथा ॥
वज्रः सिद्धिर्व्यतीपातो वरीयान्परिघः शिवः ॥ १६३ ॥
सिद्धिः साध्यः शुभः शुक्लोब्रह्मैंद्रोवैधृतिस्तथा ।
संज्ञा सदृक्फला चैषा योगानां सप्तविंशतिः ॥ १६४ ॥

अर्थः—विष्कंभ, प्रीति, आयुष्मान, सौभाग्य, शोभन, अतिगंड, सुकर्मा, धृति, शूल, गंड, वृद्धि, ध्रुव, व्याघात, हर्षण, वज्र, सिद्धि, व्यतीपात, वरीयान्, परिघ, शिव, सिद्धि, साध्य, शुभ, शुक्ल, ब्रम्हा, ऐंद्र, व वैधृति हे सत्तावीस योग आपापल्या नावाच्या अर्थाप्रमाणें फळ देणारे आहेत.
शुभ योग कोणते व अशुभ कोणते या विषयीं खालील श्लोकांत विवेचन केलें आहे.

विरुद्धयोगेषु य आद्यपादः सर्वेषु कार्येषु विवर्जनीयः ॥
सवैधृतोयो व्यतिपातयोगः सर्वोपि नेष्टः परिघार्धमाद्यं ॥ १६५ ॥

तिस्रस्तुनाड्यः प्रथमे च वज्रे गंडेतिगंडे पिचषट् च षट्च ॥
व्याघातयोगे नवपंचशूले शुभेषु कार्येषु विवर्जनीयाः ॥ १६६ ॥

अर्थः—अशुभयोग म्हणजे विष्कंभ, अतिगंड, शूल, गंड, व्याघात आणि वज्र ह्या सहा योगांचा प्रथमचरण, वैधृति व व्यतिपात हे दोन संपूर्ण त्याचप्रमाणें परिघ योगाचे पूर्वार्ध हें सर्व कार्यांस वर्ज करावे. अडचणीच्या प्रसंगीं, विष्कंभाच्या तीन, वज्राच्या नऊ किंवा तीन, गंड आणि अतिगंड या दोन योगांच्या सहा, सहा, व्याघाताच्या नऊ, व शूलाच्या पांच अशा घटका मंगलकार्यांस वर्ज्य कराव्या. वज्राच्या नऊ घटका टाकण्याचें प्रमाण अग्निपुराणांत आहे. संस्कारकौस्तुभ वृद्ध वशिष्ठ ॥

सूर्याचंद्रमसोर्धिष्ण्य योगाज्जाता यतस्ततः ॥
ऋक्षेशा एव योगेशा ज्ञातव्याः सर्वकर्मसु ॥ १६७ ॥

अर्थः—योग हे सूर्यचंद्रांच्या संबंधानें नक्षत्रावरून उत्पन्न होतात म्हणून जे नक्षत्राचे स्वामी पूर्वी सांगितले आहेत तेच योगाचे स्वामी आहेत. या प्रमाणें सर्व कार्यांस समजावें ॥ १६७ ॥ मुहुर्त कल्पद्रुमाच्या टीकेत वसिष्ठ ॥ मु. सिं. ७८ ॥

## अथ करणप्रकरणम्

अथ बव बालव कौलव तैतिल गरवणिज विष्टयः सप्त ॥
शुक्लप्रथमोर्ध्वदलादष्टावृत्त्या चलानि करणानि ॥ १६८ ॥
शकुनि चतुष्पदनागाः किंस्तुघ्नाख्यं च चत्वारि ॥
बादिभूतोर्ध्वदलात्सित प्रथमा द्यदलावधि स्थिराणिस्युः ॥ १६९ ॥

मुहूर्तमाला ॥ मु. सिं. ७८ ॥

अर्थः—बव, बालव, कौलव, तैतिल, गर, वणिज, आणि विष्टि हीं सात करणें शुद्ध प्रतिपदेच्या उत्तरार्धापासून वद्य चतुर्दशीच्या पूर्वार्धाची समाप्ति होईतोंपर्यंत, आठ वेळ पुनः पुनः येतात. या सात करणांस चल करणें असे म्हणतात ॥ १ ॥ शकुनि, चतुष्पद, नाग आणि किंस्तुघ्न हीं चार करणें वद्य चतुर्दशीच्या उत्तरार्धापासून शुद्ध प्रतिपदेच्या पूर्वार्धाच्या समाप्तीपर्यंत असतात. या चार करणांस स्थिर करणें असें नांव आहे ॥ १६८–१६९ ॥

इंद्रो ब्रह्मा मित्रनामार्यमा भूः श्रीः कीनाशश्चेति तिथ्यर्धनाथाः ॥
कल्युमाख्यौ सर्पवायू तथा च ये चत्वारस्ते स्थिराणां चतुर्णां ॥ १७० ॥

रत्नमाला ॥ मु. सिं. ७८ ॥

अर्थः—इंद्र, ब्रह्मा, मित्र, अर्यमा, लक्ष्मी व यम हे सात बव बालव इत्यादि सात चल करणांचे स्वामी आहेत. कली, शंकर, सर्प व वायु हे चार शकुनि, चतुष्पद इत्यादि चार स्थिर करणांचे स्वामी आहेत ॥ १ ॥

पौष्टिकस्थिर शुभानि बवाख्ये बालवे द्विजहितान्यपि धर्मान् ॥
कौलवे प्रमदामित्रविधानं तैतिले शुभगृहाश्रयकर्म ॥ १७१ ॥

अर्थः—पुष्टिकारक, पुष्कळ काळ टिकणारें व कल्याणकारक अशी तीन प्रकारचीं कर्में बव करणावर करावीं. ब्राह्मणांचे पूजन किंवा ब्राह्मणांना दान देणें किंवा भोजन घालणें व साधारण धर्म कार्यें बालव करणावर करावीं. स्त्रीसंबंधीं व मित्रसंबंधीं कामें कौलव करणावर करावी. कल्याणकारक कामें व घरासंबंधी कामें तैतिल करणावर करावी ॥ १७१ ॥

गरे च बीजाश्रय कर्षणानि वाणिज्यापिस्थैर्य वणिक्क्रियाश्च ।
न सिद्धिमायाति कृतं च विष्ट्यां विषारि घातादि च याति सिद्धिं ॥ १७२ ॥

अर्थः—धान्यासंबंधीं कार्यें व जमीन नांगरणें वगैरे गरकरणावर करावी. पुष्कळ दिवस टिकणारीं व व्यापारासंबंधी कामें वणिज् करणावर करावीं. बव करणापासून वणिजकरणावर जी कामें करावयास सांगितली आहेत ती विष्टी करणावर केली असतां सिद्धीस जात नाहीत. विषप्रयोग किंवा शत्रूचा घात करणें इत्यादि वाईट कामें विष्टिकरणावर केली असतां सिद्ध होतात ॥ १७२ ॥

वधबंधविषाग्न्यस्त्रच्छेदनोच्चाटनादियत् ॥ तुरंगमहिषोष्ट्रादि कर्मविष्ट्यां तु सिद्धति ॥१७३॥

अर्थः—प्राणघात, बंधन, विषप्रयोग, जाळणें, शस्त्रानें दुखापत करणें, तोडणें, हाकून देणें, व घोडे रेडे, उंट, शेळ्या व मेंढ्या इत्यादि जीं कामें तीं विष्टीकरणावर केलीं असतां सिद्धीस जातात ॥१७३॥ पीयूषधारेंत वसिष्ठ ॥ मु. सिं. ७१

विष्टिकरणावर चांगलीं कामें कोणत्या वेळीं करावीं तें खालील श्लोकांत सांगितलें आहे.

पृथिव्यां यानि कर्माणि शोभनान्यशुभान्यपि ॥
तानि सर्वाणि सिध्यंति विष्टिपुच्छे न संशयः ॥ १७४ ॥ ज्यो. नि. भृगु.

अर्थः—पृथ्वीमध्यें जीं शुभ किंवा अशुभ कार्यें आहेत तीं सर्व विष्टीच्या पुच्छ भागांत केलीं असतां सिद्धीस जातात. तो पुच्छभाग पुढें स्पष्टकरून सांगितला आहे.॥१७४॥ज्योतिर्निबंधात भृगु ॥ मु. सिं. ७९।८०

मंत्रौषधानि शकुनौ च सपौष्टिकानि गोविप्र राज्यपितृकर्म चतुष्पदेतु ॥
सौभाग्य दारुणतह्मृति ध्रुव कर्म नागे किंस्तुघ्न नाम्नि शुभ पौष्टिक मंगळानि ॥१७५॥

अर्थः—दुसऱ्याकडून मंत्रोपदेश घेणें अगर दुसऱ्यास मंत्रोपदेश देणें. सिद्धि करणें व प्रयोग करणें, औषधाची सिद्धी करणें, देणें घेणें, पुष्टिकारक कामें हीं सर्व शकुनि करणावर करावीं. गाई, बैल, ब्राह्मण, राज्य पितर यांचीं कर्में चतुष्पद करणावर करावीं. सौभाग्यदायक, क्रूरकर्में, चोरी व पुष्कळ दिवस रहाणारें काम हीं कामें नाग करणावर करावीं. चांगलीं कर्में, पुष्टिदायक कामें व मंगल कार्यें हीं किंस्तुघ्न करणावर करावीं ॥१७५॥ रत्नमाला ॥ मु. सिं. ८० ॥

## विष्टिकरणाचीं स्थानें.

शुक्ले पूर्वार्धेऽष्टमी पंचदश्योर्भद्रैकादश्यां चतुर्थ्यांपरार्धे ॥
कृष्णे त्वर्धे स्यात्तृतीयादशम्योः पूर्वे भागे सप्तमी शंभुतिथ्योः ॥ १७६ ॥

अर्थः—शुक्ल पक्षांत अष्टमी व पौर्णिमा यांच्या पूर्वार्धांत व चतुर्थी आणि एकादशी यांच्या उत्तरार्धांत त्याचप्रमाणें कृष्णपक्षांत तृतीया व दशमी यांच्या उत्तरार्धांत व सप्तमी आणि चतुर्दशी यांच्या पूर्वार्धांत विष्टि करण असते. ॥ १७६ ॥ मुहूर्तचिंतामणी मु. सि. ८०॥

विशिष्ट करणाचें पुच्छ निर्दोष केव्हां असतें व जरि संकट कालीं कोणता योग असतां विष्टिकरण घेतलें तरी चालतें ते खालील श्लोकांत सांगितलें आहे.

विष्टिर्यदाहनि तिथेरपरार्धजाता पूर्वार्धजा निशि तथा शुभदा च पुच्छे ॥
तत्कालभूरपि निजोदययामगा वा ग्राह्या शुभेबलिनि लग्नपतौ निजांशे ॥१७७॥कालमाधव.

अर्थः—जेव्हां तिथीच्या उत्तरार्धांतील विष्टिकरण दिवसा येईल व तिथीच्या पूर्वार्धांतील विष्टिकरण रात्रीं येईल असे दोन्ही विष्टिकरण व सर्व विष्टिकरणाचा पुच्छ भाग हे शुभप्रद आहेत. असे नसलें तर मंगलकार्यांच्या वेळीं जें लग्न असेल त्याचा स्वामी शुभग्रह आणि बलवान असून तो आपल्या नवांशांत असेल तर विष्टिकरण घेण्यास हरकत नाहीं. ॥ १७७ ॥ का. मा. ॥

## विष्टि करणाच्या पुच्छाचें लक्षण.

एकाद्रिराम कृतवेद गुणाद्रिभूमि पादादि पंचघटिका न सदास्यमस्याः ॥
वेदेंदुदस्रगुण रामयमेंदु वेद पादांतिमत्रिघटिकाः शुभकारिपुच्छं ॥ १७८ ॥

अर्थः—विष्टिकरणाच्या एकंदर जितक्या घटका असतील त्याचे चार चरण करून पुढें दिल्याप्रमाणें शुभ किंवा अशुभ ते ठरवावें. शुक्ल चतुर्थीस प्रथमचरण, अष्टमीस द्वितीय चरण, एकादशीस तृतीय चरण,

पौर्णिमेस चतुर्थ चरण, कृष्ण पक्षात तृतीयेस चतुर्थचरण, सप्तमीस तृतीय चरण, दशमीस द्वितीय चरण, व चतुर्दशीच्या प्रथम चरणाच्या प्रथम पाच घटका विष्टीचें मुख असतें तें अशुभ आहे. त्याचप्रमाणें शुक्लपक्षातील चतुर्थीच्या विष्टिकरणाच्या चतुर्थ चरणास या प्रमाणें पुढें तिथी व चरणाचे आकडे दिले आहेत त्यावरून समजावे. ८/१ ११/२ १५/३ ३/३ ७/२ १०/१ १४/४ ह्या चरणाच्या शेवटीं तीन घटका विष्टिकरणाचे पुच्छ असतें तें शुभप्रद आहे ॥ १७८ ॥ मुहूर्तमाला ॥ मु. चिं. ८१ ॥

असिते सर्पिणी ज्ञेया सितेपक्षे तु वृश्चिकी ॥
सर्पिण्यास्तु मुखं त्याज्यं वृश्चिक्याः पुच्छमेव च ॥ १७९ ॥

(२) अर्थः—कृष्ण पक्षातील विष्टिकरण सर्पिणी आणि शुक्ल पक्षातील वृश्चिकी आहे या करतां कृष्ण पक्षांतील विष्टिकरणाचें पूर्वार्ध व शुक्ल पक्षांतील विष्टिकरणाचें उत्तरार्ध वर्ज्य करावें बाकीच्या भागांत कार्य करण्यास हरकत नाहीं. हीं मुख पुच्छें पुढील श्लोकांत स्पष्ट दिलेलीं आहेत ॥ १७९ ॥ मुहूर्तमालेच्या टीकेंत ॥ मु. चिं ८१

रात्रावहिर्दिवा सार्पी त्यजेत्पुच्छमुखे तयोः ॥ मानाधन मुखं पुच्छं पक्षयोर्ज्ञेयमत्र च ॥१८०॥

(३) अर्थ—तिथीच्या उत्तरार्धांतील विष्टिकरण ते वृश्चिकी व पूर्वार्धांतील विष्टिकरण सर्पिणी आहे. या करतां वृश्चिकेचें पुच्छ व सर्पिणीचें मुख फक्त वर्ज्य करावें. बाकीचा भाग घेण्यास हरकत नाहीं. पूर्वीचे श्लोकांतील व ह्या श्लोकांतील मुख व पुच्छ शब्दानीं बरोबर विष्टिकरणाचे अर्थ घ्यावे ॥ १८० ॥ मुहूर्तमाला ॥ मु. चिं. पृ. ८२ ॥

मेषोक्षकौर्प्ये मिथुने घट सिंह मीन कर्केषु चाप मृगतौलिवधूषु चंद्रे ॥
स्वर्मर्त्य नागनगरीः क्रमशः प्रयाति विष्टिः फलान्यपि ददाति हि तत्र देशे ॥१८१॥

(४) अर्थः—मेष, वृषभ, मिथुन व वृश्चिक या राशीवर चंद्र असता विष्टि स्वर्गांत असते. कर्क, सिंह, कुंभ व मीन या राशीवर चंद्र असले तर विष्टि मृत्यु लोकांत असते. कन्या, तूळ, धनु व मकर या राशीस चंद्र असल्यास विष्टि पाताळात असते. यामुळें जेथें विष्टि असते तेथेंच तिचा दोष समवतो. त्यामुळें स्वर्ग व पाताळातील विष्टि घेण्यास हरकत नाहीं ॥ १८१ ॥ पीयूषधारेंत ॥ मु. चिं. ८२ ॥

# सूर्यसिद्धांतांतील तिथिनक्षत्रादि विचार.

भभोगोऽष्टशतीलिप्ता खाश्विशैलास्तथा तिथेः ॥
ग्रहलिप्ता भभोगाप्ताभानि भुक्त्या दिनादिकम् ॥ १८२ ॥ स्पष्टाधिकार

( अष्टशतीलिप्ताः ) अष्टशतकलाः ( भभोग. ) नक्षत्रभोगः ( तिथेः खाश्विशैलाः ) तिथेर्विंशत्यधिकसप्तशतकलाः ( तथा ) भोग इत्यर्थः । ( ग्रहलिप्ताः ) ग्रहस्य कलाः ( भभोगाप्ताः ) भभोगेन भक्ताः फल ( भानि ) गतनक्षत्राणि भवन्ति । शेष वर्तमाननक्षत्रस्य गतकलास्तस्मात् ( भुक्त्या ) ग्रहगत्या ( दिनादिक ) गतदिनादिक साध्यम् । अयमर्थः । शेषकलाभिरून भभोग भोग्यकला भवन्ति । भुक्त भोग्यकलासु ग्रहगत्या भाजिते फल क्रमेण गत-गम्यादिनादिक भवति ॥ ६४ ॥ १८२॥ ( सूर्यसिद्धान्त स्पष्टाधिकार ).

अर्थः—प्रत्येक नक्षत्राचा भोग ८०० कला म्हणजे १३ अंश २० कला आहे. त्याचप्रमाणें प्रत्येक तिथीचा भोग ७२० कला म्हणजे १२ अंश आहे. प्रत्येक नक्षत्राचा किंवा तिथीचा भोग म्हणजे तिथीचें व नक्षत्राचे ठराविक प्रमाण होय. ग्रहाची राशि, अंश, कलात्मक स्थिति घेऊन त्यातून जितके भभोग वजा जात असतील तितके वजा करून वजा गेलेलीं नक्षत्रें ( अर्थात् भभोग ) हीं भुक्त किंवा गतनक्षत्रें होत. बाकी ज्या कला येतील त्या भुक्त कला समजाव्या. भुक्त कला ८०० कलांतून वजा केल्या असतां बाकी राहिलेल्या कला ह्या भोग्य कला होत. भुक्त आणि भोग्य कलांस अनुक्रमें ग्रहगतीनें भागिलें असतां अनुक्रमें गत आणि गम्य असे घटिकादि फल येतें.

राशिचक्राचे जे २७ भाग तीं २७ नक्षत्रें होत. ही २७ नक्षत्रें ग्रह भोगतात. अर्थात् ह्या २७ नक्षत्रांतून ग्रहाचे परिभ्रमण होतें. राशिचक्राच्या २१६०० आहेत. कारण १ राशी म्हणजे ३० अंश व अशा १२ राशींचे मिळून सर्वंघ राशिचक्राचे ३६० अंश होतात. प्रत्येक अंश ६० कलांचा असतो. एकूण ३६०×६०=२१६०० ह्या सर्वंघ राशिचक्राच्या कला झाल्या. ह्या कलास २७ ह्यानें मागिले असतां भाग ८०० कला ह्या प्रत्येक नक्षत्राच्या कला झाल्या. कोणत्याही ग्रहाच्या राशि अंश कलात्मक स्थितीच्या एकंदर कला करून त्यास १ नक्षत्राच्या कला ८०० यानीं मागिलें असतां भागाकार ही अश्विन्यादि गत नक्षत्रें येतात. बाकी राहणाऱ्या कला ह्या पुढील नक्षत्राच्या गतकला होत. गतकला ८०० कलांतून वजा केल्या म्हणजे बाकी भोग्य कला येतात. भोग्यकलास ग्रहाच्या गतीनें भागून दिवस घटिका पळें इत्यादि फल साधावें.

एका चांद्रमासांत सूर्य आणि चंद्र यांचे अंतर एका राशिचक्राच्या कलासमान अर्थात् कलांइतकें होतें. आणि एक चांद्रमास ३० तिथींचा असतो. म्हणून चक्रकला २१६०० यांस ३० नें भागिले असतां फल ७२० कला अर्थात् १२ अंश हा तिथिभोग झाला.

रवीन्दु योगलिप्ताभ्यो योगा भभोगभाजिताः ॥
गता गम्याश्चषष्टिघ्ना भुक्तियोगाप्तनाडिकाः ॥ १८३ ॥ सूर्य सि.

( रवीन्दुयोगलिप्ताभ्यः ) सूर्य चन्द्रमसोर्योग कलाभ्यः ( योगाः ) विष्कम्भादयः ( भभोगभाजिताः ) भभोगेन विभक्ता भवन्ति । ( गताः ) गतकलाः ( गम्याश्च ) गम्यकलाश्च ( षष्टिघ्नाः ) षष्टिगुणिताः ( भुक्तियोगाप्त नाडिकाः ) सूर्याचन्द्रमसोर्गति योगेन भजनाल्लब्ध घटिका गतैष्या भवन्ति ॥ ६५ ॥ सूर्यसिद्धान्त पृष्ठ ११६ स्पष्टाधिकार.

अर्थः—सूर्य आणि चंद्र यांचा योग म्हणजे सूर्य आणि चंद्र यांची राशि अंश कलात्मक बेरीज करून त्यांच्या एकंदर कलास ८०० नें भाग दिला असतां भागाकारा इतके विष्कंभादि गतयोग होतात. शेषकला ह्या पुढील योगाच्या भुक्तकला होत. त्या ८०० तून वजा केल्या असतां बाकी भोग्यकला येतात. भुक्त व भोग्यकलास ६० नें गुणून सूर्य व चंद्र यांची गति एकत्र करून त्या गतीनें भागिलें असतां अनुक्रमें गत आणि भोग्य घटिकादि येतात.

सूर्य आणि चंद्र यांच्या योगामुळें विष्कंभादि योग उत्पन्न होतात म्हणून सूर्य आणि चंद्र यांच्या योगास ८०० यानें भाग दिला असतां विष्कंभादि गतयोग येतात. कारण विष्कंभादि योगही २७ च आहेत त्यामुळें योगभोगही ८०० कलांचाच होतो. भुक्त, भोग्य कलाची घटिका-पळें काढण्याची रीति वर सांगितलीच आहे. उदाहरणार्थ इष्ट दिवशीं स्प–रवि ० राशि ५ अंश ० कला ० विकला असून त्याची गति ५८ कला आहे चंद्र ० राशि १२ अंश ० कला आहे व त्याची गति ७७० कला आहे. रवि व चंद्र ह्यांचा योग ० राशि १७ अंश झाला. त्याच्या कला १०२० ह्यास रविचंद्राची एकत्र गति कला ८२८ यानी भागिलें असतां भागाकार १ म्हणजे विष्कंभयोग हा गतयोग झाला. व बाकी १९२ कला प्रीति योगाच्या भुक्त झाल्या त्या ८०० तून वजा करता ६०८ कला प्रीतियोग भोग्य राहिला.

अर्कोन चन्द्रलिप्ताभ्यस्तिथयो भोगभाजिताः ॥
गता गम्याश्चषष्टिघ्नानाड्यो भुक्त्यन्तरोद्धृताः ॥ १८४ ॥

( अर्कोनचन्द्रलिप्ताभ्यः रव्यूनेन्दुकलाभ्यः ( तिथयः ) प्रतिपदादादयः ( भोगभाजिताः ) तिथिभोगेन विभक्ताभवन्ति । ( गताः ) गतकलाः ( गम्याश्च ) गम्यकलाश्च ( षष्टिघ्नाः ) षष्टिगुणिताः (भुक्त्यन्तरोद्धृताः) सूर्याचन्द्रमसोर्गत्यन्तरेण भक्ताः फलं ( नाड्यः ) क्रमेण गत घटिका गम्यघटिकाश्च भवन्ति ॥ १८४ ॥ सूर्यसिद्धान्त पृष्ठ ११७ स्पष्टाधिकार.

अर्थः—चंद्रांतून सूर्य वजा करून शेष राहील त्यास १२ अंशांनीं अर्थात् ७२० कलांनीं भागावें. भागाकार गततिथि येतील. बाकी येईल ती गततिथीच्या पुढील भुक्त तिथि होय. भुक्ततिथि १२ अंशांतून

वजा करून येणारी तिथि ही भोग्य तिथि होय. भोग्य तिथीच्या कलास ६० नीं गुणून, चंद्रगतीतून सूर्यगति वजा करून येणाऱ्या तिथिगतीनें भागावें व भागाकार घटिपलात्मक आणावा व तितकी घटिपलात्मक तिथि भोग्य राहिली असें समजावें.

तिथिभोग कला ७२० म्हणजे १२ अंशाची १ तिथि होते. यावरून चद्रांतून सूर्य वजा करून येणाऱ्या कलास कोणती तिथि येते हें सहज काढता येईल. गततिथि ही भागाकाराचे योगानें कळतें आणि त्यावरून वर्तमान म्हणजे चालू तिथि कोणती हें समजतें. त्याचप्रमाणें वर्तमानतिथीच्या भुक्त व भोग्य कला किती हेंही कळून येतें.

ध्रुवाणि शकुनिर्नागं तृतीयं तु चतुष्पदम् ॥
किंस्तुघ्नं तु चतुर्दश्याः कृष्णायाश्चापरार्धतः ॥ १८५ ॥

( कृष्णाया. ) कृष्ण पक्षीयायाः ( चतुर्दश्या· ) चतुर्दशी तिथे ( अपरार्धत. ) द्वितीयार्धो द्वितीयार्ध मारम्य इत्यर्थ । ( ध्रुवाणि ) स्थिर करणानि स्यु । तान्याह–( शकुनिः ) शकुनि करण प्रथमम् । ( नाग ) नागाख्य द्वितीयम् । ( तृतीय तु चतुष्पद ) चतुष्पदाख्य तृतीयम् ( किंस्तुघ्न ) किंस्तुघ्नाख्य चतुर्थ करणमस्ति अयमर्थः । कृष्ण पक्षीय चतुर्दश्या अपरार्धे शकुनि करणम् । अमापूर्वार्धे नागकरणम् । अमाया उत्तरार्धे चतुष्पदाख्य करणम् । शुक्लपक्षीय प्रति पत्पूर्वार्धे किंस्तुघ्न नामकरणमिति ॥१८५॥ सूर्यसिद्धान्त स० पृष्ठ ११८

अर्थ—प्रत्येक महिन्याच्या कृष्ण चतुर्दशीचे उत्तरार्धी शकुनी अमावास्येच्या पूर्वाराधींत नाग, अमावास्येच्या उत्तरार्धांत चतुष्पद आणि शुक्ल प्रतिपदेच्या पूर्वार्धांत किंस्तुघ्न याप्रमाणें करण असतात. हे ४ स्थिर करण आहेत.

ववादीनि ततः सप्त चराख्यकरणानि च ॥ मासेऽष्टकृत्व एकैकं करणानां प्रवर्त्तते ॥ १८६ ॥

( तत ) स्थिरकरण कथनानन्तर शुक्लपक्षीय प्रतिपद परार्धतः ( ववादीनि ) ववकरण मादियेंषां तानि ( सप्त ) सप्तसंख्याकानि ( चराख्य करणानि ) चरकरणानि भवन्ति । ( मासे ) एकस्मिश्चान्द्रमासे ( करणानां ) ववादि सप्तकरणानां मध्ये ( एकैक ) एकमेक करण ( अष्टकृत्वः ) अष्टावृत्तिः ( प्रवर्तते ) प्रकर्षेण भवतीत्यर्थः ॥ १८६ ॥ सूर्यसिद्धान्त स. पृष्ठ ११९

अर्थः—प्रत्येक शुक्लपक्षातील प्रतिपदेच्या उत्तरार्धापासून कृष्ण पक्षातील चतुर्दशीचे पूर्वार्धापर्यंत वव, वालव इत्यादि ७ करण आठ वेळा येतात. हे चर करण आहेत. तात्पर्य एका चांद्रमासात ववादि करणांच्या ८ आवृत्त्या होतात.

तिथ्यर्धभोगं सर्वेषां करणानां प्रकल्पयेत् ॥
एषा स्फुटगतिः प्रोक्ता सूर्यादीनां खचारिणाम् ॥ १८७ ॥

( सर्वेषां करणानां ) चरकरणानां स्थिरकरणानां च ( तिथ्यर्धभोग ) तिथ्यर्धकालमितावस्थान ( प्रकल्पयेत् ) । ( सूर्यादीनां ) सूर्य आदिर्येषां ते सूर्यादयस्तेषां ( खचारिणां ) खेटानां ( एषा ) अदृश्ये-त्यादि प्रकल्पयेदित्यन्त यावत् ( स्फुट गति. ) स्पष्ट गति· स्पष्ट क्रियाज्ञानसंपादिका ( प्रोक्ता ) तुभ्य प्रति मया कथिता । एतेना स्पष्टाधिकार. परिपूर्तिः ॥ १८७ ॥ सूर्यसिद्धान्त स० पृष्ठ १२०.

अर्थ—प्रत्येक करण अर्धी तिथि भोगतो. म्हणजे एका तिथींत निश्चितपणें दोन करण येतात. मग ती तिथि ५० घटिका असो अगर ६८ घटिका असो तिथीच्या जितक्या एकदर घटिका असतील त्यांच्या निम्या घटिकांचा एक करण होतो.

आतांपर्यंत पचांगासंबंधींचे निरनिराळ्या ग्रंथांतील मूळ श्लोक व त्या संबंधाची माहिती सांगितली. ह्यांत अनुक्रमानें तिथि, वार, नक्षत्र, योग व करण ह्या पाच अगांच्यापुढें पचांगांत दिनमान, पारशी, मुसलमानी, इंग्रजी तारीख, रविउदय, रविअस्त, चद्रराशि ही माहिती दिलेली असते. त्यांच्यापुढें धर्माचार्यांच्या सदरांत त्या त्या महिन्यांतील दररोजचा धर्मार्थ, संक्रांति, ग्रहाचीं राश्यतरें, मृत्युयोग, दग्धयोग, चतुर्थी, एकादशी इत्यादि निर्णय ही माहिती असते. कोष्टकांत स्पष्टग्रह त्यांची गति व कुंडली देतात. ह्या सर्वांचें स्पष्टीकरणाकरितां प्रथम १ महिन्याचें प्रत्यक्ष पचांग देऊन नंतर त्याचें स्पष्टीकरण करतो.

शके १८५१शुक्लनाम सं.फाल्गुन शुक्लपक्षः दिं.फा.ई. र.उ.र.अ. चंद्रः संवत् १९८६ उदगयनं वसंतऋतुः मार्च १९३० अ.२५फा शु.१५श.अ.१८ ५३-४८

| | | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | श | १४ | ५१ | पू | १४ | ५४ | सा | २८ | २५ | किं | २ | १२ | २८ | १ | ७- ० | ६-४३ | १६/३३ नं. मी |
| २ | र | १८ | १६ | उ | १९ | ११ | शु | २८ | १६ | वा | ६ | २२ | २१ | २ | ६-५९ | ६-४४ | मीन |
| ३ | चं | ४० | ३१ | रे | ४३ | १२ | शु | २७ | २५ | तै | ९ | २५ | ३० | ३ | ६-५८ | ६-४४ | ४३/१२ नं. मे |
| ४ | मं | ४१ | ५७ | अ | ४५ | ५५ | ब्र | २५ | ४९ | व | ११ | २८ | ३१ | ४ | ६-५७ | ६-४४ | मेष |
| ५ | बु | ४२ | ९ | भ | ४७ | १२ | ऐं | २३ | २१ | व | १२ | ३१ | १ | ५ | ६-५७ | ६-४५ | मेष |
| ६ | गु | ४१ | ६ | कृ | ४७ | ४६ | वै | १९ | ५७ | कौ | ११ | ३४ | २ | ६ | ६ ५६ | ६-४५ | २/५ नं. वृ |
| ७ | शु | ३९ | ३ | रो | ४६ | ५३ | वि | १५ | ३१ | ग | १० | ३६ | ३ | ७ | ६-५५ | ६-४५ | वृषभ |
| ८ | श | ३५ | ८ | मृ | ४४ | २५ | मी | ९ | ५५ | वि | ७ | ३९ | ४ | ८ | ६-५४ | ६-४५ | ३२/३९ नं.मि |
| ९ | र | ३१ | ५० | आ | ४० | ४४ | आ | ५/१ | २२/२१ | वा | ३ | ४२ | ५ | ९ | ६-५३ | ६-४६ | मिथुन |
| १० | चं | २३ | २१ | पु | ३५ | ५७ | शो | ४६ | ५८ | ग | २३ | ४४ | ६ | १० | ६-५३ | ६-४६ | २१ नं. क |
| ११ | मं | १६ | १२ | पु | ३० | १६ | अ | ३७ | ४२ | वि | १६ | ४७ | ७ | ११ | ६-५२ | ६-४६ | कर्क |
| १२ | बु | ८ | २४ | आ | २४ | ६ | सु | २८ | ७ | वा | ८ | ५० | ८ | १२ | ६ ५१ | ६-४७ | २४/६ न.सिं |
| १३ | गु | ५०/१ | ५५/५ | म | १७ | ५२ | धृ | १८ | २२ | तै | ५१/१ | ५२ | ९ | १३ | ६-५० | ६-४७ | सिंह |
| १५ | शु | ४४ | ३१ | पू | ११ | ४९ | शू | ९ | ३ | वि | २८ | ५५/५ | १० | १४ | ६-४९ | ६ ४७ | १२/२८ नं. क |

इष्टिः मार्च.
चंद्रदर्शनं शु० ४५ समर्थ कुंभेशः ३६–५३
कुंभेभौमः १-९ मीनेशुक्रः ५९-३८
विना ४भ.प्र.११-१४नि.४१-५७अमृ.४५-५५*
घबाड ४७-३२ नं. आर्द्रीबेहस्त ३१
दग्ध ४१–६ घबाड ४१–६ यमघं. ४७-४६
भ. प्र. ३९-३ यमघं. ४६-५३ दग्ध ३९–३ नं.
दुर्गा ८ भ. नि. ७-५ दग्ध३५-८नं. शु.उ.परे
* दग्ध ४१–५७ नं.
मीनार्कः १-१मु ४५स्थि दग्ध२३-२३न.म.प्र §
आमलकी ११ भ. नि. १६ १२ §४९-४७
प्रदोषः घबाड २४–६ नं. ¶ ५२–११
उत्तराभाद्रपदार्कः २९-२६ध.०-१६म. प्र.¶
हुताशनी १५ मन्वा.भ.नि.१९-२२अन्वाधान

| र | चं | म | बु | गु | शु | श | रा | ह | ने |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ११ | ४ | १० | १० | १ | ११ | ८ | ० | ११ | ४ |
| ३ | २३ | १० | १७ | २० | १२ | २१ | १६ | २१ | १२ |
| ५० | ४० | ३८ | ४६ | १२ | २७ | ४८ | १३ | २२ | ४५ |
| ४८ | ५६ | ३५ | ५ | १० | ५० | १५ | १२ | ३४ | ३७ |
| ५९ | [illegible] | ४७ | [illegible] | ७ | ७४ | २ | ३ | ३ | १ |
| ४७ | ४६ | २ | ८ | ३१ | ४२ | ३३ | १० | १८ | २९ |
| — | उ | द | द | द | द | उ | | द | उ |
| शर | ४ | १ | २ | ० | १ | ० | | ० | ० |
| | ५ | १२ | २३ | २७ | २४ | ४५ | | ४३ | ४२ |

१ रा
शु११मं
२ गु
ह १२बु
१०
३
९ श
८
४
६
नेप ५ प्र.
७के

## फाल्गुन महिन्यांतील विशेष गोष्टी.

कुंभेशः--३६–५३ पा० शु० २ रवौ ता.२।३।३०,कुंभे भौमः (१-९ फाल्गुन ०१ सोमे) ता०३ मार्च १९३० रोजीं होत असून कर्क,कन्या, वृश्चिक व मीन या राशींना तो तापदायक आहे.उष्ण विकारानें पीडा जाणवेल. रक्तदोष व मस्तकास भ्रमण होईल.कुटुंबातील मंडळींसही थोडे कष्ट होतील.मेष,मिथुन, सिंह आणि धनु या राशींना तो अनुकूल फल देणारा आहे. द्रव्यविषयक कामें सहज व फायदेशीर रीतीनें होतील. प्रकृतीस्वास्थ्य मिळेल. कौटुंबिक सुखासही समाधानकारक आहे.

मीने शुक्रः ५९-३८ पा० शु० १सोमे ता०३।३।३० मीनार्कः (९-१ फाल्गु० शु०१० सोमे) ता० १० मार्च १९३०रोजीं होत असून वृषभ, कर्क, तूळ आणि मकर या राशींना तो शुभफलदायी आहे द्रव्यविषयक कामें फायदेशीर होऊन द्रव्यलाभही चांगला होईल. कोर्टातील कामात यश मिळेल. अधिकाऱ्याशी मैत्री राहील; मेष, सिंह, धनु व कुंभ या राशींना तापदायक आहे. गुप्त शत्रूकडून त्रास व अपमानाची भीति.वरिष्ठ अधिकाऱ्याशी विरोध व निष्कारण तंटे बखेडे होतील.बाकीच्या राशीस सामान्य शु.उ.परे फा०शु०८शनौ ता०८।३।३० बु.अ.पूर्वे.फा०कृ०१शनौ ता० १५।३।३०, मीनेशः १९–४६ फा० कृ० ७ शुक्रे ता० २१–३–३०, मेषेशुक्रः ४ -३६ फा० कृ० १३ शुक्रे ता० २८।३।३०.

शके१८५१शुक्लनाम सं.फाल्गुन कृष्णपक्षः दि.फा.इं.र.उ.र.अ. चंद्रः संवत् १९८६ उदगयनं वसंतऋतुः मार्च१९३०अ.२६फा कृ.३०र.अ.१८-५३-५०

| | | | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | शु | १७ | ५५ | उ | ६ | २७ | गं | ५१ | ५८ | बा | ११ | ५२ | ११ | १५ | ६-४९ | ६-४७ | कन्या | करिदिनं.धुलिवंदनं वु.अ.पूर्वे मृ. यमघं.† |
| २ | र | १३ | ११ | ह | २ ५० | १२ १५ | धु | ४५ | ८ | तै | ५ | २ ० | १२ | १६ | ६-४८ | ६-४८ | ११ न. तू | तुकाराम म पु. ति. ( देहू ) अमृ. २-१३ |
| ३ | चं | २८ | ४१ | स्वा | ५८ | २६ | व्या | १९ | ४७ | व | १ | ३ | १३ | १७ | ६-४७ | ६ ४८ | तूळ | संकष्ट ४चं.उ.क.९मि.२७भ.प्र.०-३८नि.ऽ |
| ४ | मं | ३६ | ४९ | वि | ५९ | २१ | ह | ३५ | ५१ | वा | २७ | ६ | १४ | १८ | ६-४६ | ६-४९ | ४९ नं. वृ | दग्ध २६-४९ नं.घबाड२६-४९ †६-२७नं.दृष्टि |
| ५ | बु | २६ | ५१ | अ | ६० | ० | व | ३३ | २८ | तै | २७ | ९ | १५ | १९ | ६-४५ | ६-४९ | वृश्चिक | अमृ.६०.०रंग५ऽ२८ ४३कल्पा.।शिवजयंती‡ |
| ६ | गु | २१ | १ | अ | २ | १५ | सि | ३२ | ३५ | व | २९ | ११ | १६ | २० | ६-४४ | ६-४९ | वृश्चिक | एकनाथ म पु ति.(पैठण) दग्घ२९-३ भ प्र २९-३ |
| ७ | शु | १२ | ११ | ज्ये | ६ | ५२ | व्य | १२ | ५५ | वि | १ | १४ | १७ | २१ | ६-४४ | ६-४९ | ५२ नं. ध | महाविपुवदिनं. वसंतेमाधवारंभः १९-११ § |
| ८ | श | १७ | १८ | मू | १२ | ५३ | व | १४ | १६ | या | ५ | १७ | १८ | २२ | ६-४३ | ६-५० | धनु | काला ८दग्घ३७-३८नं.§मीनेज्ञः१९-४६म.* |
| ९ | र | ४१ | ५४ | पू | १९ | ४९ | प | ३६ | १५ | तै | ११ | १९ | १९ | २३ | ६-४२ | ६-५० | ३१ ने म | घबा ४३-५१नं. ‡घबाड५८-२६नं. *नि.०-४८ |
| १० | चं | ५० | ० | उ | २७ | १० | शि | १८ | २४ | व | १७ | २२ | २० | २४ | ६ ४१ | ६-५० | मकर | दग्ध५२-०नं.म.प्र.१६-५८नि.५० ०मृ.२७-१०= |
| ११ | मं | ५५ | ५१ | श्र | १४ | २१ | सि | ४० | १८ | व | २३ | २५ | २१ | २५ | ६-४० | ६-५० | मकर | पापमोचनी स्मार्त ११ =घबाड २७-१० |
| १२ | बु | ६० | ० | ध | ४१ | १० | सा | ४२ | ६ | कौ | २८ | २७ | २२ | २६ | ६-३९ | ६-५० | ४१ नं. कुं | भागवत ११ति वा.१२-१२रेवत्यर्कः५४-२७ |
| १३ | गु | १ | ९ | श | ४७ | १० | शु | ४३ | ९ | तै | १ | ३० | २३ | २७ | ६-३८ | ६-५० | कुंभ | प्रदोषः वारुणीयोगः घ. १ प. ९ नं. |
| १४ | शु | ५ | १८ | पू | ५२ | ११ | शु | ४३ | २९ | व | ५ | ३३ | २४ | २८ | ६-३७ | ६-५१ | ५८ नं. मी | शिवरात्रिःभ प्र.५-३८नि.३७-२१मेषेशुक्रः* |
| १४ | श | ९ | ४ | उ | ५६ | ५ | ब्र | ४२ | ५१ | श | ९ | ३५ | २५ | २९ | ६-३७ | ६-५१ | मीन | दर्शः ३० अन्वाधानं. मन्वादि * ४-३६ |
| ३० | र | ११ | २८ | रे | ५८ | ५८ | ऐं | ४१ | २६ | ना | ११ | ३८ | २६ | ३० | ६-३६ | ६-५१ | ५८ नं. मे | दृष्टिः |

| र | चं | मं | बु | गु | शु | श | रा | ह | ने |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ११ | ११ | १० | ११ | १ | ० | ८ | ० | ११ | ४ |
| १९ | १७ | २१ | १७ | २२ | २ | २२ | १५ | २२ | १२ |
| ४३ | २७ | ७ | ९ | ३२ | २२ | ३५ | २१ | १६ | २२ |
| ३४ | १६ | ५० | १० | ५ | १० | ४० | ३० | ३७ | ५७ |
| ५९ | ७७५ | ४७ | ९० | ९ | ७१ | २ | ३ | ३ | १ |
| १७ | ४६ | ० | २ | ३१ | ५५ | १३ | ११ | २५ | २० |
| | द | द | द | द | द | उ | | द | उ |
| शर | २ | १ | १ | ० | ० | ० | | ० | ० |
| | २५ | १६ | ३१ | २४ | ५७ | ४५ | | ४२ | ४२ |

रा १शु ११मं २ गु ६ र १२च बु १० ३ ९ श ४ ६ ८ ५ने ७के

कोणत्याही कार्यास फाल्गुन महिन्यांतील सामान्यतः शुभदिवस. फा० शु० २-७-१०-११ कृ० ३-५-९-१३ हे दिवस चांगले आहेत.

पुण्यतिथिः—फा० कृ० ३ श्री छत्रपति शिवाजी महाराज जयंती. फा. कृ.९नानाफडणवीस निर्याणदिन फा०कृ०३०संभाजी महाराज निर्याणदिन

महयुतीः—बुध मंगळ ता १ मार्च रा० २-३० हर्षल चंद्र, ता० ३ पहाटे ५-३०, गुरु चंद्र ता० ७ सायं.७-३० नेपच्यून चंद्र ता.११ सकाळी १०-३०, शुक्र हर्शेल ता० २१ दु० २-३०, शनि चंद्र ता० २२ रात्री ४-३०, मंगळ चंद्र ता० २७ रात्री ९-३०,बुध चंद्र ता० २९ रात्री ४-३०, हर्शेल चंद्र ता० ३० दु० २-३०.

फा.शु.१५—रवि उत्तराभाद्रपदा१ चरण.चंद्र पूर्वा४ चरण.मंगळ शततारका२ चरण.बुध शततारका४चरण.गुरु रोहिणी४चरण शुक्र उत्तराभाद्रपदा१चरण. शनि पूर्वाषाढा३चरण.राहु भरणी १ चरण.हर्शेल रेवती २चरण.नेपच्यून मघा ४चरण.

फा.कृ.३०—रवि रेवती १ चरण. चंद्र रेवती१ मंगळ पूर्वाभाद्रपदा १ चरण बुध रेवती २ चरण.गुरु रोहिणी ४ चरण. शुक्र अश्विनी१ चरण. शनि पूर्वाषाढा ३ चरण. राहु भरणी १ चरण. हर्शेल रेवती २ चरण. नेपच्यून मघा ४ चरण.

## पंचांग म्हणजे काय व तें कसें पाहावयाचें यासंबंधीं सर्वसामान्य माहिती.

तिथि वारं च नक्षत्रं योगं करण मेव च । एतैः पंचभिरंगैः संयुतं पंचांगमुच्यते ।
ग्रह–ग्रहण–संक्रांतिर्विषुवादि दिनस्तथा । अस्तोदय युतिर्येषां विशेषांगं च शाश्वतः॥

तिथि, वार, नक्षत्र योग आणि करण हीं काळाचीं पांच अंगें आणि ग्रहांची सूक्ष्मस्थिति–ग्रहणें–उदयास्त–संक्रांति–विषुवदिवस, युति इत्यादि विशेष गोष्टी ज्यांत दिलेल्या असतात त्यास पंचांग असें म्हणतात. पंचांगांतील महत्त्वाच्या गोष्टी दर्शविणारा एक सामान्य श्लोक वर दिला आहे.

तिथीसंबंधीं:—कोणतेंही पंचांग उघडलें असतां त्यांत पहिल्या कोठ्यांत १–२–३ असे आंकडे असतात. त्या तिथी होत. ह्या ओळींत शुक्लपक्षांत १५ व कृष्णपक्षांत १५ याप्रमाणें एक महिन्यांत ३० तिथी असतात.

तिथि म्हणजे रविचंद्र यांचे १२ अंश अंतर व त्यास लागणारा जो काल तो.

शुक्लपक्ष म्हणजे पांढरा ( अर्थात् चंद्राच्या वाढीचा ) पंधरवडा. कृष्णपक्ष म्हणजे काळोख असणारा पक्ष. शुक्लपक्षाच्या १५ व्या तिथीस पौर्णिमा व कृष्णपक्षाच्या १५व्या तिथीस अमावास्या म्हणतात.

प्रतिपदा, द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी, सप्तमी, अष्टमी, नवमी, दशमी, एकादशी, द्वादशी, त्रयोदशी, चतुर्दशी, पौर्णिमा या शुक्लपक्षांतील १५ तिथि व याप्रमाणेंच कृष्णपक्षाच्या प्रतिपदादि तिथि असून शेवटची तिथि अमावास्या. अमावास्या म्हणजे सूर्यचंद्र एकत्र असणारा दिवस व पौर्णिमा म्हणजे सूर्यचंद्र समोरासमोर असणारा दिवस.

कोणत्याही शुक्ल. १ पासून सूर्यास्तानंतर चंद्र सुमारें दोन दोन कलांनीं वाढतो व कृष्ण प्रतिपदेपासून २।२ कला कमी होतो. तिथि ही सूर्यचंद्राच्या गति–स्थितीवर अवलंबून असल्याकारणानें नेहमीं बरोबर सूर्योदयालाच तिथि सुरू होऊन दुसऱ्या दिवशीं सूर्योदयाला ती तिथि संपावयाची व दुसरी तिथि सुरू व्हावयाची असें घडत नाहीं. तर सूर्यचंद्राच्या स्थितीप्रमाणें तिथींची घ. प. येतात व त्याप्रमाणें तिथीचा आरंभ होतो. पंचांगांतील तिथीचा आंकडा सूर्योदयास असलेल्या तिथीचा असतो. जुन्या रूढीच्या ग्रहलाघवी गणिताप्रमाणें एक तिथि जास्तींत जास्त सुमारें ६५ घटिकापर्यंत व कमींत कमी ५४ घटिकापर्यंत येते. व ह्यालाच ते "बाणवृद्धीरसक्षयः" असें वचन सांगतात. पण हें वचन कोणत्याच सिद्धांतांत नाहीं. सूक्ष्म व शुद्धगणिताप्रमाणें एक तिथि जास्तींत जास्त सुमारें ६८ घटका व कमींत कमी ५० घटिका "अष्टवृद्धिर्दशक्षयः" अशी येते. ( हें लक्षांत ठेवावें कीं, तिथि कितीही कमजास्त येवो, एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंत ६० घटिका काल जावयाचा. ) वाढलेल्या तिथीस वृद्धि व कमी आलेल्या तिथीस क्षय असें म्हणतात. पंचांगांत एखाद्या तिथीचे दोन दोन आंकडे दिलेले असतात, त्या वेळीं ती तिथि वृद्धि झालेली असते. एखाद्या तिथीचा आंकडा मुळींच नसतो, त्या वेळीं त्या तिथीचा क्षय झाला आहे असें समजावें.

कोणत्याही दिवशीं सूर्योदयाला जी तिथि स्पर्श करीत असेल तिचा दर्शक आंकडा पहिल्या कोठ्यांत देतात व जी तिथि कोणत्याही दिवशीं सूर्योदयाला स्पर्श करीत नसेल तिचा दर्शक आंकडा मुळींच दिलेला नसतो. व त्यालाच क्षयतिथि म्हणतात. पंचांगात क्षयतिथीचा आंकडा मुळींच दिलेला नसतो, म्हणून ती तिथि मुळींच नसते अगर वृद्धि तिथीचा आंकडा दोनदां दिलेला असतो, म्हणून सबंध दोन दिवस ती तिथि असते असातला प्रकार नाहीं. तर त्याचा अर्थ इतकाच कीं, क्षयतिथि कोणत्याही सूर्योदयाला नसते व वृद्धितिथि दोन दिवस सूर्योदयाला असते. तिथीवर धार्मिक कार्ये बरीचशीं अवलंबून असल्यानें ही तिथींची माहिती प्रत्येकास पाहिजे. कोणतें धर्मकार्य कोणत्या वेळीं करावें याबद्दल धर्मशास्त्रग्रंथांत निर्णय दिला असून त्यांनी दिवसाने ५ भाग मानले आहेत. ते ( १ ) प्रातःकाळ, ( २ ) संगवकाळ, ( ३ ) माध्यान्हकाळ, ( ४ ) अपराण्हकाळ व ( ५ ) सायंकाल याप्रमाणें अनुक्रमें समजावें. दिनमानाचे ५ भाग करून सूर्योदयापासून पुढें तितक्या घटिकांचा एकेक काळ अनुक्रमें समजावा. कल्पना करा कीं, पंचांगांत चैत्र शुद्ध ९ शुक्रवारीं ७ घटिका असून चै. शु. ८ गुरुवारीं फक्त ४ घटिकाच आहे; तर

रामनवमी कोणत्या दिवशीं करावयाची ? रामनवमी माध्यान्हव्यापिनी घ्यावी असा निर्णय असल्यानें चैत्र शु. ८ गुरुवारचे दिवशींच माध्यान्हव्यापिनी नवमी आहे. अर्थात् रामनवमी गुरुवारींच आली. याप्रमाणें संकष्टी चतुर्थी, एकादशी, प्रदोष, गोकुळअष्टमी, दसरा, पाडवा, गणेशचतुर्थी, ऋषिपंचमी, अनंतचतुर्दशी वगैरे महत्वाच्या गोष्टींचा निर्णय करावा लागतो व त्याबद्दलचे शास्त्रार्थही निरनिराळे आहेत. कोणती तिथि किंवा नक्षत्र किती येतें हें सांगण्याचें काम ज्योतिषशास्त्राचें व सूक्ष्म गणिताचें आणि एकादशी कधीं, प्रदोष कधीं, दसरा कोणत्या दिवशीं इत्यादि निर्णय करण्याचें काम धर्मशास्त्राचें अशी वस्तुस्थिति असल्यानें सूक्ष्म गणिताचा व धर्मशास्त्राचा कधींही विरोध येत नाहीं. कधीं कधीं दोन दोन सण येतात, त्याचें मुख्य कारण जुन्या पंचांगातील तिथि १०–१२ घटकापर्यंत स्थूल असतात व शुद्ध पंचांगातील तिथि सूक्ष्म असतात हेंच होय. दोन पंचांगातील तिथींच्या घटिकापळांत १० घटका अंतर असल्यामुळें शास्त्रार्थांत फरक पडतो व त्यामुळें सण दोन येतात. याचें स्पष्टीकरणार्थ एक उदाहरण देतों. कल्पना करा कीं, शुद्धपंचांगातील भाद्रपद कृ. ३० गुरुवारीं ५ घटिका असून त्याच दिवशीं आश्विन शु. १ चा क्षय आहे व आश्विन शु. २ शुक्रवारीं ५१ घटिका आहे तेव्हां नवरात्रारंभ कधीं करावयाचा ? याचा शास्त्रार्थ असा कीं, ज्या दिवशीं सूर्योदयाला प्रतिपदा असेल त्या दिवशीं नवरात्रारंभ करावा. पण वरील दोन्ही दिवशीं सूर्योदयाला प्रतिपदा मुळींच नाहीं. गुरुवारीं सूर्योदयाला प्रतिपदा नसली तरी ५ घ. नंतर सबंध दिवस प्रतिपदा आहे, शुक्रवारीं प्रतिपदा मुळींच नाहीं. त्यामुळें शुद्ध-पंचांगाप्रमाणें नवरात्रारंभ गुरुवारींच आला. आतां हेंच उदाहरण जुन्या रूढीच्या पंचांगाप्रमाणें सोडवूं. कल्पना करा कीं, जुन्या पंचांगांत भाद्रपद कृ. ३० गुरुवारीं ६ घटका असून शुक्रवारीं प्रतिपदा १ घटिका आहे व द्वितीयेचा क्षय आहे, तेव्हां नवरात्रारंभ केव्हां करावयाचा ? जुन्या पंचांगांत शुक्रवारीं सूर्योदयाला प्रतिपदा असल्यानें शुक्रवारीं नवरात्रारंभ आहे हें स्पष्ट झालें. वरील एकाच उदाहरणांत शुद्ध पंचांगाप्रमाणें नवरात्रारंभ गुरुवारीं आला व जुन्या रूढीच्या पंचांगाप्रमाणें शुक्रवारीं आला. याचें कारण तिथींच्या घटिकामध्यें दोन पंचांगांत फरक हेंच होय. ज्या ज्या वेळीं सण वगैरे दोन दोन दिवस आलेले आढळतात त्या त्या वेळीं अशा फरकामुळेंच ते तसे येतात आणि म्हणूनच सर्वांनीं शुद्ध पंचांगाचें आचरण करणें जरूर आहे. कारण जुनें पंचांग व त्यांतील तिथिनक्षत्रें व त्यांची घटिका पळें स्थूल आहेत हें सर्वानुमतें सिद्ध झालें असल्यामुळें अशा स्थूल घटिकेवरून केलेला निर्णय चुकीचाच याबद्दल वाद नाहीं.

**वारासंबंधीं:**—पंचांगांत तिथीच्या सदरापुढें वार दिलेला असतो. रवि, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि हा वारांचा अनुक्रम असून हा अनुक्रम सर्व जगांत चोहोंकडे एकच आहे, हें ध्यानांत ठेवावें. हिंदुस्थानांत आज शनवार असला तर युरोपांत गुरुवार असें मुळींच नाहीं, तर चोहोंकडे शनवारच असावयाचा. ज्यानें ही वारांची पद्धत व अनुक्रम सुरू केला त्यानें सर्व जगांत ही केवढी तरी संघटना करून ठेवली आहे "उदयात् उदय वारः" म्हणजे एका सूर्योदयापासून पुन्हा सूर्योदयापर्यंतचा जो काल त्यास वार असें म्हणतात वाराच्या पुढें दोन कोठ्यांत तिथींचीं घटिकापळें असतात. म्हणजे म. सूर्योदयापासून तितक्या घटिपळापर्यंत ती तिथि असते. त्याच्या पुढील कोठ्यांत नक्षत्राचें आद्याक्षर दिलेलें असतें.

**वार म्हणजे दिवस**—वार म्हणजे अहोरात्र, वार म्हणजे एका सूर्योदयापासून पुन्हा सूर्योदय होईपर्यंतचा काल, वार म्हणजे सामान्यत. २४ तासांचा किंवा ६० घटिकांचा काळ. येथें सामान्यतः असें म्हणण्याचें कारण कीं, वार म्हणजे दिवस हा नेहमीं २४ तासांचाच असतो असें नाहीं. कधीं कधीं तो २४ तासांचा असतो, कधीं २३ तास ५९ मिनिटांचा असतो तर कधीं २४ तास आणि १ मिनिटांचा असतो. अर्थात् २४ तासांपेक्षा १ मिनिट कमी अगर १ मिनिट जास्ती असा दिवस बऱ्याच वेळां येत असल्यानें त्याचें सामान्य मान २४ तास असें मानण्यांत येतें सर्व लोकांची समजूत कोणताही दिवस २४ तासांचा असतो अशी आहे याचें कारण तरी दिवसाचें सामान्य मान २४ तास हें आहे हेंच होय. पण शास्त्र शुद्ध विचार करतांना व शास्त्रीयदृष्ट्या कोणीं विचारलें असतां दिवस बरोबर २४ तासांचाच असतो असें केव्हांही म्हणतां येणार नाहीं.

**उदयात् वार प्रवृत्ति**—म्हणजे वाराचा आरंभ सूर्योदयापासून होतो. आणि ज्या वेळीं वार आणि वेळ यांचा उल्लेख करावयाचा असतो त्या वेळीं सूर्योदयापासून सुरू झालेला वार देऊन नंतर वेळ दर्शवितात.

इंग्रजी पद्धतीनें मात्र रात्रौ १२वाजता तारीख व वार एकदमच बदलतो. मुसलमानी वार सूर्यास्तापासून सुरू होतो. म्हणजे आपली जी गुरुवारची रात्र ती मुसलमानाची शुक्रवारची रात्र दिवस मात्र दोघाचाही गुरुवार एकच.

नक्षत्रासंबधीं —नक्षत्राची व्याख्या शास्त्रकारानीं " न क्षरति तत् नक्षत्र " म्हणजे जें ढळत नाहीं, जें अचल आहे, स्थिर आहे, तें नक्षत्र. अशी केली आहे. नक्षत्रें २७ असून त्यांचा अनुक्रम येणेंप्रमाणें— ( १ ) अश्विनी ( २ ) भरणी ( ३ ) कृत्तिका ( ४ ) रोहिणी ( ५ ) मृग ( ६ ) आर्द्रा ( ७ ) पुनर्वसु ( ८ ) पुष्य ( ९ ) आश्लेषा ( १० ) मघा ( ११ ) पूर्वा ( १२ ) उत्तरा ( १३ ) हस्त ( १४ ) चित्रा ( १५ ) स्वाती ( १६ ) विशाखा ( १७ ) अनुराधा ( १८ ) ज्येष्ठा ( १९ ) मूळ ( २० ) पूर्वाषाढा ( २१ ) उत्तराषाढा (उत्तरा षा. चतुर्थचरण व श्रवणाचा प्रथम १/१५ भाग यास अभिजित् म्हणतात ) (२२) श्रवण ( २३ ) धनिष्ठा ( २४ ) शततारका ( २५ ) पूर्वाभाद्रपदा ( २६ ) उत्तराभाद्रपदा ( २७ ) रेवती. नक्षत्र म्हणजे राशिचक्राच्या आरंभस्थानापासून १३ अं २० कलाचा क्रांतिवृत्तातील एकेक भाग, असे २७ भाग. व चंद्रास व ग्रहास १३ अंश २० कला जावयास लागणारा काल. पंचांगात दररोजचीं नक्षत्रें असतात. त्यास चंद्रनक्षत्रें अगर दिननक्षत्रें म्हणतात. कारण त्या दिवशीं चंद्र त्या नक्षत्रतारकासमीप अगर त्या नक्षत्राच्या मर्यादेंत असतो. नक्षत्राच्या कोठ्यापुढें त्या नक्षत्राची घ. प. दिलेली असतात. अर्थातच तीं म. सूर्योदयापासून असतात. तिथिप्रमाणेंच नक्षत्रांची क्षयवृद्धि होत असून काहीं सणाचें शास्त्रार्थ नक्षत्रावरून घावे लागतात नक्षत्रें आणि ग्रह म्हणजे फलज्योतिषशास्त्र व भविष्यनिर्णय या कार्यांतील मूळ आधार. तेव्हा नक्षत्रांचें गणित फार सूक्ष्म असावें लागतें. लो. टिळकाच्या शुद्ध निरयन पंचांगातील सूक्ष्म गणिताइतकी सूक्ष्मता जुन्या पद्धतीच्या कोणत्याही पंचांगात नाहीं, इतकेंच नव्हे तर जुन्या ग्रह लाघवी व केतकी पंचांगातील नक्षत्रें १५ ते २५ घटिकापर्यंत नेहमीं चुकलेलीं असतात. त्यामुळें फलज्यो तिषदृष्ट्या आणि भविष्यनिर्णयाच्या सूक्ष्म - घनाचें वेळीं तीं पंचांगें अगदीं निरुपयोगी होत. कारण जुन्या व केतकी पंचांगातील आरंभस्थान सुमारें ४।-४॥ चुकलें आहे व त्यामुळें नक्षत्रात मकताच फरक पडून तीं निरुपयोगीं झालीं आहेत. ज्याना खरोखर शुभ व्हावयास पाहिजे असतील व अशुभ गोष्टी टाळा ल्या अशी इच्छा असेल त्यानीं टिळकाच्या शुद्ध पंचांगाती ल नक्षत्रावरच आपलीं धर्मकृत्यें व इतर धार्मिक, ऐहिक व पारमार्थिक सुखाच्या गोष्टी केल्या पाहिजेत.

आरंभस्थानातील ह्या ४। ४॥ अशाच्या केतकी, ऐनयव५ व ग्रहलाघवी पंचांगातील चुकीमुळें ( अधिक मासामध्यें अंतर ) विशेषत सूर्याच्या प्रत्येक संक्रातींत सुम. दिवसाची चूक येते आणि ह्याच कारणानें त्या संक्रातीच्या नंतर जुन्या पंचांगाच्या संक्राति ४ [६-४॥ नीं येतात. ह्या संक्रातीच्या फर कामुळें अधिकमास भिन्न भिन्न होतात. व सर्वत्र घोंटाळा माजून जातो. याचे कारण स्थूलपंचांगातील चुकी व स्थूलता हेंच आहे. ही स्थूलता काढून टाकली म्हणजे संक्राति व क्रमास शुद्ध निरयन पंचांगा प्रमाणेंच सर्वत्र येणार यांत शंका नाहीं.

राशिचक्राच्या आरंभ स्थानावर ग्रहाची राश्यंतरेंही अवलंबून अस ग्रहाच्या राश्यंतरात ८दिवसापासून ३महिन्यापर्यंत चूक पडते. व चंद्रावमुळें जुन्यापंचांगातील पंचांगातील आठव्या कोठ्यात योग व त्यापुढील दोन कोठ्यात योगाचीं घासापर्यंत चूक आहे योग म्हणजे रवि-चंद्रगतीच्या बेरजेस १३ अंश २० कला जावयास लागणारा काल ( तिथीं नक्षत्रात, योगात, करणात आणि वारात शुभ आणि अशुभ असे दोन भाग असून दिलेली असतात आहेत. ) योगही २७ च आहेत, ते येणेंप्रमाणें —[ १ ] विष्कंभ [ २ ] प्रीति [ ३ ] आयुष्मान् [ ४ ] सौभाग्य [ ५ ] शोभन [ ६ ] अतिगंड [ ७ ] सुकर्मा [ ८ ] धृति [ ९ ] शूल [ १० ] गंड [ ११ ] वृद्धि [ १२ ] ध्रुव [ १३ ] व्याघात [ १४ ] हर्षण [ १५ ] वज्र [ १६ ] सिद्धि [ १७ ] व्यतिपात [ १८ ] वरीयान् [ १९ ] परिघ [ २० ] शिव [ २१ ] सिद्ध [ २२ ] साध्य [ २३ ] शुभ [ २४ ] शुक्ल [ २५ ] ब्रह्मा [ २६ ] ऐंद्र [ २७ ] वैधृति

योगाच्या घ. पळाच्या पुढील कोठ्यात करण दिलेले असतात. करण म्हणजे तिथीचा अर्धा भाग. एका तिथींत ठराविक दोन करण होतात. तिथीच्या पूर्वार्धी पहिला व उत्तरार्धी दुसरा. करणांचे ११ कोष्टक येणेंप्रमाणें.—

## करणादिग्दर्शन.

| शुक्लपक्ष | पूर्वार्ध | उत्तरार्ध | कृष्णपक्ष | पूर्वार्ध | उत्तरार्ध |
|---|---|---|---|---|---|
| प्रतिपदा | किंस्तुघ्न | बव | प्रतिपदा | बालव | कौलव |
| द्वितीया | बालव | कौलव | द्वितीया | तैतिल | गर |
| तृतीया | तैतिल | गर | तृतीया | वणिज | विष्टि |
| चतुर्थी | वणिज | विष्टि | चतुर्थी | बव | बालव |
| पंचमी | बव | बालव | पंचमी | कौलव | तैतिल |
| षष्ठी | कौलव | तैतिल | षष्ठी | गर | वणिज |
| सप्तमी | गर | वणिज | सप्तमी | विष्टि | बव |
| अष्टमी | विष्टि | बव | अष्टमी | बालव | कौलव |
| नवमी | बालव | कौलव | नवमी | तैतिल | गर |
| दशमी | तैतिल | गर | दशमी | वणिज | विष्टि |
| एकादशी | वणिज | विष्टि | एकादशी | बव | बालव |
| द्वादशी | बव | बालव | द्वादशी | कौलव | तैतिल |
| त्रयोदशी | कौलव | तैतिल | त्रयोदशी | गर | वणिज |
| चतुर्दशी | गर | वणिज | चतुर्दशी | विष्टि | शकुनि |
| पौर्णिमा | विष्टि | बव | अमावास्या | चतुष्पाद | नाग |

शुक्लप्रतिपदेपासून कृ. ३० पर्यंत प्रत्येक तिथीस कोष्टकांत दिल्याप्रमाणें त्या तिथीच्या पूर्वार्धी व उत्तरार्धी करण नियमानें येतात. कृ. १४ च्या उत्तरार्धी शकुनि, अमावास्येच्या पूर्वार्धी "चतुष्पाद" व उत्तरार्धी "नाग" शुद्धप्रतिपदेच्या पूर्वार्धी "किंस्तुघ्न" असे स्थिर करण येतात.

( १ ) बव ( २ ) बालव ( ३ ) कौलव ( ४ ) तैतिल ( ५ ) गर ( ६ ) वणिज ( ७ ) विष्टि (८) शकुनि ( ९ ) चतुष्पाद ( १० ) नाग ( ११ ) किंस्तुघ्न. करणाच्या पुढें त्यांची घ. प. दिलेली असतात.

याप्रमाणें पंचांगांतील मुख्य पांच अंगाचें अगदीं सामान्यतः स्पष्टीकरण आहे. आतां पंचांगांतील इतर गोष्टी सांगतों.

करणाच्या घटकाच्या पुढील कोष्ट्यांत दिनमान आणि त्याच्या पुढील एक एक कोष्ट्यांत फारशी, इंग्रजी वगैरे तारखा व त्यानंतरच्या २ कोठ्यांत रविउदय आणि रविअस्तकाल स्टँ. टाईमप्रमाणें दिलेले असतात. शेवटच्या कोठ्यांत त्या दिवशीं चंद्र कोणत्या राशींत आहे याचें स्पष्टीकरण असतें. त्या दिवशीं चंद्र बदलत असल्यास तो किती घटकांनीं कोणत्या राशींत जातो हें देतात. यानंतर त्या त्या दिवशींचे शास्त्रार्थ आणि ग्रहांचें राश्यंतर, संक्रांति, ग्रहांचे उदयास्त, भद्राप्रवृत्ति–निवृत्ति, सूर्यनक्षत्रें, दग्धयोग, अमृतसिद्धियोग, मृत्युयोग, घबाडयोग वगैरे योगाची आरंभ व समाप्ति वेळ देतात. हे योग तिथि, नक्षत्र आणि वार या तीन गोष्टींनीं मिळून होतात. कोणत्या तिथीस कोणतें नक्षत्र व वार असतां कोणता योग होतो हे अन्यत्र पहावें. अमृतसिद्धीयोग, घबाडयोग हे व्यापारास व इतर कार्यांस शुभ व मृत्युयोग हा कोणत्याही कार्यांस अशुभ.

आपल्या पंचांग पद्धतिप्रमाणें वार व दिवस सूर्योदयीं बदलतो. पण इंग्रजी पद्धतिप्रमाणें तारीख व वार रात्रौ १२ वाजतां बदलतो. पंचांगांत जी तारीख दिलेली असते ती त्या दिवशीं रात्रीं १२ वाजेपर्यंतची समजावी. कित्येक वेळां जन्म टिपणें किंवा जन्म वेळा लिहून ठेवतांना रात्रौ १२ नंतर जन्म झाला असतांही पंचांगांतील तारीखच लिहिण्यांत येते व मग घोटाळा होतो. करितां ही गोष्ट जरूर ध्यानांत ठेवून पहाटे किंवा रात्रौ १२ नंतर केव्हांही जन्म अगर महत्वाची कोणतीही गोष्ट घडल्यास उजाडतां वार अमुक असें लिहिणें योग्य आहे.

पंचांगांत उजव्या हाताच्या कोंपऱ्यांत कुंडली दिलेली असते व त्याच्यावर स्पष्ट ग्रह दिलेले असतात. ते शुक्लपक्ष असल्यास पौर्णिमेचे व कृष्णपक्ष असल्यास अमावास्येचे म. अ.स्प. सूर्योदयकालाचे असतात. स्पष्ट ग्रहाच्या कोठ्यांत ग्रहाखालीं अनुक्रमें ४ आंकडे असतात. ते राशि, अंश कला व विकला याप्रमाणें समजावे व त्याच्याच खालीं त्या ग्रहाची दिनगती दिलेली असते ती कला आणि विकलात्मक समजावी. व 'व' म्हणजे तो ग्रह वक्री आहे. पौर्णिमा व अमावास्या यांना पर्व किंवा अवधि म्हणतात.

कोणत्याही करणग्रंथावरून प्रथम रविचंद्रादि तयार करतात व नंतर त्यावरून तिथि, नक्षत्र, योग आणि करण हीं पंचांगापैकीं चार अंगें तयार होतात. पंचांग तयार करण्याच्या सुलभ अशा कांहीं सारिण्या केलेल्या असतात. पण त्यावरून केलेलीं पंचांगें करणग्रंथागत ग्रहावरून केलेल्या पंचांगावेक्षां स्थूल असतात आणि त्यामुळेंच सूक्ष्म ग्रहस्थितीकरितां व सूक्ष्मकाल दिग्दर्शनाकरितां पंचांग हें कोणत्याही सर्वमान्य सूक्ष्म करणग्रंथावरून करावें लागतें.

करणग्रंथावरून दैनिक रविचंद्र तयार झाले म्हणजे ज्याप्रमाणें तिथि नक्षत्रादिकांचे काल काढतां येतात, त्याप्रमाणेंच आयतें तयार असलेलें पंचांग घेतलें असतां त्यांतील तिथिनक्षत्रादिकांवरून रवि-चंद्राची स्थिति काढतां येते.

ज्या वेळीं अमावास्येचा अंत होतो त्यावेळीं रवि आणि चंद्र हे दोन्हीही राशि, अंश, कला, विकलात्मक अगदीं एकसारखे असतात, त्याच प्रमाणें ज्यावेळीं पौर्णिमेचा अंत होतो त्यावेळीं रवि आणि चंद्र या दोघांत बरोबर १८० अंश अर्थात् ६ राशि अंतर असतें.

पंचांगांत तिथि आणि नक्षत्र समाप्त केव्हां होतें हें वाराच्यापुढें घटिपलात्मक दाखविलें असतें. त्यावरून नक्षत्राच्या घटिपळांच्या आधारें स्पष्टचंद्र सहज साधितां येतो.

राशिचक्राच्या आरंभस्थानापासून १३ अंश आणि २० कलांचें एक, अर्थे ताराप्रधान विभागात्मक नक्षत्र असतें. याप्रमाणें सबंध राशिचक्राच्या ३६० अंशांत २७ नक्षत्रें पूर्ण होतात. पंचांगांत नक्षत्राचा समाप्तिकाल दररोजच्या मध्यम अगर स्पष्ट सूर्योदयापासून अमुक घटका व अमुक पळानें आहे हें स्पष्टपणें देतात समाप्तीच्या वेळीं स्पष्टचंद्र किती आहे हें तावढतेच लक्षांत येतें.

अश्विन्यादि २७ नक्षत्रांच्या समाप्तिकालीं स्पष्टचंद्र राशि, अंश कलात्मक किती असतो हें कोष्टक-रूपानें खालीं दिलें आहे त्यावरून लक्षांत येईल.

नक्षत्रसमाप्तिकालीं चंद्राचे राशि, अंशादि खालीलप्रमाणें असतात व रवि–चंद्रांत योगा-पुढें दिलेलें अंतर पडलें म्हणजे तो योग पूर्ण होतो.

| चंद्र रा. अं. क. | नक्षत्र नाम | योग नाम | चंद्र रा. अं. क. | नक्षत्र नाम | योग नाम |
|---|---|---|---|---|---|
| ० १३ २० | अश्विनी | विष्कंभ | ६ २० ० | स्वाती | वज्र |
| ० २६ ४० | भरणी | प्रीति | ७ ३ २० | विशाखा | सिद्धि |
| १ १० ० | कृत्तिका | आयुष्मान् | ७ १६ ४० | अनुराधा | व्यतिपात |
| १ २३ २० | रोहिणी | सौभाग्य | ८ ० ० | ज्येष्ठा | वरीयान् |
| २ ६ ४० | मृग | शोभन | ८ १३ २० | मूळ | परिघ |
| २ २० ० | आर्द्रा | अतिगंड | ८ २६ ४० | पूर्वाषाढा | शिव |
| ३ ३ २० | पुनर्वसु | सुकर्मा | ९ १० ० | उत्तराषाढा | सिद्धि |
| ३ १६ ४० | पुष्य | धृति | ९ २३ २० | श्रवण | साध्य |
| ४ ० ० | आश्लेषा | शूल | १० ६ ४० | धनिष्ठा | शुभ |
| ४ १३ २० | मघा | गंड | १० २० ० | शततारका | शुक्ल |
| ४ २६ ४० | पूर्वा | वृद्धि | ११ ३ २० | पू. भाद्रपदा | ब्रह्म |
| ५ १० ० | उत्तरा | ध्रुव | ११ १६ ४० | उ. भाद्रपदा | ऐंद्र |
| ५ २३ २० | हस्त | व्याघात | १२ ० ० | रेवती | वैधृति |
| ६ ६ ४० | चित्रा | हर्षण | | | |

ह्या रीतीनें शके १८५१ वैशाख कृ. १ चा स्पष्टचंद्र काढू —

त्या दिवशीं म. सूर्योदयापासून ५५ घ ७ पळांनीं ज्येष्ठा नक्षत्र संपतें. ज्येष्ठा नक्षत्र संपतांच स्प. चंद्र ८ रा. ० अं. ० क. असतो. अर्थात् नक्षत्र समाप्तीचे वेळीं. स्प. चंद्र ८ रा. ० अं. ० क. इतका पाहिजे.

तिथींसंबंधींही याचप्रमाणें पहातां येतें. त्यांत प्रथमतः नक्षत्रावरून तिथिसमाप्तीच्या वेळचा स्पष्टचंद्र काढावा. अमावास्या पूर्ण झाल्यानंतर रविचंद्रांत १२ अंश अंतर पूर्ण झालें म्हणजे १ तिथि पूर्ण होते. म्हणून इष्ट तिथि पूर्ण होण्यापर्यंतच्या तिथिपर्यंत रविचंद्रांतील अंतर किती होतें हें पहावें. इष्ट दिवसाच्या नक्षत्रावरून काढलेल्या स्पष्टचंद्रावरून तिथ्यंतीचा चंद्र तयार करावा. तो असा.—नक्षत्रसमाप्तीच्या पूर्वी जर तिथिसमाप्ति होत असेल तर नक्षत्रांतींच्या स्पष्टचंद्रांतून नक्षत्रकाल व तिथिकाल यामधील अंतरास येणारें चंद्राचें फल वजा करावें व नक्षत्र समाप्तीनंतर तिथिसमाप्ति असेल तर अंतराचें फल मिळवावें. म्हणजे तिथ्यंतींचा चंद्र येतो. त्यातून त्या पूर्ण तिथीपर्यंत १ तिथीस १२ अंशप्रमाणें येणारे अंशादि स्पष्ट चंद्रातून वजा करावे म्हणजे स्पष्ट रवि येईल.

( इष्ट दिवशींच्या नक्षत्रारंभापासून त्या नक्षत्रसमाप्तीपर्यंत एकंदर घटिकापळें काढून तितक्या घटिका पळांस १३अं.२०क. अर्थात् ८०० कला चंद्रगति आली असे समजावें व त्यावरून १ घटिकेची गति काढून ( अशी ६० घटिकाची गति म्हणजे दिनगति ) नक्षत्रसमाप्तिकाल व तिथ्यंतकाल यांच्यामधील अंतराचें फल काढावें व तें वर सांगितल्याप्रमाणें वजा करावें अगर मिळवावें. )

उदाहरणार्थ शके १८५१ फाल्गुन शु ३ सोमवार ह्या दिवशींचा तिथ्यंतीचा स्पष्ट रविचंद्र काढू. तृतीया ४० घ. ३१ पळांनीं संपते व रेवती नक्षत्र ४३ घ १२ पळांनीं संपते ह्यावरून ४३ घ. १२ पळें यावेळीं चंद्र मीन राशींत पूर्ण होऊन मेष राशींत जाणार म्हणजे तिथ्यंतानंतर सुमारें २॥ घटिकांनीं चंद्र १२ राशींत पूर्ण होणार सबब १२ राशींतून २॥ घटिकांची चंद्रगति सुमारें अर्धा अंश वजा केला असतां तिथिसमाप्ति कालीं स्पष्ट चंद्र ११ राशी २९॥ अंश आला.

तिथ्यंतीचे वेळीं म्हणजे तृतीया समाप्ति कालीं रवि चंद्रांत ३६ अंशाचें अंतर पाहिजे याकरितां १ रा. ६ अं. स्पष्ट चंद्रातून वजा केले असता १० राशी २३॥ अंश इतका स्पष्ट रवि तिथ्यंत कालीं आला. असा हा पंचांगांतील तिथिनक्षत्राच्या घटिकांवरून स्पष्ट रवि चंद्र तयार करण्याचा आढावा आहे. पण हा पुष्कळांस माहीत नाहीं.

याप्रमाणें कोणत्याही दिवसाचें रविचंद्राचें स्पष्ट साधन करावें.

तिथि आणि नक्षत्रें हीं जशीं आकाशांत रविचंद्रावरून प्रत्यक्ष दाखवितां येतात. तशा तारखा दाखवितां येत नाहींत. वैदिक अथवा भारतीय पंचांग हें आकाशांतील प्रत्यक्ष ग्रहस्थिति दाखविणारा नकाशा आहे आणि त्यामुळेंच त्याचें महत्व सर्व कार्यांत विशेष आहे.

चंद्राची गति अत्यंत चंचल असते चंद्राची दैनिकगति कमींतकमी ११ अं. ५० कला व जास्तींत जास्त १५ अं. २० कला अशी सामान्यतः असते. शीघ्र गति असतां तिथिनक्षत्रादि काळ मध्यम मानापेक्षां कमी येतात व मंदगति असतां जास्त येतात.

ज्याप्रमाणें सूक्ष्म गणितानें येणाऱ्या प्रत्यक्ष अशा ग्रहाच्या राशिअंशात्मक स्थितीचें विशेष महत्व आहे त्याचप्रमाणें फलज्योतिषशास्त्रदृष्ट्या वार आणि नक्षत्रें यांचेंही महत्व अतिशय आहे. ज्यावेळीं जन्म कुंडलींतील कोणत्याही स्थानांत ग्रह नसतो अशा वेळीं त्या स्थानांत जें प्रबल नक्षत्र असतें त्याचाच परिणाम तीव्र स्वरूपांत व निरंतर घडतो पण ज्यावेळीं कोणत्याही स्थानांत ग्रह असतो त्यावेळीं नक्षत्रापेक्षां ग्रहाचेच परिणाम जास्त होतात. तीव्र नक्षत्रांत तीव्र ग्रह आणि सौम्य नक्षत्रांत सौम्य-शुभ-ग्रह बलवान् होतात.

वारासंबंधींही असाच प्रकार आहे सर्वांत विशेष वाराचें महत्व असें कीं वारासंबंधीं जगांत कोठेंही मतभेद नाहीं. वारांचिरतींच्या शुभाशुभत्वाप्रमाणें व बलाबलाप्रमाणें त्यांची अनुकूल प्रतिकूल फलें मिळतात.

पंचांगांत ग्रहाध्यायांच्या शरांत मृत्युयोग, यमघंटयोग, अमृतसिद्धियोग व दग्धयोग असे चार योग मामुल्यानें देण्यांत येतात. यमघंट व मृत्युयोग, नक्षत्र आणि वार यांवर अवलंबून असून दग्धयोग,

तिथि आणि वार यांवर अवलंबून आहे. मतांतरानें दग्धयोग, वार आणि नक्षत्रें यावरूनही घेतात. पण पंचांगांत दिलेला दग्धयोग तिथि व वारावरूनच दिलेला असतो. अमृतसिद्धियोग नक्षत्र व वार यांच्या अनुरोधानें असतात.

अद्याप कोणत्याही पंचांगांत नक्षत्रतारा आणि ग्रह यांच्या युत्या देण्यांत येत नाहींत. वास्तविक त्या युत्या दिल्या नाहींत तरीही त्या नक्षत्रतारकांशीं चंद्राची अगर ग्रहाची युती केव्हां होईल हे त्या ग्रहाच्या गतीवरून काढतां येईल. टळक नक्षत्रतारकेचे जे भोग तितक्या अंशांत कोणताही ग्रह आला असतां त्याची युति झाली असें समजावें. प्रत्येक नक्षत्रतारकांचे अर्थात् योगतारेचे भोग सिद्धांतग्रंथांत किंवा करण ग्रंथांत दिलेले असतात ते भोगांश आरंभस्थानापासूनचे असतात.

याशिवाय विष्टि (भद्रा) योग आणि घबाड हे योग दिलेले असतात. विष्टियोग प्रत्येक शुक्लपक्षाच्या चतुर्थीस व एकादशीस आणि कृष्णपक्षाच्या तृतीयेस व दशमीस तिथीच्या उत्तरार्धी निश्चितपणें असतो. आणि शुक्लपक्षाच्या अष्टमीस व पौर्णिमेस आणि कृष्णपक्षाच्या सप्तमीस व चतुर्दशीस तिथीच्या पूर्वार्धी नियमानें येतो. घबाड योगाची माहिती अन्यत्र दिली आहे.

याखेरीज (१) अमृत (२) सिद्धा (३) विष (४) अमिजिव्ह (५) क्रकच् (६) संवर्त (७) ज्वालामुख हे शुभाशुभ योग आहेत पण ते पंचांगांत दिलेले नसतात. सबब सर्व योगांचे कोष्टक खालीं देत आहों. ह्यावद्दलचे श्लोक पुढें देऊं.

## अमृता, सिद्धा इत्यादि विविधयोग.

| वार | रवि | चंद्र | मंगळ | बुध | गुरु | शुक्र | शनि | योगांचीं नांवें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| तिथि | १<br>६<br>११ | २<br>७<br>१२ | १<br>६<br>११ | ३<br>८<br>१३ | ४<br>९<br>१४ | २<br>७<br>१२ | ५<br>१०<br>१५।३० | अमृत |
| तिथि | | | ३<br>८<br>१३ | २<br>७<br>१२ | ५<br>१०<br>१५ | १<br>६<br>११ | ४<br>९<br>१४ | सिद्धा |
| नक्षत्र | हस्त | मृग | अश्वि | अनुराधा | पुष्य | रेवती | रोहिणी | अमृतसिद्धि |
| तिथि | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | |
| नक्षत्र | हस्त | मृग | अश्वि | अनुराधा | पुष्य | रेवती | रोहिणी | विषयोग |
| तिथि | ४ | ६ | ७ | २ | ८ | ९ | ७ | विषयोग |
| तिथि | १२ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | अमिजिव्हयोग |
| नक्षत्र | अनुराधा | उ षा | शततारका | अश्वि. | मृग | आश्लेषा | हस्त | मृत्युयोग |
| तिथि | १२ | ११ | १० | ९ | ८ | ७ | ६ | क्रकचयोग |
| तिथि | ७ | | | १ | | | | संवर्तयोग |
| तिथि | १२ | ११ | ५ | ३ | ६ | ८ | ९ | दग्धयोग |
| नक्षत्र | भरणी | चित्रा | उत्त षा | धनि | उत्त फ | ज्येष्ठा | रेवती | दग्धयोग. |
| तिथि | ३ | ४ | ८ | ९ | ५ | या योगांत वार संबंध नाहीं | | ज्वालामुख |
| नक्षत्र | अनुराधा | उत्त ३ | रोहिणी | कृत्तिका | मघा | | | |
| नक्षत्र | मघा | विशा | आर्द्रा. | मूळ | कृत्तिका | रोहिणी | हस्त | यमघंटयोग |

**सांप्रतच्या पंचांगांतील दोन प्रकार**—सांप्रत पंचांगांमध्ये दोन प्रकार दृष्टीस पडतात. शुद्ध-सूक्ष्म गणिताचा एक आणि जुन्या व स्थूल गणिताचा दुसरा. यांपैकीं पहिल्या प्रकारचें पंचांग शुद्ध-टिळक, पंचांग होय आणि दुसरें म्हणजे महाराष्ट्रीय पंचांग होय. केतकी, ऐवढभंक पंचांग हें अर्धवट पंचांग होय

तिथि व नक्षत्रें याची आकाशातील स्थिति कोणासही दाखविता व पाहतां येते कारण, तिथि म्हणजे रवि चंद्रात १२ अंश अंतर पडणें. हें अंतर अमावास्यापासून मोजावयाचें समग्र राशिचक्राचे ३६० अंश आहेत. कल्पना करा कीं, सूर्यास्ताचे वेळीं आपणांस चंद्र आकाशात अगदीं डोक्यावर दिसत आहे रवी-पासून चंद्र राशीचक्राचा ¼ भाग ( ९० अंश, ) पुढें आहे तेव्हा १ तिथीचें १२ अंशाप्रमाणें उघड झालें कीं, त्या दिवशीं शुद्ध अष्टमी असली पाहिजे.

## तिथिनक्षत्रांचा आकाशस्थ संबंध.

कोणत्याही महिन्याच्या शुद्ध प्रतिपदेपासून चंद्र कले कलेनें वृद्धिंगत होत्साता पौर्णिमेचे दिवशीं पूर्ण चंद्र दृष्टीस पडतो. याच्या उलट कोणत्याही महिन्याच्या कृष्ण प्रतिपदेपासून कलेकलेनें चंद्र क्षीण होत जाऊन अमावास्येच्या दिवशीं तो अजिबात दृष्टीस पडत नाहीं कारण तो रवीच्या अगदीं नजीक असतो. पाहणारास असें दिसून येतें कीं, शुक्ल प्रतिपदेच्या दिवशीं ( प्रतिपदा दिवसा संपली असेल तर ) चंद्रमा सूर्यास्ताचे वेळीं किंचित्काल उगवलेला दिसतो आणि थोड्याच वेळात तो दिसेनासा होतो सूर्यापासून चंद्राचें अंतर साधारणत. १२ अंश अगर १२ अंशापेक्षा जास्त झालें म्हणजे तो दृग्गोचर होतो याचा उघड अर्थ हा कीं, त्याचें दर्शन द्वितीयेंत होतें. पण कधीं कधीं ११॥ अंश अंतर असताही चंद्र दृष्टीस पडतो व चंद्र दर्शन होतें तथापि हा प्रकार सूक्ष्म गणितावेरीज कळणार नाहीं

रविपासून किती अंश अंतरावर चंद्र गेला असता त्याचे दर्शन होईल हे निरनिराळ्या सिद्धांताप्रमाणें खालीं दिले आहे.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मूळ सूर्यसिद्धान्त | १२ | अंश | प्रथमार्य सिद्धान्त | १२ | अंश |
| साम्प्रतचे सूर्यादि ५ सिद्धान्त | ,, | ,, | ब्रह्मगुप्त–सिद्धान्तशिरोमणी | ,, | ,, |
| लल्ल–करण कुतुहल | ,, | ,, | भा. ज्यो शास्त्र | ,, | ,, |
| द्वितीय आर्य सिद्धान्त | ,, | ,, | ज्योतिर्गणित | ,, | ,, |
| करणप्रकाश | ,, | ,, | करणकल्पलता | ,, | ,, |
| ग्रहलाघव | ,, | ,, | ज्यो. गं. वार्तिक | ,, | ,, |
| केरोपती ग्रहसाधन | ,, | ,, | भविष्यसिद्धांत | ,, | ,, |

प्राचीन व अर्वाचीन ग्रंथकारांचे मतें रवि-चंद्रातील अंतर १२ अंश पूर्ण असता चंद्रदर्शन होतें.

वर सांगितलें आहे कीं, शुक्ल प्रतिपदेपासून सूर्यास्ताचे वेळीं चंद्रदर्शन होतें व तो अनुक्रमें पश्चिमेकडून पूर्वेकडे येत आहे असें अनुक्रमानें दिसतें हा प्रतिपदेच्या दिवशीं पश्चिम क्षितिजाच्यावर चंद्र जेथें दिसतो त्याच्यापेक्षां वरच्या बाजूस द्वितीयेच्या दिवशीं दिसतो. तृतीयेच्या दिवशीं त्याच्याहीपेक्षां वर आकाशाच्या वरच्या बाजूस चंद्र दिसतो याप्रमाणें वाढत वाढत सप्तमी पूर्ण होऊन अष्टमीच्या अर्ध्या भागाचे वेळीं चंद्र बरोबर आकाशाचें मध्यभागीं म्हणजे आपल्या डोक्यावर दिसतो. आणि असाच वाढत जाऊन तो पौर्णिमेला सूर्यास्ताचे वेळीं पूर्वक्षितिजावर दृग्गोचर होतो.

कृष्णपक्षातील चंद्राची स्थिति याच्या उलट होते म्हणजे कृष्ण प्रतिपदेला सूर्यास्तानंतर सुमारें २ घटिकानीं पूर्वक्षितिजावर दृग्गोचर होतो आणि समग्र रात्रभर आकाशात दिसतो कृष्ण द्वितीयचे दिवशीं सुमारें ४ घटिकांनीं उगवतो व सुमारें १२ तासानीं पश्चिम क्षितिजावर मावळतांना दिसतो. याप्रमाणें अमावास्येपर्यंत सतत चालू राहतें अमावास्येला मात्र चंद्र उगवलेला बिल्कुल दिसत नाहीं. याचें कारण तो अत्यंत क्षीण, कलाहीन व निस्तेज असा असून रवीच्या अगदीं जवळ असतो हें होय. याप्रमाणें चंद्राची दैनिक आकाशस्थ स्थिति काय आहे, त्याचा उदय व अस्त केव्हां होत आहे यावरून तिथीची निश्चित स्थिति समजते. पूर्व क्षितिजापासून पश्चिम क्षितिजाचें आकाशमार्गी अंतर १८० अंश किंवा ६ घटी पूर्व अगर पश्चिम क्षितिजापासून आकाशस्थ खमध्य ९० अंश अगर तीन घटीवर आहे यानमाणें पूर्व क्षितिजापासून पश्चिम क्षितिजापर्यंत व मध्यापर्यंत अर्ध खस्तिकाचेंही अंतर आहे.

अशा प्रकारें चंद्रस्थितिवरून तिथीचें ज्ञान ज्याप्रमाणें होतें त्याप्रमाणें ज्या नक्षत्रात चंद्र असेल त्यावरून नक्षत्राचेंही ज्ञान होतें. यासंबधीचें विवेचन पुढें करू.

" न क्षरति तन्नक्षत्र " अशी नक्षत्राची व्याख्या आहे. आकाशात २७ नक्षत्रांच्या तारका आहेत; व त्या स्पष्टपणें दिसतात. नक्षत्रें म्हणजे काल्पनिक जागा नव्हे. एकदा सूर्योदय झाल्यापासून पुन्हां सूर्योदय होईपर्यंत २७ नक्षत्रांचा १ फेरा पूर्ण होतो, म्हणजे २४ तासात २७ नक्षत्रें पूर्वक्षितिजावर उदय पावतात व पश्चिम क्षितिजावर अस्तास जातात. ज्या नक्षत्रीं सूर्य असतो, तें नक्षत्र सूर्योदयकालीं पूर्व क्षितिजावर उदय पावतें, त्यानंतर सुमारें ५३॥ मिनिटांनीं त्याच्यानंतरचें नक्षत्र उदय पावतें याप्रमाणें क्रम चालतो. सूर्य कोणत्याही नक्षत्रात आल्यापासून दररोज सु. ४-४। मिनिटें पुढें सरकतो व याप्रमाणें सुमारें १३॥ दिवसात पुढील नक्षत्रांत जातो. २४ तासांत २७ नक्षत्रें अर्थात् दिवसा १३॥ व रात्रीं १३॥ नक्षत्रें उदयास्त पावतात. दिवसा सूर्याच्या तेजामुळें नक्षत्रें दिसत नाहींत, रात्रौ नक्षत्रतारका स्पष्ट दिसतात. नक्षत्रांवरून चैत्रादि मासाची नावें प्रचलित झाली आहेत. ज्या महिन्यात सबंध रात्रभर म्हणजे सामान्यतः सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंत चित्रा नक्षत्र, रात्रीचा बहुतेक सर्व काळ दृग्गोचर होतें तो चैत्रमास, त्याचप्रमाणें विशाखा-वैशाख, ज्येष्ठा-ज्येष्ठ, पू. किंवा उ. षाढा आषाढ, श्रवण-श्रावण, पू. किंवा उ. भाद्रपदा-भाद्रपद, अश्विनी-आश्विन, कृत्तिका-कार्तिक, मृग-मार्गशीर्ष, पुष्य-पौष, मघा-माघ, पू. किंवा उत्तरा फाल्गुनी-फाल्गुन, या प्रत्येक महिन्यांत बहुतवेळ सबंध रात्रभर तें तें नक्षत्र दिसतें. शिवाय त्या त्या महिन्याच्या पौर्णिमेस साधारणतः त्या नक्षत्राजवळ चंद्र असतो. कधीं १।२ नक्षत्रें मागें पुढेंही असतो.

पौर्णिमेस त्या त्या मास नक्षत्राजवळ चंद्र असावयाचा हा सामान्य व स्थूल नियम आहे. या नियमाप्रमाणें प्रत्येक महिन्यास नक्षत्र जुळेलच असें नाहीं. कांहीं कांहीं वेळ अलीकडील १-१॥ नक्षत्रावर पौर्णिमेस असतो. ज्या वर्षी अधिक मास येतो त्या वर्षी तर अधिक मासापूर्वी ४-५ महिने कोणत्याही पौर्णिमेस मास नक्षत्रावर चंद्र न येतां १-२ नक्षत्रें मागें पुढें राहतो. याचें कारण उघड आहे कीं, अधिक मास हा सौर चांद्र मानातील साचलेल्या कसरीचा असल्यानें त्याच्या पौर्णिमेस चंद्र कोणत्या तरी नक्षत्रावर असणारच व चंद्र तर दर महिन्यास सबंध राशीचक्र भोगून २-२॥ नक्षत्रें जास्त जातो. अशा परिस्थितीमुळें अधिक मासाचे पूर्वी ४-५ महिने व क्वचित नंतर १-२ महिने पौर्णिमा आणि मासनक्षत्र यात १-२ नक्षत्रें अंतर पडतें. पण ही कांहीं चूक नव्हे अगर अशुद्धताही नव्हे. ही स्थिति चंद्राच्या गतिस्थितिमुळें येते व केव्हांही येणारच. ज्यांना वस्तुस्थिति माहीत नसते त्यांचा याबद्दल गैरसमज होतो व त्यामुळें तें पंचांग चूक आहे असें म्हणू लागतात पण हा केवळ त्यांच्या अज्ञानाचा दोष होय. याखेरीज त्यात कांहीं तथ्य नाहीं. कोणतेंही पंचांग घेतलें तरी त्यात अशी स्थिति यावयाचीच.

**सूर्यसंक्रांतीचा संबंध जन्मलग्नाशीं अतिशय असतो इतकेंच नव्हे तर रवीच्या स्थितीवरच जन्मलग्न सर्वस्वीं अवलंबून आहे म्हणून सूर्याची स्थिति फारच सूक्ष्म पाहिजे**

पंचांगांतील दृक्प्रत्ययाच्या महत्वाच्या गोष्टी म्हणजे ग्रहणें, ग्रहांचे उदयास्त, संकष्टीचे चंद्रोदय-ग्रहांच्या युत्या आणि ग्रह व नक्षत्रतारायुति ह्या होत. त्यापैकीं संकष्टीचे चंद्रोदयाची माहिती सर्वांना असते. गुरुशुक्रादिकांचे उदयास्तही बऱ्याच लोकांस पाहण्याची सवय असते. उदयास्ताशीं रवि आणि उदय अगर अस्त होणारा ग्रह यांचाच संबंध आहे. सूक्ष्म गणितागत उदयास्त पंचांगांत दिलेले असतात पण आकाशांतील साभ्र अगर निरभ्रपणामुळें, मलीनपणामुळें, पाहणाऱ्याच्या दृष्टीच्या कमजास्त सीमतेमुळें किंवा मंदतेमुळें उदयास्ताची प्रत्यक्षस्थिति दृग्गोचर होण्यास केव्हां केव्हां १-२ दिवस आगें मागें होऊं शकतात. ज्याची तीव्र दृष्टी आहे व नेहमीं पाहण्याची सवय त्यास उदयास्त पंचांगांत दिलेल्या दिवशींच पार बारकाईनें पाहतां दिसूं शकतील. पण मंद दृष्टीच्या मनुष्यास त्या दिवशीं दिसणार नाहींत. १-२ दिवसांनीं दिसतील आणि म्हणूनच प्राचीन ग्रंथकारांनीं उदयास्ताच्या पूर्वीचे व नंतरचे ३ अगर ७ दिवस शुभ कार्यांस सोडण्यास सांगितले आहेत. व कारणमयांत म्हटलें आहे कीं—

॥ नगसो मास्ति-पादे ह्युदंष्टेरपाटवादपिच "काले हो मिथोऽरवः स्तरमाद्दोषो न गणितस्य" ॥

# पंचांगासंबंधीं साद्यंत माहिती.

मुंबई इलाख्यांत अगर काशी वगैरे प्रमुख ठिकाणीं प्रसिद्ध होणारीं कोणतींही पंचांगें पहा. त्यांपैकीं प्रत्येक पंचांगांत-मग तें अत्यंत सूक्ष्म गणिताचें, शुद्ध ग्रहस्थितीचें व सूक्ष्म अयनांशाचें शुद्ध पंचांग असो अगर स्थूल गणिताचें पंचांग असो-अगदीं आरंभाच्या पृष्ठापासून शेवटच्या पृष्ठापर्यंत कोणती माहिती असते व त्यांचा उपयोग काय याचें विवरण आतां करावयाचें आहे.

वस्तुतः पंचांग म्हणजे आकाशांतील ग्रहस्थितीचें प्रत्यक्ष दिग्दर्शन असून दर पौर्णिमा-अमावास्येची कुंडली म्हणजे आकाशांतील ग्रहस्थितीचा तंतोतंत नकाशा आहे. प्रत्येक जण रोज रात्रौ आकाशांत चमकणाऱ्या चांदण्याकडे व उदयास्त होणाऱ्या नक्षत्रताऱ्यांसुद्धां ग्रहांकडे पाहात असतो अगर आकाशांतील ताऱ्यांचें पटल त्याच्या दृष्टीस पडत असतें. पण त्यांतील माहिती त्याला नसल्यामुळें त्याचें रहस्य लक्षांत येत नाहीं. सुमारें ३०।४० वर्षांपूर्वींचीं म्हातारीं माणसें केवळ आकाशांतील नक्षत्रताऱ्यांवरून रात्र किती झाली कोणत्या नक्षत्रांत कोणता ग्रह आहे, कोणत्या ग्रहाची अगर, नक्षत्र ग्रहाची युति होत आहे इत्यादि गोष्टी गणिताशिवाय बिनचूक सांगत असत व कांहीं कांहीं व्यक्ती तर रात्रौ कोणत्याही वेळीं नक्की किती वाजले आहेत हें सांगत असत. इतकी माहिती त्या कालांत अनेकांना होती व सांप्रतच्या कालांतही कांहीं व्यक्ती अशी माहिती सांगणाऱ्या व त्याप्रमाणें प्रत्यक्ष दाखवून देणाऱ्या आहेत. पण सर्वसामान्यतः बहुजनसमाज असा आहे कीं, त्यांना यांपैकीं कांहीं एक माहिती नाहीं. इतकेंच नव्हे तर यासंबंधीं कल्पनेचें वारेही त्यांना स्पर्श करीत नाहीं. अशी वस्तुस्थिति आहे म्हणूनच पंचांग म्हणजे काय व पंचांगांत कोणकोणत्या गोष्टी आरंभापासून अखेरपर्यंत असतात. ह्यासंबंधीं सविस्तर ऊहापोह करणें जरूर झालें आहे.

पुष्कळ लोकांची आणि त्यांत विशेषतः आधुनिक सुशिक्षित लोकांची सांप्रत अशी कल्पना झाल्याचें दिसून येतें कीं, पंचांग म्हणजे एक कांहीं तरी आंकड्यांचें गौडबंगाल आहे आणि अशा ह्या आंकड्यांच्या गौडबंगालाचें आम्हांस कांहीं प्रयोजन नाहीं. वर्षांतून कधींकाळीं एखादे वेळीं पंचांग पाहण्याचा प्रसंग यावयाचा तर त्या वेळेपुरतें कोणास विचारू म्हणजे झालें। आमचें त्यावांचून कांहीं अडत नाहीं. आम्हांस व्यवहाराकरितां तारीख माहीत आहेच. अशा ह्या प्रवृत्तीमुळें सुशिक्षितांतील अनेक लोकांस पंचांग पाहतां येत नाहीं व त्यांतील कांहीं कळत नाहीं असा आमचा स्वतःचा अनुभव आहे. अलीकडील १५।२० वर्षें सोडलीं असतां त्याच्यापूर्वींच्या कालांतही कुटुंबांतील कर्त्याधर्त्यांचा असा संप्रदाय होता कीं, मुलांना आणि मुलींना लहानपणींच तिथि, वार, नक्षत्रें, योग, करण, राशी, महिने, ऋतु, उदगयन, इत्यादि माहिती शिकवावयाची व नंतर थोड्याशा प्रौढपणीं त्यांस पंचांग समजावून द्यावयाचें. ह्या उत्कृष्ट संप्रदायामुळें त्या काळच्या सर्व लोकांस पंचांग पाहतां येत असे व त्यांना पंचांगाचे बाबतींत दुसऱ्या कोणाकडेही जावें लागत नसे. पण इंग्रजी शिक्षणाचा जसजसा अतिरेक आणि नव्या चालीरीतींचा उच्छृंखलपणा वाढूं लागला तसतसा प्राचीन पद्धतीच्या अनेक गोष्टी क्रमाक्रमानें कमी होत गेल्या व त्यांतच पंचांग पाहण्याचा प्रघातही बंद पडला. आणि याच कारणानें सांप्रत पुष्कळशा लोकांस पंचांग पाहतां येत नाहीं. पण ही गोष्ट अत्यंत अनिष्ट व कमीपणाची आहे. पंचांग पाहतां येण्यापासून कदाचित् द्रव्यदृष्ट्या फायदा नसेल पण पंचांग पाहतां येणें व तें समजणें ही एक सनातन वैदिकधर्मानुयायांच्या कर्तव्यापैकीं महत्त्वाच्या कर्तव्याची गोष्ट आहे. कारण राजसत्ता आणि कालमानाप्रमाणें जरी अनेक गोष्टी बदलाव्या किंवा सोडाव्या लागल्या तरी आपल्या धर्मकृत्याचा मुख्य आधार असें जें कालदर्शक पंचांग तें सोडून देणें केव्हांही श्रेयस्कर होणार नाहीं. असो.

कोणतेंही **पंचांग** पाहिलें असतां त्यांत अगदीं पहिल्या पानावर श्रीगजाननाचें चित्र आणि ज्या वर्षाचें तें पंचांग असेल तो शक, त्या शकाचें नांव, संवत् आणि संवताचें नांव व सध्या इंग्रजी राज्य असल्यामुळें इसवी सन याप्रमाणें माहिती छापण्यांत येते.

पंचांगावर शक आणि संवत् असे दोन प्रकार देण्यांत येतात अर्थात् शक म्हणजे काय व संवत् म्हणजे काय यांचा खुलासा केला पाहिजे व ते कोणी सुरू केले हेंही सांगितलें पाहिजे.

अतिशय प्राचीनकाळीं शक या नांवाचें राजकुल किंवा राजसत्ता होती. त्याच्या वंशांत शक नृप

अशा प्रकारें चंद्रस्थितिवरून तिथीचें ज्ञान ज्याप्रमाणें होतें त्याप्रमाणें ज्या नक्षत्रात चंद्र असेल त्यावरून नक्षत्राचेंही ज्ञान होतें. यासंबंधींचें विवेचन पुढें करूं.

"न क्षरति तन्नक्षत्र" अशी नक्षत्राची व्याख्या आहे. आकाशात २७ नक्षत्राच्या तारका आहेत; व त्या स्पष्टपणें दिसतात. नक्षत्रें म्हणजे काल्पनिक जागा नव्हे. एकदा सूर्योदय झाल्यापासून पुन्हा सूर्योदय होईपर्यंत २७ नक्षत्राचा १ फेरा पूर्ण होतो, म्हणजे २४ तासात २७ नक्षत्रें पूर्वक्षितिजावर उदय पावतात व पश्चिम क्षितिजावर अस्तास जातात. ज्या नक्षत्रीं सूर्य असतो, तें नक्षत्र सूर्योदयकालीं पूर्व क्षितिजावर उदय पावतें, त्यानंतर सुमारें ५३॥ मिनिटानीं त्याच्यानंतरचें नक्षत्र उदय पावतें याप्रमाणें क्रम चालतो. सूर्य कोणत्याही नक्षत्रात आल्यापासून दररोज सु. ४-४॥ मिनिटें पुढें सरकतो व याप्रमाणें सुमारें १३॥ दिवसांत पुढील नक्षत्रात जातो. २४ तासात २७ नक्षत्रें अर्थात् दिवसा १३॥ व रात्रीं १३॥ नक्षत्रें उदयास्त पावतात. दिवसा सूर्याच्या तेजामुळें न. त्रें दिसत नाहींत, रात्रौ नक्षत्रतारका स्पष्ट दिसतात. नक्षत्रावरून चैत्रादि मासाची नांवें प्रचलित झाली आहेत ज्या महिन्यांत सबंध रात्रभर म्हणजे सामान्यतः सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंत चित्रा नक्षत्र, रात्रीच्या बहुतेक सर्व काळ दृग्गोचर होतें तो चैत्रमास, त्याचप्रमाणें विशाखा–वैशाख, ज्येष्ठा–ज्येष्ठ, पू. किंवा उ. षाढा आषाढ, श्रवण–श्रावण, पू. किंवा उ. भाद्रपदा–भाद्रपद, अश्विनी–आश्विन, कृत्तिका–कार्तिक, मृग–मार्गशीर्ष, पुष्य–पौष, मघा–माघ, पू. किंवा उत्तरा फाल्गुनी–फाल्गुन, या प्रत्येक महिन्यांत बहुतवेळ सबंध रात्रभर तें तें नक्षत्र दिसतें. शिवाय त्या त्या महिन्याच्या पौर्णिमेस साधारणतः त्या नक्षत्राजवळ चंद्र असतो. कधीं १।२ नक्षत्रें मागें पुढेंही असतो.

पौर्णिमेस त्या त्या मास नक्षत्राजवळ चंद्र असावयाचा हा सामान्य व स्थूल नियम आहे. या नियमाप्रमाणें प्रत्येक महिन्यास नक्षत्र जुळेलच असें नाहीं. कांहीं कांहीं वेळ अलीकडील १-१॥ नक्षत्रावर पौर्णिमेस असतो. ज्या वर्षी अधिक मास येतो त्या वर्षी तर अधिक मासापूर्वी ४-५ महिने कोणत्याही पौर्णिमेस मास नक्षत्रावर चंद्र न येतां १-२ नक्षत्रें मागें पुढें राहतो. याचें कारण उघड आहे कीं, अधिक मास हा सौर चांद्र मानातील साचलेल्या फरकाचा असल्यानें त्याच्या पौर्णिमेस चंद्र कोणत्या तरी नक्षत्रावर असणारच व चंद्र तर दर महिन्यास सबंध राशीचक्र भोगून २-२॥ नक्षत्रें जास्त जातो. अशा परिस्थितीमुळें अधिक मासाचे पूर्वी ४-५ महिने व क्वचित नंतर १-२ महिने पौर्णिमा आणि मासनक्षत्र यात १-२ नक्षत्रें अंतर पडतें. पण ही कांहीं चूक नव्हे अगर अशुद्धताही नव्हे. ही स्थिति चंद्राच्या गतिस्थितिमुळें येते व केव्हांही येणारच. ज्याना वस्तुस्थिति माहीत नसते त्याचा याबद्दल गैरसमज होतो व त्यामुळें तें पंचांग चूक आहे असें म्हणू लागतात पण हा केवळ त्यांच्या अज्ञानाचा दोष होय. याखेरीज त्यांत कांहीं तथ्य नाहीं. कोणतेंही पंचांग घेतलें तरी त्यांत अशी स्थिति यावयाचीच.

**सूर्यसंक्रांतीचा संबंध जन्मलग्नाशीं अतिशय असतो इतकेंच नव्हे तर रवीच्या स्थितीवरच जन्मलग्न सर्वस्वीं अवलंबून आहे म्हणून सूर्याची स्थिति फारच सूक्ष्म पाहिजे**

पंचांगांतील दृक्प्रत्ययाच्या महत्वाच्या गोष्टी म्हणजे ग्रहणें, ग्रहांचे उदयास्त, संकष्टीचे चंद्रोदय-ग्रहांच्या युत्या आणि ग्रह व नक्षत्रतारायुति ह्या होत ह्यापैकीं संकष्टीचे चंद्रोदयाची माहिती सर्वांना असते. गुरुशुक्रादिकांचे उदयास्तही बऱ्याच लोकांस पाहण्याची सवय असते. उदयास्ताशीं रवि आणि उदय अगर अस्त होणारा ग्रह यांचाच संबंध आहे. सूक्ष्म गणितागत उदयास्त पंचांगांत दिलेले असतात पण आकाशांतील साभ्र अगर निरभ्रपणामुळें, मलीनपणामुळें, पाहणाऱ्या दृष्टीच्या कमजास्त तीव्रतेमुळें किंवा मंदतेमुळें उदयास्ताची प्रत्यक्षस्थिति दृग्गोचर होण्यास केव्हां केव्हां १-२ दिवस आगें मागें होऊं शकतात. ज्याची तीव्र दृष्टी आहे व नेहमीं पाहण्याची संवय त्यास उदयास्त पंचांगात दिलेल्या दिवशींच फार सारकाईनें पाहतां दिसूं शकतील. पण मंद दृष्टीच्या मनुष्यास त्या दिवशीं दिसणार नाहींत. १-२ दिवसांनीं दिसतील आणि म्हणूनच प्राचीन ग्रंथकारांनीं उदयास्ताच्या पूर्वीचे व नंतरचे ३ अगर ७ दिवस शुभ कार्यास सोडण्यास सांगितले आहेत. व करणग्रंथात म्हटलें आहे कीं—

॥ नभसो मालिन्याद्दृग्दोषात्पाटवादपि "काले सौ मिश्रोस्त. स्तस्माद्दोषो न गणितस्य" ॥

| | | |
|---|---|---|
| ( १ ) दिल्ली ( इंद्रप्रस्थ ) येथें युधिष्ठिर ( धर्मराज ) | शक | ३०४४ वर्षे. |
| ( २ ) उज्जयिनी येथें विक्रम संवत | शक | १३५ वर्षे. |
| ( ३ ) पैठण येथें शालिवाहन | शक | १८००० वर्षे |
| ( ४ ) वैतरणी कांठीं विजयाभिनंदन | शक | १०००० वर्षे. |
| ( ५ ) बंगालमध्यें धारातीर्थी नागार्जुन | शक | ४००००० वर्षे. |
| ( ६ ) कर्नाटकांत कोल्हापुरास कल्की | शक | ८२१ वर्षे. |
| एकूण कलियुग वर्ष संख्या. | | ४,३२००० |

ह्याप्रमाणें कलियुगामध्यें म्हणजे कलियुगाच्या एकंदर ४ लक्ष ३२हजार वर्षांत ६ शककर्ते व शक होतील.

प्राचीनकाळीं शककर्ता राजा होणें ही गोष्ट फार अलौकिक,सर्वश्रेष्ठतेची आणि अत्यंत धर्मश्रेष्ठ नृपतिराची समजत असत आणि त्याचप्रमाणें जे शककर्ते राजे महाराजे होऊन गेले त्यांची योग्यताही तशीच थोर होती व आहे, यांत तिळप्राय शंका नाहीं. अशा तऱ्हेनें ज्या अलौकिक दैवीसामर्थ्यसंपन्न धर्मनिष्ठ व प्रजाहिततत्पर सत्पुरुषांस विभूति असतात, त्यांच्याच नांवाचा शक सुरू होतो. श्रीछत्रपति शिवाजीमहाराजांच्या मातोश्रींना दृष्टांत होऊन "तुझ्या पोटीं शककर्ता राजा (छत्रपति) अवतीर्ण होईल" असें दिव्य दृष्टीकडून सांगण्यांत आलें होतें अशी माहिती सांपडते. ह्यावरून देशांतील शककर्ता राजा होणें ही गोष्ट त्या वेळीं अलौकिक अशी मानण्यांत येत होती हें अगदीं उघड आहे. ह्या दृष्टांताप्रमाणें श्रीछत्रपति शिवाजीमहाराजांनीं आपला शक सुरू केला व तो अद्याप चालू आहे.

श्रीछत्रपति शिवाजीमहाराज शक, शालिवाहन शके १५९६ मध्यें ज्येष्ठ शु. १३च्या दिवशीं श्री शिवाजी महाराजांनीं सुरू केला. कारण त्या दिवशींच महाराजांचा राज्याभिषेकमहोत्सव करण्यांत आला. तेव्हांपासून आतापर्यंत हा शक चालू आहे. इष्ट शालिवाहनशकांतून १५९६वजा करावे. म्हणजे बाकी येणारी संख्या ही इष्ट शकाच्या ज्येष्ठ शु. १३ पर्यंतच्या श्रीशिवाजी शकाची संख्या येते. अर्थात् त्यापुढचा शिवाजी शक हा ज्येष्ठ शु. १३ पासून सुरू होतो.

श्रीशिवाजीमहाराजांचे शकाचे बाबतींत आग्रहाने या प्रसंगीं दोन शब्द लिहिणें जरूर वाटतें. आपल्या हल्लींच्या प्रचलित पंचांगात शालिवाहन, विक्रम हे शक व संवत् देतात हें अत्यंत योग्य आहे. पण त्याच्याचबरोबर हल्लींचे राज्यकर्ते जे इंग्रजसरकार त्यांच्या सनाची माहिती,मुसलमानी हिजरी व फसली सन आणि त्यांचे महिने ह्या गोष्टी विनचूक देऊन श्रीछत्रपति शिवाजीमहाराजांचा शक देण्यांत येत नाहीं. ही गोष्ट खरोखर अतिशय लज्जास्पद व स्वाभिमानशून्यता दर्शविणारी आहे. ज्या छत्रपति शिवाजीमहाराजांनीं मराठी साम्राज्य व महाराष्ट्र सत्ता स्थापन केली व त्या राज्याच्या स्थापनेचा शक सुरू केला त्या श्रीशिवाजीमहाराजांना शक पंचांगांत देण्याची आठवण पंचांगकर्त्यांना होऊ नये हें पंचांगकर्त्यांच्या पराधीन व पारतंत्र्यमग्न बुद्धीचेंच द्योतक होय. पूर्वी स्वार्थबुद्धीने अगर अन्य कांहीं हेतूनें परदेशीय इतिहासकार अगर आमच्यांतील निर्बुद्ध अगर दुर्बुद्ध इतिहासकार अगर सत्ताधारी लोक कांहींही म्हणत असोत, पण शके १८३५ पासून म्हणजे श्रीछत्रपति शिवाजी राजशक २३९ पासून महायुद्ध सुरू झाल्याबरोबर व त्यानंतर ब्रिटिश साम्राज्याच्या वरिष्ठ सत्ताधाऱ्यांनी देखील श्रीशिवाजीमहाराजांच्या स्वराज्यस्थापनेबद्दल व त्यांच्या कर्तबगारीबद्दल धन्योद्गार काढले असून इतकेंच नव्हे तर पुण्यास श्रीशिवाजीमहाराजांच्या अखिल-भारतीय स्मारकाची मुहूर्तमेढ व त्यांचा पुतळा श्रीमंत युवराजांच्या हस्ते ब्रिटिश साम्राज्याचे युवराज आणि त्यांचेच राजप्रतिनिधि नामदार व्हाइसरॉयसाहेब यांच्या हस्तें उभारण्यांत आला आहे. अशा रीतीनें अखिल हिंदुस्थानांत इतकेंच नव्हे तर अखिल जगांत श्रीशिवाजी महाराजांनीं स्वराज्यसंस्थापक म्हणून नांव चमकत असतांना त्यांचा शक देण्याची पंचांगकारांस बुद्धि न होणें अगर त्यांच्या शकाचा विसर पडणें हें पंचांगकर्त्यांचे दुर्दैव होय. ह्यांत श्रीशिवाजी महाराज ह्या शककर्त्या राजास व अलौकिक विभूतिमत्त्वास कांहींच बाध येत नाहीं असो.

श्रीशिवाजीमहाराजांचा शक, शालिवाहन शकाच्या १५९६ या वर्षी ज्येष्ठ शु. १३ ला सुरू झाला हा वरून पंचांगकारांनी पुढील वर्षी श्रीशिवाजीशक कोणता येतो हें सहज काढतां येईल. पण हें केव्हां ध्यानांत ठेवावें कीं, शालिवाहन शकाच्या एका वर्षांत श्रीशिवाजी राजशक दोन येतात. चैत्रारंभापासून ज्येष्ठ शु.१३पर्यंत एक व त्याच्यापुढें दुसरा.

( राजा ) काल किंवा शककाल म्हणत असत. ह्या शक राजाच्या कालानंतर श्रीशालिवाहन राजाचा काल सुरू झाला व त्यामुळें पूर्वीचा शक हा शब्द कायम ठेवून शालिवाहन शक असा शकवर्षोल्लेख प्रचारात आला.

तात्पर्य शक हा शब्द वर्ष गणनेकरिताच प्रचारात आणला गेला.

शक म्हणजे वर्ष आणि संवत म्हणजेही वर्षच. शककर्ता म्हणजे ज्या राजाच्या नावानें कालगणना किंवा वर्षगणना चालते तो राजा आणि शक म्हणजे वर्षगणना. ( गी. ल. को ४६६ ) तात्पर्य, वर्ष म्हणजे शक "सम्–वसंति–ऋतवः संवत्सरः" ह्यापासूनच संवत् हा शब्द वर्षगणनेसाठीं प्रचारात आला आहे. कारण सर्व ऋतूंचा ज्यामध्यें समावेश होतो तो संवत्सर ह्या प्रमाणानें संवत्सर शब्दाऐवजीं संवत् ही संज्ञा संवत्सर शब्दाचा अपभ्रंश होऊन प्रचलित झाली असली पाहिजे. ह्याप्रमाणें शक आणि संवत् ह्या संज्ञा वर्षगणनेच्या आहेत.

## शालिवाहन शक.

सांप्रत जो शक दक्षिण हिंदुस्थानात, महाराष्ट्रात चालू आहे तो गोदातीरीं पैठण क्षेत्रामध्यें राज्य करणाऱ्या शालिवाहन या राजानें सुरू केला. अदाजें ४००।५०० वर्षांपूर्वी शालिवाहन शकाचा उल्लेख काहीं ठिकाणीं शककाल किंवा शकनृपकाल या संज्ञेनें केल्याचे दाखले आढळतात. पण सध्या आणि शालिवाहन शकारंभापासून शक हा शब्द वर्षगणना किंवा वर्ष या अर्थाचाच सर्वत्र समजण्यात येतो.

शालिवाहन शकाचें चालू वर्ष १८५१ वें आहे आणि त्याचें नाव शुक्लनाम संवत्सरे असें आहे. शकाचें नाव कसें काढावयाचें हें पृष्ठ ६ मध्यें दिलें आहे. शके १८५२ चें नाव प्रमोदनाम संवत्सरे असें आहे.

शालिवाहन शकाचा वर्षारंभ अर्थात् नवीन शकारंभाचा दिवस चैत्र शु. १ हा होय व याकरिताच गुढी पाडव्याचे दिवशीं सर्वत्र आनंदोत्सव व्यक्त करण्यात येतात.

शालिवाहन शकाची म्हणजे वर्षाची समाप्ति फाल्गुन कृ. ३० या दिवशीं होते. म्हणजे चैत्र शुद्ध १ च्या सुरवातीपासून फाल्गुन कृ. ३० च्या अखेरपर्यंतचा जो काल तो शालिवाहनाचा १ शक किंवा १ वर्ष होय. हें वर्षमान महाराष्ट्रात, वऱ्हाडात व दक्षिण भागात विशेष प्रचारात आहे.

## श्रीविक्रम संवत.

श्रीक्षेत्र उज्जयिनी येथें महाप्रतापी व धर्मनिष्ठ असा विक्रमादित्य या नावाचा राजा होता. त्यानें आपल्या स्वत च्या नांवाचा शक–संवत्–सुरू केला.

संवताचा वर्षारंभ कार्तिक शु. १ ला होतो व आश्विन कृ. ३० ला तो संवत् पूर्ण होतो. व्यापारी लोकामध्यें हा संवत् मानण्याचा विशेष प्रघात आहे. आणि यामुळेंच व्यापारी लोकांचें वर्ष नेहमीं कार्तिक शु. १ च्या दिवशीं बदलतें व नूतन वर्षारंभ होतो. संवताप्रमाणें वर्षारंभ व वर्षगणना मानण्याचा प्रघात नर्मदेच्या उत्तरेकडे गुजराथ प्रातात विशेष असून मुंबईला देखील हा प्रचार गुजराथी लोकात आहे.

## शककर्त्या राजांचीं नांवें.

युधिष्ठिरो विक्रमशालिवाहनौ ततो नृपस्याद्विजयाभिनंदनः ।
ततस्तु नागार्जुनभूपतिः कलौ कल्कीषडेते शककारकाः स्मृताः ॥

कलियुगात एकंदर शककर्ते सहा होतील असें प्राचीन आचार्यांनीं लिहून ठेवलें आहे. ह्यापैकीं आतापर्यंत युधिष्ठिर, विक्रम आणि शालिवाहन असे तीन होऊन गेले व विजयाभिनंदन, नागार्जुन आणि कल्की याप्रमाणें तीन व्हावयाचे आहेत. ह्या प्रत्येक शककर्त्यांचा शक कोणत्या मार्गी होऊन तो किती वर्षे चालू राहील तें मार्गे दिलें आहे.

| | | |
|---|---|---|
| ( १ ) दिल्ली ( इंद्रप्रस्थ ) येथे युधिष्ठिर ( धर्मराज ) | शक | ३०४४ वर्षे. |
| ( २ ) उज्जयिनी येथें विक्रम संवत | शक | १३५ वर्षे. |
| ( ३ ) पैठण येथें शालिवाहन | शक | १८००० वर्षे |
| ( ४ ) वैतरणी कांठीं विजयाभिनंदन | शक | १०००० वर्षे. |
| ( ५ ) बंगालमध्यें धारातीर्थी नागार्जुन | शक | ४००००० वर्षे. |
| ( ६ ) कर्नाटकांत कोल्हापुरास कल्की | शक | ८२१ वर्षे. |
| एकूण कलियुग वर्ष संख्या. | | ४,३२००० |

ह्याप्रमाणें कलियुगामध्यें म्हणजे कलियुगाच्या एकंदर ४ लक्ष ३२हजार वर्षांत ६ शककर्ते व शक होतील.

प्राचीनकाळीं शककर्ता राजा होणें ही गोष्ट फार अलौकिक,सर्वश्रेष्ठतेची आणि अत्यंत धर्मश्रेष्ठ नृपतित्वाची समजत असत आणि खरोखरच जे शककर्ते राजे महाराजे होऊन गेले त्यांची योग्यताही तशीच थोर होती व आहे, यांत तिळमात्र शंका नाहीं. अशा तऱ्हेनें ज्या अलौकिक दैवीसामर्थ्यसंपन्न धर्मनिष्ठ व प्रजाहिततत्पर सत्वशील विभूति असतात, त्यांच्याच नांवाचा शक सुरू होतो. श्रीछत्रपति शिवाजीमहाराजाच्या मातोश्रींना दृष्टांत होऊन "तुझ्या पोटीं शककर्ता राजा (छत्रपति) अवतीर्ण होईल" असें दिव्य दृष्टीकडून सांगण्यांत आलें होतें अशी माहिती सांपडते. ह्यावरून देखील शककर्ता राजा होणें ही गोष्ट त्या वेळीं अलौकिक अशी मानण्यांत येत होती हें अगदीं उघड आहे. ह्या दृष्टांताप्रमाणें श्रीछत्रपति शिवाजीमहाराजांनीं आपला शक सुरू केला व तो अद्याप चालू आहे.

श्रीछत्रपति शिवाजीमहाराज शक, शालिवाहन शके १५९६ मध्यें ज्येष्ठ शु. १३च्या दिवशीं श्री शिवाजी महाराजांनीं सुरू केला. कारण त्या दिवशींच महाराजाचा राज्याभिषेकमहोत्सव करण्यांत आला. तेव्हापासून आतापर्यंत हा शक चालू आहे. इष्ट शालिवाहन शकांतून १५९६वजा करावे. म्हणजे बाकी येणारी संख्या ही इष्ट शकाच्या ज्येष्ठ शु. १३ पर्यंतच्या श्रीशिवाजी शकाची संख्या येते. अर्थात् त्यापुढचा शिवाजी शक हा ज्येष्ठ शु. १३ पासून सुरू होतो.

श्रीशिवाजीमहाराजांचे शकाचे बाबतींत आम्हांस या प्रसंगीं दोन शब्द लिहिणें जरूर वाटतें. आपल्या हल्लींच्या प्रचलित पंचांगांत शालिवाहन, विक्रम हे शक व संवत् देतात हें अत्यंत योग्य आहे. पण त्याच्याचबरोबर हल्लींचे राज्यकर्ते जे इंग्रजसरकार त्यांच्या सनाची माहिती,मुसलमानी हिजरी व फसली सन आणि त्यांचे महिने ह्या गोष्टी बिनचूक देऊन श्रीछत्रपति शिवाजीमहाराजाचा शक देण्यांत येत नाहीं. ही गोष्ट खरोखर अतिशय लज्जास्पद व स्वाभिमानशून्यता दर्शविणारी आहे. ज्या छत्रपति शिवाजीमहाराजांनीं मराठी साम्राज्य व महाराष्ट्र सत्ता स्थापन केली व त्या राज्याच्या स्थापनेचा शक सुरू केला त्या श्रीशिवाजीमहाराजाचा शक पंचांगांत देण्याची आठवण पंचांगकर्त्यांना होऊं नये हें पंचांगकर्त्यांच्या पराधीन व पारतंत्र्यमग्न बुद्धीचेंच द्योतक होय. पूर्वी स्वार्थवृत्तीनें अगर अन्य कांहीं हेतूनें परदेशीय इतिहासकार अगर आपल्यांतीलच निर्बुद्ध अगर दुर्बुद्ध इतिहासकार अगर सत्ताधारी लोक कांहींही म्हणत असोत, पण शके १८३५ पासून म्हणजे श्रीछत्रपति शिवाजी राजशक २३९ पासून महायुद्ध सुरू झाल्याबरोबर व त्यानंतर ब्रिटिश साम्राज्याच्या वरिष्ठ सत्ताधाऱ्यांनीं देखील श्रीशिवाजीमहाराजाच्या स्वराज्यस्थापनेबद्दल व त्यांच्या कर्तबगारीबद्दल धन्योद्गार काढले आहेत इतकेंच नव्हे तर पुण्यास श्रीशिवाजीमहाराजाच्या अखिल-भारतीय स्मारकाची मुहूर्तमेढ व त्याचा पुतळा श्रीमंत पेशव्यांच्या वाड्यासमोर स्वत: इंग्लंडचे युवराज आणि त्यांचेच राजप्रतिनिधि नामदार गव्हर्नरसाहेब यांच्या हस्तें उभारण्यांत आला आहे. अशा रीतीनें अखिल हिंदुस्थानांत इतकेंच नव्हे तर अखिल जगांत श्रीशिवाजीमहाराजांचें स्वराज्यसंस्थापक म्हणून नांव चमकत असतांना त्यांचा शक देण्याची पंचांगकारांस बुद्धि न होणें अगर त्यांच्या शकाचा विसर पडणें हें पंचांगकर्त्यांचें दुर्दैव होय. ह्यांत श्रीशिवाजीमहाराजाच्या शकस्थापकत्वास व अलौकिक विभूतिमत्त्वास कांहींच बाध येत नाहीं. असो.

श्रीशिवाजीमहाराजाचा शक, शालिवाहन शकाच्या १५९६ या वर्षी ज्येष्ठ शु. १३ ला सुरू झाला. ह्यावरून कोणत्याही वर्षी श्रीशिवाजीराजशक कोणता येतो हें सहज काढतां येईल. पण हे केव्हांही पूर्ण लक्षांत ठेवावें कीं, शालिवाहन शकाच्या एका वर्षांत श्रीशिवाजी राजशक दोन येतात. चैत्रारंभापासून ज्येष्ठ शु.१३पर्यंत एक व त्याच्यापुढें दुसरा.

महत्त्वाचे असे तीन शक वर सांगितले. आता तितक्याच महत्त्वाचा आणखी एक शके आहे. तो असाः– लोकमान्य विद्वन्मुकुटमणि बाळ गंगाधर टिळक यांनीं शुद्ध पंचांग प्रवर्तनाकरिता सुमारें २५-३० वर्षे अत्यंत परिश्रम घेतले आणि शके १८२६ पासून क्रमाक्रमानें पंचांगशुद्धीची योजना सुरू करून त्यांत शके १८३९ सालीं आणखी प्रगति केली व शके १८४१ या वर्षी सर्वतोपरी शुद्ध पंचांग योजना कायम करून त्याप्रमाणें प्रत्यक्ष शुद्धपंचांग सुरू झालें. महाराष्ट्रांत शुद्ध निरयन पंचांगवाद गेलीं ५० ६० वर्षे सतत चालू होता. त्याचा अखेरचा निर्णय लोकमान्य टिळक यांच्या नेतृत्वाखालीं झाल्यामुळें व सर्वतोपरी शुद्ध असें पंचांग शके १८४३ पासून निघाल्यामुळें लोकमान्यांच्या शुद्धपंचांगकर्तृत्वाच्या संस्मरणार्थ टिळक शक, शके १८४३ पासून सुरू करण्यांत आला. शके १८५१ हें टिळक शकाचें ९ वें वर्ष होय व शके १८५२ हें १० वें वर्ष होय. शालिवाहन शकाच्या कोणत्याही एका वर्षांत टिळक शक एकच येतो. कारण त्याचा आरंभ शके १८४३ च्या चैत्रा पासूनच झालेला आहे.

नवीन शक सुरू करण्याचे बाबतींत जुन्या शकाचें महत्त्व कमी होतें असें कांहीं लोक समजतात पण ते चुकीचें आहे. कारण आजपर्यंत जुनें शक कायम राहूनही नवीन शक सुरू झाले अ हेत व चालू राहिले आहेत. श्री विक्रम संवत् चालू असतांच शालिवाहन शक सुरू झाला व दोन्ही शक चालू असतां श्रीशिवाजी शक सुरू झाला. अर्थात् हे तिन्ही शक चालू ठेऊनही टिळक शक सुरू करण्यास कसलाच प्रत्यवाय नाहीं. आणि शक म्हणजे त्या त्या पुण्यात्म्याचें व पुण्यकर्माचें काल गणना रुपानें संस्मरण होय ही गोष्ट लक्षांत ठेविली असतां प्रत्येक पुण्यात्म्याचा शक पाळणें हें केव्हांही श्रेयस्कर आहे.

आता व्यवहाराकरितां नित्य लागणाऱ्या इंग्रजी शकाची व तदनुसार इतर कांहीं शकाची माहिती देऊं.

## युरोपियन [ इंग्रजी ] शक [ सन. ]

कोणत्याही पंचांगांत पहिल्याच पानावर इंग्रजी दोन सन दिलेले असतात, त्याचें कारण एका शालिवाहन शकांत इंग्रजी एका सनाचे कांहीं महिने येतात व दुसऱ्या सनाचे कांहीं महिने येतात ह्यामुळेंच प्रथमतः दोन सन देण्यांत येतात.

इंग्रजी सन पंचांगांत देण्याचें कारण असें कीं, सांप्रत इंग्रजी राज्याच्या अमलाखालीं हिंदुस्थान देश आहे व सामाजिक, राजकीय, धार्मिक इत्यादि व्यवहाराचे वेळीं इंग्रजी तारखेचा, महिन्याचा व सनाचा उपयोग वारंवार लागतो व पुष्कळसा व्यवहार त्यावरच अवलंबून असतो. यामुळें इंग्रजी तारीख ( व मास ) पंचांगांतील एका कोठ्यांत मुद्दाम देण्यांत येतात व सन प्रथमच्या पानावर दिलेले असतात. अर्थात् त्यासंबंधींची इत्यंभूत माहिती प्रत्येकास असणें अगदीं जरूरीचें आहे !

हिंदी लोकांचा ज्याप्रमाणें शालिवाहन शक त्याचप्रमाणें इंग्लिश ( ख्रिस्ती ) लोकांचा इसवी सन हा होय. सन हा शब्द देखील वर्षवाचक आहे. सन हा शब्द मूळ यवनी आहे असें कांहीं म्हणतात, तर दुसरे कांहीं म्हणतात कीं हा दुसऱ्या कोणत्या तरी शब्दाचा अपभ्रंश आहे. तें कांहींही असो व सन शब्दाची उपपत्ती कोणी कशीही लावो पण सन हा शब्द वर्षात्मक कालगणनेचा दिग्दर्शक आहे हें खास.

सनाचा प्रारंभ येशूख्रिस्ताच्या जन्मापासून धरलेला असून सनाचा वर्षारंभ तारीख १ जानेवारीला दर वर्षी होतो.

इंग्रजी महिन्याचे दिवस सारख्या प्रमाणांत नसून कांहीं मास ३० दिवसांचे, कांहीं मास ३१ दिवसांचे व फेब्रुवारी २८ अगर २९ दिवसांचाच आहे. इंग्रजी वर्षाचे महिने बाराच आहेत त्यांचीं अनुक्रमानें नांवें व त्यांचे दिवस खालीलप्रमाणें:—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| जानेवारी | ३१ | मे | ३१ | सप्टेंबर | ३० |
| फेब्रुवारी + | २८ | जून | ३० | आक्टोबर | ३१ |
| मार्च | ३१ | जुलै | ३१ | नोव्हेंबर | ३० |
| एप्रील | ३० | आगस्ट | ३१ | डिसेंबर | ३१ |

लीपयिअर असेल त्यावर्षी फेब्रुवारी महिना २९ दिवसांचा असतो. अशा वर्षास अधिकादिन वर्ष म्हटलें पाहिजे.

याप्रमाणें इंग्रजी वर्षाचे दिवस ३६५ होतात.

भारतीय ज्योतिर्गणितात सौरवर्ष म्हणून जें सांगितलें आहे त्याच्याशीं इंग्रजी वर्षाच्या दिवसांचा बराच मेळ आहे, म्हणजे इंग्रजी वर्ष हें सौरवर्ष आहे. सूक्ष्मगणितानें ३६५ दि. १५ घटिका ( ६ तास ) २३ पळे ( ९ मिनिटें ) इतका काल म्हणजे सौरवर्ष होय. ह्यांपैकीं ३६५ दिवसांचें इंग्रजी वर्ष आहेच. बाकी ६ तास ९ मिनिटांची दरवर्षी जी शिल्लक पडते ती नाहींशी करून हिशेब वगैरे जुळण्याकरिता दर चार वर्षांनीं फेब्रुवारी महिन्याचे २९ दिवस धरतात व त्या वर्षास लीपयिअर किंवा अधिक वर्ष म्हणतात.

दर चार वर्षांनीं फेब्रुवारीचे २९ दिवस म्हणजे १ दिवस जास्त धरण्याचें कारण दर वर्षास ६ तास ९ मि. शिल्लक रहातात. तीं काढून टाकावीत हें होय. लीपयिअर धरल्यानें ४ वर्षांनीं ( वर्षास ६ तासप्रमाणें ) २४ तासाची म्हणजे १ दिवसाची कसर निघून दिवसाचा हिशेब बरोबर होतो हें जरी सामान्यतः खरें तरी वार्षिक ९ मिनिटांची कसर कायमच राहते. त्याच्याकरिता व दर लीप वर्षाच्या वेळीं सुमारें पाऊण तासाइतका काळ हिशेबापेक्षा अधिक धरला जात असल्याकारणानें व ४०० वर्षांत या कसरीमुळें ३ दिवस वाढत असल्यानें ही सूक्ष्म कसर व चूक काढून टाकण्याकरिता प्रत्येक ४०० वर्षांनीं ३ दिवस वजा करतात व सर्व हिशोब बरोबर करून घेतात.

आता फेब्रुवारीचे २९ दिवस म्हणजे लीप वर्ष कोणतें हें कसें पाहावयाचें हें सांगतों. ज्या सनास चार या संख्येनें निःशेष भाग जातो तें लीप वर्ष होय. जसें, सन १९२४, १९२८, १९३२ इत्यादि इत्यादि. पण ज्यावेळीं सनाच्या शेवटीं दोन शून्यें असतात त्यावेळीं त्या सनास जर ४०० नीं निःशेष भाग जात असेल तर तें लीप वर्ष समजावें. ४००नीं भागिलें असता जर बाकी राहील तर तें लीप वर्ष नव्हे. उदाहरणार्थ १२००--१६००--२००० हीं लीप वर्षे होत. पण १४००-१५००-१७००-१८००--१९०० हीं लीप वर्षे नाहींत. कारण त्यावेळीं निःशेष भाग जात नाहीं.

## इंग्रजी तारखेवरून रविस्थिति.

इंग्रजी वर्ष ३६५ दिवसांचें असल्यामुळें रवीच्या राशि--अंशात्मक स्थितीशीं त्याचा बराच मेळ बसतो. पण तो अगदीं नक्की अगर तंतोतंत नसतो. तथापि त्याची माहिती असणें वावगें नाहीं म्हणून ती देतों. शुद्ध पंचांगाप्रमाणें मकरसंक्रांत हल्लीं जानेवारीच्या ९ अगर १० तारखेस होते आणि कर्क संक्रांत ता. ११ अगर १२ जुलैला होते. ह्यावरून त्याच्या पुढील कोणत्याही तारखेस रवि कोणत्या राशीच्या कितव्या अंशात सामान्यतः असेल हें सहज काढता येईल. जसें, ता. १४ मार्च व १३ सप्टेंबरचा रवि पाहणें आहे तर ता. १० जानेवारीपासून १४ मार्चपर्यंत ६४ दिवस म्हणजे ६४ अंश अर्थात् २ राशी ४ अंश रवि मकरराशीच्या प्रारंभापासून पुढें गेला. म्हणजे ता. १४ मार्चला मीन राशीच्या ४ अंशात रवि पाहिजे. शके १८५१ चें पंचांग पाहा. त्यात ता. १४ मार्चला मीनेच्या ४ अंशातच रवि आहे. आता याच रीतीनें ता. १३सप्टेंबरचा रवि पाहूं. ता. १२ जुलैपासून १३ सप्टेंबरपर्यंतचे दिवस ६१ म्हणजे ६१ अंश अर्थात् २ राशी १ अंश इतका रवि कर्क राशीच्या प्रारंभापासून पुढें गेला म्हणजे इष्ट दिवशीं कन्या राशीच्या १ अंशात रवि पाहिजे. १८५१ च्या पंचांगात त्याप्रमाणें आहे. ही रविस्थिति स्थूलमानाची आहे. ह्यात एखाद्या अंशाचा फरक येणारच. पण साधारण रीतीनें रविस्थिति कळण्यास याचा उपयोग होईल. रवि १ दिवसात साधारणतः १ अंश पुढें जातो. ज्याप्रमाणें मकरराशींत रवि ता. ९-१० जानेवारीस व कर्कराशींत ता. ११-१२ जुलैला जातो त्याचप्रमाणें रवि मेषराशींत ता ९ एप्रिलला व तूळराशींत ता. १२-१३ आक्टोबरला जातो. हे चार बिंदु किंवा चार राशींत रवि जाण्याची स्थिति लक्षात ठेवली म्हणजे कोणत्याही तारखेची रविस्थिति विन गणितानें काढता येईल व तशी ती काढता यावी येवढ्यासाठींच ही माहिती दिली आहे.

शुद्धपंचांगाच्या संक्रांति म्हणजे रविप्रवेश कोणत्याही राशींत ज्या तारखेस होतो त्याच्यानंतर ४ दिवसांनीं जुन्या पंचांगाप्रमाणें रविप्रवेश त्या त्या राशींत होतो. अर्थात् त्या तारखावरून वरील रीतीनेंच जुन्या

पंचांगाप्रमाणें इष्ट दिवशीं रवि कोणत्या राशींत व किती अंशांत आहे हें कळेल. जुन्या पंचांगांतील मेषादि राशींत सूर्य प्रवेश करतो त्या तारखा सामान्यतः येणेंप्रमाणें:—मेष १३ एप्रिल, कर्क १६ जुलै, तूळ १७ आक्टोबर, मकर १३-१४ जानेवारी.

## शालिवाहन शक, विक्रम संवत् आणि इसवी सन यांचा परस्पर संबंध.

**( १ ) शकावरून संवत्:**—इष्ट शकात १३४ मिळविलें म्हणजे इष्ट शकाच्या चैत्रापासून आश्विन कृ. ३० अमावास्येपर्यंतचा संवत् येतो व इष्ट शकात १३५ मिळविलें असता कार्तिक शु. १ पासून पुढील संवत् येतो म्हणून पंचांगांत दोन संवत् देतात.

याच्या उलट संवतामधून १३४ वजा केलें असता शकाचे पहिले ७ महिने म्हणजे आश्विन अखेरपर्यंतचे मासाचा शक येतो. व १३५ वजा केलें असता कार्तिकापासून पुढचा शक व मास येतात.

( २ ) इष्ट शकात ७८ मिळविलें असता साधारणतः मार्गशीर्ष अखेरपर्यंतचा सन निघतो आणि ७९ मिळविलें असता पौषापासूनचा पुढील सन येतो. येथें सामान्यतः असें सांगण्याचें कारण हेंच कीं, बहुधा पौष महिन्यात नवीन सनाच्या सुरुवातीची म्हणजे जानेवारी महिन्याची पहिली तारीख येते. पण कधीं कधीं मार्गशीर्ष कृष्णपक्षातही सनाचा आरंभ अर्थात् जानेवारी १ ली तारीख येते. ज्या वर्षी अधिकमास असतो त्या वर्षी अगर त्याच्या मागील वर्षी सामान्यतः मार्गशीर्षांत जानेवारीची पहिली तारीख येते.

सनांतून ७८ वजा केले असता मार्गशीर्ष अखेरपर्यंतचा शक येतो व ७९ वजा केलें असता पौषापासूनचा शक येतो. एका शकात दोन इसवी सन किंवा एका इसवी सनात दोन शक येत असल्याकारणानें इतका द्राविडी प्राणायाम करावा लागतो. पण इष्ट सनात ७८ व ७९ वजा करून येणारा शक हा एकच येतो. फक्त मास कोणते येवढाच काय तो उलगडा यानें होतो.

( ३ ) विक्रम संवतांतून ५६ वजा केलें म्हणजे इसवी सन येतो आणि त्याच्या उलट सनांत ५६ मिळविलें असता संवत् निघतो.

संवत्, शक, सन ह्या तीन शक वर्षांच्या माहितीची प्रत्येकास हरघडी जरूरी लागते म्हणून याचे सविस्तर विवेचन केलें. आता आणखी काहीं शक अगर वर्षगणना सांगावयाची. पण तत्पूर्वी ऋग्वेद संहिता, तैत्तिरीयब्राह्मण, ऋग्वेद ज्योतिष, वेदांग ज्योतिष, पंचसिद्धांतिका इत्यादि प्रमुख ग्रंथांतील संवत्सरविषयक वचनें देणें जरूर असल्यानें तीं प्रथम देतो.

वेदमासो धृतव्रतो द्वादश प्रजावतः । वेदाय उपजायते ॥

ऋग्वेदसंहिता १-२५-८ मा. ज्यो. २८

धृतव्रत ( वरुण ) बारा महिने ( आणि ) त्यांत उत्पन्न होणारे प्राणी जाणतो ( आणि त्या बारा महिन्यां ) जवळ उत्पन्न होणारा जो ( अधिकमास ) त्यास जाणतो.

यांत अधिकमास असा प्रत्यक्ष शब्द जरी नाहीं तरी सदर्भावरून येथें अधिकमासच विवक्षित आहे हें उघड दिसतें. याप्रमाणेंच ह्या ऋचेचा अर्थ व व्याख्या परंपरेनें होत आलेली आहे. युरोपियन विद्वान देखील ह्या ऋचेचा अर्थ हाच मानतात. वर्षाचे मास सामान्यतः १२ हेंही या ऋचेंत आहे.

द्वादशारं नहितज्जराय वर्वर्ति चक्रं परिद्यामृतस्य ॥
आ पुत्रा अग्ने मिथुनासो अत्र सप्तशतानि विंशतिश्च तस्थुः ॥

—ऋ. सं. १. १६४. ११ मा. ज्यो. २८-२९

सत्यस्वरूपी ( सूर्या ) चे बारा अरे असलेलें चक्र, द्युलोकासभोंवतीं सदैव भ्रमण करीत असतें तरी नाश पावत नाहीं. हे अग्ने, या ( चक्रा ) वर पुत्रांची ७२० जोडपीं आरूढ झालेलीं असतात.

द्वादश प्रधयश्चक्रमेकं त्रीणि नभ्यानि क उ तच्चिकेत ॥
तस्मिन् त्साकं त्रिशता न शंकवोऽर्पिताः षष्टिर्न चलाचलासः

ऋग्वेद संहिता १. ६४. ४८. भा. ज्यो. २९

बारा परिधि, एक चक्र, तीन नाभि, हें सर्व कोणाला समजतें! त्या ( चक्रा ) ला शङ्कुप्रमाणें ३६० चंचल अरे एक लगत एक असे लावलेले आहेत.

वरील दोन ऋचातील वर्णन चमत्कारिक भासतें खरें, पण तें संवत्सर, (वर्ष) बारा मास व ३६० दिवस यास अनुलक्षून आहे हें उघड आहे. संवत्सर ( वर्ष ) हेंच कोणी एक चक्र होय. व त्यास बारा मास हेंच अरे होत. आणि ३६० दिवस हे ३६० खिळे होत. रात्र व दिवस हें एक युग्म म्हणजे जोडी आणि अशी ३६० युग्में म्हणजे रात्री व दिवस मिळून ७२० होतात.

मधुश्च माधवश्च शुक्रश्च शुचिश्च नभश्च नभस्यश्चेषश्चोर्जश्चसहश्च ॥
सहस्यश्च तपश्च तपस्यश्चोपयामगृहीतोऽसि सꣳसर्पोस्यꣳहस्पत्यायत्वा ॥

—तै. स. १. ४. १४. भा. ज्यो. २९.

( हे सोमा तू ) उपयामानें ( स्थालीनें ) घेतलेला आहेस. मधु, माधव, शुक्र, शुचि इत्यादि प्रत्येक तूं आहेस.

ह्यात मधु, माधव, शुक्र, शुचि, नभस, नभस्य, इष, ऊर्ज, सहस, सहस्य, तपस्, तपस्य, ही वैदिक म्हणजे वेदकालीन बाराही महिन्यांचीं नावें आलीं आहेत. आणि संसर्प हे अधिकमासाचें नाव आलें आहे. ह्यावर माधवानें जे भाष्य केलें आहे त्यात त्यानें अंहस्पति म्हणजे क्षयमास असें सांगितलें आहे.

मधुश्चमाधवश्चवासंतिकावृतू शुक्रश्चशुचिश्चग्रैष्मावृतू नभश्चनभस्यश्चवार्षिकावृतू इषश्चोर्जश्चशारदावृतू सहश्चसहस्यश्चहैमंतिकावृतू तपश्चतपस्यश्चशैशिरावृतू ॥

तै. स. ४. ४. ११. भा. ज्यो. २९.

मधु आणि माधव हे वसंतऋतूचे मास होत. ( येथें मास शब्द स्पष्ट दिलेला नाहीं. परंतु दोन मास म्हणजे एक ऋतु या सरणीनें मधु, माधव हीं नावें मासांचींच याबद्दल शंका नाहीं. कारण, प्रत्येक दोन दोन मासाला कोणता ऋतु हें त्याच्याच पुढें दिलेलें आहे. ) शुक्र व शुचि हे ग्रीष्म ऋतूचे, नभस् आणि नभस्य हे वर्षाऋतूचे, इष आणि ऊर्ज हे शरदृतूचे; सहस आणि सहस्य हे हेमंतऋतूचे, तपस् आणि तपस्य हे शिशिरऋतूचे याप्रमाणें ६ ऋतूचें १२ मास सांगितले आहेत.

एकं वा एतद्देवानामहः ॥ यत्संवत्सरः ॥

तै. ब्रा. ३-९-२२ भा. ज्यो. ६९

" संवत्सर हा देवाचा एक दिवस होय. " पृथ्वीवर उत्तरध्रुवस्थानीं मेरूवर देवाचें वास्तव्य असतें आणि ध्रुवस्थानीं ६ महिने दिवस व ६ महिने रात्र असते म्हणून संवत्सर हें देवाचें अहोरात्र असें वेदोत्तर कालीन ज्योतिषांत प्रसिद्ध आहे.

पंचसंवत्सरमयं युगाध्यक्षं प्रजापतिं । दिनर्त्वयनमासांगं प्रणम्यशिरसा शुचिः ।
प्रणम्य शिरसा कालमभिवाद्य सरस्वतीं । कालज्ञानं प्रवक्ष्यामि लगधस्यमहात्मनः ॥

ऋग्वेद ज्योतिष. १. २. भा. ज्यो. ७३.

दिवस, ऋतु, अयन, मास हीं ज्याचीं अंगें आहेत अशा पंचसंवत्सर ( पांच वर्षात्मक ) युगाध्यक्ष जो प्रजापति त्यास नमस्कार करून व त्याचप्रमाणें कालास व सरस्वतीस वंदन करून महात्मा लगध याचें कालज्ञान सांगतो.

ऋग्वेद ज्योतिषातील प्रारंभींचे २ श्लोक वर दिले आहेत त्यांतील संवत्सर शब्द आणि ऋग्वेदसंहिता व तैत्तिरीय संहिता यातील ऋचा ह्या सर्वांवरून संवत्सर हा शब्द वर्ष ह्या कालगणनेकरिताच वेदकालापासून उपयोगात आणलेला आहे. संवत्सर हा वर्षवाचक शब्द वैदिककालीन होय आणि तोच शब्द दर वर्षीच्या पंचांगात संवत्सराच्या नावापुढें वापरण्यात येतो.

संवत्सरोऽग्निः परिवत्सरोऽर्क इदादिकः शीतमयूखमाली ।
प्रजापतिश्चाप्यनुवत्सरः स्यादिद्वत्सरः शैलसुतापतिश्च ॥

श्रीमत् वराहमिहिरकृत बृहत्संहिता अध्याय ८ श्लो. २४ पृ. ५९

( पंचवर्षात्मक युगाच्या ) पहिल्या वर्षाचें नाव " संवत्सर " व त्याची देवता अग्नि. दुसऱ्या वर्षाचें नाव " परिवत्सर " व त्याची देवता सूर्य. तिसऱ्या वर्षाचें नाव " इदावत्सर " व त्याची देवता चंद्र. चवथ्या वर्षाचें नाव " अनुवत्सर " त्याची देवता ब्रह्मा. पांचव्या वर्षाचें नाव " इद्वत्सर." व त्याची देवता रुद्र. ह्याप्रमाणें एका युगातील ५ वर्षांच्या प्रत्येक संवत्सराचें नाव आहे.

युगात्मक पंचसंवत्सरापैकीं इष्ट शालिवाहन शकाचे वेळीं कोणता संवत्सर चालू आहे हें पाहावयाचें असता चैत्र ते पौषांतीपर्यंत इष्ट शालिवाहन शकातून १ कमी करावा ( म्हणजेच गतवर्ष संख्या घ्यावी. ) आणि बाकीच्या संख्येस पांचानीं भागावें. भागाकाराइतकी शकारंभापासून युगसंख्या गत झाली व त्याच्या-पुढील पंचवर्षात्मकयुग चालू आहे असें समजावें.

पांचानीं भाग देऊन जी बाकी राहिली असेल तें वर्ष पंचवर्षात्मक युगापैकीं इष्ट शकाच्या पौषअखेर-पर्यंत असें जाणावें तें येणप्रमाणेंः-बाकी १ राहिल्यास संवत्सर, २ राहिल्यास परिवत्सर, ३ राहिल्यास इदा-वत्सर, ४ राहिल्यास अनुवत्सर व ५ राहिल्यास इद्वत्सर, ह्याप्रमाणें कोणत्याही शालिवाहन शकीं वैदिक वेदांग ज्योतिष पद्धतीचें संवत्सर नाम कोणतें येतें पाहावें.

उदाहरणार्थः—४४४ ह्या वर्षी वेदांग ज्योतिष पद्धतीनें कोणता संवत्सर येतो हें पाहू. ४४४ – १= ४४३ ÷ ५ भाग ८८ बाकी ३ म्हणजे इदावत्सर हा वैदिक संवत्सर होय. अर्थात् हा संवत्सर पौषअखेर-पर्यंत आला व माघापासून अनुवत्सर सुरू होणार ह्या रीतीनें येणारा वैदिक संवत्सर हा त्या शकाच्या पौष कृ. ३० पर्यंतचा समजावा. कारण वैदिकसंवत्सरारंभ माघ शु. १ पासून होतो व पौष कृ. ३० ला संपतो. म्हणजे कोणत्याही शालिवाहन शकाच्या एका वर्षात पंचवर्षात्मक वैदिक संवत्सर दोन असतात. उदाहरणार्थ-शालिवाहन शके १८४६ ह्या वर्षी वैदिक संवत्सर पौषापर्यंत कोणता व त्यानंतर कोणता हें पाहू.

शके १८४६ – १ = १८४५ गत युगें ३६९ बाकी ० म्हणजे शके १८४६ पौषांतापर्यंत इद्वत्सर आणि माघ शु. १ पासून संवत्सर याप्रमाणें वैदिक संवत्सर आले.

शालिवाहन शक वर्ष १ चे माघापासून शककालानंतरचें पहिलें आदियुग सुरू झालें आणि म्हणूनच ज्योतिषसिद्धांतापैकीं प्रमुख सिद्धांत जो पंचसिद्धांतिकाग्रंथ त्यांत स्पष्ट म्हटलें आहे कीं,

द्व्यूनं शकेंद्रकालं पंचभिरुध्दृत्य शेषवर्षाणाम्
द्युगणं माघसिताद्यं कुर्यात् द्युगणं तदन्ह्युदयात् ।

–पंचसिद्धांतिका अध्याय १२ ज्यो. भूं. मार्ग. १८४७.

ह्याचा अगदीं उघड व स्पष्ट अर्थ असा कीं, इष्ट शकांतून २ वजा करून बाकीस ५ नें भागावें व बाकी उरेल तितके गतसंवत्सर झाले व त्याच्या पुढील संवत्सर सुरू आहे. तो वैदिक संवत्सर पौषापर्यंतचाच होय. त्यानंतर त्याच्यापुढील संवत्सर सुरू होणार. या रीतीनें चैत्र शु. १ ते पौष कृ. ३० पर्यंतच पाहावें. माघ शु. १ पासून फा. कृ. ३० पर्यंत १ वजा करावा. कारण तेव्हांच वैदिक संवत्सर बदलतो.

ह्या रीतीनें शके १८४६ चा वैदिक संवत्सर पाहूं–१८४६–२=१८४४÷५ बाकी ४ म्हणजे ४ संवत्सर गत झालें व ५ वा चालू आहे. पांचवा संवत्सर इद्वत्सर तो

१८४६ च्या पौषांतापर्यंत आहे. १८४६ च्या माघापासून पुन्हां संवत्सर या नांवाचा वैदिक संवत्सर सुरू होणार.

वर दोन रीति दिल्या आहेत. त्यापैकीं एकात, " जी बाकी येईल तेंच पचसवत्सर चक्रक्रमापैकीं इष्ट सवत्सर " वर्ष असें सांगितलें आहे. व दुसऱ्यात बाकी राहील तें "गतसवत्सर" वर्ष असून त्याच्यापुढील सवत्सर चालू, असें दिलें आहे, ह्या दोन्ही गोष्टी नीट लक्षात ठेवाव्या. कारण वैदिक सवत्सर माघ शु. १ ला सुरू होऊन पौष कृ. ३० ला सपतो.

पचसिद्धांतिकेंतील श्लोक आणि वैदिक पद्धतीच्या पचवर्षात्मक युगाची माहिती सांगितली ह्यावरून हें सहज लक्षात येईल कीं, सवत्सर हा शब्द शक याअर्थी म्हणजे वर्षात्मक कालगणनेकरिता वैदिककालीं फार प्राचीनकाळापासून योजीत असत. तोंच सांप्रतही प्रचारात असून त्याच्याच बरोबर शक हा शब्द वर्ष याअर्थी उपयोगात आणला जात आहे. वस्तुत वर दिलेल्या रीतींप्रमाणें सवत्सर काढण्याची यातायात करण्याचें फारसें कारण नाहीं. कारण शालिवाहन शके १च्या माघ शुद्ध प्रतिपदेला पचवर्षात्मक वैदिक युगाचें पहिलें वर्ष व सवत्सर सुरू झालें त्यावरून कोणत्याही शतकाच्या प्रत्येक शकास कोणतें वर्ष येतें हें खालील कोष्टकावरून लक्षात येईल.

शक—१–६–११–१६–२१–२६–३१–३६–४१–४६–५१–५६–६१–६६–७१–७६–८१–८६–९१–९६ ह्या प्रत्येक वर्षाच्या माघ शु १ पासून सवत्सर नावाचें वैदिक वर्ष सुरू होतें ( मग तें शतक कोणतेंही असो. ) अर्थात् त्याच शकाच्या पौ. कृ ३० पर्यंत इद्वत्सर या नावाचा सवत्सर चालू असतो. ह्यावरून केव्हांही लक्षात येईल कीं, शके १८४६ च्या माघात सवत्सर नावाचें वैदिक वर्ष सुरू होतें. वर दिलेल्या शक आकड्याच्यामागें कोणत्याही शतकाचे अक जोडा. त्यात वर दिल्याप्रमाणें त्या त्या शकाला माघ शु. १ पासून " सवत्सर " या नावाचें वैदिक वर्ष सुरू व्हावयाचें व त्यानतरच्या प्रत्येक वर्षाच्या माघात त्याच्या पुढील एकेक सवत्सर यावयाचा. ह्या रीतीनें व सरणीनें वाटेल त्या शकाचे व पाहिजे तितक्या प्राचीन काळचे वैदिक सवत्सर नाव काढता येईल.

ह्या पद्धतीनें शालिवाहन शके ४९६ या वर्षाच्या माघ महिन्यात वैदिक युग पद्धतीपैकीं पहिला " सवत्सर " हाच सुरू होतो ही विशेष महत्त्वाची गोष्ट आहे कारण शके ४९६ हें शुद्ध पचागाचे व शुद्ध निरयन रैवत पक्षाचे वैदिक परपरेनें पूर्ण सबधित व निगडित असें सर्वतोपरी शुद्ध व निश्चित आरभस्थान-वर्ष आहे.

## आर्बी सनांच्या संख्येचीं नांवें.

| | | | |
|---|---|---|---|
| १ इहिदे | ११ इहिदे अशर | ३० सलासीन | ३०० सलास मय्या |
| २ इसने | १२ इसने अशर | ४० अर्बैन | ४०० अर्बा मय्या |
| ३ सलास | १३ सलास अशर | ५० खमसैन | ५०० खमस मय्या |
| ४ अर्बा | १४ अर्बा अशर | ६० शीतैन | ६०० शीत मय्या |
| ५ खमस | १५ खमस अशर | ७० सब्बैन | ७०० सब्बा मय्या |
| ६ शीत | १६ शीत अशर | ८० समानीन | ८०० समान मय्या |
| ७ सब्बा | १७ सब्बा अशर | ९० तिस्सैन | ९०० तिस्सा मय्या |
| ८ समान | १८ समान अशर | १०० मय्या | १००० अल्फ |
| ९ तिस्सा | १९ तिस्सा अशर | १०१ इहिदे मय्या | |
| १० अशर | २० अशरीन | इत्यादि | उदाहरण—९८७ |
| | २१ इहिदे अशरीन इत्यादि | २०० मय्यातैन | याप्रमाणें लिहितात:— |

सब्बा ( ७ ) समानीन ( ८० ) तिस्सा मय्या ( ९०० ). तसेंच ( ११०१ )-इहिदे ( १ ) मय्या ( १०० ) व अल्फ ( १००० ). तसेंच ( १४६० )–शीतैन ( ६० ) अर्बा मय्या ( ४०० ) व अल्फ ( १००० ) " यांत अंकानां वामतोगतिः असाच प्रकार आहे '

टीप—दरएक अकापुढें " ऐन " जोडल्यानें त्या अकाची दसपट होते. जसें:—
खमस ५ + ऐन = खमसैन ५० तिस्सा + ऐन = तिसैन ९० इत्यादि.

हिजरी सन—हा मूळचा अरबस्थानांतला होय. मुसलमानांच्या अंमलापासून तो ह्या देशांत आला. हिजरा म्हणजे पळणें. मुसलमानांचा पैगंबर महंमद हा इसवी सन ६२२ ता. १५ जुलई शक ५४४ श्रावण शुद्ध १ गुरुवार रात्रीं ( मुसलमानी शुक्रवारच्या रात्रीं ) मक्काहून मदिनेस पळून गेला. म्हणून ह्या सनास हिजरी म्हणतात. आणि त्या पळण्याची वेळ ही ह्या सनाची आरंभ वेळ धरिली आहे. ह्या सनाचे महिने मोहरम इत्यादि चांद्र आहेत. आणि अधिकमास मुळींच धरीत नाहींत, यामुळें हें वर्ष केवळ चांद्र म्हणजे ३५४ किंवा ३५५ दिवसांचें आहे. आणि यामुळें दर ३२ किंवा ३३ सौर वर्षांत या सनाच्या वर्षांचा अंक कोणत्याही सौर कालाच्या वर्षांच्या अंकापेक्षा १ वाढतो. शुद्ध प्रतिपदा किंवा द्वितीया या तिथीस चंद्रदर्शन झाल्यापासून महिना सुरू होतो. महिन्याचा पहिला दिवस, दुसरा दिवस असें म्हणण्याऐवजीं पहिला चंद्र, दुसरा चंद्र असें म्हणतात. असे चंद्र ( दिवस किंवा तारखा ) महिन्यांत २९ किंवा ३० होतात. वाराचा आणि तारखेचा आरंभ सूर्यास्तीं होतो. यामुळें हिंदुलोकांची जी गुरुवारची रात्र ती मुसलमानी शुक्रवारची रात्र होय. दिवसास वाराचें नांव दोघांचें एकच असतें.

इंग्रजी तारीख व वार रात्रौ १२ वाजता बदलतो. हिंदु वार सूर्योदयास बदलतो आणि मुसलमानी वार सूर्यास्तापासून बदलतो. म्हणजे हिंदु-युरोपियन व मुसलमान यांचा वार दिवसा सर्वांचा एकच असतो.

फारशी किंवा फसली सनः—हें पिकाच्या हंगामाचें वर्ष अकबर यानें सुरू केलें. प्रथम हिजरी सनाचाच वर्षांक यास लाविला, परंतु हिजरी वर्ष केवळ चांद्र [ ३५४ दिवसांचें ] आहे, व फसली हें सौर आहे; यामुळें पुढें वर्षांच्या अंकांत फरक पडत चालला. हिजरी सन ९६३, इसवी सन १५५६, या वर्षीं म्हणजे अकबर राज्यावर बसला त्यावर्षीं उत्तर हिंदुस्थानांत फसली सन सुरू झाला आणि दक्षिण हिंदुस्थानांत शाहाजहान बादशहानें इ. स. १६३६ म्हणजे हिजरी सन १०४६ या वर्षी तो सुरू केला. प्रथम त्यास वर्षांक हिजरी सनाचा म्हणजे १०४६ वें वर्षी लागला. आणि त्यावेळीं उत्तरेकडील फसली सन १०४४ होता. यामुळें दक्षिणेकडील फसली वर्षांचा अंक उत्तरेच्या अंकापेक्षा जास्त झाला. ( हिजरी वर्ष केवळ चांद्र म्हणून असें झालें. ) वर्षारंभ दोहींकडे भिन्न धरल्यामुळें आणखी कांहीं महिन्यांचें अंतर पडलें. हें वर्ष केवळ सरकारी असल्यामुळें, आणि याचा धर्माशीं संबंध नसल्यामुळें ह्याचा वर्षारंभ अनियमित झाला असें दिसतें. मद्रास इलाख्यांत प्रथम ह्या वर्षांचा आरंभ आडा ( कर्क ) महिन्याच्या पहिल्या दिवशीं होत असे. इ. स. १८०० मध्यें इंग्लिश सरकारनें जुलईच्या १३ व्या तारखेस फसली वर्षांचा आरंभ ठरविला; आणि पुढें इ. स. १८५५ मध्यें तो जुलईच्या पहिल्या तारखेस ठरविला. मुंबई इलाख्याच्या कांहीं भागांत सूर्य मृगनक्षत्रीं जातो त्या दिवशीं ( हल्लीं जुन्या पंचांगाप्रमाणें जूनच्या ६, किंवा ७ तारखेस व नव्या पंचांगाप्रमाणें २ किंवा ३ तारखेस ] फसली वर्षांचा आरंभ होतो. थोड्या वर्षांपूर्वी हल्लींचे निजाम सरकारचें वडिलांनीं जुन्या फसलीच्या तारखेंत फेरफार करून आजूर महिन्यापासून सनाचा आरंभ ठरविला आहे. तो भाद्रपद किंवा आश्विन या महिन्यांत असतो.

## फारशी महिन्यांचीं नांवें व दिवस.

आजूर ३०, दय २९, बहमन ३०, इसपिंदाद ३०, फरवर्दी ३१, आर्दिबेहस्त ३१; खुर्दाद ३१, तीर ३१, अमरदाद ३१, शहरेवार ३१, मेहर ३० आणि आबान ३०. ह्याप्रमाणें वर्षाचे एकंदर दिवस ३६५ असतात. दर वर्षांत पूर्ण वर्षांचा काल भरण्यास सुमारें ६ तास २३ मिनिटें कमी पडतात. म्हणून इंग्रजी पद्धतीप्रमाणें ज्या फसली सनाच्या अंकास चार या संख्येनें निःशेष भाग जातो त्या सालीं दय महिना ३० तारखेचा धरतात. फसली साल हिजरी सालाप्रमाणें चांद्रमानाचें नसून सौरमानाचें असल्यामुळें, दर ३३ वर्षांनीं त्या दोहोंत एक वर्षाचें अंतर पडतें. म्हणजे तें वर्ष सौर आहे; परंतु त्याचे महिने मोहरम इत्यादि चांद्र आहेत. उत्तर हिंदुस्थानांत बहुधा सर्वत्र पूर्णिमांत मानाच्या आश्विन कृष्ण प्रतिपदेस फसली वर्षांचा आरंभ होतो. म्हणजे तेथल फसली वर्ष चांद्र सौर आहे. बंगाल्यांत फसली १३०० या वर्षांचा आरंभ इ. स. १८९२ च्या सप्टंबरांत झाला. आणि दक्षिणेंत इ. स. १८९० च्या जून किंवा जुलई महिन्यांत फसली सन १३०० हें वर्ष लागलें. दक्षिणेंतील फसली सनाच्या वर्षांत ५१२।१३ मिळविले म्हणजे शक निघतो; आणि ५९०।९१ मिळविले म्हणजे

इसवी सन निघतो. बंगाल्यांतील फसली वर्षांत ५१४।१५ मिळविले म्हणजे शकवर्ष निघतें आणि ५९२।९३ मिळविले म्हणजे इ. स. निघतो. बंगाल्यांतील फसली, विलायती, आणि अमली, या तिन्ही सनाचा अंक वर्षांत फार तर १८ दिवस खेरीज करून एकच असतो. या तिन्ही सनाहून बंगाली सन फक्त सुमारें ६।७ महिन्यांनीं धाकटा आहे. वस्तुतः बंगाली, विलायती, अमली आणि बंगाली फसली यांचें मूळ एकच-फसली सन हें होय, पुढें त्यांच्या आरंभांत थोडथोडा फरक पडला, हें उघड दिसतें.

सूरसन अथवा शाहूरसन याला कधीं कधीं आरबीसन असेंही म्हणतात. इ. स. १३४४ हिजरी सन ७४५ या वर्षी सूरसन सुरू झाला, आणि प्रथम हिजरी सनाचा अंक ७४५ हाच त्यास लाविला. फसली सन दक्षिणेंत सूरसनानंतर २९२ वर्षांनीं हिजरी सन १०४६ या वर्षी सुरू झाला. तेव्हां सूरसन १०३७ होता म्हणून सूरसन आणि दक्षिणी फसली यांत ९ वर्षांचें अंतर पडलें. मराठ्यांच्या कारकीर्दीत सूरसन फार प्रचारांत होता. हा मुंबई इलाख्यांतील फसली सनाहून नऊ वर्षांनीं लहान आहे. परंतु इतर सर्व गोष्टींत दोन्ही एकच आहेत. ह्याच्या वर्षाचा आरंभ सूर्य मृगनक्षत्रा जातो तेव्हां होतो. म्हणजे याचें वर्ष सौर आहे. परंतु याचे महिने मोहरम इत्यादिक चांद्र आहेत. सूरसनाच्या वर्षांत ५२१।२२ मिळविले म्हणजे शक येतो, आणि ५९९।६०० मिळविले म्हणजे इ. स. येतो.

बंगाली, विलायती, अमली हे सन उत्तरेकडील फसलीचे विशेष प्रकार होत, आणि उत्तरेकडील फसली दक्षिणेकडील व सूरसन हे हिजरीचे विशेष प्रकार होत.

पारशी शक—पारशी लोकांचे शकाला एजदीजर्द असें म्हणतात.

हाही आपले पंचांगांत दाखवितात, हा शालिवाहन शकाच्या ५५२ वर्षांनंतर किंवा इसवी सनाच्या ६३० वर्षांनंतर सुरू झाला. हा सन पर्शियांत [ इराणांत ] सुरू झाल्यानंतर सुमारें ४०।५० वर्षांनीं पारशी लोक हिंदुस्थानांत आले. ते पर्शिया देशांतून आले म्हणून त्यास पारशी म्हणतात. पारशी लोकांना हिंदुस्थानांत येऊन सुमारें १२५० वर्षें होऊन गेलीं. याचा महिना सावन म्हणजे पूर्ण ३० दिवसांचा असतो. अर्थात् वर्षाचे दिवस ३६० होतात. परंतु सौर वर्षाशीं मेळ बसावा म्हणून हे लोक वर्षाच्या शेवटीं पांच दिवस अधिक धरतात, त्यास गाथागंबर असें म्हणतात. हे दिवस पारशी लोक फार महत्त्वाचे समजतात. त्यांच्या महिन्यांचीं नांवें:—१ फरवर्दीन. २ आर्दीबेहस्त. ३ खोरदाद. ४ तिर. ५ अमरदाद. ६ शरेवर. ७ मेहर. ८ आबान. ९ आदर. १० देहे. ११ बहमन. १२ अस्पदादमाद. अशीं आहेत.

## शालिवाहन शक, विक्रम शक, श्री शिवाजी महाराजांचा राजशक आणि हिंदुस्थानांत चालणारे इतर सन यांचा आरंभ कधीं होतो याजबद्दलची माहिती.

( १ ) शालिवाहन शकास आरंभ चैत्र शुद्ध १ प्रतिपदेस [ सुमारें तारीख १० मार्च ते १२ एप्रिल चे दरम्यान ] होतो.

( २ ) विक्रम शकाचा (संवत) आरंभ कार्तिक शुद्ध प्रतिपदेस ता. ११ आक्टोबर ते ११ नोव्हेंबर यांचें दरम्यान ] होतो.

३ शिवाजी महाराजांचा राजशक [ त्यांनीं आपणांस राज्याभिषेक करून घेतला तेव्हांपासून राजशक सुरू केला आहे ] याचा आरंभ ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशीस म्हणजे साधारणतः मे किंवा जून महिन्यांत होतो.

( ४ ) आरबी सनाचा आरंभ सूर्य ज्यादिवशीं मृग नक्षत्रांत येतो म्हणजे हल्लीं जून महिन्याचे २।३ तारखेस [ वैशाखअखेर किंवा ज्येष्ठ महिन्यांत ] होतो. जुन्या पंचांगाप्रमाणें ६ अगर ७ तारखेस येतो.

+ जुने पंचांगाप्रमाणें पूर्वी मृग नक्षत्रास आरंभ ता० ५।६ जून रोजीं होत असे, आतां ता० ६।७ जूनला आरंभ होऊं लागला आहे. व कांहीं वर्षांनीं ८।९ तारखेस होईल.

( ५ ) फसली सनास आरंभ वरील प्रमाणेंच मृग महानक्षत्रास होतो, परंतु मार्जी निजामसरकारांनीं तो आजूर महिन्यापासून सुरू केला. तो महिना भाद्रपद किंवा आश्विन महिन्यांत येतो.

( ६ ) इसवी सनास आरंभ जानेवारीच्या पहिल्या तारखेस ( मार्गशीर्ष कृष्णपक्षांत किंवा पौष महिन्यांत) होतो.

(७) हिजरी सनास आरंभ मोहरम महिन्याचे पहिले तारखेस होतो.

(८) पारशी सनास आरंभ पूर्वी सन १८३७ मध्यें आक्टोबर महिन्यांत होत होता. हल्लीं सप्तंबर महिन्यांत होऊं लागला आहे. त्यावेळीं मराठी सुमारें भाद्रपद असतो, ज्यावेळीं इंग्रजी फेब्रुवारी महिन्याचे २९ दिवस त्या वर्षी या वर्षाचा आरंभ एक दिवस पूर्वी होतो. वर्षाचे दिवस ३६५ असतात, प्रत्येक महिना ३० दिवसांचा, त्या मानानें १२ महिन्यांचें ३६० दिवस होतात आणि वर्षाचे अखेरच्यां महिन्यांत शेवट [गाथा] अशा अक्षरांच्या पांच तारखा घालून ३६५ दिवस पुरे करून घेतात.

पारशी वर्ष समाप्तीचे वेळीं तारखांच्या शेवटीं ५ दिवस पंचांगांत "गा" "गा" असें लिहिलेलें असतें त्यास गाथा असें म्हणतात.'

(९) यहुदी सन भाद्रपद कृष्ण ३० पर्यंत असतो. पुढें आश्विन शुद्ध प्रतिपदेपासून पुढील सनास आरंभ होतो. यहुदी लोकांत अधिक मास मानण्याची चाल आहे. तो सर्वदा फाल्गुन मासांत धरतात. इतर महिन्यांत धरीत नाहींत. याकरितां क्वचित् भाद्रपद शुद्ध प्रतिपदेपासून सन फिरवितात.

## शालिवाहन शकांवरून गतकलि काढणें. व गत कलीवरून शालिवाहन शक काढणें.

॥ नंदाल्यष्टिगणैर्युक्तः शालिवाहनकः शकः ॥

॥ कलिर्गतोऽथ हीनोऽसौ तेनांकेन शको भवेत् ॥ १ ॥ राजावली.

॥ शालिवाहनगताब्द संयुताः खेचरादिकुगुणाः कलेर्गताः ॥

॥ ताः समः खखनखाग्निसिंधुषु प्रच्युता अथ समास्तदेप्यकाः ॥२॥ पं.सा. सा.

अर्थः—शालिवाहन शकांत ३१७९ मिळवावे म्हणजे येणाऱ्या संख्येइतकी वर्षे गतकलीची झाली. आणि गतकलींत ३१७९ वजा करावे म्हणजे शालिवाहन शक निघतो. एकंदर कलियुग वर्षे ४३२००० यांत गतकलि वजा केला म्हणजे भोग्य अथवा शेष कलि निघतो.

उदाहरणः—शालिवाहन शके १८५२ + ३१७९ = ५०३१ ही चैत्र शुद्ध प्रतिपदेचीं गत कलि वर्षे. गत कलि ५०३१ – ३१७९ = १८५२ हा शालिवाहन शक चत्र शुद्ध प्रतिपदेचा. ४३२००० – ५०३१ हा गतकलि = ४२६९६९ शेष कलि हें उत्तर. म्हणजे १८५२ आरंभीं शेष कलि ४२६९६९.

## विक्रमशका ( संवत् ) वरून गत कलि काढणें.

॥ तथात्र विक्रमः शाको वेदवेदाभ्रपावकैः ॥ २ ॥

अर्थः—वरील प्रमाणेंच विक्रम शकांत ३०४४ मिळविले म्हणजे येणारा वर्ष कलात्मक गत कलि निघतो, आणि गत कलींत ३०४४ वजा केले म्हणजे विक्रम शक निघतो,

उदाहरण—विक्रमशक १९८६ – ३०४४ = ५०३० गत कलि. त्याच्या उलट करून पाहतां गत कली ५०३० – ३०४४ = १९८६ हा विक्रम शक आला.

## शालिवाहन शकावरून विक्रम शक काढणें.

शालिवाहन शकांत १३४ मिळविले म्हणजे चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून आश्विन कृष्ण ३० पर्यंत शक ( संवत् ) निघतो, आणि त्यांत एक जास्त मिळविला म्हणजे कार्तिक शुद्ध प्रतिपदेपासून विक्रम शका (संवत) आरंभ समजावा.

उदाहरणः—शालिवाहन शक १८५२ + १३४ = १९८६ हा चैत्र शुद्ध प्रतिपदेचा संवत होय. यांत एक अधिक मिळविला म्हणजे १९८७ हा कार्तिक शुद्ध प्रतिपदेपासूनचा विक्रमशक ( संवत ) येतो.

## शालिवाहन शकावरून शिवाजीचा राजशक काढणें.

इष्ट शकांत १५९६ वजा करावें म्हणजे ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशीस ज्या राजशकाची समाप्ति होते, तो शक येतो. पुढें राजशकाचा वर्ष-आरंभकाल काढणें झाल्यास समाप्तीच्या शकांत एक अधिक मिळवावा, म्हणजे ज्येष्ठापासूनच्या राजशकाचा आरंभाचा काल निघतो.

उदाहरणः—शालिवाहन शके १८५२ च्या श्रावण मासीं राजशक कोणता? शालिवाहन शके १८५२–१५९६ = २५६ हा राजशक ज्येष्ठ शुद्ध १३ हीच्या अगोदरचा समजावा. यात आणखी एक जास्त मिळविला म्हणजे २५६ + १ = २५७ हा राजशक शके १८५२ च्या ज्येष्ठ शुद्ध १३ शी पासून आरंभाचा समजावा. अर्थात् श्रावण मासातील राजशक २५७ हाच होय.

## शालिवाहन शकावरून आरबी सन काढणें.

शकांत ५२२ वजा करावे. बाकी राहील तो आरबीसन समजावा. परंतु त्यात एक जास्त केला म्हणजे पुढील सन समजावा.

उदाहरण—शके १८५२ ज्येष्ठ मासीं आरबी सन कोणता?

शके १८५२ – ५२२ = १३३० हा आरबी सन होय. यांत एक जास्त केला म्हणजे १३३० + १= १३३१ हा ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमेच्या सुमाराचा होय. ३१ इहिदे अह्लाशीन, ३०० सल्लासमया, १००० अलफ ही बेरीज केली म्हणजे १३३१ हा सन आला.

## शालिवाहन शकावरून फसली सन काढणें.

शकांत ५१३ वजा करावे; बाकी राहील तो फसली सन झाला. यांत एक जास्त केला म्हणजे पुढील वर्षाचा फसली सन समजावा.

उदाहरण—शके १८५२ – ५१३ = १३३९ हा फसली सन होय. यांत एक जास्त केला म्हणजे (१३३९ + १ = १३४० हा आश्विन महिन्यातील फसली सन होय.)

## शालिवाहन शकावरून इसवी सन काढणें.

शालिवाहन शकात ७८ मिळविले म्हणजे चैत्रापासून मार्गशीर्ष कृष्ण पक्षापर्यंत इसवी सन होतो. त्यात एक जास्त मिळविला म्हणजे जानेवारीच्या आरंभाचा अर्थात् पौषापासूनचा इसवी सन येतो.

उदाहरणः—शके १८५२ चैत्र महिन्यात अर्थात् पौषा पासूनचा इसवीसन कोणता?

शके १८५२ + ७८ = १९३० हा इसवीसन चैत्रमासातील होय. यात एक जास्त मिळविला म्हणजे १९३० + १ = १९३१ हा इसवीसन पुढील वर्षाचा जानेवारीचे पहिले तारखेचा म्हणजे शके १८५२च्या पौषापासूनचा झाला.

## शालिवाहन शकावरून हिजरी सन काढणें.

शालिवाहन शक तीन ठिकाणी मांडून नंतर पहिल्या प्रतीस ३२ नीं भागून भाग वर्षें व महिन्याचा घ्यावा. त्यात दुसरे प्रतीस १६२ नीं भागून मासादि जो भागाकार येईल तो वजा करावा आणि ती बाकी तिसरे प्रतींत मिळवून त्यात ५६० वर्षें व १ महिना वजा करावा. जी बाकी राहील तो हिजरी सन आणि मोहरमादि महिना समजावा.

उदाहरणः—शके १८५२ अश्विनमासीं हिजरी सन आणि मोहरमादि महिना कोणता?

**प्रत १.**

३२ ) १८५२ ( ५७ वर्षे १० म.
१६०　　　— ११
२५२　　　५६—११
२२४
२८
× १२
३२ ) ३३६ ( १०
३२
१६

**प्रत २.**

१६२ ) १८५२ ( ११
१६२
२३२
१६२
७०

**प्रत ३.**

वर्षे　आश्विन
१८५२— ७
+ ५६—११
१९०९— ६
— ५६०— १
१३४९— ५

हा हिजरीसन व जमादिलावर हा महिना आला.

## हिजरी सनांतील १२ महिन्यांचीं नांवें पुढीलप्रमाणें:—

| | | | |
|---|---|---|---|
| ( १ ) मोहरम | ( ४ ) रबिलाखर | ( ७ ) रज्जब | ( १० ) सवाल |
| ( २ ) सफ्फर | ( ५ ) जमादिलावर | ( ८ ) साबान | ( ११ ) जिल्काद |
| ( ३ ) रबिलावल | ( ६ ) जमादिलाखर | ( ९ ) रमजान | ( १२ ) जिल्हेज |

हिजरी सनांत म्हणजे मुसलमान लोकांत अधिक महिना मानीत नसल्यामुळें व हिंदु लोकांत अधिक-मास असल्यानें मुसलमानांचा मोहरम दर तीन वर्षांनीं एकेक महिना अलीकडे येतो.

## शालिवाहन शकावरून पारशी सन [ एजदीजर्द ] काढणें.

शालिवाहन शकांत ५५३ वजा केले म्हणजे भाद्रपद मासापर्यंत मागील सन येतो. पुढील सन काढणें झाल्यास त्यात एक जास्त मिळवावा म्हणजे भाद्रपद मासांपुढील पारशी सन येतो.

उदाहरण—शके १८५२ — ५५३ = १२९९ हा पारशी सन भाद्रपद मासापर्यंतचा आला. यांत १ जास्त मिळविला म्हणजे १२९९ + १ = १३०० हा पारशी सन शके १८५२च्या भाद्रपद कृष्ण पक्षापासून पुढच्या कालाचा वर्षारंभ आला.

## शालिवाहन शकावरून यहूदी सन काढणें.

शालिवाहन शकांत ३८३८ मिळवावें म्हणजे तो यहूदी सन होतो; हा भाद्रपद कृष्ण ३० पर्यंत असतो.

उदाहरणः—शके १८५२ + ३८३८ = ५६९० हा भाद्रपद कृष्ण ३० पर्यंतचा आहे. यात एक जास्त मिळविला म्हणजे ५६९० + १ = ५६९१ हा पुढील यहूदी सन आला.

## जानेवारीचे पहिले तारखेस कोणती तिथि होती ?

इसवी सनात १६०१वजा करावे. बाकी राहील त्यास ४००नीं भागावें. भागाकार येईल त्यास चतुः-शति म्हणावें, शेष बाकी राहील त्यास १०० नीं भागावें; भागाकार येईल त्यास शेकडा म्हणावें. बाकी राहील त्यास ४ नीं भागावें; भागाकार येईल त्यास चौकडा म्हणावें; शेष राहील त्यास वर्ष म्हणावें.

चतुःशतीस नऊ तिथी आणि १९॥ घटिकांनीं गुणावें; शेकड्यास २४ तिथी आणि ३५ घटिकांनीं गुणावें. चौकड्यास १४ तिथी आणि १३॥ घटिकांनीं गुणावें आणि वर्षास १० तिथी आणि ४८ घटिकांनीं गुणून एकंदर गुणाकाराची बेरीज करावी व त्यांत २६ तिथि ५२ घटका मिळवून बेरजेचे तिथीस ३० नीं भागून जी बाकी राहील ती जानेवारीचे आरंभास सामान्यतः गत तिथि होय.

## महिना काढणें.

जानेवारीची पहिली तारीख शुद्ध प्रतिपदेपासून कृष्ण पंचमीपर्यंत आल्यास पौष मास समजावा व त्याचे पुढें इतर तिथि आल्यास मार्गशीर्ष महिना समजावा. पौष शुद्ध अष्टमीपासून पौष कृष्ण अष्टमीपर्यंत जानेवारीची पहिली तारीख आल्यास त्या सनांत अधिक मास येतो असें स्थूलमान समजावें. यांत १।२ तिथीचा क्वचित् फरक पडतो.

## वार काढणें.

चौकडा व शेंकडा यांचें मिळवणीचे पांचपटींत वर्षे मिळवून आणखी दोन मिळवावें व त्यास ७ नीं भागावें; बाकी राहील तो वार समजावा. वार रविवारपासून मोजावेंत.

## शालिवाहन शक काढणें.

इसवी सनांत ७९ वजा करावे म्हणजे इसवीचें आरंभापासून शक समाप्तीपर्यंत शक होतो. पुढें १ मिळविला म्हणजे इसवीचे समाप्तीपर्यंत शक येतो.

**उदाहरण**—इसवी सन १९१५ ला जानेवारीची पहिली तारीख कधीं झाली आणि त्याचा शालिवाहन शक महिना, पक्ष, तिथि आणि वार कोणता!

इ. स. १९१५ उणे ७९ = १८३६ + १ = १८३७ हा शालिवाहन शक झाला.

इ. स. १९१५ उणें १६०१ = ३१४ ÷ ४०० = चतुःशति ० × ९।१९॥ = ०

बाकी ३१४ ÷ १०० = शेकडा ३ × २४।३५ = ७३।४५

बाकी १४ ÷ ४ = चौकडा ३ × १४।१३॥ = ४२।४०॥

बाकी २ शेष ∴ वर्षे २ × १०।४८ = २१।३६

एकूण १३८।१॥

एकूण बेरीज १३८ । १॥ + तिथी २६ । ५२ = १६४ । ५३॥ ÷ ३० भागाकार ५ बाकी १४

∴ गत तिथि १४ + १ = १५ पौष शुद्ध पौर्णिमा. ही जानेवारीच्या पहिल्या तारखेची तिथि होय.

## वार काढण्याची रीति.

शेंकडा ३ + चौकडा ३ = ६ × ५ = ३० + वर्षे २ = ३२ + २ = ३४ ÷ ७ = भागाकार ४

∴ बाकी ६ हा वार शुक्रवार होय.

इसवी सन १९१५ चे जानेवारीच्या पहिले तारखेस शालिवाहन शके १८३६ पौष शुद्ध १५ रोज शुक्रवार हें उत्तर.

## इंग्रजी तारखेवरून मराठी महिना, पक्ष, तिथि आणि वार काढणें.

इंग्रजी गतमासांचे एकंदर दिवस करून त्यात चालू महिन्याच्या सांगितलेल्या तारखांसुद्धां बेरीज घ्यावी. आणि त्यांत त्याचा त्रेसष्टांश हिस्सा मिळवावा आणि इसवी आरंभाची म्हणजे जानेवारी ता. १ ची तिथि मिळवून ३० नीं भागावें. बाकी राहील ती तिथि समजावी; पंधराचे आंत शुक्लपक्ष व पुढें कृष्णपक्ष समजावा.

## महिना काढणें.

तिसांनीं भागून जो भागाकार आला असेल त्यांत इसवी आरंभाचे म्हणजे जानेवारी ता. १ चे मराठी महिने मिळवून त्यांत १२ वजा करावें, बाकी राहील तो गत महिना समजावा. बारा वजा न जातील तर तोच गत महिना. म्हणून त्याचेपुढील महिना तो इष्टमास समजावा.

## वार काढणें.

इंग्रजी गत मासाचे चालू महिन्याच्या तारखासुद्धा बेरीज करून त्यांत जानेवारीच्या पहिले तारखेचा वार मिळवून ७ नीं भागावें, बाकी राहील त्यात एक वजा करावा. जी बाकी राहील तो वार समजावा. वार रविवारापासून मोजावे.

उदाहरणार्थ ता. १५ मार्च १९३० ह्या दिवशीं शालिवाहनशक, महिना, पक्ष, तिथि आणि वार कोणता हें काढूं.

इसवी सन १९३० यात ७९ वजा
हा शालिवाहन शक १८५१
**वार काढणे**
गत मासाचे दिवस ७४
+ जानेवारी १ चा वार ४

```
७ ) ७८ ( ११
    ७
    ०८
     ७
     १
```

बाकी १ राहिली त्यात १ वजा करता बाकी शून्य म्हणजे शनिवार

इंग्रजी गतमास व मार्च १५ पर्यंतचे एकंदर दिवस.

```
६३ ) ७४ ( १
      +१
      ७५
जाने. ता. १ ची तिथि १
३० ) ७६ ( २ मास
      ६०
      १६  +९ इ स. आरभापर्यंत
          ११ महिन मराठी मास.
```

म्हणजे ता. १५ मार्च १९३० रोजीं मराठी ११ मास पूर्ण व १६ तिथि अर्थात् फाल्गुन कृ. १ शनिवार शके १८५१ ह्याप्रमाणें उत्तर आहे.

## तारखेवरून तिथि काढणें.

चालू सनास १९ नें भागावें बाकी राहिल त्यास ११ नें गुणून ३० नें भागावें जी बाकी राहिल ती जानेवारी ता. १ ची सुमारानें तिथि येते. या पद्धतीनें सन १८०० ते २००० पर्यंतच्या तिथि काढता येतील. क्वचित् एखाद्या तिथीचा फरक पडेल.

उदाहरण —सन १९२९ अक्टोबर ता. २० ला तिथि कोणती.

```
१९ ) १९२९ ( १०१        बाकी   १०
     १९                      ×११
     ००२९           ३० ) ११० ( ३
       १९                  ९०
       १०                  ०२०
```

बाकी २० म्हणजे पौष कृ० ५ अगर पहील्या जानेवारीची पहिली तारीख पाहिजे त्याप्रमाणें पहील आहे.

उदाहरण २ रें —सन १९३० ता १ जानेवारीला तिथि कोणती !

```
१९ ) १९३० ( १०१        बाकी   ११
     १९                      ×११
     ००३०           ३० ) १२१ ( ४
       १९                 १२०
       ११                 ००१
```

बाकी १ म्हणजे पौष शु० १ हा जानेवारीची पहिली तारीख पाहिजे त्याप्रमाणें प्रतिपदेला आहे

## इसवीचे आवलीचे पुढील तारखा काढण्याची रीति

## तिथीवरून इंग्रजी तारीख काढणें.

ज्या महिन्यांतील ज्या तिथीस इंग्रजी तारीख पहावयाची असेल त्या शकाचे आरंभापासून इसवी सनाचे समाप्तीपर्यंत फक्त १२ बारा मिळवावेत आणि त्यात इसवीने तिथींत महिने वजा देऊन बाकी राहील त्या महिन्यास ३० नीं गुणून त्यात त्या वरच्या तिथी मिळवून त्यात त्याचा ६४ वा हिस्सा वजा करून बाकी राहील त्याच्या दोन प्रती कराव्या एका प्रतींत जानेवारीपासून जितक्या महिन्यांच्या तारखा वजा जातील तितक्या वजा देऊन बाकी राहील त्यांत एक मिळवावा म्हणजे चालू महिन्याची तारीख झाली.

## वार काढणें.

दुसऱ्या ठेविलेल्या प्रतींत इसवी आरंभाचा वार मिळवून ७ नीं भागून जी बाकी राहील तो वार समजावा. वार नच मिळाल्यास त्यांत एक अधिक किंवा उणा करावा.

## महिना काढणें.

जानेवारीपासून जितक्या महिन्यांचे दिवस वजा जातील तितके गतमास झाले. पुढील महिना कायम म्हणजे इष्टमास समजावा.

उदाहरण—शके १८३६ आश्विन शुद्ध १५ पौर्णिमा ह्या दिवशीं इंग्रजी सन, महिना, तारीख आणि वार कोणता तें पाहूं !

शके १८३६ यांत<br>
+ ७८<br>
हा इंग्रजी सन १९१४

प्रत दुसरी<br>
२७६<br>
इसवी आरंभाचा + ५<br>
वार ७ ) २८१ ( ४०<br>
२८०<br>
१ हा रविवार होय.

महिने ६ — तिथी १५ यांत<br>
+ १२ — + ०<br>
१८ — १५<br>
− ९ — − ५ जानेवारीच्या पहिल्या तारखेस मराठी<br>
९ — १० महिने आणि तिथी.<br>
× ३० = २७० + १० = २८०<br>
६४ ) २८० ( ४ भागाकार हा त्यांतच वजा.<br>
− ४<br>
बाकी २७६ यांत प्रत पहिली.<br>
−२७३ जानेवारीपासून सप्तेंबरअखेर तारखांची बेरीज वजा.<br>
बाकी ३ यांत<br>
+ १

ही बेरीज आक्टोबरची ४ थी तारीख होय. हें उत्तर.<br>
इसवी सन १९१४ तारीख ४ आक्टोबर रोज रविवार हें उत्तर.

## हिजरीसन व मोहरमादि महिना दिला असतां, शालिवाहन शक आणि महिना काढणें.

हिजरी सनास ३७ नीं गुणून त्या गुणाकारांत मोहरमादि महिन्याची तिप्पट मिळवून त्यास १२४१ नीं भागून भाग वर्षें व महिन्याचा आणावा. आणि तो इष्ट हिजरी सनांत वजा करून बाकींत ५४२ वर्षें व ४ महिने मिळवावे म्हणजे ती बेरीज शालिवाहन शक व महिना अशी येतें.

उदाहरण—हिजरी सन १३३२ जिल्काद ११ या महिन्यात शालिवाहन शक आणि मराठी महिना कोणता होता तें पाहूं.

हिजरी सन १३३२<br>
× ३७<br>
४९२८४ यात<br>
+ ३३<br>
१२४१ ) ४९३१७ ( ३९ वर्षें−८ महिने

जिल्काद ११ वा महिना याची ३ पट<br>
× ३<br>
३३ हिजरी सन १३३२−११ यांत<br>
वर्षें − ३९− ८<br>
१२९३− ३<br>
+५४३− ४<br>
शक १८३६− ७ आश्विन

शालिवाहन शक १८३६ व ७ म्हणजे आश्विन महिना हें उत्तर.

## शालिवाहन शक महिना, व तिथि दिली असतां—
## हिजरीसन, महिना व तारीख काढणें.

शालिवाहन शकात ५४३ वजा करून बाकीस १२ नीं गुणून त्या गुणाकारात दिलेला मराठी महिना मिळवून त्याच्या दोन प्रती कराव्या. पहिलींत १४० वजा करून बाकीस ६१ नीं भागून जो भागाकार येईल तो त्यातच वजा करावा आणि बाकीस ३२ नीं भागावें जो भागाकार येईल तो दुसऱ्या प्रतींत मिळवून त्या बेरजेस १२ नीं भागावें. जो भागाकार येईल तो हिजरीसन, आणि जी बाकी राहील तो मोहरमादि महिना समजावा.

कोणत्याही मराठी महिन्याचे बहुधा शुद्ध द्वितीयेस अथवा तृतीयेस मुसलमानी महिन्याचा पहिला चद्र असतो.

उदाहरण—शालिवाहन शके १८३६ मार्गशीर्ष शुद्ध तृतीया रोज शुक्रवार या दिवशीं हिजरीसन, महिना चद्र अथवा तारीख कोणती होती हें पाहू ?

| | |
|---|---|
| शालिवाहन शक १८३६ यात | १५५२५ प्रत २ यात |
| −५४३ | + ४७२ |
| १२९३ बाकीस | १२ )१५९९७(१३३३ हा हिजरी सन |
| × १२ | १२ |
| १५५१६ या गुणाकारात | ३९ |
| मराठी महिना + ९ | ३६ |
| १५५२५ प्रत १ यात | ३७ |
| − १४० | ३६ |
| ६१)१५३८५यांस २५२ भागाकार वजा | १ बाकी हा मोहरम महिना शुद्ध तृतीया म्हणून चद्र १ |
| − २५२ | |
| ३२ )१५१३३ बाकी यास (४७२ भागाकार आला तो दुसऱ्या प्रतींत मिळविणें. | |

हिजरी सन १३३३ माहे मोहरम चद्र १ अथवा तारीख पहिली हें उत्तर.

## इसवी सन पालटण्याचे दिवशीं म्हणजे जानेवारीचे पहिले तारखेस हिजरीसन व मोहरमादि महिन्याची कोणती तारीख होती हें काढणें.

दिलेल्या इसवी सनात १६०० वजा करून त्याच्या तीन प्रती कराव्या एकीस ३१ नीं भागून भागाकार वर्षे, महिने व दिवसाचा घ्यावा, आणि तो भागाकार, दुसरे प्रतीची दुप्पट करून त्यास ४३१ नीं भागून, भाग महिने व दिवसाचा घेऊन त्यात मिळवून ती बेरीज तिसरे प्रतींत मिळवून त्यात १००८ वर्षे६ महिने १५ दिवस मिळवावे म्हणजे जानेवारीचे पहिले तारखेस हिजरी सन, मोहरमादि महिना व तारीख ( चद्र ) कोणती होती ती समजेल.

उदाहरण—इसवी सन १९१५ जानेवारीचे पहिले तारखेस हिजरी सन महिना आणि तारीख [ चद्र ] कोणती होती तें पाहू.

### इंग्रजी तारखेवरून हिजरी वगैरे सनाची तारीख काढणें.

इसवी सन १९१५ यात
− १६०० वजा
३१५

प्रत १

३३ ) ३१५ यांस
    २९७
    १८ ( ९व. ६म. १६ दि.
  × १२ | + १  १३
३३ ) २१६ | ९—७—२९
    १९८
    १८
   ×३०
३३ ) ५४०
    ३३
    २१०
    १९८
     १२

प्रत २

३१५
× २
४३१) ६३० यांस ( १ म १३ दि.
    ४३१
    १९९
    ×३०
४३१ )५९७०
    ४३१
    १६६०
    १२९३
     ३६७

प्रत ३

   ३१५
+ ९-७-२९
३२४-७-२९
+१००८-६-१५
१३३३-२-१४

हिजरी सन १३३३ माहे सफर २ चंद्र ( तारीख ) १४ हें उत्तर.

## इसवी सनाच्या महिन्याची पहिली तारीख दिली असतां, हिजरी सन, महिना व तारीख काढणें.

जानेवारीपासून इष्ट महिन्याच्या तारखांची बेरीज घेऊन त्यांत गतमहिन्यांचे निम्मे मिळवून आणखी त्यांत इसवी आरंभाचे पहिले तारखेस जी मोहरमादि तारीख असेल, ती मिळवून त्या एकंदर बेरजेस तिसांनीं भागावें, भाग येईल तो इसवी आरंभाचे महिन्यापासून महिने होतात ते त्या महिन्यांत मिळवावे म्हणजे इष्ट इसवी महिन्याचा महिना, आणि ३० नीं भागून बाकी राहिलेली ती तारीख होय.

टीपः—वाराकरितां तारखेंत एखादी तारीख कमजास्त होण्याचा संभव असतो. अर्धी तारीख धरूं नये.

उदाहरण:—इसवी सन १९१४ तारीख १ आक्टोबर रोजीं हिजरी सन, महिना, व तारीख कोणती होती हें पाहूं.

जानेवारीपासून सप्टेंबरअखेर आणि आक्टोबरचे पहिले तारखेपर्यंत.

दिवस २७४ त्यांत
+ ४॥ गत निम्मे महिने
+ ३ इ. स. १९१४ जानेवारीचे पहिले तारखेस सफर महिन्याची ३ तारीख
३०)२८१॥(९ महिने + २ सफर = ११ जिल्काद.
२७०
११ ही तारीख यांत एक कमी केली तेव्हां १० तारीख आली.

इ. स. १९१४ ता. १ आक्टोबर रोजी हिजरी सन पूर्वी काढलेला १३३२ माहे जिल्काद तारीख ( चंद्र ) १० हें उत्तर.

वरील माहितींपैकीं कांहीं माहिती ग्रहलाघव फलादर्शग्रंथावरून घेतली आहे.

## गुड्फ्रायडे काढण्याची रीति.

मार्च महिन्याच्या २१ तारखेनंतरच्या पौर्णिमेपुढील जो पहिला रविवार तो "ईस्टरडे" किंवा ईस्टरचा रविवार. या रविवारच्यापूर्वीचा शुक्रवार तो गुड्फ्रायडे. पौर्णिमा रविवारीच असेल तर त्याच्या पुढील

रविवार हा " ईस्टर " समजावा. सन १९२४ ते १९३० पर्यंतचा गुडफ्रायडे कोणत्या महिन्यात व मितीस आला होता हें खालीं दिलें आहे.

| सन | इंग्रजी तारीख | शके | मराठी महिना व तिथि. |
|---|---|---|---|
| १९२४ | १८ एप्रील | १८४६ | चैत्र शु. १४ शुक्रवार. |
| १९२५ | १० एप्रील | १८४७ | चैत्र कृ. १ शुक्रवार. |
| १९२६ | २ एप्रील | १८४८ | चैत्र कृ. ४ शुक्रवार. |
| १९२७ | १५ एप्रील | १८४९ | चैत्र शु. १४ शुक्रवार. |
| १९२८ | ६ एप्रील | १८५० | चैत्र कृ. १ शुक्रवार. |
| १९२९ | २९ मार्च | १८५१ | चैत्र कृ. ४ शुक्रवार. |
| १९३० | १८ मार्च | १८५२ | चैत्र कृ. ५ शुक्रवार. |

गुडफ्रायडेच्या बाबतींत लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट अशी कीं, ता. २१ मार्चनंतरची पौर्णिमा जर रविवारींच येईल तर पौर्णिमेचा दिवस हा ईस्टरडे न होता त्याच्या पुढील रविवार ईस्टरडे होतो असा युरोपियन ज्योतिषशास्त्रज्ञानीं सिद्धांत बनविला आहे व त्यामुळेंच अशा प्रसगीं गुडफ्रायडे हा देखील त्या रविवारच्या आधींच्या शुक्रवारीं येतो.

सन १९३० शके १८५२ च्या आमच्या पचागात पौर्णिमा रविवारीं असल्यामुळें गुडफ्रायडे १ आठवडा लाबला ही गोष्ट लक्षात असताही गर्दीनें व नजरचुकीनें चैत्र शु. १३ स गुडफ्रायडे छापला गेला. पण वर्षभविष्यात चैत्र कृ. ५ लाच छापलेला आहे. अशी नजरचूक पौर्णिमा रविवारीं आल्यामुळें होते म्हणून ह्या गोष्टीकडे जरूर लक्ष ठेवलें पाहिजे.

## कलियुग व गतकलिप्रमाण.

### खगशैलेंदु रामाद्रे ३१७९ शाकेब्दास्ते कलेर्गताः ॥
### तैर्विहीनं कलेर्मानं शेष शेष कलेर्मिताः ॥

ज्या वेळीं शालिवाहन शक सुरू झाला त्या वेळीं म्हणजे शकारभाचे प्रारभीं चैत्र शु. १ ला कलियुगाचीं पूर्ण वर्षें ३१७९ गत झालेलीं होतीं. म्हणून कोणत्याही इष्ट शालिवाहन शकामध्यें ३१७९ वर्षें मिळविलीं असता जी सख्या येईल ती त्या शकारभीं गत कलियुग वर्ष सख्या आली असें समजावें. गत कलियुगवर्षसख्या, कलियुगाच्या एकदर वर्षांतून म्हणजे ४,३२,००० वर्षांतून वजा केली असता शेष कलियुग वर्षें येतात. पचागात गतकलि आणि शेषकलि असें जे दोन आकडे वर्षफळात दाखविलेले असतात ते याच रीतीनें दिलेले असतात.

उदाहरणार्थः—शके १८५२ आणि १८८० ह्या दोन शकामध्यें गतकलि व शेषकलि किती हें काढू.

१८५२ + ३१७९ = ५०३१ ही गतकलि वर्षें आणि ४३२००० — ५०३१ = ४२६९६९ ही शेषकलि वर्षें आलीं.

१८८० + ३१७९ = ५०५९ हीं गतकलि वर्षें. ४३२००० यातून वजा करता शेषकलि वर्षें ४२६९४१ इतकीं राहिलीं.

ह्याप्रमाणें गतकलि आणि शेषकलि वर्षें काढावीं. शके १८५२ सालीं कलियुगाचीं वर्षें ५०३१ इतकीं गत झालीं आणि मृगादि गणना ज्या वेळीं प्रचलित होती तो काळ सुमारें ५५००—६००० वर्षांचाच येतो. यावरून कलियुगारभीं मृगादि गणनाच प्रचारात होती असें निश्चित दिसून येतें. ह्या मृगादि गणना कालावरूनच लोकमान्य टिळकानीं ज्योतिषविषयक विलक्षण शोध लावले आहेत. असो.

कोष्टकी पंचांगात दुसऱ्या पृष्ठावर नक्षत्रानुरोधानें असलेलें अवकहडाचक्र आणि राशींचे घातचक्र दिलेलें असतें तें येणें प्रमाणें:—

अवकहडाचक्र.

राशींचे घातचक्र.

हा गोलाकार चक्रांत अश्विनी नक्षत्रापासून रेवती नक्षत्रापर्यंत प्रत्येक नक्षत्राचे चार चार चरण धरून प्रत्येक नक्षत्राच्या चारी चरणास अनुक्रमानें कोणते आद्याक्षर ज्योतिषशास्त्रदृष्ट्या येतें हें अगदीं पहिल्या कोष्ट्यांत वरच्या बाजूस दिलेले आहे. हें चक्र वरून खालीं पाहात गेल्यास त्याचा अनुक्रम पुढीलप्रमाणें येतो. पहिल्याच्या कोष्टकांत नक्षत्र चरणनाम, दुसऱ्या कोष्ट्यांत त्या चारी चरणांची नाडी, तिसऱ्या कोष्ट्यांत त्या नक्षत्राची योनी, चवथ्यांत नक्षत्राचा गण, पाचव्यात प्रत्येक नक्षत्र, सहाव्यांत नक्षत्राच्या राशीचा वर्ण, सातव्यांत राशीचा स्वामी आणि आठव्यांत त्या नक्षत्राची राशि याप्रमाणें माहिती असते. ज्या ठिकाणीं एका नक्षत्राच्या कांहीं चरणांत एक राशी व पुढच्या कांहीं चरणांत दुसरी राशी असे आहे. त्या ठिकाणीं चक्रांत तसें दाखविलेलें आहे.

घातचक्राला क्रमही अशाच पण राशीवरून दिलेला असतो. प्रथम वरच्या कोष्टकांत राशी, दुसऱ्या कोष्टकात घातमास, तिसऱ्यांत घाततिथि, चवथ्यांत घातवार, पांचव्यांत घातनक्षत्र, सहाव्यांत घात प्रहर, सातव्यांत घातचंद्र याप्रमाणें राशींच्या घातचक्राचा अनुक्रम आहे. ही दोन्ही कोष्टकें ( नवीन शिक्षण घेणारास ) पाहतांना थोडा त्रास पडतो व घोंटाळा होतो म्हणून गोलाकार कोष्टकाचे ऐवजीं सुलभ असे अवकहडा चक्र व घातचक्र जास्त माहिती घालून खालीं पुढील पृष्ठावर दिले आहे.

## जन्म नक्षत्र चरणपरत्वें, गण नाडी, योनि, वर्ण राशी वगैरे समजण्याचें अवकहडाचक्र.

| नक्षत्र. | अश्विनी | भरणी | कृत्तिका | रोहिणी | मृग | आर्द्रा | पुनर्वसु | पुष्य | आश्लेषा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| नाडी. | आद्यनाडी | मध्यनाडी | अंत्यनाडी | अंत्यनाडी | मध्यनाडी | आद्यनाडी | आद्यनाडी | मध्यनाडी | अंत्यनाडी |
| योनि. | अश्वयोनि | गजयोनि | मेषयोनि | सर्पयोनि | सर्पयोनि | श्वानयोनि | मार्जारयोनि | मेषयोनि | मार्जारयोनि |
| गण. | देवगण | मनुष्यगण | राक्षसगण | मनुष्यगण | देवगण | मनुष्यगण | देवगण | देवगण | राक्षसगण |
| आराध्यवृक्ष | कुचलावृक्ष | आवळी | औदुंबर | जांबळी | खैर | कृष्णागरु | वेळू | पिंपळ | नागचाफा |
| दान. | अन्नदान | श्वेतवस्त्र | सुवर्ण | दूध | सीर [ क्षिप्रा ] | काळी गाय | उडीद, तीळ | रक्तवस्त्र | तिलधेनु |
| नक्षत्र देवता व तारे. | अश्विनी कुमार ३ | यम ( ३ ) | अग्नि ( ६ ) | ब्रह्मा ( ५ ) | चंद्र ( १ ) | शिव ( १ ) | अदिति ( ४ ) | बृहस्पति ( ३ | सर्प ( ५ ) |

| चरणपरत्वें रोग पीडा दिवस. | ९ | १० | ३ | ७ | १० | १ | ९ | २१ | ९ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| नक्षत्र चरणांक. | १ | २ | ३ | ४ | १ | २ | ३ | ४ | १ |
| नक्षत्र चरणाक्षरें. | चू | चे | चो | ला | ली | लू | ले | लो | आ |
| नक्षत्र चरणस्वामी. | म | शु | बु | च | र | बु | शु | म | गु |

| चरणपरत्वें रोग पीडा दिवस. | १० | ७ | २१ | ७ | ९ | २० | २८ | ३० | १५ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| नक्षत्र चरणांक. | २ | ३ | ४ | १ | २ | ३ | ४ | १ | २ |
| नक्षत्र चरणाक्षरें. | इ | उ | ए | ओ | वा | वी | वू | वे | वो |
| नक्षत्र चरणस्वामी. | श | श | गु | मं | शु | बु | चं | र | बु |

| चरणपरत्वें रोग पीडा दिवस. | ७ | २१ | ० | ११ | ७ | ७ | ७ | २१ | २० |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| नक्षत्र चरणांक. | ३ | ४ | १ | २ | ३ | ४ | १ | २ | ३ |
| नक्षत्र चरणाक्षरें. | का | की | कु | घ | ङ | छ | के | को | हा |
| नक्षत्र चरणस्वामी. | शु | म | गु | श | श | गु | म | शु | बु |

| चरणपरत्वें रोग पीडा दिवस. | २२ | ७ | ७ | १० | २० | ० | १ | १ | ६० |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| नक्षत्र चरणांक. | ४ | १ | २ | ३ | ४ | १ | २ | ३ | ४ |
| नक्षत्र चरणाक्षरें. | ही | हु | हे | हो | डा | डी | डू | डे | डो |
| नक्षत्र चरणस्वामी. | च | र | बु | शु | म | गु | श | श | गु |

| | राशीचा उदयकाल २८ वर्षे * | राशीचा उदयकाल २५ वर्षे | राशीचा उदयकाल ३२ ते ३३ | राशीचा उदयकाल २४ ते २८ |
|---|---|---|---|---|
| राशि. | मेष | वृषभ | मिथुन | कर्क |
| राश्याधिपति. | मंगळ | शुक्र | बुध | चंद्र |
| वर्ण. | क्षत्रियवर्ण | वैश्यवर्ण | शूद्रवर्ण | विप्रवर्ण |
| वश्य. | चतुष्पाद | चतुष्पाद | मानव | जलचर |

| नक्षत्र. | मघा | पूर्वा | उत्तरा | हस्त | चित्रा | स्वाती | विशाखा | अनुराधा | ज्येष्ठा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| नाडी. | अंत्यनाडी | मध्यनाडी | आद्यनाडी | आद्यनाडी | मध्यनाडी | अंत्यनाडी | अंत्यनाडी | मध्यनाडी | आद्यनाडी |
| योनि. | उंदीरयोनि | उंदीरयोनि | गोयोनि | महिषीयोनि | व्याघ्रयोनि | महिषीयोनि | व्याघ्रयोनि | मृगयोनि | मृगयोनि |
| गण. | राक्षसगण | मनुष्यगण | मनुष्यगण | देवगण | राक्षसगण | देवगण | राक्षसगण | देवगण | राक्षसगण |
| आराध्यवृक्ष. | वटवृक्ष | पळस | पायरीवृक्ष | जाई | बेलवृक्ष | अर्जुनवृक्ष | नागकेशर | नागकेसर | सांबरवृक्ष |
| दान. | गूळ, मीठ | अश्वदान | मोतीदान | अन्नदान | पीतवस्त्र | तांबडी गाय | ताम्रदान | शय्यादान | उपानह |
| नक्षत्र देवता व तारे. | पितर ( ५ ) | भग ( २ ) | अर्यमा ( २ ) | सूर्य ( ५ ) | त्वष्टा ( १ ) | वायु ( १ ) | इंद्राग्नि ( ४ ) | मित्र ( ४ ) | इंद्र ( ३ ) |

| चरणपरत्वें रोग पीडा दिवस | २० | १ | १७ | २० | २० | १५ | १२ | ३० | २७ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| नक्षत्र चरणांक. | १ | २ | ३ | ४ | १ | २ | ३ | ४ | १ |
| नक्षत्र चरणाक्षरें | मा | मी | मू | मे | मो | टा | टी | टू | टे |
| नक्षत्र चरण स्वामी. | मं | शु | बु | च | र | बु | शु | म | गु |

| चरणपरत्वें रोग पीडा दिवस | ३७ | ७ | ५ | १५ | ५ | ५ | ५२ | १० | ० |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| नक्षत्र चरणांक. | २ | ३ | ४ | १ | २ | ३ | ४ | १ | २ |
| नक्षत्र चरणाक्षरें | टो | पा | पी | पू | षा | णा | ठा | पे | पो |
| नक्षत्र चरण स्वामी. | श | श | गु | म | शु | बु | चं | र | बु |

| चरणपरत्वें रोग पीडा दिवस | ५ | ५६ | ० | १७ | २१ | ० | १५ | १८ | १५ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| नक्षत्र चरणांक. | ३ | ४ | १ | २ | ३ | ४ | १ | २ | ३ |
| नक्षत्र चरणाक्षरें | रा | री | रू | रे | रो | ता | ती | तू | ते |
| नक्षत्र चरण स्वामी. | शु | म | गु | श | श | गु | मं | शु | बु |

| चरणपरत्वें रोग पीडा दिवस | १३ | ३ | ७ | ३७ | २४ | ० | ५ | २६ | ५५ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| नक्षत्र चरणांक. | ४ | १ | २ | ३ | ४ | १ | २ | ३ | ४ |
| नक्षत्र चरणाक्षरें | तो | ना | नी | नू | ने | नो | या | यी | यु |
| नक्षत्र चरण स्वामी. | च | र | बु | शु | म | गु | श | श | गु |

| | राशीचा उदयकाल २८ ते २९ | राशीचा उदयकाल ३३ ते ३६ | राशीचा उदयकाल २५ व वृद्धपणीं | राशीचा उदयकाल २८ ते ३२ किंवा उमरीं: |
|---|---|---|---|---|
| राशि. | सिंह | कन्या | तूळ | वृश्चिक |
| राश्याधिपति. | सूर्य | बुध | शुक्र | मंगळ |
| वर्ण. | क्षत्रियवर्ण | वैश्यवर्ण | शूद्रवर्ण | विप्रवर्ण |
| वश्य. | वनचर | मानव | मानव | कीटक |

## जन्मनक्षत्र चरणपरत्वें गण, नाडी, वर्ण राशी वगैरेचे अवकहडाचक्र.

| नक्षत्र. | मूळ | पूर्वाषाढा | उत्तराषाढा | श्रवण | धनिष्ठा | शततारका | पूर्वाभाद्रपदा | उत्तराभाद्रप. | रेवती |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| नाडी. | आद्यनाडी | मध्यनाडी | अत्यनाडी | अत्यनाडी | मध्यनाडी | आद्यनाडी | आद्यनाडी | मध्यनाडी | अत्यनाडी |
| योनि | श्वानयोनि | वानरयोनि | मुगुसयोनि | वानरयोनि | सिंहयोनि | अश्वयोनि | सिंहयोनि | गोयोनि | गजयोनि |
| गण | राक्षसगण | मनुष्यगण | मनुष्यगण | देवगण | राक्षसगण | राक्षसगण | मनुष्यगण | मनुष्यगण | देवगण |
| आराध्यवृक्ष. | राळेचा वृक्ष | वेतवृक्ष | फणसवृक्ष | अर्क ( रुई ) | शमीवृक्ष | कळबवृक्ष | आम्रवृक्ष | कडुनिंब | मोहाचा वृक्ष |
| दान. | लोहदान | कमलदान | महिषीदान | ब्राह्मणभोजन | सुवर्णरौप्य | शर्करादान | सुवर्णदान | शेळीदान | महादान |
| नक्षत्र देवता व तारे. | निर्ऋति (११) | उदक ( ४ ) | विश्वेदेव (३) | विष्णु (१–३) | वसु ( ४ ) | वरुण (१००) | अजैकपात (२) | अहिर्बुध्न्य (२) | पूषा ( १ ) |
| चरणपरत्वें रोग पीडा दि | ९ ५ १५ ५ | ० ९ ७ ७ | ३१ १५ ४ १५ | १० २० ४ २१ | १२ २० १० २ | ११ ० १२ ८ | ७ १० ३९ २९ | ७ २४ ४ २२ | ५ १८ २६ ६० |
| नक्षत्र चरणांक. | १ २ ३ ४ | १ २ ३ ४ | १ २ ३ ४ | १ २ ३ ४ | १ २ ३ ४ | १ २ ३ ४ | १ २ ३ ४ | १ २ ३ ४ | १ २ ३ ४ |
| नक्षत्र चरणाक्षरें. | ये यो भा भी | भू धा फा ढा | भे भो जा जी | खी खु खे खो | गा गी गू गे | गो सा सी सू | से सो दा दी | दू थ झ ञ | दे दो चा ची |
| नक्षत्र चरणस्वामी | म शु बु चं | र बु शु म | गु श श गु | म शु बु चं | र बु शु म | गु श श गु | म शु बु चं | र बु शु मं | गु श श गु |

| राशि. | धन | मकर | कुंभ | मीन |
|---|---|---|---|---|
| राश्याधिपति | गुरु | शनि | शनि | गुरु |
| वर्ण. | क्षत्रियवर्ण | वैश्यवर्ण | शूद्रवर्ण | विप्रवर्ण |
| वश्य. | मानव | जलचर | मानव | जलचर |
| | राशीचा उदयकाळ २५ वर्षे अगर वृद्धपणी | राशीचा उदयकाळ २५ नंतर | राशीचा उदयकाळ ३० पासून | राशीचा उदयकाळ वृद्धपणी अगर १५ ते २० |

## मेषादि १२ राशींचे घातचक्र.

| राशि. | मेष | वृषभ | मिथुन | कर्क | सिंह | कन्या | तूळ | वृश्चिक | धनु | मकर | कुंभ | मीन |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| घातमास | कार्तिक | मार्गशीर्ष | आषाढ | पौष | ज्येष्ठ | भाद्रपद | माघ | आश्विन | श्रावण | वैशाख | चैत्र | फाल्गुन |
| घाततिथि | १।६।११ | ५।१०।१५ | २।७।१२ | २।७।१२ | ३।८।१३ | ५।१०।१५ | ४।९।१४ | १।६।११ | ३।८।१३ | ४।९।१४ | ३।८।१३ | ५।१०।१५ |
| घातवार | रविवार | शनिवार | सोमवार | बुधवार | शनिवार | शनिवार | गुरुवार | शुक्रवार | शुक्रवार | मंगळवार | गुरुवार | शुक्रवार |
| घातनक्षत्रें | मघा | हस्त | स्वाती | अनुराधा | मूळ | श्रवण | शततारका | रेवती | भरणी | रोहिणी | आर्द्रा | आश्लेषा |
| घातयोग | विष्कंभ | शुक्र | परिघ | व्याघात | धृति | शुक्र | शुक्र | व्यतिपात | वज्र | वैधृति | गंड | वज्र |
| घातकरण | बव | शकुनी | कौलव | नाग | बव | कौलव | तैतिल | गरज | तैतिल | शकुनि | किंस्तुघ्न | चतुष्पाद |
| घातप्रहर | १ | ४ | ३ | १ | १ | १ | ३ | १ | १ | ४ | ३ | ४ |
| पु. घातचंद्र. | १ | ५ | ९ | २ | ६ | १० | ३ | ७ | ३ | ८ | ११ | १२ |
| स्त्री. घातचंद्र. | १ | ८ | ७ | ९ | ४ | ३ | ६ | २ | १० | ११ | ५ | १२ |

# अवकहडाचक्रासंबंधीं विवेचन.

हें सबंध अवकहडाचक्र नक्षत्रावरची किंवा नक्षत्राधीन आहे. अर्थात् जन्मकाळीं कोणत्या नक्षत्राचा कोणता चरण इष्ट वेळीं होता हें पाहून नंतर त्या चरणाचें जें आद्याक्षर यात दिलेलें असेल तें नाव त्या व्यक्तीचें ठेवलें पाहिजे. यालाच नक्षत्रनाव, जन्मनाव किंवा नावरस नाव म्हणतात.

ह्या अवकहडाचक्रावरून कोणत्याही जातीच्या कोणत्याही व्यक्तीचें जन्मनाव त्याच्या जन्मवेळवरून त्या वेळेच्या नक्षत्राधारें काढतां येईल. पण ज्याची जन्मवेळ अगर जन्मदिवस माहीत नाहीं अशा व्यक्तींच्या चालू म्हणजे व्यवहारांत चालत असलेल्या नावाच्या आद्याक्षरावरून त्याचें नामनक्षत्र व नामराशी केव्हाही पाहातां येते. व त्यावरून त्या व्यक्तीस चालू ग्रहमान कसें आहे व त्याचे शुभाशुभ परिणाम कोणते याचाही निर्णय करतां येतो. उदाहरणार्थ —एका हिंदु गृहस्थाचें नाव मोरेश्वर, पारशी गृहस्थाचें चालू नाव नसरवानजी, इंग्लिश म्हणजे युरोपियन गृहस्थाचें नाव मॅकमिलन, मुसलमान गृहस्थाचें नाव सय्यदअली, मराठा गृहस्थाचें नाव मारुतराव, एका जैन गृहस्थाचें नाव चपकलाल आणि एका लिंगाईत गृहस्थाचें नाव शिवलिंगप्पा याप्रमाणें व्यावहारिक नांवें आहेत व त्यावरून त्यांचें नामनक्षत्र व नामराशी काढावयाची आहे. तेव्हा अवकहडाचक्र पाहातां त्या प्रत्येकाचें नामनक्षत्र, चरण व राशी खालील प्रमाणें येते.

| | | |
|---|---|---|
| मोरेश्वर | पूर्वा १ चरण | सिंह राशी |
| नसरवानजी | अनुराधा १ चरण | वृश्चिक राशी |
| मॅकमिलन | मघा १ चरण | सिंह राशी |
| सय्यदअली | शततारका २ चरण | कुंभ राशी |
| मारुतराव | मघा १ चरण | सिंह राशी |
| चपकलाल | रेवती ३ चरण | मीन राशी |
| शिवलिंगप्पा | शततारका ४ चरण | कुंभ राशी |

अशा रीतीनें कोणत्याही जातीच्या कोणत्याही व्यक्तीची नामराशी व नक्षत्र या चक्राधारें पाहातां येईल. पण ही गोष्ट केव्हाही लक्षांत ठेवावी कीं, ज्याची जन्मवेळ अगर जन्मदिवस माहीत नसेल त्याचीच नामराशी घ्यावी इतराची जन्मराशी घेणें हाच शास्त्रोक्त मार्ग.

अवकहडा चक्राचा दुसरा प्रकार जो दिला आहे त्यात नक्षत्र चरण, नाडी, योनि, आराध्यवृक्ष, दान नक्षत्रदेवता, तारे, रोगपीडा दिवस, नक्षत्रचरण स्वामि, राशी, राश्याधिपति, वर्ण, वश्य आणि राशींचा उदयकाल अशी माहिती आहे ही माहिती समजण्यास सुलभ आणि चटकन् ध्यानात येण्या सारखी असल्यानें त्याचे विशेष विवेचन नको.

अवकहडाचक्र हें फार जुनें चक्र असून तें आजपर्यंत सतत प्रचारात आहे. हें चक्र आणि त्याची रचना प्राचीन ज्योतिषाचार्यांनीं सुमारें ४००० वर्षांपूर्वी केला आहे असें त्याच्या रचनेवरून गणितानें सिद्ध होतें. ज्या वेळीं कृत्तिकादि गणना प्रचारात होती म्हणजे कृत्तिका नक्षत्र ताऱ्यावर वसत संपात होता त्या वेळींच हें अवकहडा चक्र प्रचारात आलेलें आहे कारण " आ, ई, ऊ, ए, " ही आरंभींचीं स्वराक्षरें कृत्तिका नक्षत्राच्या चार चरणास अनुक्रमानें दिलेलीं असून रोहिणी नक्षत्रास ओ, वा, वी, वू हीं अक्षरें आहेत आणि क हें व्यंजनाक्षर मृग नक्षत्राचें आहे ह्या रचनेवरून निर्विवाद सिद्ध होतें कीं, कृत्तिका कालींच हें महत्त्वाचें चक्र प्रचारात आलें व आजपर्यंत सतत चालू राहिलें आहे

आता कृत्तिका कालापासून आजपर्यंत काल किती गेला हें पाहावयाचें तर सध्याचा वसंत संपात कोठें आहे हें पाहिलें पाहिजे शके १८५२ या वर्षी रेवती नक्षत्राच्या मागें १८ अंश ५४ कला तो मागें गेला आहे व रेवती नक्षत्रातापासून कृत्तिका नक्षत्र तारा ४० अंश पुढें आहे. म्हणजे ४० अंश + सुमारें १९ अंश = ५९ अंश संपात कृत्तिका कालापासून आत्तापर्यंत मागें हटला आहे. संपाताची गति उलट आहे व ती दर वर्षास ५० विकला इतकी असल्यानें ७२ वर्षांत तो १ अंश मागें हटतो. ह्या हिशेबानें

पाहिलें असता ५९ × ७२ = ४२४८ वर्षे येतात. अर्थात् ४२४८ वर्षांपासून हें चक्र अव्याहत रीतीनें सतत प्रचारात आहे.

अशा तऱ्हेनें हें चक्र का बसविण्यात आलें व अमुक नक्षत्राला अमुकच अक्षर का ? ह्याचा निर्णय अद्याप झालेला नाहीं. परंतु येथवर खरें कीं, हें चक्र काहीं तरी महत्त्वाच्या विशेष तत्त्वावर व धोरणावर बसविलेलें असून तें फार महत्त्वाचें आहे. या चक्रासंबंधीं दोन प्रकार आहेत. एक सामान्य म्हणजे अवकहडा-चक्र ज्याप्रमाणें कोष्टकात आहे त्याप्रमाणेंच. पण दुसरा जो प्रकार त्यात कोष्टक मांडण्यात बराच फरक आहे व त्यास शतपद अवकहडा चक्र म्हणतात ह्या चक्रात, अकार, इकार, उकार, ओकार या-प्रमाणें स्वरयुक्त अक्षराचा पर्याय पूर्ण होतो व पुन्हा दुसरा पर्याय तशाच अनुक्रमानें येतो. ही स्थिति पुढें प्रत्यक्ष कोष्टकच दाखविलें आहे त्यावरून ध्यानात येईल.

### शतपद अवकहडाचक्राची मांडणी.

नामनक्षत्रज्ञानापेक्षयाऽवकहडाचक्रोपपत्तिः ।
शुंठीकोष्ठेषु २५ तिर्यक् त्ववकहड लिखाधः स्थिता लीष्विदाद्यैं
स्तान्युक्तांस्तैःस्वरैश्च क्रमत इहकुयुकृधडछतन् मध्यकोष्ठे ॥२००॥
धैर्धैरूर्ध्वाधरालीष्वनलभत इहासार्पमर्णैर्भपादाः ।
एवं चान्येषु दद्यान्मटपरतपुषुकृषणठा मध्यकोष्ठे ॥२०१॥ समरसार.

टीकाः—शुंठीकोष्ठेषु पचविंशति सख्येषु तिर्यक्स्थितो परिपंक्तौ अ, व, क, ह, ड, इति पचाक्षराणि पंचसु कोष्ठेषु उपरितनेषु लिख तदनु अधःस्थितालीषु चतसृषु तदाद्यैरेतैः पूर्वोक्तैः इस्वरैः इ, उ, ए, ओ एवरूपैश्चतुर्भिर्युक्तारतान् व, क, ह, ड, युतान् भेदान् विंशतिसख्यान् इविकिहिडि इत्येव प्रकारेण क्रमतो लिख अत्र विशेषः कुयुकृ घडछ मध्यकोष्ठे कुशब्दस्तत्र घकारडकारछकारयुक्त एवलेख्यः एव पचविंशति कोष्ठेषु अष्टाविंशति वर्णपूर्णेषु धैर्धैश्चतुर्भिरूर्ध्वाधरालीषु ऊर्ध्वाधःपंक्तिषु अ, इ, उ आदि चतुःकोष्ठेषु अनलभतः कृत्ति-कादि नक्षत्रादि चक्रे आसार्पमाश्लेषानक्षत्रपर्यंत अर्णैश्चतुर्भिर्भस्य नक्षत्रस्य पादाः स्युः यथा अ, इ, उ, ए इति कृत्तिका पादाः ॥ ओ, व, वि, वु इति रोहिणीपादाः एवमन्येषामपि नक्षत्राणां पादाश्चतुर्भिर्वर्णैर्ज्ञेयाः

पितृभत इह भानि चाद्रिदैवं नयभजखाश्च तथा धुयुकृधफौढः ।
हरिभमवधितश्च मैत्रतः स्युर्गसदचलावसुभाद्दुयुकृथझञः ॥२०२॥ समरसार.

टीकाः—अथ मघादिभपादवर्णानयनमाह ॥ एवमिति ॥ एवं प्रागुक्तरीत्या अन्येषु पचविंशतिकोष्ठेषु मटपरतवर्णान् अइउएओइति स्वरभेदेन पचविंशति सख्याकान् वर्णान्दद्यात् लिखेदित्यर्थः ॥ अत्र विशेषः मध्यकोष्ठेषु पुयुरपुकारयुक्तान् षणठान् षकारणकारठकारान्लिखेत् ॥ अथ मघादिवर्णानाह ॥ पितृभतो मघानक्षत्रात् ॥ इह मटपरतवर्णेषु आद्रिदैव विशाखानक्षत्रपर्यंत सप्तनक्षत्राणां चत्वारः पादा ज्ञेयाः नयभजखाश्च पचविंशति कोष्ठकेषु लेख्याः धुशब्दकोष्ठे धफढलेख्याः तत्र मैत्रतोनुराधानक्षत्राद्धरिभ श्रवणनक्षत्रावधिकृत्य चत्वारश्चत्वारो भपादा ज्ञेयाः ततः पचविंशतिकोष्ठेषु गसदचल इति पचवर्णान्स्वरभेदेन पचविंशति सख्यान् लिखेत् दुशब्दकोष्ठे च थझञ इति-क्रमेणालिखेदत्रवसुभादानिष्ठानभात् भरणीपर्यन्तसप्तनक्षत्रपादाः प्राग्वज्ज्ञेया इति नामनक्षत्रज्ञानम् ॥ २ ॥

अर्थ ( टीकेसह )—पचवीस पचवीस घरांचीं चार कोष्टकें तयार करून तीं एकत्र करावीं, म्हणजे एक शंभर घरांचें चौकोनाकृति कोष्टक तयार होतें. प्रथमचें पचवीस घरांचें कोष्टक घेऊन त्यात डाव्या हाताकडून उजव्या हाताकडे नीट सरळ रेषेनें अ, व, क, ह, ड अशीं पाच अक्षरें प्रथम सुतार्ची लिहावीं आणि पहिल्या ( अ ) अक्षराखालीं इ, उ, ए, ओ अशीं अक्षरें लिहावीं. म्हणजे ( अ ) सुद्धा पांच अक्षरें एकाखालीं एक येतील. वेदकालीन जें कृत्तिका नक्षत्र त्यावरूनच वरील सूत्राची उपपत्ति झाली आहे ती अशीः—अ, इ, उ, ए कृत्तिका, ओ, व, वि, वु रोहिणी. याप्रमाणें कृत्तिकादि आश्लेषापर्यंत सात नक्षत्रें या कोष्टकांत लिहावयाचीं आहेत तीं अशीं कीं, कृत्तिकापासून चवथें नक्षत्र आर्द्रा त्याचा ह्या कोष्टकाचे मध्यमार्गी स्तंभ होतो. त्या स्तंभांत कु हे अक्षर मागील पूर्वचालीप्रमाणें घेऊन आणखी त्यात घ, ङ, छ

हीं तीन अक्षरें सूत्राशिवाय जास्त लिहावीं, म्हणजे प्रथम स्तंभ पुरा होतो. नंतर ह्या स्तंभापैकीं पहिलें अक्षर ( कु ) ह्याच्यापुढील चालीप्रमाणें येणारें अक्षर ( के ) को, ह, ही पुनर्वसू याप्रमाणें पुढें आश्लेषाता पर्यंत नक्षत्रांचीं अक्षरें लिहून पहिलें कोष्टक पुरें करावें. दुसरे पंचवीस घराचे कोष्टकांत दुसरें सूत्र म, ट, प, र, त हें वर सांगितल्याप्रमाणें लिहून ( म ) अक्षराच्या खालीं मि, मु, मे, मो अशीं अक्षरें लिहावीं, म्हणजे ( म ) सुद्धां पांच अक्षरें एकाखालीं एक येतील. त्या अक्षरावरून म, मि, मु, मे, मघा, मो, ट, टि, टु पूर्वा; याप्रमाणें मघापासून सात नक्षत्रें विशाखातापर्यंत लिहावीं. मघापासून चवथें नक्षत्र हस्त आहे. त्याचा स्तंभ या कोष्टकाच्या मध्यमार्गी होतो, आणि हस्त नक्षत्रांत क्रमानें येणारें पहिलें अक्षर ( पु ) हें आहे. त्यांत आणखी सूत्राखेरीज प, ण, ठ अशीं तीन अक्षरें घालून दुसरा स्तंभ पुरा करावा, आणि त्यांत प्रथमचें ( पु ) हें अक्षर आहे त्या पुढील क्रमानें येणारें ( पे, ) पो, र, रि चित्रा. ह्याप्रमाणें पुढें विशाखाता पर्यंत सात नक्षत्रांचीं अक्षरें लिहून हें कोष्टक पुरें करावें. तिसरे पंचवीस घराचे कोष्टकांत तिसरें सूत्र न, य, भ, ज, ख हीं अक्षरें वर सांगितल्याप्रमाणें लिहावीं आणि ( न ) अक्षराखालीं नि, नु, ने, नो हीं अक्षरें घालावीं. म्हणजे न ते नो पर्यंत पांच अक्षर होतात. त्यावरून न, नि, नु, ने, अनुराधा, नो, य, यि, यु, ज्येष्ठा याप्रमाणें नक्षत्रांचीं अक्षरें येतील. अनुराधा नक्षत्रापासून चवथें नक्षत्र पूर्वाषाढा याचा स्तंभ या कोष्टकांत मध्यमार्गी होतो. म्हणून क्रमानें येणारें त्याचें पहिलें अक्षर भु, हें आहे यांत सूत्राशिवाय ध, फ, ढ अशीं तीन अक्षरें जास्त घालावीं. म्हणजे तिसरा स्तंभ पुरा होईल. या स्तंभातील ( भु ) हें अक्षर पहिलें आहे. त्यापुढें क्रमानें येणारें ( भे ) भो, ज, जी, उत्तराषाढा या क्रमानें अभिजित्सह श्रवणातापर्यंत सात नक्षत्रें या कोष्टकांत लिहिलीं म्हणजे हें कोष्टक पुरें होतें. चवथे कोष्टकांत चवथें सूत्र ग, स, द, च, ल, हीं अक्षरें वर सांगितल्याप्रमाणें लिहावीं आणि ( ग ) अक्षराखालीं गि, ते गोपर्यंत अक्षरें लिहावीं. म्हणजे ग, ते गोपर्यंत पांच अक्षरें होतील. त्यावरून ग, गि, गु, गे, धनिष्ठा, गो, स, सि, सु, शततारका याप्रमाणें नक्षत्रांचीं अक्षरें येतात. धनिष्ठेपासून चवथें नक्षत्र उत्तरा भाद्रपदा, याचा स्तंभ या कोष्टकाच्या मध्यमार्गी होतो. या नक्षत्राचें क्रमानें येणारें पहिलें अक्षर ( दु ) हें आहे. यांत आणखी सूत्राखेरीज थ, झ, ञ, अशीं तीन अक्षरें घालून ह्या चवथा स्तंभ पुरा करावा, आणि स्तंभातील पहिलें अक्षर ( दु ) या अक्षरापुढें क्रमानें येणारें ( दे ) दो, च, ची रेवती, या क्रमानें भरणी अंतापर्यंत सात नक्षत्रांचीं अक्षरें लिहून हें चवथें कोष्टक पुरें करावें.

आतापर्यंत चार कोष्टकें कशीं तयार करावीं याबद्दलची माहिती क्रमानें देऊन चारी कोष्टकें एकत्र करून सबंध एक कोष्टक तयार केलें. त्यांत चार स्तंभ आहेत. स्तंभांत तीन अक्षरें इतर घरांपेक्षा जास्त का? असा प्रश्न उत्पन्न होतो, म्हणून त्याचा खुलासा करणें जरूर आहे. नक्षत्रें २८, प्रत्येक नक्षत्राचे चरण चार, या क्रमानें २८ नक्षत्रांचे ११२ झाले व तितकींच अक्षरें होतात सबंध कोष्टकांतील घरें १००, प्रत्येकांत एकेक अक्षर घातलें म्हणजे १०० घरें भरून बाकी १२ अक्षरें शिल्लक राहिलीं ह्याकरितांच ग्रंथकारानें चार स्तंभाची योजना करून त्या प्रत्येकांत तीन तीन अक्षरें जास्त घालून चारी स्तंभ १२ अक्षरांनीं भरून काढले. आता प्रथम स्तंभांत पहिल्या सूत्रापैकीं ( क ) वर्गातील घ, ङ आणि चवथ्या सूत्रातील याजवळचा जो ( च ) वर्ग यांतील छ हें अक्षर घेऊन पहिल्या स्तंभांत तीन अक्षरें घालून तो स्तंभ भरून पुरा केला, आणि दुसरा स्तंभ यांत चवथ्या सूत्रापैकीं ( स ) वर्गातील ( प ) आणि दुसरें सूत्र यांतील ( ट ) वर्गापैकीं ण, ठ, हीं अक्षरें घेऊन दुसरा स्तंभ तयार झाला; आणि तिसरा स्तंभ यांत दुसरें सूत्र यांतील ( त ) वर्गापैकीं ध, ( प ) वर्गातील फ, ( ट ) वर्गातील ढ, अशीं अक्षरें घेऊन तिसरा स्तंभ पुरा केला, आणि चवथा स्तंभ यांत दुसरें सूत्रातील ( त ) वर्गापैकीं ( थ ) आणि चवथे सूत्रापैकीं ( च ) वर्गातील झ, ञ अशीं अक्षरें घालून चवथा स्तंभ पुरा केला आहे. साराश चार सूत्रांतील व चार स्तंभांतील स्वर आणि व्यंजनें अशीं सर्व अक्षरें घेऊन ग्रंथकारानें हें सबंध कोष्टक तयार केलें आहे. पुढील कोष्टकावरून ही सर्व रचना ध्यानांत येईल.

अवहडाचक्रामध्यें कोणत्या नावास कोणतें नक्षत्र व त्याचा चरण येतो हें ज्याप्रमाणें पहावयास सांपडतें त्याचप्रमाणें चालू व्यावहारिक नावावरून अगर जन्म नावावरून नक्षत्र व राशी कोणती हेंही पाहतां येते. ह्यावरून लक्षांत येईल कीं, अवहकडाचक्र म्हणजे नक्षत्र स्थिति दर्शक चक्र आहे.

ह्या अवकहडाचक्राचा उपयोग उपनयनप्रसंगीं संध्येंतील नाव पाहण्यास ज्याप्रमाणें करण्यात येतो त्याचप्रमाणें विवाहप्रसंगीं वधूवरांची जन्मटिपणें व जन्मनक्षत्रें एकमेकांशीं जुळतात किंवा नाहीं व एकमेकास पोषक व अनुकूल आहेत किंवा नाहींत हेंही पाहण्याकडे होतो. जन्मनक्षत्रावरच राशी, गण, नाडी, योनि, वर्ण इत्यादि सर्व गोष्टी अवलंबून आहेत आणि त्यामुळेंच जन्मनक्षत्राचें महत्त्व अतिशय आहे. वैदिककालीं केवळ नक्षत्रात्मकच ज्योतिष होते पण अलीकडे २५०० वर्षांपासून ते राश्यात्मक झालें आहे.

## शतपद अवकहडा चक्रोपपत्ति कोष्टकम्. शतपदचक्रम्.

| | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| कृत्तिका. अ सूत्र. | व | क | ह | ड १ | मघा म सूत्र. | ट | प | र | त २ | १ |
| इ | वि | कि | हि | डि | मि | टि | पि | रि | ति | २ |
| उ | वु | कु घ स्तंभ ङ छ | हु | डु | मु | टु | पु. ष. स्तंभ. ण. ठ. | रु | तु | ३ |
| ए | वे | के | हे | डे | मे | टे | पे | रे | ते | ४ |
| ओ | वो | को | हो | डो आश्लेषा. | मो | टो | पो | रो | तो विशाखा | ५ |
| अनुरा. न सूत्र. | य | भ | ज | ख ३ | धनिष्ठा ग सूत्र | स | द | च | ल ४ | ६ |
| नि | यि | भि | जि | खि | गि | सि | दि | चि | लि | ७ |
| नु | यु | भु ध स्तंभ फ ढ | जु | खु | गु | सु | दु थ स्तंभ. झ ञ | चु | लु | ८ |
| ने | ये | भे | जे | खे | गे | से | दे | चे | ले | ९ |
| नो | यो | भो | जो | खो श्रवण | गो | सो | दो | चो | लो भरणी | १० |

प्राणिमात्राचें नक्षत्रनांव किंवा नक्षत्रनावावरून नक्षत्र समजण्यासाठीं अ, व, क, ह, डा चक्र लिहितो. याची उपपत्ति मागें सांगितली आहे ह्या अवकहडाचक्रांत जी अक्षरें-ऱ्हस्व दिलेलीं आहेत तीं दुसऱ्या कांहीं ग्रंथात व चालू प्रचारात दीर्घ म्हणण्यात येतात. उदाहरणार्थ, कोष्टकांत "ना, नि, नु, ने." असें आहे त्याच्याऐवजीं, ना, नी, नू, ने. असे म्हणण्याचा प्रघात आहे. तात्पर्य अवकहडाचक्रात ज्या ठिकाणीं ऱ्हस्व अक्षरें आहेत तेथें ती दीर्घ समजावी.

# अवकहडाचक्र. ( श्लोक )

चूचेचोलाऽश्विनी प्रोक्ता लीलूलेलो भरण्यथ ।
आईऊए कृत्तिकास्यादोवावीवू तु रोहिणी ॥ २०३ ॥
वेवोकाकी मृगशिरः कुघङछार्द्रिका तथा ।
केकोहाही पुनर्भस्यात् हूहेहोडा तु पुष्यभं ॥ २०४ ॥
डीडूडेडो तथाश्लेषा मामीमूमे मघा स्मृता ।
मोटाटीटू तु पूर्वास्यात् टेटोपाप्युत्तरातथा ॥ २०५ ॥
पूषाणाठा हस्ततारा पेपोरारी तु चित्रिका ।
रूरेरोता स्मृता स्वाती तीतूतेतो विशाखिका ॥ २०६ ॥
नानीनूनेऽनुराधा च ज्येष्ठा नोयायीयू स्मृता ।
येयोभोभी मूलतारा पूर्वाषाढा भुधाफढा ॥ २०७ ॥
भेभोजाज्युत्तराषाढा जूजेजोखाऽभिजिद्भवेत् ।
खीखूखेखो श्रवणभं गागीगूगे धनिष्ठिका ॥ २०८ ॥
गोसासीसू शतभिषक् सेसोदादी तु पूर्वभा ।
दूथझञोत्तराभाद्र देदोचाची तु रेवती ॥ २०९ ॥

अर्थ—अश्विनी नक्षत्राच्या प्रथम चरणास चु हें अक्षर, द्वितीय चरणास चे, तृतीय चरणास चो आणि चतुर्थ चरणास ला अशीं चार चरणास चार अक्षरें आहेत. याप्रमाणेंच भरणी आदिकरून नक्षत्राच्या चरणास चार चार अक्षरें आहेत. तीं श्लोकात सांगितल्याप्रमाणें क्रमेंकरून समजावीं. श्लोकाचे अर्थ स्पष्ट समजण्याकरिता खालीं स्पष्टीकरण करतो.

नक्षत्रमित्थंचतुरंघ्रिकं भवेन्नामाक्षरं जन्मनि तस्य युज्यते ।
राशिस्तथैको नवभिस्तदंघ्रिभिर्नवांशसंज्ञैरजतो विनाभिजित् ॥ २१० ॥

अर्थ—वर लिहिल्याप्रमाणें चार चरणाचें एक नक्षत्र जाणावें. जो प्राणी ज्या नक्षत्राच्या ज्या चरणावर उत्पन्न होईल त्याला त्या चरणाचे जें अक्षर असेल तें अक्षर प्रथम लावून नाव ठेवावें. म्हणजे अश्विनीच्या प्रथम चरणावर जन्मलेला जो प्राणी त्याचें चूडामणि असें नाव ठेवावें. याप्रमाणें पुढेंही चेमदेव, चोलदेव, लाटपति इत्यादि नावें जाणावीं. नक्षत्राच्या चरणास नवांश असें नाव असून त्या नवांश नावाच्या नऊ चरणांनीं एक राशि होतो. त्या राशीस क्रमानें मेष, वृषभ इत्यादिक बारा नावें आहेत. त्यात अभिजित् नक्षत्राची मात्र गणना करावयाची नाहीं राशीसंबधीं पुढें सांगू

ज्या नक्षत्राच्या ज्या चरणावर जन्म असेल ते अक्षर त्या मनुष्याचें नांवातील आद्याक्षर असावें हा नियम ठीक आहे. पण नांव ठेवतांना ही गोष्ट केव्हांही विसरतां कामा नये कीं, नक्षत्रानुरोधानें येणारें आद्याक्षर घेतलें तरी तें घेऊन सुद्धां नांव जे ठेवावयाचे ते तो मनुष्य ज्या जातींत जन्माला आला असेल त्या जातीच्या नांवाप्रमाणेंच ठेवले पाहिजे. जसें न हें अक्षर असतां ब्राह्मणांत नारायण हें नांव येईल तर पारशांत नसरबानजी असेच ठेवावें लागेल.

## तिथ्यादिकांचें मध्यममान व नक्षत्रचरणगणना.

तिथिनक्षत्रांचें मध्यम मान ६० घटिका असें जरी असलें तरी त्यांचें स्पष्टमान ६० घटिकापेक्षा " अष्टवृद्धिर्दशक्षयः " असें किंवा ह्या प्रमाणाच्या जवळ जवळ येतें. याचा स्पष्ट अर्थ हा कीं, एक तिथि अगर नक्षत्र स्पष्ट मानानें कमींत कमी ५० घटिकापर्यंत व जास्तींत जास्ती ६८ घटिकापर्यंत येतें, आणि अर्थातच मग नक्षत्रचरण पाहताना कोणतेंही इष्ट नक्षत्र एकदर जितक्या घटिकांचें असेल त्या मानानें त्याच्या चरणाची घटिकापळें येणार. तिथि किंवा नक्षत्र नेहमीं सूर्योदयालाच सुरू होतें असें नाहीं. सबंध दिवसात तें केव्हाही सुरू होतें. म्हणून कोणतेंही नक्षत्र कोणत्यावेळीं सुरू होतें व दुसऱ्या दिवशीं तें कोणत्या वेळीं सपतें याची घटिकात्मक गणना करून त्याचे समसमान असे ४ भाग करावे त्या ४ भागापैकीं १ भाग म्हणजेच नक्षत्राचा चरण होय

पचागात दररोजचीं जीं नक्षत्र नावें दिलेलीं असतात तीं सूर्योदयाला जें नक्षत्र असेल त्याची दिग्दर्शक असतात व त्या नक्षत्रापुढें दिलेलीं घटिकापळें तें नक्षत्र सूर्योदयानतर किती घटिका पळांनीं सपतें याचीं निदर्शक असतात, ज्या वेळीं एक नक्षत्र सपतें त्याच वेळीं त्याच्या पुढील नक्षत्र सुरू होतें. ही गोष्ट लक्षात ठेवली असता पचागात दिलेल्या कोणत्याही नक्षत्राच्या घटिकापळावरून कोणतें नक्षत्र केव्हा सुरू होतें हेंही दिलेलें असतें असें म्हणावयास कांहींच हरकत नाहीं. पण हा समजुतीचा भाग झाला. पचागात दिलेलीं नक्षत्राचीं घटिकापळें हीं त्या नक्षत्राच्या समाप्तीची व त्याच्या पुढील नक्षत्राच्या आरंभाची वेळ असते हें निश्चितपणें लक्षात ठेवावें.

नक्षत्राचा व त्याच्या घटिकापळाचा उपयोग चद्राची स्पष्ट स्थिति समजण्यास जसा होतो तसाच तो ग्रहाच्या महादशा, अतर्दशा, विदशा, उपदशा काढण्याचे कामीं फार होतो. त्याचप्रमाणें गोचरीचे ग्रह आणि चद्राचे व इतर ग्रहाचे घडणारे योग पाहण्यास याची फार जरूर लागते म्हणून नक्षत्रस्थिति पाहताना कोणतीही चूक होऊ देता कामा नये

पचागात दररोजचीं जीं नक्षत्रें दिलेलीं असतात त्यास दिननक्षत्रें किंवा चद्रनक्षत्रें म्हणतात. कारण त्या दिवशीं चद्र त्या नक्षत्राच्या मर्यादा विभागातून भ्रमण करीत असता. दुसरीं नक्षत्रें म्हणजे उदयनक्षत्र होत. हीं पचागात दिलेलीं नसतात. पण याचें महत्त्व फार विलक्षण आहे. हीं नक्षत्रें एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंतच्या २४ तासात किंवा ६० घटिकात पूर्व क्षितिजावर उदय पावतात व पश्चिम क्षितिजावर अस्तास जातात. ह्या उदयनक्षत्राचा सबध जन्मलग्नाशीं विशेष आहे. आणि म्हणूनच जन्मलग्नाला वैशिष्ट्य किंवा प्राधान्य फलज्योतिष शास्त्रात दिलेलें आहे उदयनक्षत्रांचें विवेचन करण्याचा प्रसग दशम प्रकरणाचे वेळीं येणार असल्यानें त्याचें विस्तारपूर्वक स्पष्टीकरण त्याचवेळीं करू. पण नक्षत्रात दोन प्रकार आहेत आणि ते म्हणजे ( १ ) चद्रनक्षत्रें किंवा दिननक्षत्रें. (२) आणि उदयनक्षत्रें हे दोन हें प्रत्येकानें लक्षात ठेवावें.

आता चरण काढण्याची पद्धति सागतों —उदाहरणार्थ, शके १८५१ त फाल्गुन कृ ११ मगळवार या दिवशीं सूर्योदयानतर १५ घटिका या वेळीं कोणत्या नक्षत्राचा कोणता चरण येतो व इष्ट वेळीं कोणतें नक्षत्र किती भुक्त ( भोगलें गेलें ) झालें व किती भोग्य ( भोगावयाचें ) राहिलें, एकदर त्या नक्षत्राचीं घटिकापळें किती येतात हे काढावयाचे आहे तेव्हा पृ० ४२ वर दिलेलें पचाग पाहा. त्यांत इष्ट दिवशीं श्रवण नक्षत्र ३४ घ. २३ पळें आहे म्हणजे त्या वेळीं श्रवण नक्षत्र सपून धनिष्ठा नक्षत्र सुरू होणार.

आपणांस श्रवण नक्षत्र एकदर किती घटिकापळें आहे हें पहावयाचें आहे. कारण आपला इष्टकाळ श्रवण नक्षत्र सरण्याच्या पूर्वीचा आहे म्हणून श्रवण नक्षत्र सुरू केव्हा झालें हें पाहणें जरूर.

सोमवारीं उत्तराषाढा २७ घ १० पळें यावेळीं सपून श्रवण नक्षत्र लागतें अर्थात् २७ घ १० पळें ६० घटिकांतून वजा ( ६० घटिकांतून वजा करण्याचे कारण दिवस ६० घटिकांचा असतो ) करितां बाकी ३२ घटिका ५० पळें श्रवण नक्षत्र सोमवारीं झालें त्यांत मगळवारीं सूर्योदयापासूनचे श्रवण नक्षत्र ३४ घ २३ पळें मिळवितां ६७ घटिका १३ पळें एकदर श्रवण नक्षत्र आलें एकदर पळां पळात सर्वर्क्ष म्हणतात. इष्टकाल

पर्यंत गेलेल्या घटिकापळांस भुक्तर्क्ष म्हणतात व जन्मकालानंतर किंवा इष्टकालानंतर राहिलेल्या घटिकापळांस भोग्यर्क्ष म्हणतात. वरच्या उदाहरणात श्रवण सर्वर्क्ष ६७ घ. १३ पळें आलें. आतां भुक्तर्क्ष पहावयाचे.

मंगळवारीं सूर्योदयानंतर १५ घटिकानीं इष्टकाळ असून मंगळवार सूर्योदयानंतर श्रवण नक्षत्र ३२ घटिका ५० पळें होते. ह्या दोन्हींची बेरीज केली असतां श्रवण नक्षत्र सुरू झाल्यापासून इष्ट वेळेपर्यंत ४७ घ. ५० पळें भुक्त झालें. ही भुक्त घ. पळे एकंदर नक्षत्र ६७ घ. १३ पळें यातून वजा केली असता १९ घ. २३ पळें इतकें श्रवण नक्षत्र जन्मानंतर भोग्य राहिलें.

आता इष्ट वेळीं श्रवणाचा कोणता चरण येतो हे पहावयाचें. ६७ घ. १३ पळाचे ४ भाग केले असता १६ घटिका ४८। पळाचा एक चरण आला. सोमवारीं २७ घ. १० पळानीं श्रवण नक्षत्र सुरू झालें म्हणून त्यात १६ घ. ४८। पळें मिळविलीं तेव्हा सोमवारीं ४३ घटिका ५८। पळापर्यंत श्रवणाचा प्रथम चरण पूर्ण झाला. त्यात पुन: १६ घ. ४८। पळें मिळविता मंगळवारीं ० घटिका ४६॥ पळापर्यंत दुसरा चरण पूर्ण झाला. त्यात १६ घ. ४८। पळें मिळविता मंगळवारीं १७ घ. ३४॥। पळापर्यंत तिसरा चरण पूर्ण झाला. त्यात १६ घ. ४८। पळें मिळविता मंगळवारीं ३४ घ. २३ प या वेळीं श्रवण नक्षत्राचा चवथा चरण पूर्ण झाला.

ह्यावरून हें स्पष्ट झालें कीं इष्ट काळीं श्रवण नक्षत्राचा तृतीय चरण चालू होता. आणि श्रवणाच्या तृतीय चरणाचे नक्षत्राक्षर "खे" हें आहे अर्थात् ह्यावेळीं जन्म झालेल्या मनुष्याचें जन्मनक्षत्रनाव खेमराज किंवा खेमदेव असें आलें.

तिथि, नक्षत्र, योग, करण, हे केव्हाही समाप्त होवोत व सुरू होवोत किंवा चंद्राचें व ग्रहांचीं राश्यंतरें संबंध दिवसात केव्हाही होवोत पण पचांगात दिलेलें दिवस हे ६० घटिका प्रमाणाचेच निश्चित असतात हे केव्हाही विसरूं नये. तिथि, नक्षत्रें, योग हे ६० घटिकापेक्षा कमी अगर जास्ती नेहमीं येतील पण दिवसाचें मान ६० घटिका हें केव्हाही कम–जास्त बदलणार नाहीं.

## २७ नक्षत्रांच्या बारा राशी.

वेदकालापासून तहत सिद्धांत कालापर्यंत नक्षत्रतारानंतर निश्चित मृगादि तदत् कृत्तिका गणना पद्धतीनें व सिद्धांत कालापासून आजपर्यंत राशिचक्रारंभस्थान निःशर रेवती योगतारा जयंती ऊर्फ झीटापिसियम ह्यापासून ३०।३० अंशाच्या मेषादिराशी निश्चितपणें प्रचारात आहेत त्या येणें प्रमाणें:—

अश्विन्योथभरण्योबहुलापादश्चकीर्त्यते मेषः ।
वृषभोबहुलाशेषं रोहिण्यर्धंच मृगशिरसः ॥ १ ॥ बृहत्संहिता ५३१॥ २११॥

अश्विनी, भरणी आणि कृत्तिकेचा प्रथम चरण याची मेषराशी होते. कृत्तिका नक्षत्राचे पुढील ३ चरण, रोहिणी व मृगशीर्षाचे पहिले २ चरण याची वृषभ राशी होते.

मृगशिरसोर्धं रौद्रं पुनर्वसोर्श्वांशकत्रयं मिथुनं ।
पादश्चपुनर्वसोः (स्तोः !, सतिष्यो श्लेषाचकर्कटकः ॥ २ ॥ बृ.सं.॥ २१२॥

मृगशीर्षाचे पुढील २ चरण, आर्द्रा व पुनर्वसूचे पहिलें ३ चरण याची मिथुन राशी होते. पुनर्वसूचा शेवटचा चरण, पुष्य आणि आश्लेषा याची कर्क राशी होते.

सिंहोथमघापूर्वाचफाल्गुनीपाद उत्तरायाश्च ।
तत्परिशेषं हस्तश्चित्रार्धंचकन्याख्यः ॥ ३ ॥ बृ. सं. ॥ २१३ ॥

मघा, पूर्वा, उत्तराचा प्रथम चरण याची सिंहराशी होते. उत्तराचे पुढलें तीन चरण, हस्त व चित्राचे पहिले दोन चरण याची कन्या राशी होते.

तौलिनिचित्रांत्यार्धं स्वातिः पादत्रयं विशाखायाः ।
अलिनिविशाखापादस्तथानुराधान्विता ज्येष्ठा ॥ ४ ॥ बृ. सं. ॥ २१४॥

चित्रा नक्षत्राचे पुढील २ चरण, स्वाती व विशाखाचे प्रथम तीन चरण याची तूळराशी होते. विशाखाचा शेवटचा एक चरण, अनुराधा व ज्येष्ठा यांची वृश्चिकराशी होते.

मूलमषाढापूर्वाप्रथमश्चाप्युत्तरांशकोधन्वी ।
मकरस्तत्परिशेषं श्रवणः पूर्वंधनिष्ठार्धं ॥ ५ ॥ बृ. सं. ॥ २१५

मूळ, पूर्वाषाढा आणि उत्तराषाढा याचा प्रथम चरण याची धनुराशी होते. उत्तराषाढाचे पुढील ३ चरण, श्रवण आणि धनिष्ठाचे पहिले दोन चरण याची मकर राशी होते

कुंभोंत्यधनिष्ठार्धं शतभिषगंशत्रयंच पूर्वायाः ।
भद्रपदायाः शेषं तथोत्तरारेवतीझपः ॥ ६ ॥ बृ. सं. ॥ २१६ ॥

धनिष्ठाचे शेवटचे २ चरण, शततारका व पूर्वाभाद्रपदाचे पहिले ३ चरण याची कुंभराशी होते. पूर्वाभाद्रपदाचा शेवटचा चरण, उत्तराभाद्रपदा आणि रेवती याची मीनराशी होते.

आश्विनीपित्र्यमूलाद्या मेषसिंहहयादयः ।
विषमर्क्षांत्रिवृतंते पादवृध्यायथोत्तरं ॥ ७ ॥ बृ. सं. ॥ २१७ ॥

आश्विनी ( मेष ) मघा ( सिंह ) मूळ ( धनु ) या नक्षत्रापासून अनुक्रमाने विषम म्हणजे तिसऱ्या नक्षत्रावर चरण वृद्धीने म्हणजे १ चरण, २ चरण, ३ चरण, ४ चरण याप्रमाणे राशी समाप्त होतात.

उदाहरणार्थ आश्विनीपासून तिसरें नक्षत्र कृत्तिका, त्याच्या पहिल्या चरणावर मेषराशी समाप्त होते. कृत्तिकापासून तिसरें नक्षत्र मृग त्याच्या दुसऱ्या चरणावर वृषभराशी पूर्ण होते. मृग नक्षत्रापासून तिसरें नक्षत्र पुनर्वसु त्याच्या तिसऱ्या चरणावर मिथुनराशी पूर्ण होते. पुनर्वसुपासून ३ रें नक्षत्र आश्लेषा त्याच्या चतुर्थ चरणानीं कर्कराशी पूर्ण होते.

अश्विनीपासून रेवतीपर्यंत २७ नक्षत्रांच्या राशी कोणत्या हें बृहत्संहिता ग्रंथावरून मूळ श्लोकासह वर दिले आहे. आता नक्षत्राधारें राशी पाहण्यासंबंधीं जे श्लोक सर्वत्र प्रचारात आहेत ते खालीं देत आहो.

आश्विनी भरणी कृत्तिकाः पादं ( चरणं ) मेषः ।
कृत्तिकात्रयो रोहिणी मृगशिरार्धं वृषभः ॥ १ ॥ २१८ ॥
मृगशिरार्धं आर्द्रा पुनर्वसूत्रयो मिथुनः ।
पुनर्वसूपाद पुष्य आश्लेषांतं कर्कोटकः ॥ २ ॥ २१९ ॥
मघापूर्वा उत्तराः पादंसिंहः
उत्तरात्रयो हस्तचित्रार्धं कन्या ॥ ३ ॥ २२० ॥
चित्रार्धं स्वाती विशाखा त्रय स्तूलः ।
विशाखापाद अनूराधा ज्येष्ठांतं वृश्चिकः ॥ ४ ॥ २२१ ॥
मूळ पूर्वाषाढा उत्तरषाढाः पादंधनुः ।
उत्तराषाढात्रयो श्रवण धनिष्ठार्धं मकरः ॥ ५ ॥ २२२ ॥
धनिष्ठार्धं शततारका पूर्वाभाद्रपदात्रयः कुंभः ।
पूर्वाभाद्रपदाः पाद उत्तराभाद्रपदा रेवत्यंतं मीनः ॥ ६ ॥ २२३ ॥

वर बृहत्संहितेतील श्लोकांचा जो अर्थ तोच वरील श्लोकांचा आहे पण हे श्लोक होतें अशस्यामुळें येथें दिले आहेत.

अश्विनी नक्षत्राचा ज्या ठिकाणीं आरंभ होतो त्याच ठिकाणीं मेषराशीचा आरंभ आणि मीनराशीचा

व रेवती नक्षत्राचा अत होतो. राशीचक्राचा म्हणजे रेवती नक्षत्राचा अत व राशिचक्राचा व अश्विनी नक्षत्राचा आरभ हा एकाच ठिकाणीं होतो तें ठिकाण म्हणजे रेवती नक्षत्र प्रदेश विभागातील क्रातिवृत्ता वरील नि श्चर रेवती योगतारा जयती ऊर्फ झीटापिसियम हेंच होय ह्या जयती ( झीटापिसियम ) तान्या पासून १३ अश २० कलाचा प्रत्येक विभाग म्हणजे अनुक्रमानें अश्विन्यादि २७ नक्षत्रें होत.

आरभस्थान व नक्षत्रें यासबधीं येथें थोडेंसें स्पष्टीकरण केलें पाहिजे कारण जुन्या ग्रहलाघवी पचागात व नवीन शुद्ध पचागात नक्षत्रामध्यें बरेंच अतर पडतें त्याचीं कारणें सर्वाना कळलीं पाहिजेत

गेलीं २००० वर्षे सतत चाललेलें आणि आज तागायत प्रचारात असलेलें सिद्धातोक्त राशीचक्र, नक्षत्रचक्र व त्याप्रमाणें मेषादि राशींच्या आरभ व समाप्तीचे ठिकाण हे खुद्द बृहत्संहितेंतील श्लोकावरून वर दिलें आहे. आणि हेंच राशीचक्र प्रचारात राहिलें पाहिजे, पण सूर्यसिद्धात, ब्रह्मगुप्तसिद्धात इत्यादि महनीयसिद्धात कारानीं घेतलेले व त्याच्याही पूर्वीच्या वेदाग ज्योतिषापासून अव्याहत चाललेलें आरभस्थान सध्याच्या जुन्या पचागात स्थूलगणितामुळें ४ अश पुढें ढकललें गेलें आहे आणि त्यामुळेंच जुन्या ग्रहलाघवी पचागातील मेषादि १२ राशींची स्थिति आज खालीलप्रमाणें झाली आहे

जुन्या पचागात व केतकी पचागात साप्रत पुढीलप्रमाणें त्याच्या नक्षत्राची स्थिति आढळते कारण ज्या वेळीं खरोखर सिद्धातोक्त अश्विनी नक्षत्राचा एक चरण पूर्ण होतो त्यावेळीं ते अश्विनीचा आरभ व रेवतीची समाप्ति भरतात व याचप्रमाणें पुढील सर्व नक्षत्राची अवस्था होते, कशी ती पहा —

आकाशात क्रातिवृत्तीय नक्षत्र चक्रात ज्या वेळीं चद्र कृत्तिकेच्या दुसऱ्या चरणांत म्हणजे वृषभ राशींत प्रत्यक्ष असतो त्यावेळीं जुने पचागकार तो कृत्तिका नक्षत्राच्या पहिल्या चरणात मेष राशींतच आहे असें समजतात ह्याप्रमाणें कोणत्याही राशींत अगर कोणत्याही नक्षत्रात आकाशात प्रत्यक्ष चद्र प्रथम चरणात असता तो त्याच्या मागील राशी नक्षत्राच्या चवथ्या चरणात आहे असें मानतात व त्यामुळें त्याचे सर्व ग्रह चुक लेले असतात

आता ग्रहलाघवी पचागकर्त्यांना व केतकीपक्षाच्या पचागकर्त्यांना ख या सिद्धातोक्त राशि व नक्षत्र चक्राशीं आपल्या पचागातील स्थिति स्थूलत तरी जुळवून घ्यावयाची असेल तर त्यानीं खालीलप्रमाणें मेषादि राशींची सरणी व प्रचार सुरू केला पाहिजे म्हणजे त्याचे शुद्ध पचागाशीं बरेंच साम्य होईल, तो प्रकार असा — त्याच्याच पचागांतील नक्षत्राच्या चरणप्राप्त घटिका वरून त्यानीं असे म्हणावयास प्रारभ केला पाहिजे कीं,

**रेवत्येकं अश्विनी भरण्यंतं मेषः । कृत्तिका रोहिणी मृगशिरः पादं वृषभः ॥ २२४ ॥**
**मृगशिरस्त्रयो आर्द्रा पुनर्वस्वर्धं मिथुनः । पुनर्वस्वर्धं पुष्याश्लेषात्रयः कर्कः ॥ २२५ ॥**
**आश्लेषा पाद, मघा पूर्वांतं सिंहः । उत्तरा हस्त चित्रा श्वरणं कन्या ॥ २२६ ॥**
**चित्रास्त्रयः स्वाती विशाखार्धं तूलः । विशाखार्धं अनूराधा ज्येष्ठास्त्रयः कीटः ॥ २२७ ॥**
**ज्येष्ठा पाद, मूळ पूर्वाषाढांतं धनुः । उत्तराषाढा श्रवण धनिष्ठाः पादं मकरः ॥ २२८ ॥**
**धनिष्ठास्त्रयः शततारका पूर्वाभाद्रार्धं कुंभः । पूर्वाभाद्रार्धं मुत्तराभा रेवतीस्त्रयो मीनः ॥**

जी स्थिति ग्रहलाघव पचांगाची त्याच्याही पेक्षां जास्त चुकीची स्थिति केतकी ऐक्यवर्धक पक्षाची आहे कारण त्यांना कोणत्याच ग्रथांचा आधार नाहीं ग्रहलाघवोक्त अनयगति व वर्षमान चुकलें आहे येवढाच ग्रहलाघव पचांगाच्या स्थूलत्वाचा दोष पण त्यामुळें सबध राशीचक्र फिरून गेलें, हें असें कां झालें हें पहा

रेवती मेषारंभ असें ज्या ठिकाणीं लिहिलें आहे तेथें रवि अगर कोणताही ग्रह आला म्हणजे तो मेष राशींत आला अशी प्रत्यक्ष आत्माहस्यदृक्प्रत्ययाची व सूर्यसिद्धांतादिकाची मूळ यथोक्त स्थिति आहे. मेषारंभीं रवि आल्यापासून पुनः सबंध राशीचक्राचें परिभ्रमण करून मेषारंभस्थानीं त्यास येण्यास ३६५ दि. १५ घ. २३ पळें लागतात पण जुन्या पंचांगात हा काल ३६५ दि. १५ घ. ३१॥ पळें म्हणजे ८॥ पळें दर वर्षास चुकीनें जास्त धरला गेला आहे. याचा परिणाम असा झाला कीं दरवर्षी ८॥ पळेंप्रमाणें सूर्य खऱ्या आरंभ स्थानाच्या पुढें जाऊं लागला व तो जेथें येईल त्याच जागेस जुने ज्योतिषी आरंभस्थान समजूं लागले पण खरें आरंभस्थान मागेंच राहिलें. खऱ्या आरंभस्थानीं आरंभस्थान दर्शक रेवतीचा तारा आहे. खऱ्या आरंभस्थानाच्या पुढें सांप्रत ४ अंश जेव्हां रवि जातो तेव्हां त्यास मेषारंभीं आला असें जुने पंचांगकार मानतात पण हें मानणें चुकीचें आहे हें वरील आकृती वरून लक्षात येईल.

आतां **रेवती मेषारंभस्थान** आम्ही वर दाखविलें आहे तेंच कसें याचा थोडा खुलासा करूं. आपण व्यवहारात एखाद्या जागेसंबंधीं निश्चितपणें ठिकाण लक्षात येण्याकरितां ज्याप्रमाणें त्या जागेच्या पूर्वपश्चिम दक्षिणोत्तर अशा त्यास लागून असलेल्या स्थळांचें वर्णन लिहितो व त्यांचीं अंतरें आणि खुद्द त्या वस्तूचें आपाततः निश्चित वर्णन करून खात्री पटवितो त्याप्रमाणेंच प्राचीन सिद्धांतकर्त्यांनीं आरंभस्थानाच्या पूर्वपश्चिम दक्षिणोत्तर अशा खुणा सांगून खुद्द त्या ताऱ्याचेंही वर्णन केलेलें आहे. त्यांनीं केलेलें स्पष्ट वर्णन असें आहे कीं,:—

## रेवती योगतारा तु सदा मीनाज संधिगा । गोळानंद २३० ॥

म्हणजे रेवती योगतारा मीन राशीच्या अंतीं व अज म्हणजे मेषराशीच्या आरंभीं आहे. आतां रेवती नक्षत्र विभागांत जे तारे आहेत त्यांत हा तारा कोणता हे पहावयाचें म्हणून त्याचीं आणखी लक्षणें पाहिलीं तेव्हां तो निःशर म्हणजे क्रांतिवृत्ताच्या उत्तरेस अगर दक्षिणेस नसून क्रांतिवृत्ताच्या अति सन्निध आहे. आणि ह्या ताऱ्यापासून अत्यंत ठळक किंवा महत्त्वाचे असे जे चित्रा, ज्येष्ठा व धनिष्ठा हे नक्षत्रचक्रांतील ३ तारे त्याचें अंतर अनुक्रमें १८४, २३० आणि २९६॥-९७ याप्रमाणें दिलें आहे. अर्थात् ह्या प्रत्येक ताऱ्याच्या मागें तितक्या अंतरावर मेषारंभस्थान आहे. अशा ३-४ प्रकारांनीं आरंभ स्थानाचा निर्णय करण्यात आलेला आहे आणि तें स्थान कायम केलेलें आहे व हेंच आरंभस्थान शुद्ध निरयन पंचांगात घेतलें आहे.

जुन्या पंचांगातील आरंभस्थान दर वर्षी ८॥- पळें पुढें सरकत चाललें आहे पण सिद्धांत ग्रंथांत रेवती ( निःशर ) योगतारा हें निश्चल आरंभस्थान आहे निश्चल म्हणजे न चळणारें अगर न हलणारें आरंभ स्थान आणि हें अगदीं उघड आहे कीं, कोणत्याही एखाद्या वस्तूवर अगर स्थितिवर बाकीच्या अनेक गोष्टी अवलंबून असल्या व त्यांच्या स्थितीचा कायमचा संबंध जोडला गेला असला तर मूळ वस्तूची स्थिति ही सदैव निश्चलच पाहिजे. मुंबईचें बोरीबंदर स्टेशन दरवर्षी पाव मैल अर्धा मैल पुढें सरकवून जर त्या सरकविलेल्या जागेलाच कोणी बोरीबंदराचें मुख्य ठिकाण म्हणूं लागला तर ती चूक होईल व मूळ बोरीबंदर पासून प्रत्येक स्टेशनची कोसाची ठरलेली अंतरें, त्या त्या ठिकाणीं आगगाडीस जाण्यास लागणारा काल इत्यादि सर्व गोष्टी साफ बदलून जातील व बदलाव्या लागतील पण अशी स्थिति केव्हांच घडविली जात नाहीं व मूळ स्थान बदलण्याचा कोणीहि प्रयत्न करीत नाहीं. पण तसा प्रयत्न करून तसें अगर नकळत असें जुन्या पंचांगात व जाणून बुजून दुराग्रहानें केवढें पचनीं पडलेलें आहे.

## अवकहडा ( नक्षत्र ) चक्रासंबंधीं माहिती.

पृष्ठ ७२ मध्यें पंचांगांत देण्यात येणारें वर्तुळाकार अवकहडाचक्र व राशीनें घातचक्र दिलें असून पृ ७४।७५ मध्ये अवकहडाचक्र व घातचक्र सविस्तर व जास्त माहितीचें असें दिलें आहे. अवकहडाचक्र म्हणजे वस्तुतः नक्षत्रचक्र होय. कारण अवकहडा चक्रांतील प्रत्येक गोष्ट नक्षत्राधीन आहे आणि नाडी, गण, योनि, वर्ण, जन्मनक्षत्र-नांव वगैरे प्रत्येक गोष्ट नक्षत्रावरच अधिष्ठित झालेली आहे. प्रत्येक मनुष्याची जन्मराशी म्हणून म्हणते ही देखील जन्मनक्षत्रावरूनच निश्चित होते. याकुळें नक्षत्राचें महत्व पंचांगोपयोगि-

शास्त्रात काय किंवा गणित ज्योतिषात काय अतिशय आहे. अश्विनीपासून रेवतीच्या अंतापर्यंत नक्षत्रें २७ असून अश्विन्यारंभापासून रेवत्यंतापर्यंतच्या वर्तुलाकार राशीचक्राचे अंश ३६० आहेत. एकराशी ३० अंशाची अर्थात् ३६० अंशाच्या १२ राशी झाल्या. त्याचप्रमाणें ३६० अंशात २७ नक्षत्रें म्हणजे एका नक्षत्राचे प्रमाण १३ अं. २० कला आले. एका नक्षत्रात चरण ४असतात. व प्रत्येक चरण ३ अंश २०कलाचा येतो. कारण सबंध नक्षत्र १३ अंश २० कलाचें असून चरण म्हणजे नक्षत्राचा ¼ भाग होय. ह्याप्रमाणें आकाशस्थ नक्षत्राची व्यवस्था शास्त्रकर्त्यांनीं लावलेली आहे.

राशीचक्राच्या आरंभस्थानापासून १३ अंश २० कलाचें नक्षत्र ( किंवा नक्षत्राचा विभाग ) हें जें प्रमाण ज्योतिष शास्त्रकर्त्यांनीं ठरविलें तें गणिताच्या व्यवस्थेकरितां ठरविलें ही गोष्ट जरी उघड असली तरी त्याबरोबर हेंही तितकेंच स्पष्ट आहे कीं, राशीचक्राच्या आरंभस्थानापासून म्हणजे रेवती विभागातील नि.शर रेवती योगतारा जयती ऊर्फ झीटापिशियम यापासून अश्विन्यादि २७ नक्षत्राचा १३ अं. २० कलात्मक जो प्रत्येक विभाग त्यात मुख्यतः ठळकठळक व प्रमुख अशा त्या त्या नक्षत्रांच्या योगतारा याव्यात. किंवा त्या विभागाच्या जवळपास तरी याव्यात. असें ठरविण्याचें कारण हें कीं, आकाशात नक्षत्राच्या ज्या तारका किंवा योगतारे आहेत ते सारख्या अंतरावर नाहींत. कांहीं नक्षत्राचा तारा विभागारंभीं आहे, कांहींचा मध्यमार्गी आहे तर कांहींचा विभागाचें शेवटीं आहे आकाशातील ह्या नैसर्गिक नक्षत्राच्या स्थितींत बदल करणें किंवा कोणत्याही दोन ताऱ्यातील अंतर कमजास्त करणें हें कोणाच्याही हातात नाहीं. कारण ही स्थिति परमेश्वर निर्मित व निश्चित अशी आहे अश्विनी नक्षत्रापासून रेवती नक्षत्रापर्यंत प्रत्येक नक्षत्राचे जे योगतारे ठरविलेले आहेत त्याचें वर्णन प्राचीन ग्रंथात स्पष्ट आहे. उदाहरणार्थ, अमुक तारा क्रांतिवृत्तावर किंवा क्रांतिवृत्ताच्या दक्षिण अगर उत्तर बाजूस क्रांतिवृत्ताच्या अमुक अंशावर आहे किंवा तो तारा आरंभस्थानापासून अमुक अंशावर क्रांतिवृत्तात आहे अशीं वचनें स्पष्टपणें दिलेलीं असल्यामुळें प्रामाणिक संशोधकास आरंभस्थानाबद्दल संशयास जागा रहात नाहीं. आणि सांप्रत जुन्या पंचांगात कोठें आणि किती चूक पडली आहे हे तत्काल काढता येतें. पण त्याना ही खरोखर पडलेली चूक किंवा फरक तसाच दडपून टाकावयाचा आहे त्याना मात्र प्राचीन आचार्यांचे सर्व शोध आणि सांगितलेली निश्चित नक्षत्रस्थिति बदलून टाकून त्याचेऐवजीं केवळ काल्पनिक अशी स्थिति जगाच्या पुढें ठेवण्याशिवाय गत्यंतर नाहीं व त्या प्रमाणें त्याचे प्रयत्न चालू आहेत. हे प्रयत्न चालू देणें अगर त्याचा प्रसार होऊं देणें म्हणजे प्राचीन सिद्धांत बुडविण्याचे पातक किंवा महादोष करण्यापैकीं आहे ह्याकरिता प्राचीन नक्षत्रस्थिति व त्यातील तत्व कायम ठेवण्याचे प्रयत्न करणें हे प्रत्येकाचें कर्तव्य होय.

सुमारें २१३ वर्षांपूर्वी आमच्याकडे शृंगेरी, म्हैसूर वगैरे भागातील ४।५ दशग्रंथी विद्वान वैदिक आले होते. त्याच्याजवळ वेदांग ज्योतिषातील निरनिराळ्या पाठभेदासंबधीं चर्चा चालली असता त्यानीं वेदांग ज्योतिषा तील खालील मत म्हणून दाखविला तो श्लोक.—

**भगणार्धाद्युगांशश्च चित्राताराच या स्थिता। चित्रात्रिरेकभूरंशैः श्रविष्ठा या च संस्थिता॥**

**अर्थ:**—भगणार्धापुढें म्हणजे राशीचक्राच्या अर्ध्या भागाच्या अर्थात् १८० अंशाच्या पुढें युगांशावर म्ह. ४ अंशावर चित्रा तारा आहे. चित्रा ताऱ्यापासून ११३ ( त्रि. एक भू. अंकाना वामतोगतिः या नियमानें ११३ अंश ) अंशावर श्रविष्ठा म्हणजे धनिष्ठा तारा आहे. यावरून राशीचक्राच्या आरंभापासून चित्रा-तारा १८४ अंश + ११३ अंशावर म्हणजे २९७ अंशावर धनिष्ठा तारा आहे. ( २३१ )

वेदांग ज्योतिषातील श्लोकापैकीं वैदिकांनीं सांगितलेली ही स्थिति प्राचीन सिद्धांतातील आकड्याशीं ततोतंत बरोबर जुळते इतकेंच नव्हे तर शकारंभापासून आजतागायत झालेल्या ग्रंथाशींही स्थिति जुळते आणि प्रत्यक्ष वेधानें देखील हाच दृक्प्रत्यय येतो. प्राचीन अशा सर्व सिद्धांतात व खुद्द ग्रहलाघवात आरंभस्थाना पासून चित्रा तारा १८४ अंशावर दिलेला आहे व सिद्धांतात धनिष्ठा तारा २९७ च्या जवळ जवळ दिला आहे. कारण सध्याइतकी सुद्द साधनसामुग्री त्यावेळीं उपलब्ध असणें शक्य नसल्याकारणानें अर्ध्या अंशा पर्यंत कमजास्तपणा त्यात राहणें साहजिक आहे. तेव्हा चित्रातारा १८४ अंश व धनिष्ठा २९७ अंश ज्या पंचांगातील आरंभ स्थानापासून असतील तेंच पंचांग सिद्धांतोक्त पंचांग होय.

# शुद्ध पंचांगासंबंधीं व बीज संस्काराबद्दल दोन शब्द.

तिथि, वार, नक्षत्र, योग आणि करण ही कालाचीं पांच अंगें ज्यांत सूक्ष्म गणितागत व दृक्प्रत्यय-सिद्ध अशीं दिलीं आहेत अशा कालदर्शक जंत्रीस पंचांग असें म्हणतात. हीं कालाचीं पांचही अंगें शुद्ध पाहिजेत. तरच त्या कालानुसार केलेलें कोणतेंही धर्मकृत्य शास्त्रोक्तकालीं झालें असें म्हणतां येईल. भलत्याच वेळीं करण्यांत येणारें धर्मकृत्य किंवा दैनिक अनुष्ठान सफल किंवा सुफलदायी न होतां निरर्थक होणार याबद्दल तिलमात्र शंका नाहीं. जनतेचीं धर्मकृत्यें भगवान् सहस्ररश्मि श्री सूर्यनारायणाच्या व चंद्राच्या साक्षिभूत दृक्प्रत्ययानें शुद्धकालीं व्हावीत ह्या उदात्त व धर्मनिष्ठ इच्छेनेंच सूर्यसिद्धांतादि ग्रंथ प्रचारांत आले व त्या ग्रंथांत जसजसा दृक्प्रत्ययाशीं फरक पडूं लागला तसतसे ते ग्रंथ मागें पडून नवीन ग्रंथ प्रचारांत आले. आर्यसिद्धांत, सूर्यसिद्धांत, ब्रह्मसिद्धांत, सिद्धांतशिरोमणी इत्यादि महत्त्वाचे सिद्धांत ग्रंथ मागें पडून सुमारें ४०० वर्षांपूर्वी ग्रहलाघव ग्रंथ जो प्रचारांत आला त्याचें कारण तरी सिद्धांत ग्रंथांचें गणित दृक्प्रत्ययाशीं मिळेनासें झालें हेंच होय. प्रत्येक ग्रंथकार व सिद्धांतकार आपआपल्यापरीनें फार मोठ्या योग्यतेचे होते व त्यांच्याकालीं जीं साधनें उपलब्ध होतीं त्यांच्या स्थूलत्वाचा विचार करतां त्यांनीं केलेलें गणित व लावलेले शोध याबद्दल प्रत्येकास अभिमानच वाटला पाहिजे यांत तिलप्राय शंका नाहीं. पण त्यांनीं त्याच्यावेळीं केलेले सिद्धांत व गणित जगाच्या अंतापर्यंत जसेंच्या तसेंच घेतले पाहिजे, मग ते दृक्प्रत्ययाशीं व सांप्रतच्या वेधस्थितीशीं जुळत नसले तरी हरकत नाहीं. किंवा ग्रहणांत २।२ तास, उदयास्तांत १५।१५ दिवस आणि संक्रांतींत ४।४ दिवस चूक पडत असली तरी त्याची दुरुस्ती न करतां चुकीचें आहे तसेंच कायम ठेवलें पाहिजे असें म्हणणें व त्याचाच दुराग्रह धरणें म्हणजे जाणून बुजून धार्मिक प्रवृत्तीस व धर्मश्रद्धेस पूर्वाचार्यांच्या नांवाखालीं जबरदस्त धक्का देणेंच होय. सिद्धांतकार व करणग्रंथकार मागील ग्रंथांतील चुका व फरक दुरुस्त करून नवीन ग्रंथ करीत व प्रचारांत आणीत असा आजपर्यंतचा इतिहास आहे. ग्रहलाघवकारानीं मध्यमाधिकारांत कोणत्या सिद्धांतांतील ग्रह ग्रहलाघवकालीं वेधाशीं मिळतात व कोणते मिळत नाहींत हें दिलें आहे त्यावरून असें निर्विवाद सिद्ध आहे कीं, सूर्यसिद्धांत, आर्यसिद्धांत, ब्रह्मसिद्धांत ह्या सिद्धांतांतील बहुतेक ग्रह वेधाशीं त्यावेळीं मिळत नव्हते. श्रीमत् गणेश दैवज्ञानें तर स्पष्ट सांगितलें आहे कीं, वेधास मिळणाऱ्या ग्रहांवरून गणित करून ग्रहणादिपर्वें, व्रतादि धर्मकृत्यें, नीति ( राजनीति, व्यवहार ) कार्यें व विवाहादि मंगलकार्यें करावीं. यावरून पूर्वीचे सर्व सिद्धांतकार व करणग्रंथकार केवळ पूर्वीपासून चालत आलेलें म्हणून चुकीचें असलें तरी तेंच घ्यावें अशा मताचे नव्हते तर त्यांनीं मागील चुका दुरुस्त करून आकाशांत प्रत्यक्ष दृक्प्रत्यय येईल अशा तऱ्हेचे ग्रंथ केले व त्याचा प्रसार केला इतकेंच नव्हे तर सांप्रतच्या जुन्या म्हणविणाऱ्या पण वस्तुत निर्मूलपंथी, पोथीनिष्ठ आणि जुन्याच्या नांवावर तोतया पंथ निर्माण करून लोकांत बुद्धिभेद करणाऱ्यांच्या हट्टाग्रहाप्रमाणें खोट्या कल्पनांचा असत्याग्रह त्यांनीं यत्किंचितही केला नाहीं. उलट असेंही लिहून ठेवलें कीं, कालांतरानें या ग्रंथांतील गणितांत फरक पडेल तेव्हां त्या त्या वेळीं जें दृक्प्रत्ययसिद्ध व वेधसिद्ध गणित व ग्रहगतिमान येईल तेंच घ्यावें व त्याप्रमाणेंच सर्व धर्मकृत्यें करावीं.

श्रीसूर्यसिद्धांतकार सूर्यसिद्धांतांत स्पष्ट सांगतात कीं,

> " शास्त्रमाद्यं तदेवेदं यत् पूर्वं प्राहभास्करः
>
> युगानां परिवर्तेन कालभेदोऽत्र केवलम् ॥ सू. सि. म. ९, २३२ ॥

भगवान् सहस्ररश्मि सूर्यानें जें पूर्वी सांगितलें तेंच हें पुरातन ज्योतिःशास्त्र होय. परंतु अनेक युगें लोटल्यामुळें कालवशात् व दीर्घकालांतरानें उत्पन्न झालेला भेद मात्र यांत प्रविष्ट केला आहे.

श्रीब्रह्मगुप्त सिद्धांतकार म्हणतात कीं,

> ब्रह्मोक्तं ग्रहगणितं महता कालेन यत्खिलीभूतम् ।
>
> अभिधीयते स्फुटं तत् जिष्णुसुतब्रह्मगुप्तेन ॥ ब्र. स्फु. सि. ॥ २३३ ॥

ब्रह्मसिद्धांतांचें गणित महत्प्रयास केल्यामुळें मिळालेलें असें आहे. म्हणून तें ( अर्थात् ग्रहगणित बरोबर पाहून ) स्फुट म्हणजे सूक्ष्म करून घेणें.

श्रीवसिष्ठसिद्धांतकार म्हणतात.

यस्मिन् देशे यत्रकाले येन दृग्गणितैक्यकम्।
दृश्यते तेन पक्षेण कुर्यात् तिथ्यादि निर्णयम् ॥ व. सं. ॥ २३४ ॥

ज्याकालीं जें गणित आकाशातील दृश्य स्थितीशीं जुळत असेल तेंच घ्यावें व त्यावरूनच तिथ्यादि निर्णय करावा.

आकाशस्थ प्रत्यक्ष दृक्प्रत्ययात्मक ग्रहाची स्थिति घ्यावी अशी वरील तिन्ही महाप्रसिद्ध ग्रंथाचीं वचनें लक्षात घेता तिथिनक्षत्रें, ग्रहयोग, उदयास्त, नक्षत्रग्रहयुति, ग्रहणें इत्यादि प्रत्येक गोष्ट दृक्प्रत्ययास येणारीच घेतली पाहिजे, हे निर्विवाद सिद्ध होतें. मग आमच्या अमुक ग्रंथावरून गणित केलें आहे तें दृक्प्रत्ययाशीं जुळत नसलें तरी ४०० वर्षे चालू आहे म्हणून तेंच घेतलें पाहिजे असें म्हणजे केव्हाही अगदीं पराकाष्ठेच्या असमंजसपणाचें होईल. पण याचा फारसा विचार करण्याचें कारणच नाहीं. का कीं, ज्या ग्रहलाघवी गणिताचा, पंचांगाचा आणि त्यात कालांतरानें आलेल्या स्थूलतेचा व चुकीचा काहीं लोक व्यर्थ हट्ट धरीत आहेत, त्याच खुद्द ग्रहलाघवकर्त्यांनीं स्वतः अत्यंत समंजसपणानें काय केलें आहे व प्राचीन ग्रंथातील स्थूलता व चुका काढून टाकून नवीन आकडे व गणित घेऊन कशी दुरुस्ती केली आहे याचा खालील ग्रहलाघवातील पुरावा पहा.

## ग्रहलाघवकार, व त्याचे टीकाकार खुद्द मल्हारी व विश्वनाथ दैवज्ञ हें काय सांगतात पहा.

सौरार्कोपि विधूच्चमंककलिकोनाब्जो गुरुस्त्वार्यजो-ऽसृग्राहू च कजं ज्ञकेन्द्र-कमथार्ये सेपुभागः शनिः।
शौक्रं केन्द्रमजार्यमध्यगमितीमे यांति दृक्तुल्यतां सिद्धैस्तैरिहपर्व, धर्म, नयसत्कार्यादिकं त्वादिशेत् ॥ १६ ॥ २३५ ॥ —ग्रहलाघव.

मल्लारिः—अथ कस्मिन् पक्षे को ग्रहो घटत इत्येकवृत्तेनाह सौर इति। अर्कः सूर्यः सौरपक्षीयो घटत इति सर्वत्र। विधूच्चमपि सौरपक्षीयम्। अंककलाभिर्नव ९ कलाभिरूनोऽब्जश्चन्द्रः सौरपक्षीयः गुरुरार्यज आर्यपक्षीयो गुरुरित्यर्थः। असृग्राहू मंगलराहू चार्यपक्षीयौ। के ब्रह्मपक्षे जायते तत्तथा एवंभूत ज्ञस्य बुधस्य केन्द्रम्। अथ शब्दोऽनन्तरवाची। आर्य आर्यपक्षे शनिः सेपुभाग. पंच ५ भागयुक्तो घटते। शुक्रस्येद शौक्रम्। एवंभूत यत्केन्द्र तदजार्यमध्यगम्। अजो ब्रह्माऽऽर्यः प्रसिद्धः। अनयोः पक्षौ तयोर्मध्यं गच्छतीति तथा। उभयो. प्रसाध्यैतद्योगार्द्धतुल्य घटत इत्यर्थः। इति तेभ्य पक्षेभ्य साधिता इमेग्रहाः दृशि तुल्यतां दृग्गणितैक्यं यान्ति प्राप्नुवन्तीति। एवं ग्रहणोदयास्तताराकादौ ग्रहाणां साधनं बहुभ्यो ग्रन्थेभ्यः कर्तव्यमिति जडकर्म दृष्ट्वा आचार्यो लाघवार्थममुग्रन्थ कृतवान्। इहास्मिन् ग्रन्थे सिद्धैस्तैर्ग्रहैः पर्वधर्मनयसत्कार्यादिकमादिशेत्। पर्व ग्रहणं धर्मो यज्ञानुष्ठानैकादशीव्रतादिकम्। नयो नीतिः। राजनीति दण्डनीत्यादिः। सत्कार्यं शुभ कार्यं व्रतबन्धविवाहादि। एभ्यो ग्रन्थेभ्य एतदुत्पन्नातिथ्यादेरेवादिशेत् अय भावः। एकादश्यादिनिर्णयोऽस्मादेव तिथे. कार्यः। जातकादिषु सर्वत्र ग्रहा अनल्पा एव ग्राह्याः। यतो यस्मिन् यस्मिन्काले यद्यद्दृग्गणितैक्यकृत्तदेवग्राह्य घटमानत्वात् ॥ १६ ॥

दैवज्ञवर्यस्य दिवाकरस्य सुतेन मल्लारिसमाव्हयेन। वृत्तौ कृतायां ग्रहलाघवस्य जात लगानामिति मध्यकर्म ॥

विश्वनाथः—अथ पक्षान्तरग्रहान् दृग्गणितैक्यस्थापनमाह सौरोऽर्क इति। अत्रदृग्गणितैक्ये अर्क. सौरपक्षीयो घटत इति सर्वत्र। विधूच्चमपि सौरपक्षीयम्। अंक ९ कलाभिरूनश्चन्द्रः सौरपक्षीयो गृहीतः। गुरुरार्यपक्षे गृहीतः। असृग्राहू आर्यपक्षजौ। कज ब्रह्मपक्षज बुधस्य केन्द्रम्। आर्यपक्षे शनिः पंचभागयुक्तो गृहीत.। शौक्र केन्द्रमजार्य मध्यग ब्रह्मार्यपक्षयो. प्रसाध्य तद्योगार्द्धतुल्य घटत इत्यर्थः। इति अमुना प्रकारेणसाधिता इमे ग्रहा दृक्तुल्यतां दृग्गणितैक्यंयान्ति एवं बहुभ्यो ग्रंथेभ्यो ग्रहाणां साधनं कर्तव्यमिति जडकर्म दृष्ट्वा आचार्यो लाघवार्थमिम ग्रन्थ कृतवान् इहास्मिन् ग्रन्थे सिद्धैस्तैर्ग्रहैः पर्वधर्मनयसत्कार्यादिक

आदिशेत् । पर्वग्रहणंधर्मो धर्मकृत्यं नयो नीतिःसत्कार्यादिकं विवाहव्रतबन्धादिकमादिशेत् । यतो यस्मिन् काले यद्दृग्गणितैक्य कृत्तदेवग्राह्यं ' ग्रहलाघव म. म. सुधाकरद्विवेदीकृत पृ.७० मध्यमाधिकार १६.

अर्थः—रवि, चंद्रोच्च आणि सूर्यसिद्धांताच्या गणिताने येणाऱ्या चंद्रांत ९ कला कमी करून आलेला चंद्र, हे सूर्यसिद्धांतातून, गुरु, मंगळ आणि राहू आर्यसिद्धांतातून, बुधकेंद्र ब्रह्मसिद्धांतातून, आर्यसिद्धांताच्या गणिताने येणाऱ्या शनींत ५ अंश जास्त मिळवून येणारा शनि व शुक्रकेंद्र हे ब्रह्मसिद्धांत आणि आर्यसिद्धांत यांच्या मध्यम प्रमाणाने याप्रमाणें आकडे घेतलें असता वेधास मिळतात. म्हणून या वेधास मिळणाऱ्या ग्रहावरून गणित करून त्यावरून ग्रहणादि पर्वें, व्रतादि धर्मकृत्यें, नीतिकार्यें आणि विवाहादि मंगलकार्यें करावी.

प्रत्यक्ष ग्रहलाघवांतील जो श्लोक वर दिला आहे त्यावरून कोणाच्याही सहज लक्षात येईल की, ग्रहलाघव ग्रंथ ज्यावेळीं करण्यात आला त्यावेळीं, सूर्यसिद्धांतांतील चंद्र ९ कलांनीं चुकत होता व बाकीचे सर्व ग्रह देखील चुकीचेच येत होते त्यामुळें ग्रहलाघवकार श्रीगणेशदैवज्ञ यांनीं निरनिराळ्या सिद्धांतांतून निरनिराळे आकडे त्यांत कमीजास्त करून घेतलें व वेधाशीं जमेल असा आपला ग्रंथ बनविला. यावरून प्राचीन ग्रंथांत कसकसा फरक पडत गेला व त्याची दुरुस्ती प्रत्येकानें कशी केली हें ध्यानात येईल.

ग्रहलाघवास २११ वर्षें झाल्यानंतर त्यांत असाच फरक पडूं लागला म्हणून श्री विश्वनाथ दैवज्ञानें ग्रहलाघवाच्या रवि, चंद्र व उच्च यांच्या ध्रुवक व क्षेपकाच्या आंकड्यांत पुन्हा फरक करून घेतला व त्यानें " यातेद्विग्रहलाघवस्यधरणी या श्लोकाच शेवटीं स्पष्ट सांगितलें आहे कीं, हा फरक "दृष्टिप्रत्ययकारणाद्गणित वित् श्री विश्वनाथो बुधे " म्हणजे दृक् प्रत्ययाकरितां केला आहे.

## ज्योतिर्निबंधांत याचा केलेला विचार.

योगाग्रहाणां ग्रहणं रवीन्द्वोस्थितेस्तु बीजं विधुदर्शनं च ।
नित्योदयास्तौ खलुखेटभानां युतिश्च तेषां खचरोदयास्तौ ॥ २३६ ॥
प्रत्यक्षसमयाद्येते येन पक्षेण यत्र वै ।
स्फुटं दृक्तुल्यतां यान्ति तेन सर्वविनिश्चयः ॥ २३७ ॥
यात्रोद्वाहप्रभृतिषु फलं स्पष्टखेटाश्रयं—
यत्तस्मात्तत्साधन इह बुधैर्भाषितेऽपि क्वचित्ते।
स्पष्टा न स्युः परमपुरुषांशाश्चिराल्लक्ष्यचारास्तस्मात्साध्या
बहुविधमतैर्नैकपक्षाभिमानः ॥ २३८ ॥ ज्योतिर्विवरणे
अस्त्युच्चावचता क्षितेरत इमे स्वस्थानसंस्था ग्रहाः क्वापिक्वापि
भवन्ति दूरनिकटे दृक्चक्रचारादपि ।
दृश्यन्ते न समास्ततो बहुविधोक्तानां मतानां भवेद्यः
सिद्धान्तदृगैक्यतः स्वनगरे तेनाखिलं साधयेत् ॥ २३९ ॥ पीयूषतरंगिणी
संसाध्य स्पष्टतरं बीजं नलिकादियन्त्रेभ्यः ।
तत्संस्कृतास्तु सर्वे पक्षाः साम्यं भजन्त्येव ॥ २४० ॥ मीरभाष्य
ध्यानग्रहोपदेशाद्बीजं ज्ञात्वा सुदैवज्ञः ।
तत्संस्कृतग्रहेभ्यः कर्तव्यौ निर्णयादेशौ ॥ २४१ ॥ ब्रह्मसिद्धान्तभाष्य

पूर्वाचार्यांची ही सत्यतत्त्वनिष्ठा, उदात्त व निःपक्षपाती वृत्ति, निरभिमान, दृक्प्रत्ययात्मक शास्त्रेंकर्त्यांची

व वेधसिद्ध शुद्धपंचांगाची धार्मिक प्रवृत्ति कोणीकडे आणि सांप्रत खोट्या आणि चुकीच्या गणिताच्या पक्षाचा दुरभिमान धरून लोकांना चक्रविणारें पक्ष निर्माण करणाऱ्या केतकी-चित्रा ऐक्यवर्धक अशा नावाखालीं वावरणाऱ्याची शुद्धपंचांगविरोधी वृत्ति कोणीकडे ! कै. लो. टिळक यांनीं वैदिक परंपरेचे दृक्प्रत्ययात्मक वेधसिद्ध शुद्धपंचांग सुरु केलें तें केवळ आपली सनातन वैदिक परंपरा व सनातन नक्षत्र राशी-चक्र स्थिर कायम राहून धर्मकृत्यें शुद्धकालीं व्हावींत ह्या बुद्धीनेंच होय. लो. टिळकांच्या पश्चात् शुद्धपंचांग प्रवर्तनाचें कार्य ज्यांनीं चालविलें आहे त्यांची बुद्धि देखील हीच कीं, सिद्धांत तत्त्वसंमत व सनातन वैदिक परंपरायुक्त शुद्धपंचांग अमलांत यावें याखेरीज यांत दुसरें कोणतेंही उद्दिष्ट नाहीं व असणें शक्यही नाहीं.

पंचांगाच्या वादांत तिथि सूक्ष्म व शुद्ध पाहिजेत याबद्दल वाद नाहीं व तशा तिथि शुद्ध पंचांगांत आहेत. गुरुशुक्राचे उदयास्त, सकष्टीचे चंद्रोदय, ग्रहणाचे काल, ग्रहांच्या युत्या इत्यादि दृक्प्रत्ययाच्या गोष्टी आकाशस्थ स्थितीशीं ततोतंत जुळणाऱ्या पाहिजेत व तशा टिळकपंचांगांत असतात ही गोष्टही सर्वमान्य आहे. यांत विशेष महत्त्वाची व आश्चर्याची गोष्ट अशी कीं, जुन्या पंचांगांत त्यांच्या गणितानें वरील सर्व गोष्टी निराळ्या वेळीं काहीं तासांच्या अगर ८।१० दिवसांच्या अंतरानें येत असतां शके १८४९ पासून त्या हुबेहुब टिळक पंचांगाप्रमाणें जुनें पंचांगकर्ते देऊं लागले आहेत व जनतेंत असा खोटा भ्रम उत्पन्न करीत आहेत कीं, जुन्या गणितानेंही हेंच काल येतात. पण हा शुद्ध लपंडाव आहे

विशेष वाद व मतभेद जो आहे तो आरंभस्थान, अयनांश, अधिकमास, संक्रांति आणि आरंभस्थानानुसार येणारी ग्रहस्थिति याबद्दलच आहे. म्हणुन त्याचा थोडक्यांत खुलासा करून १९ अयनांश हेंच शास्त्रशुद्ध कसें व २३ अगर २२॥ अयनांश हे चुकीचें कसें याचें दिग्दर्शन करूं.

राशिचक्राचें आरंभस्थान सिद्धांतावरून स्पष्ट निघतें व ते रेवतीपैकीं अत्यल्प शर झीटापिशियम हेंच येतें. सिद्धांतांत आरंभस्थानापासून प्रमुख नक्षत्रताऱ्यांचें अंशात्मक अंतर दिलेलें आहे. त्यांत कृत्तिका स्पु. ३९॥-४०, मघा १२९, चित्रा १८४, ज्येष्ठा २३०, धनिष्ठा २९६॥. याप्रमाणें अंशात्मक अंतर दिलें आहे. याचा अर्थ असा कीं, ह्या प्रत्येक ताऱ्यामागें तितक्या अंतरावर आरंभस्थान म्हणजे रेवत्यंत किंवा अश्विन्यारंभ आहे. ह्या अंतरावरून आरंभस्थान टिळक पंचांगांत घेतलें आहे तेंच निर्विवाद सिद्ध होतें. व केतकी चित्रा ऐक्यवर्धक पक्षाचें आरंभस्थान खोटें ठरतें, कारण त्यांचे काल्पनिक आरंभस्थान घेतल्यास वरील ५ नक्षत्रांचे अंश अनुक्रमें ३६ (कृ.) १२५ (म.) १८० (चि) २२६ (ज्ये) २९३ (ध) असें असल्यानें प्रत्येकांत सुमारें ४ अंश चूक धडधडीत दिसून येते व या कारणानें केतकी व तदवलंबी ऐक्यवर्धक पक्ष सिद्धांतविरोधी व वैदिकपरंपरा विघातक आहे याबद्दल संशय रहात नाहीं.

शके ४५० ते ५०० च्या दरम्यान शून्य अयनांश वर्ष होतें ही गोष्ट सर्वसिद्धांत, करणग्रंथ आणि सज्ञ ज्योतिषी यांच्या मतानें निश्चित आहे. ४२१ च्या पूर्वी शून्यायनांश होतें असें म्हणणारा व सांगणारा एकही ग्रंथ अगर ह्या काल्पनिक पक्षाचें प्रतिपादन करणारा एकही विद्वान् ज्योतिषी अखिल हिंदुस्थानांत नाहीं. निरयन राशिचक्राने क्रांतिवृत्तीय आरंभस्थान निश्चल व अढळ असलें पाहिजे व आहे. प्रत्यक्ष वेधानें शके ४९६ हें वर्ष शून्यायनांश वर्ष येतें. ब्रह्मसिद्धांतासारख्या वेधनिपुणग्रंथकर्त्यांच्या ग्रंथावरूनही शके ४९६ हेंच वर्ष शून्यायनांशाचे येथार्थ ठरतें. वेदांमध्यें रेवतीचा तारा एकच असून श्रीमद्भास्कराचार्यांनीं असें म्हटलें आहे कीं, "क्रांतिवृत्तेयोमीनांतस्त रेवती तारायां निवेदय" "पौष्णांते भगण स्मृत (सूर्यसिद्धांत) म्हणजे क्रांतिवृत्तांत ज्या ठिकाणीं मीनांत आहे त्याच ठिकाणीं रेवतीतारा आहे. "तसेंच रेवत्यंतीं भगणपूर्ति" होते असें सूर्यसिद्धांतांत आहे. तात्पर्य रेवती तारेपासून राशिचक्रारंभ सिद्धांतांत आहे व तो तारा म्हणजे झीटापिशियम हाच होय. अर्थात् राशिचक्राचा व आरंभस्थानाचा तारा म्हणजे झीटापिशियम हे निश्चित. आणि म्हणूनच झीटापिशियम ऊर्फ रेवती ताऱ्यापासून अयनांश मोजले पाहिजेत.

आरंभस्थानीं तारा असेल तरच त्याला निश्चल, अचल किंवा स्थिर म्हणतां येईल व त्या ताऱ्यापासून दुसऱ्या नक्षत्रताऱ्याचें अंतर सांगतां येईल. निरयनआरंभस्थान काल्पनिक, अदृश्य व कांहीं खूण नाहीं असें असणेंच शक्य नाहीं. कारण निरयनगणना नक्षत्रतारासिद्धिष्ट आहे. आरंभस्थानीय तारा आणि संपात एका ठिकाणीं असण्यानें जें वर्ष तें शून्यायनांश वर्ष. हे प्रत्यक्ष वेधानें शके ४९६ येतें. आरंभस्थान म्हणजेच मेषराशीचा आरंभ. हे आरंभस्थान नेहमीं एकच रह. १ हजार वर्षांपासून निश्चित झालेलें व तदनुसार

कृत्तिका ताऱ्याच्या मागें ४० अंशावर असलेलें म्हणजे ४९६ शालीं जें होतें तेंच आजही असणें याचेंच नांव सिद्धांत व वैदिक परंपरा. ही शु. प. पूर्णपणें रास्तची आहे. आरंभस्थान, संपात आणि रवि मेषार्कांचे वेळीं ४९६ मध्यें एक होते. संपात दर वर्षी ५० विकला मागें हटतो ही सूक्ष्मस्थिति त्यावेळीं बिनचूक न कळल्यानें संपाताची मागें हट ण्याची गति पूर्वग्रंथकारानीं ६० विकला मानली व त्यामुळें दर वर्षास १० विकला चूक पडली आहे ही चूक पडलेली सर्वांना मान्य आहे. ( मग तो केतकीपक्ष असो किंवा दुसरा कोणता असो ) अशी चूक १४०० वर्षांची साचली असून सांप्रत सु. ४ अंश झाली आहे ही चूक जुन्या पंचांगाच्या २३ अंशांतून वजा केली म्हणजे शुद्ध अयनांश १९ येतात. आतां दुसऱ्या रीतीनें पहा. सूर्य क्रांतिवृत्तात एका ठिकाणाहून निघून वर्तोतंत पुनः त्याच ठिकाणीं येण्यास लागणारा जो काल त्यास ( सूर्याचें ) नाक्षत्र सौरवर्ष म्हणतात. हें सौरवर्ष वेधसिद्ध असें ३६५ दि. १५ घ. २३ पळांचें आहे. पण जुन्या करण ग्रंथांत तें ३६५ दि. १५ घ. ३१॥ पळें म्हणजे ८॥ पळें अधिक धरलें आहे आणि त्यामुळेंच आरंभस्थान सूर्य आणि संपात असे एके ठिकाणीं असल्याचें वर्ष जें शके ४९६ त्यापासून दरवर्षी रवी ८॥ पळें आरंभस्थानाच्या पुढें पुढें सरकत चालला आहे व तो सांप्रत सध्या आरंभस्थानाच्या पुढें ४-४॥ अंश गेला आहे सिद्धांतकाराचा व करण ग्रंथकाराचा हेतु व ध्येय हें कीं, नक्षत्रचक्राच्या आरंभस्थानीय ताऱ्यावरच नेहमीं मेषारंभ अर्थात राशिचक्रा- रंभ झाला पाहिजे. कारण, त्याशिवाय आरंभस्थान स्थिर व निश्चल राहणार नाहीं पण वर्षमानातील ८॥ पळांच्या चुकीमुळें आरंभस्थान दरवर्षी पुढें सरकूं लागलें आणि सांप्रत सबंध राशीचक्राची वैदिककालीन स्थिति जुन्या पंचां गांत बदलून गेली आहे. खालील नकाशावरून ही गोष्ट चांगली लक्षात येईल.

वर दिलेली आकृति प्रत्यक्ष वस्तुस्थिति दर्शवील. ज्या ठिकाणीं मेषारंभस्थान, झीटा ( नि शर ) रेवती तारा, संपात ४९६ असें लिहिलें आहे तें स्थान निरयन राशि-नक्षत्र-चक्राचें वेद व सिद्धांतसंमत आरंभ स्थान होय. ह्या आरंभस्थानीं रेवती ( झीटा ) ताऱ्याजवळ वसंतसंपात शके ४९६ मध्यें होता, व त्यावेळीं मेषसंक्रमणही त्याच ताऱ्यावर होत होतें अर्थात् हेंच शून्यायनांश वर्ष होय. शिवाय यावें मागें प्रथम म्हणजे कृत्तिका ताऱ्याचे मागें ४० अंशावर नक्षत्र नक्षत्रारंभ ऊर्फ रेवत्यंत आणि अश्विन्यारंभ आहे ही गोष्ट सर्व सिद्धांतात दिली आहे अर्थात झीटा नामक आरंभस्थानीय ताऱ्यापासून अश्विनी नक्षत्र व मेषराशीचा आरंभ होणें व तेथेंच नेहमीं मेषसंक्रमण होणें हाच सिद्धांत ठाम होतो. हा आरंभबिंदु मागें कायम राहण्यास नाक्षत्र सौरवर्ष सूक्ष्म म्हणजे ३६५ दि. १५ घ. २३ पळें पाहिजे. पण जुन्या ग्रंथांत तें २३ पळांऐवजीं ३१॥ पळें घेतलें आहे. त्यामुळें कसा घोटाळा झाला आहे व मोठे धार्मिक कसें बदलले गेले आहे तें पहा.

शके ४९६ मध्यें झीटा ताऱ्याशेजारीं मेषार्क झाला व तो नेहमींच तेथें व्हावयास पाहिजे. त्याप्रमाणें शुद्ध पंचांगांत होतो, पण जुन्या पंचांगांतील वर्षमानाच्या ८॥ पळांच्या वाढीमुळें त्यांची मेषार्कांत दरवर्षी

८॥ पळें पुढें पुढें सरकत चालली व दर ३५० वर्षांस १ अंश किंवा १ दिवस याप्रमाणें सुमारें १३५०-१४०० वर्षांत ४ अंश किंवा ४ दिवस पुढें सरकली आहे. व याच्याही पुढें ती अशीच सरकत जाणार. याचा उघड अर्थ असा आहे कीं, जुन्या ग्रहलाघवी पंचांगाची व केतकी, चित्रा वगैरे पंचांगाची मेषसंक्रांत सध्या अश्विनी नक्षत्राच्या दुसऱ्या चरणांत रवि गेल्यानंतर सुरु होते व तेथपर्यंतच्या अश्विनीच्या नक्षत्रचरण-विभागास ते रेवती नक्षत्र समजत असतात. पण खरोखर त्यांच्या गणितागत मेषार्क कालापूर्वी ४ अंश किंवा ४ दिवस प्रत्यक्ष मेषार्क होऊन गेलेला असतो. त्याचप्रमाणें ग्रहांचीं राश्यंतरें देखील जुन्या पंचांगांतील व केतकी, चित्रशाळा इत्यादि पंचांगांतील राश्यंतराच्या आधीं ८ दिवसांपासून २-२॥ महिने-पूर्वी होऊन गेलेलीं असतात. अर्थात् जुन्या पंचांगांतील व केतकी, चित्रशाळा इत्यादि पंचांगांतील संक्रांति, नक्षत्रें व राश्यंतरें हीं वेदसंमत स्थिर-आरंभ स्थानानुरूप खरीं राश्यंतरें व खऱ्या संक्रांति नव्हेत. कारण त्यांच्या गणितागतस्थितींत दर वर्षी ८॥ विकला आरंभस्थान पुढें सरकत असल्यानें व तेंदेखील चल आणि अस्थिर असल्यानें नक्षत्रचक्रारंभ स्थिर व निश्चित येणेंच शक्य नाहीं. गणितागत रवि जेथें येईल त्यालाच ते आरंभस्थान म्हणणार. पण ते चुकीचें आहे याची त्यांना फिकीर नाहीं.

ह्या ८॥ पळाच्या वार्षिक सरकणीमुळें म्हणा किंवा ढकलणीमुळें म्हणा जुन्या पंचांगांत खऱ्या राशि-चक्राची भयंकर उलथापालथ झालेली आहे. त्या पंचांगानें सनातन वैदिक परंपरेची *"अश्विनी भरणी कृत्तिका. पादमेष."* ही सरणी लयाला गेली असून त्यांच्या गणितागत ग्रहस्थितिमुळें मागें दिल्याप्रमाणें विलक्षण राशि-विभाग सध्या होत आहेत व ते पंचांग वापरणाराकडून मानले जात आहेत. पण ते राशिविभाग खरे नव्हेत. व खरें नक्षत्र-राशीविभागही नव्हेत. तो चुकीच्या गणितानें उत्पन्न झालेला व केलेला भ्रम-भास आहे. तेव्हां त्याच्यांत सुधारणा करून खरें आरंभस्थान घेतलेंच पाहिजे.

सिद्धांत ग्रंथांनीं निश्चित व निश्चल आरंभस्थान वैदिक कालापासून कृत्तिकादि गणना परंपरेनें घेतले व आरंभस्थानीय ताऱ्यापासून महत्त्वाच्या नक्षत्राच्या ताऱ्याचे अंतर सांगितलें ते खालीं दिलें असून हें अंतर नेहमीं सारखें असलें पाहिजे. पण ग्रहलाघवी आणि केतकी, वैकवर्धक व इतर सर्व पंचांगांतून हें अंतर चार साडेचार अंशांनीं चुकलेलें आहे ही वस्तुस्थिति स्पष्ट कळण्याकरितां सिद्धांतोक्त, शुद्ध निरयन पंचांग, ग्रहलाघवप्रणीत व केतकी अशा तुलनात्मक पद्धतीनें कोष्टक खालीं दिलें आहे.

कोष्टांतील आंकडे आरंभस्थानीय ताऱ्यापासून त्या त्या नक्षत्रताऱ्यापर्यंतच्या अंशाचे आहेत.

| | कृत्तिका | रोहिणी प्रकटयोग | पुनर्वसु | मघा | हस्त | चित्रा | स्वाती | ज्येष्ठा | मूळ | श्रवण | धनिष्ठा | पू. भा. | रेवती |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| सूर्यसिद्धांत | १९। | ४७ | ९३ | १२९ | १७४ | १८१ | १८३ | २३० | २४३ | २८२ | २९६ | ३३४ | ३६० |
| ब्रह्मगुप्त सि. | १९ | ४७ | ९३ | १२९ | १७४ | १८४ | १८३ | २३० | २४१ | २८० | २९६। | ३३४ | ३६० |
| द्रिक्षार्यसि. | १८॥ | ४७ | ९३ | १२९ | १७४ | १८३ | १८४ | २३० | २४३ | २८० | २९५॥ | ३३४ | ३६० |
| सार्वभौमसि | १९ | ४७ | ९३ | १२९ | १७५ | १८४ | १८२॥ | २३० | २४१ | २८० | २९४। | ३३६ | ३६० |
| सिद्धांतशिरो. | १९। | ४७ | ९३ | १२९ | १७४ | १८४ | १८३॥ | २३० | २४३ | २८२ | २९६। | ३३४ | ३६० |
| ग्रहलाघव | २० | ४७ | | १२९ | १७४ | १८४ | १८३। | २३० | २४३ | | २९६ | ३३४ | ३६० |
| शुद्धपंचांग | २० | ४७ | ९३ | १३० | १७३॥ | १८४ | १८४ | २३० | २४३ | २८२ | २९७॥ | ३३४ | ३६० |
| केतकी | १६ | ४३ | ८९ | १२६ | १६९॥ | १८० | १८० | २२६ | २३९ | २७८ | २९३॥ | ३३० | ३५६ |
| ग्र. ला. पंचांग. | १६ | ४३ | ८९ | १२६ | १६९॥ | १८० | १८० | २२६ | २३९ | २७८ | २९३॥ | ३३० | ३५६ |

या कोष्टकावरून प्राचीन सिद्धांतांतील स्थितीशी शुद्ध निरयन पंचांगाची, ग्रह व नक्षत्र स्थिति कशी मिळती जुळत आहे हाची साक्ष पटते. काहीं कलांचा आगे माग असणें अंशाची तफावत या वेधाच्या आणि आतांच्या स्थूल सूक्ष्म साधनांच्या योगानें दिसणें शक्य आहे, पण केतकी, वैकवर्धक इत्यादि नवीन धर्तीवर पण आणि जुने ग्रहलाघवी पंचांगें यांच्या "आरंभस्थाना" पासून वेध साधनांवरून ४ अंशांनी पुढें पडली आहे हे निर्विवाद सिद्ध होते.

आकाशात, सूर्याचा व ग्रहाचा संबंध राशीचक्रात फिरण्याचा किंवा सूर्य ज्याच्यातून फिरत आहे असें दिसतें त्याचा जो मार्ग त्यास आक्रमवृत्त किंवा क्रातिवृत्त असें म्हणतात. क्रातिवृत्ताचे निरयन राशिचक्राच्या आरंभस्थानापासून जे १३ अं. २० कलात्मक समांतर २७ भाग किंवा विभाग तीच अनुक्रमानें अश्विन्यादि २७ विभाग नक्षत्रें होत. ह्या नक्षत्र ( राशी ) चक्राचा आरंभ कोठून होतो, प्राचीन सिद्धांतकारांनी गेलीं २ हजार वर्षे क्रातिवृत्ताच्या कोणत्या ठिकाणीं राशीचक्राचा ऊर्फ नक्षत्रचक्राचा आरंभ मानला आहे हाच काय तो मुख्य मुद्दा आहे आणि राशीचक्राचें आरंभस्थान अमुक हें अनेक प्रमाणावरून सिद्ध झालें म्हणजे कोणतें पंचांग चूक व कोणतें बरोबर हें आपोआपच ठरतें म्हणून गेलीं २ हजार वर्षे व त्यापूर्वीही वेदकालापासून आरंभ स्थानाची काय स्थिति होती हें आपण पाहू.

आकाशातील क्रातिवृत्तस्थ नक्षत्रांची स्थिति वर दाखविली आहे अगदीं बरोबर क्रातिवृत्तावर किंवा क्रातिवृत्ताच्या अतिसंनिध असा रेवती विभागातील तारा तो राशीचक्राच्या आरंभस्थानाचा तारा व तेथून राशीचक्राचा व नक्षत्रचक्राचा आरंभ होतो ही स्थिति सिद्धांत ग्रंथात स्पष्ट दिलेली आहे. क्रातिवृत्ताच्या उत्तरेस अगर दक्षिणेस तारा असल्यास तो तारा सशर म्हणजे ज्याला शर आहे असा तारा समजतात व सशर तारा आरंभस्थानीं घेतलेला नाहीं. म्हणून रेवती विभागातील्या राशीचक्रारंभस्थानीय ताऱ्याचें वर्णन सिद्धांत ग्रंथात निःशर रेवती योगतारा असें केलेलें आहे. क्रांतिवृत्त व विषुववृत्त यांच्या छेदन बिंदूस संपात म्हणतात. विषुववृत्तक्रातिवृत्तास दोन ठिकाणीं छेदते. त्यांपैकीं एकास वसंतसंपात व एकास शरत्संपात म्हणतात. ह्या छेदनबिन्दु ऊर्फ संपात क्रांतिवृत्तावर नक्षत्रचक्रातून दर वर्षी ५० विकला गतीनें मागें मागें हटत जातो. शके ४९६ या वर्षी रेवती योगताऱ्यावर हा छेद-बिंदु संपात होता. त्याच्या अतिशय पूर्वी तो मृग नक्षत्रांत होता, तो पुढें रोहिणींत, नंतर कृत्तिकात, नंतर भरणींत व नंतर अश्विन्यारंभीं म्हणजे रेवती ताऱ्यावर आला. कारण रेवती तारा हाच रेवतीचा अंत व अश्विनीचा आरंभ होय. संपात दरवर्षास ५० विकला मागें हटतो ( व तो ४९६ या वर्षी अश्विन्यारंभीं होता. याचा अर्थ त्या वर्षी अयनांश शून्य होते. ) म्हणजे ७१॥। वर्षात तो १ अंश मागें हटतो. यावरून तो शके ४९६ पासून जितका मागें हटला तितके अयनांश शके १८५२ मध्यें होते हें अगदीं उघड आहे. हे अयनांश १८ अंश ५४ कला आहेत.

कारण अयनांशाचा स्पष्ट निर्णय व सिद्धांत, सूत्रात्मक सांगावयाचा म्हणजे असा कीं,

संपाताद्रेवतीतारा यांतरांशाऽयनांश ते
यत्तारा योगतारा स्यात् कलान्येको यमः शरः ॥ २४२ ॥

**अर्थः**—*वसंत संपातापासून रेवतीयोगताऱ्यापर्यंतचें अंशात्मक जें अंतर तें अयनांश होत. १३ कला दक्षिणशर असलेला असा जो रेवती विभागातील तारा तोच रेवतीचा आरंभस्थानीय योगतारा होय. ह्या स्थानाहून भिन्न असे जे चारिकडील किंवा इतर तारे ते योगतारे नव्हेत व आरंभस्थानीय तारेही नव्हेत.*

*संपात मागें हटण्याच्या गणितावरून १८५२ मध्यें अयनांश किती हे सांगितले. आतां जुन्या केतकी वगैरे पंचांगांत अयनांश २१ का घेतात हें सांगतों*

याशिवाय आरंभस्थानापासून संपात मागें हटण्याचें जे ५० विकला हें वेधसिद्ध प्रमाण तें न घेतां जुन्या पंचांगांचे कर्ते व ग्रंथकार वार्षिक ६० विकला घेतात त्यामुळें १० विकला जास्त गति धरली जाते आणि यास १० वि. चुकीनें जास्त धरल्यामुळें १४०० वर्षांत सुमारें ४ अंश मधान जास्त मागें गेला असें समजतात व त्या कारणानेंच खरे अयनांश १९ असतां जास्तगति धरल्यानें २३ अंश अयनांश मानतात ही चूक प्रायः आकाशस्थ स्थिति पाहण्याचें टाळल्यामुळें झालेली असून केवळ जे आंकडे ग्रंथात दिले आहेत तेच बरोबर असून त्या चुकीच्या गणितानें ज्या दिवशीं मेषसंक्रांत येईल तोच दिवस संक्रांतीचा मानावयाचा असा परप्रत्ययनेय बुद्धीमुळें झाली आहे ही चूक दुरुस्त केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. इतकेंच नव्हे तर ह्या चुकीमुळें जुन्या पंचांगांत सर्व राशीचक्राचा, नक्षत्रचक्राचा, प्रत्येक नक्षत्राचा, नक्षत्रचरणाचा,

८॥ पळें पुढें पुढें सरकत चालली व दर ३५० वर्षांस १ अंश किंवा १ दिवस याप्रमाणें सुमारें १३५०—१४०० वर्षांत ४ अंश किंवा ४ दिवस पुढें सरकली आहे व यापुढाही पुढें ती अशीच सरकत जाणार. याचा उघड अर्थ असा आहे कीं, जुन्या ग्रहलाघवी पंचांगाची व केतकी, चित्रा वगैरे पंचांगाची मेषसंक्रांत सध्या अश्विनी नक्षत्राच्या दुसऱ्या चरणांत रवि गेल्यानंतर सुरु होते व तेथपर्यंतच्या अश्विनीच्या नक्षत्रचरण विभागास ते रेवती नक्षत्र समजत असतात पण खरोखर त्याच्या गणितागत मेषार्क कालापूर्वी ४ अंश किंवा ४ दिवस प्रत्यक्ष मेषार्क होऊन गेलेला असतो. त्याचप्रमाणें ग्रहांचीं राश्यंतरें देखील जुन्या पंचांगांतील व केतकी, चित्रशाळा इत्यादि पंचांगांतील राश्यंतराच्या आधीं ८ दिवसांपासून २—२॥ महिने-पूर्वीं होऊन गेलेलीं असतात. अर्थात् जुन्या पंचांगांतील व केतकी, चित्रशाळा इत्यादि पंचांगांतील संक्रांति, नक्षत्रें व राश्यंतरें हीं वेदसंमत स्थिर—आरंभ स्थानानुरूप खरीं राश्यंतरें व खऱ्या संक्रांति नव्हेत. कारण त्याच्या गणितागतस्थितींत दर वर्षी ८॥ विकला आरंभस्थान पुढें सरकत असल्यानें व तेंदेखील चल आणि अस्थिर असल्यानें नक्षत्रचक्रारंभ स्थिर व निश्चित येणेंच शक्य नाहीं. गणितागत रवि जेथें येईल त्यालाच ते आरंभस्थान म्हणणार पण ते चुकीचें आहे याची त्यांना फिकीर नाहीं.

ह्या ८॥ पळांच्या वार्षिक सरकणीमुळें म्हणा किंवा ढकलणीमुळें म्हणा जुन्या पंचांगांत खऱ्या राशि-चक्राची भयंकर उलथापालथ झालेली आहे त्या पंचांगानें सनातन वैदिक परंपरेची "अश्विनी भरणी कृत्तिका पादमेष " ही सरणी लयाला गेली असून त्याच्या गणितागत ग्रहस्थितिमुळें मागें दिल्याप्रमाणें विलक्षण राशि-विभाग सध्या होत आहेत व ते पंचांग वापरणाराकडून मानले जात आहेत पण ते राशिविभाग खरे नव्हेत. व खरे नक्षत्र—राशीविभागही नव्हेत तो चुकीच्या गणितानें उत्पन्न झालेला व केलेला भ्रम—भास आहे. तेव्हां त्याच्यांत सुधारणा करून खरें आरंभस्थान घेतलेंच पाहिजे.

सिद्धांत ग्रंथानीं निश्चित व निश्चल आरंभस्थान वैदिक कालापासून कृत्तिकादि गणना परंपरेनें घेतले व आरंभस्थानीय ताऱ्यापासून महत्वाच्या नक्षत्राच्या ताऱ्याचें अंतर सांगितलें ते खालीं दिलें असून हें अंतर नेहमीं सारखें असलें पाहिजे. पण ग्रहलाघवी आणि केतकी, ऐक्यवर्धक व इतर सर्व पंचांगांतून हे अंतर चार साडेचार अंशानीं चुकलेलें आहे ही वस्तुस्थिति स्पष्ट कळण्याकरितां सिद्धांतोक्त, शुद्ध निरयन पंचांग, ग्रहलाघवग्रंथोक्त व केतकी अशा तुलनात्मक पद्धतीनें कोष्टक खालीं दिलें आहे.

कोष्ट्यांतील आकडे आरंभस्थानीय ताऱ्यापासून त्या त्या नक्षत्रताऱ्यापर्यंतच्या अंशाचे आहेत.

| | कृत्तिका | रोहिणी शकटभेद | पुनर्वसु. | मघा | हस्त | चित्रा | स्वाती | ज्येष्ठा | मूळ | श्रवण | धनिष्ठा | पू. भा. | रेवती |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| सूर्यसिद्धांत | ३९। | ४७ | ९३ | १२९ | १७४ | १८१ | १८३ | २३० | २४३ | २८२ | २९६ | ३३४ | ३६० |
| ब्रह्मगुप्त सि. | ३९ | ४७ | ९३ | १२९ | १७४ | १८४ | १८३ | २३० | २४३ | २८० | २९६। | ३३४ | ३६० |
| द्विआर्यसि | ३८॥ | ४७ | ९३ | १२९ | १७४ | १८३ | १८४ | २३० | २४३ | २८० | २९५॥ | ३३४ | ३६० |
| सार्वभौमसि | ३९ | ४७ | ९३ | १२९ | १७५ | १८४ | १८२॥ | २३० | २४३ | २८० | २९४। | ३३६ | ३६० |
| सिद्धांतशिरो. | ३९। | ४७ | ९३ | १२९ | १७४ | १८४ | १८३॥ | २३० | २४३ | २८२ | २९६। | ३३४ | ३६० |
| ग्रहलाघव | ४० | ४७ | | १२१ | १७४ | १८४ | १८३। | २३० | २४३ | | २९६ | ३३४ | ३६० |
| शुद्धपंचांग | ४० | ४७ | ९३ | १३० | १७३॥ | १८४ | १८४ | २३० | २४३ | २८२ | २९७॥ | ३३४ | ३६० |
| केतकी | ३६ | ४३ | ८९ | १२६ | १६९॥ | १८० | १८० | २२६ | २३९ | २७८ | २९३॥ | ३३० | ३५६ |
| प्र ला पंचांगें | ३६ | ४३ | ८९ | १२६ | १६९॥ | १८० | ८० | २२६ | २३९ | २७८ | २९३॥ | ३३० | ३५६ |

ह्या कोष्टकावरून प्राचीन सिद्धांतांतील स्थितीशीं शुद्ध निरयन पंचांगाची, ग्रह व नक्षत्र स्थिति कशी निकटवर्ती जुळत आहे ह्याची खात्री पटते काहीं कलांचा अगर पाव अर्ध्या अंशाची तफावत त्या वेळच्या आणि आताच्या स्थूल सूक्ष्म साधनांच्या योगानें दिसणें शक्य आहे, पण केतकी, ऐक्यवर्धक इत्यादि नवीन बनावट पक्ष आणि जुनं ग्रहलाघवी पंचांगें यांच्या नक्षत्रचक्रारंभस्थानांत प्रत्येक नक्षत्राशावरून ४ अंशाची चूक पडली आहे हें निर्विवाद सिद्ध होतें.

ह्या आकृतींत रेवती नक्षत्र विभागांत असणारे तारे दाखविले असून शके ४५० व १८४५ ह्या वर्षी विषुवद्वृत्ताची अर्थात संपाताची काय स्थिति होती हे दाखविलें आहे.

## नक्षत्रांच्या नाडी

अश्विन्यार्द्रा शतभिषक्फल्गुनीचोत्तरा तथा

ज्येष्ठाहस्तः पुनर्मूलं पू. भा. चैवाद्यनाडिका ॥ ज्योतिर्निबंध ॥ २४३ ॥

अश्विनी, आर्द्रा, शततारका, उत्तराफाल्गुनी, ज्येष्ठा, हस्त, पुनर्वसु, मूळ, पूर्वाभाद्रपदा यांची आद्यनाडी समजावी.

पूर्वाफाल्गुनिका चित्रा धनिष्ठा भरणी मृगः ।

पुष्योऽहिर्बुध्न्य पू. षाढानुराधा मध्यनाडिका ॥ २४४ ॥

पूर्वा-फाल्गुनी, चित्रा, धनिष्ठा, भरणी, मृग, पुष्य,(अहिर्बुध्न्य-)उत्तरा भाद्रपदा, पूर्वाषाढा, अनुराधा यांची मध्यनाडी समजावी.

कृत्तिका रोहिणी स्वाती मघाऽऽश्लेषाच रेवती ।

श्रवणश्चोत्तराषाढा विशाखा अंत्यनाडिका ॥ २४५ ॥

कृत्तिका, रोहिणी, स्वाती, मघा, आश्लेषा, रेवती, श्रवण, उत्तराषाढा, विशाखा यांची अंत्यनाडी समजावी.

## एकनाडीचा दोष.

एकनाडी स्थिता यत्र गुरुर्मंत्रश्च देवताः ।

तत्रद्वेषंरुजं मृत्युं क्रमेणफलमादिशेत् ॥ रुद्रयामल सं. ॥ २४६ ॥

प्रभुः पण्यांगना मित्रं देशोग्रामःपुरं गृहम् ।

एकनाडीस्थितं भव्यं विरुद्धं वेधवर्जितम् ॥ २४७ ॥

गुरु, मंत्र, देवता यांची कोणताही व्यक्तीशी एकनाडी अनिष्ट फलदायक होते.

ग्रहादयंतरांचा आणि पंचांगांतील प्रत्येक गोष्टीचा बोजवारा उडाला आहे. व तो बोजवारा शास्त्रशुद्ध १९ अंश अयनांश घेतल्याखेरीज बदलणें किंवा सुधारणें कालत्रयीं शक्य नाहीं.

**क्रांतिवृत्त व विषुववृत्त स्थितिदर्शक २ आणि रेवती नक्षत्र पुंजदर्शक १ अशा ३ आकृति खालीं दिल्या आहेत.**

ह्या आकृतींत शके ४४४ मधील क्रांतिवृत्त, विषुववृत्त आणि संपात व मेषारंभस्थिति दाखविली आहे.

ह्या आकृतींत शके १८४५ मधील क्रांतिवृत्त, विषुववृत्त संपात आणि आरंभस्थान यांची स्पष्टस्थिति दाखविली आहे.

## महा वैरयोनि.

गोव्याघ्रमश्च महिषं श्वैणं गजसिंहमाखुमार्जारम्
अहिबभ्रुवानरांज महत्त्यजेत् पुंस्त्रियो वैरम् ॥ २५४ ॥

गाय आणि वाघ, घोडा आणि म्हैस, कुत्रा आणि हरण, हत्ती आणि सिंह, उंदीर आणि मांजर, मुंगुस आणि सर्प, वानर आणि मेंढा याप्रमाणें एकमेकांचें महावैर समजावें.

## नक्षत्रांचे गण.

हस्तस्वाती मृगः पुष्यः श्रवणश्च पुनर्वसू ।
रेवत्याश्विन्यनूराधा एते देवगणास्मृताः ॥—ज्यो. सि. ॥ २५५ ॥

हस्त, स्वाती, मृग, पुष्य, श्रवण, पुनर्वसु, रेवती, अश्विनी, अनुराधा ह्या ९ नक्षत्रांचा देवगण समजावा.

पूर्वोत्तरात्रयश्चार्द्रा रोहिणी यम ( भरणी ) मानुषः ।

पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा ह्या तीन पूर्वा, त्याचप्रमाणें उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा ह्या तीन उत्तरा, आर्द्रा, रोहिणी, आणि भरणी ह्या ९ नक्षत्रांचा मनुष्यगण समजावा.

शततारा विशाखा च चित्रामूलं च कृत्तिका
मघाऽश्लेषा धनिष्ठा च ज्येष्ठा रक्षो गणस्तथा ॥ २५६ ॥

शततारका, विशाखा, चित्रा, मूळ कृत्तिका, मघा, आश्लेषा, धनिष्ठा, ज्येष्ठा या ९ नक्षत्रांचा राक्षसगण समजावा.

दे–म–रा–म–द–मं–दे–दे–रा–रा–म–म–द–रा–द–रा ।
अ. भ. कृ. रो. मृ. आ. पु. पु. आ. म. पू. उ. ह. चि. स्वा. वि.
दे–रा–रा–म–म–दे–रा–रा–म–म–देऽति गणाः स्मृताः ॥ ज्यो. नि. १४३
अ. ज्ये. मू. पू. उ. श्र. ध. श. पू. उ. रे. ॥ २५७ ॥

वर दिलेला श्लोक गण पाहण्याचा असून त्यात अश्विनी नक्षत्रापासून रेवतीपर्यंत प्रत्येक नक्षत्राच्या गणाचे आद्याक्षर क्रमानें दिलें आहे. दे किंवा द म्हणजे देवगण, म किंवा मं म्हणजे मनुष्यगण आणि रा म्हणजे राक्षसगण अशी ह्या श्लोकाची सरणी आहे.

## राशींचे वर्ण.

मीनालिकर्कटा विप्रा नृपाः सिंहाज धन्विनः
कन्यानक्र वृषावैश्याः शूद्रायुग्मतुलाघटाः ॥ २५८ ॥

मीन, वृश्चिक व कर्क ह्या राशींचा विप्रवर्ण, सिंह, मेष, धनु यांचा क्षत्रियवर्ण, कन्या, मकर, वृषभ यांचा वैश्यवर्ण आणि मिथुन, तूळ आणि कुंभ यांचा शूद्रवर्ण याप्रमाणें वर्ण समजावे. "विप्रः क्षात्रो वैश्य शूद्रः षण्मीनाद्यनुक्रमात् " असाही एक सामान्य श्लोक आहे. याचा अर्थ मीनराशीपासून अनुक्रमानें बाराही राशींचे वर्ण विप्र, क्षत्रिय, वैश्य, शूद्र याप्रमाणें समजावे

## मेषादि बारा राशींचे स्वामी.

| भौमः | शुक्रो | बुध | श्चंद्रो | रविः | सौम्यो | भृगुः | कुजः । |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मेष | वृषभ | मिथुन | कर्क | सिंह | कन्या | तूळ | वृश्चिक |
| | गुरु | मंदः | शनि | र्जीवो | मेषादीनामधीश्वराः ॥ | | |
| | धनु | मकर | कुंभ | मीन | | | |

मेषराशीचा स्वामी मंगळ, वृषभेचा शुक्र याप्रमाणें मेषादि १२ राशींचे स्वामी समजावे.

## राशींचें घातचक्र.

नं पू भा भ ज पू रि नं ज रि ज पू घाततिथिर्मेषभात्
सू श श्चंबुशशाङ्कसुः शुमगुशुर्वारा महोस्वानुमूः ।
श्रूपूर्षांत्यभरोशिवाहिभमथो चंद्रेपु नंदद्विपद्
दिग्रामा द्रियुगाष्टरुद्ररवयो घातं भमिंदुस्तथा ॥ १ ॥ ॥ २५९ ॥.

## स्त्रियांचा घातचंद्र.

भू १ नागा ८ श्वां ७ क ९ वेदा ४ ग्नि ३ रसा ६
श्व्या २ शा १० शिवे ११ पु ५ भिः ।
सूर्यै १२ श्च प्रमिता मेषाद्घात चंद्रा मृगीदृशाम् ॥ २६० ॥

ह्या श्लोकांत पारिभाषिक शब्दात व संक्षेत मेषादि बारा राशींच्या घाततिथि, घातवार, घातनक्षत्रें आणि घातचंद्र सांगितले आहेत ते असेः—नं. म्हणजे १-६-११ ह्या नंदा संज्ञात्मक तिथि, पू म्हणजे ५–१०-१५ ह्या पूर्णा संज्ञेच्या तिथि, भ किंवा भा म्हणजे २-७ १२ ह्या भद्रा संज्ञेच्या तिथि ज म्हणजे ३-८-१३ ह्या ज–या संज्ञकतिथि, आणि रि म्हणजे ४-९-१४ ह्या रिक्ता संज्ञकतिथि, अशा संज्ञेनें बोधित मेष राशीस नंदा, वृषभ राशीस पूर्णा, मिथुनेस भद्रा ह्याप्रमाणें १२ राशींच्या घाततिथि जाणाव्या. तिथींच्या नंतर सूशश्चंबु याप्रमाणें मेषादि राशींचे वार सांगितले. त्याच्या पुढें महोः स्वानुमूः या चरणार्धापासून नक्षत्रें सांगितलीं आहेत. म म्हणजे मघा हो म्हणजे हस्त ( येथें आमच्या मतें महो ऐवजीं मह असें असावयास पाहिजे होतें. ) स्वानुमू म्हणजे स्व+अनु+मू म्हणजे स्वाती, अनुराधा, मूळ, श्रू म्हणजे श्रवण ( येथेंही श्रूच्या ऐवजी श्रः पूषा असें चाललें असतें. ) पूषा म्हणजे शततारका ( वास्तविक पाशी किंवा पाशा अशी शततारकेची संज्ञा आहे ) अंत्य म्हणजे रेवती, भ म्हणजे भरणी रो म्हणजे रोहिणी, शिव म्हणजे आर्द्रा, अहि म्हणजे आश्लेषा याप्रमाणें घातनक्षत्रें दिली आहेत. व चंद्रेपु येथून घातचंद्र सांगितले आहेत. चंद्र म्हणजे १, इषु म्ह. ५ नंद म्ह. ९, द्वि म्ह. २ पद् म्ह. ६ दिक् म्ह. १०, ग्राम म्ह. ३, अद्रि म्ह ७, युग म. ४, अष्ट म्ह. ८, रुद्र म्ह. ११ रवि म्ह. १२ याप्रमाणें मेषापासून बारा राशींचे घातचंद्र जाणावे. स्त्रियांचे घातचंद्र वरील श्लोकातच आ घालून दाखविले आहेत.

## घातमास–घातप्रहर.

कामाऽपा पांज्येभमाऽश्वि शर्वचेफाच घातदः ॥ २६.

मे. वृ. मि. क. सिं. क. तु. वृ. ध. म. कुं. मी.

याप्रमाणें मेषादि राशींचे घातमास समजावे. श्लोकात आद्याक्षरें दिलीं आहेत.

इपु ( १ ) वेंद ( ४ ) त्रि ( ३ ) भू ( १ ) ग्नीम ( ३ ) रेक (१) वेद ( ४ ) अभू ( १ ) रिपुः ( १ ) युगा ( ४ ) ऽग्नि ( ३ ) वेंद ( ४ ) यामश्च घातयामान्यनुक्रमात् ॥ २६२ ॥

मेपादि १२ राशींचे घातप्रहर वरील श्लोकात सांगितले आहेत. ज्योतिष विषयक ग्रन्थाच ग्रथात घातमास व घातप्रहर दिलेले नाहींत.

## घातचंद्रादि वर्ज्य.

यात्रायां वर्जयेत् प्राज्ञो नूतनं वस्त्रधारण ।
भूपणं घातचंद्रंच घारर्क्षं न च शोभनं ॥ २६३ ॥

घातवार, घातनक्षत्र, घातचद्र, घाततिथि ह्या चार गोष्टी यात्रा, नवीन वस्त्र अगर अलकार धारण यासच वर्ज्य कराव्या. या खेरीज इतर कोणत्याही कार्यास वर्ज्य करण्याचें कारण नाहीं.

पुष्कळ लोकाची अशी समजूत असो असते कीं, कोणत्याही महत्त्वाच्या कार्यास व मगल कार्यास घातवारादि वर्ज्य करण्यास ज्योतिष शास्त्रात सांगितल आहे पण ही समजूत अयोग्य आहे.

नक्षत्रचक्र ऊर्फ अवकहडाचक्राची व घातचक्राची माहिती येथवर सांगितली आता पचागात दर-रोजचीं जीं नक्षत्रें दिलेलीं असतात व ज्याच्यावर आकडडा चक्राची सर्वस्वी मदार आहे त्या नक्षत्राचे दोन प्रकार म्हणजे चद्रनक्षत्रें आणि उदितनक्षत्रें यासबधीं स्पष्टीकरण यथावकाश पुढें करू.

## मुहूर्तमालेच्या टीकेंत

अजाज्जन्मधीधर्मवित्तारिखत्रिस्मरांब्वष्टलाभांत्यगो घातचंद्रः ।
नृपद्वारयात्रा विरोधामयादौ विचिंत्यो विवाहादिके नैव चिंत्यः ॥ २६४ ॥

अजात्:—म्हणजे मेषापासून जन्म म्ह. १, धी म्ह. ५, धर्म म्ह. ९, वित्त म्ह. २, अरि म्ह. ६, ख म्ह. १०, त्रि म्ह. ३, स्मर म्ह. ७, अंबु म्ह. ४, अष्ट म्ह. ८, लाभ म्ह. ११, अंत्य म्ह. १२, याप्रमाणें मेषराशीपासून मीनराशीपर्यंत अनुक्रमानें त्या त्या राशीपासून वर सांगितलेल्या राशीइतक्या राशीचा चद्र घातचद्र जाणावा. उदाहरणार्थ, मकर राशीस अष्ट म्हणजे मकरराशीपासून ८ वा अर्थात् सिंह राशीचा चद्र हा मकर राशीचा घातचद होय.

मेपस्त्री रुद्र सिंहश्च दशात्रि धनुपो वृपः ।
मीन सिंह धनु कुंभो घातचंद्रान्यनुक्रमात् ॥ २६५ ॥

असाही एक पाठ आहे. ह्या सर्वांचा अर्थ एकच आहे.

अर्थ.—मेष, कन्या, कुंभ, सिंह, मकर, मिथुन, धनु, वृषभ, मीन, सिंह, धनु आणि कुंभ याप्रमाणें बारा राशींचे चद्र, अनुक्रमें मेषादि राशींचें घातचद्र जाणावे हे घातचद्र राजद्वारीं जाण्यास, प्रयाणास, विरोध करण्यास व रोगपरिहारार्थ उपाय करण्यास वर्ज्य करावे विवाहादि मगल कार्यास वर्ज्य नाहीं.

युद्धे चैव विवादे च कुमारीपूजने तथा ।
राजसेनावाहनादौ घातचंद्रं विवर्जयेत् ॥ ५८ ॥ २६६ ॥

अर्थ:—युद्ध, वाद विवाद, विवाहाच्या पूर्वीचे कुमारीपूजन, राजसेवा, वाहन व शस्त्रसंबंधीं जें कार्य याविषयीं घातचद्र वर्ज्य करावा.

अध्वरे तीर्थयात्रायां राज्ञां पट्टाभिपेचने ।
मांगल्य सर्वकार्येषु घातचंद्रं न चिंतयेत् ॥ ५९ ॥ मुहूर्तमालाटीका ॥ २६७ ॥

अर्थ.—यज्ञ, तीर्थयात्रा, राजांना पट्टाभिषेक आणि सर्व मगल कार्ये यांविषयीं घातचद्राचा विचार करू नये.

## घातवारादिवर्ज्य करण्यास आर्षवचन नाहीं.

यद्यप्यार्षिक वचनं न लभ्यते घातचंद्रादौ ॥ २६८ ॥
लुप्ता श्रुतिरनुमेया शिष्टाचारेण किं पुनर्मुनिवाक् ॥ ६० ॥ मुहूर्तमाला

अर्थः—घातचंद्र, घाततिथि, घातवार, घातनक्षत्र आणि घातलग्न याविषयीं प्रमाणभूत ऋषिवाक्य जरी आढळत नाहीं, तरीही वर सांगितल्याप्रमाणें वर्ज्य करणें बरें; कारण परंपरागत ज्योतिषी लोक हीं वर्ज्य करण्यास सांगतात. तेव्हां ह्या शिष्टाचारास काहीं तरी ऋषिवाक्य प्रमाण असेल असें अनुमान होऊं शकतें.

घातवार वर्ज्य करण्याचा प्रघात किंवा संवय अगदीं सामान्य लोकातही आहे. घातनक्षत्र, घाततिथि मास, प्रहर ह्या गोष्टी सहसा कोणी पाहात नाहींत. घातचंद्र देखील बरेच लोक पाहातात. पण इतक्या सर्व गोष्टी पाहून कोणतेही महत्त्वाचे कार्यास प्रारंभ करावयाचें ठरविल्यास सध्यांच्या काळात ती फार मोठी आपत्तीच होईल. करिता घातप्रकरणास विशेष महत्त्व देण्याचें कारण नाहीं असें आमचें मत आहे. पण कुंडलींतील बलवान् ग्रहाच्या अनुकूलतेवर कार्य करणें उत्तम.

### अथ नामविचारः ( स्वरशास्त्रे )

प्रसुप्तोयेन जागर्ति येनाऽऽगच्छति शब्दितः ।
तन्नाम्नश्चाऽऽदिमो वर्णो ग्राह्यस्तस्माद्धनिर्णयः ॥ १ ॥ २६९ ॥
न प्रोक्ता ङञणा वर्णा नामादौ सन्ति ते नहि ।
चेद्भवन्ति तथा ज्ञेया गजडास्ते यथाक्रमम् ॥ २ ॥ २७० ॥
खषौ सशौ बवौ चैव ज्ञेयाविति परस्परम् ।
संयोगाक्षरजे नाम्नि ग्राह्यं तत्राऽऽदिमाक्षरम् ॥ ३ ॥ २७१ ॥
बहूनि यस्य नामानि नरस्य स्युः कथंचन ।
तस्य पश्चाद्भवं नाम ग्राह्यं स्वरविशारदैः ॥ ४ ॥ २७२ ॥

### जन्मराशी कशी ओळखावी. ( यवनमते )

यत्र स्थितः शीतकरो नराणां स्याज्जन्मराशिं तमुदाहरन्ति ।
*यथायथा येषु खगा विलग्नाः स्थिता न ते सप्त कुतोभवन्ति* ॥ ५ ॥२७३॥
अतोऽष्टराशिर्मनुजोऽत्र सर्वः प्रोक्तानि तेभ्यश्च शुभाशुभानि ।
फलानितेषां तु वियोगयोगाद्यदष्टवर्गोत्थफलं स्फुटं स्यात् ॥ ६ ॥ २७४ ॥
भौमादौ लग्नभं योज्यं राजकार्येऽर्कभं तथा ।
चन्द्रभं सर्वकार्येषु सङ्ग्रामादौ च भौमभम् ॥ ७ ॥ २७५ ॥
विद्याभ्यासे बुधर्क्षं च विवाहे गुरुभं स्मृतम् ।
शुक्रयुग्मं प्रयाणे च दीक्षायां शनिभं बुधैः ॥ ८ ॥ २७६ ॥

अर्थः—जन्मकाळीं ज्या राशींत चंद्र असेल ती जन्मराशी समजावी. पण यावर शंका अशी उत्पन्न होते कीं, कुंडलींत फक्त एकटा चंद्रच असतो असें नाहे तर आणखी ७ ग्रह निरनिराळ्या राशींत असतात, मग चंद्राखेरीज इतर ग्रह ज्या राशींत असतील तीच जन्मराशी कां मानू नये. व याप्रमाणें मानूं लागल्यास प्रत्येक मनुष्याच्या आठ आठ राशी होतील.

ह्या शंकेचें समाधान असें कीं प्रथमतः ह्या वचनात "यत्रस्थितः शीतकरो (चंद्रः) नराणांस्यात् जन्मराशिम्" असें स्पष्ट दिलेलें आहे. आणि दुसरें कारण असें कीं मनुष्यप्राण्याच्या, जगातील एकंदर उलाढालीची व घडामोडींची आधारभूत शक्ति म्हणजे "मन" होय. वेदात "चंद्रमा मनसो जातः" "चक्षुः सूर्यो अजायत ।" म्हणजे मनाचा कारक चंद्र, आणि दिव्यदृष्टि, प्रकाश, उजेड आणि प्रकटीकरण याचा कारक रवि असें सांगितलें आहे. श्रीमद् भगवद्गीतेंत "मनएव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः" असें वचन आहे. अर्थात् मन म्हणजे चंद्र हाच सर्व गोष्टींचा कारक आहे आणि यामुळेंच चंद्र जन्मतः ज्या राशींत असेल ती जन्मराशी समजण्यात येते.

राजकार्य रवि, सर्वकार्यें चंद्र, संग्राम, वादविवाद, धाडस-मंगळ, विद्या बुद्धि, बुध, विवाह मंगलकार्यें-गुरु, *प्रयाण-शुक्र, दीक्षा-शनि, याप्रमाणें अष्टकवर्गांतर्गत व इतरनही प्रत्येक ग्रहापासून कोणती फलें पहावीं* हें सांगितलें. त्यांतील तत्त्व हेंच कीं त्या कार्यास या ग्रहाचें बल पाहिजे

## अथ जन्मराशिनिर्णयः ।

विवाहे सर्वमाङ्गल्ये यात्रादौ ग्रहगोचरे ।
जन्मराशेः प्रधानत्वं नामराशिं न चिन्तयेत् ॥ १ ॥ २७७ ॥

देशे ग्रामे ग्रहे युद्धे सेवायां व्यवहारके ।
नामराशेः प्रधानत्वं जन्मराशिं न चिन्तयेत् ॥ २ ॥ २७८ ॥

काकिण्यां वर्गशुद्धौ च वादे द्यूते ज्वरोदये ।
मन्त्रे पुनर्भूवरणे नामराशेः प्रधानता ॥ ३ ॥ २७९ ॥

विवाहघटनं चैव लग्नजं ग्रहजं फलम् ।
नामभाचिन्तयेत्सर्वं जन्म न ज्ञायते यदा ॥ ४ ॥ राजमार्तण्ड ॥ २८० ॥

जन्म न ज्ञायते येषां तेषां नाम्नो गवेष्यते ।
चक्रेऽवकहडे भांशे तन्नाडी कैश्चिदभिमात् ॥ ५ ॥ २८१ ॥

यदा स्त्रीजन्मसंपत्तिर्नरजन्म न लभ्यते ।
स्त्रियाः स्याज्जन्मतः शुद्धिर्नाम्नो मेलक्रिया तदा ॥ ६ ॥ दीपिकायां २८२॥

जन्मज्ञानेऽपि चक्रस्य द्वयोर्नाम्नोर्भमेलक ।
चिन्त्यस्तत्रैव जन्मर्क्षाद्वीक्ष्यं लग्नेन्दुजं बलम् ॥ ७ ॥ पद्मसारे ॥ २८३ ॥

## पंचांगाची पुढील माहिती.

पंचांगाच्या दुसऱ्या पृष्ठावर त्या वर्षाचें वर्णन दिलेलें असतें त्या वर्णनांत प्रथम श्रीसिद्धिविनायक, देवी, सरस्वती, नवग्रह इत्यादिकांचें स्मरण व प्रार्थना केलेली असते. त्यानंतर चैत्र शु. १ स कोणत्या गोष्टी कराव्या हें सांगून नंतर जगाच्या उत्पत्तिपासूनच्या कालाचें वर्णन असतें व गतकलि आणि शेषकलि दिलेला असतो, नंतर चालू वर्षाचा संवत्, त्याचें नांव श्रीशालिवाहन शक व त्याचें नांव आणि त्या वर्षाचे राजा, प्रधान इत्यादि अधिकारी व त्यांचीं फलें देतात. त्याचप्रमाणें पर्जन्यनिदर्शक आर्द्राप्रवेश व त्याचीं फलें अशीं सांगतात, व शेवटीं पर्जन्यलक्षणाचें फल देऊन वर्णन पुरें होतें.

## वर्षफलांतील राजा, प्रधान इत्यादि निर्णय.

चैत्रादौ मेष कर्कार्द्रा तुला कार्मुक ( धनु ) वासराः। ॥ २८४ ॥
नृपो मंत्री धान्य-तोय-( मेघ ) रसस्याधिपाः क्रमात् ॥ मु. सिं. २२

चैत्र शु. १ च्या वाराचा जो अधिपति तो राजा, मेषार्कप्रवेशाचा जो वार तो मंत्री, कर्कराशी रवि-प्रवेशाचा वार तो पूर्वधान्येश, आर्द्रानक्षत्र रविप्रवेशवार तो मेघेश, तूळराशींत रविप्रवेशाचा वार तो रसेश, आणि धनुराशी-रविप्रवेशाचा वार तो पश्चाद्धान्येश याप्रमाणें ६ अधिपती समजावे.

चैत्रस्य सितप्रतिपदि यो वारोर्कोदये स वर्षेशः। ॥ २८५ ॥
उदयद्वितये पूर्वो नोदययुगलेपि पूर्वः स्यात् ॥ ज्यो. नि. रत्नावली मु. सिं. २२

चैत्र शुक्ल प्रतिपदेस सूर्योदयीं जो वार असेल तो वर्षपति म्हणजे राजा समजावा. प्रतिपदेची वृद्धि असतां सूर्योदयीं ज्यावेळीं दोन प्रतिपदा व दोन वार येतात त्यावेळीं पूर्व दिवशींचा जो वार तोच वर्षपति जाणावा. प्रतिपदेचा क्षय असल्यास प्रतिपदेनें युक्त जो वार तोच वर्षपति म्हणजे राजा समजावा.

यासंबंधीं बराच मतभेद आहे. कोणी म्हणतात प्रतिपदेचा क्षय असला तरी अमावास्येचा दिवस हा मागील वर्षांतील असल्यानें अमावास्येच्या वाराचा अधिपति राजा होऊं शकत नाहीं तर द्वितीयेचा वार हाच राजा होतो. पण वरील वचनांत तसें नाहीं.

ज्या वर्षी वर्ष प्रतिपदेचा क्षय होतो त्यावर्षी "राजा कोण" या बद्दल फार वाद माजतो याकरितां त्याबद्दलची सर्व वचनें येथें देतो.

दर्शप्रतिपत्संधौ चैत्रादौ यो भवेद्वारः।
सोब्दप उक्तस्त्वपरैः प्रतिपदिमध्यान्हकाले यः ॥ १ ॥ २८६ ॥
बहुभिः कीर्तितो राजा रवेरुदयकालिकः।
तत्र भूपद्वयं वृद्धौ भूपाभाव स्तिथिक्षये ॥ २ ॥ २८७ ॥
दर्शान्तेऽनल्पेपि च स पूर्वराज स्तदागम विरोधः।
यस्माच्चैत्र-सितादेरुदयाद्भानोः प्रवृत्तिरब्दादेः ॥ ३ ॥ रत्नावल्यां २८८॥
चैत्रसितादेरुदयाद्भानोर्दिनमासयुगकल्पाः।
सृष्टयादौ लंकायां समं प्रवृत्ता दिनेऽर्कस्य ॥ ब्रह्मगुप्तः-॥ २८९ ॥
अमाप्रतिपदोः संधिर्मध्यान्हात्पूर्वतो यदि।
तदा तद्दिनपो राजा परतश्चेत्परो भवेत् ॥ गर्गः ॥ २९० ॥

चैत्रेमासि जगत् ब्रह्माससर्ज प्रथमेहनि। शुक्लपक्षे समग्रंतु तदा सूर्योदये सति।
प्रवृत्तयामासतथा कालस्यगणनामपि। ग्रहान्नागानृतून्मासान् वत्सरान् वत्सराधिपान् ॥
॥ २९१ ॥ जयसिंहकल्पतरुः पृ. ६३ श्रीभगवन्तः हेमाद्रौ ब्रह्मोक्ति ज्यो. नि. २९

याप्रमाणें अनेक महत्त्वाचीं वचनें आहेत त्यावरून हें सिद्ध होतें कीं अमायुक्त प्रतिपदा अगर त्याच्या दुसऱ्या दिवशींचा वाराधिपती राजा होऊं शकतो.

चैत्र शु. १ चा क्षय ज्या वर्षी येतो त्या वर्षी कोणत्याही सूर्योदयाला प्रतिपदा तिथीचा स्पर्श होत नाहीं. अर्थात् फाल्गुन कृ. ३० च्या दिवशींच वर्षप्रतिपदा येते. त्या दिवशीं सूर्योदयानंतर कांहीं घटका अमावास्या असते नंतर प्रतिपदा सुरू होते आणि दुसऱ्या दिवशीं सूर्योदय होण्यापूर्वीच प्रतिपदा संपून सूर्यो-

देयाला द्वितीया लागते. अशा वेळीं अमावास्येचा जो वार तोच वर्षाधिपति समजावा असा वरील कांहीं श्लोकाचा अर्थ आहे. पण दुसऱ्या कांहीं श्लोकाचा अर्थ द्वितीयेचा वाराधिपती राजा होतो असा आहे.

## ज्योतिष्फलोदयांत राजादिनिर्णय.

चैत्रस्य शुक्ल प्रतिपत्तिथौ यो वारः स उक्तो नृपति स्तदाब्दे । मेषप्रवेशः किल भास्करस्य यस्मिन् दिने स्यात् स तु राजमंत्री ॥ कर्कप्रवेशे दिनपः स उक्तो सस्यस्य नाथो मुनिभिः पुराणैः । आर्द्राप्रवेशे दिननाथ उक्तो मेघाधिपः प्राक्तनविप्रवर्यैः ॥ तुलाप्रवेशेऽह्नियस्य वारो रसाधिपोऽयं नियतं प्रदिष्टः । चापप्रवेशे दिवसाधिनाथो धान्याधिपो वै कथितो मुनींद्रैः ॥ज्यो. नि. २९१॥२९२॥

चैत्रादौ प्रतिपद्राजा मन्त्रिणो मेषसंक्रमः ।
सिंहे सैन्याधिपश्चैव कर्के सस्याधिपस्तथा ॥
मेघाधिपश्च आर्द्रार्क्षे तुलाया रसपस्तथा ।
नीरसेशस्तु मकरे ज्ञातव्याः क्रमतोऽधिपाः ॥ पं. सा. सा. ७३. ॥ २९३ ॥

राजावली ग्रंथातही असाच क्रम देण्यात आलेला आहे. यापैकीं पंचांगात फक्त राजा, मंत्री, अग्रधान्येश, मेघेश, रसेश, आणि पश्चाद्धान्येश इतक्यांचीं व आर्द्राप्रवेशाचें फल दिलेलें असतें. तीं फलें निरनिराळ्या ग्रंथांतून विस्तरशः असून स्थलसंकोचास्तव येथें दिलीं नाहींत.

वर्षफलाच्या पुढील पृष्ठावर त्या वर्षांतील उपनयन, विवाह ( व कांहीं पंचांगांत वास्तुशांती ) मुहूर्तांच्या तिथि दिलेल्या असतात व त्यांची नक्षी वेळही कांहीं पंचांगांत देतात, त्यांना मुहूर्तांची टीप असें म्हणतात.

विवाहमुहूर्त फक्त वैशाख, ज्येष्ठ, मार्गशीर्ष, माघ आणि फाल्गुन ह्या पांचच महिन्यांत असतात. पण ह्या पांचापैकीं कोणत्याही महिन्यात गुरु अगर शुक्र यांचा अस्त असेल तर त्या महिन्यांत विवाहादि मंगल कार्ये वर्ज्य असल्यानें मुहूर्त दिलेले नसतात. ज्या वर्षी सिंह राशीला गुरु असेल त्या वर्षी संबंध वर्षभर मुहूर्त नसतात.

उपनयनमुहूर्त, चैत्र, वैशाख, ज्येष्ठ, माघ, फाल्गुन ह्या ५ महिन्यांत असतात. मार्गशीर्ष मास उपनयनास वर्ज्य आहे. व गुरुशुक्रास्तकालही वर्ज्यच आहे. उपनयनमुहूर्तांच्या तिथि व नक्की वेळा पंचांगात छापलेल्या असतात.

वास्तुशांतीच्या मुहूर्तांचे दिवस दिलेले असतात. विवाह, उपनयन, वास्तुशांति यांच्या मुहूर्तासंबंधींची विस्तृत माहिती पुढें विवाहप्रकरणांत येणार आहे.

*विवाहोपनयन मुहूर्तांनंतर त्या वर्षांतील ग्रहणें व त्यांचे स्पर्श, मध्य आणि मोक्षकाल अशी माहिती असते.*

चंद्र ग्रहणाचा काल स्टॅ. टा. प्रमाणें सर्व ठिकाणीं एकच असतो. पण सूर्यग्रहणाचा स्पर्श, मध्य आणि मोक्ष, काल प्रत्येक ठिकाणीं निराळा येतो. पण पंचांगात फक्त एकाच ठिकाणाचा छापलेला असतो. ठिकठिकाणचा सूर्यग्रहणाचा स्पर्शमोक्षकाल गणितानें काढावा लागतो.

यानंतरच्या पृष्ठांत नवग्रहांची दानें, जपसंख्या आणि राशीवरून शुभाशुभ ग्रह पाहण्याचें व पुढें ४ थें स्थानफल कोष्टक असतें व त्याच्याच पुढें निरनिराळे शुभाशुभ वेळा दिलेल्या असतात.

शुभाशुभ ग्रह पाहण्याच्या कोष्टकांत ३ ६-१० ११ या स्थानीं पापग्रहानें फल शुभ व बाकीनें अशुभ, आणि ४ ८-१२ या स्थानीं शुभग्रहानें फल अशुभ बाकीनें शुभ असा नव्हे असें. ह्या कोष्टकावरून फल पाहणारांना इष्ट राशीपासून जो ग्रह ज्या स्थानीं येत असेल तिसऱ्या कोष्टकांत त्या ग्रहासमोरील फल पहावें. कोष्टकांत या लिहिलेल्या १२ राशींचा त्याच्या क्रमाशीं कांहीं संबंध नसतो. यांत दिलेल्या १२ राशी व त्यांनी घटिका पळे दिलेलीं असतात ही वचनावरून असतात.

## ग्रहांची जपसंख्या.

७००० ११००० १०००० ४००० १९००० १६०००

सप्त, रुद्र, दशा वेदा नवभूः षोडशो तथा ।

२३००० १८००० १७०००

त्रयोविंश श्चाष्टदशः सप्तैको भानुतः क्रमात् ॥ ॥२९४॥

ह्या प्रमाणें ग्रहांची जपसंख्या आहे.

दिवालिखित शुभाशुभ वेळा म्हणजे दिवसाचे ८ व रात्रीचे ८ भाग ठरवून त्यावरून प्रत्येक वारीं कोणता काळ चांगला व कोणता वाईट हें ठरविलेलें कोष्टक होय. ह्या कोष्टकावरून शुभाशुभ काल पाहून त्यावर महत्वाचीं कृत्यें करण्याचा प्रघात व्यापारी लोकांत फार आहे.

याच्यापुढें बहुधा २८ आनंदादि योगाचें कोष्टक दिलेलें असतें.
त्याच्या पुढील पृष्ठांत ज्या अयनांशाचें पंचांग असेल त्या अयनांशाचे लग्नसाधनकोष्टक, मेषादि लग्नांचें षड्वर्गयुक्त शुभाशुभकोष्टक आणि त्याच्या पुढील पानांत दशमभाव कोष्टक, दिनमानसारिणी इत्यादि माहिती असते.

वर्षफलें तयार करण्याकरितां वर्षध्रुवकचक्र, होराकोष्टक, विवाहोपयोगी माहिती, महादशासंबंधीं विवेचन, दिनदशाचे कोष्टक, ठिकठिकाणचे पंचांग करण्याची सारिणी, ग्रहाच्या युति, केंद्र इत्यादि योगाचे फल माहिती असते.

याच्यापुढें २४ पानें चैत्रापासून फाल्गुनअखेरचें पंचांग असतें. त्यांत अनुक्रमानें शक, शकाचे नांव मास, पक्ष, संवत्, अयन, ऋतु, इंग्रजी मास व सन याप्रमाणें अगदी वर माहिती असून, कोष्ठ्यांत अनुक्रमानें तिथि, वार, तिथीची घ. प., नक्षत्र, नक्षत्राची घ. प., योग, योगाची घ. प., करण व करणाच्या घटका, दिनमान, ( काहीं पंचांगांत फारशी, पारशी, मुसलमानी ) इंग्रजी तारीख, रविउदय, रविअस्त, चंद्र राश्यंतर इतकी माहिती असून त्याच्या पुढें शास्त्रार्थ व ग्रहांची गोचर स्थिति म्हणजे रविसंक्रांति व नक्षत्र प्रवेश, ग्रहाचें राश्यंतरकाल, अस्त, उदय, वक्र, मार्ग, युत्या इत्यादि स्थिति व संकष्टीचा चंद्रोदय असतो. त्या शिवाय दग्धयोग, अमृतसिद्धियोग, घबाडयोग, यमघंटयोग, मृत्युयोग, भद्राप्रवृत्ति, भद्रानिवृत्ति इत्यादि गोष्टी असतात आणि कोपऱ्यांत त्या पंधरवड्यात शेवटच्या तिथीच्या सूर्योदयाची कुंडली आणि त्याच्यावरच्या बाजूस नवग्रहांची, राशी अंशकला विकलात्मक स्थिति व दैनिक गति दिलेली असते.

पंचांगातील पंधरवड्याचीं पृष्ठें संपल्यानंतर शेवटच्या पृष्ठांत मकर संक्रांति फल दिलेलें असतें. व जन्म नक्षत्रावरून संक्रांति नक्षत्राची फलेंही देतात. व कधीं त्याच्यापुढें अगर पहिल्याच ४।५ पृष्ठांवर मेषादि बारा राशींचे आयव्यय देण्यांत येतात.

( वर्षफल व संक्रांतिफल याचे मराठी भाषांतरही काहीं पंचांगांत दिलेलें असतें. ) नंतर विंशोपका म्हणजे १०५ वस्तूंची महागाई, स्वस्ताई किंवा किती प्रमाणांत त्या गोष्टी प्रस्तुत वर्षात घडतील याचें प्रमाण दिलेलें असतें. याच्यापुढें गोरक्षमतें गमनास मुहूर्त म्हणून फलश्रुतिसह मुहूर्तांचें एक प्रकरण असतें. याशिवाय आणखी काहीं ज्योतिषविषयक उपयुक्त माहिती, गोत्रावळी, मंगळ पाहण्याचा प्रकार इत्यादि देऊन पंचांग पूर्ण करण्यांत येते.

पंचांगाबद्दलही अगदीं त्रोटक माहिती झाली. या माहितीचे मुख्याचे व महत्वाचे मूळ श्लोक जरूरीप्रमाणें शेवटीं अगर त्या त्या प्रकरणाशीं संबंध असलेल्या प्रकरणांत देण्यांत येतील.

## विष्टि ( भद्रा किंवा कल्याणि )

शुक्ले पूर्वार्धेष्टमीपंचदश्यो र्भद्रं कादश्यांचतुर्थ्यांपरार्धे । ॥ २९५ ॥
कृष्णेंत्यार्धेस्यात्तृतीयादशम्योः पूर्वे भागे सप्तमीशंभुतिथ्योः ॥ १ ॥ पं. सा. सा. २३

अर्थः—शुक्लपक्षीं ८ आणि १५ यांचे पूर्वदली ( पूर्वार्धी ) व एकादशी आणि चतुर्थी यांचे उत्तरदली ( उत्तरार्धी ) कृष्णपक्षीं तृतीया आणि दशमी याचे उत्तरदली ( उत्तरार्धी ) व सप्तमी आणि चतुर्दशी यांचे पूर्वदली ( पूर्वार्धी ) भद्रा नियमानें येते.

## भद्रेचा ( कल्याणीचा ) शास्त्रार्थ.

दिवा सर्पमुखीभद्रा रात्रौ भद्रा तु वृश्चिकी ।
सर्पस्य च मुखं त्याज्यं वृश्चिक्याः पुच्छमेव च ॥ ६ ॥ २९६ ॥
रात्रिभद्रा यदान्हिस्याद्दिवाभद्रा यदा निशि ।
न तत्र भद्रादोषः स्यात्सर्वकार्याणि साधयेत् ॥ ७ ॥ २९७ ॥

## भद्रेचीं फलें.

स्वर्गे भद्रा भवेत्सौख्यं पाताले च धनागमः ।
मृत्युलोके यदा भद्रा कार्यसिद्धिस्तदानहि ॥ १० ॥ २९८ ॥

## भद्रेचीं वारपरत्वें नांवें.

सोमे शुक्रे च कल्याणी शनौ चैव तु वृश्चिकी । ॥ २९९ ॥
गुरौ पुण्यवती ज्ञेया चान्यवारेषु भद्रिका ॥ ११ ॥ बृ. पं. फ. १२८.

## भद्रा कोणत्या लोकां आहे.

मेषोक्ष कौर्प्य मिथुने घटसिंहमीनकर्केषु चाप मृगतौलिवधूषु चंद्रे ॥
स्वर्मर्त्यनाग नगरीः क्रमशः प्रयाति विष्टिः फलान्यपि ददाति हि तत्रदेशे ॥ १४ ॥
पीयूषधारा–मु. सि. ८२ ॥ ३०० ॥

अर्थः—मेष, वृषभ, मिथुन व वृश्चिक ह्या राशींचा चंद्र असतां विष्टि स्वर्गांत असते. कर्क, सिंह, कुंभ व मीन ह्या राशींचा चंद्र असेल तर विष्टि, मनुष्य लोकांत असते. कन्या, तूळ, धनु आणि मकर ह्या राशींचा चंद्र असल्यास विष्टि पाताळांत असते. तेव्हां जेथें विष्टि असेल तेथेंच तिचा दोष आहे यास्तव अन्य लोकांत ती विष्टि घेतली असतां चिंता नाहीं.

## पर्जन्ययोगज्ञानार्थ नक्षत्रवाहन.

सूर्यर्क्षाद्दिनभंनवाप्तमवशिष्टेघोटकोजंबुकोमंडूकाविमयूरमाखुमहि–
षोस्याद्गर्दभः कुंजरः ॥
वाहनानांनवकेह येगिरिजलंक्रोष्टाविकोनिर्जलोस्वल्पाकेकिखरा–
खुपुप्रचुरतः शेषपुष्टिः शुभा ॥ १ ॥ ३०१ ॥ प. सा. सा.

अर्थः—सूर्यनक्षत्रापासून दिन नक्षत्रापर्यंत मोजून त्याला ९ नीं भागावें आणि बाकी राहील त्या अनुक्रमानें १ घोडा, २ कोल्हा, ३ मंडूक, ४ मेंढा, ५ मयूर, ६ मूषक, ७ महिष, ८ गर्दभ, आणि ९ हत्ती.

## ग्रहांची जपसंख्या.

७००० ११००० १०००० ४००० १९००० १६०००
सप्त, रुद्र, दश वेदा नवभूः षोडशो तथा।
२३००० १८००० १७०००
त्रयोविंश अष्टदशः सप्तैको भानुत क्रमात्॥ ॥२९४॥

ह्या प्रमाणें ग्रहांची जपसंख्या आहे.

शिवालिखित शुभाशुभ वेळा म्हणजे दिवसाचे ८ व रात्रीचे ८ भाग ठरवून त्यावरून प्रत्येक वारीं कोणता काल चांगला व कोणता वाईट हें ठरविलेलें कोष्टक होय. ह्या कोष्टकावरून शुभाशुभ काल पाहून त्यावर महत्त्वाचीं कृत्यें करण्याचा प्रघात व्यापारी लोकात फार आहे.

याच्यापुढें बहुधा २८ आनंदादि योगाचें कोष्टक दिलेलें असतें.

त्याच्या पुढील पृष्ठात ज्या अयनांशाचें पंचांग असेल त्या अयनांशाचे लग्नसाधनकोष्टक, मेषादि लग्नाचें षड्वर्ग युक्त शुभाशुभकोष्टक आणि त्याच्या पुढील पानात दशमभाव कोष्टक, दिनमानसारिणी इत्यादि माहिती असते

वर्षफलें तयार करण्याकरिता वर्षप्रवेशचक्र, होराकोष्टक, विवाहोपयोगी माहिती, महादशासबंधी विवेचन, दिनदशाचे कोष्टक, ठिकठिकाणचे पंचांग करण्याची सारिणी, ग्रहांच्या युति, केंद्र इत्यादि योगाचे फल माहिती असते.

याच्यापुढें २४ पानें चैत्रापासून फाल्गुनअखेरचें पंचांग असतें. त्यात अनुक्रमानें शक, शकाचें नाव मास, पक्ष, संवत्, अयन, ऋतु, इंग्रजी मास व सन याप्रमाणें अगदी वर माहिती असून, कोष्ठ्यात अनुक्रमानें तिथि, वार, तिथींचीं घ. प., नक्षत्र, नक्षत्राची घ. प., योग, योगाची घ. प., करण व करणाच्या घटका, दिनमान, ( काहीं पंचांगात पारशी, पारशी, मुसलमानी ) इंग्रजी तारीख, रविउदय, रविअस्त, चंद्र राश्यंतर इतकी माहिती असून त्याच्या पुढें शास्त्रार्थ व ग्रहांची गोचर स्थिति म्हणजे रविसंक्रांति व नक्षत्र प्रवेश, ग्रहांचे राश्यंतरकाल, अस्त, उदय, वक्र, मार्ग, युत्या इत्यादि स्थिति व संकष्टीचा चंद्रोदय असतो. त्या शिवाय दग्धयोग, अमृतसिद्धियोग, घबाडयोग, यमघंटयोग, मृत्युयोग, भद्राप्रवृत्ति, भद्रानिवृत्ति इत्यादि गोष्टी असतात आणि कोष्ट्यात त्या पक्षवड्यात शेवटच्या तिथीच्या सूर्योदयाची कुंडली आणि त्याच्यावरच्या बाजूस नवग्रहांची, राशी अंशकला विकलात्मक स्थिति व दैनिक गति दिलेली असते.

पंचांगातील पक्षवड्याचीं पृष्ठें संपल्यानंतर शेवटच्या पृष्ठात मकर संक्रांति फल दिलेले असते. व जन्म नक्षत्रावरून संक्रांति नक्षत्राचीं फलेंही देतात. व कधीं त्याच्यापुढें अगर पहिल्याच ४/५ पृष्ठावर मेषादि बारा राशींचे आयव्यय देण्यात येतात.

( वर्षफल व संक्रांतिफल याचें मराठी भाषांतरही काहीं पंचांगात दिलेलें असते. ) नंतर विंशोपका म्हणजे १०५ वस्तूंची महागाई, स्वस्ताई किंवा किती प्रमाणात त्या गोष्टी प्रस्तुत वर्षात घडतील याचें प्रमाण दिलेलें असतें. याच्यापुढें गोरक्षमतें गमनास मुहूर्त म्हणून फलश्रुतिसह मुहूर्तांचें एक प्रकरण असतें. या शिवाय आणखीं काहीं ज्योतिषविषयक उपयुक्त माहिती, गोलावळी, मंगळ पाहण्याचा प्रकार इत्यादि देऊन पंचांग पूर्ण करण्यात येते.

पंचांगाबद्दलही अगदीं त्रोटक माहिती झाली. या माहितीचे मुख्याचे व महत्वाचे मूळ श्लोक जरूरीप्रमाणें शेवटीं अगर त्या त्या प्रकरणाशीं संबंध असलेल्या प्रकरणांत देण्यात येतील.

## विष्टि ( भद्रा किंवा कल्याणि )

शुक्ले पूर्वार्धेऽष्टमीपंचदश्यो र्भद्रैकादश्यांचतुर्थ्यांपरार्धे। ॥ २९५ ॥
कृष्णेंत्यार्धेस्यात्तृतीयादशम्योः पूर्वे भागे सप्तमीशंभुतिथ्योः॥ १ ॥प.सा.सा. २३

अर्थः—शुक्लपक्षीं ८ आणि १५ यांचे पूर्वदली ( पूर्वार्धी ) व एकादशी आणि चतुर्थी यांचे उत्तरदली ( उत्तरार्धी ) कृष्णपक्षीं तृतीया आणि दशमी याचे उत्तरदली ( उत्तरार्धी ) व सप्तमी आणि चतुर्दशी यांचे पूर्वदली ( पूर्वार्धी ) भद्रा नियमानें येते.

## भद्रेचा ( कल्याणीचा ) शास्त्रार्थ.

दिवा सर्पमुखीभद्रा रात्रौ भद्रा तु वृश्चिकी ।
सर्पस्य च मुखं त्याज्यं वृश्चिक्याः पुच्छमेव च ॥ ६ ॥ २९६ ॥
रात्रिभद्रा यदान्हिस्याद्दिवाभद्रा यदा निशि ।
न तत्र भद्रादोषः स्यात्सर्वकार्याणि साधयेत् ॥ ७ ॥ २९७ ॥

## भद्रेचीं फलें.

स्वर्गे भद्रा भवेत्सौख्यं पाताले च धनागमः ।
मृत्युलोके यदा भद्रा कार्यसिद्धिस्तदानहि ॥ १० ॥ २९८ ॥

## भद्रेचीं वारपरत्वें नांवें.

सोमे शुक्रे च कल्याणी शनौ चैव तु वृश्चिकी । ॥ २९९ ॥
गुरौ पुण्यवती ज्ञेया चान्यवारेषु भद्रिका ॥ ११ ॥ वृ. पं. फ. १२८.

## भद्रा कोणत्या लोकां आहे.

मेषोक्ष कौर्प्ये मिथुने घटसिंहमीनकर्केषु चाप मृगतौलिवधूषु चंद्रे ॥
स्वर्मर्त्यनाग नगरीः क्रमशः प्रयाति विष्टिः फलान्यपि ददाति हि तत्रदेशे ॥ १४ ॥
पीयूषधारा—मु. सिं. ८२ ॥ ३०० ॥

अर्थः—मेष, वृषभ, मिथुन व वृश्चिक ह्या राशींचा चंद्र असतां विष्टि स्वर्गांत असते. कर्क, सिंह, कुंभ व मीन ह्या राशींचा चंद्र असेल तर विष्टि, मनुष्य लोकांत असते. कन्या, तूळ, धनु आणि मकर ह्या राशींचा चंद्र असल्यास विष्टि पाताळांत असते. तेव्हां जेथें विष्टि असेल तेथेंच तिचा दोष आहे यास्तव अन्य लोकांत ती *विष्टि घेतली असतां चिंता नाहीं.*

## पर्जन्ययोगज्ञानार्थ नक्षत्रवाहन.

सूर्यर्क्षादिनभंनवाप्तमवशिष्टेघोटकोजंबुकोमंडूकाविमयूरमारुमहि-
षीस्याद्रर्दभः कुंजरः ॥
वाहनानांनवकेह येगिरिजलंक्रोष्टाविकोनिर्जलोस्वल्पाकेकिरसा-
सुपुमञ्चुरतः शेषेषुवृष्टिः शुभा ॥ १ ॥ ३०१ ॥ प. सा. सा. ४ ॥ ३१८ ॥

अर्थः—सूर्यनक्षत्रापासून दिन नक्षत्रापर्यंत मोजून त्याला ९ नीं भागावें शेष ।
अनुक्रमानें १ घोडा, २ कोल्हा, ३ मंडूक, ४ मेंढा, ५ मयूर, ६ मूषक, ७ महिष, ८ ... ॥ १५ ॥

वाहनें जाणावीं, यांचें फल—घोडा वाहन असतां पर्वतावर वृष्टी होईल. कोल्हा व मेंढा हीं वाहनें असतां वृष्टि होणार नाहीं. मयूर, गर्दभ व मूषक हीं वाहनें असतां स्वल्प वृष्टि; बाकीचीं वाहनें असतां सुवृष्टी होईल.

वृष्टिबाबत—स्त्री, नपुंसक, आणि पुरुष नक्षत्रें.

स्त्रीसंज्ञमार्द्रादशकंचतुष्टयंक्लीविंपुमाख्यानि ततश्चतुर्दश ।
वृष्टिर्यदार्केंदुभयोः समागमः स्त्रीपुंसयोरेवतदान्यथातु न ॥२०२॥ पं. सा. सा. ३०

अर्थः—आर्द्रापासून १० नक्षत्रास स्त्रीसंज्ञा, त्या पुढील ४ नक्षत्रांस नपुंसकसंज्ञा, या पुढील १४ नक्षत्रांस पुरुषसंज्ञा अशा संज्ञा आहेत. सूर्यचंद्र नक्षत्र योग झाला असतां तो स्त्री पुरुष योग होतो. असा योग झाला असतां सुवृष्टि होईल.

दास्रात्रिदस्रशरनंदकृतद्विभूमीभूर्मींदुभानिशशिनस्तरणेःक्रमेण ।
स्यात्सूर्ययोर्युतिरवृष्टिकरीतथेंद्वोश्चेद्दुर्दिनायशशिभानुमतोस्तुवृष्टचै ॥ २०३ ॥

अर्थः—अश्विनी नक्षत्रापासून ३ नक्षत्रें चंद्राचीं, पुढें २ नक्षत्रें रवीचीं, पुढें ५ चंद्राचीं, पुढें ९ रवीचीं, पुढें ४ चंद्राचीं, पुढें २ रवीचीं, पुढें १ नक्षत्र चंद्राचें, १ रवीचें आणि पुढें १ चंद्राचें याप्रमाणें अभिजित्सह २८ नक्षत्रांचे रविचंद्र कारक आहेत. दोन सूर्य नक्षत्रांचा योग झाला असतां अवृष्टि, आणि दोन चंद्रनक्षत्रांचा योग असतां दुर्दिन म्हणजे मेघ येतील, परंतु वृष्टि होणार नाहीं. चंद्राचें नक्षत्र आणि सूर्याचें नक्षत्र यांचा योग झाला असतां सुवृष्टि होईल.

## चरयोगादिअनेकयोग.

( १ ) चरयोग—रवौपूभागुरौपुष्यः शनौमूलंभृगौमघा ।
सौम्येत्राक्षं विशाभौमेचंद्रेर्द्राचरयोगकः ॥ १ ॥ २०४ ॥

( २ ) क्रकचयोग—रवौतुद्वादशी प्रोक्ता भौमेच दशमी तथा ।
चंद्रेचैकादशी प्रोक्ता नवमी बुधवासरे ॥
शुक्रे च सप्तमी ज्ञेया शनौचेव तु षष्टिका ।
गुरौचाष्टमिकाज्ञेयो योगस्तुक्रकचोबुधैः ॥ २ ॥ २०५ ॥

( ३ ) दग्धयोग—सौम्यस्तृतीयाकुजपंचमीच षष्ठयां
गुरौरष्टमिशुक्रवारे ॥ २०६ ॥
एकादशी सोमशनिर्नवम्यां द्वादशमर्कामितिदग्धयोगः ॥ ३ ॥

( ४ ) मृत्युदायोग—रवौभौमे भवेन्नंदा भद्राजीवशशांकयोः ।
जयाशुक्रे बुधेरिक्ताशनौ पूर्णा च मृत्युदा ॥ ४ ॥ २०७ ॥

( ५ ) सिद्धियोग—शुक्रेनंदा बुधेभद्रा जयाभौमप्रकीर्तिता ।
शनौरिक्तागुरौपूर्णा सिद्धियोगा उदाहृताः ॥ ५ ॥ २०८ ॥

( ६ ) उत्पात योग—विशाखादि चतुष्कं तु भास्करादि क्रमेण तु ।
उत्पात मृत्युकाणारव्यसिद्धियोगाः प्रकीर्तिताः ॥ ६ ॥ २०९ ॥

( ७ ) यमदंष्ट्रयोग—मघा धनिष्ठा सूर्येतु चंद्रे मूल विशाखके ।
कृत्तिकाभरणी भौमे सौम्ये पूपा पुनर्वसुः ॥ ७ ॥ २१० ॥

शुक्रे पूर्वार्धेष्टम
कृष्णेंत्यार्धेस्याद्वृ

गुरौऽपाश्विनीशुक्रे रोहिणीचानुराधका ।
शनौविष्णुः शतभिषक्यमदंष्ट्रप्रकीर्तितः ॥ ७ ॥ ३११ ॥

( ८ ) यमघंटयोग—रवौमघाबुधेमूलंगुरौचैव च कृत्तिका ।
भौमेचार्द्राशनौहस्तः शुक्रे चैव तु रोहिणी ।
चंद्रे विशाखायोगोयं यमघंटः प्रकीर्तितः ॥ ८ ॥ ३१२ ॥

( ९ ) मुसलवज्रयोग—चंद्रेचित्रा भृगौ ज्येष्ठा शनौ चैव तु रेवती ।
चांद्रजेतुधनिष्ठोक्तारवौ तु भरणी तथा ॥
उपाश्वैव तु भौमेच गुरौचैवोत्तरात्तथा ।
अयंमुसलवज्राख्ययोगोवर्ज्यः शुभे बुधैः ॥ ३१३ ॥

## अमृतसिद्धियोग.

(१०) आदित्यहस्तेगुरुपुष्ययोगे बुधानुराधाशनिरोहिणी च । ॥ ३१४ ॥
सोमे च सौम्यंभृगुरेवतीच भौमाश्विनीचामृतसिद्धियोगः ॥१४॥ पं.सा.सा. ३१

(११) मृत्युयोग—मृत्युयोगो रवौमित्रं चंद्रेवैश्वं कुजे शतं ।
बुधेदास्रं गुरौचांद्रं भृगौसार्पं शनौकरः ॥ वृ. पं. १३९ ॥
अन्येतु ॥ अनुराधा रवौ, चंद्रे उत्तरा, भौम तारका ।
बुधाश्विनी, मृगेजीवाऽश्लेषाशुक्रे, शनौकरः ( हस्त ) ॥
वारर्क्षयुतकालंच मृत्युयोगः प्रकीर्तितः ॥ ३१५–३१६ ॥

## घबाडयोग.

(१२) सूर्यभाद्गणयेत्चांद्रं त्रिगुणं तिथिमिश्रितम् ।
सप्तभिस्तुहरेद्भागं त्रिशेषेस्यात् घबाडकम् ॥ ३१७ ॥

(सप्तभिस्तुहरेद्भागं या ऐवजीं नवभिस्तुहरेद्भागं असाही पाठ आहे.)

अर्थ:—सूर्यनक्षत्रापासून चंद्र म्हणजे दिननक्षत्रापर्यंत मोजून त्याची तिप्पट करावी व त्यांत इष्ट तिथि मिळवावी. त्यास ७ नें भागून बाकी ३ राहिल्यास घबाड योग आहे असें समजावें. ( पंचांगात जो घबाड मुहूर्तकाल दिलेला असतो त्याचा व्यापारी लोकास फार उपयोग होतो व त्या मुहूर्तावर व्यापारी लोक महत्वाची कामें करतात. )

## २८ योगांचीं नांवें व २८ योग कसे होतात त्याबद्दल.

आनंदाख्य कालदंडश्च धूम्रो धाता सौम्यो ध्वांक्षकेतू क्रमेण ।
श्रीवत्साख्यो वज्रकं मुद्गरश्च छत्रं मित्रं मानसं पद्मलुंबौ ॥ १४ ॥ ३१८ ॥
उत्पात मृत्यू किल काणसिद्धी शुभामृताख्यौ मुसलं गदश्च ।
मातंगरक्षश्चरसुस्थिराख्याः प्रवर्धमानः फलदाः स्वनाम्ना ॥ १५ ॥ ३१९ ॥
मु. चिं. शु. पं. फ. १४१

अर्थः—१ आनंद, २ कालदंड, ३ धूम्र, ४ धाता, ५ सौम्य, ६ ध्वांक्ष, ७ ध्वज, ८ श्रीवत्स, ९ वज्र, १० मुद्गर, ११ छत्र, १२ मित्र, १३ मानस, १४ पद्म, १५ लुंब, १६ उत्पात, १७ मृत्यु, १८ काण १९ सिद्धि, २० शुभ, २१ अमृत, २२ मुसल, २३ गद, २४ मातग (कुंजर) २५ राक्षस, २६ चर, २७ स्थिर, २८ वर्धमान असे हे अठ्ठावीस योग आपआपल्या नावाप्रमाणें चांगलें वाईट फल देणारें आहेत.

## हे योग कसे उत्पन्न होतात, त्याचा प्रकार.

सूर्येऽश्विभात्तुहिनरोचिपि सौम्यधिष्ण्यात्सार्पाच्च भूमितनये च बुधे च हस्तात् ॥
मैत्राद्गुरौ भृगुसुते खलु वैश्वदेवाच्छायासुते वरुणभात्क्रमशः स्युरेते ॥१६॥रत्नमाला–

अर्थः—रविवारीं अश्विनीपासून अभिजितसह क्रमानें २८ नक्षत्रें लिहावीं, सोमवारीं मृगापासून क्रमानें रोहिणीपर्यंत २८ नक्षत्रें लिहावीं. मंगळवारीं आश्लेषापासून क्रमानें पुष्यापर्यंत २८ नक्षत्रें लिहावीं, बुधवारीं हस्तापासून उत्तरापर्यंत लिहावीं, गुरुवारीं अनुराधेपासून विशाखापर्यंत लिहावीं, शुक्रवारीं उत्तराषाढापासून पूर्वाषाढापर्यंत लिहावीं, आणि शनिवारीं शततारकापासून धनिष्ठापर्यंत घ्यावीं. याप्रमाणें २८ नक्षत्रांनीं क्रमानें आनंदादिक अठ्ठावीस योग उत्पन्न होतात त्यांचीं नांवें वर दिलीं आहेत. ॥ ३२० ॥

ह्या २८ योगामध्यें १ शुभ, २ कुंजर, ३ मित्र, ४ ध्वज, ५ मुद्गर, ६ अमृत, ७ सौम्य, ८ सिद्धि, ९ श्रीवत्स, १० स्थिरमानस, ११ धाता, १२ आनंद, १३ छत्र, १४ वर्धमान हे चवदा योग शुभ फल देणारे आहेत, याहून इतर जे १४ ते अशुभ समजावे.

## गमनास तिथिचक्र व त्याचें फल.

( पंचांगांत असलेले गोरक्षमतें गमनास मुहूर्त. )

पौषे पक्षस्यादिका द्वादशैवं तिथ्यो माघादौ द्वितीयादिकास्ताः ।
कामात्तिस्रः स्युस्तृतीयादिवच्च याने प्राच्यादौ फलं तत्र वक्ष्ये ॥ १ ॥ ३२१ ॥
सौख्य क्लेशो भीतिरर्थागमश्च शून्यं नैःस्वं निःस्वता मिश्रता च ।
द्रव्यक्लेशौ दुःखमिष्टाप्तिरर्थो लाभः सौख्यं मंगलं वित्तलाभः ॥ २ ॥ ३२२ ॥
लाभो द्रव्याप्तिर्धनं सौख्यमुक्तं भीतिर्लाभो मृत्युरर्थागमश्च ।
लाभः कष्टं द्रव्यलाभौ सुखं च कष्टं सौख्यं क्लेशलाभौ सुखं च ॥ ३ ॥ ३२३ ॥
सौख्यं लाभः कार्यसिद्धिश्च कष्टं क्लेशः कष्टात्सिद्धिरर्थो धनं च । ॥ ३२४ ॥
मृत्युर्लाभो द्रव्यलाभश्च शून्यं शून्यं सौख्यं मृत्युरत्यंतकष्टम् ॥ ४ ॥–मु. चिंतामणि
बृ. पं. ९३

अर्थ—पौष मासांत प्रतिपदेपासून द्वादशीपर्यंत क्रमानें तिथि लिहाव्या. त्याचप्रमाणें माघादिकांच्या द्वितीया, तृतीया इत्यादि अनुक्रमानें १२ महिन्याच्या कोष्टकांत तिथि लिहाव्या. त्रयोदशीचें फल तृतीयेप्रमाणें चतुर्दशीचें फल चतुर्थीप्रमाणें आणि पूर्णिमेचें पंचमीप्रमाणें फलें असीं जाणावीं. अमावास्येचें फल शून्य समजावें. ह्या सर्व तिथींचीं फलें पूर्वादि दिशेला प्रयाण केल्यानें निरनिराळीं आहेत. तीं पुढील कोष्टकावरून स्पष्ट समजावीं. जसें पौष शुद्ध प्रतिपदेवर पूर्व दिशेला गमन केलें असतां त्याचें फल सौख्य, दक्षिणेस गमन केलें असतां त्याचें फल क्लेश; पश्चिमेस भीति; आणि उत्तरेस अर्थागम म्हणजे द्रव्यप्राप्ति इ० फलें समजावींत. ही पाहून ज्या महिन्यांत ज्या तिथीचें ज्या दिशेला गमनाचें शुभफल सांगितलें असेल त्या दिशेला गमन करावें. हें तिथिचक्र कोणी म्हणतात, गोरक्ष मताचें, कोणी म्हणतात मुहूर्तादि ग्रंथांतलें.

## पंचांगांत खालीलप्रमाणें गोरक्षमुहूर्त कोष्टक दिलेलें असतें.

अथ गोरक्षमते गमनास मुहूर्तः—द्वादशमासाच्या तिथिगमनास योग्य फलश्रुतिः—तृतीया-त्रयोदशीचें फल १, चतुर्थी-चतुर्दशीचें फल १, पंचमी-पौर्णिमेचें फल १, अमावास्या वर्ज्य, मुहूर्ते चालेल त्यास चंद्रदोष, भद्रा, भरणी, दिशा, योगिनी, काळ, घातवार इत्यादि अनेक कुयोगाचा दोष नाहीं. गोरक्षनाथ पुसे आणि मत्स्येंद्रनाथ सांगे. मुहूर्ते चालेल ते कुशल पावेल. हा केवळ मुहूर्तराज होय. ज्या वारीं जे नक्षत्र असेल त्या वेळेस तें सत्य होय, याप्रमाणें मत्स्येंद्रनाथ स्वामीचें मत आहे. ( जन्मलग्नापासून किंवा जन्म राशीपासून ४ ५ ९ १० हीं लग्नें उदित असतां व त्यांत कोणताहि पापग्रहयोग नसतां त्या लग्नावर प्रयाण केल्यास इष्ट कार्यसिद्धि होते असा ज्योतिषसिद्धांत आहे.

| पौ | मा | फा | चै | वै | ज्ये | आ | श्रा. | भा | आ | का. | मा | पूर्व | दक्षिण | पश्चिम | उत्तर |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | सौख्य | क्लेश | भय | द्रव्य |
| २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | शून्य | नाश | दरिद्र | चिंता |
| ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | २ | द्रव्य | दु:ख | इष्टप्राप्ति | धनप्राप्ति |
| ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | २ | ३ | क्लेश | भलें न हो | धन | सौख्य |
| ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | २ | ३ | ४ | लाभ | द्रव्य प्रा | धन | सौख्य |
| ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | २ | ३ | ४ | ५ | भय | लाभ | मृत्यु | द्रव्यलाभ |
| ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | लाभ | कष्ट | लाभ | सुख |
| ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ० | सौख्य | ० | सौख्य |
| ९ | १० | ११ | १२ | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | सौख्य | लाभ | कार्यसि | कष्ट |
| १० | ११ | १२ | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | क्लेश | कष्ट | द्रव्यप्राप्ति | धन |
| ११ | १२ | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | लाभ | द्रव्यनाश | शून्य | मित्र |
| १२ | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | शून्य | सुख | मृत्यु | कष्ट |

## अष्टोत्तरीप्रमाणें राशीचें आयव्ययसाधन.

षट्रवौशरभुवोरजनीशेष्टौ कुजेनगभुवः शशिपुत्रे ।
गोभुवः कुयुगुला गुरुभृग्वो भास्करस्यतनये च दशाब्दा ॥ १ ॥ ३२५ ॥
त्रिघ्नेत्र्यं वर्षपतिराशिपवत्सरैक्ये पंचान्विते तिथिहृते सतिशेषमायः ।
लब्धेहुताशनहतेपवनैसमेतेतिथ्युद्धृतेसति च शेषमितोव्ययःस्यात् ॥ २ ॥ ३२६ ॥

प. सा. सा. ९२ .

अर्थ.—आयव्यय आणण्याकारिता सूर्यादि ग्रहाचीं वर्षे, रवीचीं ६, चंद्राचीं १५, मंगळाचीं ८, बुधाचीं १७, गुरुचीं १९, शुक्राचीं २१, आणि शनीची १० याप्रमाणें समजावीं. वर्षस्वामी आणि राशीस्वामी यांच्या वर्षांची बेरीज करून त्यास ३ नीं गुणावें, त्यांत ५ मिळवून येणाऱ्या संख्येस १५ नीं भागावें, जी बाकी राहील तो त्या राशीचा आय होय, आणि भागाकार आला असेल त्यास ३ नीं गुणून त्यात ५ मिळवावे आणि त्यास १५ नीं भागून बाकी राहील तो त्या राशीचा व्यय होय. हें अष्टोत्तरी मान होय.

## विंशोत्तरी मानानें नक्षत्राचें आयव्यय आणि त्यांचा प्रकार.

रविश्चंद्रःकुजोराहुर्जीवोमंदोबुधः शिखी ।
शुक्रोदशापतिश्चैवंकृत्तिकादिक्रमात्ततः ॥ १ ॥ ३२७ ॥

उत्तरादिततोप्येवमुत्तराषाढकात्तथा ।
वर्षाणिक्रमशोवक्ष्येरसा आशाः शिलोच्चयाः ॥ २ ॥ ३२८ ॥
धृतयः क्षितिपा अंकभुवः शैलं भुवोनगाः ॥
नखाश्चाब्दाः क्रमेणैतेसूर्यादीनांदशास्मृताः ॥ ३ ॥ ३२९ ॥

अर्थः—कृत्तिका नक्षत्रापासून पूर्वा नक्षत्रापर्यंत ( ९ ) नक्षत्रांचे रवि, चंद्र, मंगळ, राहु, गुरु, शनि, बुध, केतु आणि शुक्र हे स्वामी होत. याचप्रमाणें उत्तरापासून पूर्वाषाढापर्यंत व उत्तराषाढापासून भरणीपर्यंत हेच स्वामी समजावे. रवि, चंद्र, मंगळ, राहु, गुरु, शनि, बुध, केतु, आणि शुक्र यांची अनुक्रमें ६-१०-७-१८ १६-१९-१७ ७-२० हीं वर्षे होत.

स्वस्वामिवर्षाधिपवत्सरैक्यंत्रिघ्नंशराढ्यंतिथिभक्तशेष ।
आयोथलब्धिस्त्रिगुणार्थयुक्तास्तिथ्याप्तशेषोव्ययसंज्ञकस्यात् ॥ ४ ॥ ३३० ॥

अर्थः— नक्षत्रस्वामी व वर्षेश यांच्या वर्षांचे ऐक्य करून त्यास ३ नीं गुणून त्यांत ५ मिळवावे, आणि याला १५ नीं भागावें, शेष राहील तो आय होय. भागाकार आला असेल त्यास ३ नीं गुणावें, त्यांत ५ मिळवावे, आणि त्यास १५ नीं भागावें शेष राहील तो व्यय होय. हे अष्टोत्तरीमात होय.

## आयव्ययाचें शुभाशुभ फल.

यस्मिन्वर्षेदीर्घ आयः प्रदिष्टस्तस्मिन्वर्षेलाभदश्चाति सौख्यं ।
क्लेशोहानिर्व्यर्थनाशोव्ययश्चेदेतत्सर्वंचिंतयेदष्टमूले ॥ ५ ॥ ३३१ ॥

## आर्द्रादिदशनक्षत्राचेगर्भलक्षण व गर्भपातलक्षण.

मूलाद्येपुदशोन्मितेपुरविभेष्वभ्रांबुशंपामरुचेत्स्यात्त-
र्हिशिवर्क्षतोरवियुजांगर्भोदशानां भवेत् ॥
गर्भाहाच्छरनंदभू १९५ मितदिनेवृष्टिस्तुमेषेरवौचंद्रा-
द्व्येदशकेऽश्वितोवुपतनात्तद्गर्भपातोभवेत् ॥ १ ॥ ३३२ ॥

अर्थ.—मूळ महानक्षत्रापासून ( १० नक्षत्रें ) अश्विनी महानक्षत्रापर्यंत आकाशात ढग येणें, वृष्टि होणें, वीज चमकणें आणि वारा सुटणें इत्यादि चिन्हें जाहलीं असता आर्द्रादि १० महानक्षत्रांचा अनुक्रमें गर्भ जाणावा.

गर्भधारणः—ज्या दिवशीं होईल त्या दिवसापासून १९५ दिवसानीं वृष्टि होईल असें जाणावें.

मेषसंक्रांति झाल्या नंतर अश्विनी चंद्र नक्षत्रापासून १० दिवसांत वृष्टि झाली तर अनुक्रमानें त्या त्या नक्षत्राचा गर्भपात झाला असें समजावें.

## संक्रांतिफल.

### ववादिकरणानुरोधानें संक्रांतिवाहनादिक विचार.

ववेसिंहगाश्वेतवस्त्राचवालाभृशुंडीधराच्यान्नभुक्पंचकाव्या ॥
सुकस्तूरिकालेपनादेवजातिः प्रवालोत्थभूपार्कसंक्रांतिरुक्ता ॥ १ ॥ ३३३ ॥
कुमारीसुपीतांनराव्याघ्रगाचगदाव्याचजाती मसूनाहिजातिः
सुमुक्ताफलालंकृताकुंकुमाव्यासमुत्पायसासाभनेद्वालवाख्ये ॥ २ ॥ ३३४ ॥

वर जो स्पष्ट नकाशा रेखाटला आहे त्यावरून आपणास असें आढळून येईल कीं, सूर्यराशी मध्यस्थ कल्पून अनुक्रमानें बाकीच्या राशी मांडिल्या आहेत. यात चंद्र कुंभराशीमध्यें, मंगळ मिथुनराशिमध्यें, बुध कन्याराशिमध्यें, शुक्र तूळराशींत, सूर्य सिंहराशिमध्यें, शनि धनुराशींत आणि गुरु मिथुनराशिमध्यें आहे. याप्रमाणें सूर्यादि ग्रह राशीचक्रामध्यें आपल्या निजगतीनें परिभ्रमण करीत आहेत. तसाच राहु मेष राशींत, हर्शल मीन राशींत व नेपच्यून सिंह राशींत आहे. कुंडलीच्या मथळ्यावर "अ" अक्षराची निशाणी असते त्याचा अर्थ (अहर्गण) असा असतो. अहर्गण म्हणजे कोणत्याही गणितग्रंथात सांगितलेल्या गणितारंभ कालापासून इष्टकालपर्यंत जे दिवस गेले असतील त्यास "अहर्गण" असें म्हणतात. त्याचा उपयोग सूर्यादि नवग्रह स्पष्ट करण्याकरिता असतो. कांहीं पंचांगात मध्यम सूर्य लिहिलेला असतो. मध्यमग्रह याचा अर्थ—ग्रह आपल्या मध्यम गतीनें विषुववृत्तात फिरतो अशी कल्पना करून जो त्याचा भोग येतो त्यास ग्रहाचा मध्यम भोग किंवा मध्यमग्रह असें म्हणतात. नंतर त्या ठिकाणींच मध्यमसूर्य आणि स्पष्ट सूर्य अर्थात् मध्यम ग्रह व मंदस्पष्टग्रह यामधील जे अंतर ते असते त्यास मंदफल म्हणतात. कोणत्याही गावचा सूर्योदय किती वाजून किती मिनिटांनी आहे आणि "दिनमान" किती आहे हें समजण्याकरिता, अक्षांशावरून व रेखांशावरून "चर" धन किंवा ऋण आहे याचें कोष्टक निराळें दिलेले असते. आता पंचांगात शास्त्रार्थ या सदराखाली ज्या ज्या गोष्टी असतात त्या त्या प्रतिपादन करावयाच्या आहेत त्या गोष्टी अशाः— प्रत्येक ग्रहाच्या इनमंडलात राश्यंतर करण्याच्या स्थिति दर्शविल्या असतात; जसें अश्विनी मेषार्कः याचा अर्थ अश्विनी महानक्षत्रामध्यें सूर्यानें प्रवेश केला असा होय (महानक्षत्र म्हणजे...ज्या नक्षत्रामध्यें सूर्य आपल्या निजगतीनें परिभ्रमण करितो त्यास महानक्षत्र किंवा सूर्यनक्षत्र असें म्हणतात.) वृषभार्कः–मिथुनार्कः तुलार्कः याचा अर्थ वृषभ मिथुन तुला या राशिमध्यें सूर्यानें प्रवेश केला असा होय. त्याप्रमाणें बुध–गुरु–शनि–शुक्र इत्यादि ग्रहाचे संक्रांतीपरत्वें काल दिलेले असतात. जसें वृषभेज्ञः म्हणजे वृषभराशीमध्यें बुधानें प्रवेश केला असा होय. तसेंच मिथुने गुरुः, तुळे शुक्रः, धने शनिः, कन्यायां केतुः याप्रमाणें प्रत्येक ग्रह क्रांतिवृत्तामध्यें फिरत असतां त्याचे संक्रांती परत्वें काल दिलेले असतात. विषुवांश अगर भोगावरून ग्रहाचे अस्तोदय दिले असतात. जसें (भृगोःपूर्वास्तः) याचा अर्थ शुक्राचा पूर्वेस अस्त झाला असा होय. याप्रमाणें गुरु–शुक्र–शनि इत्यादि ग्रहाचे अस्तोदय पंचांगात प्रतिपादन केले असतात, तसेंच चंद्रोदय, दशावतारांचे जयंत्या, निरनिराळ्या सत्पुरुषांचे उत्साहाचे दिवस, आणि पदोपदीं लागणाऱ्या धर्मशास्त्राची माहिती दिली असते. ज्योतिषचक्र, घातचक्र, गोचरीच्या ग्रहावरून शुभाशुभ पाहण्याची मूलतत्त्वें कोष्टकरूपानें प्रतिपादन केलेली असतात. याशिवाय भद्राप्रवृत्तिः–भद्रानिवृत्ति, अमृतसिद्धियोग–मृत्युयोग, कालयोग, घबाड, मुहूर्त–गोरक्षमत–गर्गाचार्यांचें मुहूर्त इत्यादि विविध माहिती पंचांगात असते. याशिवाय इतर पुष्कळ उपयोगी गोष्टीही पंचांगात देतात. एकादशीचें उपोषण कधीं, श्रावणी कधीं इत्यादि गोष्टी धर्मशास्त्रावरून देतात त्याचा पंचांगस्थ गणिताशीं संबंध आहे. धर्मशास्त्राच्या ग्रंथात कोठें कोठें मतभेद पडतो. "दसरा आज करावा किंवा उद्यां करावा" असे वाद कधीं कधीं उत्पन्न होतात. पण ह्या वादाचें कारण पंचांगातील गणित नव्हे. असो–पंचांगात आरंभीं संवत्सर फलें दिलेलीं असतात त्यात त्या संवत्सराचा राजा कोण; मंत्री कोण इत्यादि सांगून त्याचा फलादेश सांगितला असतो. (१) चैत्र शुद्ध प्रतिपदेस जो वार असेल तो राजा, (२) सूर्याचें मेषसंक्रमण ज्या वारीं होईल तो मंत्री, (३) आर्द्रा प्रवेश ज्या वारीं होईल तो मेघेश; (४) कर्क, सिंह, आणि धनु, हीं संक्रमणें ज्या वारीं होतील ते क्रमानें पूर्वधान्येश, सेनापति व पश्चाद्धान्येश असतात असा नियम आहे. (कांहीं पंचांगात अधिपती या पेक्षा बरेच ज्यास्त असतात. ते त्यांनीं दिले असून महत्त्वाचे पंचांग तयार करतांना जे मूळ आंकडे गणितासाठीं घेतात तेंही त्यांनीं देत आहों) यांत चंद्र–बुध–शुक्र–गुरु हे शुभ ग्रह होत व त्यांची फलें चांगलीं असतात. इतर ग्रहांचीं फलें वाईट असतात. या अनुरोधानें फलें जाणावीं. ग्रहांच्या शुभाशुभ फलाचें विशेष स्पष्टीकरण पुढें येईल.

## अथराजादिविचारचक्र.

| चैत्रशुक्लप्रतिपदा | मेषसंक्रात | कर्कसंक्रात | आर्द्रामहानक्षत्र | तूळसंक्रात | धनुसंक्रात |
|---|---|---|---|---|---|
| राजा | मंत्री | अग्रधान्येश | मेघेश | रसेश | पश्चाद्धान्येश |
| मिथुनसंक्रात | सिंहसंक्रात | मकरसंक्रात | मकरसंक्रात | कुंभसंक्रात | कुंभसंक्रात |
| अर्घाधीश | सेनाधीश | निरसेश | फलेश | तृणेश | धनेश |

मीनसंक्राति समयेनार स कोटपाल

## अथ ग्रहलाघवपंचांगोपकरणचालनानि ॥

| | | | |
|---|---|---|---|
| अद्वप | १।१५।३१।३१ | ति स्प कैंद्र | ७। ५।५५।२३ |
| ति शुद्धि | ११। ३।५३।२४ | न. स्प. कैंद्र | ७। ०।२२।२२ |
| तिथि ध्रुव | १०।५६। ६।३६ | यो. स्प कैंद्र | ७।३१।५०।५७ |
| न. यो. ध्रुव | १०। २।२९।५६ | तिथिभोग | १।११।४१।५६ |
| ति. म. कैंद्र | ७। ९।४८।४७ | नक्षत्रभोग | १।१८। ३।१४ |
| न. म. कैंद्र | ६।५७।५२।२५ | योगभोग | १।१७।५२।३९ |
| यो. म. कैंद्र | ७।२९।२१। ० | न. स्प. भोग | १।१३। ३।१५ |

याप्रमाणें एक वर्षाचें मान आहे.

*ग्रहलाघवाचे पचाग करिताना वरील आकडे गणिताकरिता घेतात,* **यास उपकरणचालन म्हणतात.**

## पंचांगविषयक अनेक गोष्टींचा खुलासा.

[ १ ] सूर्य ज्या मार्गानें आकाशात फिरतो असें दिसतें त्या मार्गाच्या पातळीस क्रांतिवृत्त (Ecliptic) असें म्हणतात क्रांतिवृत्ताच्या दोन्ही बाजूस सुमारें आठ आठ अंशाचा पट्टा कल्पून त्यास **राशिचक्र** (Zodiac) असें म्हणतात. या पट्यावर रात्रीस लक्ष लावून पाहिलें असता एका मागून एक उगवणारे असे तारे सर्व पट्टा वेष्टून राहिलेले आहेत असें दृष्टीस पडते एका रात्रींत पट्यावरील सुमारें निम्मेच तारे दृष्टीस पडतात, तरी सहा महिनेपर्यंत पाहण्याचा क्रम ठेविला तर ते सर्व पाहाण्यात येतात

पृथ्वी स्थिर असून आकाशगोल सर्व तारकासह पृथ्वीभोंवती फिरतो, हा समज आता पुष्कळ प्रमाणानीं खोटा ठरला आहे, याबद्दल वाद राहिलेला नाहीं तरी स्थिति म्हटली तर पृथ्वी आपले आसाभोंवतीं फिरत फिरत सूर्याभोंवतींही फिरते, यामुळे आकाशगोलातील सर्व तारे पृथ्वीभोंवती फिरतात असें दिसतें. हा समज आता कायमचा झाला आहे. यापैकीं कोणत्याहि तऱ्हेनें कल्पना केली असता पचागातील गणितास व्यत्यय येत नाहीं, तथापि खऱ्या स्थितीची माहिती असणें योग्य आहे म्हणून ती येथें दिली आहे.

[ २ ] ह्या पट्यावरील तारे कोणासही ओळखिता यावे म्हणून पूर्वीच्या लोकानीं चागला अभ्यास करून त्यास त्याच्या आकृतींवरून खुणेचीं नावें दिलीं आहेत त्यांस नक्षत्र म्हणतात. तीं अश्विन्यादी २७ आहेत या नक्षत्रातील तारे कोणत्याही काळीं पाहिले तरी त्या एकमेकामधील अतर सारखेंच आहे असे दिसतें, यामुळें त्याच्या ठरलेल्या आकृतींतही फरक दिसत नाहीं, ते तारे म्हणजे जणु काय आकाशातील रत्नें आकाशात कायमचीं बसविलेलीं आहेत असें दिसतें म्हणून त्या ताऱ्यास (नक्षत्र) अचल तारे असें मानिलें आहे.

नाहीं. तो नेहमीं हळू हळू दक्षिण दिशेकडून उत्तर दिशेकडे अथवा उत्तर दिशेकडून दक्षिण दिशेकडे सरकत सरकत उगवतो असें दिसतें. सायन मकरसंक्रात होण्याच्या वेळेस तो पूर्व दिशेपासून सुमारें २३॥ अंश दक्षिण दिशेकडे जातो, तेव्हा इंग्रजी डिसेंबर महिन्याची सुमारें २२ तारीख असते व तेथून तो लागलीच उत्तरेकडे येऊ लागतो. तो हळू हळू मेषसंक्रात होण्याच्या वेळेस म्हणजे मार्च महिन्याच्या २१ तारखेच्या सुमारास पूर्व दिशेस जाऊन कर्कसंक्रात होण्याच्या वेळेस म्हणजे जून महिन्याच्या सुमारें २२ तारखेस, उत्तरेकडे सुमारें २३॥ अंश जातो. या सहा संक्रातीचे अवधीस सूर्याचें उत्तरायण म्हणतात. नंतर तो लागलाच दक्षिण दिशेकडे जाऊ लागतो, तो तूळ संक्रात लागण्याच्या वेळेस म्हणजे सप्टेंबर महिन्याच्या सुमारें २३ तारखेस, पूर्व दिशेंत जाऊन मकर संक्रात लागण्याचें वेळीं म्हणजे डिसेंबर महिन्याच्या सुमारें २२ तारखेस, पूर्व दिशेपासून सुमारें २३॥ अंश पुन्हा दक्षिणेकडे जातो या सहा संक्रातीचे अवधीस सूर्याचें दक्षिणायन म्हणतात. विषुववृत्तापासून सूर्याचें अंतरास क्रांति असें म्हणतात. ती उत्तर अथवा दक्षिण या भेदानें जशी असेल तशी अंश व कला यांनीं काहीं पंचांगांत प्रत्येक दिवसाची देतात.

[ ७ ] उत्तरायणांत, ज्या वेळेस सूर्य थेट पूर्व दिशेस जातो, त्या वेळेस सूर्याची क्रांति शून्य असते व त्या स्थानबिंदूस सायन पंचांगातील ग्रहांची गति मोजण्याकरिता आरंभस्थान धरितात. हें स्थान अचल नाहीं चल आहे, हल्लीं त्याची गति दर वर्षास ५०·२ विपलें मागें ( पश्चिम दिशेस ) (जाण्याची) राहण्याची आहे, यामुळें सायन वर्ष निरयन वर्षापेक्षा सुमारें २० मिनिटांनीं लहान आहे.

[ ८ ] पृथ्वी ज्या मार्गानें सूर्याभोंवतीं फिरते त्या मार्गास कक्षा असें म्हणतात व पृथ्वीच्या मध्य वृत्तस्थ व आकाशापर्यंत वाढणाऱ्या पातळीचे वर्तुळास विषुववृत्त ( Equator) असें म्हणतात. यावरून कक्षेचे मार्गास सीमा आहे व विषुववृत्तास सीमा नाहीं, तें अनंत आहे. कक्षा ही बहुधा एक पातळींतच असणारी आहे, त्यांत फरक होत असला तरी फारच थोडा आहे. कक्षा ही कक्षा–पातळी जर अनंत वाढविली तर आकाशापर्यंतचे होणाऱ्या वर्तुळास क्रांतिवृत्त ( Ecliptic ) असें म्हणतात. कक्षेचे दीर्घ वर्तुळाचे एका केंद्रांत सूर्य असतो ही कक्षा–पातळी विषुववृत्ताचे पातळीशीं सुमारें २३॥ अंश कलती आहे. यामुळें विषुववृत्ताचे पातळीनें कक्षावर्तुळाचें दोन ठिकाणीं छेदन होतें या दोन छेदनरेषेतल्या मार्गबिंदूत जेव्हा पृथ्वी जाते, तेव्हा सूर्यक्रांति शून्य होते, व जेव्हा या दोन छेदनमार्गबिंदूच्या मध्यभागीं पृथ्वी जाते, तेव्हा एका मध्यबिंदूत सूर्य २३॥ अंश उत्तरेकडेस कलता आहे असा दिसतो व दुसरे मध्यबिंदूत सूर्य २३॥ अंश दक्षिणेकडेस कलता आहे असा दिसतो या विवेचनावरून वर लिहिलेल उत्तरायण व दक्षिणायन याची समजूत चांगली पटेल.

[ ९ ] सायनग्रह मोजण्याचें आरंभस्थान व निरयणग्रह मोजण्याचें आरंभस्थान या दोन स्थानांमधील अंतरास **अयनांश** असें म्हणतात. या दोन आरंभस्थानाबद्दलच्या व्याख्या व निरयणग्रह मोजण्याचें आरंभ स्थान कोणतें आहे, याबद्दलचा विचार वरील कलमांत झालाच आहे. या अयनांशावर सर्व पंचांगाची भिस्त आहे, याबद्दल व शुद्ध निरयन पंचांगच लोकांस का मान्य आहे, सायन का मान्य नाहीं, याबद्दलचे मुद्दे खालीं दिले आहेत.

(१०) निरयनपंचांग हें केवळ व्यावहारिक कालगणनेकरिताच रचलेलें नाहीं,तर आकाशांतील दृश्यग्रह व तारका यांपासून होणारे जे योग डोळ्यांनीं घडलेले दिसतात, अथवा अदृश्य असले तरी खरोखर होतात, त्यावर देव, धर्म व पितृसंबंधीं आपलीं सर्व कृत्यें शास्त्राप्रमाणें व्हावीं, ह्याकरिताही रचलेलें आहे. त्याचप्रमाणें प्रत्येक मनुष्याच्या आयुष्यक्रमांत होणाऱ्या महत्त्वाच्या गोष्टी व दररोज जें काय आपण करितों त यथाशास्त्र पंचांगातील दृक्प्रत्ययी योगावर व्हावें, याकरिता त्याची योजना आहे यावरून शुद्धपंचांग हें ज्याची धर्मावर श्रद्धा आहे व जो त्याप्रमाणें आचरण करण्यास इच्छितो, त्यास अत्यंत आवश्यक आहे. केवळ व्यावहारिक कालगणनेस, इंग्रजी वर्ष, त्याचे महिने, तारखा व वार, व त्यांतील थोडे नियमांची माहिती असली म्हणजे पुरे आहे.

( ११ ) ज्या कालीं आमच्या पंचांगाचा आरंभ झाला त्या कालीं विषुववृत्त आणि क्रांतिवृत्त याचे

खरोखर पाहिलें तर त्या तारकासही अति सूक्ष्म गति आहे, पण तीमुळें तारकांचे अंतरात होणारा फरक हजारों वर्षांनीं सुद्धा नुसत्या डोळ्यांनीं उमगणारा नाहीं, दुर्बीणीसारख्या यंत्रानेंच तो उमगणारा आहे. **पण हा फरक बहुधा इतका अल्प असतो कीं त्याचे महत्त्व नाहीं. दोन हजार वर्षांत एक-दोन कला फरक पडल्यास त्यास फरक म्हणतां येत नाहीं.**

[ ३ ] दुसऱ्या एका जातीचे गोल आकाशात दृष्टीस पडतात, ते सूक्ष्म दृष्टीनें पाहिले असता वरील राशीचक्राचे पट्ट्यावर पूर्व दिशेस थोडे थोडे जातात असें दिसतें म्हणजे अर्थात् सर्व नक्षत्रामधून क्रमाक्रमानें ते भ्रमण करितात.–कोणी जलद भ्रमण करितात, कोणी सावकाश भ्रमण करितात–अशा भ्रमण करणाऱ्या गोलास ग्रह म्हणतात. त्यांचीं नावें रवि, चद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र व शनि हीं होत. राहु व केतु हे ग्रह नाहींत, तरी ते चंद्रमार्गांत अदृश्य बिंदू आहेत, व त्यास गति आहे, म्हणून त्यांची गणना ग्रहांतच करितात.

वास्तविक पाहिलें असता रवि हा ग्रह नसून एक अचल तारा आहे. याचे भोंवती बुध, शुक्र, पृथ्वी, मंगळ, गुरु व शनि हे गोल अनुक्रमानें दूर दूर अंतरावरून फिरतात, म्हणून हेंच कायते खरे ग्रह आहेत. आणखी दोन ग्रह शनीच्याही पेक्षा दूर अतरावरून फिरणारे अलीकडे पाश्चिमात्य लोकांनी शोध लावलेले आहेत त्यास हर्शल ( Uranus ) व नेपच्युन ( Neptune ) असें म्हणतात. हे गोल अनुक्रमानें दूर दूर अंतरावरून रवींभोंवतीं फिरतात. हे यंत्राचे साहाय्याशिवाय दिसत नाहींत म्हणून ते पूर्वकाळीं माहित नव्हते. त्यास अलीकडे आमचे लोकांनीं प्रजापति व वरुण अशीं अनुक्रमानें नांवें दिलीं आहेत, पण त्यांचे गतींचा उपयोग अद्यापि सर्व पंचांगात करू लागले नाहींत. चद्र हा गोल आपल्या पृथ्वीभोंवती फिरतो म्हणून तो आपल्या पृथ्वीचा उपग्रह आहे. **चंद्राचें परिणाम पृथ्वीवर अतिशय होतात.**

पृथ्वी ही रवीभोंवती फिरते या कारणानें आपल्यास रवि फिरतो असें दिसतें. चद्र तर बाकीच्या ग्रहाप्रमाणेंच राशिचक्रातून फिरतो असें पृथ्वीवरून दिसतें यामुळें रवि व चद्र हे खरोखर ग्रह नसता त्यास ग्रह म्हणणें जरी वस्तुतः बरोबर नाहीं तरी तेवढ्यानें वरील मूळ व्याख्येस बाध येत नाहीं.

[ ४ ] राशिचक्राचे बरोबर १२ विभाग केले आहेत या प्रत्येक भागास राशि म्हणतात. त्या प्रत्येक राशीचे बरोबर ३० विभाग केले आहेत; त्यास अंश म्हणतात. त्या प्रत्येक अंशाचे बरोबर ६० विभाग केले आहेत त्यास कला म्हणतात व त्या प्रत्येक कलेचे बरोबर ६० विभाग केले आहेत, त्यास विकला म्हणतात. याचा उपयोग ग्रहांचें वर्तुलमापन करण्याच्या कामात होतो. या १२ राशींचीं स्थानें ओळखण्या-करिता त्यास नावें दिलेलीं आहेत, तीं अनुक्रमानें येणेंप्रमाणें:–मेष, वृषभ, मिथुन, कर्क, सिंह, कन्या, तूळ, वृश्चिक, धनु, मकर, कुंभ, मीन. हीं नावें त्या त्या राशींतील नक्षत्रतारकांच्या आकृती वरून आमचे ज्योतिष्यांनीं प्रथम दिलीं, तीं अद्यापर्यंत जशींच्या तशींच सर्व पृथ्वीवर कायम राहिलीं आहेत.

[ ५ ] ग्रहाच्या गतींचें मापन पृथ्वीचा मध्यबिंदु क्रांतिवृत्ताचें केंद्र असें धरून करितात म्हणून त्यास आरंभस्थान पाहिजे. ते अश्विनी नक्षत्राचें किंवा मेष राशीचें आरंभस्थान धरितात कारण त्या दोहोंचे आरं-भस्थान एकच आहे. त्यास आपण " अश्विनी मेषस्थान " असेंच नाव देऊं. तें स्थान आकाशात अमुकच जागीं आहे असें तारात्मक निश्चित दाखविता येतें. कारण त्याचा उल्लेख सिद्धान्त ग्रथात **सप्रमाण असंदिग्ध** असा केलेला आहे व यामुळेंच मूळचें स्थान काय होतें हें समजणें केव्हाही सहजसाध्य आहे. अशा तऱ्हेनें ठरविलेलें अचल स्थान निरयण पंचांगातील ग्रहांचीं स्थानें दाखविण्याकरिता आरंभस्थान घेत-लेलें असते. पृथ्वी आणि रवि हे नेहेमीं क्रांतिवृत्तातच असतात व बाकीचे ग्रह राशिचक्राचे पट्ट्यात कोठें तरी असतात, यामुळें ते कधीं क्रांतिवृत्ताचे उत्तरेस, कधीं क्रांतिवृत्ताचे दक्षिणेस व कधीं क्रांतिवृत्तावर असतात. यामुळें या ग्रहाच्या गतीचें मापन, ग्रहबिंदूपासून क्रांतिवृत्ताशी काटकोन करणाऱ्या वर्तुळानें जेथें क्रांतिवृत्त छेदिलें जातें तेथपर्यंतचें वर्तुळमापन जें अश्विनी मेषस्थानापासून येईल तें घेतात व तेंच पंचांगामध्यें दिलेलें असतें, त्यास भोग असें म्हणतात. ग्रहबिंदू पासून क्रांतिवृत्ताचे छेदनबिंदुपर्यंतचे अंतरास शर असें म्हणतात तेंही पंचांगात दिलेले असतात.

[ ६ ] सूर्य हा अचल ताऱ्यासारखा कोणत्या तरी नियमित एकाच दिशेस नेहमीं उगवणारा असा दिसत

नाहीं. तो नेहमीं हळू हळू दक्षिण दिशेकडून उत्तर दिशेकडे अथवा उत्तर दिशेकडून दक्षिण दिशेकडे सरकत सरकत उगवतो असें दिसतें सायन मकरसंक्रांत होण्याच्या वेळेस तो पूर्व दिशेपासून सुमारें २३॥ अंश दक्षिण दिशेकडे जातो, तेव्हां इंग्रजी डिसेंबर महिन्याची सुमारें २२ तारीख असते व तेथून तो लागलींच उत्तरेकडे येऊं लागतो तो हळू हळू मेषसंक्रांत होण्याच्या वेळेस म्हणजे मार्च महिन्याच्या २१ तारखेच्या सुमारास पूर्व दिशेस जाऊन कर्कसंक्रांत होण्याच्या वेळेस म्हणजे जून महिन्याच्या सुमार २२ तारखेस, उत्तरेकडे सुमारें २३॥ अंश जातो या सहा संक्रांतीचे अवधीस सूर्याचें उत्तरायण म्हणतात नंतर तो लागलाच दक्षिण दिशेकडे जाऊं लागतो, तो तूळ संक्रांत लागण्याच्या वेळेस म्हणजे सप्टेंबर महिन्याच्या सुमारें २३ तारखेस, पूर्व दिशेंत जाऊन मकर संक्रांत लागण्याचें वेळीं म्हणजे डिसेंबर महिन्याच्या सुमारें २२ तारखेस, पूर्व दिशेपासून सुमारें २३॥ अंश पुन्हा दक्षिणेकडे जातो या सहा संक्रांतीचे अवधीस सूर्याचें दक्षिणायन म्हणतात विषुववृत्तापासून सूर्याचे अंतरास क्रांति असें म्हणतात ती उत्तर अथवा दक्षिण या भेदानें जशी असेल तशी अंश व कला यांनीं कांहीं पंचांगांत प्रत्येक दिवसाची देतात

[ ७ ] उत्तरायणांत, ज्या वेळेस सूर्य थेट पूर्व दिशेस जातो, त्या वेळेस सूर्याची क्रांति शून्य असते व त्या स्थानबिंदूस सायन पंचांगांतील ग्रहांची गति मोजण्याकरितां आरंभस्थान धरितात हें स्थान अचल नाहीं चल आहे, हल्लीं त्याची गति दर वर्षास ५० २ विपळें मागें ( पश्चिम दिशेस ) (जाण्याची) राहण्याची आहे, यामुळें सायन वर्ष निरयन वर्षापेक्षां सुमारें २० मिनिटांनीं लहान आहे

[ ८ ] पृथ्वी ज्या मार्गानें सूर्याभोंवतीं फिरते त्या मार्गास कक्षा असें म्हणतात व पृथ्वीच्या मध्य वृत्तस्थ व आकाशापर्यंत वाढणाऱ्या पातळीचे वर्तुळास **विषुववृत्त** ( Equator) असें म्हणतात यावरून कक्षेचे मार्गास सीमा आहे व विषुववृत्तास सीमा नाहीं, तें अनंत आहे कक्षा ही बहुधा एक पातळींतच असणारी आहे, त्यांत फरक होत असला तरी फारच थोडा आहे कक्षा ही कक्षा–पातळी जर अनंत वाढविली तर आकाशापर्यंतचे होणाऱ्या वर्तुळास **क्रांतिवृत्त** ( Ecliptic ) असें म्हणतात कक्षेचे दीर्घ वर्तुळाचे एका केंद्रांत सूर्य असतो ही कक्षा–पातळी विषुववृत्ताचे पातळीशीं सुमारें २३॥ अंश कलती आहे यामुळें विषुववृत्ताचे पातळीनें कक्षावर्तुळाचें दोन ठिकाणीं छेदन होतें या दोन छेदनरेषेतल्या मार्गबिंदूंत जेव्हां पृथ्वी जाते, तेव्हां सूर्यक्रांति शून्य होते, व जेव्हां या दोन छेदनमार्गबिंदूंच्या मध्यभागीं पृथ्वी जाते, तेव्हां एका मध्यबिंदूंत सूर्य २३॥ अंश उत्तरेकडेस कलता आहे असा दिसतो व दुसरे मध्यबिंदूंत सूर्य २३॥ अंश दक्षिणेकडेस कलता आहे असा दिसतो या विवेचनावरून वर लिहिलेलें उत्तरायण व दक्षिणायन यांची समजूत चांगली पटेल

[ ९ ] सायनग्रह मोजण्याचें आरंभस्थान व निरयणग्रह मोजण्याचें आरंभस्थान या दोन स्थानांमधील अंतरास **अयनांश** असें म्हणतात या दोन आरंभस्थानाबद्दलच्या व्याख्या व निरयणग्रह मोजण्याचें आरंभस्थान कोणतें आहे, याबद्दलचा विचार वरील कलमांत झालाच आहे या अयनांशावर सर्व पंचांगांची भिस्त आहे, याबद्दल व शुद्ध निरयन पंचांगच लोकांस का मान्य आहे, सायन का मान्य नाहीं, याबद्दलचे मुद्दे खालीं दिले आहेत

(१०) निरयनपंचांग हें केवळ व्यावहारिक कालगणनेकरितांच रचलेलें नाहीं, तर आकाशांतील दृश्यग्रह व तारका यापासून होणारे जे योग डोळ्यांनीं घडलेले दिसतात, अथवा अदृश्य असले तरी बरोबर होतात, त्यावर देव, धर्म व पितृसंबंधीं आपलीं सर्व कृत्य शास्त्राप्रमाण व्हावीं, याकरितांही रचलेलें आहे त्याप्रमाणें प्रत्येक मनुष्याच्या आयुष्यक्रमांत होणाऱ्या महत्त्वाच्या गोष्टी व दररोज न काय आचरण करितां तें यथाशास्त्र पंचांगांतील दृक्प्रत्ययी योगावर व्हावें, याकरितां त्याची योजना आहे यावरून शुद्धपंचांग हें ज्याची धर्मावर श्रद्धा आहे व जो त्याप्रमाणें आचरण करण्याचें इच्छितो, त्यास अत्यंत आवश्यक आहे केवळ व्यावहारिक कालगणनेस, इंग्रजी वर्ष, त्याचे महिने, तारखा व वार, व त्यांतील थोडे नियमांची माहिती असली म्हणजे पुरे आहे

( ११ ) ज्या वर्षी आमच्या पंचांगाचा आरंभ झाला त्या वर्षी विषुववृत्त आणि क्रांतिवृत्त यांचे

छेदनबिंदूंतच मेषराशीचा प्रारंभ होत होता. या स्थानबिंदूस **संपात** म्हणजे विषुववृत्त व क्रांतिवृत्त यांचा संयोग असे नाव आहे. त्या वेळेस जी स्थिति आकाशात होती तिचें वर्णन आमच्या जुन्या ग्रंथात आहे. त्या वेळेस वरील छेदनबिंदूपासून पुन्हा त्या छेदनबिंदूंत पृथ्वी येण्याच्या कालाचे मान व मेष राशीच्या प्रारंभापासून मेष राशीच्या प्रारंभापर्यंतचे कालाचे मान, हीं दोन्ही एकच अशी समज होती. या मानात काहीं सूक्ष्म भेद असावा असें त्या वेळेस ध्यानात आलेलें नसावें असें वाटतें. म्हणून पहिले मुद्यात दिल्याप्रमाणे दृक्प्रत्यंतरावर म्हणजे निरयण वर्षकालावर शास्त्राची रचना झाली. पुढे जेव्हा संपातापासून संपातापर्यंतच्या कालाचें वर्ष व अश्विनीमेषस्थानापासून मेषस्थानाचे कालाचें वर्ष यामधील फरक थोडा थोडा नजरेस पडूं लागला, तेव्हा आमच्या ज्योतिषग्रंथकारानीं त्याची उपपत्ति लिहिली व त्यावरूनच सायन निरयण हे भेद त्यानींच केले—हे सूर्यसिद्धांतातील गणितावरून सिद्ध होतें; व त्या वेळेसच तो ग्रंथ उदयास आला. तरी दृक्प्रत्यंतराचे योगावर जें एकदा बसविलेलें शास्त्र, ते सोडून सायन पद्धतीचे गणिताने केवळ ऋतु, अयन वगैरे गोष्टी जरी आमच्या जुन्या ग्रंथात वर्णन केल्याप्रमाणे जुळल्या, तरी ग्रह व तारे याचे योगाचा मेळ मुळींच रहात नाहीं, म्हणून सायन पद्धतीचें पंचाग सशास्त्र होऊंच शकत नाहीं असे शास्त्राप्रमाणें वागणारे लोकास पटून सायन पद्धतीने केलेले पंचाग त्यास पसंत झालें नाहीं. ऋतु, अयन बरोबर जमणें हें पचागाचें मुख्य अंग नव्हे, ग्रह व तारे याचे योग बरोबर जमणें व दृष्टीनें त्याची साक्ष पटणें, हेच मुख्य पंचागाचे अंग आहे. आणि त्यावर आर्यफलज्योतिष सर्वस्वी अवलंबून आहे, वरेच लोकाचा विश्वासही आहे. हल्लीं सायन पद्धतीचे पचागानेंही इंग्रजी फलज्योतिष वर्तविणारे लोक आमच्यात काहीं तयार होत आहेत व त्यावर विश्वास ठेवणारेही काहीं लोक निघाले आहेत; तरी आमच्या जुन्या शास्त्राप्रमाणे वागणाऱ्या लोकास त्याचा काहीं उपयोग होणार नाहीं व त्यावर विश्वासही बसणार नाहीं. असो. निरयण पद्धतीचे गणिताने ऋतु, अयन वगैरे गोष्टी आमच्या जुन्या ग्रंथात वर्णन केल्याप्रमाणे जरी पूर्वी जुळत असत तरी पण आता त्या सापातिक गणिताप्रमाणे घ्याव्या लागतात ही गोष्ट सर्वास अवगत झालेली आहे तेव्हा व्यवहाराकरिता मात्र सायन पद्धतीने ऋतु, अयन काढून घ्यावे व धर्मकृत्यात सर्व योग निरयण पद्धतीनें निघालेले असतील तेच घ्यावे, असा निर्णय झाल्यामुळे, पंचागाचे गणितास निरयन पद्धतच आदरणीय झाली. सायन पद्धतीनें केलेले पचागास आर्यपचागात जागा नाहीं. कारण भारतीय पचाग पद्धति निरयन आहे.

( १२ ) अलीकडे सुमारें ६० वर्षे जुन्या पद्धतीनें केलेले पंचाग, घटिका पळात पुष्कळसें चुकतें, असें लोकाचे नजरेस आले व त्यास काहींतरी चालन दिलें पाहिजे असेंही त्यास वाटूं लागले तेव्हापासून सूक्ष्म गणितानें निरयण पद्धत सुधारावी किंवा सायन पद्धतीनें पंचाग तयार करून धर्मसंबंधीं व्यवहारास घ्यावें असें म्हणणारे लोक पुढे आले, त्या दोन पक्षापैकीं सायन पद्धतीचा ऱ्हास का झाला हे वर आलेंच आहे. निरयण पद्धतींत अयनांश व गणित बरोबर घेतले तरच तें पंचाग दृक्प्रत्ययास जुळेल व लोकसमूहास मान्य होईल. आजपर्यंत जीं पचागें झालीं व हल्लींही सुरू आहेत त्यामध्यें संक्रांतीसारख्या महत्वाच्या गोष्टींत चार चार दिवसाचा फरक जुन्या पद्धतीच्या संक्रांतीर्दी पडूं लागला अथवा अधिक महिन्यासारखी गोष्ट जुन्या पद्धतींतल्या पचागात नसणें व सूक्ष्म पद्धतीच्या पंचागात असणें असे होऊ लागले तर तें लोकमान्य होईल किंवा नाहीं. अशा प्रकारची शका येऊन काहींनीं अयनांश चुकीचे कायम ठेवून दृक्प्रत्यय येईल अशी पचागें काढली. पण ती जनतेस पटली नाहींत. जनतेचे म्हणणे असें कीं, पंचांग शुद्ध करावयाचे तर सर्वच शुद्ध केलें पाहिजे. आणि म्हणूनच लो० टिळक यानीं शुद्ध अयनांश व शुद्ध गणिताचें शुद्ध निरयन पचाग सुरू केलें आहे आणि ते सूक्ष्म व दृक्प्रत्ययास जुळणारें असें असल्याने सर्वमान्य झालें आहे.

अयनांश अमुकच घ्यावे याचा निर्णय करणें सोपें आहे. याबद्दलचें विवेचन मागें अनेक रीतीनें केलें आहे. हा निर्णय जितका हा विषय जाणणाऱ्या बहुमतसमूहानें करिता येईल व तो मान्य होईल तितका एक व्यक्तीनें केलेला निर्णय बहुजनास मान्य होणार नाहीं. यामुळेंच तो सर्व अधिकार ज्योतिष परिषदेकडे ठेविला, त्याप्रमाणे ठरावाची एकवाक्यता बहुजनसमूहाकडून होऊन त्याप्रमाणें शुद्ध पंचांग तयार झालें आहे.

( १३ ) सूर्य दोनप्रहरीं याम्योत्तर वृत्तातून म्हणजे मध्यान्ह रेषेंतून निघून पुन्हा त्याच रेषेंत येण्यास मध्यम

मानानें जो काळ लागतो, तो सौरमानाचा एक दिवसाचा काल होय. याच दिवसानें कोणचेंही कालमान दाखवितात. *या दिवसाचे कालाचे बरोबर ६० विभाग केले आहेत त्यास* **घटिका** *म्हणतात. प्रत्येक घटिकेचे* बरोबर ६० विभाग केले आहेत, त्यास **पळें** म्हणतात व प्रत्येक पळाचे बरोबर ६० विभाग केले आहेत त्यास **विपळें** म्हणतात. प्रत्येक सौरदिवसाचें कालमान तेंच वाराचे कालमान होय. पचागामध्यें सूर्योदया पासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंत वाराचे कालमान धरतात. या कालमानात व सौर दिवसाचे कालमानात फारसा फरक नाहीं, मोठयात मोठा फरक १·१ मिनिटाचे आतच असतो, ही गोष्ट सर्व हिंदुस्थानास लागू आहे.

( १४ ) सूर्यास अश्विनीमेषरस्थानापासून निघून त्याच स्थानात परत येण्यास, बरोबर ३६५ दिवस १५ घटिका ३१॥ पळें लागतात असें सूर्यसिद्धातात सांगितलें आहे व हीच निरयन सौर ( Sidereal ) *वर्षाची कालमर्यादा होय. हल्लीं ह्याच वर्षाची इग्रजी ज्योतिष्यानी फार सूक्ष्म वेधाने ठरविलेली कालमर्यादा,* ३६५ दिवस १५ घटिका २२·८५ पळें आहे. म्हणजे फक्त सुमारें ८ ६५ पळानी कमी आहे.

एवढी चुकी तरी, आमचे पूर्वजानीं काढलेल्या कालमानात का पडावी, याबद्दल शका येते—पृथ्वी आपले मार्गक्रमणात वर्षातून एकदा सूर्याजवळ व एकदा सूर्यापासून दूर अशी जाते व या दोन बिंदूस थोडे पूर्वेकडेस जाण्याचें चलन आहे, यामुळे या बिंदूपासून होणारें वर्ष निरयण सौर वर्षापेक्षा कांहीं पळानीं *मोठे आहे, असें इग्रजी ज्योतिष्यानी फार सूक्ष्म वेधानें ठरविलें आहे. पूर्वकालीं वर्षकालाचा निर्णय करतेवेळेस* आमचे ज्योतिष्यानी या तऱ्हेनेंही वर्षकालमान ठरविण्याचा एक निराळा प्रयत्न केलेला असला, तर हा काढलेला काल व निरयण सौर वर्षाचा काल हे दोन्ही एकच असें मानणें साहजिक आहे. अशा तऱ्हेनें किंचित् फरकानें आलेलीं वर्षकालाची दोन मानें याचा मध्य, एकदर वर्षकालमानात फारशी चुकी होऊ नये म्हणून जर त्यानीं त्या वेळेस घेतला असला, तर त्याच्या वरील चुकीचें बहुतेक निरसन होतें. पूर्वकालीं दुर्बीण वगैरे यत्रसाधनें नसल्यामुळे, वरील केलेलें अनुमान बरोबर आहे असेंच कोणासही वाटेल.

( १५ ) अश्विनीमेषस्थानापासून प्रत्येक ३० अशाचे सूर्याचे मार्गक्रमणास एक **संक्रांत** याप्रमाणें एक *वर्षांत १२ सक्राती होतात. त्या सक्रातीची नावें म्हणजे त्या त्या राशींचीच नावे होत. याचप्रमाणें सायन* सक्राति सायनप्रारभस्थानापासून ( सपात बिंदूपासून ) धरतात. हीं नावें व त्याच्या प्रारभवेळा पचागात देतात.

**( १६ ) कोणत्याही सायन संक्रांतिचा प्रवेश व त्याच निरयन संक्रांतिचा प्रवेश या दोहों-मधील जे दिवसात्मक अंतर तितके अयनांश हा सामान्यतः नियम आहे. हें अंतर कधीं कमी, कधीं जास्ती असें होणें शक्य नाहीं. अंतर हें नेहमीं नियमित व सारखेंच पाहिजे.**

(१७) निरयनसक्रातीची प्रारभवेळा हीच बगाली व मलबारी लोकाच्या महिन्याची प्रारभवेळा होय. ही वेळा सूर्य स्पष्ट मध्यान्हानतर जर आली, तर महिन्याचा आरभ दुसरे दिवशीं करितात, नाहींतर त्याच *दिवशीं करितात. हाच सर्व हिंदु लोकाचा सौरमासाचा प्रारभ होय. ह्या सौरमासाच्या तारखा कित्येक* पचागात निराळे सदर करून देतात. कित्येकात देत नाहींत.

(१८) ज्या चाद्रमासात सक्रात येत नाहीं तो **अधिकमास** धरतात. त्यास अनुक्रमानें येणाऱ्या महिन्याच्या नावामागें अधिक हा शब्द जोडून नाव देतात व त्याचे पुढील महिन्यास नुसते तेंच नाव देतात. अधिकमास साधारण २७ चाद्रमासानतर व ३६ मासापूर्वी येतो. तो बहुधा चैत्रापासून अश्विनापर्यंतचे महिन्यातला असतो. ज्या वर्षांत अधिकमास येतो त्या वर्षांत १३ महिने येतात.

( १९ ) ज्या चाद्रमासात म्हणजे शु. १ च्या आरभापासून कृ. ३० च्या अतापर्यंतच्या दरम्यान कोणतीही सूर्यसक्रात होत नाहीं तो अधिक मास ही गोष्ट सर्वमान्य आहे पण *ह्या अधिक मासास नाव* कोणत्या मासाचे द्यावयाचें यासबधीं क्वचित् मतभेद आहे आणि त्याचा विचार करण्यासारखा आहे, तो *असा —अधिकमास म्हणजे सौर आणि चाद्र मासातील फरक.* सौरवर्ष ३६५ दि. १५ घ. २३ पळाचे व चाद्रवर्ष ३५४ दिवसाचे. अर्थात् ह्या दोन प्रकारच्या वर्षमानात सुमारें ११। दिवसाचा फरक आहे. *हा फरक तीन वर्षांत सुमारे ३४ दिवसाचा पडणार हेंही निर्विवाद आहे. हा फरक असाच सतत राहू दिला* तर सौर आणि चाद्रमानाचा मेळ केव्हाही राहणार नाहीं. याकरिता दर अडीच अगर तीन वर्षांनीं हा फरक अधिक मासाच्या रूपानें काढून टाकण्यात येतो व सौर चाद्रमानाचा मेळ कायम राखला जातो. वरील

परिस्थिति ध्यानात घेतली असता हे कोणासही कबूल करावे लागेल कीं, ज्यावेळीं अधिक मास येतो त्याच्या पूर्वीच्या २॥ वर्षांतील साचलेल्या कसरीमुळे तो उत्पन्न झालेला असतो. तेव्हा वास्तविक ज्या महिन्याच्या पुढें अधिक मास येतो त्या महिन्याचे नाव अधिक मासास देणे क्रमप्राप्त ठरतें. पण शास्त्रकारानीं आजपर्यंत घालून दिलेली परिपाठी अशी आहे कीं, अधिक मासाच्या पुढील जो मास त्याचे नाव अधिक मासास द्यावयाचें व त्याप्रमाणेंच सध्या अधिक मास देण्यात येतात. अयनांशाचा संबंध जसा मेषादि बारा संक्रातिप्रवेशाशीं आहे तसाच विशेषतः अधिक मासाशीं आहे. कारण संक्रातिवरच अधिकमास सर्वस्वी अवलंबून असतो. ज्या पंचागात जे अयनांश असतील त्यावरून येणारा अधिकमास त्या गणितानें येणार, हें जरी खरें तरी शास्त्रशुद्ध अयनांश कोणते याच्यावरच अधिकमासाची सर्व मदार आहे. शास्त्रशुद्ध आणि वेदकालापासूनच्या परंपरेने प्राप्त असें सध्या १९ अयनांश आहेत हें सिध्द झाले आहे. तेव्हा १९ अयनांशानें येणारे अधिकमासच खरे अधिकमास होत.

(२०) ज्या चांद्र महिन्यात दोन संक्राति येतात तो **क्षयमास.** तो कार्तिकादि तीन मासात येतो. क्षयमास आलेल्या वर्षांत दोन अधिकमास येतात. क्षयमास वारंवार येत नाहीं. फार वर्षांनीं येतो यामुळें त्याची विशेष माहिती देण्याचें कारण दिसत नाहीं.

(२१) सूर्यसंक्रातीप्रमाणेंच सूर्याचें नक्षत्रसंक्रमण काढितात. तें काढण्याकरिता प्रत्येक नक्षत्रामधील अंतर बरोबर १३ अंश व २० कला धरतात. त्यानाच **सूर्यनक्षत्रें** म्हणतात. त्याचीं नावें व प्रारंभवेळा पंचागात देतात. यात मृगापासून ९ नक्षत्रे पर्जन्य नक्षत्रे म्हणून मानतात.

(२२) **चंद्रदर्शनें:—**पंचागामध्ये चंद्रदर्शनं मु. ४५ अशा पद्धतीने चंद्रदर्शनें देतात. ह्याचा अर्थ चंद्रदर्शन ४५ मुहूर्तावर होतें असा आहे. सूर्याचे तेजामुळें व चंद्राचे प्रकाशित भागाचे हीनत्वामुळे अमावास्येपुढें काहीं कालपर्यंत चंद्र दिसत नाहीं. तो नुसत्या डोळ्यानीं दिसण्यास निदान १२ अंश तरी सूर्य व चंद्र यामध्यें अंतर झाले पाहिजे असें आमचे ज्योतिष्यानी प्रमाण काढिले आहे व तेच **सामान्यतः ठीक** आहे; यामुळें त्याचा नियम असा आहे कीं सूर्यास्तापूर्वी जर शुक्र प्रतिपदा संपून द्वितीयेस आरंभ झाला तर सूर्योदयींच्या प्रतिपदेच्या दिवशीं चंद्रदर्शन पंचागात मांडावें, नाहींतर सूर्योदयींच्या द्वितीयेच्या दिवशीं मांडावें.

चंद्रनक्षत्रास दिवस नक्षत्रे म्हणतात. चंद्रदर्शनाचे वेळेस जें दिवसनक्षत्र असतें त्यावर चंद्रदर्शनाचे तीन प्रकारचे मुहूर्त अवलंबून असतात. त्या प्रत्येक प्रकारचे मुहूर्तास कोणकोणचीं नक्षत्रें असावीं लागतात याची यादी खालीं दिली आहे; त्याप्रमाणें पाहून चंद्रदर्शनाचे वेळचे मुहूर्त लिहितात.

रोहिणी, पुनर्वसु, उत्तरा, विशाखा. उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा ह्यापैकीं कोणतेंही नक्षत्र असले तर मु० ४५ मांडतात, हा उत्तम असा मुहूर्त मानला आहे.

अश्विनी, कृत्तिका, मृगशीर्ष, पुष्य, मघा, पूर्वा, हस्त, चित्रा, अनुराधा, मूळ, पूर्वाषाढा, श्रवण, धनिष्ठा, पूर्वाभाद्रपदा, रेवती ह्यापैकीं कोणचेंही नक्षत्र असले तर मु० ३० मांडतात, हा मध्यम असा मुहूर्त मानला आहे.

भरणी, आर्द्रा, आश्लेषा, स्वाती, ज्येष्ठा, शततारका ह्यापैकीं कोणचेंही नक्षत्र असलें तर मु० १५ मांडतात, हा कनिष्ठ असा मुहूर्त मानला आहे.

चंद्रदर्शन ज्या दिवशीं होतें त्याचे दुसरें दिवशीं मुसलमानी महिन्याचा आरंभ होतो. ही पद्धत हिंदुस्थानातील सर्व मुसलमानास समत असल्यामुळें काहीं पंचागामध्यें मुसलमानी तारखा देतात.

(२३) **सूर्यसंक्रांति.**—अश्विनीआरंभापासून तीस तीस अंश सूर्य कोणकोणच्या वेळीं प्रत्येक राशीस जातो, हें समजण्याकरिता त्या त्या राशींचे नाव व सूर्योदयापासूनची वेळ, ज्या तिथीस संक्रात असेल त्या तिथीसमोर मांडतात. त्यास सूर्यसंक्राति असें म्हणतात. या संक्रातीच्या दिवशीं पिंडरहित श्राद्ध करावें असें सांगितलें आहे. चंद्रदर्शनाच्या मुहूर्ताप्रमाणेंच सूर्यसंक्रातिचे मुहूर्त मांडितात. सूर्यसंक्रातीचेही वेळेस जें दिवसनक्षत्र असतें त्यावर सूर्यसंक्रातीचे मुहूर्त अवलंबून असतात. व त्या प्रत्येक मुहूर्तास कोणकोणतीं नक्षत्रें धरितात याची यादी चंद्रदर्शनाचे मुहूर्ताकरिता वर दिली आहे त्याप्रमाणें धरून मुहूर्त मांडितात. ही पंचागात मांडण्याची पद्धत उदाहरणार्थ खालीं दिली आहे.

अश्विनी मेषेऽर्कः २५/० मु. ३०, याचा अर्थ मेषसंक्रांतींत सूर्याचा प्रवेश सूर्योदयानंतर २५ घटिका ० पळांनी ३० मुहूर्तांवर होतो व त्याच वेळेस सूर्याचा अश्विनी नक्षत्रातही प्रवेश होतो असें समजावें.

(२४) सूर्यनक्षत्रें:—अश्विनीमेषारंभतान्यापासून प्रत्येक १३ अंश २० कलाच्या अंतरावरील बिंदूंत सूर्य केव्हा जातो व नक्षत्रबदल होतो, हे समजण्याकरिता त्या नक्षत्राचें नाव व सूर्योदयानंतरची वेळ हीं त्या दिवसासमोर मांडतात. त्यास सूर्यनक्षत्र असें म्हणतात.

मृगनक्षत्रापासून हस्तनक्षत्रापर्यंतचीं ९ नक्षत्रें पर्जन्यकाळाचीं होत. ह्याच नक्षत्रामध्यें हिंदुस्थानात पाऊस पडतो. प्रत्येक वर्षास नेहमीं सारखाच पाऊस नसतो, कधीं उत्तम; कधीं मध्यम व कधीं कनिष्ठ असा असतो. हें पूर्वी कसें समजावें याचे ठोकताळे आमचे ज्योतिष्यांनीं तीन तऱ्हेनें बसविले आहेत ते येणेंप्रमाणें:—

( १ ) सूर्यनक्षत्र कोणत्या वाहनावर आहे हे काढावयाचें व त्या वाहनावरून भाकित करावयाचें.

( २ ) सूर्यनक्षत्र व त्याच वेळचें दिवसनक्षत्र हीं पुरुषसंज्ञक, स्त्रीसंज्ञक अथवा नपुंसकसंज्ञक आहेत हें काढावयाचें, व या दोन संज्ञांनीं भाकित करावयाचें.

( ३ ) सूर्यनक्षत्र व त्याच वेळचें दिवसनक्षत्र हीं चंद्राचीं किंवा सूर्याचीं नक्षत्रें आहेत हें काढावयाचें, व या दोन नक्षत्रांवरून भाकित करावयाचें.

पहिल्या ठोकताळ्याची रीति अशी आहे कीं, सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापर्यंत नक्षत्रें मोजून त्या आकड्यास ९ नीं भागावें, बाकी राहील ती ( ० ) असल्यास हत्ती, ( १ ) अश्व; ( २ ) जंबूक, ( ३ ) मंडूक, ( ४ ) मेष, ( ५ ) मयूर, ( ६ ) मूषक, ( ७ ) महिषी, व ( ८ ) असल्यास गर्दभ, याप्रमाणें वाहनें जाणावीं.

पहिल्या ठोकताळ्याचें भाकित—मंडूक, महिषी व हत्ती हीं वाहनें सुवृष्टिसूचक आहेत; मयूर, मूषक व गर्दभ हीं वाहनें अल्पवृष्टिसूचक आहेत, जंबूक व मेष हीं वाहनें शून्यवृष्टिसूचक आहेत; व अश्व हें वाहन पर्वतावर होणाऱ्या वृष्टीचें सूचक आहे असें जाणावें.

दुसऱ्या व तिसऱ्या ठोकताळ्याच्या संज्ञेचीं नावें बसविलेलीं आहेत, तीं खालीं क्रमवारीनें नक्षत्रांचीं नावें देऊन संज्ञेचीं नावें त्यापुढे कौंसात संक्षेपरूपानें दिलीं आहेत.

१ अश्विनी ( पु. च. ); २ भरणी ( पु. च. ); ३ कृत्तिका ( पु. च. ); ४ रोहिणी ( पु. सू. ); ५ मृगशीर्ष ( पु. सू. ), ६ आर्द्रा ( स्त्री. च ); ७ पुनर्वसु ( स्त्री. चं. ); ८ पुष्य ( स्त्री. चं. ); ९ आश्लेषा ( स्त्री. चं. ); १० मघा ( स्त्री. च. ); ११ पूर्वा ( स्त्री. सू. ); १२ उत्तरा ( स्त्री. सू. ); १३ हस्त ( स्त्री. सू. ), १४ चित्रा ( स्त्री, सू. ), १५ स्वाती ( स्त्री. सू. ); १६ विशाखा ( न. सू. ); १७ अनुराधा ( न. सू. ); १८ ज्येष्ठा ( न. सू. ), १९ मूळ ( पु. सू. ); २० पूर्वाषाढा ( पु. चं. ); २१ उत्तराषाढा ( पु. च. ); २२ श्रवण ( पु. च. ); २३ धनिष्ठा ( पु. सू. ), २४ शततारका ( पु. सू. ); २५ पूर्वाभाद्रपदा ( पु. च. ), २६ उत्तराभाद्रपदा ( पु. सू. ); २७ रेवती ( पु. च ).

दुसरे ठोकळ्यातील नक्षत्रें जर स्त्री व पुरुषसंज्ञक असलीं तर सुवृष्टि होईल. बाकी योग अवृष्टीनें समजावे.

तिसरे ठोकताळ्याचीं नक्षत्रें दोन हीं सूर्याचीं असलीं म्हणजे अवृष्टि समजावी; दोनही चंद्राचीं असलीं म्हणजे दुर्दिन, म्हणजे मेघ येतील परंतु वृष्टी होणार नाहीं असें समजावें. एक चंद्राचें व एक सूर्याचें असें असले तर सुवृष्टि होईल असें समजावें.

या तीनही ठोकताळ्यांनीं भाकित करण्याचीं साधनें पर्जन्यनक्षत्रानें पुढें दिलेलीं असतात. परंतु भाकित करण्याचें व तें जमेल किंवा नाहीं हें पाहण्याचें काम लोकांवर सोपविलें असतें. हीं नक्षत्रें पंचांगात कशीं मांडतात याचें एक उदाहरण खालीं दिलें आहे.

मृगेऽर्कः २०/२८ वा. मूषक. पु. न. सू. सू.—याचा अर्थ असा आहे कीं, सूर्योदयानंतर २० घटिका २८ पळांनी सूर्य मृगनक्षत्रीं जातो, नक्षत्राचें वाहन मूषक आहे, सूर्यनक्षत्र पुरुषसंज्ञक, चंद्रनक्षत्र नपुंसकसंज्ञक, सूर्यनक्षत्र सूर्याचें नक्षत्र, व चंद्रनक्षत्र हें सूर्याचें नक्षत्र आहे असें समजावें.

सूर्य जेव्हा कोणत्याही राशींत अथवा नक्षत्रात जातो, तेव्हापासून तो पुढल्या राशींत अथवा पुढल्या

नक्षत्रात जाईपर्यंत तो त्या राशीस अथवा त्या नक्षत्रात आहे असें मानतात. ही पद्धत सर्व ग्रहास व चंद्रासही लागू आहे, याच पद्धतीने ग्रहाची कुंडली भरतात.

**संक्रांति प्रवेश व सूर्यनक्षत्र प्रवेश कालीन लग्न कुंडलीवरून ही पर्जन्य योगाचें भविष्य वर्तविण्यांत येते.**

(२५) **सायन सूर्यराशी.**—सायन सूर्यराशींनीं ऋतूंचा निर्णय होतो, म्हणून ऋतुनिर्णय निरयन सूर्य राशींनीं न करिता सायन सूर्यराशींनीच केला जातो, तो असा—मीन राशीस वसंतऋतूचा आरंभ, वृषभ राशीस ग्रीष्मऋतूचा आरंभ, कर्क राशीस वर्षाऋतूचा व दक्षिणायनाचा आरंभ, कन्या राशीस शरदृतूचा आरंभ, वृश्चिक राशीस हेमंतऋतूचा आरंभ व मकर राशीस शिशिरऋतूचा व उत्तरायणाचा आरंभ, याप्रमाणे ऋतूंचे आरंभ दिलेले असतात.

**अन्यधर्मी लोकांच्या महिन्यांचीं नांवें.**—पारसी, मुसलमानी व इंग्रजी या प्रत्येकाचे पहिले तारखेसमोर त्याचे महिन्याचे नाव व वर्षारंभापासूनचा कितवा महिना याचा आकडा हीं कौंसात दिलीं असतात. ही माहिती कित्येक पंचांगात दिलेली नसते. त्यात फक्त इंग्रजी व पारशी तारखा असतात.

( २६ ) **ग्रहदर्शनें व ग्रहअदर्शनें.**—ग्रहदर्शनारंभ म्हणजे अस्त झालेला ग्रह सूर्य क्षितिजाखालीं असताना पहिल्याने नुसत्या डोळ्यानीं कोणच्या दिवशीं दिसतो तो दिवस, व ग्रहअदर्शनारंभ म्हणजे सूर्य क्षितिजाखालीं असताना पूर्वी दिसत असलेला ग्रह पहिल्यानें नुसत्या डोळ्यानीं कोणच्या दिवशीं दिसत नाहींसा होतो तो दिवस. ग्रह क्षितिजावर व सूर्य क्षितिजाखालीं असूनही सूर्यसानिध्यामुळे त्याचे तेजाने ग्रह दिसत नाहीं; तरी तो दिसूं लागण्यास ग्रह व सूर्य याचे मध्यें किती अंतर असलें पाहिजे हें आमचे ज्योतिष्यानीं अनुभव घेऊन काढलेलें आहे. शुक्र, गुरु, बुध, शनि व मंगळ, हे ग्रह अनुक्रमाने कमी कमी तेजाचे आहेत, म्हणून त्याचें अंतर ज्यास्त ज्यास्त असलें पाहिजे. तीं अंतरें अनुक्रमानें ७, ११, १३, १५, व १७ अंश अशीं काढलेलीं आहेत. अथवा २८, ४४, ५२, ६०, व ६८ मिनिटें अशी वेळा अंतरें घेतलीं आहेत. या अनुरोधानें आरंभदिवसाचा निर्णय करून हीं ग्रहदर्शनें व ग्रहअदर्शनें दिलीं असतात. दृक्प्रत्ययाच्या गोष्टी या सदराखालींच ह्या गोष्टी येतात. **उदयास्ताचीं अंतरें निरनिराळ्या ग्रंथांत भिन्न भिन्न आहेत. हे अंश भोगांश किंवा विषुवांश यापैकीं कोणते तरी घेतात.**

कोणत्याही गोलाचा उदय अथवा अस्त दिसणे अथवा न दिसणें याचा संबंध क्षितिजाशीं आहे म्हणून त्याचा निर्णय जितका खात्रीचा आहे तितका निर्णय ग्रहदर्शनाचा अगर ग्रहअदर्शनाचा नाहीं. कारण खरेखोटेपणा दृष्टीने ताडावयाचा असतो. आणि दृष्टी ही सर्वांची सारखी नसते. वातावरणातील फेरफारानेंहें दिसण्यात फरक पडतो. वरील अंतराबद्दलही मतभेद आहे. तशात अभ्रानें आकाश वेष्टिलेलें असलें म्हणजे मग प्रत्यय घेण्यासही मार्ग नाहीं, अशा अनेक कारणानीं वरील दृग्गोचरतेंत कधीं कधीं सर्व ठीक असलें तरी १।२ दिवसांच्याही अंतर पडण्याचा संभव आहे. यात पंचांगाचा दोष नव्हे, तर स्य दृग्गोचरपणाच्या स्थितीचा आहे. अशा वेळेस एखादे धर्मकृत्याकरिता जर एकाद्या दर्शनाची अथवा अदर्शनाची जरूरी लागली, तर ती लागण्यापूर्वी बरेच दिवस पंचांगातील निर्णय गणिताची खात्री करून घेऊन जो दिवस असेल तो घ्यावा. यद्दुतेक पंचांगात हीं दर्शनें व अदर्शनें ज्या दिवशीं होतात असें गणितानें येते. त्या दिवशींची वेळ ही घटिका व पळानीं देतात. परंतु वस्तुतः त्याची जरूरी नाहीं.

**अगस्तीदर्शन व अदर्शन.**—याच्या प्रारंभाचा निर्णय महाप्रमाणेंच ग्रहलाघवोक्त रीतीने ग्रहलाघव पंचांगात करतात. व शुद्धपंचांगात शुद्धगणित रीतीनें करण्यात येतो.

(२७) **ग्रहराशि.**—मंगळ, बुध, गुरु, शुक्र, आणि शनि, हे ग्रह अश्विनीमेषतान्यापासून तीस तीस अंश अंतरावर कोणच्या वेळीं जातात हें समजण्याकरिता सूर्याप्रमाणेंच त्याच्याही राशि दिल्या असतात. कधीं कधीं याची गति पृथ्वीच्या गतीपेक्षा कमी झाली म्हणजे ते मागें हटत आहेत असें दिसतें. अशा मागें हटण्याचे सुरवातीचा काळही पंचांगात देण्याची चाल आहे त्याप्रमाणें देतात आहे. या मागें हटण्याचे गतीस "वक्री" असें म्हणतात. व वक्री झालेला ग्रह थोडेच दिवसानीं पुढें जाणाऱ्या गतीचा होतो, यापुढें जाणाऱ्या गतीस "मार्गी" असें म्हणतात. मार्गी होण्याचा दिवसही देण्यात येतो.

त्या देऊन त्यांचीं ठराविक जीं फळ आहेत ती देतात शेवटीं संक्रातींत काय काय गोष्टी वर्ज्य कराव्या, दानधर्म कसा करावा, श्रवण काय करावें, व त्यांचीं फळे काय आहेत, हे देतात

(३९) **जन्मनक्षत्रावरून संक्रांतीचीं फळें** हें कोष्टक प्रत्येक वर्षांत नवें देतात मकरसंक्रातीचे मागले दिवसाचे दिवसनक्षत्रापासून तीन नक्षत्रें "पथा" या सदरात येतात, त्यापुढील सहा नक्षत्रे "भोग" या सदरात येतात, त्यापुढील तीन नक्षत्रें "व्यथा" ह्या सदरात देतात, त्या पुढील सहा नक्षत्र "वस्त्र" सदरात देतात, यापुढील तीन नक्षत्र "हानि" या सदरात देतात, व त्या पुढील सहा नक्षत्रें "विपुल धन" या सदरात देतात

(४०) **दिवस व रात्र यांतील वेळाचे वारपरत्वें मुहूर्त** —याचीं दोन कोष्टकं दिला आहेत त्याचा उपयोग कसा करावयाचा हें तीं कोष्टकें पाहाताक्षणींच समजण्यासारखं आहे दिवसाच्या तीस घटिकांचे आठ भाग व रात्रीच्या तीस घटिकांचे आठ भाग करून प्रत्येक वारापुढ वेळाचे मुहूर्त दिले असतात पण यात दिनमानाचें ८ व रात्रिमानाचें ८ समसमान भाग करावयाचे हे ध्यानात ठेवाव

(४१) **घबाडमुहूर्त** यावर पुष्कळ लाकाचा विश्वास असतो,व त्या मुहूर्तावर एकादे वेळेस गोष्ट होते ती इतकी फलद्रप होते का, त्याचा अचंबा वाटतो, म्हणून तो कसा काढावयाचा याची रीति पूर्वी दिली आहे

(४२) **राशीवरून शुभाशुभफल पाहावयाचें कोष्टक** हें कोष्टक पाहाण्याची अशी रीति आहे की, ज्या वेळेच फल आपल्यास पाहणें असेल त्या वळेस ग्रह कोणच्या राशींत आहेत हें पहिल्याने पचागाचे आधाराने काढावें, नतर ज्याला ग्रहफलें पाहावयाचीं असतील त्याचे न मराशीपासून प्रत्येक ग्रहाचे राशीपर्यंत मोजावे, व त्या प्रत्येक आकड्याने राशीसदरात प्रत्येक ग्रहाचें फल पहावें

(४३) **नवग्रहाचीं दानें व जपसंख्या** —याबद्दल अधिक काहीं लिहिण्यासारखं नाहीं याची कोष्टकें पाहताच सर्व काहीं समजणार आहे

(४४) **चद्र व सूर्यग्रहणें** —हीं पूर्णपण अर्थ समजण्यासारख्या भाषेंत देतात, तथापि काही शब्द समजण्यासारखे नसतात तेवढे देतों—स्पर्शकाल म्हणजे, जेव्हा पृथ्वीची छाया चद्रावर पहिल्यानें दिसू लागते तो काळ किंवा चद्राची छाया सूर्यबिंबावर पहिल्यानें दिसते तो काळ सम्मीलन काळ म्हणजे, पृथ्वीच्या छायेंत जेव्हा पूर्ण चद्र येतो तो काळ उन्मीलन काळ म्हणजे पृथ्वीचे छायेंतून जेव्हा चद्र पहिल्याने बाहेर पडतो असा दिसतो तो काळ मोक्षकाळ म्हणजे, जेव्हा चद्र अथवा सूर्य ग्रहणापासून मुक्त होतो तो काळ मध्यकाळ म्हणजे, चद्र अगर सूर्य ग्रहणाचा मध्य काळ पर्वकाल म्हणजे, स्पर्शकाळापासून मोक्षकाळापर्यंतचा अवधि चद्रबिंबव्यास हा कला विकलामध्यें देतात ग्रास म्हणजे, आकाश वेष्टिलेला भाग, व ग्रास म्हणजे, चद्रबिंब व आकाश वेष्टिलेला भाग, हाही कला व विकला मध्यें देतात

## एकादशीसंबधीं निर्णय.

( १ ) कोणत्याही महिन्यातील एकादशीचा निर्णय करण्याचे वचन येणेंप्रमाणें —

**एकादशी द्विधाज्ञेया यदा नदार्कयो ''क्षय'।**
**धर्कवृद्धी रसेर्पुभ्यो घटिकाभ्योऽधिकाक्वुप्॥**

अर्थ —( १।२ ) एकादशी अगर द्वादशी या तिथीचा क्षय असता ( ३ ) द्वादशी तिथीची वृद्धि असता ( ४ ) अगर दशमी ५६ घटिकांपेक्षा जास्त असता असा चार कारणामुळ दोन एकादशा होतात दशमी ५६ घटिकांपेक्षा जास्त असून एकादशीची वृद्धि असेल अशावेळी एकादशी एकच समजावी

भागवत एकादशी म्हणजे दुसरी एकादशी ही नेहमी द्वादशीलाच यावयाची असा नियम आहे कारण वचन असं आहे का, "**उपोष्या द्वादशी शुद्धा त्रयोदश्यांतु पारण**" द्वादशीस उपोषण व त्रयोदशीस पारणा व्हावयाची नीरीक्षण ५४ घटिका दशमी असता दोन एकादशा मानतात

ज्यावेळीं वरील नियमाप्रमाणे दोन एकादशा येतात त्यावेळीं पहिल्या एकादशीस स्मार्त एकादशी व दुसऱ्या एकादशीस भागवत एकादशी असे म्हणतात

## ज्येष्ठ व आषाढ मासांतील शास्त्रार्थ संग्रह.

| ज्येष्ठ शुक्लपक्ष | तिथि | ज्येष्ठ कृष्णपक्ष |
|---|---|---|
| दशहराप्रारंभः करिदिनं | १ | |
| चंद्रदर्शनं भानुपद्कनिवृत्तिः | २ | |
| | ३ | |
| विनायकी ४ मध्यान्हव्यापिनी | ४ | संकष्ट ४ चंद्रोदयव्यापिनी |
| | ५ | |
| महाराणी लक्ष्मीबाई ( झाशी ) नि. दि. | ६ | श्रीबाळाजी बाजीराव पेशवे नि. दि. |
| | ७ | |
| दुर्गा ८ मध्यान्व्यापिनी | ८ | काला ८ प्रदोषव्यापिनी |
| | ९ | |
| दशहरासमाप्तिः | १० | |
| निर्जला ११ | ११ | योगिनी ११ |
| | १२ | |
| प्रदोषः सावित्रीव्रतारंभः श्रीशिवराज्याभिषेकः | १३ | प्रदोषः |
| | १४ | शिवरात्रिः |
| मन्वादि पूर्वाण्हे वट १५ | १५–३० | दर्शः ३० |

| आषाढ शुक्लपक्ष | तिथि | आषाढ कृष्णपक्ष |
|---|---|---|
| श्री वासुदेवानंद सरस्वति पु. ति. | १ | लोकमान्य टिळक पुण्यतिथि, श्रीबाजीप्रभु नि.दि. |
| चंद्रदर्शनं | २ | |
| | ३ | |
| विना ४ मध्यान्हव्यापिनी | ४ | संकष्ट ४ चंद्रोदयव्यापिनी |
| | ५ | |
| | ६ | लोकमान्य टिळक जयंती |
| | ७ | |
| दुर्गा ८ मध्यान्हव्यापिनी | ८ | काला ८ प्रदोषव्यापिनी कौस्तुभे बहुग्रंथेषु तु + |
| | ९ | +सूर्यास्तात्प्राक् त्रिमुहूर्तव्यापिनी पूर्वविद्धानेतरा |
| मन्वादि पूर्वाण्हे, गोपद्मव्रतारंभः | १० | |
| शयनी ११ चातुर्मास्यारंभः पंढरपूरची यात्रा | ११ | कामिका ११ |
| हरिवासरः | १२ | |
| प्रदोषः श्रीकल्याणस्वामी पु. ति. डोमगाव | १३ | प्रदोषः |
| | १४ | शिवरात्रिः |
| मन्वादि पूर्वाण्हे. व्यासपूजा. त्रिमुहूर्तव्यापिनीमाह्या | १५–३० | दीपपूजा, दर्शः ३० |

" **सोमवती सा अपराण्ह पर्यंतयोगः अग्रे न** " म्हणजे सोमवती अमावास्या अपराण्हा नंतर सुरू होत असेल तर घेऊ नये, तोपर्यंतची घ्यावी असें एकवचन आहे. पण सूर्यास्तापर्यंतची घ्यावी असे कित्येक सांगतात, व त्याप्रमाणें पंचांगांत दिलेली असते.

# आश्विन व कार्तिक मासांतील शास्त्रार्थसंग्रह.

| आश्विन शुक्लपक्ष | तिथि | आश्विन कृष्णपक्ष |
|---|---|---|
| मातामहश्राद्ध, घटस्थापन नवरात्रारंभ | १ | |
| चंद्रदर्शन | २ | |
| | ३ | |
| विना ४ मध्यान्हव्यापिनी | ४ | सकष्ट ४ चंद्रोदयव्यापिनी |
| ललिता ५ अपराण्हव्यापिनी केवलधर्मसिंधौ * | ५ | |
| **सरस्वत्यावाहनं** *बहु समतस्तु मध्यान्हकाल | ६ | |
| सरस्वतीपूजन निर्णय पहा × व्यापिनी | ७ | |
| दुर्गा ८ मध्यान्हव्यापिनी महालक्ष्मी ८ निशीथ × | ८ | काला ८ प्रदोषव्यापिनी |
| मन्वादि पूर्वाण्हव्यापिनी | ९ | |
| विजया १० अपराण्हव्यापिनी. बौद्ध जयती + | १० | |
| पाशांकुशा ११ | ११ | रमा ११ |
| + सायान्हव्यापिनी | १२ | गोवत्स १२ प्रदोषव्यापिनी गुरुद्वादशी |
| प्रदोष | १३ | धन १३ यमदीपदान प्रदोषव्यापिनी प्रदोष |
| † व्यापिनी कार्तिकस्नानारंभ | १४ | नरक १४ चंद्रोदयव्यापिनी शिवरात्रि |
| आग्रयणनवान्न १५ कोजागरी १५ निशिथ † | १५–३० | अभ्यंगस्नान दर्श ३० लक्ष्मीपूजन,प्रदोषव्यापिनी |

| कार्तिक शुक्लपक्ष | तिथि | कार्तिक कृष्णपक्ष |
|---|---|---|
| बलि १ गोक्रीडन, सवत्, गोवर्धनपूजा | १ | |
| यम २ भाऊ २ सामध्यान्हव्यापिनी सायंकाल † | २ | |
| † व्यापिनी वा चंद्रदर्शन | ३ | |
| विना ४ मध्यान्हव्यापिनी | ४ | सकष्ट ४ चंद्रोदयव्यापिनी |
| * वाक्यात्, गोपाष्टमी | ५ | |
| + पूर्वाण्हे कार्तिकस्वामीदर्शन | ६ | पंडित जवाहिरलाल नेहरूजन्मदिन |
| कल्पादि पूर्वाण्हव्यापिनी | ७ | |
| दुर्गा ८ मध्यान्हव्यापिनी दिनद्वयचेत्युग्म * | ८ | काला ८ प्रदोषव्यापिनी कालभैरवजयती |
| कृतयुगादि पूर्वाण्हव्यापिनी वा त्रिमुहूर्तव्यापिनी× | ९ | |
| × परान्यूना पूर्वा कृष्मांड ९ | १० | |
| प्रबोधिनी ११ भीष्म पंचक | ११ | उत्पत्ति ११ आळंदीची यात्रा |
| मन्वादि पूर्वाण्हव्यापिनी तुलसीविवाह चातुर्मास † | १२ | |
| प्रदोष † समाप्ति हरिवासरे | १३ | प्रदोष श्रीज्ञानेश्वर महाराज पु ति |
| वैकुंठ १४ | १४ | शिवरात्रि |
| त्रिपुरी १५ कार्तिकस्नानसमाप्ति मन्वादि + | १५–३० | दर्श ३० (तूळसंक्रान्त्यदिने महालयसमाप्ति) |

ज्येष्ठा नक्षत्र युक्तषष्ठीस सरस्वत्यावाहन, मूळयुक्त सप्तमीस सरस्वती स्थापन, पूर्वाषाढा युक्त अष्टमीस पूजन, होम, उपोषण, उत्तराषाढायुक्त नवमीस बलिदान व श्रवणयुक्त दशमीस विसर्जन याप्रमाण करावं (निर्णयसिंधु १८८) त्या त्या तिथींस ते नक्षत्र नसता केवळ तिथि प्राधान्ययुक्त निर्णय करावा.

## मार्गशीर्ष व पौष मासांतील शास्त्रार्थसंग्रह.

| मार्गशीर्ष शुक्लपक्ष | तिथि | मार्गशीर्ष कृष्णपक्ष |
|---|---|---|
| देव दीपावली | १ | |
| चन्द्रदर्शन | २ | |
| | ३ | |
| विनायकी ४ मध्यान्हव्यापिनी | ४ | संकष्ट ४ चंद्रोदयव्यापिनी |
| लाला लजपतराय नि. दि | ५ | |
| चंपा ६ त्रिमुहूर्तव्यापिनी | ६ | श्री मोरया गोसावी पु ति चिंचवड. |
| | ७ | |
| दुर्गा ८ मध्यान्हव्यापिनी | ८ | काला ८ प्रदोषव्यापिनी |
| | ९ | |
| | १० | श्री गादवल्लेश्वर महाराज पु ति |
| मोक्षदा ११ गीताजयंती | ११ | सफला ११ |
| | १२ | |
| प्रदोष | १३ | प्रदोष |
| | १४ | शिवरात्रि |
| दत्तजयंती प्रदोषव्यापिनी | १५–३० | दर्श ३० |

| पौष शुक्लपक्ष | तिथि | पौष कृष्णपक्ष |
|---|---|---|
| शाकंबरी नवरात्रारंभ | १ | |
| चन्द्रदर्शन | २ | |
| | ३ | |
| विनायकी ४ मध्यान्हव्यापिनी | ४ | संकष्ट ४ चंद्रोदयव्यापिनी |
| | ५ | |
| | ६ | |
| | ७ | |
| दुर्गा ८ मध्यान्हव्यापिनी. श्रीसदाशिवराव व* * विश्वासराव पेशवे नि दि | ८ | काला ८ प्रदोषव्यापिनी |
| | ९ | |
| | १० | |
| पुत्रदा ११ मन्वादि पूर्वाण्हव्यापिनी | ११ | षट्तिला ११ |
| | १२ | |
| प्रदोष | १३ | प्रदोष |
| | १४ | शिवरात्रि |
| माघस्नानारंभ श्रीनृसिंहसरस्वती पु ति | १५–३० | दर्श ३० अर्धोदय महोदय सभने विचार्य |

चैत्रापासून बाराही महिन्यांचे शास्त्रार्थ थोडक्या रीतीने दिले आहेत यांतील विशेष महत्वाच्या शास्त्रार्थांचा विस्तार पुढे करण्यात येईल पण सामान्यतः शास्त्रार्थांची दिशा थोडक्यात कळावी म्हणून त्या त्या तिथीपुढे संक्षिप्त निर्णय दिला आहे.

## माघ व फाल्गुन मासांतील शास्त्रार्थसंग्रह.

| माघ शुक्लपक्ष | तिथि | माघ कृष्णपक्ष |
|---|---|---|
| दशहराप्रारंभः | १ | श्री गुरु दत्तात्रय महाराज पु. ति. गाणगापूर |
| चंद्रदर्शनम् | २ | |
| | ३ | |
| विनायकी ४ मध्यान्हव्यापिनी | ४ | संकष्ट ४ चंद्रोदय व्यापिनी |
| वसंत ५ पूर्वाण्ह व्यापिनी | ५ | |
| श्रीपद्मनाभाचार्य पु. ति. | ६ | |
| रथ ७ अरुणोदयव्यापिनी मन्वादि पूर्वाण्ह व्यापिनी | ७ | |
| दुर्गा ८ मध्यान्ह व्यापिनी भीष्मा ८ मध्यान्ह व्यापिनी | ८ | काला ८ प्रदोष व्यापिनी |
| श्रीमध्वाचार्य पु. ति. | ९ | रामदास ९ तानाजी नि. दि. |
| दशहरा समाप्तिः | १० | |
| जया ११ श्री अण्णासाहेब पटवर्धन पु. ति. | ११ | विजया ११ |
| तिथि वासरः | १२ | |
| प्रदोषः श्री बापू गोखले नि. दि. | १३ | प्रदोषः |
| | १४ | महाशिवरात्रिः |
| माघस्नान समाप्तिः | १५–३० | दर्शः ३० द्वापारयुगादि अपराण्ह व्यापिनी |

| फाल्गुन शुक्लपक्ष | तिथि | फाल्गुन कृष्णपक्ष |
|---|---|---|
| | १ | वरिदिनं. धूलीवंदनं. आम्रकुसुमप्राशनं अभ्यंग+ |
| चंद्रदर्शनं | २ | + श्रीतुकाराम महाराज पु. ति. नाना फ. पु. |
| | ३ | कल्यादि अपराण्हव्यापिनी श्री छत्रपति शिवाजी० |
| विनायकी ४ मध्यान्ह व्यापिनी | ४ | संकष्ट ४ चंद्रोदय व्यापिनी. |
| | ५ | रंग ५ ० महाराज जन्मदिन |
| | ६ | एकनाथ महाराज पु. ति. |
| | ७ | |
| दुर्गा ८ मध्यान्ह व्यापिनी | ८ | काला ८ प्रदोष व्यापिनी |
| | ९ | संभाजी महाराज पु. ति. |
| | १० | |
| आमलकी ११ | ११ | पापमोचनी ११ |
| | १२ | तिथि वासरः |
| प्रदोषः | १३ | प्रदोषः वारुण्यादियोगः |
| | १४ | शिवरात्रिः |
| हुताशनी १५ मन्वादि पूर्वाण्ह व्यापिनी | १५–३० | दर्शः ३० मन्वादि अपराण्ह व्यापिनी. [illegible] |

एकादशीचा निर्णय १०–११–१२ या तिथींच्या परिस्थितीवरून होतो व त्यानंतर दोन एकादशा येण्याचा संभव असतो. पहिली एकादशी स्मार्त व दुसरी भागवत असा भेद आहे. याचा विस्तृत निर्णय पृष्ठ १३८ वर दिला आहे.

# जन्मटिपण आणि जन्मकुंडली.

ज्याच्यावरून सबध जन्माचें भविष्य वर्तवावयाचें ती गोष्ट म्हणजे जन्मलग्नकुंडली ही होय. जन्मलग्नकुंडली तयार करावयाचें मुख्य साधन म्हणजे नक्की जन्मकाल. कोणत्या दिवशीं व कोणत्या वेळीं जन्म झाला असता कोणतें जन्मलग्न येतें हें गणितानेंच ठरवावें लागतें. जन्मलग्न म्हणजे जन्माच्या वेळीं पूर्वक्षितिजावर उदय झालेला राशि होय.

जन्मटिपण आणि जन्मकुंडली तयार करावयाची असता प्रथम सूर्योदयापासून जन्मवेळेपर्यंत किती काल गेला हें पाहावें लागतें. यासच इष्टकाल असें म्हणतात. हा इष्टकाल काढून त्यावेळीं स्पष्टलग्नसाधन पद्धतीनें कोणतें लग्न येतें हें पाहावयाचें. जन्मटिपणांत प्रथमत जन्मदिवशींचा शक, त्या शकाचें नाव, सवत् व त्याचें नाव, अयन, ऋतु, मास, पक्ष, तिथि व तिथीची घटिका, पळें, नक्षत्र व त्याचीं घटिकापळें, योग व त्याची घटिकापळें, आणि करण व त्याच्या घटिका किंवा घटिकापळें इतकी पचागात असलेली माहिती देण्यात येते. त्यानतर सूर्योदयापासून जन्मवेळेपर्यंतचा काल घटीपलात्मक देतात. आणि ह्या कालावरूनच जन्मनक्षत्र, त्याचा चरण, नक्षत्रनाम, राशि, गण, नाडी, घातचक्र, ज्या नक्षत्रावर जन्म झाला तें सुरवातीपासून अखेरपर्यंत किती घटिकापळें आहे, जन्मकालीं भुक्त किती झालें व भोग्य किती राहिलें याप्रमाणें माहिती दिलेली असते त्याच्याखालीं दोन कुडल्या दिलेल्या असतात, त्यांपैकीं एक जन्मलग्नकुडली व दुसरी राशि कुडली. जन्मलग्नकुडलींत प्रथमस्थानीं, इष्टकालीं मेषादि बारा राशींपैकीं जो राशी पूर्वक्षितिजावर उदित असेल त्याचा दर्शक असा आकडा माडून पुढें अनुक्रमानें सर्व राशींचे अक माडतात. व त्यात जन्मदिवशीं ज्या राशींत जो ग्रह असेल तो लिहितात व याप्रमाणें लग्नकुडली तयार करतात. राशिकुडलींत जन्मकालीं चद्र ज्या राशींत असेल त्या राशीचा दर्शक आंकडा प्रथमस्थानीं लिहितात, आणि बाकीचे अक अनुक्रमानें भरून त्या त्या राशींत ग्रह माडतात. याप्रमाणें जन्मटिपण व कुडली तयार करतात.

जन्मटिपण व कुडली तयार करताना पहिली महत्त्वाची गोष्ट काढणें जरूर असते ती गोष्ट म्हणजे इष्टस्थळाची सूर्योदयाची वेळ ही होय पचागात छापलेली सूर्योदयाची व सूर्यास्ताची वेळ ही खुद्द मुबई येथील असते. हिंदुस्थानात कोणत्याही ठिकाणीं जन्म झाल्यास पचागात दिलेला सूर्योदय घेऊन चालणार नाहीं. ज्या गावीं जन्म झाला त्या गावचाच सूर्योदय,सूर्यास्तकाल काढला पाहिजे तरच जन्मटिपण बरोबर होईल. सूर्योदयाप्रमाणें स्पष्टलग्नाचा प्रकारही तसाच आहे. तें प्रत्येक स्थळाला निरनिराळें येतें व गणितानें काढावें लागतें. हे सर्व प्रकार आम्ही अनुक्रमानें सागणार आहों पण तत्पूर्वी जन्मटिपणाची समजूत पडण्याकरिता काहीं जन्मटिपणें प्रथम देऊ.

## जन्मटिपणांतील माहिती व टिपणें.

॥ श्रीगजाननः प्रसन्नोऽस्तु ॥

*॥ श्रीगणेशाय नम ॥ श्रीसरस्वत्यै नम ॥ श्री गुरुभ्यो नम ॥ श्रीइष्टदेवताभ्यो नम ॥ श्रीकुल* देवताभ्यो नम ॥ श्रीआदित्यादिनवग्रहदेवताभ्यो नम ॥ एकदन्तो महाबुद्धि सर्वज्ञो गणनायक ॥ सर्वसिद्धिप्रदो देवो गौरीपुत्रो विनायक ॥ ब्रह्मा करोतु दीर्घायुर्विष्णु कुर्याच्च सपदम् । हरो रक्षतु गात्राणि यस्यैषा जन्मपत्रिका ॥ गणाधिपो ग्रहाश्चैव गोत्रजा मातरो ग्रहा । सर्वे कल्याणमिच्छन्तु यस्यैषा जन्मपत्रिका ॥ ग्रहा राज्य प्रयच्छन्ति ग्रहा राज्य हरन्ति च । ग्रहैर्व्याप्तमिद सर्वं त्रैलोक्य स चराचरम् ॥ उमा गौरी शिवा दुर्गा भद्रा भगवती तथा । कुलदेव्यथ चामुण्डा सदा रक्षन्तु बालक ॥ न मया विवृत यत्र न मया स्थापिता घटी । परोपदिष्टवेलाया लिख्यते जन्मपत्रिका ॥ कल्याणानि दिवामणि सुललिता कान्ति कलाना निधिर्लक्ष्मीं क्ष्मातनयो बुधश्च बुधता जीवश्चिरजीविताम् । साम्राज्य भृगुजोऽर्कजो विजयता राहुर्बलोत्कर्षता केतुर्यच्छतु तस्य

वाञ्छितमियं पत्री यदीयोत्तमा ॥ स जयति सिंधुरवदनो देवो यत्पादपंकजस्मरणम् । वासरमणिरिव तमसां राशिं नाशयति विघ्नानाम् ॥ अथ श्रीविक्रमार्कसमयातीतसंवत् १९८७ स्वस्ति श्रीतिलकशके ११ तथा श्रीमन्नृपशालिवाहनशके १८५३ प्रजापतिनामसंवत्सरे उदगयने वसंतऋतौ चैत्रेमासे कृष्णपक्षे पंचम्यां तिथौ भौमवासरे घट्यः १६ पलानि ५१ परं ६, ज्येष्ठानक्षत्रे घ. २७ प. १९ परं मूळ, वरीयान् योगे घ. ३६ प. २४ अनंतरं परिघयोगे तैतिल करणे घ. १७ परं गरकरणें एवं पंचागशुद्धौ अस्मिन् दिने श्रीमन्मार्तंडमंडलोदयात् गतघट्यः ( घटी ) ० पलानि ( पळें ) २५ अस्मिन्समये———कुलोत्पन्नानां——— तनुजनुषा श्रीमता———शर्मणा भार्या सौभाग्यवती———नाम्नी पुत्ररत्नं प्रासूत ॥ असौ देवद्विजप्रसादाद्दीर्घायुर्भूयात् ॥ अस्य पुत्ररत्नस्य ज्येष्ठा नक्षत्रस्य ( सर्वर्क्ष घ. ५९ प. ४ भुक्तर्क्ष घ. ३२ प० १० ) तृतीय चरणे जातत्वात् वृश्चिक राशिः, राशिस्वामी भौमः, विप्र वर्णः, राक्षस गणः, मृग योनिः, आद्य नाडी. नाक्षत्रनाम्नः आद्याक्षरं यी इति ॥

## ॥ मंगलमाहेश्वरी शुभं भवतु ॥

॥ अथ शुभाशुभफलज्ञानार्थे जन्मलग्नचक्रादि लिख्यते ॥

॥ जन्मलग्नकुंडली ॥

॥ जन्मराशिकुंडली ॥

अथास्य घातचक्रं लिख्यते ॥ आश्विन मासः १।६।११ तिथयः, भृगुवारारः, रेवती नक्षत्रम्, १ प्रहरः, ७ चंद्रः, दशमरविः एकादशभौमः अष्टमबुधः द्वादशगुरुः प्रथमभृगुः नवमशनिः द्वितीयराहुः चतुर्थकेतुः इतिघातचक्रम् ॥ पूर्वक्षितिजस्थोदितजन्मलग्नांतर्गत अश्विनीनक्षत्रस्य प्रथम चरणः ॥ सूक्ष्मगणितागतस्पष्ट ( जन्म ) लग्नांशादयः ० राशिः १ अंशाः ५ कलाः २० विकलाः, ३९२० वि. स्पष्टरविः ११ राशिः २७ अंशाः ३० कलाः———वि. जन्मकालः—मंगळवार तारीख ७ माहे एप्रील सन १९३१ उजाडता वार———उजाडती तारीख ——— जन्म वेळः—सकाळीं, सहा वाजून ३५ मिनिटें स्टँडर्ड वेळे ( टाईम ) प्रमाणें जन्मस्थळ—पुणें. अक्षांश १८ रेखांश ७२ ह्या टिपणाचें गणित व तिथ्यादिकाळ शुद्ध पंचांगाप्रमाणें आहेत.

वंशो विस्तारतां यातु वृद्धिं यातु महद्यशः ।
आयुर्विपुलतां यातु यस्यैषा जन्मपत्रिका ॥
आदित्याद्या ग्रहाः सर्वे सनक्षत्राः सराशयः ।
शुभं कुर्वन्तु ते सर्वे यस्यैषा जन्मपत्रिका ॥

॥ शुभंभवतु ॥

---

सूचनाः—घातचंद्राची माहिती घातचक्रांत असते त्यांत नवग्रहांची माहिती देत नाहींत, म्हणून नवग्रहांची घातराशींची माहिती आम्ही पुढें देणार आहों.

| | | घ. | प. | |
|---|---|---|---|---|
| नागपूर अक्षांश २१ | | १५ | ० | |
| क्रांति×२३॥ | | +१ | ३८ | |
| ५ ) ४९३॥ ( ९८ | | १६ | ३८ | दिनार्ध |
| ४५ | | +१६ | ३८ | |
| ०४३॥ | | ३३ | १६ | दि. मा. |
| ४० | | | | |
| ०३॥ | १. घ. ३८ पळें चर आलें. | | | |

दिनार्धाची ६ ता. ३९ मि. १२ तासांतून वजा केली, तेव्हा ५ वा. २१ मि. त्यात कालांतर ३ मि. मिळविली तेव्हा ५ वा. २४ मि. हा नागपूर स्थानिक सूर्योदय झाला. यात २ मि. किरणवक्रीभवनाचा वजा करता ५ वा. २२ मि. हा सूर्योदयकाल आला.

याप्रमाणें कोणत्याही ठिकाणचा सूर्योदय आणि दिनमान–रात्रिमान काढावें.

## दिनार्धावरून सूर्योदय व सूर्यास्तकाल.

( १ ) इष्ट दिवसाची क्रांति आणि इष्ट अक्षांश माहीत असता त्यावरून सूर्योदय सूर्यास्त काढण्याची आणखी एक सोपी रीति अशी आहे कीं, इष्ट अक्षांशास इष्ट दिवसाच्या रविक्रांतीनें गुणावें आणि त्यास १३ नें भागून भागाकाराइतकीं मिनिटें चर आले असें समजावें. हे चर ता० २१ मार्चपासून २२ सप्टेंबरपर्यंत ६ तासांत मिळवावें, व २३ सप्टेंबरपासून २० मार्चपर्यंत ६ तासांत वजा करावें. ६ तासांत मिळवून किंवा वजा करून येणारी तास मिनिटें हें दिनार्ध होय.

( २ ) हें दिनार्ध १२ तासांतून वजा करावें. बाकी जी तास-मिनिटें येतील त्यास कालांतर संस्कार द्यावा व किरण वक्रीभवनाची २ मिनिटें वजा करावीं म्हणजे स्थानिक स्पष्ट सूर्योदय झाला.

( ३ ) दिनार्धाची दुप्पट करून त्याचीं तास मिनिटें स्पष्ट सूर्योदयांत मिळवावीं आणि शिवाय त्यांत ४ मिनिटें मिळवावीं म्हणजे स्पष्ट सूर्यास्त येईल. उदाहरणार्थ, ता. २३ जून या दिवशींचा मुंबईचा सूर्योदय सूर्यास्त या रीतीनें काढूं. या दिवशीं रविक्रांति २३॥ अंश × १९ अक्षांश = ४४६॥ – १३=३४ मिनिटें हीं वर सांगितल्याप्रमाणें ६ तासांत मिळवून ६ तास ३४ मिनिटें हें दिनार्ध झालें. ते १२ तासांतून वजा करता ५ तास २६ मि. आलीं. त्यात कालांतर संस्कार २ मि. मिळविलीं तेव्हा ५ ता. २८ मि. यात किरणवक्रीभवनाचीं २ मिनिटें वजा करता ५ ता. २६ मि. हा स्थानिक सूर्योदयकाल झाला.

आता सूर्यास्त काढूं. दिनार्ध ६ ता. ३४ मि. त्याची दुप्पट १३ तास ८ मि. यात स्थानिक सूर्योदयाचीं ५ ता. २६ मि. मिळविलीं तेव्हा १८ तास ३४ मिनिटें झालीं. यात ४ मिनिटें मिळविलीं असता १८ तास ३८ मिनिटें. ह्या वेळीं म्हणजे संध्याकाळीं ६ वाजून ३८ मिनिटांनीं सूर्यास्तकाल झाला.

याप्रमाणें अनेक रीतीनें सूर्योदय, सूर्यास्त अखिल हिंदुस्थानांतील कोणत्याही स्थळाचें काढता येतात. मात्र या रीतीनें येणाऱ्या कालांत क्वचित् १।२ मिनिटांची कसरही येईल.

## स्थानिक वेळ व स्टॅंडर्ड वेळ यांतील अंतर काढण्याची माहिती.

पुढें स्थानिक वेळ व स्टॅं. टा. यामधील अंतर काढून कांहीं प्रमुख स्थळांचे मान दिलें आहे. हें अंतर काढण्याची पद्धत खालीलप्रमाणें आहे.

इष्ट स्थळाचे रेखांश८२॥ रेखांशापेक्षा जितके अंश कमी अगर जास्ती असतील तितके अंशास प्रत्येक अंशास ४ मिनिटें प्रमाणें येणारा काल हा इष्टस्थळ ८२॥ रेखांशापेक्षा कमी रेखांशावर असेल तर कमी आहे असें समजावें व इष्टस्थळ ८२॥ रेखांशापेक्षा जास्त रेखांशावर असेल तर जास्त आहे असें समजावें. दिलेलें कोष्टक या पद्धतीनेंच केलें आहे. इतर कोणत्याही ठिकाणचें अंतर काढावयाचें झाल्यास ह्या रीतिप्रमाणें काढावें. पण हें नेहमीं लक्षांत ठेवावें कीं, अंतराचीं मिनिटें कमी असल्यास तितकीं मिनिटें स्थानिक

सूर्योदयात मिळविली पाहिजेत व अंतराची मि. जास्ती असल्यास तितकीं मिनिटें स्थानिक सूर्योदयात वजा केली पाहिजेत म्हणजे स्टॅ. टा. प्रमाणें स्प. सूर्योदय किंवा सूर्यास्त होईल.

स्टॅ. टा. म्हणजे ८२॥ रेखांशावरील निजकाल किंवा स्थानिक काल हा होय. हाच सर्व हिंदुस्थानात सरकारनें सन १९०५ सालापासून प्रचारात आणला आहे. व याप्रमाणेंच सर्वत्र रेलवे, तारखातें, पोष्ट वगैरे सरकारी ऑफिसामध्यें आणि व्यवहारातही घड्याळें चालू आहेत. १९०५ च्या पूर्वी सर्वत्र मद्रास टाईम म्हणजे मद्रासचा स्थानिक किंवा निजकाल हा प्रचारात होता.

**( १ ) इष्ट स्थळाचे रेखांश ८२॥ पेक्षां जास्त असतील तर त्या प्रत्येक अंशास ४ मिनिटें व १५ कलांस १ मिनिट याप्रमाणें येणारी मिनिटें, चर आणि कालांतर संस्कार देऊन आलेल्या तासमिनिटांत वजा करावी.**

( २ ) तसेंच इष्टस्थलाचे रेखांश ८२॥ पेक्षा कमी असल्यास जितके अंशादि कमी असतील तित क्याचीं मिनिटें करून कालांतर आणि चर संस्कार देऊन आलेल्या **तासमिनिटांत मिळवावीं**. म्हणजे त्या ठिकाणचा स्टॅ. टा. सूर्योदय येईल.

सूर्यास्त काढण्याचे वेळीं चर वगैरे संस्कार सूर्योदयाच्या उलट करावयाचे हें सांगितलेंच आहे व त्याचीं उदाहरणेंही दिलीं आहेत. पण हें जरूर लक्षात ठेवावें कीं, स्थानिक वेळ व स्टॅ. टा. यामधील अंतराची मिनिटें अस्तात नेहमीं सूर्योदयाप्रमाणेंच इष्टस्थानाचे रेखांश ८२॥ पेक्षा कमी असल्यास मिळवीत जावीं व रेखांश ८२॥ पेक्षा जास्त असल्यास वजा करावीं.

खालीं मध्यें स्थानिक वेळ ( लोकल टाईम ) व स्टँडर्ड टाईम यातील फरक दिला आहे. त्यात ज्या ठिकाणीं जितकीं मिनिटें कमी असें लिहिलें आहे तितकी मिनिटें स्थानिक सूर्योदयात मिळवावीं, वजा करूं नयेत; तसेंच जेथें जास्त असें लिहिलें असेल तेथें तितकीं मिनिटें वजा करावीं; मिळवूं नयेत, उदाहरणार्थ, तेथें मुंबईच्या पुढें "३९ मिनिटें कमी" असें लिहिलें आहे. याचा अर्थ असा नव्हे कीं, आलेल्या लोकल टाईममध्यें ३९ मिनिटें कमी करावयाचीं ! तर ३९ मि. स्टॅ. टा. पेक्षा मुं. टा. कमी आहे, म्हणून स्टॅ. टा. करावयाचें असल्यास ३९ मि. मिळवलीच पाहिजेत. सर्वत्र असेंच समजावें.

## अक्षांशांवरून पलभासाधन.

अक्षांशास १० नीं भागून भागाकार अक्षांशातच मिळवावा नंतर त्यास ५ नीं भागावें. भाग येईल त्या पलभा होत. (या सोप्या रीतीनें काढलेल्या पलभात कचित् अल्प व्यंगुलाचा फरक राहण्याचा संभव आहे.)

उदाहरणः—अक्षांश १ च्या पलभा काढणें.

```
      १
     ×६०
१० ) ६० ( ६
     ६०
     ००
```

```
     ६० ( १ अक्षांशाच्या कला. )
    +६
५ ) ६६ ( १३ व्यं.
    ६५
    ०१
```

पलभा काढण्याची रीत अशी आहे कीं, अक्षांशास १० नें गुणून ती संख्या ६२५ यात म्हणजे२५ पलभेच्या वर्गसंख्येंत वजा करावी. नतर त्या संख्येचें वर्गमूळ काढून ( वर्गमूळ म्हणजे जी संख्या अहेल तिनेंच तिला गुणलें असता जी संख्या येते त्या संख्येचें वर्गमूळ, मूळची संख्या हें होय. उदाहरणार्थ २५ चें वर्गमूळ ५ ). तें वर्गमूळ २५ पलभेंतून वजा करावें. म्हणजे त्या अक्षांशाच्या अंगुलात्मक पलभा येतात. वर दिलेल्या व ० ते ६३ च्या अक्षांशाच्या कोष्टकात दिलेल्या पलभा याच पद्धतीनें दिल्या असून त्या मध्यम मानानें दिल्या आहेत हें लक्षात ठेवावें. पलभा आणि उदय याचा अतिशय उपयोग असल्यानें त्याची सविस्तर माहिती द्यावी लागली. असो.

# स्थानिक वेळ व स्टँडर्ड वेळ यांमधील फरकाचें कोष्टक.

स्थानिक वेळ व स्टँडर्ड वेळ यातील फरक खालीं दिला आहे. तो कमी, अगर जास्ती असेल त्या-प्रमाणें चर व कालांतर संस्कार करून आलेल्या सूर्योदयात ( मिनिटें जास्त असता ) वजा करावा अगर ( मिनिटें कमी असता ) मिळवावा म्हणजे इष्ट स्थलाचा स्टॅं. टा. सूर्योदय होईल.

| स्थळ. | स्टॅ.टा. पेक्षा क. जा. मि. | स्थळ. | स्टॅ.टा. पेक्षा क. जा. मि. | स्थळ. | स्टॅ.टा. पेक्षा क. जा. मि. |
|---|---|---|---|---|---|
| आग्रा | १७ क. | गंतूर | ९ क. | भुसावळ | २७ क. |
| अलाहाबाद | २ क. | ग्वाल्हेर | १८ क. | मुंबई | ३९ क. |
| अलपाई | २५ क. | गोवें | ३४ क. | मद्रास | ९ क. |
| अर्काट | १३ क. | जयपूर | २६ क. | मदुरा | १८ क. |
| अहमदाबाद | ४० क. | जबलपूर | १० क. | मंगलोर | ३१ क. |
| अहमदनगर | ३१ क. | जोधपूर | ३८ क. | मच्छलीपट्टण | ५ क. |
| अकोला | २२ क. | झाशी | १५ क. | मीरत | १९ क. |
| अमृतसर | ३१ क. | डेहराडून | १८ क. | मुर्शिदाबाद | २३ जा. |
| इंदूर | २६ क. | तंजावर | १३ क. | मौलमीन | ६१ जा. |
| उज्जैन | २७ क. | तिनेवेल्ली | २० क. | मुलतान | ४४ क. |
| उमरावती | १९ क. | त्रिचनापल्ली | १५ क. | मसुरी | १८ क. |
| उकटमंड | २३ क. | त्रिवेंद्रम | २२ क. | म्हैसूर | २३ क. |
| ओरिसा | ६ जा. | दार्जीलिंग | २३ जा. | मथुरा | ३ क. |
| औरंगाबाद | २९ क. | दिल्ली | २३ जा. | मिरज | ३१ क. |
| काबूल | ५२ क. | नागपूर | १२ क. | राजमेहेंद्री | ३ क. |
| कलकत्ता | २४ जा. | नागापट्टण | १० क. | रामेश्वर | १३ क. |
| कानानोर | २८ क. | नेलोर | १० क. | रंगून | ५५ जा. |
| केपकामोरीन | २० क. | नाशिक | ३५ क. | रत्नागिरी | ३७ क. |
| कोईमतूर | २२ क. | पाटणा | ११ जा. | रायपूर | ३ क. |
| कोलंबो | ११ क. | पेनँग | ६७ जा. | लाहोर | ३३ क. |
| कडुल्लर | ११ क. | पाडेचरी | ११ क. | लखनौ | ७ क. |
| कडपा | १५ क. | पुणें | ३५ क. | विझगापट्टण | ३ जा. |
| कालिकत | २७ क. | पोर्टब्लेअर | ४२ जा. | वनपार्थी | २२ क. |
| कोचीन | २५ क. | पंढरपूर | २८ क. | शिकंदराबाद | १६ क. |
| काश्मीर | ३० क. | बंगलोर | २० क. | सालेम | १७ क. |
| कर्नूल | १८ क. | बेपूर | २७ क. | सिमला | २१ क. |
| कोदाल कॅनाल | २० क. | बेल्लारी | २३ क. | सिंगापूर | ८२ जा. |
| कोल्हापूर | ३२ क. | बनारस ( काशी ) | २ जा. | सुरत | ३९ क. |
| कानपूर | ९ क. | यऱ्हाणपूर | २५ क. | सातारा | ३४ क. |
| गंजम | १० जा. | बडोदें | ३७ क. | सोलापूर | २६ क. |
| गोहट्टी | ३८ जा. | बेळगाव | ३२ क. | सावंतवाडी | ३४ क. |
| गुटी | २० क. | भोपाळ | २० क. | हैद्राबाद ( द. ) | १६ क. |

कमी दिलेली मिनिटें त्या त्या गांवच्या सूर्योदयांत मिळवावी. व जास्त दिलेली मिनिटें त्या त्या स्थळाच्या सूर्योदयांत वजा करावी. म्हणजे इष्टस्थलाचा सूर्योदय स्टँ. टा. प्रमाणें होईल.

## ग्रहांची मध्यम दिनगति व जास्तींतजास्त दैनिक गति.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| रवि | ५९ क. | ८ वि. | ६१–१५ | गुरु. | ५ क. | १२ वि. | १४– ० |
| चंद्र | ७९० क. | ३५ वि. | ९२०– ० | शुक्र. | ५९ क. | ८ वि. | ७६– ० |
| मंगळ | ३१ क. | २६ वि. | ४६– ० | शनि. | २ क. | ० वि. | ७–१५ |
| बुध | ५९ क. | ८ वि. | १२८– ० | राहु स्पष्टगति | ३ क. | ११ वि. | ३–११ |

## सूक्ष्म व स्पष्टलग्नसाधनरीति

जन्मकालीं पूर्वक्षितिजावर कोणतें लग्न किती अंश, कला वगैरे उदित आहे, हें सूक्ष्म रीतीनें काढण्याची माहिती याखालीं देत आहों. जन्मलग्न जितकें खात्रीचें व सूक्ष्म असेल त्या मानानें आयुष्यांत घडणाऱ्या गोष्टींचें भविष्य बरोबर येतें, म्हणून जन्मवेळ नक्की असणें चांगलें. याबद्दल विशेष विवेचन पुढें करण्यांत येईल. तत्रापि प्रथम इतकें लक्षांत ठेवावें कीं, जन्मलग्न हा फलज्योतिषशास्त्राचा मूळ पाया किंवा मुख्य आधार आहे. म्हणून तें सिद्ध करतांना ज्या ज्या आवश्यक गोष्टी आहेत त्या त्या विशेष रीतीनें स्पष्ट केल्या पाहिजेत. कोणत्याही वेळचें स्पष्टलग्न सिद्ध करावयास इष्ट अक्षांश, त्यावरून काढलेल्या पलभा, लंकोदय, चरखंडे, स्वोदय, अयनांश, स्पष्टसूर्य इतक्या गोष्टी लागतात. मुख्य मुख्य शहरांच्या पलभांचें कोष्टक पूर्वी दिलेंच आहे. त्यावरून चरखंडें तयार करून मेषादि राशीचे स्वोदय करितां येतात. (या ग्रंथांत तेच दिलेही आहेत.) स्पष्ट लग्नसाधनाची सविस्तर माहिती उदाहरणांसह खालीं देत आहों.

## अक्षांशावरून पलभासाधन.

अक्षांशंतद्दशांशंच एकीकृत्य विशेषतः । तत्संख्या पंचभिर्हत्वा पलभासिद्धि जायते ॥३५०॥

इष्ट अक्षांशांत त्याचा १० वा भाग मिळवून येणाऱ्या संख्येस ५ नीं भागावें. भाग अंगुलें व व्यंगुलें असा आणावा म्हणजे त्या इष्टस्थळाच्या पलभा होतात.

उदाहरणार्थ अक्षांश २५ + त्याचा दशांश २॥=२७॥ ÷ ५ = ५ अं. ३० व्यं. ह्या पलभा आल्या. ह्या पद्धतीच्या पलभामध्यें कांहीं व्यंगुलांची क्वचित् कसर राहील.

## पलभा व चरखंडें आणि त्यांचा उपयोग.

मेषादिगे सायनभागसूर्ये दिनार्धभा या पलभा भवेत् सा ॥३५१॥
त्रिस्था हता स्युर्दशभिर्भुजंगैर्दिग्भिश्चराधानि गुणोध्दृतांत्या ॥ग्र. स्प. ५

मेषादिग इति । अयनस्य भागा अयनांशा अग्रे वक्ष्यमाणाः । तैः सह वर्तमानोयुक्तो यः सूर्यस्तस्मिन सूर्ये मेषादिगे राशिभागकलादिना शून्यमितेसति तस्मिन्दिने दिनार्धे मध्यान्हे समभुवि द्वादशांगुलशंकुनिर्देश्य एवंतस्य शंकोर्मध्यान्हे भा छाया या भवति सा पलभा भवेत् इत्यर्थः । सा पलभा त्रिपुस्थानेपु तिष्ठति दशभि (१०) र्भुजंगैरष्टभि (८) र्दिग्भिः (१०) हता गुणिता ततोऽन्तिमा गुणैस्त्रिभि (३) रुध्दृता भक्ता सतीत्रीणि चरखंडानि भवंति ।

ता. २१ मार्च रोजीं सायन रवि ० राशि, ० अंश, ० कला असतो व तोच विषुव दिवस होय. त्या दिवशीं सूर्य मध्यान्हीं असतांना सपाट जागेवर १२ अंगुलें उंचीचा शंकु म्हणजे मेख ठोकून त्याची जी छाया पडते तिला पलभा असें म्हणतात. मुख्य मुख्य शहरांच्या पलभा किती आहेत हें दिलेल्या कोष्टकावरून समजेल. प्रत्येक ठिकाणची पलभा निरनिराळी असते. उदाहरणार्थ, कलकत्ता ४ अं. ५८ व्यं., मुंबई ४ अं. ७ व्यं., हैद्राबाद ३ अं. ४५ व्यं. याप्रमाणें आहे. आपल्या गांवच्या पलभा ठाऊक नसल्यास नजिक असलेल्या शहराच्या किंवा तालुक्याच्या गांवच्या पलभा घ्याव्या. त्यामुळें फारसा फरक पडणार नाहीं.

आपल्या गावची पलभा तीन ठिकाणीं माडून तिला अनुक्रमें १०, ८ व १०/३ ह्या संख्येनें गुणावें जे तीन गुणाकार येतील त्यास अनुक्रमें पहिलें, दुसरें व तिसरें चरखंड म्हणावें. तिसरे चरखंडास १० नीं गुणून तिहीनीं भागावें लागतें. खालील उदाहरणें पहा. मुंबईचीं चरखंडें —

```
  ४ | ७            ४ | ७            ४ | ७
  × १०             × ८              × १०
 ------           ------           ------
 ४० | ७०          ३२ | ५६          ४० | ७०
+ १ | -६०                         +१ | -६०
 ------                           ------
 ४१ | १०                          ४१ | १०
                                  ३ ) ४१ ( १३
                                      ३९
                                      --
                                      ०२
                                     × ६०
                                     १२०
                                      १०
                                 ३ ) १३० ( ४३
                                     १२
                                    +१०
                                      ९
                                     --
                                     ०१
```

पहिलें चरखंड ४१–१०

दुसरें चरखंड ३२–५६

तिसरें चरखंड १३–४३

६० व्यंगुळे म्हणजे १ अंगुल होतें.

पुण्याचीं चरखंडें—

```
   ४              ४              ४
  × १०           × ८            × १०
 ------         ------         ------
   ४०             ३२             ४०
३ ) ४० ( १३
    ३९
   ----
    ०१
  × ६०
३ ) ६० ( २०
```

पुण्याचें पहिलें चरखंड ४०–०

,, दुसरें चरखंड ३२–०

,, तिसरें चरखंड १३–२०

## लंकोदय आणि इष्टस्थलीं मेषादि राशींचें उदय.

लंकोदया विघटीकागजभानिगोंकदस्रा स्त्रिपक्षदहनाः क्रमगोत्क्रमस्थाः ॥ हीनान्विताश्वरदलैः क्रमगोत्क्रमस्थै मेंषादितोघटत उत्क्रमतस्त्विमेस्युः ॥ १ ॥ ग्र ला. त्रि. प्र. १

( गजभानि अष्टसप्तत्यधिकशतद्वयम् २७८ ( मेष ) गोंकदस्राएकोनत्रिशती २९९ (वृषभ) त्रिपक्षदहनः त्रयोविंशत्यधिक त्रिशती ३२३ (मिथुन) एतेमेषादीनां त्रयाणाम् त एवोत्क्रमस्था कर्कादित्रयाणाम् यथा, कर्क ३२३, सिंह २९९, कन्या २७८.) (श्लो. ३५२)

अर्थ—लंकेंत मेषराशीचा उदय २७८ पळें, वृषभ राशीचा उदय २९९ पळें, मिथुनराशीचा उदय ३२३ पळें, कर्कराशीचा उदय ३२३ पळें, सिंहराशीचा उदय २९९ पळें, कन्याराशीचा उदय २७८ पळें

असतो; आणि लंकेत तूळराशीपासून मीन राशीपर्यंत उदयांचीं पळें, कन्या राशीपासून उलट मेष राशीपर्यंत जी उदयाची पळें सांगितली आहेत तींच असतात.

ज्या गांवचे मेषादि राशींचें उदयकाळ काढावयाचें आहेत त्या गांवची चरखंडे घेऊन तीं अनुक्रमानें मेष, वृषभ व मिथुन यांच्या पलात्मक उदयातून वजा करावी. आणि उलट कर्क, सिंह व कन्या याचे पलात्मक उदयात मिळवावीं. म्हणजे स्वदेशीय मेष राशीपासून कन्या राशीपर्यंत उदयकाळ क्रमानें होतात. आणि तेच उलट क्रमानें तूळापासून मीनापर्यंत होतात. ह्या उदयास स्वोदय असें म्हणतात. हे सायन असतात.

## लंकोदय आणि आपल्या गांवाचे मेषादि राशींचे उदयाचे ( स्वोदय ) उदाहरण.

मेषराशीपासून मीनराशीपर्यंत बाराही राशींचे लंकेतील उदय खालीं देत आहों. ते पलात्मक आहेत. मेष, वृषभ, मिथुन या तीन राशींच्या उदयांची जीं पळें तीच उलट क्रमानें कर्क, सिंह, कन्या या राशींचीं पळें समजावीं. तसेंच कन्याराशीपासून उलट मेषराशीपर्यंत जीं पळें तींच तूळराशीपासून मीनराशीपर्यंत सहा राशींच्या उदयांची पळें जाणावीं. म्हणजे मेष, तूळ, कन्या व मीन; वृषभ, सिंह, वृश्चिक व कुंभ; मिथुन, कर्क, धनु व मकर या राशींचे पलात्मक अंक सारखे असतात. ते येणेंप्रमाणें:—

लंकोदय ( लंकेतील राशींचे पलात्मक उदय. )

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मेष | २७८ | कर्क | ३२३ | तूळ | २७८ | मकर | ३२३ |
| वृषभ | २९९ | सिंह | २९९ | वृश्चिक | २९९ | कुंभ | २९९ |
| मिथुन | ३२३ | कन्या | २७८ | धनु | ३२३ | मीन | २७८ |

या लंकोदयावरून आपल्या गांवाचे उदय तयार करण्याची रीत अशी आहे कीं, ज्या गांवाचे उदय तयार करावयाचे असतील त्या गांवच्या पलभांवरून वर दिलेल्या रीतीनें चरखंडे तयार करून तीं तिन्ही चरखंडें अनुक्रमें मेष, वृषभ व मिथुन या राशींच्या लंकोदयाच्या वर दिलेल्या पळांतून वजा करावीं; नंतर तींच चरखंडें उलट क्रमानें म्हणजे तिसरें चरखंडे कर्कराशीच्या लंकोदयात, दुसरें सिंहराशीच्या व पहिलें कन्याराशीच्या लंकोदयाचे पळात मिळवावीं. म्हणजे मेष राशीपासून कन्याराशीपर्यंतचे आपल्या गांवाचे उदय तयार झाले. हेच उदय उलट क्रमानें म्हणजे कन्याराशीचे जे उदय तेच तूळराशीचे, सिंहराशीचे जे उदय तेच वृश्चिकराशीचे, कर्कराशीचे जे उदय तेच धनुराशीचे, याप्रमाणें मीनराशीपर्यंत बाराही राशींचीं उदय पळें आहेत.

पुण्याच्या पलभा ४१० असून त्यावरून येणारीं चरखंडें घेऊन पुणें येथील मेषादि बारा राशींचे उदय खालीं दिले आहेत. त्यावरून उदय काढण्याची रीति लक्षांत येईल.

| लंकोदय | पळें | | चरखंडें | | पुण्यनगरीचें उदय. | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मेष | २७८ | − | ४० | = | २३८ | = | ३ घ. ५८ प. |
| वृषभ | २९९ | − | ३२ | = | २६७ | = | ४ घ. २७ प. |
| मिथुन | ३२३ | − | १३ | = | ३१० | = | ५ घ. १० प. |
| कर्क | ३२३ | + | १३ | = | ३३६ | = | ५ घ. ३६ प. |
| सिंह | २९९ | + | ३२ | = | ३३१ | = | ५ घ. ३१ प. |
| कन्या | २७८ | + | ४० | = | ३१८ | = | ५ घ. १८ प. |

हे सहा राशींचे उदय झाले, आता तेच उलट क्रमानें घेतले ( कन्याराशीपासून मेषराशीपर्यंत ) म्हणजे तुळराशीपासून मीनराशीपर्यंतचे सर्व उदय तयार होतात. ( जसें तूळ ३१८, वृश्चिक ३३१, धन ३३६ मकर ३१०, कुंभ २६७, मीन २३८) याप्रमाणें १२ राशींचे पुणें येथील उदय तयार झाले. त्यांचें कोष्टकः—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मेष | २३८ | सिंह | ३३१ | धनु | ३३६ |
| वृषभ | २६७ | कन्या | ३१८ | मकर | ३१० |
| मिथुन | ३१० | तूळ | ३१८ | कुंभ | २६७ |
| कर्क | ३३६ | वृश्चिक | ३३१ | मीन | २३८ |

## इष्टकालिक लग्नसाधन

गतभोग्यासवः कार्या भास्करादिष्टकालिकात् ॥
स्वोदयासुहता भुक्त भोग्या भक्ताः खवन्हिभिः ॥ ३५३ ॥
अभीष्ट घटिकासुभ्यो भोग्यासून् प्रविशोधयेत् ॥
तद्वत्तदेष्यलग्नासूनेवं यातान्तथोत्क्रमात् ॥ ३५४ ॥
शेषं चेत्त्रिशताभ्यस्तमशुद्धेन विभाजितम् ॥
भागहीनं च युक्तं च तल्लग्नं क्षितिजे तदा ॥ सूर्यसिद्धांत. ॥३५५॥

तात्कालिक सूर्य ज्या राशीस असेल त्या राशीचे रवीचे भुक्तांश व भोग्यांश यास सूर्य स्थित राशीच्या उदयपलांनीं गुणून ३० नीं भागावें. भागाकाराइतकीं पळें अनुक्रमें भुक्तपळें व भोग्यपळें समजावी. इष्टकालाच्या घटिकापलातून भोग्यांशाची घटीपळें वजा करावी. त्याचप्रमाणें रविस्थितराशीच्या पुढील अनुक्रमानें जितक्या राशींची घटिकापळें वजा जातील तितकी घ्यावी. ज्या राशीची घटिकापळें वजा जात नसतील त्यास अशुद्धोदय म्हणावें. बाकी राहिलेल्या घटिकापळाची पळें करून त्यास ३० नें गुणून अशुद्धोदय राशीच्या पळांनीं भागावें. भागाकार अंश, कला, विकलात्मक आणावा. नंतर पूर्ण वजा झालेल्या राशींची संख्या व बाकविरून आलेलें अंशादि इतकें स्पष्टलग्न आलें असें समजावें. सायन सूर्य करून नंतर स्वोदयावरून लग्नसाधावें.

तत्कालार्कः सायनः स्वोदयघ्ना भोग्यांशाः खत्र्युध्दृता भोग्यकालः ॥ एवं यातांशैभवे द्यातकालो भोग्यः शोध्यो भीष्टनाडी पलेभ्यः ॥ १ ॥ तदनुजहीहिग्रहोदयांश्चशेषं गगनगुणघ्नमशुद्धहल्लवाद्यं ॥ सहितमजादि गृहैरशुद्ध पूर्वैर्भवति विलग्नमदोयनांशहीनं ॥२॥ ग्र. ला. त्रि. प्र. २।३ (श्लो. ३५६)

उपपत्तिः—अभीष्टकाले यः क्रांतिमंडलप्रदेश क्षितिजे लग्नस्तल्लग्नमित्युच्यते । सिद्धांत शिरोमणी ॥ यत्रलग्नमपमंडलं कुजे तद् गृहाद्यमिह लग्नमुच्यते ॥

अर्थ—ज्या वेळेचे लग्न काढावयाचें असेल त्या वेळेचा स्पष्ट रवि करून त्यात अयनांश मिळवावें. जी बेरीज येईल त्यातील राशी बाजूस ठेऊन जे अंशादिक राहील तो भुक्त राशी होतो. नंतर जे राशी असतील त्यात एक मिळवून तत्परिमित राशीच्या उदयानें भुक्त आणि भोग्य यांस गुणाव. जे गुणाकार येतील त्यास ३० नीं भागावें म्हणजे अनुक्रमानें भुक्तकाल आणि भोग्यकाल ह्यांची पळें होतात. आतां अभीष्ट घटिकाची पळें करून त्यातून भोग्यकालाची पळें वजा करावी,जी बाकी राहील तींतून ज्या उदयानें गुणलें असेल त्या पुढील जितकें पलात्मक उदय वजा जातील तितकें वजा करावें आणि जी पलात्मक बाकी राहील तिला ३० नीं गुणून जो गुणाकार येईल त्यास जो उदय वजा गेला नसेल त्या उदयानें भागून भागाकार अंशादि येईल त्यांत मेष राशीपासून जितक्या राशींचे उदय वजा झाले असतील तितके राशी मिळवावे. जी बेरीज येईल तींतून अयनांश वजा करावें म्हणजे अभीष्टकालीं रात्र्यादिक स्प. लग्न होते.

## अयनांशसाधन

( १ ) इष्टाच्छकात् पण्णनमाब्धि हीनात् त्रिभागचंद्रैर्पि हृतायनांशाः ॥ सि. र.
( २ ) इष्टाच्छकात् पण्नवेद हीनात् पादोन पक्षाद्रि (७१।।।.) हृतायनांशाः॥ सि.भा.

इष्टशकांतून ४९६ वजा करून बाकीस ७१।।।नें भागावें. येईल ते अयनांश होत.
उदाहरणार्थ.–१८५४–४९६–१३५८÷७१।।। = १८ अंश ५५ कला हे अयनांश आले.

( ३ ) शक, नेत्र ( २ ) नवा ( ९ ) ब्ध्यु (४) न । द्विसप्तत्याश्च भाजयेत् ॥ सि.क.

( ४ ) द्विनंदवेदा ( ४९२ ) रहितः शकाब्दाः द्विःसप्तभक्ता अयनांशका स्युः

इष्टशकांत ४९२ वजा करून ७२ नीं भागावें म्हणजे अयनांश येतील.

( ५ ) हीनाः शकाब्दाश्च खचंद्रवाणा (५१०) रूपर्पि (७१) भक्ता अयनांशकाश्च ॥ वृ.सि.

इष्टशकांत ५१० वजा करून बाकीस ७१नीं भागावें म्हणजे अयनांश येतील.

उदाहरणार्थ १८५४-५१०=१३४४÷७१=१८ अंश ५५ कला हे अयनांश आले.

( ६ ) शाकः पट् (६) गो (९) ब्धि (४) रूनः ख (०) रस (६) हृतः स्थूलमानायनांशः हीनःस्तत्तर्क (६) भागः युग (४) युतकलयः सूक्ष्मरीत्यापि सिद्धम् ॥

इष्टशकांतून ४९६ वजा करून बाकीस ६० नीं भागावें. भागाकार अंशकलात्मक आणून त्याचा पष्ठांश त्यांतच वजा करावा. आणि बाकींत ४ कला मिळवाव्या म्हणजे सूक्ष्म व शुद्ध अयनांश येतात.

उदाहरणार्थ इष्ट शक १८५४-४९६=१३५८÷६०=२२ अं. ३८ कला, त्याचा पष्ठांश ३ अंश ४६ कला २० विकला ह्या २२ अं. ३८ कलांतून वजा करतां १८ अं. ५१ कला ४० विकला आल्या, त्यांत४ कला मिळविल्या तेव्हां १८ अं. ५५ क. ४० वि. हे अयनांश झाले.

( ७ ) कृत्वाशकं द्विगुणितं विभजेत्त्र्युगेकं ( १४३ ) ऋण्यंशतद्विरहितं अयनांशकस्यात् ॥ सि. भा. ( श्लो३५७ ते ३६३ ).

इष्टशकाची दुप्पट करून त्यास १४३ नीं भागावें. भागाकार अंशकलात्मक आणून त्यांतून ७ अंश वजा करावें म्हणजे इष्ट शकाचे अयनांश येतात.

उदाहरणार्थ, शके १८५४×२=३७०८÷१४३=२५ अंश ५५ कला त्यांतून ७ अंश वजा केले तेव्हां १८ अंश ५५ कला अयनांश आले.

## सिद्धांतसम्मत आरंभस्थान निःशर ( झीटापिशियम ) रेवतातारीयुक्त रैवतपक्षाप्रमाणें, सूक्ष्म व शुद्ध अयनांशसाधनाची दुसरी रीति.

इष्टशकांत ४९६ वजा करून बाकी येणाऱ्या वर्षसंख्येस ५० नें गुणावें व येणाऱ्या संख्येंत पुनः वर्षसंख्येस ६ नें भागून येणारा भागाकार व त्या भागाकारास ४० नें भागून येणारा भागाकार मिळवावा. नंतर एकंदर संख्येस ३६०० नें भागावें. येणारा भागाकार अंश व बाकीस ६० नें भागून येणारा भागाकार कला व बाकी राहील त्या विकला इतके सूक्ष्म व शुद्ध अयनांश त्या वर्षारंभींचे आले असें समजावें. अयनांशाची वार्षिक वेधोपलब्ध सूक्ष्मगति ५० वि. १० प्रतिवि. व १४ प्रप्रतिविकला इतकी असून अधिक मास नसेल त्या वर्षी मासिक गति ४ वि. १० प्र. वि. ५१ प्रप्रतिवि. व अधिकमास असेल त्या वर्षी मासिक गति ३ वि. ५१ प्र. वि. १९ प्रप्रतिविकला इतकी असते.

उदाहरणार्थ शके १८४४ चे सूक्ष्म अयनांश काढूं.

```
   १८४४          ६ ) १३४८ ( २२४        ४० ) २२४ ( ५
  -४९६ वजा           १२                      २००
  -------           ----                     ----
   १३४८              १४                       २४
  × ५०               १२
  -------           ----
 ६७४००               २८
   २२४               २४
     ५              ----
 -------              ४
 ६७६२९
```

## ग्रहलाघवीय अयनांश

वेदाब्ध्यब्ध्यूनः खरसहृतः शकोयनांशाः ॥ ३६४ ॥

**इष्ट शकांतून ४४४ वजा करावे ( वेद ४, अब्धि ४, अब्धि ४, ऊन=वजा करणें, ख० रस ६ हृतः—भागणें. येतील ते अयनांश. )**

इष्ट शकात ४४४ वजा करून बाकीस ६० नें भागावें. भागाकार येईल तितके अयनांश व बाकी राहतील त्या कला. हे त्या वर्षाचे अयनांश झाले. या पद्धतीप्रमाणें शके१८४४ चे अयनांश२३ अं.२०क. येतात. ते शुद्ध करण्याकरितां येणेंप्रमाणें बीजसंस्कार द्यावा. ग्रहलाघवाप्रमाणें जे अयनांश येतील त्या अंशास ५ नें भागून भागाकार अंश येतील. बाकीस ६० नें गुणून त्यात कला मिळवाव्या. व त्यास ५ नें भागावें. व येणारा भागाकार कला समजाव्या. हे अंश व कला ग्रहलाघवाच्या रीतीनें येणाऱ्या अयनांशात वजा करावें, म्हणजे इष्ट शकाचे अयनांश झाले. हें मानही किंचित् स्थूलच आहे, पण माहितीकरिता सांगितलें आहे. सूक्ष्म अयनांश वर सांगितलेल्या व उदाहरणें दिलेल्या पद्धतीनेंच काढावें. ग्रहलाघवातील अयनांश व अयनगतीस ज्याप्रमाणें बीजसंस्कार देणें जरूर, त्याचप्रमाणें ग्रहगति, वर्षमान व इतर गोष्टींसही बीजसंस्कार दिला पाहिजे.

## सिद्धांतशिरोमणींतील स्पष्टलग्नसाधन.

तात्कालिकार्केण युतस्य राशे–रभुक्तभागैर्गुणितोदयात्स्वात् ।
भोग्यासवः खाग्निहृता दवाप्ता भुक्तासवो भुक्तलवैः ? स्युरेवम् ॥ ३६५ ॥
इष्टासुसंघादपनीय भोग्यां स्तदग्रतो राश्युदयांश्च शेषम् ।
अशुद्धहृत्खाग्निगुणं लवाद्य–मशुद्धपूर्वैर्भवनैरजाद्यैः ॥ ३६६ ॥
युक्तं तनु: स्या दयनांशहीन–मिष्टासवोऽल्पा यदि भोग्यकेभ्य: ।
त्रिंशद्गुणाः स्वोदयभाजितास्ते लब्धांशयुक्तो रविरेव लग्नम् ॥ ३६७ ॥

ज्या वेळीं लग्नसाधन करावयाचें असेल त्या कालीं तात्कालिक स्पष्टसूर्य करून त्यात अयनांश मिळवून सायन–रवि तयार करावा तो सायन–रवि ज्या राशीला असेल, त्या राशीचे भोग्यांश ( म्हणजे सूर्य ज्या राशींत असेल त्यापासून राशिसमाप्तीपर्यंत जे अंश असतील ते ) करून त्यास स्वराशीच्या उदयासूंनीं गुणून ३० नीं भागिलें असता भोग्यकाल येतो; आणि रवीच्या भुक्तांशात म्हणजे भोगिलेल्या अंशास स्वराशीच्या उदयानें गुणून ३० नीं भागिलें असता भुक्तकाल येतो. नंतर इष्टकालातून भोग्यकाल वजा करून बाकी जी राहील तींतून सूर्यराशीच्या पुढच्या राशींचे जितके उदय वजा जातील तितके वजा करावेत. ज्या राशीचा उदय वजा जाणार नाहीं त्यास अशुद्धोदय असें नाव द्यावें. आणि जी शिल्लक राहील तिला ३० नीं गुणून अशुद्धोदयानें भागून अंश, कला, विकलात्मक लब्ध घ्यावें. आणि त्यामध्यें अशुद्धोदयाचे पूर्वी जितके मेषादि राशि असतील ते मिळविले असता राश्यादि सायनलग्न येतें. त्यातून अयनांश वजा केले म्हणजे निरयण लग्न येईल. जर भोग्यकालापेक्षा इष्टकाल कमी असेल तर त्या इष्टकालासच ३० नीं गुणून स्वकीय उदयानें भागून जें लब्ध अंशादि येईल, तें सूर्यामध्यें मिळविलें असता लग्न होतें.

येतो. ज्या वेळीं रवि व लग्न एकाच राशीला असतील तेव्हां त्या दोघांच्या अंतरांशांनीं स्वकीय राशीच्या उदयास गुणून ३० नीं भागिलें असतां इष्टकाल येतो. परंतु हा इष्टकाल रवीपेक्षां लग्न अधिक असल्या वेळचा समजावा आणि जर रवीपेक्षां लग्न कमी असेल, तर आलेला इष्टकाल अहोरात्रांतून म्हणजे ६० घटिकेंतून वजा केला असतां इष्टकाल होतो असें समजावें.

येथें इष्टकालसाधन करीत असतां रविभोग्य हें औदयिक सूर्यापासून करितात, कारण इष्टकालज्ञानावांचून सूर्य तात्कालिक करिता येत नाहीं. म्हणून आलेला इष्टकाल किंचित् स्थूल येतो; यावरून पुनः तात्कालिक सूर्य करून रविभोग्य आणावें, नंतर त्यापासून इष्टकाल आणावा म्हणजे तो इष्टस्थितीच्या जवळ येईल. याप्रमाणें वारंवार क्रियेनें स्फुट इष्टसावन घटिकात्मक काल येईल. ही गोष्ट सावनघटिकात्मक काल इष्ट असल्या वेळची झाली. जर नाक्षत्र घटीच इष्ट असतील, तर औदयिक सूर्यापासून लग्न व लग्नापासून काल एकवारच साधिला असतां इष्टकाल होतो.

ज्या वेळीं सूर्योदयाचे पूर्वी इष्टकाल असतो त्या वेळचें लग्नसाधन करावयाचें असल्यास तात्कालिक सूर्याचे भुक्तांशावरून भुक्तकाल आणून तो इष्टकालातून वजा करून जें शेष राहील त्यांतून सूर्यराशीच्या पूर्वराशीचे उदय विलोमक्रमानें जितके जातील तितके वजा करून शेषास ३० नीं गुणून अशुद्धोदयानें भागून जें अंशादिलब्ध येईल तें, सूर्यभुक्तांश व जितके राशि वजा गेले असतील तत्तुल्यराशि हे सूर्यांतून वजा केले असतां लग्न तयार होतें.

## स्पष्टलग्नसाधनाची रीति व प्रत्यक्ष उदाहरण.

ज्या वेळचें स्पष्ट लग्न तयार करावयाचें असेल त्या वेळचा स्पष्ट रवि सिद्ध करून त्यांत अयनांश मिळवावे. नंतर जी बेरीज होईल, त्यांतील राशीचा अंक निराळा ठेवावा. बाकी अंश, कला, विकला ज्या राहिल्या असतील ते निराळ्या मांडून ठेवलेल्या राशीच्या पुढील राशीचे भुक्त अंशादिक झाले. ३० अंश म्हणजे १ राशि होतो. म्हणून भुक्त अंशादि ३० तून वजा करावे, म्हणजे त्याच राशीचे भोग्यांश येतात. ज्या राशीचे हे भुक्त व भोग्यांश असतील त्याच राशीच्या उदयाच्या पळांनीं भोग्यांशांस गुणावें व ३० नें भागावें. भागाकार येईल तितकीं पळें त्या राशीचीं भोग्य पळें आहेत असें समजावें. सूर्योदयापासून जन्मकालापर्यंत जितकीं घटी पळें गेलीं असतील त्या सर्वांचीं पळें करून त्यांतून वरील भोग्य राहिलेलीं पळें उणीं करावीं. बाकी जीं पळें राहतील त्यातून ज्या राशीच्या उदयानें गुणलें असेल त्याच्या पुढील राशीचे जितके उदय वजा जातील तितके करावे. नंतर वजा न जातां बाकी राहिलेल्या पळास ३० नें गुणावें. त्या गुणाकारास ज्या राशीचा उदय वजा गेला नसेल त्यानें ( यास अशुद्धोदय म्हणतात. ) भागावें. उत्तर-अंश, कला, विकलापर्यंत आणून मेषराशीपासून जितक्या राशींचे उदय वजा गेले असतील तितके राशीचे अंक मिळवावे व अयनांश वजा करावे. म्हणजे सूक्ष्म निरयण स्पष्ट लग्न झालें. पुढील उदाहरण पहा.

शके १८४८ आश्विन शु. १५ गुरुवारीं सूर्योदयात् ग. घ. १५ या वेळचे स्पष्टलग्नसाधन करूं.

सूर्योदयाचा स्प. रवि ६ रा.८अं. २क.२६वि. व याच दिवशींचे अयनांश १८ अं. ५० क. ५१ वि.

| रा. | अं. | क. | वि. | |
|---|---|---|---|---|
| ६ | ८ | २ | २६ | स्प. र. सूर्योदयाचा |
| | + | १४ | ५५ | १५ घटी रविगति. |
| ६ | ८ | १७ | २१ | स्प. रवि इष्टकालचा |
| | +१८ | ५० | ५१ | अयनांश |
| ६ | २७ | ८ | २० | सायन रवि. |

सूर्योदयाच्या स्प. रवींत १५घ.ची रविगति १४ क. ५५ वि. मिळविली. तेव्हां इष्टकालीन स्प. रवि ६ रा. ८ अं. १७ क. २१ वि. झाला. त्यात अयनांश मिळविले तेव्हा ६ रा. २७ अं. ८ क. २० वि. इतका सायन रवि झाला. त्यांतील राशीचा अंक बाजूस ठेवून रा. अं. क. ह्या ३० अंशांतून वजा केल्या. तेव्हां बाकी २ अं. ५१ क. ४० वि. या तूळ राशीच्या भोग्य राहिल्या.

```
      १३०
     २७००
     २४८०
      २२०
     ×६०
२१० ) १३२०० ( ४२ विकला
      १२४०
        ८००
        ६२०
        १८०
```

| अं. | क. | वि. | |
|---|---|---|---|
| १९ | ३८ | ४२ | |
| −१८ | ५० | ५९ | अयनांश |
| ० | ४७ | ४३ | स्पष्टलग्न |

१९ अंश ३८ कला ४२ विकला यांतून अयनांश १८ अंश ५० कला ५९ विकला वजा केले, अर्थात् ० अंश ४७ कला आणि ४३ विकला हें स्पष्ट लग्न झालें. त्यांत इष्टकालांतून वजा गेलेल्या राशींचा आंकडा ९ म्हणजे धनु हा मिळविला असतां ९ राशी पूर्ण होऊन त्याच्या पुढील राशीचे म्हणजे मकर-राशीचे ० अंश ४७ कला आणि ४३ विकला इतकें स्पष्टलग्न आलें.

इष्ट स्थलाचें स्पष्टलग्न काढतांना हें नेहमीं ध्यानांत ठेवावें कीं, लग्नसाधनार्थ मेषादि राशींचे उदय इष्टस्थलाचे घ्यावयाचे असतात. प्रत्येक अक्षांशाचे उदय या ग्रंथांत दिलेले आहेत व ते तयार करण्याची माहितीही जोडली आहे.

## सूर्योदय व सूर्यास्तकालीन लग्न.

योऽभ्युदेति समयेन येन तत् सप्तमोऽस्ति मुपयाति तेन च । सि. शि.
सूर्योदये भानुः तुल्यः षड्भार्कास्ते विशेषतः ।
एवं सूर्योदयेचास्ते प्राग्लग्नंचविनिर्दिशेत् ॥ ३७१ ॥

यतः प्रागपरत्र क्षितिजयोरन्तरे षड्राशय एव भवंति । अत उदयलग्नं षड्राशियुक्तं अस्त-लग्नंभवति । रात्रौ लग्नसाधनार्थे रविः सषड्भःकार्यः । अस्तकाले रविरेवास्तलग्नं तत् सषड्भं प्राक् क्षितिजे लग्नम् ॥ ग्र० ला० टी० १२६ ॥

सूर्योदयकालीं, स्पष्टसूर्य जितका असेल तितकेंच स्पष्ट लग्न पूर्व क्षितिजावर असते. सूर्यास्तकालीं अस्तकालीन सूर्यांत ६ राशी मिळवून येईल तेंच स्पष्ट लग्न होय. पूर्व क्षितिजाला क्रांतिवृत्ताचा जो प्रदेश स्पर्श करीत असतो किंवा लागलेला असतो त्यास लग्न म्हणतात. सूर्य क्रांतिवृत्तातच भ्रमण करीत असल्या-कारणानें सूर्योदयकालीं सूर्य हेंच लग्न असतें. आणि सूर्यास्तकालीं त्यावेळचा स्पष्ट अधिक ६ राशी इतकें लग्न असतें.

## ॥ मध्यलग्नानयनम्—दशमभावसाधनम् ॥

प्राक् पश्चान्नतनाडीभिस्तस्माल्लंकोदयासुभि ः ।
भानौ क्षयधने कृत्वा मध्यलग्नं तदा भवेत् ॥ सू. सि. त्रि. ४९ ॥३७२॥

( प्राक्पश्चान्नतनाडीभिः ) पूर्वनतघटिकाभिः पश्चिमनतघटिकाभिश्च ( तस्मात् ) तात्कालिक सूर्यात् ( लंकोदयासुभिः ) निरक्षदेशराश्युदयासुभिः लग्नसाधनप्रकारेण सिद्धं यद्राशिभागादिकं तत् ( भानौ सूर्ये ) ( क्षय धने ) हीनयुते ( कृत्वा ) ( तदा ) अभीष्टसमये ( मध्यलग्नं ) दशमलग्नं ( भवेत् )

—याम्योत्तर वृत्ताच्या ऊर्ध्वभागास म्हणजे वरच्या भागास क्रांतिवृत्ताचा जो भाग संलग्न असतो त्यास मध्यलग्न किंवा दशमभाव म्हणतात. नतघटिका आणि तात्कालिक सूर्य यावरून लग्नसाधनपद्धतीनें लंको-दयावरून राश्यादि फल काढून तें सूर्यांत ऋण धन ( पूर्वनत असतां ऋण, पश्चिमनत असतां धन ) केल्यानें मध्यलग्न अर्थात् दशमलग्न येते.

## दशमभावसाधनार्थं नतसाधन.

रात्रेः शेषमितंयुतं दिनदले नान्होगतं शेषकं ।
विश्लेष्यं खलु पूर्व पश्चिमनतं त्रिंशच्युतं चोन्नतम् ॥ ३७३ ॥
यत्पूर्वोन्नतषड्भयुक्तरवित पश्चान्नतादित्यतो ।
यल्लंकोदयकैश्चलग्न मितयन्माध्यं सषड्भंसुखं । जातक केशवी पृ. ८६ ॥३७४॥

रात्रेः शेषं वा गत दिनार्धेन युत, अन्हो दिनस्य गत वा शेष दिनदलेन विश्लेष्य खल्विति निश्चियेन क्रमेण पूर्वपश्चिमनतंस्यात्, तन्नत त्रिंशच्च्युतं च पुन उन्नत स्यात् । पूर्वोन्नतषड्भयुक्तरवित. लंकोदयैर्लग्नमितयल्लग्न तन्माध्य दशम स्यात् । एव पश्चान्नतादित्यतः केवलार्कात् लंकोदयकैर्लग्नमितयल्लग्नं तद्दशमं स्यात् । तचषड्राशीयुक्त सुख चतुर्थंस्यात् ।

दिवसा पूर्वनत आणि दिवसा पश्चिमनत, रात्रीं पूर्वनत आणि रात्री पश्चिमनत असे नताचे ४ प्रकार आहेत. *मध्यरात्रीनंतर सूर्योदयापर्यंत जी शिल्लक रात्र राहिली असेल त्यात दिनार्ध मिळवावे म्हणजे रात्रीचे* पूर्वनत होते. सूर्यास्तापासून मध्यरात्रीपर्यंतचे नत काढावयाचे असता सूर्यास्तापासून गेलेल्या घटका दिनार्धात मिळवाव्या म्हणजे रात्रीचे पश्चिमनत होते. सूर्योदयापासून दिवसा मध्यान्हापर्यंतचे नत काढावयाचे असल्यास सूर्योदयापासून गेलेल्या घटका दिनार्धात वजा कराव्या म्हणजे दिवसाचे पूर्वनत होते. दिवसा मध्यान्हापासून सूर्यास्तापर्यंतचे नत काढावयाचे असता इष्टकालापासून सूर्यास्तापर्यंत राहिलेली घटिकांपळे दिनार्धात वजा करावी म्हणजे दिवसाचे पश्चिमनत होते. हे नत ३०घ. तून वजा केले म्हणजे उन्नत होते. पूर्वनत वजा केले असता पूर्वोन्नत व पश्चिमनत वजा केले असता पश्चिमोन्नत होते. पूर्वोन्नतप्रसंगी उन्नतकाल हाच इष्टकाल समजून तात्कालिक सूर्यात ६ राशी मिळवून लंकोदयावरून लग्नसाधनरीतीने लग्नसाधन करावे. येईल तो दशमभाव होय. पश्चिमनतप्रसंगी उन्नत न काढता पश्चिमनत हाच इष्टकाल समजून तात्कालिक सूर्यावरून लंकोदयाने लग्नसाधन करावे म्हणजे तोच दशमभाव होतो. दशमभावात ६ राशी मिळविल्या असता चतुर्थभाव होतो. ही सूक्ष्मदशमभाव साधनाची रीति आहे.

दिवसा मध्यान्ह हा इष्टकाल असता तात्कालिक सूर्य हाच दशमभाव होतो आणि मध्यरात्र हा इष्टकाल असता तात्कालिक सूर्य हाच चतुर्थभाव होतो.

यात. शेषः प्राक्परत्रोन्नत स्यात् कालस्तेनोनं द्युदलं नतंस्यात् ॥ प्र.या.नि प्र. ७॥
( अथ नतोन्नतसाधनं–प्राक्पूर्वकपाले यात भुक्त काल उन्नत स्यात्
अपरत्र पश्चिमकपाले शेष उर्वरित उन्नत कालः स्यात ॥) ॥३७५॥

सूर्योदयापासून दिनमध्यान्हापर्यंत जो काल त्यास पूर्वकपाल असे म्हणतात. दिनमध्यान्हापासून सूर्यास्तापर्यंतच्या कालास पश्चिमकपाल म्हणतात. सूर्योदयापासून पूर्व कपाली जो गतकाल त्यास पूर्वोन्नतकाल म्हणतात आणि पश्चिमकपाली जो सूर्यास्तापर्यंत शेषकाल त्यास पश्चिमोन्नतकाल म्हणतात. उन्नतकाल दिनार्धात वजा करून जी बाकी राहते त्यास नतकाल म्हणतात.

उदयान्मध्यपर्यंतं दिनार्धाद्धीनतत्घटिः
अस्तान्मध्यान्हपर्यंतं अस्तादिष्टंदिनार्धयुक् ॥ ३७६ ॥
मध्यरात्राग उदयात् रात्रिशेषंदिनार्धयुक्
दिनार्धादस्तपर्यंतं हीनंशेषं दिनार्धतः ॥ ३७७ ॥
दिनार्धाद्रात्रिपर्यंतंनतं पश्चिममुच्यते
रात्र्यर्धादिनमध्यांतं नतपूर्वं निगिप्यते ॥ ३७८ ॥

घटीनतंपड्गुणकारयेच्च प्राप्तांशतत्स्पष्टरविश्वहीनं
पूर्वोन्नतं, पश्चिमयुक् तथैव प्राप्तं च भावंदशमंयदिस्यात् ॥ ३७९ ॥

## स्थूलमानाचें भावसाधन.

भागाः स्युर्नतनाडिका रसहतास्तद्धीनयुक्प्राक्परे ।
सूर्यः खं सरसं सुखं कथितवल्लग्नं सपड्भं मदः ॥ ३८० ॥
व्यस्ताग्रत्रिलवोऽथ दकृच्युत उभौ योज्यौ कुदघ्नौ पृथक् ।
लग्ने चांबुनि ते सपद्‌तनुसुखाः संधिर्द्वियोगोर्धकः ॥ ३८१ ॥
( पाठांतरं ॥ व्यस्ताग्रारिलवोऽथ भूच्युत इमौ भूयोंगपातालयोः ।
क्षेप्यौ पड् तनुतः ससंधय इमे पड्भान्विताः स्युः परे ॥ ३८२ ॥)

श्लोकार्थ—नतघटींना ६ नीं गुणून गुणाकार येईल ते अंश होतात, मग ते अंश इष्टकाळच्या स्पष्टरवींतून पूर्वनत असता वजा करावे. आणि पश्चिमनत असता स्पष्टरवींत मिळवावे, म्हणजे तो दशमभाव होतो. दशमभावात ६ राशि मिळविल्या म्हणजे तो चतुर्थभाव होतो ह्याच ग्रंथांत पूर्वी सांगितल्याप्रमाणे स्पष्टलग्न तयार करावें. म्हणजे तो प्रथमभाव होतो. यात सहा राशि मिळविल्या म्हणजे तो सप्तमभाव होतो. नंतर दशमभावातून सप्तमभाव वजा करून बाकीला ६ नीं भागावें, राश्यादि भागाकार येईल तो १ राशींतून वजा करून बाकी घ्यावी मग राश्यादि भागाकार पुनः पुनः लग्नात मिळवावा, आणखी वरील बाकी पुनः पुनः चतुर्थभावात मिळवावी, म्हणजे लग्नापासून संधीसहित ६ भाव तयार होतात, त्या प्रत्येकात ६ राशि मिळवाव्या म्हणजे सप्तमादि पुढचे ६ भाव तयार होतात.

संध्यंशतुल्य इत्याद्युक्तं तत्र के ते संधयः के ते भावा इत्यपेक्षायां तत्साधनं किंचित्स्थूलमेकेन वृत्तेनाऽऽह–भागाःस्युरिति । नतनाडिका रसहता भागाः स्युः । नतसाधनं जातकपद्धतावुक्तं । रात्रेः शेषमितं युतं दिनदले नाह्नो गतं शेषकं विश्लेष्यं खलु पूर्वपश्चिमनतमिति । एतदुक्तं भवति । सूर्येष्टलग्नाभ्यामिष्टकालं साधयित्वा नतं च साधयित्वा तदिष्टकालभवं नतं पड्गुणं क्षतभागाः स्युरित्यर्थः । प्राक्पश्चिमनतेन क्रमेण तन्न्यूनयुक् सूर्यः तैर्भागैर्न्यूनयुक् पूर्वनते सति न्यूनः पश्चिमनते सति युक् युक्तः तात्कालिकः सूर्यः खं स्यात् दशमभावः स्यादित्यर्थः । तत् खं दशमः भावः सरसं पड्राशियुक्तं सत् सुखं चतुर्थभावः स्यात् कथितवल्लग्नं प्रोक्तवल्लग्नं ज्ञेयं तत्सपड्भं पड्राशियुक्तं सत् मदः सप्तमभावः स्यात् । एवं भावचतुष्टयं साधयित्वांऽतर्भावसाधनमाह–व्यस्ताग्रत्रिलव इति । विगतः अस्तः अस्तभावो तस्मात्तद्व्यस्तं तच्च तत् अग्रं च व्यस्ताग्रं सप्तमभावरहितदशमभाव इत्यर्थः । तस्य त्रिलवो राश्यादिको ग्राह्यः अथ दकृच्युतः द्विपातितः कार्यः एवं उभौ केवलत्रिलवदकृच्युतत्रिलवौ पृथक् पृथक् कुदघ्नौ संतौ पृथक् पृथक् लग्ने अंबुनि च योज्यौ अयमर्थः । कुघ्नः त्रिलवो लग्ने योजितः सन् द्वितीयभावो भवति । दघ्नो लग्नयोजितः सन् तृतीयभावो भवति । अथ दकृच्युतः त्रिलवः कुघ्नः अंबुनि पूर्वसाधिते चतुर्थभावे योजितः सन् पंचमभावो भवति । तत्रैव द्घ्नोंबुनि योजितः षष्ठभावो भवति । ते पडनंतरसाधिता भावाः सपद् पड्राशिसहिताः कार्याः । ते तु सप्तमा ज्ञेयाः लग्नं सपड्भं मद इति यावत् ।

ते तु लग्नमुखा लग्नादयो भावाः स्युः । अथ संधिसाधनमाह–संधिर्द्वियोगोर्धक इति । द्वयोर्भावयोर्योगः आर्धितः संधिः स्यादिति स्पष्टम् ॥ अथ पाठांतरस्य व्याख्या–व्यस्तेति । सप्तमभावरहितस्य अखिलः षड्भागो राश्यादिकः स पृथक् भूच्युत एकस्मात्प तित इमौ उभौ भूयः वारंवारमंगपातालयोः प्रथमचतुर्थभावयोः क्षेप्यौ तनुतः लग्नात् ससंधयः संधिसहिताः षड्भावाः स्यु । इमे भावा । षड्भावान्विताः संतः परे ससंधयो भावाः स्युः एवं भावसंधिसाधनं कृत्वा संध्यंशतुल्यो फल इति प्रागुक्तं ग्रहफलं विचार्य अंतरे अनुपातः भावसंध्यंतरेणाप्तं संधिखेटांतरात्फलमिति जातकपद्धतेः । एतत्स्थूलभावानयनं । सूक्ष्मं तु जातकपद्धतावगंतव्यम् ॥

टीकार्थ–संधीच्या अंशांशी तुल्य ग्रह असें सांगितलें आहे तें कसें व त्यामध्यें ते संधि कोणते व भाव कोणते अशी अपेक्षा आली असता त्याचें स्थूलमानाचें साधन एका वृत्तानें सांगतों–नत कसें साधावें हें जातक पद्धतींत सांगितलें आहे. जो गुणाकार येतो तो नतपूर्व असेल तर रवीमधून वजा करावा आणि नत पश्चिम असेल तर तो गुणाकार रवीमध्यें मिळवावा. सूर्य आणि इष्टलग्न ह्यापासून इष्टकाळ साधावा आणि नतही सिद्ध करावें. जें इष्ट काळाचें नत असेल त्याला ६ नीं गुणावें आणि तें नत पूर्व असेल तर सूर्यांतून वजा करावें आणि पश्चिम नत असेल तर सूर्यांत मिळवावें, नतर जो सूर्य येतो तो दशमभाव समजावा. त्या दशम भावात ६ राशि मिळविल्या असतां तो सुख म्हणजे चतुर्थभाव झाला. ह्याच ग्रंथांत पूर्वी सांगितल्याप्रमाणें लग्न तयार करावें तोच प्रथम भाव समजावा. त्या प्रथम भावात ६ राशि मिळविल्या असतां मद ह्म० सप्तम भाव तयार होतो. अशा रीतीनें दशमभाव, चतुर्थभाव, प्रथमभाव आणि सप्तमभाव असे चार भाव तयार केल्यावर मग इतर भावाचे साधन सांगतों–ख ह्म० दशम भावातून अस्त ह्म० सप्तमभाव वजा करावा. त्याचे राशि, अंश, कला वगैरे भाग घ्यावेत, तो दोन ठिकाणीं मांडावा. हे दोन त्रिलवादि घेतले आहेत त्यापैकीं एकातून वजा करून जी बाकी येईल ती लग्नात मिळविली असता द्वितीय भाव तयार होतो. दुसऱ्यातून दोन वजा करून जी बाकी ती लग्नात मिळविली असता तिसरा भाव होतो. पुनः राश्यादि भाव दोन ठिकाणीं मांडलेला असेल त्यापैकीं एका भागातून एक वजा केल्यावर जी बाकी राहील ती चतुर्थ भावांत मिळविली असता पंचम भाव तयार होतो, तोच चतुर्थ भावात मिळविला असता षष्ठ भाव तयार होतो, असे सहा भाव साधून तयार केल्यावर मग त्यात सहा राशी मिळविल्या असतां, सातवा भाव तयार होतो म्हणजे लग्नात सहा राशी मिळविल्या असता मद ह्म० सप्तमभाव तयार होतो. अशा रीतीनें लग्नादि भाव सांगितले. आता संधिसाधन सांगतो–दोन भावाची बेरीज करून त्याचें अर्ध केलें असता ते त्या दोन भावाचा संधि होतो.

उदाहरण–शके १८५३ अधिक भाद्रपद कृ. ३० शनिवार ता. १२ सप्टेंबर १९३१ या दिवशीं सूर्योदयापासून घ. ९, घ. १८, घ. ३८ आणि घटी ५० अशा चार वेळेचें नतसाधन करू. ह्या दिवशींचे दिनमान ३० घटिका ४० पळें; दिनार्ध १५ घ. २० पळे, रात्रिमान २९ घ. २० पळें, रात्र्यर्ध १४ घ. ४० प. इष्टकाल घ. ९ ह्या दिनार्ध १५–२० ह्यांतून वजा करता ६ घ. २० पळें हे पूर्वनत आले.

इष्टकाल घ. १८ ह्या वेळेपासून अस्तापर्यंत दिनशेष १२ घ. ४० पळें राहिली. ती दिनार्ध १५–२० यातून वजा करितां २–४० हे पश्चिमनत झाले.

इष्टकाल घ. ३८ म्हणजे सूर्यास्तापासून ७ घ. २० पळें ही दिनार्ध १५–४० यात मिळविली तेव्हां २३–० हे पश्चिमनत झाले.

इष्टकाल घटी ५० ह्यापासून सूर्योदयापर्यंत १० घटिका ( रात्रिशेष ) राहिल्या त्या दिनार्धांत मिळविल्या तेव्हां २५–४० हे पूर्वनत झालें.

उदाहरण.—घ. १८ ह्यावेळचे पश्चिमनत २ घ. ४० प.यांस ६ नीं गुणिलें तेव्हां १६ अंश आले ते

स्पष्टरवी ४ रा. २९ अं. ४१क. यात मिळवितां ५रा. १५ अं. ४१क. हा दशमभाव झाला. दशमभावां ६ राशी मिळविल्या तेव्हा ११ रा. १५ अं. ४१ क. हा चतुर्थभाव आला. इष्टकाल घ. १८ ह्यावेळ स्पष्ट लग्न ८ रा. ८ अंश ५० कला हा प्रथमभाव होय. व ह्यात ६ राशी मिळविल्या तेव्हां २ रा. ८ अं ५० कला हा सप्तमभाव झाला.

आतां बाकीचे भाव काढावयाचे म्हणून दशमभाव ५–१५–४१–० यांतून सप्तमभाव २-८-५०- वजा करून बाकी ३-६-५१ हिला ६ नीं भागून राश्यादि भागाकार ०-१६-८-३० हा १ राशींतून वजा करून बाकी ०-१३-५१-३० निघाली. लग्न अर्थात प्रथमभाव ८-८-५० ० ह्यात राश्यादि भागाकार ० १६ ८-३० मिळविला तेव्हां ८-२४ ५८-३० हा प्रथम भावसंधी झाला. त्यांत पुनः ०-१६-८-३० मिळविले तेव्हां ९-११ ७-० हा द्वितीयभाव झाला. त्यात पुनः ०-१६-८-३० मिळवितां ९-२७-१५-३० हा द्वितीय भावसंधि झाला. त्यांत पुनः ०-१६ ८ ३० मिळवितां १०-१३-२४ ० हा तृतीयभाव झाला. यांतच पुनः ०-१६ ८ ३० मिळवितां १०-२९ ३० हा तृतीयभाव संधि आला. चतुर्थभाव ११-१५ ४१-० हा तयार आहेच. त्यात पूर्वीची बाकी ०-१३-५१-३० ही मिळवितां ११-२९-३२ ३० हा चतुर्थभावसंधी आला. यातच पुनः बाकी ० १३-५१ ३० मिळवितां ०-१३-२४ ० हा पंचमभाव झाला. ह्यांत पुनः बाकी ०-१३ ५१-३० मिळवून ० २७ १५-३० हा पंचमभावसंधी. यांत पुनः बाकी ० १३-५१-३० मिळवितां १-११-६-० हा षष्ठभाव झाला. आणि यांतच पुनः बाकी मिळवितां १ २४-५७-३० हा षष्ठभाव संधि झाला ह्याप्रमाणें संधीसह ६ भाव तयार झालें म्हणजे त्या प्रत्येकात ६ राशी मिळवाव्या म्हणजे त्याच्या समोरचे सहा भाव संधीसह तयार होतात.

## सूक्ष्म दशमभाव साधन. पूर्वनताचीं उदाहरणें.

पश्चिमनत आणि पूर्वनत यापैकीं इष्टकाळीं जे नत असेल त्यांवरून दशमभाव साधावयाचा असतो. इष्टकाळीं पश्चिमनत असतां नतघटीवरूनच अंशादि साधन करून दशमभाव काढतां येतो. पण इष्टकाळीं पूर्वनत असतां दशमभाव काढण्यास निराळ्याच तऱ्हेनें गणित करावें लागतें. ती माहिती खालीं दिली आहे.

रात्रीं मध्यान्हांपासून दिवसां मध्यान्हापर्यंत इष्टकाल असल्यास पूर्वनत आहे असें समजावें.

मध्यरात्रींपासून सूर्योदयापर्यंत इष्टकाल असल्यास इष्टकालापासून सूर्योदयापर्यंत शेष राहिलेलीं घटिका पलें त्या दिवशींच्या दिनार्धांत मिळवावी.

सूर्योदयापासून दिवसा मध्यान्हापर्यंत इष्टकाल असल्यास इष्टकालापासून दिवसमध्यान्हापर्यंत येणारी घटिकापलें त्या दिवसाच्या दिनार्धांत वजा करावींत.

वरीलप्रमाणें केल्यानंतर अनुक्रमें जी बेरीज किंवा वजाबाकी येईल तो घटीपलात्मक पूर्वनतकाल समजावा.

हा पूर्नतकाल ३० घटिकांतून वजा करावा, व बाकी जीं घटिकापलें येतील तीं पूर्व उन्नतकालाचीं आलीं असें समजावें.

याप्रमाणें येणारा पूर्वउन्नतकाल हाच इष्टकाल समजून त्यावेळेचा स्पष्टसूर्य तयार करावा व त्यांत ६ राशी मिळवाव्या.

नंतर लंकोदयावरून पूर्वोन्नतकालाचे ( अर्थात् इष्टकाल तोच धरला असल्यामुळें ) स्पष्टलग्न साधावें म्हणजे तोच दशमभाव होतो.

वर पूर्वोन्नतकाल हाच इष्टकाल समजून त्यावेळेचे स्पष्टलग्न लंकोदयावरून साधावें असें सांगितलें आहे याचें कारण दशमभावसाधनास लंकोदयच घेतले पाहिजेत. स्वोदय किंवा निरयनउदय घेऊन चालणार नाहीं हें होय.

लंकोदय म्हणजे शून्य अक्षांशावरील मेषादि १२ राशींचे उदय. ते पूर्वी दिलेलें आहेत.

उदाहरणार्थः—शके १८४८ अधिक ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमा गु[illegible] (ता. २७ मे १९२६ ) त्या दिवशीं सूर्योदयात् प्राक् पूर्वी घटि ६ प. ४० या[illegible] नतकाल [illegible] काढं.

10074

त्याचप्रमाणें याच दिवशीं सूर्योदयात् गत घटि ८ या वेळेच्या दशमभाव काढूं.

इष्टदिवशीं दिनमान ३२ घ. ४६ पळें आहे. अर्थात् दिनार्ध १६ घ. २३ प. आलें. त्यांत (इष्टकाल मध्यरात्रीपासून सूर्योदयाच्या दरम्यान असल्यामुळें ) इष्टकालापासून सूर्योदयापर्यंतचीं ६ घ. ४० प. मिळविलीं, तेव्हां २३ घ. ३ प. हें पूर्वनत् झालें. याचे उन्नत काढण्याकरिता ३० घटिकातून वजा केलें तेव्हां ६ घ. ५७ पळें बाकी आली. अर्थात् हें पूर्वोन्नत झालें.

इष्टदिवशीं म. सूर्योदयाचा स्पष्टरवि १ राशि १६ अंश ९ कला २८ विकला आहे, तो ६घ.५७पळें या वेळेचा करावयाचा, म्हणून त्यातरवीची दिनगति ५७ कला ३४ विकला, यावरून ६ घटिका ५७ पळास येणारें चालन ६ कला ४२ विकला आणि ५८ प्र. विकला त्यात मिळविलें असता स्पष्टरवि १ राशि १६ अंश १६ कला १० विकला आणि ५८ प्र. वि. आला. त्यांत ६ राशि मिळविल्या. तेव्हा ७ राशि १६ अंश १६ कला १० विकला आणि ५८ प्र. वि. हा रवि झाला आतां हा रवि धरून घटि ६ पळें ५७या वेळचें लग्नसाधन करूं.

स्पष्टरवि ७ राशि १६ अंश १६ कला १० विकला यात अयनांश १८ अंश ५० कला४०विकला इतके मिळविलें तेव्हा सायनरवि ८ राशि ५ अंश ६ कला ५० विकला इतका आला. यातील राशीचा अंक बाजूस ठेऊन राहिलेले अंश, कला, विकलादि धनु राशीचे भुक्त अंशादि आले. तें ३० अंशांतून वजा करिता २४ अंश ५३ कला १० विकला हे धनु राशीचे भोग्य राहिलें. हे अंश धनुराशीचे असल्यानें धनुराशीचे लंकोदय ३२३ यानीं भोग्यांश २५ ( भोग्यांश २४ अंश ५३ कला असल्यामुळें २५ अंश धरलें ) यांस गुणिले तेव्हां ८०७५ आलें, त्यास ३० नीं भागिलें असता २६९ पळें भागाकार आला. हीं पळें धनुराशीचीं भोग्य राहिलीं. आपणास ज्या वेळचा दशमभाव काढावयाचा आहे त्या घटिका म्हणजे पूर्वोन्नत घटिका ६ पळें ५७ यांचीं एकंदर पळें ४१७ झालीं. त्यातून वरील २६९ पळें वजा केलीं, तेव्हा बाकी १४८ पळें राहिलीं. त्यातून मकरराशीचा लंकोदय वजा जात नाहीं अर्थात् हा अशुद्धोदय आला. म्हणून १४८ पळास ३० नें गुणिलें. गुणाकार ४४४० यास मकरराशीचे लंकोदय ३२३ पळें यानीं भागिलें असता भागाकार १३ अंश आला. बाकीस ६० नीं गुणून पूर्ववत् भागिलें. भागाकार ४४ ह्या कला आल्या. पुन्हा बाकीस ६० नीं गुणून पूर्ववत भागिलें असता भागाकार ४६ विकला आल्या. याप्रमाणें ९ राशी १३ अंश ४४ कला ४६ विकला इतका अयनांशासहित दशमभाव आला. यातून १८ अंश ५० कला ४० विकला हे अयनांश वजा केले तेव्हां ८ राशी २४ अंश ५४ कला आणि ६ विकला हा स्पष्ट निरयन दशमभाव झाला.

सूर्योदयात् प्राक् गतघटि ६ पळें ४० या वेळचें स्पष्टलग्न शून्य राशि ( मेष ) १ अंश आहे.

उदाहरण दुसरें:—अधिक ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमा सूर्योदयात् गत घ. ८ या वेळचा दशमभाव काढूं:—

दिनार्ध १६ घ.२३ पळें यातून इष्टकाल ८ घटिका वजा केल्या. बाकी ८ घ. २३ पळें हें पूर्वनत आलें. हे तिसांतून वजा केले असता २१ घ. ३७ पळें हें पूर्वोन्नत झालें.

सूर्योदयाचा स्पष्टरवि १ राशि १६ अंश ९ कला २८ विकला यात २१ घटिका ३७ पळाची गति २० कला २८ विकला मिळविली तेव्हां १ राशि १६ अंश २९ कला ५६ विकला इतका स्पष्ट रवि झाला. त्यांत ६ राशि मिळविल्या. तेव्हां ७ राशि १६ अंश २९ कला ५६ विकला हा रवि आला. आता दशमसाधन करावयाचें.

आलेल्या रवींत अयनांश १८ अंश ५० कला ४० विकला मिळविलें, तेव्हा ८ राशि ५ अंश २० कला ३६ विकला हा सायनरवि झाला. याच्यातील राशीचे अंक बाजूस ठेऊन ५ अंश २० कला ३६ विकला हें तीस अंशांतून वजा केले. तेव्हा २४ अंश ३९ कला २४ विकला म्हणजे सुमारें २५ अंश धनुराशीचे रविभोग्य राहिलें. त्यांस धनुराशीचे लंकोदय ३२३ पळें यांनीं गुणून ३० नें भागिलें. तेव्हां २६९ पळें धनुराशीची भोग्य राहिली.

पूर्व-उन्नत इष्टकाल २१ घ. ३७ पळें; म्हणजे १२९७ पळें यांतून रविभोग्य धनुराशीचीं पळें



1074

स्पष्टरवी ४ रा. २९ अं. ४१क. यांत मिळवितां ५रा. १५ अं. ४१क. हा दशमभाव झाला. दशमभावांत ६ राशी मिळविल्या तेव्हां ११ रा. १५ अं. ४१ क. हा चतुर्थभाव आला. इष्टकाल घ. १८ ह्यावेळचें स्पष्ट लग्न ८ रा. ८ अंश ५० कला हा प्रथमभाव होय. व ह्यात ६ राशी मिळविल्या तेव्हां २ रा. ८ अं. ५० कला हा सप्तमभाव झाला.

आतां बाकीचे भाव काढावयाचे म्हणून दशमभाव ५–१५–४१–० यांतून सप्तमभाव २-८-५०-० वजा करून बाकी ३-६-५१ हिला ६ नीं भागून राश्यादि भागाकार ०-१६-८-३० हा १ राशींतून वजा करून बाकी ०-१३-५१-३० निघाली. लग्न अर्थात प्रथमभाव ८-८-५० ० ह्यांत राश्यादि भागाकार ० १६ ८-३० मिळविला तेव्हां ८-२४ ५८-३० हा प्रथम भावसंधी झाला. त्यांत पुनः ०-१६-८-३० मिळविले तेव्हां ९-११-७-० हा द्वितीयभाव झाला. त्यात पुनः ०-१६-८-३० मिळवितां ९ २७-१५-३० हा द्वितीय भावसंधि झाला. त्यांत पुनः ०-१६-८ ३० मिळवितां १०-१३-२४ ० हा तृती झाला. यांतच पुनः ०-१६ ८ ३० मिळवितां १०-२९ ३० हा तृतीयभाव सधि आला. चतुर्थ ११-१५ ४१-० हा तयार आहेच. त्यात पूर्वीची बाकी ०-१३-५१-३० ही मिळवितां ११-२९-३२ ३० हा चतुर्थभावसंधी आला. यांतच पुनः बाकी ० १३-५१ ३० मिळविता ०-१३-२४ ० हा . झाला. ह्यांत पुनः बाकी ०-१३ ५१-३० मिळवून ० २७ १५-३० हा पंचमभावसंधी. यांत पुनः बाकी ० १३-५१-३० मिळवितां १-११-६-० हा षष्ठभाव झाला. आणि यांतच पुनः बाकी मिळवितां १ २४-५७-३० हा षष्ठभाव संधि झाला ह्याप्रमाणें संधीसह ६ भाव तयार झाले म्हणजे त्या प्रत्येकांत ६ राशी मिळवाव्या म्हणजे त्याच्या समोरचे सहा भाव संधीसह तयार होतात.

## सूक्ष्म दशमभाव साधन, पूर्वनताचीं उदाहरणें.

पश्चिमनत आणि पूर्वनत यापैकीं इष्टकाळीं जे नत असेल त्यावरून दशमभाव साधावयाचा असतो. इष्टकाळीं पश्चिमनत असता नतघटीवरूनच अंशादि साधन करून दशमभाव काढतां येतो. पण पूर्वनत असतां दशमभाव काढण्यास निराळ्याच तऱ्हेनें गणित करावें लागतें. ती माहिती खालीं दिलीं आ

रात्रीं मध्यान्हापासून दिवसां मध्यान्हापर्यंत इष्टकाल असल्यास पूर्वनत आहे असें समजावें.

मध्यरात्रींपासून सूर्योदयापर्यंत इष्टकाल असल्यास इष्टकालापासून सूर्योदयापर्यंत शेष राहिलेलीं घटि-पळें त्या दिवशींच्या दिनार्धांत मिळवावी.

सूर्योदयापासून दिवसा मध्यान्हापर्यंत इष्टकाल असल्यास इष्टकालापासून दिवसमध्यान्हापर्यंत घटिकापळें त्या दिवसाच्या दिनार्धांत वजा करावीत.

वरीलप्रमाणें केल्यानंतर अनुक्रमें जी बेरीज किंवा वजाबाकी येईल तो घटीपलात्मक पूर्वनत समजावा.

हा पूर्नतकाल ३० घटिकांतून वजा करावा, व बाकी जीं घटिकापळें येतील तीं पूर्व ... आलीं असें समजावें.

याप्रमाणें येणारा पूर्वउन्नतकाल हाच इष्टकाल समजून त्यावेळेचा स्पष्टसूर्य तयार करावा व त्यात राशी मिळवाव्या.

नंतर लंकोदयावरून पूर्वोन्नतकालाचे (अर्थात् इष्टकाल तोच धरला असल्यामुळें) स्पष्टलग्न साधावें म्हणजे तोच दशमभाव होतो.

वर पूर्वोन्नतकाल हाच इष्टकाल समजून त्यावेळेचे स्पष्टलग्न लंकोदयावरून साधावें असें सांगितलें आ- याचें कारण दशमभावसाधनास लंकोदयच घेतले पाहिजेत. स्वोदय किंवा निरयनउदय घेऊन नाहीं हें होय.

लंकोदय म्हणजे शून्य अक्षांशावरील मेषादि १२ राशींचे उदय. ते पूर्वी दिलेलें आहेत.

उदाहरणार्थः—शके १८४८ अधिक ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमा गुरुवार (ता. २७ मे १९२६) दिवशीं सूर्योदयात प्राक पूर्वी घटि ६ प. ४० या वेळचा नतकाल व दशमभाव काढ.

## अयनांश १९ चें दशमभावकोष्टक व द्वादशभाव.

स्पष्ट लग्न तयार केल्यानतर द्वादशभावाकरिता दशमभाव काढावा लागतो व त्यास नतउन्नत इत्यादिकाच्या भानगडी कराव्या लागतात. त्याची सोदाहरण माहिती वर दिली असून शिवाय दशमभावाचें आयतें तयार कोष्टक दिलें आहे. इष्टलग्नाच्या कोष्ट्यात इष्ट लग्नाच्या अंशासमोर जो राशि व जो अंश असेल तो त्या लग्नाच्या त्या अंशाचा दशमभाव समजावा. उदाहरणार्थ, आपलें स्पष्टलग्न कर्क १८ अंशात आहे तर कर्क लग्नाखालील व १८ अंशासमोरील कोष्ट्यात मीनेचे १५ अंश आहेत. अर्थात् मीनेचे १५ अंश हा दशमभाव आला.

**सिद्धांतोक्त किंवा करणग्रंथोक्त सांगितलेल्या रीतीनें सूक्ष्म दशमभाव काढावा किंवा** आयता, दशमभाव कोष्टकावरून, स्पष्टलग्नाच्या अंशावरून दशमभाव घ्यावा. दशम भावातून सप्तम भाव वजा करून (स्पष्टलग्नात ६ राशि मिळवाव्या, म्हणजे सप्तमभाव होतो.) बाकी राश्यादि येईल ती ६ राशीतून वजा करावी. व ६ राशींतून वजा करण्यापूर्वीचे राश्यादि व ६ राशींतून वजा केल्यानंतरचे राश्यादि यांचे प्रत्येकीं ३ भाग करावें आणि अनुक्रमें सप्तम भावापासून मिळवीत जावें, म्हणजे सप्तम भावापासून लग्नापर्यंत भाव तयार होतील व त्या प्रत्येकात ६ राशी मिळविल्या असतां त्याच्या समोरचे भाव येतील.

उदाहरणार्थ जन्मलग्न मेषेच्या १० अंशात आहे, तेव्हा त्याचा दशमभाव कोष्टकातून मकर २ अंश आला. मेष १० अंशात ६ राशी मिळवितां तूळ १० अंश सप्तम भाव झाला. दशम भावातून सप्तम भाव वजा केला, बाकी २ रा. २२ अंश आले. ते ६ राशींतून वजा करता ३ रा. ८ अंश आले. या दोन्हींचे प्रत्येकीं ३ भाग केले तेव्हा अनुक्रमें प्रत्येकीं २७ अंश. २० क. चे ३ भाग व १ रा. २ अंश ४० कलाचे ३ भाग झाले. ते सप्तम भावापासून मिळवीत जाता खालीलप्रमाणें द्वादश भाव येतात.

| | रा. अ. क. |
|---|---|
| सप्तम | ६—१०— ० |
| | +—२७—२० |
| अष्टम | ७— ७–२० |
| | +—२७–२० |
| नवम | ८— ४–४० |
| | +—२७–२० |
| दशम | ९— २– ० |
| | +१— २–४० |
| एकादश | १०— ४–४० |
| | +१— २–४० |
| द्वादश | ११— ७–२० |

| | |
|---|---|
| | ११— ७–२० |
| | +१— २–४० |
| प्रथम | ०—१०— ० |
| द्वितीय | १— ७–२० |
| तृतीय | २— ४–४० |
| चतुर्थ | ३— २– ० |
| पचम | ४— ४–४० |
| षष्ठ | ५— ७–२० |

याप्रमाणें द्वादशभाव थोडक्यात येतील. ही माहिती वारवार लागते मुद्दाम सविस्तर दिली आहे.

टीपः—वरीलप्रमाणें काढलेल्या कोणत्याही दोन भावाचा जो मध्य तो भावसंधी, म्हणजे भावाचा विरामसंधि व पुढील भावाचा आरंभसंधि होय.

द्वादशभावाचे संधि काढावयाचें असतां अनुक्रमें कोणत्याही दोन भावांची वजाबाकी करावी बाकी येईल त्याचा अर्धांभाग घेऊन तो त्या भावाच्या राश्यादिकात मिळवावा म्हणजे राश्यात्मक काल निघतो.

दुसरी रीती अशी आहे कीं दशमभावातून सप्तमभाव वजा केल्यानंतर येणाऱ्या बाकीचे ६ करावें त्याचप्रमाणें तीच बाकी ६ राशींतून वजा करून येणाऱ्या बाकीचे ६ भाग करावें व ते सप्तमभावापासून दशमभावापर्यंत व दशमभावापासून लग्नभावापर्यंत मिळवित जावें म्हणजे संधीसह पासून लग्नापर्यंतचे ६ भाव तयार होतात त्या प्रत्येकांत ६ राशी मिळवाव्या म्हणजे बाकीचे ६ भाव

येणेंप्रमाणें प्रत्येक चरण समाप्तीचा घटीपलात्मक काळ आणि त्या प्रत्येक चरण समाप्तीचे वेळचा स्पष्टचंद्र तयार झाला. आता दुसऱ्या रीतीनें ह्याच चंद्र तयार करू.

मघा नक्षत्र १० वें त्यास ४ नें गुणून आलेल्या ४० या संख्येस २०० नें गुणिलें तेव्हां ८००० संख्या आली यास ६० नें भागिलें असता १३३ अंश २० कला म्हणजे ४ राशी १३ अंश २० कला स्पष्टचंद्र मघा नक्षत्र समाप्तीचा झाला. त्यात प्रत्येकीं ३ अंश २० कला मिळविल्या म्हणजे किंवा ४१ चरण, ४२ चरण, ४३ चरण, आणि ४४ चरण ह्या प्रत्येकास २०० नें गुणून ६० नें भागले असता त्या त्या चरण समाप्तीचा चंद्र होतो. २७ नक्षत्राचे प्रत्येकीं ४ चरण म्हणजे सर्व राशी चक्राचे १०८ चरण होतात व ह्यालाच नवमांश म्हणतात अशा तऱ्हेनें राशिचक्राचासर्व निरनिराळ्या प्रकारानीं व गोष्टीनीं एकमेकाशीं कायम राखलेला आहे. व त्यामुळें कोणत्याही एखाद्या ठिकाणीं कांहीं फरक किंवा चूक झाल्यास ती सहज कळून येते.

आता नक्षत्र चरणाच्या गतीचे स्पष्टीकरण करू. नक्षत्राचे परम अल्पमान ४९॥ घटिका आणि परम वृद्धिमान ६९॥ घटिका असें आहे अर्थात् नक्षत्राच्या एका चरणाचें प्रमाण कमींत कमी १२। घटिका व जास्तींत जास्ती मान १७।' घटिका येते. हें कमजास्त प्रमाण चद्रगतीवर अवलंबून असते आणि ती चद्रगति इष्टचरणाला किती हें इष्ट चरणाच्या घटी पळावरून स्पष्ट समजते. इष्टचरणाच्या घटीपळांचीं पळें करून त्यास ४ नीं गुणावें व त्या संख्येनें ७२०००० यास भागावें. भागाकार कलात्मक येईल त्याचे अंश करावे म्हणजे येणाऱ्या अंश,कला,ही इष्ट चरणाची चद्रगति झाली. त्यावरून मधला चद्र तयार करता येईल.

## चंद्रगतीचे चढते व उतरतें मान.

चद्रगती कांहीं काळ कांहीं प्रमाणात वाढत जाते व त्याचप्रमाणें कमी होते. दैनिक किंवा दिननक्षत्र ज्या वेळीं बरोबर ६० घटिका असते त्यावेळीं चद्रगति एका दिवसात १३ अंश २० कला येते. दिननक्षत्र ६० घटीपेक्षां वाढू लागले म्हणजे चद्रगति उत्तरोत्तर कमी होते आणि दिननक्षत्र ६० घटीपेक्षा कमी होऊ लागले म्हणजे चद्रगति वाढत जाते. याप्रमाणें चद्रगतींत एकसारखा फरक होत असतो आणि त्यामुळेंच तिथि, नक्षत्रें याची घटीपळें दररोज बदलत जातात.

दररोज चद्रगतींत फरक होत असल्याकारणानें ज्या वेळीं अत्यत सूक्ष्मरीतीनें चद्रसाधन किंवा गति साधन करावयाचें असेल तेव्हा ते कोणत्याही करणग्रथावरून किंवा स्वतत्र सूक्ष्म अशा चद्रसाधन कोष्टकावरूनच करावें लागतें व करतात. यात दिलेल्या रीति बऱ्याच जारकाईच्या आहेत पण अतिसूक्ष्म नाहींत. तथापि तेवढ्यानें कोणताही विलक्षण फरक पडणार नाहीं दोन दिवसातील चद्रगतींचे जे अतर ते जर ६० घटिकास तर त्यातील इष्टकालास काय या प्रमाणानें चद्र गत्यतर काढावें.

## स्पष्टरवी, कोणताही तिथ्यंत व पर्वकाल यावरून स्पष्टचंद्र.

स्पष्टरवि आणि तिथ्यंताची वेळ ह्या दोन गोष्टींवरूनही स्पष्टचद्र सहज काढता येतो. मात्र त्या तिथ्यंतीचा स्पष्टरवी अगदीं नक्की पाहिजे अमावास्यातापासून (अमावास्यातास रवि चद्र हे अगदीं राशी, अंश, कला, विकलात्मक समान स्थितींत असतात.) रवीच्या पुढें बरोबर १२ अंश चद्र गेला म्हणजे १ तिथि पूर्ण होते. यावरून इष्ट तिथि ज्यावेळीं पूर्ण होत असेल त्या वेळचा स्पष्ट रवि तयार करून त्यात जी तिथी पूर्ण होते त्या तिथीस १२ नें गुणून येणारे राशी अशादि फल स्पष्ट रवींत मिळवावें म्हणजे त्या वेळचा स्पष्टचद्र झाला. प्रत्येक तिथ्यंतींचा स्पष्टचद्र याप्रमाणें करता येतो. पौर्णिमा समाप्ति कालीं-बरोबर रवीच्या समोर ६ राशीवर चद्र असतो आणि अमावास्याताचे वेळीं सूर्याशतकाच चद्र असतो. शुक्र पक्षाच्या ७॥ तिथी पूर्ण होताना रवीच्या पुढें चद्र बरोबर ९० अंशावर असतो आणि कृष्ण पक्षाच्या ७॥ तिथी पूर्ण होण्याचे वेळीं रवीपासून चद्र बरोबर २७० अंशावर असतो.

शके १८५५'च्या ज्येष्ठ शु. १५ व कृष्ण ३० या दिवशींच्या रवि चंद्राच्या स्थितीवरून याचे स्पष्ट दिग्दर्शन होईल.

ज्ये. शु. १५ गुरुवारीं सकाळीं १० घटिका १ पळानीं पौर्णिमा संपते ह्या दिवशीं सकाळीं स्पष्ट रवी १ रा. २७ अं. ५१ क. ११ वि. आहे त्यात १० घ. १ पळाचे गतिफल ९ कला ३३ विकला हें मिळवितां १ रा. २८ अं. ० क. ४४ इतका स्पष्ट रवि पौर्णिमातींचा झाला. ह्यांत ६ राशी मिळविल्या तेव्हा ७ राशी २८ अंश ० कला ४४ वि. इतका स्पष्टचंद्र होतो.

आता ज्येष्ठ कृ. ३० ची स्थिति पाहूं. ज्येष्ठ कृ. ३० सूर्योदयानंतर घटी ० प. २६ यावेळीं संपते. सूर्योदयाचा स्प. रवी २ रा. १२ अं. १० क. ३८ वि. आहे त्यात २६ पळाचे गति फल मिळविता तो २ राशी १२ अं. ११ क. १ वि. येतो. स्पष्ट चंद्र सकाळचा २ राशी १२ अंश ३ कला ५५ विकला म्हणजे रवि चंद्रांत ७ कला अंतर रवीच्या मागें चंद्र आहे ह्या ७ कला चंद्र २६ पळात पुढें जाऊन बरोबर रवीच्या स्थितींत येईल. तात्पर्य वर दिल्याप्रमाणें अमावास्याताला रवि चंद्र समान स्थितींत येतात.

शुद्धपंचांगांत ग्रहाची व चंद्राची दिलेली स्थिती अतिशय सूक्ष्म व अनेक सूक्ष्म संस्कारानें युक्त अशी वेधसिद्ध असते. तितकी सूक्ष्मता निरनिराळ्या रीतीनें केलेल्या पद्धतीवरून तंतोतंत येणार नाहीं. बहुतेक सर्व प्रसंगीं चंद्र जमेल. पण काहीं प्रसंगीं क्वचित् काहीं कला कमजास्त राहणें शक्य आहे हें ध्यानांत ठेवावें व अशा वेळीं पंचागस्थ स्थितीच मुख्य व ग्राह्य मानली पाहिजे. कारण त्यात अत्यंत सूक्ष्म गति स्थितीचा विचार करून अनेक संस्कारयुक्त गणित केलेले असते अर्थात् अत्यंतसूक्ष्म आणि क्रमसन्निकर्षणपद्धतिप्रमाणें क्रमाक्रमानें येणारी फलसूक्ष्मता यांत इतकी कसर राहणार याबद्दल वादच नाहीं.

## नक्षत्रताऱ्याशीं चंद्रयुति, ग्रहचंद्रयुति किंवा नक्षत्रात्मक चंद्रगतीवरून स्पष्टचंद्र.

अश्विनीपासून रेवतीपर्यंतच्या २७ नक्षत्रांचे योग तारे ( म्हणजे प्राचीन आचार्योनीं व ऋषिवर्यांनीं हजारों वर्षांच्या निरीक्षणानें ठरविलेला प्रत्येक नक्षत्रचा मुख्य तारा ) प्राचीन अशा दिव्यदृष्टीच्या आचार्यांनी ठरविलें असून त्याचे आरंभस्थानापासून बरोबर अंतरही सांगितलें आहे. हजारो वर्षे ह्या ताऱ्याची स्थिति बरोबर अनुभवास येत आहे इतकेंच नव्हे तर ह्या निश्चित अशा मुख्य आधारस्तंभावरूनच जुनी पंचागें निश्चितपणें चुकीची आहेत हें सिद्ध होत आहे.

ह्या २७ नक्षत्रापैकीं ज्या नक्षत्राचे तारे ठळक आहेत व क्रांतिवृत्तावर आहेत त्या ताऱ्याशीं ग्रहाची किंवा चंद्राची युति झाल्यास सामान्य माणसासदेखील ती सहज ओळखता येते. प्राचीन आचार्योनीं राशीचक्राच्या आरंभस्थानापासून कृत्तिकातारा ४० अंशावर म्हणजे १ राशी १० अंशावर, मघातारा ४ राशी ९॥ अंशावर, चित्रातारा ६ राशी ४ अंशावर, ज्येष्ठातारा ७ राशी २० अंशावर आणि रेवतीतारा १२ राशी ० अंशावर म्हणजे बरोबर राशीचक्राच्या अगदीं आरंभींच याप्रमाणें सांगितलें आहे व आज प्रत्यक्ष आकाशात तीच स्थिति स्पष्टपणें दिसत आहे. ह्या नक्षत्रताऱ्याची राशी अंशात्मक स्थिति कायमची, निश्चित, अचल व पूर्णपणें स्थिर अशी असल्यामुळें ज्यावेळीं कोणत्याही ग्रहाची किंवा नक्षत्राची ह्यापैकीं कोणत्याही नक्षत्रताऱ्याशीं युति होईल त्यावेळीं तो ग्रह किंवा चंद्र ह्या नक्षत्रताऱ्याइतक्याच अंशात बरोबर असणार व असला पाहिजे हें अगदीं उघड आहे आणि त्याप्रमाणें शुद्धपंचागात अगदीं तंतोतंत तशी स्थिति असते याबद्दल लक्षावधी लोकाची खात्री पटली आहे. आकाशात प्रत्यक्ष युती झाली असता जुन्या व केतकी वगैरे अशुद्ध पंचागात त्यावेळीं चंद्र व इतर ग्रह चार ते साडेचार अंश मागें असतात आणि बरोबर इतकीच व हीच भयंकर चूक त्याच्या पंचागांत राहिली आहे.

आकाशात ज्यावेळीं वर दिलेल्या नक्षत्राशीं चंद्रयुति करतो त्यावेळीं तो त्या नक्षत्रताऱ्याच्या राशी अंशाइतका असतो अर्थात् त्या नक्षत्राच्या ताऱ्याचे राशि अंश गाठीत असले म्हणजे गणित न करता स्पष्टही चंद्र सांगतां येतो.

जी स्थिति नक्षत्रताऱ्याच्या राशीअंशावरून कळते तशीच ग्रहचंद्र युतिवरूनही कळते. मात्र त्याकरितां ग्रहाची राशी अंशात्मक स्थिति माहीत असली पाहिजे. म्हणजे ज्या ग्रहाशी चंद्राची युति होईल तो ग्रह जितक्या राशी अंशामध्यें असेल तितकाच युतिकाली बरोबर चंद्र असणार, हे सांगावयास नको. अशा रीतिनें ग्रह-युतीवरूनही चंद्रस्थिति सहजासहजी कळते.

चंद्रगतिवरून सामान्यतः मधला चंद्र काढता येतो. मागें प्रत्येक चरण समाप्तीचा चंद्र काढण्याची रीति व त्या चरणाची चंद्रगति कशी काढावी हें सांगितलें त्यावरून एका चरणाच्या घटीपळास जर अमुक गति तर मागील चरण संपल्यापासून इष्ट कालपर्यंतच्या घटीपळास किती याप्रमाणें येणारें फल मागील चरण समाप्तीच्या स्पष्टचंद्रात मिळवावें म्हणजे इष्ट कालचा स्पष्टचंद्र झाला.

## कोणत्याही इष्ट तारखेचा वार काढणें.

( १ ) शतकांकास ५। नें गुणावें व पूर्ण संख्या घ्यावी.

( २ ) चालू शतकाच्या पुऱ्या झालेल्या वर्षांची १। पट करावी.

( ३ ) चालू वर्षाचे इष्ट तारखेसुद्धां म्हणजे जानेवारी १ पासून इष्ट तारखेसह दिवस घेऊन त्यांत दोन मिळवावें

आणि ह्या सर्वांची बेरीज करून तिला ७ नें भागावें बाकी १ राहिल्यास शनिवार, २ राहिल्यास रविवार, ३ राहिल्यास सोमवार, ४ राहिल्यास मंगळवार, ५ राहिल्यास बुधवार, ६ राहिल्यास गुरुवार आणि ० राहिल्यास शुक्रवार याप्रमाणें समजावें.

ह्या रीतीनें ता. ३० एप्रील, २१ जुलै व १३ नव्हेंबर १९३३ ह्या तीन दिवसाचे वार काढूं.

| ता. ३० एप्रील. | ता. २१ जुलै. | ता १३ नव्हेंबर. |
|---|---|---|
| १९ | १९ | १९ |
| ×५। | ×५। | ×५। |
| ९९।।। | ९९।।। | ९९।।। |
| ४० | ४० | ४० |
| १२२ | २०४ | ३१९ |
| ७ ) २६१ ( ३७ | ७ ) ३४३ ( ४९ | ७ ) ४५८ ( ६५ |
| २१ | २८ | ४२ |
| ५१ | ६३ | ३८ |
| ४९ | ६३ | ३५ |
| २ रविवार. | ०० शुक्रवार | ३ सोमवार. |

## ग्रहांच्या युति व त्यांचा काल.

दिवांकसोरंतरलिप्तिकौघात् गत्योर्वियोगेन हृताद्यदैकः।
वक्रीजर्यैक्येन दिनैरवाप्तै याता तयोः संयुतिरल्पभुक्तौ ॥ ३९८ ॥
वक्रेथवा न्यूनतरेन्यथैष्या द्वयोरनृज्वोर्विपरीत मस्मात् ॥ ३९९ ॥

सिद्धांत शिरोमणी—ग्र. यु. अ.

अधिकजवखगेऽधिकेऽल्पभुक्ते ऽथ कुटिलेऽल्पतरेऽनलोमतो वा ।
अनृजुगखगयोस्तु शीघ्रगेऽल्पे युतिरनयोः प्रगताऽन्यथा तु गम्या ॥ ४०० ॥

—ग्र. ला. युत्यधिकारः

मल्लारिः—अथ ग्रहयुतेर्गतैष्यताज्ञानमाह । ययोर्ग्रहयोर्युतिः साध्यते तयोर्मध्ये योऽधिकगतिर्ग्रहः स चेदल्पगतेर्ग्रहादंशाद्यवयवेनाधिकस्तदा तयोर्युतिर्गतेति वाच्यम् । अथ वा कुटिले वक्रिणि ग्रहे अनुलोमतो मार्गिग्रहादल्पतरे सति युतिर्गता वाच्या । अवक्रगखगयोर्द्वयोर्वक्रिणोर्ग्रहयोर्मध्ये शीघ्रगतौ ग्रहे भागादिना अल्पे युतिर्गतैव वाच्या अन्यथोक्त लक्षणवैपरीत्ये ग्रहयुतिर्गम्येत्यर्थः ।

विश्वनाथः—अथ ग्रहयुतेर्गतैष्यताज्ञानमाह अधिकेति । ग्रहयुत्यासन्नग्रहयोर्मध्ये अल्पभुक्तेन्यूनगतेः सकाशात् । अधिकजवखगोऽधिकगतिर्ग्रहः । अधिकोंऽशाद्यवयवेनाधिकः । तदा अनयोर्युतिः प्रगता गतेति वाच्यम् । अथ वाऽनुलोमतो मार्गिग्रहात् कुटिले वक्रिणि ग्रहे अल्पतरे सतियुतिर्गता वाच्या । अथ वा अनृजुगखगयोर्द्वयोर्वक्रिणोर्ग्रहयोर्मध्ये शीघ्रगतौ ग्रहे अल्पे युतिः प्रगता वाच्या । अन्यथोक्त लक्षण वैपरीत्ये ग्रहयुतिर्गम्येत्यर्थः । अल्पगतेः शनेः ११।४।५०।५० सकाशादाधिकगतिर्भौमः ११।६।३८।१७ अधिकोऽतो गतलक्षणा युतिः ॥ २ ॥

ऋजुगतिखगयोस्तु वक्रयोर्वा विवरकला गतिजान्तरेण भक्ताः ।
गतिजयुतिहृता यदैक वक्री युतिरगताप्रगताप्त वासरै स्यात् ॥ ४०१ ॥

—ग्र. ला. युत्यधिकार.

मल्लारिः—अथ ग्रहयुतिदिवसज्ञानमाह मार्गिणोर्द्वयोर्ग्रहयोः सतोः । अथ वा वक्रयोर्द्वयोर्ग्रहयोः सतोः । तदन्तरकलाः कार्याः । ता गत्यन्तरेण भक्ताः यदेको वक्री परो मार्गी तदाप्यन्तरकला गतियोगभक्ताः कार्याः । आप्तैर्दिनैर्ग्रहयुतिर्गम्या गता पूर्वोक्त लक्षणेन स्यात् ।

अत्रोपपत्तिः । यदि गत्यन्तरकलाभिरेक दिन तदा ग्रहान्तरकलाभिः किमिति वक्रिणि गतियोग एवा न्तरमिति । अतस्तत्र तेनैवाप्ता लब्धदिनैरेष्यगतैर्ग्रहयुतिसमयः स्यादित्युपपन्नम् ॥ ३ ॥

विश्वनाथः—अथ ग्रहयुतिदिवसज्ञानमाह ऋजुगतीति । मार्गिणोर्द्वयोर्ग्रहयोः सतोः । अथ वा वक्रयोर्द्वयोर्ग्रहयोः सतोस्तदन्तरकलाः कार्याः । ता गत्यन्तरेण भक्ताः । यद्येको वक्री तदा तु ग्रहान्तरकला एव गतियोगेन भक्ताः कार्याः । आप्तैर्दिनैर्ग्रहयुतिर्गम्या गता वा पूर्वोक्त लक्षणेन स्यात् ।

ज्या दोन ग्रहाची युति पाहणें आहे त्यामध्यें जर अधिक गति ग्रह अल्पगति ग्रहापेक्षा अंशाद्यवयवानीं अधिक असेल किंवा मार्गगति ग्रहापेक्षा वक्रगतिग्रह अंशाद्यवयवानीं कमी असेल किंवा अधिक वक्रगतिग्रह अल्पवक्रगति ग्रहापेक्षा अंशाद्यवयवानीं कमी आहे, तर युति होऊन गेली असें जाणावें. आणि जर या लक्षणात वैपरीत्य आलेतर ग्रहयुति होणार आहे असें समजावें.

उदाहरणार्थ अल्पगतिग्रह गुरु ५ रा. १७ अ. ७ क. अधिकगतिग्रह मंगळ ५ रा. २८ अ. ५० क. यापेक्षा कमी आहे म्हणून मंगळ गुरुची युति पूर्वीच होऊन गेली. येथें मंगळ जर गुरुपेक्षा कमी असता तर युति व्हावयाची आहे असें स्पष्ट झालें असतें.

जर दोन्ही ग्रहमार्गी किंवा वक्री असतील तर त्याच्या अंतराच्या कलांस गतिच्या अतरानें भागावें; आणि जर एकग्रह वक्री आहे व दुसरा मार्गी आहे तर अंतरकलास गतिच्या बेरजेनें भागावें म्हणजे आलेल्या दिवसांनीं त्या दोन ग्रहाची युति होईल किंवा होऊन गेली असें जाणावें.

| उदाहरणार्थ-मार्गीग्रह | उदाहरणार्थ वक्रीग्रह |
|---|---|
| स्प. शुक्र ५-१०-२९-४५ गति ७२-१८ | स्प. मं. १-७-३४-५ गती ३५-३५ |
| स्प. गुरु ५- ६-५१-३८ गति १२- ४ | स्प. श. १ -४ -५८ -५ गती ५- ५ |
| अंतर ०- ३-३८-०७ — ६०-१४ | अंतर ० -२ -३६ -० अंतर ३०-३० |
| ×६० | ×६० |
| १८० | १२० |
| +३८ | +३६ |
| ६०)२१८(३ दि. | ३०)१५६(५ दि. |
| १८० | १५० |
| ०३८ | ००६ |
| ×६० | ×६० |
| २२८०(३८ घटिका | ३६०(१२ घटी |
| १८० | ३० |
| ०४८० | ६० |
|  | ६० |
| वर दिलेलें ग्रह शके १८५५ श्रावण कृ. ३०ता. २१ आगस्टचें आहेत. त्या दिवसांपूर्वी ३ दिवस३८ घटिका गुरुशुक्राची युति होऊन गेली. | उदाहरणार्थ घेतलेल्या दोन्ही वक्री ग्रहावरून ५दि. १२ घटिका नंतर वक्री शनिमंगळाची युति होणार. |

उदाहरणार्थ एकग्रहवक्री व एकमार्गी यांची युति--शके १८५५च्या माघ शु. १५ चे ग्रह ता.३० जानेवारी १९३४.

| | |
|---|---|
| वक्री शुक्र १०- १- ६-४१ | वक्रगती ३०-३५ |
| मार्गी बुध ९-२७-३२-५७ | मार्गीगती +१०३-२३ |
| अंतर ०- ३-३३-४४ | १३३-५८ |
| ×६० | याबद्दल १३४ घेतलें कारण फक्त २ विकला कमी आहेत. |
| १८० | |
| +३३ | |
| १३४) २१३(१ दिवस | ४७४०(३५ घटिका |
| १३४ | ४०२ |
| ०७९ | ०७२० |
| ×६० | ६७० |
| ४७४० | ०५० |

ह्या युति प्रकरणांत शुक्र बुधांत ३ अं. ३३ कला अंतर असून मार्गी बुधगतींत वक्री शुक्रगति मिळविली कारण बुध पुढें जाणार व शुक्रमागें येणार यामुळें दोघांतील अंतर दररोज १३४ कला घटत जाणार आणि या कारणानेंच पौर्णिमेनंतर १ दिवस ३५ घटिकांनीं त्यांची युति होते.

## सूर्यसिद्धांतांतील ग्रहयुति प्रकरण.

ताराग्रहाणामन्योन्यं स्यातां युद्धसमागमौ ॥
समागमः शशाङ्केन सूर्येणास्तमनं सह ॥४०२॥ सू. सि. ग्र. यु.

( ताराग्रहाणां ) भौमादि पञ्चखेटानाम् ( अन्योन्यं ) परस्परं ( युद्धसमागमौ ) वक्ष्यमाणलक्षणभिन्नौ ( स्याता ) भवेताम् । ( शशाङ्केन ) चन्द्रेण ( सह ) पञ्चताराणां योगः ( समागमः ) समागम संज्ञःस्यात् । ( सूर्येण ) अर्केणसह ( अस्तमनं ) पूर्णास्तगतत्वम् । न त्वस्तमात्रं भवतीत्यर्थः ॥ १ ॥

भौमादि पाच ग्रहांचें परस्पर युद्ध व समागम ( म्हणजे सामान्य युति व भेदयुति ) होतो. चंद्राच्या बरोबर मंगळादि ५ ग्रहांचा जो योग होतो त्यास समागम ( अर्थात् युति ) म्हणतात. चंद्राचा सूर्याबरोबर जो योग होतो त्यास अस्तमन किंवा पूर्णास्त असें म्हणतात. ( चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि ह्या सहा ग्रहांच्या युत्याच फक्त पाहतां येतात. रवीशी होणाऱ्या युतीस अस्त म्हणतात.)

शीघ्रे मन्दाधिकेऽतीतः संयोगो भवितान्यथा ॥
द्वयोः प्राग्यायिनोरेवं वक्रिणोस्तु विपर्ययात् ॥ ४०३ ॥
प्राग्यायिन्याधिकेऽतीतो वक्रिण्येष्यः समागमः ॥

( शीघ्रे ) ययोर्ग्रहयोर्योगोऽभिमतस्तयोर्मध्ये यः शीघ्रगतिर्ग्रहस्तास्मिन् ( मन्दाधिके ) मन्दगतिग्रहाधिके सति ( संयोगः ) तयोर्युतिसंज्ञः ( अतीतः ) गतो ज्ञेयः । ( अन्यथा ) शीघ्रगतिग्रहान्मन्दगतिग्रहेऽधिके सति ( भाविता ) एष्यः । ( एवम् ) उक्तलक्षणयोः ( प्राग्यायिनोः पूर्वगतिकयोः ( द्वयोः ) ग्रहयोर्भवति । ( वक्रिणोः ) वक्रगतिग्रहयोः ( तु ) तुकाराद्गतैष्यत्वं ( विपर्ययात् ) उक्तवैपरीत्याद्भवति । ( प्राग्यायिनि ) पूर्वगतिग्रहे ( अधिके ) वक्रगतिग्रहादधिके सति ( अतीतः ) गतयोगः । ( वक्रिणि ) वक्रगतिग्रहे पूर्वगति-ग्रहादधिके सति ( एष्यः ) गम्यः ( समागमः ) योगः स्यात् ॥ २ ॥

ज्या दोन ग्रहाची युति पहावयाची असेल त्यापैकीं जो मंदगतिग्रह त्यापेक्षां शीघ्रगति ग्रह अधिक असेल तर युति होऊन गेली असें समजावें. आणि मंदगतिग्रहापेक्षा शीघ्रगति ग्रह कमी असेल तर युति व्हाव याची आहे असें समजावें. मार्गी म्हणजे पूर्वगामिनी गति असतां ही स्थिति असते, परंतु दोन्ही ग्रह वक्री असल्यास याच्या उलट म्हणजे मंदगतिग्रहापेक्षा शीघ्रगति ग्रह अधिक असेल तर युति व्हावयाची आहे आणि मंदगति ग्रहापेक्षां शीघ्रगति ग्रह कमी असेल तर युति होऊन गेली असें समजावें.

ग्रहान्तरकलाः स्वस्वभुक्तिलिप्तासमाहताः ॥ ४०४ ॥
भुक्त्यन्तरेण विभजेदनुलोमाविलोमयोः ॥
द्वयोर्वक्रिण्यथैकस्मिन्भुक्तियोगेन भाजयेत् ॥ ४०५ ॥
लब्धं लिप्तादिकं शोध्यं गते देयं भविष्यति ॥
विपर्ययाद्वक्रगत्योरेकास्मिंस्तु धनव्ययौ ॥ ४०६ ॥
समलिप्तौ भवेतां तौ ग्रहौ भगणसंस्थितौ ॥
विवरंतद्वदुद्धृत्य दिनादि फलमिष्यते ॥ ४०७ ॥

( ग्रहान्तरकलाः ) युतिसम्बन्धिग्रहयोरभीष्टैककालिकयोरन्तरकलाः ( स्वस्वभुक्तिलिप्ता समाहताः ) पृथक् पृथक् स्वस्वगतिकलाभिर्गुणिताः ( अनुलोमविलोमयोः ) मार्गगयोर्वक्रगयोर्वेत्यर्थः ( द्वयोः ) ग्रहयोः ( गत्यन्तरेण ) स्पष्ट भुक्त्यन्तरेन ( विभजेत् ) गणको भजेत् । ( एकस्मिन् ) द्वयोर्मध्य एकतरे ( वक्रिणि ) वक्रगति ग्रहे सति ( भुक्तियोगेन ) गतियोगेन ( भाजयेत् ) हरेदित्यर्थः । ( गते ) गतयोगे ( लब्धं लिप्ता-दिकं ) फलं कलादिकं स्वं स्वं ( शोध्यं ) पूर्वगतिग्रहयोर्हीनं ( भविष्यति ) एष्य योगे ( देयं ) योज्यम् । ( वक्रगत्योः ) वक्रगतिग्रहयो स्वं, स्वं फलं ( विपर्ययात् ) उक्तवैपरीत्यात्कार्यम् । गतयोगे योज्यमेष्ययोगे हीन मित्यर्थः । ( एकस्मिंस्तु ) द्वयोर्मध्य एकतरे वक्रिणि तु स्वं स्वं फले ( धनव्ययौ ) युतहीनौ कार्यौ । एवं कृते सति ( तौ ) युतिसम्बन्धिनौ ('भगणसंस्थितौ ) राश्यधिष्टित चक्रस्थितौ राश्याद्यात्मकौ ( ग्रहौ ) खेटौ ( समलिप्तौ ) समकलौ ( भवेतां ) स्याताम् । ( विवरं ) अभीष्टैककालिक ग्रहयोरन्तरं ( तद्वत् ) पूर्वोक्तवत् ।

भुक्त्यन्तर रूपहरेणेत्यर्थ : ( उद्धृत्य ) भक्त्या ( दिनादि ) दिन घटिनेत्यादि ( फल ) गतैष्ययुतिवशाद्गतैष्य फलम् ( इष्यते ) उच्यतइत्यर्थ. ॥ ३ । ४ । ५ । ६ ॥

इष्टकालीन युति सबंधीं पहावयाचे असता त्या दोन ग्रहांची युति होण्याचा सुमार असेल त्या दोन ग्रहांतील अंतर काढून त्याच्या कला कराव्या व त्यास दोन्ही ग्रहांच्या गतींतील अंतरानें भागावें. भागाकार दिवस, घटिका, पळें आणावा. ज्या दिवशींचे म्हणजे पौर्णिमा अगर अमावास्येचे ग्रह गणिता करितां घेतले असतील त्या दिवसापासून भागाकारा इतक्या कालानं युति होणार असें समजावें.

ग्रहाची युति कोणतेंही दोन ग्रह एकाच राशींत असल्याशिवाय होऊं शकत नाहीं. हें यावरून सिद्ध आहे.

सूर्यसिद्धांतातील युतिकाल काढण्याची पद्धति आणि ग्रहलाघव व सिद्धांतशिरोमणी यांतील पद्धती एकच आहे व ती पूर्वी सोदाहरण दिली आहे. सूर्यसिद्धांताच्या युत्यधिकारातील वर दिलेल्या भागांत पहिला कांहीं भाग ग्रहयुतिकालीं राशिचक्रापैकीं कोणत्या स्थानीं युति होईल हे दर्शविणारा आहे पण युतिदिन काढण्याचें कामीं त्याचा उपयोग नाहीं ( व युति स्थिति काढण्याची अगदीं सोपी रीति आम्ही खालीं दिली आहे ) म्हणून फक्त युतिकाल काढण्याची रीतिच येथें दिली आहे युतिकाल निघाल्यानंतर त्या वेळचा स्पष्टग्रह केला असता राशिचक्राच्या कोणत्या राशीच्या कोणत्या अंशावर युति होत आहे याचे सहज ज्ञान होईल.

ज्यावेळीं एक ग्रह वक्री असून तो मार्गी ग्रहापेक्षा कमी असेल तेव्हां त्याची युति होऊन गेली आणि वक्री ग्रह मार्गी ग्रहापेक्षा जास्त असेल तेव्हां युति व्हावयाची आहे असें समजावें.

उपपत्ति—मार्गीग्रहांचे वेळीं, मंदगतिग्रहापेक्षा शीघ्र गतीग्रह अधिक असता पुढें युति होणें शक्य नाहीं. कारण त्या दोन ग्रहांत अधिकाधिक अंतर पडत जाणार आणि यामुळेंच अशा स्थितींत युति पूर्वीच होऊन गेली व यालाच गत ( होऊन गेलेला ) योग म्हणतात. मंदगति ग्रहापेक्षा शीघ्रगतिग्रह कमी असता शीघ्रगतीग्रहच मंदगतिग्रहाशीं पुढें योग करतो म्हणून त्यास गम्य ( पुढें होणारा ) योग म्हणतात. एक वक्री ग्रहाचे वेळीं शीघ्रगतीग्रह जास्त असता पुढें योग होणें असंभनीय म्हणून तो गत योग झाला. कमी असेल तर पुढें योग होणार याबद्दल शंकाच नाहीं. कारण वक्रीग्रह उत्तरोत्तर कमी कमी होत जातो आणि शीघ्रगति व मार्गीग्रह पुढें पुढें चालत होतो.

मार्गीग्रहापेक्षा वक्रीग्रह कमी असेल तर पुढें योग होणें अशक्य कारण भिन्न दिशेनें गमन करणाऱ्या दोन ग्रहांत जास्त जास्त अंतर पडत जातें आणि त्यामुळेंच तो गत योग झाला. मार्गीग्रहापेक्षां वक्रीग्रह जास्त असेल तर मात्र तो गम्य योग होतो. कारण वक्रीग्रह कमी कमी होणार व मार्गीग्रह वाढत जाणार.

## ग्रहांची युति राशीचक्रस्थ कोणत्या अंशांत होईल.

ज्या दोन ग्रहांची युति काढावयाची असेल त्या ग्रहांच्या स्थितिवरून युतिकालाचा सुमार कळतो व युति होऊन गेली किंवा व्हावयाची आहे हेंही अंशात्मक स्थितिवरून समजतें युति होणार त्या काळापूर्वीच्या अवधीने युति करणारे दोन्ही ग्रह राशि अंशकलात्मक त्यांच्या गतिवरून करावे कमी ग्रह जास्तीग्रहांतून वजा करून बाकी येईल त्याच्या कला कराव्या. त्याचप्रमाणे दोन्ही ग्रहांच्या गतींतील अंतर काढावें ते कलात्मक असावें. नंतर त्या दोनपैकीं कोणत्याही ग्रहाच्या गतीनें दोन ग्रहांतील अंतराच्या आलेल्या कलांस गुणावें व दोहोंच्या गतींतील अंतरानें भागावें. भागाकाराने जें फल कलात्मक येईल त्याचे अंशादि करून ते घेतलेल्या अवधीनंतर युति व्हावयाची असेल तर जो ग्रह घेतला असेल त्यांत मिळवावें. युति होऊन गेली असल्यास ते फल त्याच अंशादिक ग्रहांतून वजा करावें म्हणजे युतिकालाची ग्रहाची राशि, अंश, कलात्मक राशिचक्रस्थ स्थिति येईल.

उदाहरणार्थ शके १८०० च्या चैत्र शु. १५ सोमवार ता. १० एप्रिलच्या शनि बुधाकरून त्यांच्या युतीचे राशिचक्रस्थस्थान काढू.

रा. अं. क.

स. र. ०– ०–४७ गति ५८ कला

स. शु. ११–२७–४६ गति ७४ कला

अंतर ०– ३– १ अंतर १६ कला

×६०

१८०

+ १

१८१

×७४

७२४

१२६७

१६ ) १३३९४ ( ८३७ कला

१२८

०५९

४८

११४

११२

००२

६० ) ८३७ ( १३ अंश

७८०

५७ कला

अवधिस्थ शुक्र ११–२७–४६

फल + १३–५७

राशिचक्रस्थ ०–११–४३ ही युति कालची स्थिती होय.

आता रवीवरून स्थिति काढूं.

१८१ कला अंतर

×५८

१४४८

९०५

१६ )१०४९८ ( ६५६ कला

९६

००८९

८०

०९८

९६

०२

६० ) ६५६ ( १० अंश

६००

५६ कला

| अ. स्प. र. | ० | – | ० | – | ४७ |
|---|---|---|---|---|---|
| फल | + | | १० | – | ५६ |
| | ० | – | ११ | – | ४३ |

ही युतिकालची रवीची स्थिति झाली. या उदाहरणात विकला घेतलेल्या नाहींत. त्या घेतल्यास दोन्ही ठिकाणीं येणें जरूर पडते. दोन वक्री ग्रहाचे उदाहरण याच्या उलट समजावें. एकवक्री व एकमार्गी यांचे उदाहरणही यावरून व उपपत्ति वरून कसें करावें लागेल हे विचारांतीं लक्षांत येईल.

## ग्रहांचे राशिचक्रस्थ युतिस्थान.

ग्रहांतरं कलारूपं गतिर्निघ्नं पृथक् पृथक् ।
भक्तं गत्यंतरेणैतत् फलमिष्टं च लभ्यते ॥ ४०८ ॥
तत्तत्फलं ग्रहैर्युक्तं भचक्रस्थान मादिशेत् ॥
गतयोगेफलं हीनं गम्ययोगे फलंयुतं ॥४०९ ॥
विपरीतफलं वक्रे मिश्रे मिश्रं वदेत् बुधः ॥ ४१० ॥

सिद्धांतरहस्य—८५

इष्ट अशा दोन ग्रहांतील अंतराच्या कला करून घ्याव्या. त्या प्रत्येकास त्याच्या गतीनें ( निघ्नं ) गुणून दोघांतील गत्यंतरानें भागावें. त्या प्रत्येकाचे येणारें फल त्या त्या ग्रहात मिळवावें म्हणजे राशीचक्रांतील त्यांचे युतिस्थान निघेल.

गतयोग म्हणजे युति होऊन गेली असेल तर तें फल ग्रहात वजा करावें व गम्य म्हणजे युति व्हाव-याची असेल तर तें फल ग्रहात मिळवावें

दोन्ही ग्रह वक्री असता याच्या उलट फलसंस्कार करावा. एक ग्रह वक्री व एक मार्गी असता मिश्र फल घ्यावें लागते. ते बुद्धिवंतास विचारानें सहज कळून येईल.

## ग्रह आणि चंद्र यांच्या युतिकालाची राशीचक्रस्थ—
## स्पष्टस्थिति काढण्याची रीति.

ज्या दिवशीं युति होणें संभवनीय असेल त्या दिवशीं सूर्योदयाचा इष्टस्पष्टग्रह व स्पष्टचंद्र तयार करून त्यावरून पूर्वोक्त रीतीनें युतिकालाची राशी, अंशात्मक स्थिति काढावी.

## क्रमसन्निकर्षणपद्धति.

क्रमसंनिकर्षणपद्धति म्हणजे कोणत्याही फलांत अधिकाधिक सूक्ष्मता आणणें. उदाहरणार्थ, आपणास ग्रहांच्या युतीचे गणित करावयाचे आहे तर त्याकरिता राशी, अंश, कला, विकला अशी स्थिति घेऊन त्यांतील प्रथम केवळ अंशावरून फल काढावयाचे, त्यानंतर त्यापेक्षां सूक्ष्मता येण्याकरिता अंश, कला ह्या दोन्हीवरून फल काढावयाचें, आणि अखेर अतिशय सूक्ष्मता आणण्यासाठीं अंश, कला, विकला या तिन्हींवरून फल आणावयाचे अर्थात् तिसऱ्या पद्धतीचें फल विशेष सूक्ष्म येईल. क्रमाक्रमानें फलांत सूक्ष्मता आणणाऱ्या ह्या पद्धतीलाच क्रमसंनिकर्षण पद्धति म्हणतात.

## नक्षत्रताऱ्यांशीं कोणत्याही ग्रहांची युति.

## दोन ग्रहांच्या युत्या आणि जन्मस्थ ग्रहांशी युति.

कोणत्याही दोन ग्रहांचें किंवा नक्षत्रतारा आणि ग्रह यांचे एकाच राशींत राशि, अंश, कला, विकलात्मक साम्य किंवा समानता असणें यालाच नांव युति. क्रांतिवृत्त, आकाशवृत्त किंवा ग्रहाचा परिभ्रमणाचा मार्ग ठरलेले वर्तुळ यांच्यांतून ग्रहांचें परिभ्रमण होत असतें. क्रांतिवृत्ताचे दक्षिणेस किंवा उत्तरेस कांहीं अंतरावरून ग्रह जात असतात. बरोबर क्रांतिवृत्तांतच ते नेहमीं असतात असें नाहीं. पण क्रांतिवृत्ताच्या आसपास असतात. मेषराशींतून वृषभ राशींत, वृषभराशींतून मिथुनराशींत याप्रमाणें १२ ही राशींत ग्रहाचें परिभ्रमण

होते. अर्थात् एक ग्रह ज्या राशि अंशात असेल त्याच राशि अंशात (त्या दोघांचे पूर्वपश्चिम अंतर शून्य पण दक्षिणोत्तर अंतर कितीही असलें तरी चालेल ) ज्यावेळीं दुसरा कोणताही ग्रह येतो तेव्हा त्यास युति असें म्हणतात. युतीचें प्रकार दोन पैकीं पहिला प्रकार म्हणजे सामान्य युति. ह्या युतीचें प्रसंगीं कोणतेंही दोन ग्रह समान स्थितींत येतात पण नुसते समान स्थितींत येणें निराळें आणि पूर्वपश्चिम दोघांचे समानत्व येऊन शिवाय दक्षिणोत्तर समानत्व येणें हें जितकें महत्त्वाचें तितकेंच तें दीर्घकालानें येणारें असें असतें व अशा स्थितीलाच भेद युती म्हणतात. युतीचा हा दुसरा पण फार महत्त्वाचा प्रकार आहे.

आकाशात ग्रहांच्या युत्या नेहमीं होत असतात आणि विशेषत प्रत्येक ग्रहाशीं चंद्राची युती तर दर महिन्याला होते. परंतु युती करणाऱ्या दोन ग्रहामध्यें दक्षिणोत्तर बरेंच अंतर असते. ज्या वेळीं कोणत्याही दोन ग्रहांचे पूर्व पश्चिम अंतर शून्य आणि दक्षिणोत्तर अंतरही शून्य किंवा शून्या जवळ जवळ असेल किंवा असते त्यावेळीं त्या ग्रहांची युती फार विलक्षण परिणामकारक, पाहण्यालायक आणि विशेष चमत्कारजन्य अशी असते. अशा युत्या फार कमी किंवा क्वचितच होतात. याचें कारण दोन्ही ग्रहांचा शर (म्हणजे क्रांतिवृत्ताच्या दक्षिणोत्तर अंतराचे प्रमाण) शून्य किंवा अत्यल्प असण्याची स्थिति सहसा साधत नाहीं. एकाचा शर शून्य असला तर दुसऱ्याचा जास्त असतो. एवंच भेद युतीची स्थिति क्वचित् च एखाद्या प्रसंगींच येते. सामान्य युत्या मात्र नेहमीं होतात. या करिता हें सदैव लक्षात ठेवावें कीं, भेदयुती व्हावयाच्या वेळीं दोन्ही ग्रहांचा शर शून्य किंवा एकाच दिशेचा समान शर आणि पूर्वपश्चिम अंतरही शून्यच पाहिजे. त्याखेरीज भेदयुती होणार नाहीं.

आतां उदाहरणार्थ आपण शके १८५५ च्या मार्गशीर्ष कृ ३० चें शनि शुक्र घेऊन त्यावरून युतिकाल व त्याची भेदयुति आहे कीं काय हें पाहूं.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| स श. | ९–२३–५७–१० | गति | ५–४७ | शर, दक्षिण | ०–५७ |
| स. शु. | ९–२०–५४–१७ | गति | ४७–३५ | शर, दक्षिण | १–४५ |
| अंतर | ०– ३–०२–५३ | अंतर | ४१–४८ | शरांतर | ०–४८ |

×६०
१८०
+२
गत्यंतर ४१) १८२( ४ दिवस
१६४
१८
×६०
४१)१०८०( २४ घटिका
८२
०२००
१६४
०३६

येणेंप्रमाणें मार्ग कृ. ३० नंतर पूर्ण ४ दिवस आणि २४ घटकांनीं शनी व शुक्र यांची युति होणार. आता शरासंबंधीं विचार करता दोघांचा ही "दक्षिणशर" म्हणजे एकाच दिशेचा शर असून दोघांचे शरांतर ४८ कला आहे. शुक्राचा शर क्षयगामिनी आहे. (कारण पौष शु १५ ला शुक्राचा शर उत्तर ७कला आहे ) व त्याची शर क्षीणत्वाची गति दररोज ८ कला मध्यम प्रमाणात येते. तेव्हा ४ दिवस २४ घटिकांत सुमारें ३५ कला शर कमी होणार. त्या ३५ कला १ अं. ४५ कलांतून वजा जाता १ अंश १० कला इतका युती कालीं शुक्राचा दक्षिण शर, झाला. शनीचा शर ५७ कला दक्षिण आहे. अर्थात् युतीच्या वेळीं शनी व शुक्राच्या शरांत फक्त १३ कलांचे अंतर राहते म्हणून ही युति जरी भेदयुति नसली तरी युतिकालीं शनि शुक्र पुष्कळच एकमेकांच्या जवळ जवळ दिसतील इतका निष्कर्ष ह्या गणितावरून सिद्ध झाला.

वर दिलेलें गणित फक्त गत्यंतर कला व गति कला यावरून केलें आहे. पण विकला घेऊन गणित केले असता त्यापेक्षांही सूक्ष्मता साधते. त्याचें प्रत्यक्ष उदाहरण देऊ.

वरील उदाहरणातील ग्रहांतर ३ अंश २ कला ५३ विकला यांच्या विकला १०९५३ यास ग्रहांच्या गत्यंतर कला ४१ विकला ४८ यांच्या विकला २५०८ यांनीं भागून भागाकार ४ दिवस. बाकी ९४१

यास ६० नें गुणून पूर्ववत् भागिलें असता भाग २२ घटिका, बाकी १२८४ यास ६० नें गुणून पूर्ववत् भागिलें असता भागाकार २२ पळें येतो. अर्थात् ४ दिवस २२ घटिका २२ पळांनीं युति होते. ४ दिवस म्हणजे पौष शु ५ (ता. २१ डिसेंबर १९३३) येथें २२ घटिका २२ पळांचा काळ ८ तास ५७ मिनिटें इतका येतो त्यांत म. सू. ६ ता. ३९ मि. मिळविली असतां स्टॅ. टा. दुपारीं ३ वाजून ३६ मिनिटांनीं युति होते. शुद्ध पंचांगाप्रमाणेंही तोच काल आहे.

आतां ह्या युतीचें राशिचक्रस्थ स्थान काढू. युति करणाऱ्या दोन ग्रहांतील अंतराच्या कला १८३ (विकला ४० पेक्षा अधिक असल्यानें विकलांबद्दल ग्रहांतर, गत्यंतर व गती यामध्यें १ कला अधिक धरली आहे.) यांस शुक्राच्या ( ४८ कला ) गतीनें गुणून गुणाकार ८७८४ आला त्यास गत्यंतर कला ४२ यांनीं भागिलें तेव्हां २०९ कला म्हणजे ३ अंश २९ कला फल आलें. तें मागील शुक्रांत मिळविलें असतां (९ – २० – ५४ – १७ + ० – ३ – २९ – ० =)९ राशि, २४ अंश, २३ कला व १७ विकला ही शुक्राची युतिकालची राशिचक्रस्थ स्थिति होय.

त्याचप्रमाणें १८३ कलांस शनि गति ६ कला यांनीं गुणून गुणाकार १०९८ यांस गत्यंतर ४२ कलांनीं भागिलें तेव्हां भागाकार २६ कला आला. ह्या २६ कला मागील शनि ९–२३–५७–१०–यांत मिळवितां ९ राशि, २४ अंश, २३ कला, १० विकला ही शनीची राशिचक्रस्थ स्थिति झाली.

नक्षत्रतान्यांशीं ग्रहाची युति आणि जन्मस्थ ग्रहांशीं चालू ग्रहांनी युति काढण्याची पद्धत अगदीं सोपी व वरील युतिप्रमाणेंच आहे.

नक्षत्रतान्याच्या राशीअंशांतून इष्टग्रह वजा करून बाकी येणाऱ्या फरकाच्या कला कराव्या व त्यास त्या ग्रहाच्या गतीनें भागून इष्ट दिवस, घटी, पळें आणावीं व तितक्या कालानें युति होईल असें समजावें.

जन्मस्थ ग्रहाच्या राशी अंशादिकांतून चालू ग्रह वजा करावा. बाकी येईल त्याच्या कला करून त्यास त्याच ग्रहाच्या गतीनें भागावें भागाकार दिवस, घटिका, पळें आणावा व इतक्या कालानें युति होईल असें समजावें. युति करणारे दोन ग्रह एकाच राशींत पाहिजेत हें नेहमीं लक्षांत ठेवावें व तसे ग्रह येतील अशाच अवधीचे ते घ्यावें

## दोन ग्रहांमध्यें इष्ट अंशाइतकें अंतर केव्हां येईल !

कोणत्याही दोन मार्गी ग्रहामध्यें इष्ट अंशाइतकें अंतर केव्हां येईल हें खालील रीतीनें काढावें.

इष्ट अंश दोन ग्रहांतील अंशादिस्थ अंतर काढावें व त्यांच्या गतींतील अंतरही निराळें मांडून ठेवावें. जें ग्रहांतर येईल तें, जितकें अंश अंतर पडावयास पाहिजे असेल तितक्या अंशां तून वजा करून बाकी येईल त्याच्या कला कराव्या व त्यांस गत्यंतरानें भागावें आणि दिवस, घटी, पळें आणावीं त्या वेळीं इष्ट अंशाइतकें अंतर त्या दोन ग्रहांत येईल असें समजावें.

दोन्ही ग्रह वक्री असतांही (परंतु वक्री असलेला जास्त गतीचा ग्रह कमी व कमी गतीचा अधिक असतां) वरील रीतीनेंच इष्टअंशाइतकें अंतर काढतां येईल

एक ग्रह मार्गी व एक वक्री असतां बाकी सर्व वरीलप्रमाणेंच करावयाचें. परंतु दोघांच्या गतींतील अंतर न काढतां दोघांच्या गतीची बेरीज करून त्या बेरीजेनें भागावें म्हणजे इष्टांशाच्या अंतराचा येणारा काळ निघेल. उदाहरण पुढील पानावर पहा,

### दोन्ही मार्गीग्रह.

स्प. शुक्र ५–१०–२९–४५ गति ७२–१८
स्प. गुरु ५– ६–५१–३८ गति १२– ४
अतर ०– ३–३८– ७ अतर ६०–१४

आता हें अतर १० अंश केव्हा येईल हें पाहण्याकरिता.

०–१०– ०–०
–०– ३–३८–०
०– ६–२२–०
×६०
३६०
+२२
६० ) ३८२ ( ६ दि.
३६०
२२
×६०
१३२० ( २२ घ.
१२०
१२०

६ दिवस २२ घटिकांनीं १० अंश अंतर येईल.

### एकवक्री व एक मार्गीग्रह.

वक्री स्प. बुध ३–२३–१२–३७ गति २७-१८
स्प. रवि ३–९–५०–० गति ५७-१८
अतर ०–१३–२२–३७ अंतर८४-३६

आता हें अतर ७ अंश येण्याकरिता.

०–१३–२२–३७
–०– ७– ०– ०
०– ६–२२–३७
×६०
३३०
+२२
८४ ) ३८२ ( ४ दि.
३३६
४६
×६०
२७६० ( ३२ घ.
२५२
२४०

४ दिवस ३२ घटिकांनीं ७ अंश अंतर येईल.

उदाहरणार्थः—आतां नक्षत्रतारा व ग्रह युती पाहूं.

उदाहरणार्थ चित्रा नक्षत्र तारा १८४ अंशावर म्हणजे ६ राशी ४ अंशावर असून त्याच्याशीं शके १८५५ मध्यें शुक्र आणि गुरु यांची युति केव्हा होतें हें पहावयाचें म्हणून.

चित्रातारा ६–४–०–०
स्प. शु. ५–२७–१६–४७
०–०६–४३–१३
×६०
३६०
+४३
शुक्रगति ७२ ) ४०३ ( ५ दिवस.
३६०
०४३
×६०
२५८० ( ३५ घटिका.
२१६
०४२०
३६०
०६०

भाद्रपद कृ. ५ ला. ३५ घटिकांनीं चित्रा शुक्रयुति होईल.

चित्रातारा ६–४–०–०
स्पष्टगुरु ६–४–१–३३
०–०–१–३३

शके १८५५ माघ शु. १५ ता. ३० जानेवारी १९३४ रोजीं चित्रातारा व गुरु यांत १ कलेचें अंतर आहे, अर्थात् त्यापूर्वी चित्राताऱ्याशीं गुरूची युति झाली, येथें गुरु १ कला अधिक असल्यामुळें व त्याची गति १॥ कला असल्यानें ६ दिवस पूर्वी युति होऊन गेली असें सहजा सहजीं कळण्यासारखें आहे.

१८५५ आश्विन कृ. ३० गुरुवार.
चित्रातारा ६–४–०–०
स्प. चंद्र ६–३–३७–४४ गति ८५७
अतर ०–०–२२–१६

यावरून वरील रीतीनें १ घटिका ३२ पळांनीं चित्रातारा व चंद्र यांची युति होते.

## जन्मस्थग्रहांशीं गोचरग्रहांचें होणारें अनेक योग.

आता जन्मस्थ ग्रहांशीं गोचरीच्या ग्रहांचे होणारे योग कसे पहावयाचे व ते अंशात्मक कसे काढावयाचें तें सांगू.

जन्मस्थ ग्रहांशीं व स्थानांशीं गोचरीच्या ग्रहांचे राश्यात्मक व त्यातही अंशात्मक असे योग होतात त्यांची नावें व ते जन्मस्थ ग्रहाच्या किंवा जन्मलग्नाच्या अंशापासून किती अंशावर असतां सुरू होतात याचें दिग्दर्शन येणेंप्रमाणें —

द्विर्द्वादशयोग ३० अंश आणि ३३० अंश.
त्रिरेकादशयोग ६० अंश आणि ३०० अंश.
केंद्रयोग ९० अश अंश आणि २७० अंश.
त्रिकोणयोग १२० अंश आणि २४० अंश.
षडाष्टकयोग १५० अंश आणि २१० अंश.
युतियोग ० अंश, प्रतियुति १८० अंश.

हे सर्व योग जन्मलग्नाच्या उदित अंशापासून पहावयाचे असतात. त्याचप्रमाणें ग्रहांच्या अंशापासूनही पहावयाचे असतात असा गणितशास्त्रज्ञाचा गणितसिद्धांत आहे. परंतु फलज्योतिषशास्त्रदृष्ट्या यांत किंचित् व कांहीं बदल केलेला आहे तो कां व त्याचे कारण काय याबद्दल थोडें विवेचन करू.

पुष्कळ लोकांची अशी कल्पना असते कीं, गोचरीनें कोणत्याही ग्रहाचे राश्यंतर झाल्याबरोबर त्याचे फल मिळतें. मग तें फल शुभ असो किंवा अनिष्ट असो. त्याचप्रमाणें जो ग्रह चांगला असेल त्याचे व जो ग्रह वाईट असेल त्याचे फल ज्या राशींत तो येतो त्या राशींत असेपर्यंत सर्व काल सतत मिळत रहावयाचे असाही समज अनेक लोकांचा असल्याबद्दल प्रत्यक्ष आम्हांस अनुभव आला आहे. पण ह्या दोन्ही गोष्टी किंवा समजुती चुकीच्या पायावर उभारलेल्या आहेत.

कोणत्याही ग्रहाचे कोणतेंही चांगलें व वाईट जे फल मिळावयाचें ते तो कोणत्याही राशींत आल्याबरोबर मिळतें किंवा मिळालें पाहिजे व त्याचप्रमाणें त्या राशींत तो ग्रह असेपर्यंत ते सतत मिळतें व मिळालें पाहिजे हे म्हणणें साराासार विचाराला व चिकित्सक बुद्धीला सोडून आहे. इतकेंच नव्हे तर अशा तऱ्हेची कल्पना करून घेणें म्हणजे आपल्या कल्पनेचा, बुद्धीचा व विचार शक्तीचा उपहास आपण जाणून बुजून करण्यासारखें आहे.

ग्रहांचे जे कांहीं चांगलें वाईट परिणाम व्हावयाचे व घडवयाचे असतील ते जर ग्रहांचे राश्यंतर झाल्याबरोबर घडत असते तर हा एक कायमचा नियम होऊन बसला असता व मग गणिताची आणि प्रत्येक व्यक्तीच्या जन्मकालच्या ग्रहांच्या बलाचे व हानीचे प्रमाण काढून त्यांचे परिणाम आयुष्यात कोणत्या वेळीं कसे घडतील हे काढण्याची यातायात चुकली असती. राशिचक्रामध्ये फक्त १२ राशी असून जगातील एकंदर लोकसंख्या सोडून दिली तरी फक्त हिंदुस्थानातल्या लोकसंख्येचा आकडा घेतला तर तो ३५ कोटी आहे. म्हणजे हिंदुस्थानांत प्रत्येक राशीचे लोक सुमारें ३ कोटी आहेत. केवळ राश्यंतरावरून ग्रह चांगला किंवा वाईट असें अनुमान काढून ग्रह बदलल्याबरोबर त्याची फळें मिळाली पाहिजेत असें मानल्यास सुमारें २७ कोटी लोकांस सतत चांगलें किंवा वाईट फल एकसमयावच्छेदेंकरून मिळालें पाहिजे असें येतें. पण वस्तुस्थिती याच्या उलट असते. कारण ह्या सर्वांची जन्मराशि जरी एक असली तरी त्या प्रत्येक व्यक्तीची जन्म वेळ, जन्मदिवस, जन्मस्थळ इत्यादि इत्यादि प्रत्येक गोष्ट भिन्न असणार आणि जन्मकालच्या ग्रहांचे शुभाशुभ बलही अगदीं स्वतंत्र येणार.

एकाच वेळीं निघणाऱ्या आगगाडींत हजारों तऱ्हेचे लोक बसलेले असतात पण सर्वांना घेऊन जाणारी आगगाडी निश्चितपणें एकाच वेळीं निघते येवढ्याच कारणानें त्यांच्यामध्ये [illegible] आहे. [illegible] विचार,

कार्य, स्वभाव, स्थिति वगैरे सर्वस्वी सारखी असणें शक्य नाहीं, इतकेंच नव्हे तर ही गोष्ट पूर्णपणें अशक्य आहे. त्याचप्रमाणें एका राशींत जरी कोट्यावधी लोकांचा जन्म झाला असला तरी प्रत्येकास व्यक्तिशः ग्रहांची फलें निरनिराळींच मिळणार. शिवाय इतक्या लोकांची एक राशी आहे हें म्हणण्यात देखील किती प्रचंड ढोबळपणा व कमालीची अतिव्याप्ति आहे हें सहजासहजी कोणाच्याही लक्षांतच येत नाहीं. राशी एक खरी पण त्या एकाच राशींत १ लक्ष ८ हजार इतकें सूक्ष्म विभाग फक्त कोणत्याही एका गावी जन्म झालेल्यात होतात आणि अशी ८ लक्ष निरनिराळीं गावें व त्या प्रत्येकात १ लक्ष ८ हजार विभाग असल्यानें एक राशी असताही प्रत्येकानें फल सारखें येणें अशक्य आहे हे कोणाच्याही ध्यानात येईल व प्रत्येकानें ध्यानात ठेवावें. राशींची जी फलें दिलेलीं असतात तीं स्थूलमान व सर्व साधारण स्वरूपाची असतात.

प्रत्येक व्यक्तीस कोणताही ग्रह बदलल्याबरोबर शुभाशुभ फल मिळते ह्या समजुतींत ही स्वारस्य नाहीं. कोणत्याही ग्रहाचे राश्यंतर झाल्यानंतर त्याचें फल मिळण्याचा काल किंवा अवधी हा सर्वस्वी जन्मलग्नाच्या, त्या त्या स्थानाच्या व जन्मकालीन ग्रहस्थितीच्या अंशात्मक स्थितीवर अवलंबून असतो आणि याकरिताच जन्मकाळच्या ग्रहांची व द्वादशस्थानांची सूक्ष्म स्थिति आपाततः काढावी लागते.

ग्रह ज्या राशींत येतो त्या राशींत आल्यापासून अखेरपर्यंत त्याचे फल मिळणें ही गोष्ट केवळ ज्या स्थानात तो येतो त्या स्थानात व ज्या ग्रहाशीं त्याचा संबंध येतो त्या ग्रहासंबंधींच्या फलास–शुभ असल्यास पोषक व सहाय्यक होतो आणि अशुभ असल्यास फलनाशक व अनिष्ट विचार प्रवर्तक होतो. इतक्या पुरतींच ग्राह्य धरता येईल. पण त्याचे शुभ अगर अनिष्ट असें पूर्ण फल मिळावयाचे ते जन्मस्थ ग्रहांशीं किंवा लग्नाशाशी योग होईल त्याच वेळीं मिळते. फलज्योतिष शास्त्रात येवढेंच दर्शविलें आहे कीं, असें योग होण्याच्या आधीं ५ अंश आणि पुढें ५ अंश इतक्या कालात त्याचे महत्त्वपूर्णफल मिळण्याचा अवधी असतो. अर्थात् जन्मस्थ योग आणि त्याच्याशी गोचरीचे अंशात्मक योग पाहणें हाच फलाचा पाया होय. नुसत्या एकांगी राशीवरून पाहणें हा नव्हे.

आता प्रत्यक्ष एका कुंडलीचे ग्रहयोग पाहूं.

श्री शके १८४९ मार्गशीर्ष कृ. ९ मंदवासरे श्री सूर्योदयात् गतघटी ४ प. ५० समये पुत्ररत्नं-प्रासुत् जन्म ता. १७ डिसेंबर १९२७.

ज. ल. कुंडली.

११ १२ १० बुश म ८ के १२ गु ९ ७ शु २ रा ४ ६ ३ ५

| र. | चंद्र | ल. |
|---|---|---|
| ८ | ५ | ९ |
| ६ | १७ | ३ |
| १४ | ३६ | २० |
| ८ | ५ | ४५ |

वर दिलेल्या कुंडलीवरून शके १८५५ च्या भाद्रपदांत शु. १५ स कोणतें ग्रह कसें आहेत हें पहावयाचे म्हणून त्याची प्रथम स्थिति देऊं.

| | | | |
|---|---|---|---|
| रवि | ४-२२-६-२३ | शुक्र | ५-२७-१६ ४७ |
| चंद्र | १०-१९-५९-३७ | शनि | ९-२२-३-५३ |
| मंगळ | ६-१६-४८-११ | राहु | १०-८-५५ ३५ |
| बुध | ४ १४ ३४-५७ | हर्शल | ०-८-१२-५० |
| गुरु | ५-९ ४५-४ | नेपच्युन | १४-२१ १-३९ |

येथें लग्नांशापेक्षां सर्व ग्रहांचे अंश जास्त असल्यानें ते ग्रह त्या त्या राशीच्याच स्थानांत येतात. पण चंद्रापासून पाहिलें असतां तूळेतील मंगळ पहिला येतो. आणि सिंहेंतील बुध अकरावा येतो पण तो स्थूलमानानें १२ वा दिसतो याकरितां अंशात्मक योगच नेहमीं पहावें.

# अखिल जगांतील दररोजचा सूर्योदय व सूर्यास्त पाहण्याचें कायमचें कोष्टक.

पृष्ठ २९० पासून "उत्तर अक्षांश" ० पासून ६० अक्षांशापर्यंत प्रथम १०।१० अक्षांशाच्या अंतरानें व पुढें ५।५ अंशाचे व नंतर २।२ अंशाचे अंतरानें दररोजचे सूर्योदय व सूर्यास्त दिले आहेत. त्यावरूनच सर्व दक्षिण अक्षांशावरील सूर्योदय व सूर्यास्त कसे तयार करावयाचे याची रीति, फरक करावयाच्या कोष्टकासुद्धा दिली आहे. ह्या दोन्ही कोष्टकावरून अखिल जगातील कोणत्याही स्थलाचे स्थानिक वेळेचे ( Local Time ) सूर्योदय व सूर्यास्त काढता येतील, इतकेंच नव्हे तर प्रत्येक ठिकाणच्या प्रभातकाल सूर्याच्या संधिप्रकाशप्रवृत्तिचा आणि सायंकालीं सूर्याच्या संधिप्रकाशनिवृत्तिचा स्थानिक काळ कोणता हेंही कळून येईल.

## स्पष्टसूर्योदय वर्षांतील प्रत्येक दिवशीं कोणत्या वेळीं होतो तें पाहण्याचें कोष्टक.

पुढील कोष्टकात स्थलाचे अक्षांश कोष्टकाच्या शिरोभागीं असून डाव्या हाताच्या पहिल्या रकान्यात प्रत्येक महिन्याची तारीख दिली आहे. त्याप्रमाणें इष्ट तारखेच्या आंकड्यापासून सरळ आडव्या रेषेंत पहात इष्ट स्थलाच्या अक्षांशाचे रकान्यात सरळ उभ्या रेषेनें खालीं दृष्टी टाकीत जावें म्हणजे इष्ट तारीख व अक्षांश ह्याच्या परस्पर संयोगस्थलीं तास मिनिटें दिलेलीं आहेत तीं टिपून ठेवावीं. इष्टस्थलाचे अक्षांश कोष्टकात नसतील तर इष्ट अक्षांशाच्या मागील व पुढील कोष्टकातून आकडे टिपून त्यांचें अंतर काढावें. त्याला दहानीं भागिलें असता दरम्यानच्या प्रत्येक अंशाचा काल निघेल. त्यावरून इष्ट अक्षांशाचा काल आणावा. त्याला निजकाल ( अथवा लोकल टाईम ) म्हणतात. हा निजकाल आणि स्टँडर्ड टाईम ह्याच्यामधील रेखान्तराची मिनिटें पृ. १८५ मध्यें दिली आहेत. तितकीं निजकालात मिळवावीं म्हणजे स्टँडर्ड टाईम प्रमाणें सूर्योदयचा इष्ट अक्षांश रेखांशाचा व स्थलाचा काल समजेल.

( टिळक पंचांगात अधिक सूक्ष्मतेसाठीं वर्षी मयनाचा आणखी एक संस्कार जास्त दिलेला असल्यानें वरील काल आणि पंचांगातील स्पष्टसूर्योदय ह्यात क्वचित् सुमारें १ मिनिटापर्यंत अंतर पडूं शकेल. )

उदाहरणः—मुंबई येथील ता. १ मे चा स्पष्टसूर्योदय काढ. मुंबईचे अक्षांश उत्तरेचे १९° आहेत ते कोष्टकात नसल्यानें १०° आणि २०° ह्या अक्षांशाप्रमाणें उदयकाल वरील तारखेस अनुक्रमें ५तास ४३मि. आणि ५ तास ३१ मि. आला. १२ मिनिटाचे अंतर. म्हणून प्रत्येक अंशास १·२ मि. अंतर पडलें तें २० अक्षांशावरून येणाऱ्या कालात मिळविलें असता सुमारें ५ ता. ३२ मि. येतात. स्टँडर्ड टाईम व मुंबई टाईम ह्यांतील रेखान्तर ३९ मिनिटाचें आहे. तें अंतर ५ ३२ ह्यांत मिळविलें असता मुंबईचा सूर्योदय स्टँडर्ड टाईमप्रमाणें ६ ता. ११ मिनिटांनीं होतो.

ह्याच पद्धतीनें सूर्यास्तहि काढावा.

इष्ट अक्षांशाच्या मागील अक्षांशाचा सूर्योदय किंवा सूर्यास्त इष्ट अक्षांशाच्या पुढील अक्षांशाच्या सूर्योदयापेक्षा किंवा सूर्यास्तापेक्षा कमी असल्यास अंतराची येणारी मिनिटें मागील अक्षांशाच्या काला मिळवावी व जास्त असल्यास फलाची मिनिटें वजा करावी.

भूविषुवाच्या दक्षिणेकडे जे प्रदेश आहेत त्याच्या अक्षांशांस दक्षिण अक्षांश म्हणतात. त्या अक्षांश संबंधानें प्रत्येक तारखेचे कोष्टक नंबर २ पुढें दिलें आहे. त्या कोष्टकांत इष्ट तारखे पुढें आडव्या रेषेंत दुसऱ्याच रकान्यात दक्षिण अक्षांशाच्या सूर्योदयाच्या स्थलास जुळणाऱ्या निजकालाची तास मिनिटें नंबर १ च्या कोष्टकांत कोणत्या तारखेच्या पुढें सापडतील ती तारीख दिली आहे. व तिसऱ्या रकान्यांत संस्काराची मिनिटें दिली आहेत. सूर्योदयाशीं जुळणाऱ्या तारखेवरून १ ल्या कोष्टकातून निजकाल काढावा व त्याला तिसऱ्या रकान्यांतील संस्कार द्यावा म्हणजे इष्ट दक्षिण अक्षांशावरील स्थळाच्या निजकालाप्रमाणें स्पष्टसूर्योदयकाल येईल. नंतर त्याला रेखान्तर संस्कार द्यावा म्हणजे स्टँडर्ड टाईमप्रमाणें स्पष्टकाल येतो.

झांजिबार, दक्षिण आफ्रिका, दक्षिण अमेरिका, आस्ट्रेलिया, न्यूझीलंड इत्यादि गांवें दक्षिण अक्षांशानीं असून दक्षिण अक्षांशाची इतर गांवें कोष्टकावरून पहावीं.

ज्योतिषशिक्षणकोर्समधील रीतीनें हें कोष्टक कोणासही तयार करतां येते पण त्याला थोडेसे परिश्रम आहेत ते टळावें म्हणून आयतें तयार असलेलें हें सूर्योदय सूर्यास्ताचें हें कोष्टक १९३४च्या नाविक पंचांगांतून दि कंट्रोलर ऑफ हिज मॅजेस्टिस स्टेशनरी ऑफीस यांच्या संमतीनें छापण्यांत येत आहे.

## जगांतील कोणत्याही स्थळाचें स्थानिक वेळेचें ( लोकलटाईम ) सूर्योदयाचे कोष्टक. १

| अ. ता. | + ० उ क. मि. | +१०उ. क. मि. | +२०उ. क. मि. | +३०उ. क. मि. | +३५उ. क. मि. | +४०उ. क. मि. | +४५उ. क. मि. | +५०उ. क. मि. | +५२उ. क. मि. | +५४उ. क. नि. | +५६उ. क. मि. | +५८उ. क. मि. | +६०उ. क. मि. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १५ | ०६ ०६ | ०६ ०८ | ०६ ०९ | ०६ ११ | ०६ १२ | ०६ १३ | ०६ १४ | ०६ १६ | ०६ १६ | ०६ १७ | ०६ १८ | ०६ १९ | ०६ २० |
| १६ | ०६ ०६ | ०६ ०७ | ०६ ०८ | ०६ १० | ०६ ११ | ०६ १२ | ०६ १२ | ०६ १४ | ०६ १४ | ०६ १५ | ०६ १५ | ०६ १६ | ०६ १७ |
| १७ | ०६ ०५ | ०६ ०६ | ०६ ०८ | ०६ ०९ | ०६ ०९ | ०६ १० | ०६ ११ | ०६ १२ | ०६ १२ | ०६ १२ | ०६ १३ | ०६ १३ | ०६ १४ |
| १८ | ०६ ०५ | ०६ ०६ | ०६ ०७ | ०६ ०८ | ०६ ०८ | ०६ ०८ | ०६ ०९ | ०६ ०९ | ०६ ०९ | ०६ १० | ०६ १० | ०६ १० | ०६ १० |
| १९ | ०६ ०५ | ०६ ०५ | ०६ ०६ | ०६ ०६ | ०६ ०६ | ०६ ०७ | ०६ ०७ | ०६ ०७ | ०६ ०७ | ०६ ०७ | ०६ ०७ | ०६ ०७ | ०६ ०८ |
| २० | ०६ ०४ | ०६ ०५ | ०६ ०५ | ०६ ०५ | ०६ ०५ | ०६ ०५ | ०६ ०५ | ०६ ०५ | ०६ ०५ | ०६ ०५ | ०६ ०५ | ०६ ०४ | ०६ ०४ |
| २१ | ०६ ०४ | ०६ ०४ | ०६ ०४ | ०६ ०४ | ०६ ०४ | ०६ ०४ | ०६ ०३ | ०६ ०३ | ०६ ०२ | ०६ ०२ | ०६ ०२ | ०६ ०२ | ०६ ०२ |
| २२ | ०६ ०४ | ०६ ०४ | ०६ ०३ | ०६ ०३ | ०६ ०२ | ०६ ०२ | ०६ ०१ | ०६ ०१ | ०६ ०० | ०६ ०० | ०५ ५९ | ०५ ५९ | ०५ ५८ |
| २३ | ०६ ०४ | ०६ ०३ | ०६ ०२ | ०६ ०१ | ०६ ०१ | ०६ ०० | ०५ ५९ | ०५ ५८ | ०५ ५८ | ०५ ५७ | ०५ ५७ | ०५ ५६ | ०५ ५५ |
| २४ | ०६ ०३ | ०६ ०२ | ०६ ०२ | ०६ ०० | ०६ ०० | ०५ ५९ | ०५ ५८ | ०५ ५६ | ०५ ५६ | ०५ ५५ | ०५ ५४ | ०५ ५३ | ०५ ५२ |
| २५ | ०६ ०३ | ०६ ०२ | ०६ ०१ | ०५ ५९ | ०५ ५८ | ०५ ५७ | ०५ ५६ | ०५ ५४ | ०५ ५३ | ०५ ५२ | ०५ ५२ | ०५ ५० | ०५ ४९ |
| २६ | ०६ ०३ | ०६ ०१ | ०६ ०० | ०५ ५८ | ०५ ५७ | ०५ ५५ | ०५ ५४ | ०५ ५२ | ०५ ५१ | ०५ ५० | ०५ ४९ | ०५ ४८ | ०५ ४६ |
| २७ | ०६ ०२ | ०६ ०१ | ०५ ५९ | ०५ ५६ | ०५ ५५ | ०५ ५४ | ०५ ५२ | ०५ ५० | ०५ ४८ | ०५ ४७ | ०५ ४६ | ०५ ४५ | ०५ ४३ |
| २८ | ०६ ०२ | ०६ ०० | ०५ ५८ | ०५ ५५ | ०५ ५४ | ०५ ५२ | ०५ ५० | ०५ ४७ | ०५ ४६ | ०५ ४५ | ०५ ४३ | ०५ ४२ | ०५ ४० |
| २९ | ०६ ०२ | ०६ ०० | ०५ ५७ | ०५ ५४ | ०५ ५२ | ०५ ५० | ०५ ४८ | ०५ ४५ | ०५ ४४ | ०५ ४२ | ०५ ४१ | ०५ ३९ | ०५ ३७ |
| ३० | ०६ ०१ | ०५ ५९ | ०५ ५६ | ०५ ५३ | ०५ ५१ | ०५ ४९ | ०५ ४६ | ०५ ४३ | ०५ ४२ | ०५ ४० | ०५ ३८ | ०५ ३६ | ०५ ३४ |
| ३१ | ०६ ०१ | ०५ ५८ | ०५ ५५ | ०५ ५२ | ०५ ५० | ०५ ४७ | ०५ ४४ | ०५ ४१ | ०५ ३९ | ०५ ३८ | ०५ ३६ | ०५ ३३ | ०५ ३१ |
| ए१ | ०६ ०१ | ०५ ५८ | ०५ ५४ | ०५ ५० | ०५ ४८ | ०५ ४६ | ०५ ४२ | ०५ ३९ | ०५ ३७ | ०५ ३५ | ०५ ३३ | ०५ ३१ | ०५ २८ |
| २ | ०६ ०० | ०५ ५७ | ०५ ५४ | ०५ ४९ | ०५ ४७ | ०५ ४४ | ०५ ४१ | ०५ ३७ | ०५ ३५ | ०५ ३३ | ०५ ३० | ०५ २८ | ०५ २५ |
| ३ | ०६ ०० | ०५ ५७ | ०५ ५३ | ०५ ४८ | ०५ ४५ | ०५ ४२ | ०५ ३९ | ०५ ३४ | ०५ ३२ | ०५ ३० | ०५ २८ | ०५ २५ | ०५ २२ |
| ४ | ०६ ०० | ०५ ५६ | ०५ ५२ | ०५ ४७ | ०५ ४४ | ०५ ४१ | ०५ ३७ | ०५ ३२ | ०५ ३० | ०५ २८ | ०५ २५ | ०५ २२ | ०५ १९ |
| ५ | ०६ ०० | ०५ ५५ | ०५ ५१ | ०५ ४६ | ०५ ४३ | ०५ ३९ | ०५ ३५ | ०५ ३० | ०५ २८ | ०५ २५ | ०५ २२ | ०५ १९ | ०५ १६ |
| ६ | ०५ ५९ | ०५ ५५ | ०५ ५० | ०५ ४४ | ०५ ४१ | ०५ ३८ | ०५ ३३ | ०५ २८ | ०५ २६ | ०५ २३ | ०५ २० | ०५ १७ | ०५ १३ |
| ७ | ०५ ५९ | ०५ ५४ | ०५ ४९ | ०५ ४४ | ०५ ४० | ०५ ३६ | ०५ ३१ | ०५ २६ | ०५ २३ | ०५ २० | ०५ १७ | ०५ १४ | ०५ १० |
| ८ | ०५ ५९ | ०५ ५४ | ०५ ४८ | ०५ ४२ | ०५ ३९ | ०५ ३४ | ०५ २९ | ०५ २४ | ०५ २१ | ०५ १८ | ०५ १५ | ०५ ११ | ०५ ०७ |
| ९ | ०५ ५८ | ०५ ५३ | ०५ ४८ | ०५ ४१ | ०५ ३७ | ०५ ३३ | ०५ २८ | ०५ २२ | ०५ १९ | ०५ १६ | ०५ १२ | ०५ ०८ | ०५ ०४ |
| १० | ०५ ५८ | ०५ ५३ | ०५ ४७ | ०५ ४० | ०५ ३६ | ०५ ३१ | ०५ २६ | ०५ २० | ०५ १६ | ०५ १३ | ०५ १० | ०५ ०५ | ०५ ०२ |
| ११ | ०५ ५८ | ०५ ५२ | ०५ ४६ | ०५ ३९ | ०५ ३४ | ०५ ३० | ०५ २४ | ०५ १७ | ०५ १४ | ०५ ११ | ०५ ०७ | ०५ ०३ | ०४ ५८ |
| १२ | ०५ ५८ | ०५ ५२ | ०५ ४५ | ०५ ३८ | ०५ ३३ | ०५ २८ | ०५ २२ | ०५ १५ | ०५ १२ | ०५ ०८ | ०५ ०४ | ०५ ०० | ०४ ५५ |
| १३ | ०५ ५७ | ०५ ५१ | ०५ ४४ | ०५ ३६ | ०५ ३२ | ०५ २७ | ०५ २० | ०५ १३ | ०५ १० | ०५ ०६ | ०५ ०२ | ०४ ५७ | ०४ ५२ |
| १४ | ०५ ५७ | ०५ ५० | ०५ ४४ | ०५ ३५ | ०५ ३० | ०५ २५ | ०५ १९ | ०५ ११ | ०५ ०७ | ०५ ०४ | ०४ ५९ | ०४ ५४ | ०४ ४९ |
| १५ | ०५ ५७ | ०५ ५० | ०५ ४३ | ०५ ३४ | ०५ २९ | ०५ २४ | ०५ १७ | ०५ ०९ | ०५ ०५ | ०५ ०१ | ०४ ५७ | ०४ ५२ | ०४ ४६ |
| १६ | ०५ ५७ | ०५ ५० | ०५ ४२ | ०५ ३३ | ०५ २८ | ०५ २२ | ०५ १५ | ०५ ०७ | ०५ ०३ | ०४ ५९ | ०४ ५४ | ०४ ४९ | ०४ ४३ |
| १७ | ०५ ५६ | ०५ ४९ | ०५ ४१ | ०५ ३२ | ०५ २७ | ०५ २१ | ०५ १३ | ०५ ०५ | ०५ ०१ | ०४ ५७ | ०४ ५२ | ०४ ४७ | ०४ ४० |
| १८ | ०५ ५६ | ०५ ४९ | ०५ ४० | ०५ ३१ | ०५ २५ | ०५ १९ | ०५ १२ | ०५ ०३ | ०४ ५९ | ०४ ५४ | ०४ ४९ | ०४ ४४ | ०४ ३७ |
| १९ | ०५ ५६ | ०५ ४८ | ०५ ४० | ०५ ३० | ०५ २४ | ०५ १८ | ०५ १० | ०५ ०१ | ०४ ५६ | ०४ ५२ | ०४ ४७ | ०४ ४१ | ०४ ३४ |
| २० | ०५ ५६ | ०५ ४८ | ०५ ३९ | ०५ २९ | ०५ २३ | ०५ १६ | ०५ ०८ | ०४ ५९ | ०४ ५४ | ०४ ५० | ०४ ४४ | ०४ ३८ | ०४ ३१ |
| २१ | ०५ ५५ | ०५ ४७ | ०५ ३८ | ०५ २८ | ०५ २२ | ०५ १५ | ०५ ०७ | ०४ ५७ | ०४ ५२ | ०४ ४७ | ०४ ४२ | ०४ ३६ | ०४ २८ |

## ( प्रभातकाल ) सूर्याच्या संधिप्रकाशप्रवृत्तिकालचे कोष्टक.

| | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १२ | ०४ ५८ | ०५ ०० | ०४ ५९ | ०४ ५६ | ०४ ५२ | ०४ ४८ | ०४ ४३ | ०४ ३५ | ०४ ३१ | ०४ २६ | ०४ २१ | ०४ १५ | ०४ ०८ |
| २२ | ०४ ५५ | ०४ ५४ | ०४ ५० | ०४ ४३ | ०४ ३८ | ०४ ३१ | ०४ २३ | ०४ ११ | ०४ ०५ | ०३ ५९ | ०३ ५१ | ०३ ४३ | ०३ ३३ |
| ए१ | ०४ ५२ | ०४ ४८ | ०४ ४१ | ०४ ३० | ०४ २३ | ०४ १३ | ०४ ०१ | ०३ ४६ | ०३ ३८ | ०३ २९ | ०३ १८ | ०३ ०६ | ०२ ५१ |
| ११ | ०४ ४९ | ०४ ४२ | ०४ ३१ | ०४ १७ | ०४ ०७ | ०३ ५५ | ०३ ३९ | ०३ १९ | ०३ ०८ | ०२ ५६ | ०२ ४२ | ०२ २४ | ०२ ०१ |
| २१ | ०४ ४५ | ०४ ३५ | ०४ २२ | ०४ ०४ | ०३ ५१ | ०३ ३६ | ०३ १७ | ०२ ५० | ०२ ३६ | ०२ २० | ०१ ५९ | ०१ ३० | ०० ४० |

## जगातील कोणत्याही स्थळाचें स्थानिक वेळेचें ( लोकलटाईम ) सूर्योदयाचे कोष्टक १

| अ | +०उ | +१०उ | +२०उ | +३०उ | +३५उ | +४०उ | +४५उ | +५०उ | +५२उ | +५४उ | +५६उ | +५८उ. | +६०उ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ता | क मि | क मि | क मि | क मि | क मि | क मि | क मि | क मि | क मि | क मि | क मि | क मि | क मि |
| जु३ | ०६ ०० | ०५ ४३ | ०५ २४ | ०५ ०३ | ०४ ५० | ०४ ३५ | ०४ १८ | ०३ ५५ | ०३ ४५ | ०३ ३३ | ०३ १९ | ०३ ०३ | ०२ ४३ |
| ४ | ०६ ०० | ०५ ४३ | ०५ २५ | ०५ ०३ | ०४ ५० | ०४ ३६ | ०४ १८ | ०३ ५६ | ०३ ४६ | ०३ ३४ | ०३ २० | ०३ ०४ | ०२ ४४ |
| ५ | ०६ ०० | ०५ ४३ | ०५ २५ | ०५ ०३ | ०४ ५१ | ०४ ३६ | ०४ १९ | ०३ ५७ | ०३ ४६ | ०३ ३४ | ०३ २१ | ०३ ०५ | ०२ ४५ |
| ६ | ०६ ०१ | ०५ ४४ | ०५ २५ | ०५ ०४ | ०४ ५१ | ०४ ३७ | ०४ १९ | ०३ ५८ | ०३ ४७ | ०३ ३६ | ०३ २२ | ०३ ०६ | ०२ ४७ |
| ७ | ०६ ०१ | ०५ ४४ | ०५ २६ | ०५ ०४ | ०४ ५२ | ०४ ३७ | ०४ २० | ०३ ५८ | ०३ ४८ | ०३ ३६ | ०३ २३ | ०३ ०७ | ०२ ४८ |
| ८ | ०६ ०१ | ०५ ४४ | ०५ २६ | ०५ ०५ | ०४ ५२ | ०४ ३८ | ०४ २१ | ०३ ५९ | ०३ ४९ | ०३ ३८ | ०३ २४ | ०३ ०९ | ०२ ५० |
| ९ | ०६ ०१ | ०५ ४४ | ०५ २६ | ०५ ०५ | ०४ ५३ | ०४ ३९ | ०४ २२ | ०४ ०० | ०३ ५० | ०३ ३८ | ०३ २५ | ०३ १० | ०२ ५१ |
| १० | ०६ ०१ | ०५ ४५ | ०५ २७ | ०५ ०६ | ०४ ५४ | ०४ ३९ | ०४ २२ | ०४ ०१ | ०३ ५१ | ०३ ४० | ०३ २६ | ०३ ११ | ०२ ५३ |
| ११ | ०६ ०२ | ०५ ४५ | ०५ २७ | ०५ ०६ | ०४ ५४ | ०४ ४० | ०४ २३ | ०४ ०२ | ०३ ५२ | ०३ ४१ | ०३ २८ | ०३ १३ | ०२ ५४ |
| १२ | ०६ ०२ | ०५ ४५ | ०५ २७ | ०५ ०७ | ०४ ५५ | ०४ ४१ | ०४ २४ | ०४ ०३ | ०३ ५३ | ०३ ४२ | ०३ २९ | ०३ १४ | ०२ ५६ |
| १३ | ०६ ०२ | ०५ ४५ | ०५ २८ | ०५ ०७ | ०४ ५५ | ०४ ४१ | ०४ २५ | ०४ ०४ | ०३ ५४ | ०३ ४३ | ०३ ३० | ०३ १६ | ०२ ५८ |
| १४ | ०६ ०२ | ०५ ४६ | ०५ २८ | ०५ ०८ | ०४ ५६ | ०४ ४- | ०४ २६ | ०४ ०५ | ०३ ५५ | ०३ ४४ | ०३ ३२ | ०३ १७ | ०३ ०० |
| १५ | ०६ ०२ | ०५ ४६ | ०५ २९ | ०५ ०८ | ०४ ५६ | ०४ ४३ | ०४ २६ | ०४ ०६ | ०३ ५७ | ०३ ४६ | ०३ ३३ | ०३ १९ | ०३ ०२ |
| १६ | ०६ ०२ | ०५ ४६ | ०५ २९ | ०५ ०९ | ०४ ५७ | ०४ ४४ | ०४ २७ | ०४ ०७ | ०३ ५८ | ०३ ४७ | ०३ ३५ | ०३ २० | ०३ ०४ |
| १७ | ०६ ०२ | ०५ ४६ | ०५ २९ | ०५ १० | ०४ ५८ | ०४ ४४ | ०४ २८ | ०४ ०८ | ०३ ५९ | ०३ ४८ | ०३ ३६ | ०३ २२ | ०३ ०५ |
| १८ | ०६ ०२ | ०५ ४७ | ०५ ३० | ०५ १० | ०४ ५८ | ०४ ४५ | ०४ २९ | ०४ १० | ०४ ०० | ०३ ५० | ०३ ३८ | ०३ २४ | ०३ ०७ |
| १९ | ०६ ०२ | ०५ ४७ | ०५ ३० | ०५ ११ | ०४ ५९ | ०४ ४६ | ०४ ३० | ०४ ११ | ०४ ०२ | ०३ ५१ | ०३ ३९ | ०३ २६ | ०३ ०९ |
| २० | ०६ ०२ | ०५ ४७ | ०५ ३० | ०५ ११ | ०५ ०० | ०४ ४७ | ०४ ३१ | ०४ १२ | ०४ ०३ | ०३ ५३ | ०३ ४१ | ०३ २८ | ०३ १२ |
| २१ | ०६ ०३ | ०५ ४७ | ०५ ३१ | ०५ १२ | ०५ ०० | ०४ ४८ | ०४ ३२ | ०४ १३ | ०४ ०४ | ०३ ५४ | ०३ ४३ | ०३ २९ | ०३ १४ |
| २२ | ०६ ०३ | ०५ ४८ | ०५ ३१ | ०५ १२ | ०५ ०१ | ०४ ४८ | ०४ ३३ | ०४ १४ | ०४ ०६ | ०३ ५६ | ०३ ४४ | ०३ ३१ | ०३ १६ |
| २३ | ०६ ०३ | ०५ ४८ | ०५ ३२ | ०५ १३ | ०५ ०२ | ०४ ४[illegible] | ०४ ३४ | ०४ १६ | ०४ ०७ | ०३ ५७ | ०३ ४६ | ०३ ३३ | ०३ १८ |
| २४ | ०६ ०३ | ०५ ४८ | ०५ ३२ | ०५ १३ | ०५ ०२ | ०४ ५० | ०४ ३५ | ०४ १७ | ०४ ०८ | ०३ ५९ | ०३ ४८ | ०३ ३५ | ०३ २० |
| २५ | ०६ ०३ | ०५ ४८ | ०५ ३२ | ०५ १४ | ०५ ०३ | ०४ ५१ | ०४ ३६ | ०४ १८ | ०४ १० | ०४ ०० | ०३ ४९ | ०३ ३७ | ०३ २२ |
| २६ | ०६ ०३ | ०५ ४८ | ०५ ३३ | ०५ १५ | ०५ ०४ | ०४ ५२ | ०४ ३७ | ०४ २० | ०४ ११ | ०४ ०२ | ०३ ५१ | ०३ ३९ | ०३ २४ |
| २७ | ०६ ०३ | ०५ ४८ | ०५ ३३ | ०५ १- | ०५ ०५ | ०४ ५३ | ०४ ३८ | ०४ २१ | ०४ १२ | ०४ ०३ | ०३ ५३ | ०३ ४१ | ०३ २७ |
| २८ | ०६ ०३ | ०५ ४९ | ०५ ३३ | ०५ १६ | ०५ ०६ | ०४ ५४ | ०४ ४० | ०४ २२ | ०४ १४ | ०४ ०५ | ०३ ५४ | ०३ ४३ | ०३ २९ |
| २९ | ०६ ०३ | ०५ ४९ | ०५ ३४ | ०५ १६ | ०५ ०६ | ०४ ५४ | ०४ ४१ | ०४ २४ | ०४ १६ | ०४ ०७ | ०३ ५६ | ०३ ४५ | ०३ ३१ |
| ३० | ०६ ०३ | ०५ ४९ | ०५ ३४ | ०५ १७ | ०५ ०७ | ०४ ५५ | ०४ ४२ | ०४ २५ | ०४ १७ | ०४ ०८ | ०३ ५८ | ०३ ४७ | ०३ ३४ |
| ३१ | ०६ ०३ | ०५ ४९ | ०५ ३४ | ०५ १८ | ०५ ०८ | ०४ ५६ | ०४ ४३ | ०४ २६ | ०४ १९ | ०४ १० | ०४ ०० | ०३ ४९ | ०३ ३६ |
| आ१ | ०६ ०३ | ०५ ४९ | ०५ ३५ | ०५ १८ | ०५ ०९ | ०४ ५७ | ०४ ४४ | ०४ २८ | ०४ २० | ०४ १२ | ०४ ०२ | ०३ ५१ | ०३ ३८ |
| २ | ०६ ०३ | ०५ ५० | ०५ ३५ | ०५ १९ | ०५ ०९ | ०४ ५८ | ०४ ४५ | ०४ २९ | ०४ २२ | ०४ १३ | ०४ ०४ | ०३ ५३ | ०३ ४१ |
| ३ | ०६ ०३ | ०५ ५० | ०५ ३६ | ०५ २० | ०५ १० | ०४ ५९ | ०४ ४६ | ०४ ३१ | ०४ २३ | ०४ १५ | ०४ ०६ | ०३ ५५ | ०३ ४३ |
| ४ | ०६ ०३ | ०५ ५० | ०५ ३६ | ०५ २० | ०५ ११ | ०५ ०० | ०४ ४७ | ०४ ३२ | ०४ २५ | ०४ १७ | ०४ ०७ | ०३ ५७ | ०३ ४५ |
| ५ | ०६ ०२ | ०५ ५० | ०५ ३- | ०५ २१ | ०५ ११ | ०५ ०१ | ०४ ४९ | ०४ ३३ | ०४ २६ | ०४ १८ | ०४ ०९ | ०३ ५९ | ०३ ४८ |
| ६ | ०६ ०२ | ०५ ५० | ०५ ३६ | ०५ २१ | ०५ १२ | ०५ ०२ | ०४ ५० | ०४ ३- | ०४ २८ | ०४ २० | ०४ ११ | ०४ ०२ | ०३ ५० |
| ७ | ०६ ०२ | ०५ ५० | ०५ ३७ | ०५ २२ | ०५ १३ | ०५ ०३ | ०४ ५१ | ०४ ३६ | ०४ ३० | ०४ २२ | ०४ १३ | ०४ ०४ | ०३ ५३ |
| ८ | ०६ ०२ | ०५ ५० | ०५ ३७ | ०५ २२ | ०५ १४ | ०५ ०४ | ०४ ५२ | ०४ ३८ | ०४ ३१ | ०४ २४ | ०४ १५ | ०४ ०६ | ०३ ५५ |
| ९ | ०६ ०२ | ०५ ५० | ०५ ३८ | ०५ २३ | ०५ १४ | ०५ ०५ | ०४ ५३ | ०४ ३९ | ०४ ३३ | ०४ २५ | ०४ १७ | ०४ ०८ | ०३ ५८ |

## ( प्रभातकाल ) सूर्याच्या साधिप्रकाशप्रवृत्तिकालचे कोष्टक

| | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ३० | ०४ ४५ | ०४ २५ | ०३ ५९ | ०३ २५ | ०३ ०२ | ०२ ३१ | ०१ ४४ | | | | | | |
| १० | ०४ ४७ | ०४ २८ | ०४ ०४ | ०३ ३१ | ०३ ०९ | ०२ ३९ | ०१ ५६ | | | | | | |
| २० | ०४ ४९ | ०४ ३१ | ०४ ०९ | ०३ ३८ | ०३ १८ | ०२ ५१ | ०२ १४ | ०१ ०४ | | | | | |
| ३० | ०४ ५० | ०४ ३४ | ०४ १४ | ०३ ४६ | ०३ २८ | ०३ ०५ | ०२ ३३ | ०१ ४३ | ०१ ०७ | | | | |
| आ९ | ०४ ५० | ०४ ३६ | ०४ १९ | ०३ ५५ | ०३ ३९ | ०३ २० | ०२ ५२ | ०२ १५ | ०१ ५३ | ०१ २० | | | |

कोठें असला पाहिजे किंवा आकाशातील ग्रह ग्रहकुंडलींत कोणत्या स्थानीं मांडला पाहिजे हें सहज ताडता येईल. उदाहरणार्थ पूर्वक्षितिज हें जर लग्न, तर क्षितिजाच्या साधारणपणें वर आलेला ग्रह कुंडलींत १२ व्या स्थानीं येईल. त्याच्यापेक्षाही बराच वर आलेला ग्रह ११ स्थानीं, व याम्योत्तर वृत्तावरील ग्रह दशमस्थानीं असेल, त्याचप्रमाणें दशमस्थानाच्या पश्चिमेकडे झुकलेला ग्रह नवमात, व मावळण्याच्या बेतात आलेला ग्रह अष्टमस्थानात आणि पश्चिमक्षितिजावरील ग्रह सप्तमात असेल. क्षितिजावर न दिसणारे ग्रह द्वितीय स्थानापासून सप्तमापर्यंत कोठेंतरी असतील मध्यरात्रीं सूर्य चतुर्थस्थानात असतो आणि उत्तररात्रींचा सूर्य द्वितीय किंवा तृतीय ह्यांच्या सुमारास असतो ह्याच धोरणानें कुंडलीवरून सूर्याचें पाहून स्थान अमुक वेळेस जन्म झाला पाहिजे असें सांगता येतें, व सूर्याच्या आणि चंद्राच्या राशिवरून महिना आणि तिथिहि सांगता येतात. कुंडलीचा खरा अर्थ न समजणाऱ्या मनुष्यास ह्याचें आश्चर्य वाटतें परंतु कुंडली हा केवळ एक प्रकारचा नकाशा आहे ही गोष्ट एकदा पटली म्हणजे मग जर कुंडली व्यवस्थित मांडली तर वरील ठळक गोष्टी सांगता आल्याच पाहिजेत अशी खात्री होईल.

आकाशातील अश्विन्यादि नक्षत्रपुंज आक्रमवृत्ताचे धोरणानेंच ठरविले गेले आहेत. आणि सूर्य व बुधशुक्रादि इतर ग्रह हे देखील आक्रमवृत्ताचे अनुरोधानेंच पश्चिमेकडोन पूर्वेस भ्रमण करीत असतात म्हणून आपल्या पंचांगातील व जातकातील ग्रहस्थिती भोग व शर ह्या मापकांच्या योगानें सांगितली असते. कृत्तिका नक्षत्राच्या १० व्या अंशांत रवि आहे असें सांगितलें असलें म्हणजे ते अंश आक्रमवृत्तापैकीं आहेत, असें समजावें. इतर ग्रहासंबधानेंहि तेंच समजावें. आपल्या इकडील ग्रहस्थिति आक्रमवृत्ताला अनुलक्षून सांगितली असल्यानें जन्म लग्नकुंडलींतही त्याचाच अनुवाद असतो. फक्त मांडण्याची धाटणी वेगळी इतकेंच. थोडक्यात सांगावयाचें म्हणजे कुंडली हा आकाशातील ग्रहांच्या स्थितीचा आक्रमवृत्ताच्या अनुरोधानें ठरविलेला नकाशा होय. परंतु हें पक्कें लक्षात ठेविलें पाहिजे कीं, कुंडलीला त्याप्रमाणें वेळेची त्याप्रमाणें स्थळाचीही आवश्यकता आहे. आपण वर पाहिलेंच आहे कीं, क्षितिजासंबधानें सूर्याची स्थिति एकाच वेळीं सर्व ठिकाणीं सारखी नसते. तोच न्याय कुंडलीला लागू आहे. एकाद्या गावच्या क्षितिजाच्या मर्यादेंत विवक्षित वेळेंस आक्रमवृत्ताचा किती भाग येतो ही गोष्ट कुंडलींत अतिशय महत्त्वाची आहे. पूर्व क्षितिजास चिकटलेला आक्रमवृत्ताचा अंश तें उदयलग्न अथवा लग्नलग्न, पश्चिम क्षितिजास चिकटलेला भाग तें अस्तलग्न अथवा सप्तमस्थान, आणि बरोबर खस्वस्तिकीं असणारा भाग तें दशमस्थान अशी कुंडलीची मोडणी आहे आक्रमवृत्ताचा हा भाग निरनिराळ्या स्थळीं अक्षांशपरत्वें निरनिराळा असणार व एकाच ठिकाणींसुद्धां आक्रमवृत्ताची आकाशातील स्थिति एकसारखी नसणार, ती प्रत्येक घटकेस किंबहुना प्रत्येक पळास बदलत जाणार. म्हणून कुंडली मांडताना स्थल आणि काल याचेकडे अतिशय लक्ष पुरवावें लागतें. रोजच्या स्पष्ट सूर्योदयाची वेळ समजण्याकरतां ज्याप्रमाणें चरखंडें व उदयान्तरवेलाखंडे याची दररोजचीं कोष्टकें तयार ठेवावीं लागतात त्याचप्रमाणें प्रत्येक अक्षांशावरील उदयलग्न व दशमलग्न प्रत्येक दिवशीं कसकसें बदलतें त्याच्या सारण्या सूक्ष्म कुंडलीकरिता तयार ठेवाव्या लागतात स्थलपरत्वें होणाऱ्या उदयलग्नाच्या विपर्ययाकडे लक्ष न देता कुंडल्या मांडण्याचा हल्लीं बराच प्रघात आहे. परंतु ह्या सर्व कुंडल्या ठोकळ मानाच्या होत सूक्ष्म कुंडलीस भावचलित कुंडली म्हणतात व हीच कुंडली खरी होय.

नक्षत्रें, ग्रह, किंवा चंद्र ह्यांपैकीं कोणीहि सूर्यापासून ८ पासून १२ अंशापेक्षा जवळ असले म्हणजे ते त्याच्या तेजांत लुप्त होऊन दिसत नाहींत. तेव्हां त्यांचा अस्त होतो त्याला अदर्शन म्हटलें असता चालेल ह्याप्रमाणें त्याचें जेव्हां अदर्शन नसतें तेव्हा सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंतच्या कालात केव्हां तरी ते पूर्वेस उगवतात, आणि पश्चिमेकडे सरकत जातात हा जो त्याचा नित्यक्रम ती त्याची दैनंदिन गति होय सूर्य हा देखील ह्याप्रमाणेंच नित्य दैनंदिन गतीनें फिरतो. ज्योतिःशास्त्रातील पहिलें कार्य म्हणजे सूर्याप्रमाणेंच चंद्र आणि ग्रह ह्याचे रोजचे विषुवांश व क्रांति ह्यावरून भोग व शर ठरवावयाचे. ह्याप्रमाणें कित्येक वर्षें परिश्रम करून ज्योतिर्षांनीं त्याचे नक्षत्रपुंजांतील मार्ग निश्चित केले आहेत. त्या मार्गांना कक्षा म्हणतात. आणि सूर्याच्या कक्षेला आक्रमवृत्त म्हणतात. वास्तविकपणें सूर्य स्थिर असून पृथ्वीच त्याच्या भोंवतीं

फिरत आहे तरी सोईसाठीं सूर्यच नक्षत्रातून फिरतो असें मानतात आणि ह्या संकेताला अनुलक्षून पृथ्वीच्या कक्षेलाच **रविकक्षा** अथवा आक्रमवृत्त म्हणतात. ह्याप्रमाणें रविचन्द्रादि ग्रहांचे गमनमार्ग दोन प्रकारचे आहेत. पहिला वास्तविक म्हणजे त्याचा नक्षत्र पुंजांतून फिरण्याचा मार्ग अथवा कक्षा वृत्त दुसरा दैनंदिन म्हणजे ते रोज पूर्वेकडे उगवून पश्चिमेकडे सरकत जाऊन मावळतात तो मार्ग. हा दुसरा दैनंदिन मार्ग केवळ पृथ्वीच्या दैनंदिन गतिमुळें उत्पन्न होतो. पृथ्वी आपल्या आसाभोंवतीं २४ तासात एक फेरा घेते त्यामुळें रवि, चंद्र, ग्रह आणि नक्षत्रें हीं सर्व पूर्वेकडे उगवून पश्चिमेकडे मावळतात. ह्या दैनंदिन मार्गानें नक्षत्रें दररोज जातात तेव्हां तीं विषुववृत्तावरून किंवा त्याच्या दक्षिणेकडून अगर उत्तरेकडून. परंतु विषुववृत्ताशीं **समान्तर** अशाच मार्गानें जातात. सूर्य चंद्र आणि ह्यांचा मार्ग मात्र पूर्णपणें समान्तर नसला तरी साधारणतः समान्तरच म्हणावयास हरकत नाहीं; त्याच्या मार्गाचा नकाशा (आकृतीमध्यें) दाखविला आहे *त्यातील ज्या रेषेवरून ग्रह जात असेल त्या रेषेपासून विषुववृत्तावर जो लंब तितकी त्या ग्रहाची क्रान्ति असते.* ह्यात १, २, ३ ही उत्तरक्रान्ति आणि १′ २′ व ३′ ही दक्षिणक्रान्ति होय. अशाच रीतीनें आकाशाच्या पोकळींत पृथ्वी ही मध्यबिंदूस्थानीं आणि २७ नक्षत्रें परिघावर ठेवून रविची स्थिति दाखविता येते. हें कल्पनेनें कोणाच्याही लक्षात येईल.

चंद्र पृथ्वीभोंवतीं फिरतो आणि पृथ्वी रविभोंवतीं फिरते त्याचप्रमाणें बुध, शुक्र, मंगळ गुरु शनि हर्शल आणि नेपच्युन हे ग्रह देखील सूर्याभोंहतीं फिरतात, परंतु वर्तुळाकार कक्षेनें फिरत नाहींत, दीर्घ वर्तुळ कक्षेनें म्हणजे दीर्घवर्तुळ मार्गानें फिरतात. (आकृतिमध्यें वर्तुळ मार्ग आणि दीर्घ वर्तुळ मार्ग दाखविला आहे). *ग्रह जर वर्तुळाकार कक्षेनेंच सूर्याभोंवतीं फिरेल तरच त्याची प्रत्यक्ष दिनगति अगदीं* **समसमान** राहून तिलाच मध्यम गती आणि तिलाच स्पष्ट गति म्हणतां आलें असतें. परंतु ग्रह दीर्घ वर्तुळांत फिरतो त्यामुळें त्याची आजची आणि उद्यांची दिनगति कधींहि समान नसते, थोडी तरी कमी जास्त असते. "नी" ह्या ठिकाणीं ग्रह सूर्याच्या जवळ येतो तेव्हा गतिशास्त्राच्या नियमाप्रमाणें त्याची दिनगति त्या दिवशीं ज्यास्तींत ज्यास्त असते. नतर तो बाण दिशेनें फिरू लागला म्हणजे तो सू–नी ह्या अन्तरापेक्षा ज्यास्त ज्यास्त अन्तरावरून फिरूं लागतो आणि त्या मानानें त्याची प्रत्यक्ष दिनगति कमी कमी होत जाऊन तो "उ" ह्या स्थानीं सूर्यापासून ज्यास्ती ज्यास्ती दूर म्हणजे उच्चस्थानीं गेला जास्त गति आणि कमीत कमी गति ह्याची जी सूक्ष्म सरासरी तिलाच **मध्यम दिनगति गति म्हणतात.** पृथ्वीची (व्यावहारिक भाषेंत सूर्याची) ज्यास्तीत ज्यास्त दिनगति ६१′ ९″ आणि कमीत ५७′ १०″ इतकी अजमासें असतें. म्हणून त्यांची सरासरी ५९′ ८″ ही मध्यम दिनगति झाली, परंतु अशा रीतीनें काढलेली मध्यम दिनगति थोडी स्थूलच असते. कक्षेचा घेर मैलाच्या मोजणीनें कितीही असला तरी वर्तुलाच्या मोजणीनें प्रत्येक ग्रहाची कक्षा ३६० अंशच असते; म्हणून ग्रहाच्या प्रदक्षिणाकालाने ३६० अंशांस भागिलें असता सूक्ष्म मध्यम दिनगति निघते.

आकाशामध्ये ग्रहाचें स्थान **भोग** आणि **शर** ह्या भावेनें ठरतें; शर हा आक्रमवृत्ताला अनुलक्षून सांगितला असतो म्हणून सूर्य (म्हणजे पृथ्वी ही) आक्रमवृत्तातच भ्रमण करीत असल्यानें सूर्याला शर नसणार हें साहजिक आहे. पण आज आपण वेधानें सूर्याचा **भोग** काढिला आणि त्यानतर दोन महिन्यानीं पुनः वेध घेऊन भोग ठरविला तर हे दोन प्रकारचे भोग सूर्याची प्रत्यक्ष किंवा स्पष्ट स्थानें दर्शवितील. म्हणजे त्याप्रमाणें त्या त्या ठिकाणीं आकाशात सूर्य प्रत्यक्ष असेल. पण पहिला भोग काढिल्यानंतर त्याच भोगात सूर्याची दोन महिन्यांची मध्यम दिनगति मिळवून जर दुसरा भोग ठरवूं लागलों तर मध्यम गतिनें आलेला **भोग** आणि प्रत्यक्ष वेधानें निघालेला दुसरा भोग ह्याच्यात अन्तर पडणारच. कारण मध्यम गती ही गणिताच्या सोईसाठीं मानलेली असते मध्यम गतीच्या दृष्टीनें आलेले जे ग्रहाचेंस्थान त्याला मध्यमग्रह आणि प्रत्यक्ष वेधाप्रमाणें ठरणारें जें स्थान (तें अशादि भाषेंत सांगितलें म्हणजे) त्याला स्पष्ट सूर्य म्हणतात. मध्यम आणि स्पष्ट स्थानामध्यें जें अंशादि अन्तर त्याला मन्द फल म्हणतात. मध्यम ग्रहाला मन्द फल संस्कार देऊन स्पष्ट सूर्य आणतात. अर्थात् स्पष्टग्रहाला मन्दफल संस्कार उलट केला असतां

स्पष्ट ग्रहावरून मध्यम ग्रह काढता येईल. सूर्याप्रमाणेंच चन्द्र–बुध–शुक्रादि ग्रह ह्यानाहि मध्यम आणि स्पष्ट अशीं दोन स्थानें असतात.

नक्षत्राप्रमाणेच मेषादि द्वादश राशींसुद्धा क्रांतिवृत्ताचे अनुरोधानें आहेत. नक्षत्रें जशीं डोळ्याना प्रत्यक्ष दिसतात त्याचप्रमाणें मेषवृषभ हे राशिपुंजहि डोळ्याना प्रत्यक्ष दिसतात, आणि पाहणाराच्या मनावर आपल्या आकृतीच्या मनोहरत्वाचा रम्य ठसा उमटवीत असतात. आक्रमवृत्ताचे जें वलय आहे त्याच्या दक्षिणोत्तर दोन्ही बाजूस ६।६ अंश इतका प्रदेश नक्षत्रें व राशि ह्यानीं व्यापलेला आहे. त्या प्रदेशाला राशिचक्र ( इग्रजींत Zodiac ) म्हणतात. राशिचक्रातून अथवा नक्षत्राच्या ह्या पट्ट्यातूनच सूर्य फिरतो. सूर्य ज्या नक्षत्राच्या जवळ येतो तें व त्याच्या जवळचें कोणतेहि नक्षत्र दिसत नाहीं. त्यामुळें सूर्य नक्की कोणत्या नक्षत्रात आहे हें प्रत्यक्ष पाहाता येत नाहीं. ह्याकरिता सोय अशी करावी लागते कीं, प्रत्येक नक्षत्राची क्रांति व विषुवांश अमुक दिवशीं अमुक आहेत असें अनेक वेळा सूक्ष्मवेध घेऊन ठरवून आणि त्यावरून त्याचे भोग व शर हे गणितानें काढून नक्षत्राचा एक उत्तम आलेख किंवा नकाशा तयार करतात. नतर मध्यरात्रीचे वेळेस जे नक्षत्र याम्योत्तरावर येईल त्याचे अगदीं समोरचें बाजूस १८० अंश सूर्य त्या वेळीं आहे असे निश्चित करतात अगर त्या नक्षत्राचे याम्योत्तर लघनाचे वेळेपासून सूर्य दुसरे दिवशीं किती वेळानें मध्यान्हवृत्तावर आला हें पाहून ठेवतात व त्यावरून पृथ्वीचें दैनंदिन भ्रमण व सूर्याची गति हिशेबात घेऊन त्या नक्षत्रापासून सूर्याचे विषुवांश निश्चित करून त्यावरून त्याचा भोग काढतात. किंवा सूर्याची मध्यान्हींची रोजची क्रांति किती आहे तें सूक्ष्मपणें पाहून त्या सूक्ष्म क्रांतिवरून त्याचा रोजचा भोग काढतात. याप्रमाणें अनेक वेध घेऊन सूर्याचा नक्षत्रपुंजातील गमन मार्ग निश्चित केला आहे त्यालाच आक्रमवृत्त म्हणतात. नक्षत्रें व राशि हे अचल आहेत म्हणजे त्यांच्या परस्परामधील दृश्य अंतर हजारों वर्षांत सुद्धा विचारात घेण्याइतकेंहि बदलत नाहीं. अचल व स्थिर ह्याचा ज्योतिषशास्त्रात अर्थ इतकाच आहे. नक्षत्रें जशी अचल त्याचप्रमाणें सूर्याचा गमनमार्ग देखील अचलच आहे, म्हणजे नक्षत्राच्या धोरणानें पाहिलें असता त्या गमनमार्गाची दिशा आज हजारों वर्षांनींहि म्हणण्यासारखी बदललेली नाहीं. नक्षत्रें व आक्रमवलय हीं अचल अथवा स्थिर आहेत. परंतु आक्रमवृत्ताशीं २३॥ अंशाच्या कोन करणारें विषुवलय मात्र चल आहे आक्रमवृत्त व विषुववृत्त हीं एकमेकांस दोन ठिकाणीं छेदितात. त्या दोन्ही छेदनबिंदूस संपात असें म्हणतात. ह्याचें एकमेकापासूनचें अंतर बरोबर १८० अंश असतें. सूर्यक्रांतिवृत्तातून फिरताना प्रत्येक संपातात एकेक दिवस येतो. विषुववृत्ताच्या उत्तरेकडे सूर्य जात असतां जो संपात लागतो तो वसंत संपात होय सूर्य वसंत संपातीं मार्च महिन्याच्या २०।२१ तारखेस येतो. व त्याच्या समोरच्या संपाती सप्टेंबरचें २२।२३ वें तारखेस येतो. या दोन्ही दिवशीं दिनमान व रात्रिमान समसमान असतें म्हणून ह्याना विषुवदिन म्हणतात भोग व विषुवांश हे वासंतिक संपातबिंदूपासून पूर्वेकडे मोजीत जातात. संपात, संपात म्हणून ज्योतिष्याच्या बोलण्यात नेहमीं येतो तो वसंतसंपातच होय. काचेच्या दोन बांगड्या एकींत एक चिकार बसतील अशा घेऊन त्या दोहोंत सुमारें २३॥ अंशाचा कोन होईल इतक्या तिर्कस धरल्यास विषुव व आक्रम हीं वलयें एकमेकाशीं कसा कोन करतात व एकमेकांस दोन ठिकाणीं कसें छेदितात तें स्पष्ट दिसेल बाहेरची बांगडी ही आक्रमवृत्त समजून आतलीस विषुववृत्त म्हणावें, व आतील बांगडी तशीच तिर्कस ठेऊन दोन्ही छेदनबिंदु मागें मागें सरकत जातील अशा तऱ्हेनें फिरवावी म्हणजे आकाशातील संपातबिंदु क्रांतिवृत्तावर मागें मागें कसें सरत जातात तें ध्यानांत येईल. आकाशातील कोणताही संपात दरसाल ५०·२ ह्याप्रमाणें नक्षत्रातून मागें पश्चिमेकडे सरत जातो. अर्थात् सुमारें ७१।७२ वर्षांत एक अंश ह्याप्रमाणें मागें जाण्याची त्याची गति आहे. हिलाच संपाताची विलोमगति म्हणतात. एकाहत्तर वर्षांपूर्वी जेथें संपात होता त्या ठिकाणापासून एक अंश पश्चिमेस तो आज आहे व आणखी एकाहत्तर वर्षांनीं तो हल्लीं आहे त्याच्या मागे एक अंश जाईल. याप्रमाणें संपात दरसाल मागें जात आहे. आणि ग्रहलाघवीय रविचें स्थान दरसाल ८॥ विकला पुढें पूर्वेस सरकत चाललें आहे. त्यायोगानें संपात आणि ग्रहलाघवीय आरंभस्थान ह्यांच्यामध्यें प्रतिवर्षांस सुमारें ५८॥ (५० + ८॥)

साडे अठ्ठावन विकलांचे अंतर पडत आहे व निरयन पद्धतीच्या मुळावरच घाव पडून तिचा नायनाट होऊं पहात आहे. ही आपत्ति टाळलीच पाहिजे आणि निरयन पद्धतीचें अबाधित तत्त्व कायम ठेविलें पाहिजे. तें तत्त्व असें आहे कीं, आरंभस्थान म्हणजे वर्षारंभस्थान अचल पाहिजे अर्थात तें तारात्मक असावें अगर नक्षत्र पुंजांतील परंपरागत तारेच्या इतकें सन्निध असावें कीं त्याच्या अचलत्वाविषयीं किंवा त्याच्या स्थानाविषयीं संदेह उत्पन्न होऊं नये. ग्रहलाघवीय आरंभस्थानानें ही मुख्य गोष्ट मुळींच साध्य होत नाहीं व आरंभ स्थानाचा स्थिर तारेशी संबंध राहत नाहीं. एखाद्या विशिष्ट तारेशीं संबंध असणें ह्याचा अर्थ असा कीं, आरंभस्थान त्याच तारेपाशीं किंवा तिच्या जवळ सदैव असावयाचें. परन्तु ग्रहलाघवीय वर्षमान स्वीकारल्यास आरंभस्थानाचें कायमचें निकट सानिध्य स्थिर तारेशीं राहणें शक्य नाहीं. ग्रहलाघवीय आरंभस्थान प्रतिवर्षी चळून पूर्वेकडे पुढें जात असल्यानें परंपरागत आरंभस्थान कोणतें असावें हा एक मोठा प्रश्न उत्पन्न झाला. ह्यालाच अयनांशाचा प्रश्न म्हणतात. सायन आणि निरयन आरंभस्थान ह्याच्या मधील जें अंशात्मक अंतर तें अयनांश. समजलें म्हणजे आरंभस्थान ठरतें अगर आरंभस्थानाचा निर्णय झाला म्हणजे अयनांशही निश्चित होतात म्हणून आरंभस्थाननिर्णयाचें येथें दिग्दर्शन करणें अप्रासंगिक होणार नाहीं.

आरंभस्थान हें पूर्वपरंपरेस अनुसरून पाहिजे. ज्याला परंपरा नको त्याला भारतीय पंचांगाची जरूर नाहीं. ज्याला वैदिक धर्म नको, परंपरा नको, तो आमचा नव्हे व त्याच्या करितां हा प्रयत्नहि नाहीं. ही परंपरा डोळ्यांत तेल घालून आपल्या पूर्वजांनीं आजपर्यंत रक्षण केली आहे. व म्हणूनच यवनज्योतिष आमच्यावर लादूं पहाणाऱ्या रोमक सिद्धांतकारासारख्या खुळसट मनुष्याची डाळ इकडे शिजली नाहीं. ज्या मनुष्यानें रोमक सिद्धांतांतील परकीय तत्त्वें आमच्या परंपरेंत घुसडण्याचा निंद्य प्रयत्न केला त्याच मनुष्याच्या मनःस्थितीचें चित्र परंपराभिमानशून्य लोकांच्या कृतीत हल्लीसुद्धां पहाण्यास सांपडतें. असिरियन भाषेचें कांहीं एक ज्ञान नसतां किंवा पुरता शोधही न करतां आम्ही भारतीयांनीं सूर्यसिद्धांतांतील ज्योतिष असिरियन लोकांकडून घेतलें, असलें निराधार विधान असाच मतिभ्रष्ट लोकांनीं केलारा केलें आहे. विवेक शून्यानां कसली परंपरा आणि कसला अभिमान ! जर्मन व फ्रेंच ग्रंथकार खोडसाळपणानें, मूर्खपणानें, किंवा अडपणानें आम्हां भारतीयांसंबंधानें पाहिजे तशीं विधानें करीत असतांना त्यांतील ढोंगाचें ज्यांना अद्यापि ज्ञान होत नाहीं, त्यांनीं सत्याच्या कल्पना करणें व सूर्यसिद्धांतांतील ज्योतिष आम्हीं असिरियन लोकांपासून घेतलें असल्या नादानपणाच्या गोष्टी वाचकांच्या डोक्यांत कोंबण्याचा प्रयत्न करणें ही अत्यंत शरमेची गोष्ट होय. प्राचीन काळच्या ज्योतिषाचे सिद्धांत हे एकट्या असिरियन लोकांच्या बापाचे नव्हेत. व ग्रीक लोकांच्या प्रपितामहांचेहि नव्हेत. ते प्राचीन काळच्या सर्व सुसंस्कृत राष्ट्रांचे होत. ज्यास ही उघड गोष्ट कळली नाहीं तो मनुष्य वैदिक परंपरेचा शत्रु होय. तो वैदिक परंपरेचा शोध न करतां तिला मूठमाती देण्याची तयारी मात्र करणार आणि असिरियन लोकांच्या लायण्या गाऊन त्यांच्याच द्वारावर थापा मारीत राहणार !

परंपरेचा उच्छेद करणाऱ्यांविषयीं आणखी लिहून जास्त जागा अडविण्याचें कारण नाहीं. परन्तु आपली परंपरा काय आहे तें मात्र आपणांस समजून घेतलें पाहिजे, म्हणून मागील एका मुद्याचें समालोचन करूं. रवि आद्यमवृत्तांतून फिरतो, तरी त्याचें अंतर पृथ्वीपासून दररोज न बदलतें. कारण आद्यमवृत्त हे वर्तुळ नसून दीर्घवर्तुळ आहे. त्यामुळें ज्यानेवारीच्या १ पहिल्यातारखेच्या सुमारास रवि हा नीची म्हणजे पृथ्वीच्या जवळ येतो; आणि त्या दिवसापासून त्याचें पृथ्वीपासूनचें अन्तर दररोज वाढत जाऊन जुलैच्या ३१ तारखेच्या सुमारास तो आपल्या उच्चामध्यें असतो. ह्याच स्थानाला रवीचें उच्च म्हणतात. त्या ठिकाणीं पृथ्वीपासून त्याचें अन्तर ज्यास्तीत जास्त असतें. गतिशास्त्राचा नियम असा आहे कीं, रविपासून ग्रहाचें अन्तर जास्त झालें म्हणजे त्याची दिनगति कमी होते, आणि तें अन्तर कमी झालें कीं दिनगति जास्त असते म्हणूनच ज्यानेवारीच्या १ तारखेस रविची दिनगति सुमारें ६१ कला आणि जुलैच्या पहिल्यातारखेस दिनगति अजमासें ५७ कला असते.

सायनाब्दापावर रवि आल्यावरोबर त्याचा दररोज येथ येत गेले असतां तो वसंतसंपातापासून दूर दूर जात आहे किंवा वसंतसंपाताच्या जवळ जवळ येत आहे या दोहोंपैकी एक गोष्ट निश्चितपणें दिसून येईल.

सूर्याचें मध्यान्हवृत्तावरील दररोजचें स्थान व विपुववृत्त ह्या मधील दक्षिणोत्तर अंतर ती क्रांति होय. सूर्य विपुवाचे उत्तरेकडे असतो तेव्हा त्याची क्रांति उत्तर असते. दक्षिणेकडे असतो तेव्हा क्रांति दक्षिण असते. आणि खुद्द विपुववृत्तावर म्हणजे संपाती असला म्हणजे क्रांति शून्य असते, अशी परिभाषा आहे. सूर्य संपातीं आल्याशिवाय तो विपुववृत्तावर कधींहि येत नाहीं. म्हणून विपुवांवर आला म्हणजे तो संपाती आला व त्याची क्रांति शून्य झाली असें समजतात. वसंत ऋतुंत सूर्य ज्या संपातीं येतो त्याला वसंत संपात म्हणतात. वसंत संपात हल्लीं पूर्वाभाद्रपदा व उत्तराभाद्रपदा ह्याच्या दरम्यान आहे व सूर्य संपातीं येतो त्या दिवशीं मार्च महिन्याची २१ तारीख असते. त्यानंतर तो विपुवाच्या उत्तरेकडे जातो. व आकृतित दाख त्याप्रमाणें त्याची क्रांति वाढत जाते. ती वाढता वाढतां जूनच्या २२ तारखेचे सुमारास पावसाळ्यामध्यें २३ अंश २७ कला होते, हिलाच परम क्रान्ति म्हणतात. त्यापेक्षां ती जास्त वाढत नाहीं. उलट कमी होऊं लागते व सूर्य दक्षिणेकडे मागें वळूं लागतो. ह्या दिवशीं दिनमान अर्थात ज्यास्तीत जास्त मोठें असतें व त्याच वेळेस दक्षिणायनास सुरवात होते. याप्रमाणें क्रांति क्रमानें दररोज कमी होत होत पावसाळ्याचें अखे रीस ता० २३ सप्टेंबरचे सुमारास शून्य होते व सूर्य पुनः विपुववृत्तावर येतो. त्यानंतर त्याची क्रांति दक्षिण होऊं लागून ती वाढतां वाढता २२ डिसेंबरचें सुमारास तिची परमावधि होते व रात्रिमान जास्तींत जास्त होऊन सूर्य उत्तरेकडे परत जाऊं लागतो. हा दिवस उदगयनाचा होय. हा हिवाळ्याच्या आरंभीचे महिन्यात पडतो. नंतर पुनः सूर्याची दक्षिणक्रांति कमी कमी होत जाऊन वसंत ऋतूत सूर्य पुनः संपाती येतो व संपातिवर्ष पुरें होतें असा क्रम अखंड चालूं आहे.

ज्याप्रमाणें खविपुवाचा आणि खगोलाचा ध्रुव बिन्दु ध्रुवतारेजवळ आहे, त्याप्रमाणें आक्रमवृत्त हें जें महत् वर्तुळ त्यालाहि दोन ध्रुवबिन्दु मानले आहेत त्यानाच कदंब असें म्हणतात. सूर्य हा आक्रमवृत्तांतच असतो.परंतु चंद्र, व इतर ग्रह हे बहुतकरून आक्रमवृत्ताच्या दक्षिणेस किंवा उत्तरेस असतात; तेव्हा कदंबबिंदु, आणि ग्रह ह्यांच्यातून जाणारें जें वर्तुळ आक्रमवृत्ताशी काटकोन करील तेंच त्या ग्रहाच्या शराचें वर्तुल होय. ह्याच वर्तुळावर ग्रहापासून शराचें मापन अंश कलादिकांनीं करितात. त्याचप्रमाणें खविपुवाचा ध्रुवबिन्दु आणि ग्रह ह्यांच्यातून जाऊन जे वर्तुळ विपुवाशीं काटकोन करितें त्याच वर्तुळावर क्रान्ति मोजतात. व ती ग्रहापासून विपुवापर्यंत मोजावयाची असते. परंतु ही क्रान्तिची मोजणी जुन्या सूर्य सिद्धान्तादि ग्रंथात ग्रहापासून आक्रमवृत्तापर्यंत केली असते. ध्रुवांतून निघून विपुवाशीं काटकोन कर -या वर्तुळाचा आक्रमवृत्ताशीं कधींहि काटकोन नसतो. तथापि जुन्या ग्रंथातून ह्याच अर्ववट क्रान्तिला ध्रुवाभिमुख शर असें नांव दिलें आहे; आणि ध्रुवाभिमुख शर आक्रमवृत्ताचा जेथें छेद करतो तेथपासून वसंत संपातापर्यंतचें जें अंशादि अन्तर त्याला जुन्या ग्रंथांत ध्रुवक किंवा ध्रुवाभिमुख भोग किंवा दृक्कर्म संस्कृत भोग असे म्हणतात. कंदववृत्तांतून जाणाऱ्या वृत्तावरील ग्रह हा वास्तविक शर आणि सं. हा त्याचा वास्तविक भोग होय.

भारतीय परंपरेचें मूळ स्वरूप कसें होतें त्याचा सांगोपांग ऊहापोह विद्वन्मुकुटमणि लोकमान्य टिळक यांनीं आपल्या ग्रथांत केला आहे तो ग्रंथ व कै. कृष्णशास्त्री गोडबोले ह्यांचे एक लहानसें पुस्तक ह्यांचें विचारपूर्वक अवलोकन केल्यास आपल्या पूर्वपरंपरेतील महत्वाच्या पुढील गोष्टी निदर्शनास येतात त्या पैकीं:

पहिली गोष्ट ही कीं, आक्रमवृत्ताच्या पट्टयांत जे कृत्तिका मृग, आर्द्रा, पुनर्वसु इत्यादि नक्षत्रपुंज आहेत त्याचीं नावें आता आहेत तींच वैदिककाळींही होतीं. मृगाला अश्विनी किंवा हस्ताला श्रवण अशा तऱ्हेची नावाची घालमेल कधीं झाली नाहीं. अर्थात् नक्षत्रपुंजांच्या नांवांची अदलाबदल न होणें हें त्या परंपरेचें पहिलें मुख्यस्वरूप आहे.

दुसरी गोष्ट अशी कीं, नक्षत्रपुंजांपैकीं ज्या नक्षत्राजवळ चंद्र पूर्ण होतो त्या पूर्णिमेस त्या नक्षत्राचें नांव द्यावयाचें. विशाखेजवळ चंद्र पूर्ण होतो त्या पूर्णिमेस वैशाखी, ज्येष्ठा नक्षत्रीं होणाऱ्या पूर्णिमेस ज्येष्ठी,

अशीं नावें देऊन त्यानंतर तत्प्रयुक्तमहिन्यांनाहि वैशाख, ज्येष्ठ अशी नावें दिलेलीं आहेत, तीं तदनुरूप अर्थानें कायम ठेवणें ही मुद्याची दुसरी गोष्ट होय.

वर्ष सौर व महिने चांद्र मानावयाचे व सुमारें ३२।३३ *महिन्यांनीं एक चांद्र महिना अधिक धरून चांद्रसौर मानांचा मेळ घालावयाचा हा आपल्या परंपरेचा तिसरा विशेष आहे.

वर्षारंभ कोणत्याही महिन्यापासून मानला तरी ऋतूंचें चक्र, व अयनें वास्तविक असतील तशींच मानावयाची हा चवथा विशेष आहे. ह्याप्रमाणें आमच्या वर्षमानांत नक्षत्र व आर्तव ह्या दोन्हीं पद्धतीस पूर्ण वाव आहे. ऋतूंचें चक्र ही नैसर्गिक परिस्थिति आहे. व निरयन वर्ष म्हणजे नक्षत्र प्रदक्षिणा अथवा पूर्ण प्रदक्षिणा काल हीसुद्धां नैसर्गिक स्थिति आहे. आपल्या परंपरेत ह्या दोहोंचाहि मेळ घातला आहे. व तो जितका पडेल तितकाच घातला आहे. कारण परंपरा म्हणजे ज्योतिःशास्त्र विरोध नव्हे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. जी ज्योति शास्त्राच्या आड येणार नाहीं तीच खरी परंपरा होय.

चंद्रगतिचें गणित त्याच्या अत्यंत अनियमित गतिमुळें अवघड व गुंतागुंतीचे झालें आहे. तथापि त्याला सुलभता येण्याकरितां १५ व्या दिवशीं पौर्णिमा व ३० व्या दिवशीं अमावास्या असें ठरविणें असमंजसपणाचें होईल. कारण मग गणितागत पौर्णिमेचे दिवशीं खरी पौर्णिमा येईलच अशी खात्री देता येणार नाहीं. तीच अवस्था पूर्ण प्रदक्षिणाकालात ऋतूंचे विपर्यय जबरदस्तीनें बसविण्यानें होत आहे. उलट, ऋतूंच्या विपर्ययाच्या धोरणानें वर्ष धरल्यास नक्षत्र पुंजाशीं आपल्या वर्षमानाचा जो कायम संबंध आहे तो तुटेल व परंपरा भग्न होईल. परंपरा ठेवणें म्हणजे परंपरेचा नुसता देखावा ठेवणें असा अर्थ नव्हे. सायनवाद्याच्या मताप्रमाणें चालल्यास परंपरा हें एक नाटक होईल. परंपरा नुसती सायन नाहीं व केवळ निरयनहि नाहीं. ती संमिश्र आहे. सायनवाद म्हणजे सायनाचा अतिरेक करून नक्षत्र वर्षमान प्रचारांतून बुडविणें होय; व निरयन ऋतुवाद म्हणजे ऋतुचक्राचा उच्छेद गणितांत करून ऋतुपरंपरा नष्ट करणें होय. ह्या दोन्हींच्या अतिरेकांपासून परंपरेचा बचाव करणें हेंच खऱ्या सुधारणेचें लक्षण होय. ह्यापेक्षा विवेकहीन सायनवादासंबंधानें येथें जास्त लिहिण्याचें प्रयोजन नाहीं.

आरंभस्थानाचा म्हणजे अयनांशाचा वाद समजून घेण्यास पुढील आकृति मनश्चक्षूंसमोर ढळढळीत ठेविली पाहिजे. आकृति ( क ) यात आक्रमवृत्ताच्या परिघाच्या पट्ट्यात नक्षत्रपुंज कसे आहेत तें दाखविलें आहे. हे पुंज अचल आहेत. व म्हणूनच पूर्ण प्रदक्षिणा कालास विशेष महत्त्व आहे. संपात हल्लीं पूर्वाभाद्रपदा नक्षत्राचे अर्ती आहे व तो सायक रेषेनें दाखविला आहे. अयनें उ द या रेषेनें दाखविलीं आहेत. तीं हल्लीं अनुक्रमें मूळ व आर्द्रा ह्या नक्षत्रपुंजांत आहेत. नक्षत्रपुंज हल्लीं ज्या स्थितींत आहेत, त्याच बहुतेक स्थितींत ते हजारो वर्षें राहतात. त्यांचीं परस्पर सापेक्ष स्थानें बदलत नाहींत म्हणून नक्षत्रचक्र कायम मानण्यास हरकत नाहीं. परंतु संपात व अयनें यांचीं नक्षत्रासंबंधानें हल्लीं जी स्थिति आहे ती पूर्वी नव्हती व पुढेंही राहणार नाहीं. सुमारें चवदाशें वर्षांपूर्वी संपात व अयनें ह्यांची स्थिति ( ख ) आकृतींत दाखविली आहे. घड्याळांतील काटे ज्या दिशेनें फिरतात त्याच्या अगदीं उलट दिशेनें संपात व अयन बिंदू फिरतात. १४०० वर्षांपूर्वी संपात आरंभस्थानीं होता. त्यानंतर तो चिन्हयुत १ ह्या स्थानीं आला. नंतर २′ ३′ ह्याप्रमाणें दरसाल ५०·२ विकला ह्या मानानें मागें हटत आहे. शुद्धनिरयन वर्ष म्हणजे सूर्यास नक्षत्र पुंजांतील कोणत्याहि एका ताऱ्यापासून निघून आक्रमवृत्तपरिघाच्या प्रदक्षिणेने पुनः त्याच स्थलापर्यंत येण्यास जितका काल लागतो तो काल होय. त्या स्थलापर्यंत सूर्य पोहोंचला नाहीं तोंपर्यंत वर्षमान अपुरें, व स्थल सोडून पुढें गेलेला असल्यास वर्षमान अध्याधिक अथवा जास्त आहे म्हणून समजावें. संपातबिंदु मागें हटत असल्यामुळें सूर्य एकदा संपातबिंदुपासून निघून प्रदक्षिणा मार्गानें पुनः पहिल्या स्थानीं येण्याचे अगोदर संपातबिंदूच मागें हटून सूर्यास उलट दिशेनें येऊन मिळतो. त्यामुळें होतें काय कीं, संपात स्थिर असता जितका वेळ सूर्यास पुनः संपातीं येण्यास लागला असता त्यापेक्षा कमी वेळ

संपात बिंदू चळत असल्यामुळें लागतो. समजा कीं ( ख ) आकृतींत आ ह्या स्थानीं संपात आहे व तेथून सूर्य निघाला तो पुनः आ येथें येण्यापूर्वीच सं १′ ह्या ठिकाणीं संपात येतो आणि संपात व सूर्य एकत्र होतात परंतु सं १′ व आ ह्यांच्यामधील अंतराइतकी प्रदक्षिणा अपुरी राहते. दुसऱ्या खेपेस सं १′ येथून सूर्य निघून पुनः सं १′ येथें पोहोंचण्यापूर्वींच संपात मागें हटून सं २′ ह्या ठिकाणीं सूर्यास मिळतो. म्हणजे पुनः प्रदक्षिणा अपुरीच राहते. ह्याप्रमाणें सांपातिक प्रदक्षिणा ही अपुरी प्रदक्षिणा होय. सूर्याचा पूर्ण प्रदक्षिणाकाल ३६५ दि. १५ घ. २२·९ पळें इतका आहे. व सांपातिक अथवा अपुऱ्या प्रदक्षिणेचा काल ३६५ दिवस १४ घटका ३१ पळें म्हणजे सुमारें ५१ पळांनीं कमी आहे. संपात व अयनें हीं एक-सारख्या गतीनेंच मागें हटत असतात. १४०० वर्षांपूर्वी संपात अश्विनी नक्षत्राच्या आरंभीं किंवा रेवती-नक्षत्राच्या शेवटीं होता. त्यानंतर तो उत्तराभाद्रपदा नक्षत्रात आला. हल्लीं पूर्वाभाद्रपदा नक्षत्राच्या शेवटीं तो आला आहे. आतां पुढें शततारकानक्षत्रांत जाईल व सालोसाल मागें हटत हटत सुमारें २६ हजार वर्षांनीं पुनः अश्विनीचें आरंभीं येईल.

१४०० वर्षांपूर्वी संपात अश्विनी नक्षत्राचे आरंभीं होता म्हणून सांगितलें. परंतु त्याच्याहि पूर्वी तो अश्विनी नक्षत्राच्या पूर्वेस होता. सात सवासात हजार वर्षांपूर्वी वसंत संपात पुनर्वसुनक्षत्राचे सुमारास होता. त्याला अनुलक्षून कांहीं उल्लेख ऋक्संहितेंत सांपडतात. त्यानंतर दोनहजार वर्षांनीं संपात मृग नक्षत्रात मागें आला. संपात मृग नक्षत्रांत होता व त्यानंतर कृत्तिका नक्षत्रात आला असें निर्विवाद सिद्ध करणारे उल्लेख अनुक्रमें ऋक्संहितेंत व तैत्तिरीय संहितेंत आहेत. लोकमान्याचा शोध तो हाच. त्याची अपूर्वता व महत्व किती आहे त्याचें वर्णन थोडक्यात होणार नाहीं व तें यथातथ्य उतरणारहि नाहीं. ह्या अभूतपूर्व शोधामुळें पाश्चिमात्यांच्या विचारौघांत विलक्षण क्रांति व खळबळ उडून गेली, व भारतीयाची खरी परंपरा कोणती यानें ज्ञान आपणासहि वस्तुस्थित्यनुरूप झालें. यामुळें परंपरा विकृतहि झाली नाही व उच्छिन्न होण्याचीहि भीति तिला उरली नाहीं. भारतीय परंपरा कालाच्या महासागरांत खडकावर मजबूत रीतीनें स्थानापन्न केल्या-प्रमाणें चिरस्थायी होण्यास लोकमान्यांचा शोधच कारणीभूत झाला आहे, इतकें सांगितलें म्हणजे त्या शोधाला भारतीयइतिहासात अभूतपूर्व महत्व कां आहे तें तत्काळ ध्यानांत येईल.

पूर्ण प्रदक्षिणाकाल म्हणजे शुद्ध निरयन वर्षमान ३६५ दिवस, १५ घटका २२–९ पळें इतकें आहे. म्हणजे इतक्या काळानें सूर्याचा वेध घेतल्यास तो त्याच ठिकाणीं परत आला आहे असें दिसून येईल. म्हणजे नक्षत्रपुंजा संबंधानें पाहिले तर त्याचें स्थान स्थिर राहिल. शास्त्रोक्त वर्षमान हेंच होय. निरयन वर्षमाना-शिवाय आरंभस्थान अचल राहूंच शकणार नाहीं. संपातिक वर्षमान म्हणजे अपुरें वर्षमान घेतल्यास आरंभस्थान नक्षत्रपुंजांत मागें हटत जाईल. संपातिक वर्षमान आपण स्वीकारलें असतें तर आज आरंभस्थान पूर्वाभाद्रपदा-पर्यंत मागें न्यावें लागले असतें. त्याचप्रमाणें वर्षमान शुद्ध निरयनापेक्षां अधिक धरलें म्हणून तर आरंभस्थान रेवतीनक्षत्रापासून पुढें पुढें चळत गेलें आहे. एवच संपातिक वर्षमान घेतलें तरी आरंभस्थान स्थिर राहणार नाहीं. व अधिक घेतलें तरी स्थिर राहणार नाहीं. ग्रहलाघवी वर्षमान संपातिक नाहीं. परंतु शुद्ध निरयनहि नाहीं. ८॥ पळांनीं तें अधिक आहे. त्यामुळें ग्रहलाघवीय आरंभस्थान दरसाल सुमारें ८॥ विकला पुढें पुढें ढकलत आहे. १४०० वर्षांपूर्वी तें ' आ ' या स्थानीं होतें, आतां ते आ १।२।३ ह्यापैकीं कोठेंतरी परंतु रेवतीच्या पूर्वेस आहे. संपात दरसाल ५०·२ विकला मागें हटतो; व ग्रहलाघवीय आरंभस्थान दरसाल ८॥ विकला पुढें जातें. ह्यामुळें संपात व ग्रहलाघवीय चल आरंभस्थान ह्यांचेमध्यें ५८।५९ विकलांचें अंतर पडतें. तें ग्रहलाघवीय गणितांत ६० विकला अथवा १ कला मानलें आहे. हेंच ग्रहलाघवीय अथवा जुन्या पद्धतीचें अयनांश. अयनांश म्हणजे आरंभस्थान आणि संपात ह्यांच्यामधील अंशात्मक अंतर. ग्रहलाघवीय आरंभस्थान हें चल आहे. त्यामुळें तें वास्तविक आरंभस्थान होऊंच शकत नाहीं म्हणून ग्रहलाघवीय मेष-संक्रांतीचे दिवशीं जेथें सूर्य असतो तो खरा मेषारंभ नव्हे. ग्रहलाघवीय अथवा जुनें वर्षारंभस्थान दरसाल ८॥ विकला पुढें जात आहे अर्थात अश्विनी नक्षत्राचा आरंभ त्यानें दर्शविला जाणें शक्यच नाहीं. जुन्या पंचांगाचा जसा मेषारंभ खोटा तसा मकरारंभहि खोटाच. म्हणजे ग्रहलाघवी मकरसंक्रांत ही निरयन मकरसंक्रांतच

नव्हे. ज्योतिषानभिज्ञ व दुराग्रहाध मतलबी लोकांस हें समजत नाहीं. सुशिक्षितांस समजतें पण उमजत नाहीं. आता तें कोठें थोडें थोडें त्याच्या डोक्यात घुसूं लागलें आहे परंतु अजून खरें बोलण्यास व त्याप्रमाणें चालण्यास ते थोडे बिचकतातच !

हल्लींचीं जुनीं पंचांगें चुकतात असें म्हटल्यानें ग्रहलाघव किंवा सूर्यसिद्धांत ह्या सर्वमान्य ग्रंथांस किंवा ग्रंथकारास दोष लावल्यासारखें होतें, असें समजण्याचें मुळींच कारण नाहीं. ज्योतिःशास्त्र हें प्रगमनशील असल्यामुळें आणि तेजोगोलाच्या गतिही कालांतरानें कमी जास्त होत असल्यामुळें कोणत्याही ग्रंथांतील आंकडे निरंतर दृक्प्रत्यय दाखवीत राहतील अशी अपेक्षा करणेंच वेडेपणाचें आहे. आकडे वरचेवर वेधाशीं मिळवून घेतलेच पाहिजेत व रीतिहि सूक्ष्म व शुद्ध केल्या पाहिजेत. ब्रह्मसिद्धांत, आर्यसिद्धांत इत्यादि ग्रंथास असें चालन वारंवार मिळालें आहे, इतकेंच काय पण खुद्द ग्रहलाघवकारांनींही ग्रहगति वेधास मिळतील अशाच घेतल्या आहेत. दृक्प्रत्ययावर तर गणेश दैवज्ञांचा विशेष कटाक्ष होता. कारण ते स्वतः अविवेकी, अहंमन्य किंवा दुरभिमानी ज्योतिषि नव्हते. ते आकाशाचें स्वतः निरीक्षण करणारे वेधकर्मनिष्णात असे ज्योतिर्विद होते. त्यामुळें त्यास बिलकूल मत्सर नव्हता. पूर्वी दुर्बीणी नव्हत्या व दुसरीही हल्लींच्या इतकीं सूक्ष्म उपकरणें नव्हतीं असें असतानासुद्धा, वराहमिहिर, ब्रह्मगुप्त व गणेशदैवज्ञ अशासारख्यांचे वेध पुष्कळच सूक्ष्म उतरले हेंच महदाश्चर्य होय ! त्यांच्या कसोशिची व सूक्ष्म आणि सतत अवलोकनकौशल्याची तारीफ करावी तेवढी थोडीच. त्याच्या ग्रंथावरून केलेलें गणित, दुर्बिणीच्या सहाय्याशिवाय जितका दृक्प्रत्यय येणें शक्य आहे तितका दृक्प्रत्यय त्याच्या वेळीं दाखवीत असलेंच पाहिजे. परन्तु आताचीं वेधसाधनें अतिशय सूक्ष्म झाल्यानें ग्रहगतिचें ज्ञानहि अधिक सूक्ष्म झालें आहे. व ह्या सूक्ष्मतेस अनुसरूनच शुद्ध निरयनवर्षमान ग्रहलाघवी वर्षमानापेक्षा सुमारें ८॥ पळांनीं म्हणजे ३।-३॥ मिनिटांनीं कमी आहे असें निदर्शनास आलें आहे. सबंध वर्षांत ३।-३॥ मिनिटांचा फरक फार नव्हे. परन्तु तो सांचत गेल्यास ४२५ वर्षांत एक दिवसाचा फरक पडेल. व त्याप्रमाणें तो पडत आलाहि आहे.

टिळकपंचांग व केरोपंती पचांग ह्यांत शुद्ध निरयन वर्षमानाचा स्वीकार केला असल्यामुळें त्याचें आरंभस्थान अचल झालें आहे. तें ग्रहलाघवाप्रमाणें पुढें सरकत नाहीं. किंवा सपातिक वर्षमानाप्रमाणें मागेंहि जात नाहीं. तें नक्षत्रपुंजातील कोणत्याही स्थिर ताऱ्यापासून ठरीव अंतरावरच असतें. अर्थात् तें स्थिर आहे. तेव्हा हें आरंभस्थान व संपात ह्याच्या मधील अंतर ते अयनांश हें ओघानेंच प्राप्त झालें. प्रस्तुतचे अयनांश १८।४७।१२ इतके आहेत. परन्तु प्रश्न असा उत्पन्न केला आहे कीं, टिळकपंचांगाचें जें आरंभस्थान आहे तेंच प्राचीन काळचें आरंभस्थान म्हणून कशावरून ? शंका क्षुल्लक आहे, परन्तु कांहीं धूर्तांचें पाठबळ मिळाल्यामुळें ह्या शंकेनें उचल खाल्ल्यासारखें केलें आहे, म्हणून तिचें सर्वसामान्य निराकरण करावें हें योग्य आहे.

रेवतीनक्षत्राचा शेवट अथवा अश्विनीनक्षत्राचा प्रारंभ हें हल्लीं आपण आरंभस्थान मानतो. पूर्वी कृत्तिकादि हें आरंभस्थान होतें. आपल्या इकडे उत्तम नामांकित ज्योतिषी बरेच होऊन गेले त्यातहि वराह, ब्रह्मगुप्त, भास्कराचार्य, व गणेशदैवज्ञ हे तर स्वतः वेध कर्म निपुण व सिद्धांतपारंगत असे ज्योतिषी होते. त्याना आरंभस्थान माहीत नव्हतें असें कधींहि म्हणता येणार नाहीं. नक्षत्रपुंज व त्यातील योगतारा ह्यांची ज्याप्रमाणें वेध प्रवीण ज्योतिष्यास उत्तम ओळख असते त्याप्रमाणें आरंभस्थानाचीही माहिती त्यांस असणारच! ज्यानीं सोपपत्तिक सिद्धांतग्रंथ रचले, ज्यांनीं अनेक वेध घेऊन ग्रहगतिना बीजसंस्कार देऊन ते आपापाल्या वेळेस दृक्तुल्य मिळतील असे केले, ज्याना अनुच्छिन्न परंपरा अवगत होती, त्याना आरंभस्थान माहीत नसेल असें म्हणण्याचें धाडस कोणीही करणार नाहीं. अर्थात् वराह ब्रह्मगुप्तादि ज्योतिष्यांस अश्विन्यादि आरंभस्थान माहीत होतें व आपणहि ह्या आरंभस्थानाचाच स्वीकार केला पाहिजे. आरंभस्थान व संपात ह्यांच्यातील अंशकलादि अंतर ते अयनांश ह्या अर्थ सर्वसंमतच आहे. म्हणून संपात ज्या वर्षी आरंभस्थानीं होता त्या वर्षी

असले पाहिजेत. हें शून्य वर्ष कोणतें तें बऱ्याच प्राचीन ग्रंथात सांगितलें आहे. ग्रहलाघवाचे अयनांश शके १८४४ सालीं २३।२० इतके येतात. परंतु हे चुकीचे आहेत, का तर चुकीच्या वर्षमानामुळें संपातगति वाजवीपेक्षां ज्यास्त धरली गेली म्हणून. म्हणून संपाताची गति ५०-२ विकला असून ती विलोम म्हणजे उलट आहे; व जुन्या वर्षमानातील वाढवा ८॥ विकलाचा असून त्याची गति अनुलोम म्हणजे पूर्वेकडे आहे. या प्रमाणें पूर्वेकडे ८॥ विकला सरकणारे ग्रहलाघवाचें चल आरंभस्थान आणि संपात ह्याच्यामध्यें सुमारें ५९ विकलांचें अंतर पडतें तें वर सांगितल्याप्रमाणें सोई करिता ६० मानलें आहे. परंतु ही कांहीं संपाताची खरी गति नव्हे. खरी गति आणि वर्षमानांतील वाढावा ह्यांची ती बेरीज आहे. वर्षमानातील वाढवा काढून टाकल्यास म्हणजे वर्षमान सूक्ष्म घेऊन आरंभस्थान स्थिर केल्यास संपाताची गति ५०.२ विकला, मात्र हिशेबात घ्यावी लागेल. व त्यामुळें शुद्ध निरयन पंचांगाचे अयनांश ग्रहलाघवापेक्षां नेहमीं कमी कमीच येणार. कसे ते पहा.समजा कीं एका पूर्व पश्चिम सडकेवर एक देवालय आहे. त्या देवळापासून संपतराव नांवाचा मनुष्य पश्चिमेकडे जाऊं लागला. तो दररोज ५० मैल जातो. संपतराव पश्चिमेकडे निघाला त्याचवेळीं रंभाजी नावाचा दुसरा मनुष्य तेथून पूर्वेकडे निघून गेला. रंभाजी दररोज ९ मैलच जातो. तेव्हां त्या दोन इसमांमधील अंतर दररोज ५९ मैल पडत जाईल. तथापि देवालय व संपतराव ह्याच्यांतील अंतर दररोज फक्त ५० मैलांचेंच पडणार. आपल्यास अंतर पहावयाचें तें रंभाजीपासून नव्हे. तर तो निघाला त्या देवळापासून, कारण तें स्थिर आहे. त्याचप्रमाणें आपणांस अयनांश मोजावयाचे ते, संपात, आणि ग्रहलाघवादिकांचें स्थान ज्या ठिकाणीं एकत्र होते, त्या अश्विनी नक्षत्राच्या स्थिर आरंभा-पासून हेंच स्थिर आरंभस्थान व तेथूनच अयनांश मोजावयाचे व तेहि दरसाल ५०.२ विकला ह्या गतिप्रमाणें मोजले पाहिजेत हें अगदीं उघड आहे.

अयनांश मोजावयाचे ते स्थिर आरंभस्थानापासून वास्तविक वार्षिक अयनगति ५०.२ विकला ह्या मानानेंच मोजावयाचे; चल आरंभस्थान घ्यावयाचे नाही, व त्या चल आरंभस्थानाचा संपाताशीं मेळ घालण्याकरितां वाढविलेली अवास्तव अयनगति ५८|५९ विकला हिचाहि अंगिकार करावयाचा नाहीं येवढें ठाम ठरलें म्हणजे मग

## ✓ स्थिर आरंभस्थान

कोणतें तें निश्चित केलें म्हणजे झालें. हल्लीं आपली नक्षत्रगणना अश्विन्यादि आहे. पूर्वी कृत्तिकादि होती, व शकापूर्वी कित्येक शतकें तिचा प्रचार होता. अश्विन्यादि गणना ज्या ग्रंथांत आहे तेच आता परंपरेचे निदर्शक होत. परंपरा म्हणजे एका ग्रंथाचे मत नव्हे.

सर्वमान्य प्राचीन ग्रंथांची एकवाक्यता किंवा निष्कर्ष हें परंपरेचें गमक होय. प्राचीन सूर्य-सिद्धांत, वर्तमान सूर्यसिद्धांत, ब्रह्मस्फुटसिद्धांत, शिरोमणि इत्यादि सिद्धांतग्रंथावरून परंपरा समजून येते. ह्या ग्रंथांत स्थिर आरंभस्थान कशा तऱ्हेनें दर्शविलें आहे तें पाहूं. अयनांश हें आरंभस्थान दर्शविण्याचे साधन आहेत. पूर्वोक्त ग्रंथाचें शून्य अयनांशवर्ष काढतां येतें. बहुतेक ग्रंथांत तें दिलेलेंच असतें. शून्य अयनांशवर्ष म्हणजे पश्चिमेकडे सरणारा संपात आणि पूर्वेकडे चळणारा सिद्धांतसूर्य ( अथवा मेषसंक्रमण ) हे ज्या वर्षी एकत्र होतें तें वर्ष, हें वर्ष ग्रंथावरून काढतां येतें. स्थिर आरंभस्थान संपातावरून ठरविलें नाहीं. संपातानुरोधानें पाहतां आक्रमवृत्तावरील कोणताही बिंदु आरंभस्थानीं मानतां येईल. परन्तु ती अश्विन्यादि परंपरा नव्हे. आरंभस्थान पूर्वाचार्यांनीं कांहीं तरी ठरविलें नाहीं. तें त्यास माहीत होतें व तेंच त्यांनीं सांगितलें आहे. वराहमिहिर व ब्रह्मगुप्त ह्यांनीं स्थिर आरंभस्थानाश अनुलक्षून केलेले वेध लिहून ठेवले आहेत. परन्तु तो विषय आज आपणांपुढें नाहीं. त्या वेधांवरून इतकें मात्र निःसंशय सिद्ध होतें कीं, प्राचीन सिद्धांतकारास स्थिर आरंभस्थान माहीत होतें. तें त्यांनीं शून्य अयनांश वर्षाच्या

म्हणनें निर्दिष्ट केलें आहे. सूर्यसिद्धातादि ग्रंथांतील वर्षमानावरून येणारीं शून्य अयनांश वर्षे येणेंप्रमाण आहेत:—( पहा. भा. ज्यो. इ. )

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| वराहोक्त सूर्यसिद्धांत | ... " | शके ४५१ | मुंजाल ... ... ... ... ... | शके " | ४४९ |
| वर्तमान सूर्यसिद्धांत | ...... " | " ४५० | राजमृगांक | ... ... " | " ४४५ |
| ब्रह्मगुप्त सिद्धांत | ..... ... " | " ५०९ | भास्कराचार्य | ... ... " | " ४५४ |

यावरून असें स्पष्ट दिसून येतें कीं, शून्य अयनांश वर्ष अथवा स्थिरारंभस्थान दर्शक वर्ष शके ४५० पासून शके ५०९ पर्यंत कोणतें तरी होतें. म्हणजे वरील निरनिराळ्या ग्रंथांतील स्थिर आरंभस्थान सुमारें ४२ कलांच्या फरकानें एकमेकांशीं जमतें. ग्रंथकारानींच सांगितलेलीं शून्य अयनांश वर्षे घेतल्यास आरंभीची कालमर्यादा शके ४५० च्या ऐवजीं शके ४४० ची होईल ह्यापेक्षा विशेष अंतर पडणार नाहीं. एकंदरींत शून्य अयनांशकाल अथवा स्थिरारंभस्थान वर्ष शके ४४० पासून शके ५०९ पर्यंत कोणतेंतरी होतें हें निःसंशय आहे. म्हणून शके ४४० पासून शके ५०९ पर्यंत वसंत संपात ज्या ज्या ठिकाणीं होता त्यांपैकीं कोणताहि बिंदु आरंभस्थान म्हणून समजण्यास हरकत नाहीं.

स्थिर आरंभस्थान आतां दाखविल्याप्रमाणें पाऊण अंशाच्या फरकानें निश्चित होतें. परन्तु शुद्धनिरयन पंचांग प्रत्यक्ष प्रचारांत आणावयाचें तर अयनांश यापेक्षा निश्चित स्वरूपाचे पाहिजेत. त्यालाही एक प्रत्यंतरादाखल मार्ग सांपडला, तो रेवती योगतारेचे भोग हा होय. भोग म्हणजे स्वस्थ ज्योतींतून आक्रमवृत्ताला काटकोनांत कापणाऱ्या वर्तुळाच्या छेदन बिंदूपासून आरंभस्थानापर्यंत आक्रमवृत्तावरील अंशकलादि अंतर. सायन पद्धतींत संपात हें आरंभस्थान मानतात आणि शुद्ध निरयन पद्धतींत एखादि तारा किंवा तिच्या अत्यंत निकटवर्ती असे आक्रमवृत्तावरील स्थान आरंभस्थानीं मानतात. एखाद्या तारेचे निरयन भोग ३० अंश आहेत असें म्हटलें म्हणजे त्याचा अर्थ असा कीं, ती तारा स्थिर आरंभस्थानापासून तीस अंशावर आहे. मघा तारेचा निरयन भोग १२९ आहे, म्हणजे स्थिर आरंभस्थानापासून मघा नक्षत्र १२९ अंशावर आहे असें झालें. त्याचप्रमाणें जिचा भोग ३५९·अंश आहे ती तारा आरंभस्थानाच्या मागें एक अंश आणि जिचा भोग ३६० अंश किंवा जवळ जवळ ३६० अंश आहे. ती आरंभस्थानींच आहे. किंवा तिच्या अत्यंत सन्निध आहे असें ठरतें.

रेवती योग तारेचा भोग सूर्य सिद्धांतांत ३५९. ५०. ,व ब्रह्मसिद्धांत, सिद्धांतशिरोमणि, व ग्रहलाघव ह्यांत रेवती योग तारेचा भोग ३६० किंवा ० सांगितला आहे म्हणून रेवती योग ताराच आरंभस्थानीं होती हें सिद्ध आहे. रेवतीचा शर शून्य अंश सांगितला आहे. अर्थात रेवती तारा निःशर आहे म्हणजे ती आक्रमवृत्तावर आहे किंवा आक्रमवृत्तापासून अत्यल्प अंतरावर आहे. कोणी दीर्घ शहाण्यानीं निःशर ह्याचा अर्थ कितीहि शर असला तरी तो हिशेबांत न धरणें असा करण्याचा चंग बांधला आहे. परन्तु हा केवळ पाचकळ कोटिक्रम होय. प्रेत झालेला मनुष्य हा एक जिवंत प्राणी आहे. किंवा दिवाळखोर हा क्रोडपती आहे. असें सिद्ध करण्याकरितां घसा फोड फोडून ओरडणाऱ्या उरफाट्या बुद्धीच्या टकाला साजेल असाच तो अर्थ आहे. त्यांत शहाणपणा नाहीं व सत्यपणा तर बिल्कूल नाहीं. नि शर ह्याचा अर्थ जिला शर मुळींच नाहीं किंवा अत्यल्प आहे असाच घेतला पाहिजे नाहींतर नि.शर म्हणण्यांत स्वारस्यच राहणार नाहीं.

स्थिर आरंभस्थानाचीं याप्रमाणें दोन प्रत्यंतरें ठरलीं. पहिले प्रत्यंतर हें कीं, पूर्वाचार्यांप्रमाणें शून्यायनांशवर्ष शके ४४० पासून शके ५०९ पर्यंत असले पाहिजे व दुसरें असें कीं त्या अवधींत संपात बिंदु नि.शर रेवती योगताऱ्यासन्निध पाहिजे. ह्या दोन प्रत्यंतरानीं जे वर्ष निघेल तेंच स्थिर आरंभस्थानाचें शून्य अयनांश वर्ष. ह्याप्रमाणें पाहतां शके ४९६ सालीं संपात हा नि.शर निघतो. शके ४९६ सालीं दोन्हीं प्रत्यंतरें जमतात. म्हणून तेंच शून्य अयनांश, वर्ष होय.

शके ४९६ हें शून्य अयनांशवर्ष असें सिद्ध झाल्यावर त्यानंतरच्या कोणत्याहि वर्षाचे अयनांश दरवर्षीं ५०.२ विकला अयनगति धरून काढतां येतात. म्हणजे शके १८४४च्या आरंभीं अयनांश

(१८४४-४९६) वजावाकी गुणिलें(५०–२=)१८।४७।१२ येतात म्हणजे ग्रहलाघवापेक्षा सु. ४॥ अंशानीं कमी येतात. आणि ते तसें येणारच हें वरील विवेचनावरून वाचकाच्या सहज लक्षात येईल. ग्रहलाघवाचें आरंभस्थान चल असल्यामुळें दरसाल ८॥ विकलाची चुकी पडत गेली आहे. त्री ग्रहलाधवाचें आरंभस्थान शके ४४४ असल्यामुळें आजपर्यंत साचून ४॥ साडेचार अंश झाली आहे. ग्रहलाघवी अयनांश ४॥ अंशानीं जास्त आहेत ते चुकीमुळें होय. ही गोष्ट कै० शंकर बाळकृष्ण दीक्षित यानाहि मान्य आहे. परंतु तीस वर्षांपूर्वी लोकमत हल्ली इतकें जागृत नसल्याकारणानें ग्रहलाघवाच्या चुकीच्याहि अयनांशाचा त्याग करणे जोशाना सुद्धा अवघड वाटत असे त्यामुळें ग्रहलाघवाच्या जवळ जवळ अयनांश यावे अशा हेतूनें कै० दीक्षित यानीं म्यू पिशियम तारा सुचविली, परतु वर सिद्ध केलेलीं जी दोन प्रत्यंतरें त्याच्या कसोटीस म्यूशियम उतरत नाहीं. म्यूशियम ही निःशर नाहीं, तिचा शर सवातीन अंश असून तो दक्षिण आहे. व तिच्याजवळ संपात असण्याचें वर्ष हें शके ४५०—५०९च्या दरम्यान येत नाहीं त्यामुळें ती परंपरागत आरंभस्थान होऊं शकत नाहीं आणि तें कसें होणार ! जें आरंभस्थान ग्रहलाघवाच्या हल्लींच्या चुकीच्या अयनांशाशी मेळ घालण्याकरताच बोलून चालून सुचविलेलें त्याचा शास्त्रीय प्रत्यतराशीं मेळ कसा पडावा.! तेव्हां सिद्ध झालें काय कीं, शके ४९६ शकवर्षापासून वास्तविक संपात गतीनें मोजलेलें अयनांश हेच शास्त्रीय अयनांश होत. म्यूपिशियम व चित्रा अयनांश हें अयनांश नकली आहेत. परंपरागत नव्हेत. म्हणून निःशर रेवती तारेपासून मोजलेले हेच खरे अयनांश होत.

## दिव्यदर्शन.

ईश्वराचें प्रत्यक्ष दर्शन मनुष्यास होत नाहीं. कारण तो अनाद्यनंत आहे असे आपण म्हणतों आणि तें खरेंहि आहे. परंतु अनाद्यनत ईश्वराचें नाहीं तरी त्याच्या परमरमणीय अनाद्यनत कृतींचें दर्शन जरी आपणास झालें तरीहि आपण कृतार्थ होऊं. अमर्याद नीलवर्ण अशा आकाशाचा अत्यंत भव्य घुमट आपण एक क्षणभर जरी अवलोकन केला, त्या घुमटात हीरकमण्यापेक्षाहि उज्वल तेजस्वितेनें चमकणाऱ्या तारागणाकडे एक निमिषमात्र जरी दृष्टिक्षेप केला, तरीहि ईश्वराच्या अद्भुत आणि चमत्कृतिपूर्ण घटनेनें आपण थक्क होऊन जाऊं. आपल्या परमपवित्र वेदग्रंथात नक्षत्रांचें आश्चर्यकारक सौंदर्य, त्यांची निरुपमप्रभा, त्यांचें भ्रमण ह्याच्या मोहक वर्णनानें भगवंताचें गुणसंकीर्तन केलें आहे. प्राणिमात्राला प्रकाशाचा आणि दिव्योदकाचा लाभ करून देणें हा भगवान् इंद्राचा सर्वांत मोठा पराक्रम होय, आणि ही गोष्ट मनाला किती उत्तम पटते. अंत रिक्ष निरीक्षणातच आपले ऋषि तन्मय होऊन जात असत. सात्विक अशा ऋषींची गोष्ट कशाला, हल्लींच्या ऐहिक व्यवहारात सर्वस्वी गुरफटून गेलेल्या सामान्य मनुष्यासुद्धा आकाशदर्शन हा एक नयनोत्सवच वाटेल. कोणत्याहि निरभ्र रात्रीं शीतरश्मीचें प्रशांत तेजस्क धवल बिंब पाहून सर्व आनंदाचें निधानच तेथें साठवलें आहे कीं काय असें वाटतें. चंद्र नेहमींच रात्रीं आकाशात दिसतो असें नाहीं. केव्हा पूर्व रात्रीं सूर्यास्ता नंतर, केव्हा उत्तररात्रीं सूर्योदयापूर्वी, केव्हा विरहीं जनाची उत्सुकता वाढवीत आपल्या संपूर्ण वैभवानें सूर्यास्त होताच पूर्वदिग्भागीं, आणि एखादे दिवशीं तर मुळींच गुप्त अशा तऱ्हेनें तो स्वच्छंदी मनुष्याप्रमाणें विहार करतो. चंद्र नसेल त्या वेळीं हजारों नव्हे, लक्षावधि नव्हे, कोट्यवधि नव्हे, अगणित तारका विद्यु दीपाप्रमाणें नभोमंडळात चमकत असतात. तो आकाशगंगेचा दुग्धौघाप्रमाणें श्वेतप्रवाह नक्षत्रसमूहामधून वांकडीतिकडी वाट काढीत इतस्ततः पसरलेला किती मजेदार दिसतो ! त्या सर्वांचें निरीक्षण करणें किती आनंददायक वाटतें ! ज्योतिषशास्त्राचा मार्मिक अभ्यास करणारास तर हें कार्य अत्यवश्य आहे. त्यावाचून ज्योतिषशास्त्रज्ञान होणेंच नाहीं. हें निरीक्षण शास्त्रज्ञ वर्षानुवर्षे करीत असतात. इतक्या दीर्घ कालपर्यंत नाहीं तरी निदान वर्ष दोन वर्षे तरी दिवसा, सायंकाळीं, सुप्रभातीं व रात्रींतून कित्येक वेळां अंतरिक्ष चमत्कार अवलोकन केलाच पाहिजे. याप्रमाणें अवलोकन करीत असता आपल्या नजरेस काय काय प्रकार पडतो? तर नक्षत्रभ्रमण म्हणजे प्रत्येक तारा प्रत्येक तारकापुंज पूर्व क्षितिजाच्या कोणत्या तरी भागांतून वर येऊन आकाशांत फेरा घेऊन पश्चिमक्षितिजाच्या कगोऱ्याच्या आड जाऊन दिसेनासा होतो. हा सर्वसामान्य मार्ग, झाला. ह्या असंख्य तारांत एक तारा आकाशांत निरंतर निःसंचार, निश्चल, आपल्याच तोऱ्यांत चमकणाऱ्या

उभी आहे. केव्हांहि पहा बहुतेक त्याच ठिकाणीं. सूर्योदय झाला म्हणजे अदृश्य. परंतु सूर्यास्त होऊन अंधकार पडूं लागताच पुनः आपली त्याच ठिकाणीं. ही चळत नाहीं, म्हणूनच तिला ध्रुवाची तारा म्हणतात. ह्या तारेचा महिमा असा आहे कीं, हिच्यापासून थोड्या अंतरावर असणाऱ्या ध्रुवमत्स्य, सप्तर्षि, देवयानी, वृषपर्वा, भाद्रपदा, अग्नि, ब्रह्महृदय, अभिजित् इत्यादि सर्व ठळक ठळक तारा ध्रुवाच्याभोंवतींच फेरा करितात. स्वस्तिक, विषुववृत्त ह्याच्या जवळचीं नक्षत्रें म्हणजे अश्विनी, कृत्तिका, रोहिणी, मृग, व्याध, ज्येष्ठा इत्यादि पुंज पूर्वेकडे उगवून पश्चिमेकडे मावळतात व विषुववृत्ताच्या भागांतूनच फेरा करतात. अगदीं दक्षिणेकडील तारका म्हणजे अगस्त्य, यमुना, त्रिशंकु, याममत्स्य हे आग्नेयीकडे उगवून नैर्ऋत्येकडे मावळतात. उत्तर ध्रुवाच्या कक्षेंतील तारका व त्याचप्रमाणें अगस्त्य इत्यादि दक्षिण दिव्य नक्षत्रपुंज हे आपल्या इकडील प्रदेशास कधींहि डोक्यावर येत नाहींत, त्यांचा आकाशांतील फेरा बाजूनेंच होतो. शुक्ल पक्षांतील चंद्र सूर्यास्तानंतर आकाशांत कोठें तरी दृग्गोचर होतो. व कृष्णपक्षांतील चंद्र सूर्यास्तानंतर दिवसानुदिवस उशीरानें पूर्व क्षितिजांतून उदित होऊन वर येतो. सूर्योदय होण्याची वेळ झाली किंवा सूर्योदय झाला तरी मावळत नाहीं. तारागणांतील सौंदर्याची केवळ खाण, अशी शुक्राची चांदणी ही कांहीं दिवस शुक्लपक्षाच्या चंद्राप्रमाणें सूर्यास्तानंतर पश्चिमेकडे दिसूं लागते व कांहीं दिवस सूर्योदयापूर्वी पहाटे पूर्वेकडे उदय पावते असे शेंकडों चमत्कार आपल्या अवलोकनांत येतात. सूर्यनारायण तर दररोज पूर्वेकडे उगवतो व पश्चिमेकडे मावळतो. परंतु हे सारे चमत्कार रोजच्या उदयास्ताचे म्हणजे नित्योदयास्ताचे होत. हेंच दैनिक परिवर्तन. ह्याचें कारण काय असावें ? हे सर्व तेजोगोल येवढा फेरा रोजच्या रोज करतात काय ? मनुष्यास प्रथम प्रथम ह्या तारकाच फिरतात असें वाटतें. परंतु ध्रुवाची निश्चलता, सप्तर्षींचें ध्रुवाभोंवतीं परिभ्रमण ह्यांचा उलगडा तारांच्या परिभ्रमणकल्पनेनें होत नाहीं. त्यामुळें शोधकांनीं खरें कारण शोधून काढलें. तें हें कीं, खुद्द पृथ्वीरूप गोलाचें स्वतःभोंवतींच भ्रमण. ह्यालाच दैनंदिनभ्रमण म्हणतात. तें ह्या सर्व नित्योदयास्ताच्या चमत्काराचें कारण आहे. आणि या एकाच गोष्टीनें सर्व तऱ्हेच्या नित्योदयाची यथायोग्य उपपत्ति बसते. आगगाडींतून जात असतांना खिडकीवाटे पाहिलें तर आपण स्थिर असून रस्त्याच्या कडेचीं झाडेंच उलट बाजूकडे धाव मारीत आहेत असें वाटतें, व आगगाडी हळू चालली असते तोंपर्यंत झाडेंहि हळू हळू धावतात, व गाडी भर वेगानें चालली कीं तीं झाडेंहि अतिशय वेगानें परंतु उलट दिशेकडे धांवतात. श्रीमच्छंकराचार्यांनीं अशा अनुभवाचा उल्लेख आपल्या ग्रंथांत केला आहे. हा अनुभव शास्त्रज्ञांनीं आकाशांतील नक्षत्रादिकांच्या नित्य परिभ्रमणास लावला. पृथ्वीच्या दैनंदिन भ्रमणाच्या दिशेच्या उलट दिशेनें दिव्य गोलानें भ्रमण चाललें आहे. नक्षत्रें पूर्वेकडून पश्चिमेकडे जातात. अर्थात् पृथ्वीचें दैनंदिनभ्रमण पश्चिमेकडून होत असलें पाहिजे. भोंवरा ज्याप्रमाणें आपल्या अणकुचीदार आंसाभोंवतीं जोरानें फिरतो व फिरतांना डोलतो व पुढेंहि सरकतो. त्याचप्रमाणें पृथ्वी ही ध्रुवदर्शक आंसाभोंवतीं वेगानें फिरत आहे. व पुढेंहि सरत आहे. भोंवरा ह्याप्रमाणें फिरत असला म्हणजे आंस स्थिरप्राय असतो. व त्याच्याजवळ टोंचलेली टांचणी त्या आंसाच्या मध्यबिंदूभोंवतीं फिरते. व मधल्या फुगीर भागाजवळची टांचणी त्या मध्यभागाभोंवतींच फिरते ह्याच नमुना आपणास आकाशांत पहावयास मिळतो. पृथ्वीच्या आंसासमोरची ध्रुवतारा स्थिर, त्याजवळचीं नक्षत्रें ध्रुवाभोंवतीं फिरणारीं–व विषुवाच्या प्रदेशांतील नक्षत्रें विषुवाच्या मार्गानेंच आकाशाच्या मध्यभागाभोंवतीं फेरे घेणारीं, याप्रमाणें देखावा आपल्यास दृग्गोचर होतो. हा पृथ्वीच्या दैनिक परिभ्रमणाचा परिणाम आहे.

## सूर्याचा नित्योदयास्त

सुद्धां त्याच दैनंदिनगतीमुळें होतो. सूर्यासमोर असणारा पृथ्वीचा कोणता ना कोणता तरी अर्धा वर्तुलभाग नेहमींच प्रकाशित असतो व त्याच्या उलट दिशेचा अर्धा भाग काळोखांत असतो. काळोखांतील भागांत रात्र व प्रकाशित भागांत उदय. प्रकाशित भागाची जी वर्तुलाकार मर्यादा त्या मर्यादेवर सूर्योदय व सूर्यास्त. त्या प्रकाशवर्तुळरेषेवर पृथ्वीचा काळोखांतील जो भाग प्रथम येईल तेथें सूर्योदय व जो प्रकाशाच्या सीमेवरील भाग काळोखांत जाण्याच्या बेतांत असेल तेथें सूर्यास्तसमय. यावरून याचकाच्या

लक्षांत आलेंच असेल कीं, पृथ्वीवर सर्व ठिकाणीं सूर्योदय एका क्षणींच होणें अशक्य आहे. एका क्षणीं जेथें सूर्योदय, त्याच क्षणीं दुसरीकडे मध्यान्ह, तिसरे ठिकाणीं सूर्यास्त, चौथे ठिकाणीं मध्यरात्र, ह्याप्रमाणें क्रम आहे. हा पृथ्वीच्या गोलत्वाचा परिणाम आहे. दुसरें असें कीं, सूर्याचें किरण पृथ्वीवर ज्या रेषेनें पडतात, त्या रेषेच्या अगदीं समोर पृथ्वीचा आस नाहीं, बराच तिर्कस आहे. सूर्यकिरणांच्या रेषेशीं त्याचा सुमारें ६६॥ अशाचा कोन होतो व भूविषुवाचा २३॥ अशाचा कोन होतो. सूर्यकिरण रेषा म्हणजे आक्रम मार्गाशीं अथवा क्रांतिवृत्ताशीं समांतर असतात. त्यामुळें भूविषुवाचा सूर्याच्या गमनमार्गाशीं सुमारें २३॥ अशाचा कोन असतो ह्याचीच प्रतिमा आकाशांत उमटते, म्हणजे तेथेंहि आक्रमवृत्त व खविषुव ह्यामध्यें २३॥ अशाचाच कोन आहे. जर पृथ्वीचा आंस म्हणजे ध्रुवरेषेचा किरणाशीं काटकोन असता, तर पृथ्वीवरील रेखांश रेषा व आकाशातील याम्योत्तरवृत्तें व पृथ्वीच्या प्रकाशित भागाची वर्तुलमर्यादा ह्याचा मिलाफ झाला असता व एकाच रेखांशवृत्तावरील सर्व ठिकाणीं सूर्योदय किंवा सूर्यास्त एका क्षणींच झाले असते, परतु पृथ्वीच्या आसाच्या तिर्कसपणामुळें हें होत नाहीं. ह्याप्रमाणें पृथ्वीवर एकाच रेखांशावरील सर्व ठिकाणीं सूर्योदय, मध्यान्ह किंवा सूर्यास्त एका क्षणींच होत नाहींत. त्याचीं कारणें दोन ठरतात. पहिलें पृथ्वीचें गोलत्व व तिच्या अक्षाचा म्हणजे ध्रुवरेषेचा तिर्कसपणा. ह्याप्रमाणें गोलत्वामुळें व अक्षाच्या सर्व तिर्कसपणामुळें जरी एकाच रेखांशावरील सर्व ठिकाणीं जरी सूर्योदयास्त एकाच क्षणीं होत नसले, तरी सर्व खस्थज्योतींचें उदयस्थान पूर्वक्षितिजार्ध आणि अस्तस्थान पश्चिमक्षितिजार्ध हेंच असतें. कारण पृथ्वीच्या अक्ष परिभ्रमणाची दिशा बदलत नाहीं. त्यामुळें कोणताहि तेजोगोल एकदा पूर्वक्षितिजार्धातून उदय पावला कीं, त्याचा अस्त पश्चिमक्षितिजार्धांत झालाच पाहिजे. असें होऊं शकेल कीं, पश्चिमक्षितिजार्धांत अस्त होण्यापूर्वीच सूर्याचा उदय झाल्या कारणानें त्याच्या तीव्र प्रकाशात तो तेजोगोल अदृश्य होईल. पहाटे व सूर्योदयापूर्वी उदय पावणारीं सर्व नक्षत्रें आणि ग्रह व कृष्णपक्षातील चंद्र हे सर्व प्रत्यक्ष अस्तापूर्वीच सूर्यकिरणांमध्यें अदृश्य होतात, परतु त्याच्या अस्ताचें स्थान कधींहि बदलत नाहीं. अस्तस्थान पश्चिमक्षितिजार्ध हेंच होय.

पृथ्वीच्या गोलत्वाचा आणि दैनंदिन भ्रमणाचा आणखी एक परिणाम आकाशात असा घडतो कीं, सर्व खस्थज्योति पहाणाराच्या डोक्यावरूनच पश्चिमेकडे अस्तास जातात असें नाहीं. पृथ्वीच्या अक्षांश वर्तुळाच्या पातळींत व आकाशांतील विषुववृत्ताशीं समांतर अशी वर्तुळें आहेत. तेजोगोल, नित्य भ्रमणात ह्यांच्यापैकीं कोणत्या ना कोणत्या तरी वर्तुळातून फिरतात, ह्या वर्तुळाचें विषुवापासून दक्षिणोत्तर अंतर तीच क्रांति. ह्याची वाचकांनीं आठवण करावी. त्या कारणानीं होतें काय कीं, प्रेक्षकाच्या स्थलाचे जितके अक्षांश तितकीच क्रांति ज्या तेजोगोलाची असेल तोच तेजोगोल प्रेक्षकास डोक्यावर दिसेल. त्यापेक्षां ज्याची क्रांति थोडी कमजास्त ते थोडे बाजूनें जातील व प्रेक्षकाच्या अक्षांशापेक्षा ज्याची क्रांति पुष्कळच ज्यास्त किंवा कमी आहे ते जास्त बाजूनें जातील. तेजोगोलाचें अक्षांशवलय प्रेक्षकाच्या ज्या दिशेकडे असेल त्या दिशेच्या बाजूनें तो तेजोगोल जाईल. हरिद्वार येथें सूर्य कधींहि डोक्यावर येत नाहीं. सूर्य जास्तींत ज्यास्ती उत्तरेकडे जातो तो २३ अंश २६।२७ कला जातो व हरिद्वार सु ३० अंश उत्तरेकडे आहे तेव्हा हरिद्वारच्या दक्षिणेकडे ६॥ अंशांइतक्या बाजूनेंच सूर्य भर उन्हाळ्यांत जातो व हिंवाळ्यात तर तो २३॥ + ६॥ = ३० इतके अंश हरिद्वारच्या दक्षिणेस असतो. इग्लडात तोच नमुना. तेथें भर उन्हाळ्यात सूर्य २७॥ अंश दक्षिणेकडून जातो व हिंवाळ्यांत तर बोलावयासच नको. डिसेंबर २२ चे दिवशीं तर तो इग्लडातील प्रेक्षकांस ( ५१+२३॥ = ) ७४॥ अंश दक्षिणेकडे दिसेल. म्हणजे सकाळीं सूर्योदयानतर एक तासानें जितक्या उंचीवर सूर्य आपल्याकडे येतो, तितक्या उंचीवर इग्लडात तो हिंवाळ्यांत दिवसभर असतो व त्या दिवसात दिनमानहि तिकडे फक्त १९। घटकांचें असतें लहानमोठ्या दिनमानाचें कारण मागें सांगितलेंच आहे. प्रेक्षकाच्या क्षितिजांत आकाशाच्या अतर्गोलाचे १८० अंश नेहमीं असतातच. कारण क्षितिज ह्या वर्तुळाचा जमिनीवरील मध्यबिंदु प्रेक्षक आणि वर आकाशाच्या अर्धगोलांत मध्यबिंदु प्रेक्षकाच्या डोक्यावरील खस्वस्तिक बिंदु. परतु ह्या अर्धगोलात खविषुववलयाशीं समांतर अक्षणाच्या वर्तुळांचा किती भाग अंतर्भूत होतो, ह्यावर दिनमान व रात्रिमान अवलबून असतें.

काहीं गोष्टी वेधसाध्यच आहेत. खस्थ ज्योतींचे उन्नतांश किंवा त्यांचे नतांश प्रत्यक्ष वेधानेंच ठरवावे लागतात. उन्नतांश म्हणजे क्षितिजापासून ज्योतिर्गोल आकाशात जितका वर आला असेल तितके अंश, आणि नतांश म्हणजे–खस्वस्तिकापासून ती ज्योति जितके अंश झुकलेली दिसेल ते अंश. अंशांतून उन्नतांश ९० वजा केल्यास नतांश समजतात व नतांश वजा केल्यानें उन्नतांश कळतात. त्याप्रमाणेंच दुर्बीण किंवा नलिकायंत्र खस्वस्तिक बिंदूतून जाणाऱ्या याम्योत्तराचे पातळींत, अथवा बरोबर दक्षिणोत्तर फिरती राहील अशी बसविल्यास ( आकृति पहा ) खस्थज्योति त्या याम्योतरावर येतील त्या वेळचे त्यांचे उन्नतांश अगर नतांश समजतील. मग त्यावरून त्याची क्रांति–व त्यावरून त्याचे भोग व शर गणितानें निघतील. अशा तऱ्हेचा खस्थ ज्योतींचा सुलभ वेध बहुतेक ज्योतिःशास्त्रजिज्ञासूंस साध्य आहे असें आम्हास वाटतें. ध्रुवतारा बरोबर ध्रुवबिंदुस्थानीं नाहीं, थोडी बाजूस आहे. तथापि स्थूलमानानें तिलाच ध्रुवस्थानीं समजण्यास हरकत नाहीं. ध्रुवाचे जितके उन्नतांश तितके प्रेक्षकाच्या ठिकाणचे अक्षांश. अक्षांशाइतकें सविषुव त्या स्थानाच्या खस्वतिकापासून बाजूस झुकलेलें दिसेल. कोणत्याहि तारेचे याम्योत्तर उन्नतांश, सोईप्रमाणें दक्षिण क्षितिजापासून किंवा उत्तर क्षितिजापासून वेधानें ठरवावे व त्याच्यापासून क्रांति आणावी. क्षितिजापासून खस्वस्तिकापर्यंत अंतर ९० अंश, त्यात अक्षांश मिळविले असतां उत्तर क्षितिजापासून विषुववलयाचें अंतर निघेल. किंवा ९० अंशांतून अक्षांश वजा करानें म्हणजे दक्षिणक्षितिजापासून विषुववृत्ताचें अंतर निघेल. याप्रमाणें अंतरें काढून ठेवावीं. उत्तरेकडोन उन्नतांश मोजल्यास ते उत्तरक्षितिजापासूनच्या अंतरांतून वजा करावे म्हणजे त्या खस्थ ज्योतीची क्रांति निघेल.

## कालज्ञान व कालमापन.

सिद्धांतज्योतिष आणि फलज्योतिष ह्यांत कालज्ञान व कालसाधन यांचें महत्त्व किती आहे त्याची जाणीव तज्ज्ञाशिवाय इतरांस होणार नाहीं. कालमापन करण्याचें साधन जर बरोबर नसेल तर सर्व ज्योतिषशास्त्र असून नसून सारखेंच. अमुक वेळेस सूर्योदय आहे, अमुक वाजतां ग्रहण आहे, इतक्या घटकापर्यंत अमृतसिद्धियोग आहे, अमक्याचें जन्मलग्न अमुक आहे इत्यादि शेंकडों गोष्टी आज आपल्यास सहज साध्य वाटतात व फलज्योतिषावर विश्वास ठेवणारे हजारों लोक ह्या सहज सुलभ गोष्टींचा उपयोगहि करून घेत आहेत. आज चारशें वर्षांपासून यांत्रिक ज्ञानाचा व यांत्रिक कलेचा उत्तरोत्तर उत्कर्षच होत गेल्यामुळें ही अत्यंत अवघड व महत्त्वाची गोष्ट केवळ परसांतल्या भाजीप्रमाणें सुलभ झाली आहे. मोठीं घड्याळें,(clocks) वेळादर्शकें ( Time pieces ), लघुवेळादर्शकें ( Watches ) हीं माहीत नसणारा व ह्यांचा उपयोग न करणारा मनुष्य आतां खेडेगावांतहि सांपडणार नाहीं. लक्षावधि लोक आज लहान मोठीं घड्याळें वापरीत आहेत, हल्लीं तीं अल्प किंमतींत मिळतात व वेळहि बहुतेक बरोबर दाखवितात. कदाचित् थोडीं मागेंपुढें झाल्यास–रेल्वे स्टेशन, पोष्ट व इतर मोठमोठीं सरकारी कार्यालयें ह्यांतील बहुमोल घड्याळांवरून तीं बिनचूक दररोज लावून घेतां येतात. परंतु घड्याळाची रचना किती नाजूक, काटेकोर आणि चातुर्याची आहे ह्याचा फार थोड्यांनीं विचार केला असेल अलीकडे घड्याळाशिवाय कालज्ञानाचें दुसरें साधनच नाहीं; परंतु घड्याळें नव्हतीं तेव्हां लोक काय करीत असतील! बरोबर वेळ समजण्याकरितां त्यांस किती दक्ष रहावें लागत असेल व त्याकरितां किती श्रम पडत असेल, ह्याची नीट कल्पना आल्यास सहज होईल. पण थोडा अनुभव घेतला पाहिजे. पूर्वीचें कालज्ञानसाधन म्हणजे नाडीयंत्र किंवा घटकापात्र. परंतु घटका हा काल कसा ठरविला, एका अहोरात्रांत ६० घटका किंवा २४ तास हा कालविभाग कसा ठरला ह्याची कल्पना आपणांस एकदम होणार नाहीं. पूर्वीच्या लोकांचें चातुर्य त्यांच्या कसरतींत, हल्लींचें चातुर्य कौशल्यांत; पूर्वीच्या लोकांचें चातुर्य अवलोकनशक्तींत, आणि प्रस्तुतच्या लोकांचें चातुर्य त्यांच्या यांत्रिक प्रगतींत आहे. त्या अवलोकनशक्तीनेंच ६० घटकांचें अहोरात्र हें माप ठरलें.

पूर्वींचे लोक कमी वेधकुशल नव्हते. सतत अवलोकनानें असें अनुभवास येतें कीं, एखादी ठळक तारा याम्योत्तरावर एकदा आल्यापासून पुनः दुसऱ्या दिवशीं ती तेथें येईपर्यंत जो काळ लागतो तो ठरा[illegible]

आहे. सर्व स्थिर तारांना खगोलाची एक प्रदक्षिणा करण्यास एकसारखाच वेळ लागतो व तो हजारों वर्षांत समजण्याइतकाहि कमीजास्त होत नाहीं. सिद्धांतज्योतिषांत न्यूनाधिक न होणारा कालविभाग हा येवढाच. ह्या कालास नाक्षत्रदिवस म्हणतात. सिद्धांतांत नक्षत्रभ्रम दिलेले असतात ते हेंच. वर्षाचे साधारणपणें ३६० दिवस व परिघाचे ३६० अंश आणि प्रत्येक अंशाचे ६० पोटभाग करण्याची वहिवाट पडली व त्यामुळेंच दिवसाचे भाग ६० अशा तऱ्हेचे, कालदर्शक विभाग झाले. सूर्य पश्चिमेकडोन पूर्वेकडे दररोज थोडथोडा चळतो. प्राचीनकाळीं ऋषि अतिशय पहाटे उठून उपस्थान करीत. त्या वेळेस सूर्य कोणत्या नक्षत्राजवळ उदित होतो तें प्रत्यक्ष पहात. तसें आपणही केल्यास असें दिसून येईल कीं, आज ज्या नक्षत्राजवळ सूर्य उगवलेला दिसेल, त्याच्या पुढच्या नक्षत्राजवळ तो तेरा चवदा दिवसांनीं गेलेला आढळेल. व जें नक्षत्र आज सूर्योदयापूर्वी स्पष्ट दिसेल त्याच्या पुढचें नक्षत्र पुढें १४ दिवसांनीं स्पष्ट दिसू लागेल. याप्रमाणें एक एक नक्षत्र सूर्य पूर्वेस सरकतो व सुमारें तीनशें सव्वापासष्ट दिवसांनीं तो पहिल्या नक्षत्रीं उगवलेला आढळतो. म्हणजे दररोजची एक याप्रमाणें सूर्याच्या खगोलाभोंवतीं एका वर्षांत ३६५¼ प्रदक्षिणा होतात व नक्षत्रांचीं तितक्याच काळांत एक जास्त होते. म्हणजे नक्षत्रांच्या ३६६¼ प्रदक्षिणा होतात. आपला व्यवहार सूर्याच्या उदयास्तावर आहे. सूर्याचें एक दैनिक *परिभ्रमण* म्हणजे एक अहोरात्र. ह्यास सावन दिवस (सिव्हिल डे) म्हणतात. बरोबर एक नाक्षत्रदिवस दाखविणारें एकच घटका पात्र केलें आणि त्यावरून सूर्य एकदां मध्यान्हीं आल्यापासून पुनः मध्यान्हीं येईपर्यंतचा काल मोजला तर नाक्षत्रदिवस सावनदिवसापेक्षां लहान आहे असे दिसून येतें. तो किती हें गणितानें दाखविणेंच सोइस्कर. त्याचें गणित स्थूलमानानें असें आहे कीं, ३६६। नाक्षत्र दिवसाचे ३६५। सावन दिवस, तर एका नाक्षत्र दिवसास सावन दिवसाचे २३ तास ५६ मि. ४·०१ सेकद इतका काल लागतो. म्हणजे सावन दिवसापेक्षा नाक्षत्र दिवस ३ मिनिटें ५६ सेकंद किंवा सुमारे ९॥ पळें कमी आहे. हें मध्यम अथवा सरासरीचें अंतर आहे. एकदां सूर्य मध्यान्हीं आल्यापासून पुनः मध्यान्हीं येण्याच्या कालामधील अंतर जर दररोज तपासीत गेलें, तर तें अंतर कांहीं महिने दररोज वाढत जातें, व कांहीं महिने कमी कमी होत जातें असें आढळून येईल. म्हणजे नाक्षत्र दिवसाचें मान बदलत नाहीं. परंतु सौर दिवसाचें मान कमीजास्त होतें. ह्याची रोजची सरासरी तो मध्यम सौरदिवस होय.

दिवसाच्या ६० घटिका किंवा २४ तास असे समान भाग कल्पिलेले आहेत. आपल्या जुन्या घटका किंवा हल्लींचीं घड्याळें मध्यमसौर म्हणजे सरासरीचा दिवस दाखवितात. परंतु वास्तविक सौरदिवस हा मध्यमसौर दिवसापेक्षां बहुतकरून कमी किंवा जास्त असतो. प्रत्यक्ष अनुभवास येणारें दिनमान म्हणजे स्पष्ट दिवसाचें मान तें स्पष्ट दिनमान होय. मध्यम दिनमान व स्पष्ट दिनमान ह्यातील प्रत्येक दिवसास किती पळें, अगर प्रत्येक तारखेस किती मिनिटें अंतर पडतें तें साधारण ठरलेलें आहे, ह्या अंतरासच वेलांतर (म्हणजे इक्वेशन ऑफ टाईम) म्हणतात. भास्कराचार्य ह्यालाच उदयांतर म्हणतात. सूर्य प्रत्यक्ष उगवला म्हणजे स्पष्ट सूर्योदय झाला आणि याम्योत्तरावर आला म्हणजे स्पष्ट मध्यान्ह झाला. जानेवारीच्या पहिल्या तारखेस मध्यान्ह झाल्याबरोबर घड्याळ पहावें व त्या दिवशींचा वेलांतर संस्कार करावा. म्हणजे मध्यम काल येईल. स्पष्ट सूर्योदयाचें वेळेस स्पष्ट काल ६ तास व स्पष्ट मध्यान्हाचे वेळेस स्पष्ट काल १२ तास धरतात. मध्यम काल ह्याहून जितका कमी किंवा जास्त येईल, तितकाच घड्याळांत असावयास पाहिजे. नाहींतर घड्याळ मागें आहे किंवा पुढें आहे असें समजावें. प्रत्येक ठिकाणचा सूर्योदय काल निराळा, अर्थात् स्पष्ट काल निराळा. तेव्हां स्पष्ट कालावर अवलंबून असणारा मध्यम काल प्रत्येक ठिकाणचा वेगळा असणार ह्यात नवल काय? दोन ठिकाणच्या मध्यम कालांतील अंतरास रेखांतर किंवा देशांतर म्हणतात. मध्यम दिवसाच्या साठ घटका किंवा चोवीस तास. इतक्या कालांत सूर्याचें दैनंदिन गतीनें ३६० अंश म्हणजे खगोलाची एक प्रदक्षिणा होते. खगोलाचे याम्योत्तर व भूगोलाचे *रेखांशवलय एकच म्हणून ६० घटिकांत सूर्य पृथ्वीच्या ३६० रेखांशांची प्रदक्षिणा करतो.* तेव्हां एका रेखांशास १० पळें किंवा ४ मिनिटें मध्यममानानें अंतर पडतें. म्हणजे ज्या दोन स्थलांत १५ अंश

रेखांतर आहे, त्यातील मध्यम कालांत २॥ घटकांचें किंवा एका तासाचें अंतर पडेल. स्थल पूर्वेकडे असेल तर मध्यमकाल अधिक असतो किंवा रेखांतर धन असतें व पश्चिमेस असेल तर मध्यमकाल कमी असतो अथवा रेखांतर ऋण असतें. निरनिराळ्या ठिकाणचा एकाच वेळचा मध्यमकाल पूर्वी दाखविला आहे. कोणत्याही ठिकाणच्या स्पष्ट कालावरून स्टँडर्ड टाईमचें घड्याळ लावावयाचें असल्यास प्रथम वेलांतर संस्कारानें घडयाळाचा मध्यकाल बिनचूक करावा नंतर लंडनपासूनचा देशांतरसंस्कार धन करून त्यावरून स्टँडर्ड टाईम साधावें. ह्याप्रमाणें ज्योतिषशास्त्रज्ञानें कालज्ञान करून घेऊन आपलें कालमापन साधन बिनचूक ठेवावें.

## ग्रहाचें रविमध्य व भूमध्य-स्थान.

ज्याप्रमाणें रविचन्द्र ह्या प्रमुख ज्योतिर्गोलांना मध्यम आणि स्पष्ट स्थान असतें. त्याप्रमाणें रविचन्द्र वगळून बाकीचे जे बुधादि सप्त ग्रह त्याना रविमध्यस्थ आणि भूमध्यस्थ अशीं आणखी स्थानें असतात. बुधादि ग्रह हे वास्तविक पाहता रविच्याच भोंवतीं प्रदक्षिणा करीत असल्यानें त्यांचें स्पष्ट स्थान आणि रविमध्य स्थान हीं दोन्ही एकच. रविमध्य म्हणजे सूर्य बिंबावर उभें राहून जर प्रेक्षकानें ग्रहाकडे पाहिलें तर तो ग्रह आकाशांत त्याला ज्या ठिकाणीं प्रत्यक्ष दिसेल तें त्या ग्रहाचें रविमध्य अथवा स्पष्टस्थान होय. परंतु कोणीहि प्रेक्षक रविवरून ग्रह पाहूं शकत नाहीं. आपणा सर्वांस बुध, शुक्र, मंगळ, गुरु शनि ह्या ग्रहांचें आकाशांत जें स्थान स्पष्ट दिसतें तें त्यांचें पृथ्वीवरून दिसणारें प्रत्यक्ष स्थान होय. याप्रमाणें एकंदरीत बुधादि ग्रहांना तीन स्थानें असतात. पहिलें मध्यम, दुसरें मंद स्पष्ट किंवा रविमध्यस्थ, आणि तिसरें (आपल्यास दिसणारें) दृक्तुल्य म्हणजे भूमध्यस्थ स्थान होय. गणित करतांना मध्यमग्रहास प्रथम मन्दफल संस्कार देऊन रविमध्य ग्रह तयार करतात आणि नंतर त्याला शीघ्रफळ संस्कार देऊन त्याचे भूमध्यस्थ प्रत्यक्षस्थान निश्चित करतात. ह्या क्रियेची फोड आकृतिवरून घ्यानांत येईल. येथें एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. ती अशी कीं, भूमध्यस्थ ग्रह वर्तवितांना तीन आकाश गोल गणितात येतात. परंतु गणितात प्रत्येक वेळीं एकेकच ग्रहाचा विचार असल्यानें भूमध्यग्रह करतांना रविचा विचार करण्याचें कारण नाहीं.

आकृति काढल्यास त्यांत शुक्राची कक्षा आहे आणि रवि हा मध्य बिंदूंत असून शुक्राचें रविवरून दिसणारें ( रविस्थान ) इ हें दाखविलें आहे म्हणजे रविवरून पाहणाऱ्या प्रेक्षकाला शुक्र "र" ह्या ठिकाणीं दिसेल. परंतु त्याच वेळीं पृथ्वी "ही" ह्या ठिकाणीं असल्यानें पृथ्वीवरून शुक्र रविमध्य स्थानाच्या पुढें "भू" ह्या ठिकाणीं आकाशांत दिसेल. हें त्याचें भूमध्यस्थ म्हणजे आपल्यास प्रत्यक्ष दिसणारें स्थान होय. रविमध्य आणि भूमध्यस्थ ग्रहांतील हें जें अन्तर त्याला शीघ्रफल म्हणतात. दुसऱ्या आकृतींत गुरु हा ग्रह दाखविणें झाल्यास त्याचेंहि रविमध्यस्थान र हें असून, पृथ्वीवरील लोकांना तो "भू" ह्या ठिकाणीं दिसेल. म्हणून तेंच त्याचें दृक्तुल्य अथवा प्रत्यक्ष स्थान होय.

बुधादि ग्रह कधीं कधीं वक्री होतात त्याचें कारण त्यांची भूमध्यस्थ स्थलाची दृश्य स्थिति हें आहे. रवि-चन्द्र ह्यांच्या स्पष्ट गतिमध्यें किंवा स्थितिमध्यें वक्री मार्गी ही भानगड नाहीं त्याचें कारण हें कीं चन्द्र हा प्रत्यक्ष पृथ्वीभोंवतीं फिरणारा आणि पृथ्वी ही रविच्या भोंवती फिरणारी असल्यानें, तेथें भूमध्यस्थ स्थिति गति हें एकच दृश्य असतें. बुध शुक्रादि ग्रहाच्या वक्री मार्गित्वाची कल्पना आकृतिवरून सहज समजेल. आकृतिमध्यें शुक्राची कक्षा दाखविलीं असून पृथ्वी, रवि आणि शुक्र ह्यांची स्थिति दाखविली आहे. गतिचा घोंटाळा होऊं नये म्हणून पृथ्वी आणि शुक्र ह्यांच्या स्थानांच्या सापेक्षतेची तुलना करतांना फक्त ग्रहाची तुलनात्मक गति विचारांत घेतली तरी चालते म्हणून आकृतींत पृथ्वी आणि सूर्य यांचीं स्थानें दाखवून शुक्र कक्षेंत शुक्राचीं क्रमवार स्थानें शु¹-शु²—शु³ शु' शु' शु' अशीं दाखविली आहेत. प्रथमतः शुक्र शु ( १ ) येथें गेला असतां त्याची सूर्याशी युति होते; आणि तो रवि किरणांत झांकून जाऊन त्याचा अस्त झालेला असतो; पण तो जर दिसला असता, तर १ ह्या ठिकाणीं दिसला असता. पुढें शु ( २ ) येथें गेला तेव्हां एक स्थानाच्या पुढें २ ह्या ठिकाणीं दिसतो, त्याच्यानंतर

शु ( ३ ) येथें गेलेला शुक्र ३ येथें दिसतो ह्याप्रमाणें ( ५ ) ह्या ठिकाणचा शुक्र ५ येथे दिसतो पण शुक्र रविमध्यगतीनें ( ६ ) येथें पुढें गेला असूनहि भूमध्यस्थितिप्रमाणें तो ( ६ )′ ह्या ठिकाणीं अथवा ( ५ ) ह्या स्थानाच्या मागें गेलेलाच दिसतो म्हणजे ५ ह्या स्थानानंतर तो वक्री झाला. म्हणूनच ( ७ ) शुक्राचें रविमध्यस्थान ( ६ ) च्या पुढें असून सुद्धां त्याचें भूमध्यस्थान ६′ ह्याच्याहि मागें ७′ ह्या ठिकाणीं दिसतें म्हणजे वक्रगतिनें तो मागें मागें सूर्याच्या बाजूकडे येत आहे दिसतें. त्याच पद्धतिनें तो ९′ ह्या ठिकाणीं आणि तेथून १०′ ह्या ठिकाणीं फारच मागें म्हणजे सूर्याच्या दुसऱ्या दुसऱ्या बाजूकडे गेलेला दिसतो. ह्याप्रमाणें बुध, शुक्र हे वक्रगतीनें रविच्या पूर्वेकडे असतांना वक्री होऊन पश्चिमेकडे जातात; म्हणून ते प्रथमतः सूर्यास्तानंतर दिसत असून वक्रगतिनें अस्त पावून सूर्योदयापूर्वी दिसूं लागतात. मंगळ, गुरु आणि शनि यांच्या वक्रत्वाची उपपत्ति वरच्याप्रमाणेंच आहे.

**ग्रहांची आकाशस्थस्थिति, स्पष्ट, मध्यम आणि त्यांचे अतिचारित्व, वक्रत्व, अस्त, युति भ्रमणमार्ग, ग्रहणें, क्रांतिवृत्त, विषुववृत्तांची स्थिति, नक्षत्र ताऱ्यांचे भोग इत्यादि गोष्टींच्या स्पष्टीकरणार्थ प्रत्यक्ष आकृति देण्यांत येणार आहेत त्यावरून विशेषरीतीनें ह्या विषय कळेल.**

---

# वैदिक आरंभस्थानाचा निर्णय.

आपल्या भारतीय पंचागाचा निकटसंबंध धर्माशीं विशेष आहे; तो संबंध तसा नसता तरी देखील प्राचीन परंपरा कायम ठेऊन त्यात सुधारणा करणें हेंच खऱ्या प्रगतीचें लक्षण होय. भारतीय पंचांगाची परंपरा अथवा पद्धति वैदिक असली पाहिजे यांत वादच नाहीं. पण पंचागाचें स्वरूप वैदिक काळीं जसें असेल, तसेंच अगदीं तें आताहि असणें हें मात्र शक्य नाहीं. मग परंपरा कोणती ? आणि ती कायम कशी राखावयाची हा प्रश्न उपस्थित होतो. त्याचें उत्तर असें कीं, परंपरेंतील ज्या गोष्टी सुधारणेच्या आणि दृक्प्रतीतीच्या आड येणार नाहींत. त्या शक्य तोंपर्यंत तशाच ठेवावयाच्या; निदान त्यात ज्या रीतीनें पूर्वीपासून बदल होत आला असेल तशाच रीतीनें पुढेंहि बदल करावयाचा याचेंच नांव परंपरारक्षण. परंपरा म्हणजे बाह्यस्वरूप पूर्वीचेंच किंवा त्या स्वरूपातहि थोडा बहुत अगदीं अवश्य असा जो फरक होईल त्याची पद्धतिहि पूर्वाचीच; ह्या गोष्टी साध्य झाल्या म्हणजे परंपरा राखली गेली असें खुशाल समजावें. तेव्हां प्रस्तुतच्या पंचागशोधनाच्या प्रश्नाला वरील कसोटी कशी लावली पाहिजे हें समजण्याला **वैदिक परंपरा** कोणती तें प्रथम समजलें पाहिजे.

वैदिक परंपरेचें पंचांगविषयक स्वरूप लोकमान्य टिळक आणि ज्योतिर्विद शंकर बाळकृष्ण दीक्षित यांच्या सर्वमान्य ग्रंथावरून चागलें ध्यानात येईल. त्याची साधारण रूपरेषा अशी कीं—

१. अगदीं प्राचीन काळीं म्हणजे सुमारें पाच सहा हजार वर्षांपूर्वी चैत्रादि संज्ञा प्रचारांत आल्या, चंद्र मार्गावरील तारकापुंजाना नावें दिलीं गेलीं आणि चान्द्रसौर वर्ष चालू झालें. वर्षमान सौर; महिने चान्द्र; संवत्सरारंभ मात्र ज्या महिन्यात वसंत ऋतु लागेल किंवा उदगयन सुरू होईल, त्या महिन्यांतील पौर्णिमेपासून किंवा शुद्ध प्रतिपदेपासून करावयाचा, आणि चान्द्र सौन्द्र वर्षांचा मेळ अधिक महिना धरून घालावयाचा अशी व्यवस्था होती. ह्या महत्त्वाच्या गोष्टी नीट ध्यानात ठेविल्या म्हणजे कांहीं एक घोंटाळा होणार नाहीं.

आतां वैदिक नक्षत्र पद्धतिचें स्वरूप सांगण्यापूर्वी ती पद्धति ज्या आधारांनीं सिद्ध झाली त्यापैकीं कांहीं आधारभूत वचनें येथें देतों:—

सुषुप्वांस ऋभवस्तदपृच्छतागोह्य क इदं नो अबूबुधत् ।
श्वानं बस्तो बोधयितारमब्रवीत् संवत्सर इदमद्या व्यख्यत ॥

ही ऋचा ऋग्वेदाच्या पहिल्या मंडळात असून त्या ऋचेवरून मृग नक्षत्रीं संपाताचें अस्तित्व आणि द्वादशाहाची उपपत्ति या गोष्टी लोकमान्यांनीं सिद्ध केल्या आहेत. नंतर महत्त्वाचें जे वृषाकपि सूक्त तें देऊन त्यावरूनहि मृगशीर्षांतील वसंत संपाताचाच निष्कर्ष काढिला आहे. वृषाकपि सूक्तात फारच महत्त्वाच्या ज्या ऋचा आहेत तेवढ्याच येथें लिहितों:—

धन्व च यत्कृंतत्रं च कतिस्वित्ता वि योजत । नेदीयसो वृषाकपे स्तमेहि गृहाँ उप ॥
यदुदंचो वृषाकपे गृहमिन्द्रा जगन्तन । क १ स्य पुल्वघो मृगः कमगञ्जनयोपनः ॥

लोकमान्य टिळकाच्या विचारसरणीचा साराशहि येथें देता येणें शक्य नाहीं पण मृगशीर्षनक्षत्राला "अग्रहायण" हें नांव पडण्याचें कारण ऋग्वेदकाळीं मृगनक्षत्रात निदान मृग नक्षत्र जवळ वसंतसंपात होता आणि त्यावेळीं म्हणजे प्राचीनकाळीं वसतारभीं संवत्सरारंभ होत असे महत्त्वाचे दोन अपूर्व शोध लोकमान्यांनीं लावले. लोकमान्यांनीं आपल्या ग्रंथात जीं वचनें उद्धृत केली आहेत तेवढीच या विषयासंबधानें ऋकसंहितेंत सापडतात असें नव्हे. विशेष शोध केला तर जास्तीहि सापडतील यात शका नाहीं म्हणून उदाहरणार्थ मृगांत संपात असल्याविषयीं ज्यांत ज्ञापक मिळतें अशा ज्या दोन तीन ऋचा आमच्या वाचनात आल्या आहेत त्याहि देतो:—

बीभत्सूनां सयुजं हंसमाहुरपां दिव्यानां सख्ये चरन्तम् ।
अनुष्टुभमनु चर्चूर्यमाणमिन्द्रं नाचिक्युः कवयो मनीषा ॥ (१०, १२४ ९),

वरील ऋचेंत मृगनक्षत्रात उदित झालेला देदीप्यमान आणि आकाशगंगा ह्यांचें हृदयंगम वर्णन केलेलें आहे. म्हणून या ऋचेचें महत्त्व फार आहे. त्याचप्रमाणें:—

द्वे स्रुती अशृणवं पितॄणामहं देवानामुत मर्त्यानाम् ॥
द्वे समीची बिभृतश्चरन्तं शीर्षतो जातं मनसा विमृष्टम् ।
स प्रत्यङ् विश्वा भुवनानि तस्था-वप्रयुच्छन् तरणि भ्राजमानः ।
विश्वावसुं सोम गन्धर्वमापो ददृशुषी स्तदृतेना व्यायन् ।
तदन्ववैतत् इन्द्रो रारहाण आसां परिसूर्यस्य परिधीरपश्यत् ॥
सख्निमविन्दत् चरणे नदीनां अपावृणोत् दुरो अश्मव्रजानाम् ॥

वरील ऋचामध्यें देवयान आणि पितृयाण हे नक्षत्रचक्रांतील मार्ग, तसेंच आकाशगगा आणि त्याच्या जवळील सूर्याचें स्थान ह्यांना अनुलक्षून स्पष्ट उल्लेख आहेत.

आता वर्षारंभाविषयीं काय आधार सांपडतात तें पाहू. "ग्रीष्म ऋतूंत सोमयागाला आरभ करावा असें कोणी म्हणतात, पण ग्रीष्मांत आरंभ न करतां वसंत ऋतूंतच करावा" अशा अर्थाचें वाक्य शतपथ ब्राह्मणांत आढळतें. ग्रीष्म ऋतूचा संबध असा आहे कीं, मृगनक्षत्रात रवि असताना पूर्णिमा वैशाखी किंवा ज्येष्ठी येते म्हणजे अगदीं प्राचीन काळीं अर्थात् ऋग्वेद काळीं वत्सरारभ

वैशाखी पूर्णिमेस

होत असे. शतपथ ब्राह्मणकाळीं वैशाख ज्येष्ठात ग्रीष्म ऋतू असे म्हणून ग्रीष्म ऋतूचा संबंध सोमयागा संबधानें तेथें आलेला आहे. विशाखा-पूर्णमासानतर संवत्सरारंभ चित्रा पूर्णमासानतर होऊ लागला, त्यानंतर फाल्गुनी पूर्णमासावर आणि शेवटीं माघी पौर्णिमेस होऊ लागला. माघी पौर्णिमा ही वैदिक काळची अखेरची सीमा होय हे सर्व उल्लेखवैदिक वाङ्मयात आहेत.

परंतु प्रकृत विवेचनाचा मुख्य मुद्दा संवत्सर प्रवृत्ति हा नव्हे. तर वैदिक नक्षत्रगणनेची पद्धति कशी होती हा आपला विषय आहे. त्यासंबधानें मृगनक्षत्रीं संपात असल्याची आधारभूत वाक्यें वर दिलीं आहेत

तीं सर्व ऋग्वेदांतीलच आहेत. अर्थात् ऋग्वेदकाळीं संपात मृगनक्षत्रांत होता, व त्या कारणानें नक्षत्रगणनाहि मृगादिच होती. या कालानंतर संपात हा विलोम गतिनें रोहिणी नक्षत्रांत गेला.

अभिजित् स्पर्धमानातु रोहिण्या कन्यसी स्वसा
इच्छन्ती ज्येष्ठतां देवी तपस्तप्तुं वनं गता ॥
धनिष्ठादि स्तदा कालो ब्रह्मणापरि कल्पितः ।
रोहिणी ह्यभवत् पूर्वे एवं संख्या समाभवत् ।
एवमुक्तेतु शक्रेण कृत्तिकाः त्रिदिवं गताः ॥

महाभारत. वन. २३०

हे श्लोक ज्यो. दीक्षितांनीं आपल्या पुस्तकांमध्यें उद्धृत केले आहेत, पण ह्या "वाक्यांचा भावार्थ नीट समजत नाहीं" असें जरी त्यांनीं प्रथमतः म्हटलें तरी लागलीच "रोहिण्यादि गणना कधी होती तीव अनुसरून हें म्हटलें आहे कीं काय नकळे" असा खुलासा केला आहे. वास्तविक पाहतां मृगानंतर संपात रोहिणींत आला परंतु त्याच काळांत कृतिका पूर्व बिन्दूत उदय पावूं लागल्या. त्यामुळें रोहिण्यादि गणना फार काळ प्रचारांत न राहतां कृत्तिकादि गणना चालू झाली असा त्या वाक्यांचा भावार्थ आहे.

नंतर संपात तेथून कृत्तिका नक्षत्रांच्या पुंजापर्यंत जाऊन ठेपला तेव्हां कृत्तिका पुंजांतील योगतारा(इंटा) हीच नक्षत्र चक्राच्या आरंभस्थानीं मानली गेली. कृत्तिका नक्षत्रगणनेचें महत्त्व दोन प्रकारांनीं आहे. पहिलें कारण असें कीं, रोहिणीमध्यें संपात असतांना देखील रोहिण्यादि गणना प्रचारांत यावयाची, ती सरसहा न येतां कृतिकादि गणनाच प्रचारांत आली. दुसरें कारण असें कीं, या कालापासून-विभागात्मक नक्षत्रें मानण्याचा प्रघात पडला-अशा प्रकारचा निश्चित पुरावा सांपडतो. तो असा.

मुखं वा एतन्नक्षत्राणां यत् कृत्तिकाः ॥ मुखं वा एतदृतूनां यत् वसंतः॥ देवगृहा वै नक्षत्राणि । कृत्तिकाः प्रथमं, विशाखे उत्तमं । तानि देवनक्षत्राणि । अनुराधाः प्रथमं अपभरणीरुत्तमं । तानि यम नक्षत्राणि ॥ मधुश्च माधवश्च वासंतिकावृतू ॥ तस्मात् कृत्तिका स्वादधीत । एता ह वै प्राच्यै दिशो न च्यवन्ते । सर्वाणि ह वा नक्षत्राणि प्राच्यै दिशश्च्यवन्ते ॥

ह्या सर्व वचनांवरून आणि विशेषतः शेवटच्या श्रुतिवाक्यावरून कृत्तिकापुंज अगदीं पूर्व बिंदूंत उदय पावत असे हें सिद्ध होतें. हल्लीं कृत्तिका पूर्व बिन्दूच्या उत्तरेस उगवतात. कृत्तिका बरोबर पूर्व बिन्दूत उगवण्याचा काल शकापूर्वी ३१०० वर्षांचा होय. म्हणजे आज या गोष्टीला पांच हजार वर्षें पुरी होत आली आहेत. या वेळीं आकाशांतील विषुववृत्त कृत्तिका पुंजातून जात असे व म्हणून त्या थेट पूर्वबिंदूंत उगवत असत.

वरील श्रुतिमध्यें नक्षत्रचक्राचे विभाग दोन केले असल्याचें सांगितले आहे. पहिला विभाग देवनक्षत्रांचा, दुसरा विभाग यमनक्षत्रांचा. देवनक्षत्राचा अंतर्भाव उत्तर गोलार्धांत आणि यमनक्षत्रांचा दक्षिण गोलार्धांत करीत असत. अर्थात् ऋतूंच्या अनुरोधानेंहि नक्षत्रांचे विभाग झाले असले पाहिजेत.

या कालानंतर विषुववलय हें कृत्तिकांच्या दक्षिणेस झुकलें, परंतु संपात कृत्तिका पुंजाच्या कदंबप्रोतावर आला. हा काल शकापूर्वी २३०० वर्षांच्या सुमाराचा होय. म्हणून शकापूर्वी ३१०० वर्षांपासून श. पू. २३०० वर्षांपर्यंतचा काल कृत्तिका युगांतील होय.

या युगांत उदगयन माघ पौर्णिमेच्या सुमारास होत होतें. नंतर तें मागें हटत हटत माघ शुद्ध अष्टमीस होऊं लागलें. माघ शुद्ध अष्टमीस भीष्माष्टमी असें नांव आहे.

माघोयं समनुप्राप्तो मासः सौम्यो युधिष्ठिरः ॥
त्रिभागशेषः पक्षोयं शुक्लो भवितुमर्हति ॥

हा श्लोक महाभारतांत भीष्मनिर्याण प्रसंगाच्या वेळेला अनुलक्षून आहे. श्री. ज. स. करंदीकर, यांनीं ह्या श्लोकाचा अर्थ करितांना " त्रिभागशेषः " ह्याचा संबंध " पक्षोऽयं " ह्या पदाशीं जोडून " त्रिभागशेषः पक्षोऽयं " असा अन्वय केला, पण त्यामुळें भीष्म निर्याणाची तिथि माघ कृष्ण ४।५ त्याना धरावी लागली, व वद्य ५ पर्यंत शुक्लपक्ष मानण्यास हरकत नाहीं असा शास्त्रार्थ " भवितुमर्हति " ह्या पदांतून काढावा लागला. परंतु इच्छामरणी भीष्मांना असा केवळ " शास्त्रीय " शुक्लपक्ष मान्य झाला असें म्हणणें अयुक्तिक दिसतें. शास्त्रार्थच म्हटला तर माघ व॥ ८ मी तर एकाष्टका म्हणून प्रसिद्ध आहे व त्या तिथीस यज्ञाला सुद्धां आरंभ होतो. मग मोडकांनीं माघ व॥ ८ स भीष्मनिर्याण मानलें त्यांत चूक कोणती ! ह्या सर्व अडचणी " त्रिभागशेषः " ह्याचा अन्वय " माघः " ह्या पदाशीं घेतला म्हणजे दूर होतात. आणि माघ शुक्ल अष्टमी ती भीष्माष्टमी अशी जी परंपरा तिला बाध येत नाहीं आणि प्रत्यक्ष शुक्ल पक्षांत निर्याण येतें. ह्याप्रमाणें सर्व सुसंगत होतें. वरील श्लोकांत वर्णिल्याप्रमाणें भीष्मनिर्याणाचें वेळीं हें उदगयन माघ शुक्ल ८ च्या सुमारास होऊं लागलें त्याकाळींहि विभागात्मक नक्ष पद्धति प्रचारांत आली होती.

कृत्तिका योगतारेच्या जवळ संपात होता तेव्हां माघ शुद्ध पौर्णिमेस उदगयन होत असे. आणि त्यावेळीं संवत्सर सत्राला आरंभ होत असे हें वर दाखविलेंच आहे. परंतु भीष्मनिर्याणाचे वेळीं हें उदगयन शुक्लाष्टमीस होऊं लागलें अर्थात् उदगयनबिंदू (७।) सुमारें सव्वासात अंशाइतका शततारका नक्षत्रापासून पश्चिमेकडे मागें हटला होता. हा काळ मैत्र्युपनिपदांत उल्लेखिलेला काळ होय. गीतारहस्य पान ५४६।४७. यांत मैत्र्युपनिपदांतील वाक्याचा अर्थ दिलेला आहे तें वाक्य असें:—

सूर्यो योनिः कालस्य । तस्यैतद्रूपं ।
यन्निमेषादि कालात् संभृतं वत्सरं । मघाद्यं श्रविष्ठार्धं ॥

म्हणजे " मघा नक्षत्राच्या आरंभापासून क्रमानें धनिष्ठा नक्षत्राच्या अर्ध्या भागावर सूर्य येईपर्यंत दक्षिणायन होतें " असा वरील वाक्याचा आशय देऊन ' रहस्यकार ' लिहितात कीं " **कांहीं म्हटलें तरी वेदांग ज्योतिषाच्या पूर्वीची उदगयनस्थिती मैत्र्युपनिषदांत वर्णिली आहे** याबद्दल शंका रहात नाहीं " कारण वेदांगकालीन उदगयन मैत्र्युपनिपत्कालीन उदगयनापेक्षाहि अर्ध्या नक्षत्रानें मागें आलें होतें. वरील उताऱ्यांत महत्त्वाची गोष्ट ही कीं, नक्षत्रासंबंधानें आद्य, अर्ध, अशी विभागदर्शक भाषा योजण्यांत येऊं लागली होती. विभागात्मक नक्षत्रपद्धति प्रचारांत असल्यावेरीज " श्रविष्ठार्धं " " आश्लेषार्ध " असे सामासिक शब्द योजणें शक्य नाहीं. मात्र येवढें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, ही विभागगणना कृत्तिका तारेपासून असली पाहिजे. यापूर्वी कदाचित् रोहिण्यादि गणना प्रचारांत असेल, परंतु येवढें खास कीं मैत्र्युपनिपदोक्त-विभाग, किंवा वेदांगज्योतिपोक्तविभाग हे **आश्विन्यादि विभाग किंवा मेपादि विभाग नव्हेत.** हा मुद्दा पुष्कळांच्या नजरेंतून सुटला आहे आणि त्या योगानें भलतींच अनुमानें त्यांनीं काढलेलीं आहेत. एतावता निश्चित गोष्ट ही कीं, मैत्र्युपनिपत् आणि वेदांगज्योतिष यांत " मघाद्यं," " श्रविष्ठार्धं, किंवा " श्रविष्ठादौ," " सार्पार्धे," असे जे उल्लेख आहेत ते ते सर्व विभागात्मक पद्धतीला अनुलक्षूनच केलेले आहेत, आणि असले पाहिजेत.

वरील विवेचनावरून वैदिक नक्षत्रगणनेचें वास्तविकस्वरूप व त्याचें महत्त्व वाचकांच्या सहज ध्यानांत येईल. तें स्वरूप असें कीं, ज्या चंद्रनक्षत्रांतून आकाशांतील विषुव जातें तें नक्षत्र थेट पूर्वबिन्दूत उगवतें ही गोष्ट वैदिक आर्यांच्या ध्यानांत आली होती. त्यांनीं दुसरा प्रत्यक्ष अनुभव असा पाहिला कीं, सूर्य एखाद्या ठळक नक्षत्राजवळ उदय पावतो तेव्हां जर रात्र व दिवस हे समसमान असले तर त्या वेळेस. वसंतऋतु किंवा शरदृतु असतो. म्हणून प्रघात असा पडला कीं, ज्या नक्षत्रांत सूर्य असतांना वसंतऋतु

असेल किंवा जें ठळक नक्षत्र थेट पूर्वेला उगवेल त्या नक्षत्रापासून नक्षत्रगणनेस आरंभ करावयाचा. तारात्मक नक्षत्रपद्धति जाऊन तिचे जागीं विभागात्मक नक्षत्रपद्धति जेव्हां आली तेव्हां आरंभीच्या नक्षत्र पुंजातील एक ठळक तारा आरंभस्थानीं मानून तेथून त्यांनीं नक्षत्रविभाग कल्पिले. प्रत्येक नक्षत्र विभागाच्या आरंभीं तारा असणें शक्यच नाहीं म्हणून गणनारंभाचें जें नक्षत्र त्या पुंजांतील योगतारा पहिल्या विभागाच्या आरंभीं किंवा शेवटीं असली म्हणजे झालें. ही गणना वरचेवर बदलणेंहि शक्य नसतें. प्रथमची मृगादि गणना ही किती हजार वर्षे सुरू होती तें माहीत नाहीं पण त्यानंतर कृत्तिकादि गणना जी शकापूर्वी ३००० वर्षानंतर चालू झाली ती शकारंभापर्यंतहि होतीच. यावरून आरंभस्थान बदलणें किती कालावधीचें काम आहे तें स्पष्ट दिसतें. या दीर्घकालांत नक्षत्रविभाग ठाम ठरून गेले होते आणि अश्विन्यादि गणना जेव्हां सुरू झाली तेव्हांहि कृत्तिकादि विभागच प्रचारांत होते. वराहमिहिराच्या ग्रंथांत कृत्तिकादि गणना आणि अश्विन्यादि गणना या दोहोंचीहि सरमिसळ झालेली आहे. परंतु येवढी गोष्ट निश्चित दिसते कीं, वराहाच्या वेळीं किंवा सूर्यसिद्धांत वराहानें प्रचारांत आणला त्या वेळीं म्हणजे शके **४२१ ते शके ४४४ या सुमारास वैदिक आरंभस्थानावरून अश्विनी विभागाचें आरंभस्थान निश्चित झालेलेंच होतें म्हणूनच शके ४२१ किंवा शके ४४४ ह्या शून्यायनांश वर्षांना अत्यंत महत्त्व आहे.** ही वर्षे काल्पनिक नव्हेत तर ऐतिहासिक आहेत या वर्षाचे सुमारास कृत्तिकादि गणनेस **अनुसरून वैदिक आरंभस्थानाचा जसा निर्णय झाला तसाच तो आजहि कमेटीच्या शुद्धपंचांग प्रवर्तनानें झाला आहे.**

## कृत्तिकारंभस्थान.

ऋग्वेदकालीं तारात्मक मृग नक्षत्रांत संपात होता, आणि पूर्वाभाद्रपदा व उत्तराभाद्रपदा यांचे दरम्यान उदगयन होत होतें, अशा वेळीं नक्षत्रप्रदेशाचे समसमान विभाग मानून त्या विभागास त्यांतील नक्षत्राचें नांव देण्याची पद्धति जिला विभागपद्धति म्हणतात ती चालू होती किंवा नाहीं हें नक्की सांगतां येत नाहीं. परंतु तैत्तिरीय संहिता आणि शतपथ ब्राह्मणकाल म्हणजे कृत्तिकापुंज बरोबर पूर्व बिन्दूत उदय पावूं लागल्यापासून कृत्तिकादि गणना चालू झाली हें वर दाखविलेंच आहे. त्यावेळीं संपात कृत्तिकापुंजाचे पूर्वेस म्हणजे रोहिणी नक्षत्रांत होता. तरी कृत्तिकापुंज बरोबर पूर्व दिशेस उगवतो या अत्यंत महत्त्वाच्या गोष्टीमुळें नक्षत्रपुंजाची गणना रोहिणीपासून होण्याऐवजीं कृत्तिकापासून होऊं लागली. हा काळ संहिता कालाचा शेवट होय.

मैत्र्युपनिषत् हा ग्रंथ कृत्तिकादिगणनाकालांतीलच आहे. त्यांत "मघाद्यं। श्रविष्ठार्धं॥" म्हणजे मघांचा आरंभ आणि 'धनिष्ठांचा अर्धांभाग' असा स्पष्ट निर्देश आहे. तेव्हां मैत्र्युपनिषत् कालांत नक्षत्रासंबंधानें विभागपद्धति चालू होती यांत यत्किंचित् देखील संशय नाहीं. दक्षिणायनबिंदु मघा नक्षत्राच्या आरंभीं आणि उदगयन बिन्दु धनिष्ठा नक्षत्रविभागाच्या अर्ध्यावर" अशा वस्तुस्थितीचा उल्लेख मैत्र्युपनिषदांत आहे. मैत्र्युपनिषदांतील विभागपद्धतिविषयीं वादच नाही. परंतु हा उल्लेख कृत्तिकादिगणनेस धरूनच आहे. कृत्तिकादि विभाग याचा अर्थच हा कीं, कृत्तिकापुंजांतील योगतारेपासून नक्षत्र प्रदेशाचे समसमान विभाग मानण्याची पद्धति, आणि कृत्तिकादि गणना म्हणजे कृत्तिकापुंजाशीं पूर्व बिंदूचा किंवा संपात-बिन्दूचा योग झाल्यामुळें नक्षत्रगणना कृत्तिकापासून करण्याचा प्रघात. हा प्रघात निदान शकापूर्वी ३१०० वर्षांपासून आहे. शकापूर्वी २३०० वर्षांचे सुमारास संपात कृत्तिका नक्षत्रीं आला. याप्रमाणें कृत्तिकादि गणना आणि कृत्तिकादि विभागपद्धति या दोहोंचें ऐक्य शकापूर्वी ३००० ते २३०० या कालाचे दरम्यान केव्हांतरी झालें. मैत्र्युपनिषदांत विभागपद्धति आहे; आणि ती कृत्तिकायोगतारेपासून आहे. विभाग-पद्धतीमध्यें प्रत्येक विभागाच्या आरंभीं तारा असलेच असें नाहीं. चार दोन विभाग असे निघतील कीं ज्याच्या आरंभसीमेच्या किंवा अंतिमसीमेच्या जवळ त्या नक्षत्रांतील एखादी तारा येईल. परंतु तो नियम नव्हे तर अपवाद होय. नुसतें अमुक नक्षत्र म्हटलें म्हणजे नक्षत्र विभाग असेंच समजलें पाहिजे-मैत्र्यु-

पनिषदाचा काल शकापूर्वी १९०० वर्षें ते १७०० वर्षें इतक्या कालाच्या दरम्यान आहे. असें त्यांतील उदगयनबिन्दूच्या स्थितिवरून ठरतें. लगधविरचित वेदांगज्योतिष हें मैत्र्युपनिषदानंतर ५०० वर्षांनीं म्हणजे शकापूर्वी १४०० ते १२०० इतक्या अवधींत रचलेलें आहे. म्हणून मैत्र्युपनिषदांत जर नक्षत्रविभाग पद्धतीनें अयन बिन्दूंची स्थिती सांगितली आहे तर वेदांग ज्योतिषांतहि तशाच पद्धतीनें अयन-बिन्दूची स्थिति सांगितली आहे असें म्हटलें पाहिजे. कारण शब्दरचना दोन्ही ग्रंथात सारखीच आहे. मैत्र्युपनिषदांत "मघारंभ" आणि "धनिष्ठार्ध" असे शब्द आहेत आणि वेदांगज्योतिष्यांतहि "धनिष्ठारंभ" व "आश्लेषार्ध" असे शब्द आहेत. तेव्हां अर्थ करण्याची पद्धति दोन्ही ठिकाणीं एकसारखीच स्वीकारली पाहिजे. मैत्र्युपनिषदांतील वाक्य वर दिलें आहे. आतां वेदांगज्योतिषांतील वाक्य देतों:—

प्रपद्येते श्रविष्ठादौ सूर्याचांद्रमसावुदक्।
सार्पार्द्धे दक्षिणार्कस्तु माघ श्रावणयोः सदा॥

याचा अर्थ असा कीं—

"धनिष्ठा नक्षत्राच्या आरंभीं सूर्यचन्द्र उत्तरेस वळतात आणि आश्लेषानक्षत्र अर्धें झालें म्हणजे दक्षिणेस वळतात. ही स्थिति माघ आणि श्रावण या महिन्यात अनुक्रमानें घडतें"

या श्लोकांतील "श्रविष्ठादौ" या पदाचा अर्थ विभाग पद्धतीस अनुसरून करतांना—कै ज्यो. दीक्षित यांना शंका आली कीं, वेदांगकालीं अश्विन्यादि गणना प्रचारांत नव्हती तर त्यांतील विभाग अश्विन्यादि गणनेप्रमाणें कसे असूं शकतील! ही शंका अगदीं बरोबर आहे. आणि आह्मांसहि ती मान्य आहे. पण आमचें ह्मणणें असें कीं मैत्र्युपनिषदांतील नक्षत्रविभाग किंवा वेदांग ज्योतिषांतील नक्षत्रविभाग हे मुळीं अश्विन्यादि गणने-प्रमाणें नाहींतच. हे विभाग आश्विन्यादि नसून कृत्तिकादि आहेत. ही गोष्ट. कै० ज्यो० दीक्षित यांच्या लक्षांतून अजिबात गळली. शिवाय त्यांच्या अवलोकनांत मैत्र्युपनिषदांतील वचनें आलीं नव्हतीं. त्यामुळें वेदांगज्योतिषापेक्षांहि निदान चार पांचशें वर्षें पूर्वी झालेल्या मैत्र्युपनिषदांतही तशाच स्वरूपाचे विभागपद्धतीला अनुसरून उल्लेख केलेले आहेत ही गोष्ट त्यांच्या लक्षांत येण्यास मार्ग नव्हता. परंतु ती अडचण आतां नाहीं." मैत्र्युपनिषदांतील "श्रविष्ठार्ध" आणि वेदांग ज्योतिष्यांतील सार्पार्द्धे या शब्दाचा अर्थ जर त्या त्या नक्षत्र विभागाचें अर्ध असा न केला तर 'अर्ध' या शब्दाचें स्वारस्यच राहणार नाहीं कारण ज्या नक्षत्राची मर्यादाच निश्चित नाहीं त्याच्या संबंधानें आरंभ, मध्य आणि अंत या शब्दांचा उपयोग करणें वेडे पणांचें ठरेल. नक्षत्रपुंजाला कोणतीही आणि कशीहि मर्यादा घाला तो नक्षत्र विभागच झाला. आणि आमचें ह्मणणें हेंच कीं पंचांगामध्यें नक्षत्रांचा उपयोग होऊं लागण्या पूर्वीच त्याच्या मर्यादा अथवा विभाग ठरले असले पाहिजेत. म्हणून नक्षत्रांचे विभागच होते आणि ते विभाग समसमान होते असें मानल्याशिवाय गत्यंतर नाहीं म्हणून "मघाद्यं श्रविष्ठार्धं" आणि "श्रविष्ठादौ" आणि "सार्पार्द्धे" या पदांचा अर्थ विभागात्मक पद्धतिस अनु सरूनच केला पाहिजे. जर "श्रविष्ठादौ" याचा अर्थ धनिष्ठा योगतारा असा करावयाचा तर "मघाद्यं" या पदाचा अर्थहि मघा नक्षत्रांतील योगतारे पासून असाच करावा लागेल. म्हणजे मघायोगताराही मघा नक्षत्राच्या आरंभीं होती आणि त्या ठिकाणीं दक्षिणायनबिन्दू होता असा अर्थ केला पाहिजे. असें जर आहे तर केतकरांनीं "मघाद्यं" या शब्दाचा अर्थ "मघा नक्षत्र विभागारंभीं" असा काय म्हणून केला! कोणत्याहि शास्त्राच्या शोधनात मतलब आणि अन्याय याना जागाच नाहीं. "मघाद्यं" याचा अर्थ जर "मघा नक्षत्र विभागाच्या आरंभीं" असा करावयाचा तर "श्रविष्ठादौ"याचाहि अर्थ "धनिष्ठा नक्षत्रविभागाच्या आरंभीं असा केलाच पाहिजे. म्हणणें इतकेंच कीं "मघाद्यं" आणि "श्रविष्ठादौ" याचा अर्थ कोणत्याहि पद्धतीनें करा, पण तो एकाच पद्धतीनें करा. नक्षत्रारंभ म्हणजे नक्षत्रयोगतारा असा करावयाचा असेल तर दोन्हीठिकाणीं तसाच करा आणि मग चमत्कार पहा. नाहींतर एका ठिकाणीं 'तारा' हा अर्थ आणि दुसऱ्या ठिकाणीं "विभाग

रंभ" असा अर्थ आपल्या सोईला येईल त्या प्रमाणें करणारा मनुष्य खरा शास्त्रसंशोधक नसून अप्रामाणिक आहे असें म्हटल्या शिवाय गत्यंतर उरणार नाहीं.

म्हणून वेदांगज्योतिषातील विभागारंभीं धनिष्ठा योगतारा होती असें जर मानावयाचें तर वेदांग ज्योतिषाचें-पेक्षांहि प्राचीन जें मैत्र्युपनिषत् त्यांत उल्लेखिलेला जो मघाविभाग त्याच्याहि आरंभीं मघा योगतारा होती असें मानलेंच पाहिजे. किंवा धनिष्ठा योगतारेंत जर उदगयनबिन्दू होता असें समजावयाचें, तर मघा योगतारेंतहि दक्षिणायन बिन्दू होता असें समजलेंच पाहिजे. अर्थात् धनिष्ठारंभावरून जसा आरंभस्थान निर्णय होईल तसातो मघारंभावरूनहि होईल; आणि वेदांग ज्योतिषोक्त आरंभस्थान जर आदरणीय, तर वेदांग ज्योतिषापेक्षाहि प्राचीन आणि प्रत्यक्ष श्रुति असें जें मैत्र्युपनिषत् त्यावरून निष्पन्न होणारें आरंभस्थान अत्यंत आदरणीय असलेंच पाहिजे. तेव्हां तैत्तिरीयसंहिता कालातील जे मैत्र्युपनिषत् त्यावरून कोणतें आरंभस्थान येतें तें पाहूं:

मघा योगतारेपासून संपातनिर्दिष्ट आरंभस्थान पश्चिमेस ९० अंश होतें
हल्लीं संपातबिंदु मघायोगतारेपासून पश्चिमेस १४८ अं. ५० कला आहे
अर्थात् संहिताकालीन आरंभस्थान प्रस्तुत संपातबिंदूचे पूर्वेस ५८ अं ५० कला येतें
म्हणजे मघाताऱ्याच्या पश्चिमेस ९० अंशावरील

### कृत्तिका योगतारा

हेंच संहिताकालीन आरंभस्थान होय असें निर्विवाद सिद्ध होतें.
तेव्हां ज्या पंचांगाचें आरंभस्थान कृत्तिकायोगतारेच्या भोगाशीं जुळेल तेंच पंचांग वेदविहित होय.
वरील विवेचनावरून ज्या मुख्य गोष्टी प्रस्थापित होतात त्या अशाः—

## वेदविहितपंचांगपद्धतींतील मुख्य गोष्टी.

१ वर्षाचे महिने बारा असून ते अमान्त किंवा पूर्णिमान्त चांद्रमानाचे असत.

२ चांद्र महिन्याचीं नावें तारात्मक नक्षत्रांवरून चैत्र, वैशाख, माघ, फाल्गुन इत्यादि पूर्वपद्धती-प्रमाणेंच देत असत.

३ वर्षारंभ मात्र प्रत्यक्ष उदगयन ज्या चांद्र महिन्यांत होईल, त्या महिन्याच्या आरंभापासून धरीत. त्याच्याहि पूर्वकालीं ज्या चांद्र महिन्यात रवि वसंतसंपातीं येई त्या महिन्यापासून वर्षारंभ धरीत असत.

४ चांद्र व सौर वर्षांचा मेळ पाच वर्षांत दोन अधिक चांद्र महिने धरून करीत.

५ तिथि मध्यममानाच्या असत.

६ पाच पांच वर्षांचा एकेक गट करून त्याला युग असें म्हणत. युगांतील पहिलें वर्ष 'संवत्सर' दुसरें परिवत्सर, तिसरें इदावत्सर, चौथें अनुवत्सर, आणि पांचवें इद्वत्सर. याप्रमाणें पांच वत्सरांचें एकेक युग मानीत असत.

७ नक्षत्रचक्राचे २७ विभाग समसमान करून त्या विभागासच नक्षत्राचें नांव असे. मात्र ठळक नक्षत्रांच्या योगतारा तरी आपआपल्या विभागांत येतील येवढी खबरदारी घेत. त्यामुळें प्रत्येक नक्षत्र-विभागाच्या आरंभीं तारा असेच, असे नाहीं. कारण प्रत्येक विभागारंभी तारा असणें अशक्य आहे.

८ नक्षत्रगणनेस आरंभ ज्या नक्षत्रापासून करावयाचा, त्या नक्षत्रविभागाच्या आरंभीं किंवा अंतीं तारा येईल अशा तऱ्हेनें विभागणी करीत.

९ विभागपद्धति प्रथम सुरू झाली तेव्हां, पूर्व बिंदूंत नक्षत्र पुंजाचा उदय होणें, किंवा, एखाद्या पुंजांतील प्रमुख तारेचा संबंध विषुववृत्तावरील पूर्वबिंदू अथवा वसंतसंपात ह्यांच्याशी येत असे.

१० याप्रमाणें प्रथम मृगादि गणना होती, नंतर रोहिण्यादि गणना असावयाची; पण कृत्तिका थेट पूर्व बिन्दूत उगवूं लागल्या त्यामुळें रोहिण्यादि गणनेस फारसा अवसर न मिळता कृत्तिकापुंज प्रमुख ठरून कृत्तिकायोग तारा नक्षत्राच्या आरंभीं मानली गेली. नंतर कृत्तिकेजवळ वसंतसपात आला. पण त्याच्या पूर्वीपासून कृत्तिकादि गणना चालू झाली होती.

११ तैत्तिरीय संहिताकालीं कृत्तिकादि गणना चालू होती, हें लो० टिळक, ज्यो० दीक्षित, इ० सर्व विद्वानाना मान्य आहे.

१२ तीच कृत्तिकादि गणना मैत्र्युपनिषत्कालीं आणि वेदांगज्योतिषकालींहि होती. अर्थात् जे नक्षत्र-विभाग उपनिषद कालीं व वेदांगकालीं प्रचारांत होते ते कृत्तिकायोगतारेपासून केले होते.

वरील बारा मुद्यांपैकीं प्रत्येक मुद्दा सर्वमान्य आहे. म्हणून हे मुद्दे वाचकानीं पक्के लक्षांत ठेवले म्हणजे शास्त्रशुद्ध पंचांगाचें स्वरूप कोणतें ह्याचा त्याना सहज उमज पडेल.

युरोपियन लोकानीं तारात्मक राशिचक्र ग्रीक लोकापासूनच घेतलें. त्या तारात्मक ग्रीकराशिचक्राचा आरंभ कोणता यांविषयीं लिहिताना रापेल ( Raphael ) ज्योतिषी लिहितो कीं, संपातबिंदु युरोपियन तारात्मक-राशिचक्राच्या आरंभापासून २२° पश्चिमेकडे आहे. अर्थात् २२–२३ अयनांश मानणें म्हणजे युरोपियन आरंभस्थानच घेणें होय. आपण युरोपियनाचे वेध घेतो, म्हणून त्यांचें आरंभस्थानही स्वीकारण्यास ज्याना हरकत वाटत नसेल, त्यानीं तें खुशाल घ्यावें. आमच्या सनातन वैदिक धर्मीयांना मात्र अशी गोष्ट सम्मत होणें शक्य नाहीं. सनातन-धर्मीयांना ग्रीक अथवा यवन आरंभस्थान सर्वथैव त्याज्य होय.

## मैत्र्युपनिषदांतील नक्षत्रविभाग.

वेदांगामध्यें जे नक्षत्रविभाग निर्दिष्ट आहेत ते वेदांगाचें वेळीं नव्यानेंच सुरू केले असा काहीं लोकाच्या म्हणण्याचा आशय दिसतो. वेदांगाच्या पूर्वी पांचशें वर्षें देखील नक्षत्रविभागपद्धति प्रचारांत होती हें मैत्र्युपनिषदावरून निर्विवाद सिद्ध होतें, आणि तें नाकबूल करतां येत नाहीं म्हणून ते अशी कल्पना लढवूं पाहत आहेत कीं, मैत्र्युपनिषत्कालीन विभागपद्धति आणि वेदांग–विभागपद्धति ह्या भिन्न होत. असें कोणींहि स्पष्टपणें अद्यापि म्हटलें नाहीं, परंतु अशा धोरणावर त्यांचें लिहिणें येतें. वेदांगामध्यें दक्षिणायनबिन्दु आश्लेषाविभागाच्या अर्ध्यावर होता असा उल्लेख आहे. पण मैत्र्युपनिषत्कालीं तोच बिन्दु मघाविभागाच्या आरंभीं म्हणजे वेदांगकालीन स्थानाच्या ( पूर्वेस ) ६° ४०′ इतका होता. ही स्थिति वेदांगाच्या पूर्वी ( ६° ४०′ × ७२ = ) ४८० वर्षें अस्तित्वात होती. वेदांगामध्यें जशी "श्रविष्ठादौ" आणि "सार्पार्धे" अशीं पदें आहेत, तशींच मैत्र्युपनिषदामध्येंहि "मघाद्यं" "श्रविष्ठार्धम्" अशीं पदें आहेत; म्हणून मैत्र्युपनिषत्कालीं देखील विभागपद्धतीच प्रचारात होती, ह्यांत बिलकुल संशय उरत नाहीं. आता मैत्र्युपनिषदांतील विभागपद्धतीचें आरंभस्थान कोठून मानलें होतें हा प्रश्न येतो. या बाबतींत पूर्वी सांगितलेच आहे कीं, विषुववृत्त पूर्व बिन्दु किंवा संपात, ह्यांचा संयोग नक्षत्रपुंजांतील एखाद्या प्रमुख तारेशीं होणें हें विभागपद्धतींतील आरंभस्थानाचें निमित्तकारण आहे, विभागपद्धति प्रथमच चालू झाली असल्यास तिच्या आरंभस्थानाचा निश्चय या कारणावाचून अन्य कारणानें होणें संभवनीयच नाहीं. परंतु जें आरंभस्थान विभागपद्धतीच्या प्रारंभीं एकदां निश्चित झालें असेल तें पुढें बदललें असेल असाहि पण संभव नाहीं. प्राचीन सूर्यसिद्धांतामध्यें निर्दिष्ट असलेलें आरंभस्थान वराहानें स्वीकारलें; ब्रह्मगुप्तासहि तेंच आरंभस्थान स्वीकारणें भाग पडलें, आणि वर्तमान सूर्यसिद्धांतामध्यें तेंच आरंभस्थान आहे. ह्यावरून आरंभस्थान किंवा नक्षत्रविभागांची मर्यादा बदलणें मोठमोठ्या विद्वान ज्योतिर्विदांनाहि शक्य नाहीं. म्हणूनच वेदांगज्योतिषाच्या वेळीं मैत्र्युपनिषदांत निर्दिष्ट केलेली मर्यादा बदलली असें कां मानावें ? आणि तसें मानलें तर वेदांग–विभाग–पद्धति ही पूर्वपरंपरेचा उच्छेद करणारी आणि म्हणूनच त्याज्य आहे असा आरोप तिच्यावर सहज घेता येतो. हा आरोप अनिष्ट आहे. म्हणून मैत्र्युपनिषदनिर्दिष्ट, वेदांगनिर्दिष्ट, आणि सूर्यसिद्धान्तनिर्दिष्ट अशा तीनही विभागमर्यादा एकच असल्या पाहिजेत, आणि त्या तशा वस्तुतः आहेत हेंच दाखविलें

पाहिजे. नुसतें " धनिष्ठा " धनिष्ठा " " वेदाग वेदाग " म्हटल्यानें कार्यसिद्धि होणार नाहीं. मूल आरंभस्थान कोणतें तें दाखवून तेंच या तीनही प्रथात आहे असें त्यानीं सिध्द केलेंच पाहिजे. परतु कृत्तिका-प्रयुक्त आरंभस्थान हें विभागपद्धतीप्रमाणें सर्वांत प्राचीन असल्यानें तेंच वेदागामध्यें विवक्षित आहे असें आम्ही दाखवितों.

आतापर्यंतच्या विवेचनावरून जे मुद्दे व्यक्त झाले आहेत ते असेः—

( १ ) धनिष्ठापुजातील योगतारा बीटा होय, आल्फा नव्हे.

( २ ) बीटा धनिष्ठा किंवा आल्फा धनिष्ठा ह्या तारेमध्यें कधीं तरी उदगयन झालेलें असलें तरी नक्षत्राचें विभाग तत्पूर्वीच ठरून गेले असल्यामुळें त्या तारा विभागारंभींच आहेत असें मानता येणार नाहीं.

( ३ ) वेदागापूर्वीच विभागपद्धति अस्तित्वात होती हें मैत्र्युपनिषदावरून सिद्ध होतें. तें कोणालाहि अमान्य करिता येणार नाहीं. आता चौथा मुद्दा असा प्रस्थापित होत आहे कीं, ( ४ ) वेदागापूर्वी अस्तित्वात असलेली विभागपद्धति वेदागकालीं बदलली असणें शक्य नाहीं. कारण त्यायोगानें परंपरोच्छेदाचा आरोप वेदागावर येतो.

हा आरोप टाळण्याकरिता ' नृसिंह ' ह्या सहीनें लेख लिहिणान्या गृहस्थानीं एक कोटि लढविली आहे. ' नृसिंह ' म्हणतात कीं, त्याच्या मताप्रमाणें ( आल्फा ) धनिष्ठा तारेपासून केलेला जो विभागारंभ म्हणजे धनिष्ठाविभागपद्धति तीच मैत्र्युपनिषदात विवक्षित आहे. हें नृसिंहाचें म्हणणें अत्यंत हास्यास्पद आहे. कारण वेदागापूर्वी ५०० वर्षांच्या मैत्र्युपनिषत्कालीं आल्फा तारेशीं उदगयनाचा अर्थाअर्थीही संबंध नव्हता अशा स्थितींत मैत्र्युपनिषत्कालीन विभाग आल्फा तारेपासून झालेले असणें शक्य नाहीं. त्या वेळीं उदगयन धनिष्ठाविभागाच्या मधोमध म्हणजे आल्फा तारेपासून फार दूर होते. त्या वेळीं दक्षिणायनबिन्दु मघा नक्षत्रविभागाच्या मात्र आरंभीं होता, परंतु त्या वेळीं विभागपद्धति प्रचलित होती, तर अशा पद्धतीला नक्षत्रविभागाचा आरंभ जसा सोईस्कर, तसा नक्षत्राचा मध्यभाग सोईस्कर नव्हे. आरंभ कोठूनहि ठरतो परंतु आरंभ ठरल्याशिवाय मात्र मध्य कोणता तें ठरणार नाहीं. पाचशें वर्षांनीं पुढें एखाद्या तारेमध्यें होणाऱ्या उदगयनावरून आज त्या अनुरोधानें आरंभस्थान ठरविणें हें उपहासास्पदच नव्हे तर अशक्य आहे. असें म्हणणें म्हणजे मुलानें बापाला जन्म दिला, किंवा शाकरभ प्यावरून गीता रचली गेली, किंवा गीतेवरून उपनिषदें लिहिलीं असें म्हणण्याइतकें वेडेपणाचें आहे. अर्थात् मैत्र्युपनिषदातील विभागपद्धतीचा धनिष्ठाविभागाशीं जो संबंध आहे तो पिता-पुत्र असा आहे. म्हणून वेदागांतील विभाग धनिष्ठेवरून ठरले नसून ते मैत्र्युपनिषत्कालींच ठरलेले होते. आणि त्यातील मघारंभावरूनच वेदांगातील धनिष्ठारंभ निश्चित केला गेला होता.

वरील विचारसरणी " नृसिंहा " च्या मुळींच लक्षात आली नाहीं. त्यांनीं लो. टिळक याच्या Vedic Calendar ह्या भागातील एक उतारा दिला आणि त्याच्यापासून मन मानेल तसे तर्क चालविलें. तो उतारा असाः—

" It is expressly stated that the winter solstice in those days occurred when the Sun, the Moon, and the *Asterism* of Dhanistha were together; and *this Nakshatra* is therefore taken as the first point of the celestial sphere which is siderial and not Tropical in character. Starting from this *First Point* the zodiac is divided into 27 equal parts." (p 23.)——For this purpose we may well make the *Vedanga—Jyotisha* as our *starting Point* and see what elements of the system contained therein are found in the older Vedic works

S. B Dixit has shown that in the Brahmana period of the Vadic literature the nature of the Calendar was *substantially the same*;——with this difference that whereas Dhanistha is the first in the Vedanga—Jyotisha, the (Nakshatra) series in the Brahmana and the Samhitas always begins with the *Krittikas.*"

ता. २०।१०।१२ (Incomplete)

लोकमान्यांच्या वरील उताऱ्याचा आशय असा आहे कीं, "सूर्य, चंद्र आणि धनिष्ठापुंज हे सर्व एकत्र होते. अशा वेळीं उदगयन झालें, असा स्पष्ट निर्देश आहे, म्हणून हें धनिष्ठा नक्षत्र ज्योतिषचक्राचा आरंभ ( Starting Point ) मानिला आहे, अर्थात् नक्षत्रचक्र हें तारात्मक आहे, संपातानुवर्ती नव्हे, आणि ह्या नक्षत्रापासून आरंभ करून राशिचक्राचे २७ सारखे विभाग केलेले आहेत . म्हणून वेदांग ज्योतिष हें आमच्या संशोधनाचा आरंभ ( Starting Point ) मानून त्यातील कोणकोणतीं तत्त्वें जुन्या वैदिक ग्रंथात उपलब्ध होतात तें आपणास पाहिलें पाहिजे परंतु हें कार्य ज्यो श बा दीक्षित यानीं केलेंच आहे. त्यांनीं असें दाखविलें आहे कीं, वैदिकवाङ्मयकालातील ब्राह्मण ग्रंथकालीं पंचांगाचें स्वरूप तत्त्वत तेंच होतें. फरक इतकाच कीं, वेदांग-ज्योतिषामध्यें गणना जी धनिष्ठादि आहे ती ब्राह्मण आणि संहिता कालीं नेहमीं कृत्तिकादि असे " ( अपूर्ण )

मडाले ( ता. ३० आक्टोबर १९१३ )
लोकमान्याच्या उताऱ्याचा आशय वरीलप्रमाणें आहे.

ह्या उतारा वरवर वाचणाराच्याहि सहज लक्षात येईल कीं, तो केतकीपक्षाला बिलकुल अनुकूल नाहीं केतकीपक्षीय 'नृसिंह' हे first Point ह्या शब्दानेच फसले आहेत वरील उताऱ्यातील first point ह्या शब्दाचा खरा अर्थ त्याच्या लक्षात मुळींच आला नाहीं point ह्याचा अर्थ ते लहानपणीं घोकल्याप्रमाणें "बिंदु" असा समजले परंतु ह्या ठिकाणीं point ह्या शब्दाचा "बिंदु" असा अर्थ मुळींच होत नाहीं. लोकमान्यानीं धनिष्ठा योगतारा असा जर निर्देश केला असता तर "बिंदु" हा अर्थ तेथें योग्य दिसला असता परंतु धनिष्ठा योगतारा असे शब्द तेथें नसून धनिष्ठापुंज ( म्हणजे अनेक ताराचा समूह ) असे शब्द आहेत सर्वच पुंज बिंदु होऊ शकणार नाहींत हें उघड आहे. म्हणून विशिष्ट तारेचा उल्लेख न करता "पुंज" असें सामान्यत च म्हटलें. कारण, अमुकच तारेपासून धनिष्ठाविभाग सुरू झाला असें निश्चित विधान लोकमान्याना करावयाचें नव्हतें व प्रसंगहि निश्चित विधान केलेंच पाहिजे असा नव्हता. म्हणून त्या ठिकाणीं point ह्या शब्दाचा अर्थ "बिंदु" असा होणें शक्य नाहीं. तेथें त्याचा अर्थ सामान्यत "आरंभ" असाच केला पाहिजे ह्याच उताऱ्यात लोकमान्यानीं "वेदांगा" लाहि Starting point असें म्हटलें आहे, मग "नृसिंहाच्या" कोटिक्रमाप्रमाणें वेदांगालाहि "आरंभबिंदु" म्हणावें लागेल ! वेदांगासारख्या ग्रंथाला आरंभबिंदु म्हणणें हें कोणालाहि हास्यापद दिसेल आणि म्हणूनच वेदांगग्रंथा संबधानें जसा point ह्या शब्दाचा अर्थ लाक्षणिक केला पाहिजे, तसाच तो नक्षत्र "पुंजा" संबधानेंहि लाक्षणिकच केला पाहिजे

"नृसिंहा"चा उद्देश असा दिसतो कीं, धनिष्ठापुंजातील योगतारेपासून वेदांगकालीं विभागारंभ काढिले असा अर्थ लोकमान्यांच्या वरील उताऱ्यातून कसा तरी ओढूनताणून काढून लोकांना उगाच भ्रम पाडावा, परंतु संबध नक्षत्रपुंजालाच First point म्हटल्यानें ह्या भ्रमाला जागाच राहत नाहीं धनिष्ठा पुंजामध्यें निदान पाच तारा तरी आहेत त्या सर्वच आरंभस्थानीं संभवतील किंवा आरंभस्थानाजवळ असू शकतील हें दाखविण्याकरिताच विशिष्ट तारेचा निर्देश न करतां, पुंज हा सामान्य शब्द लोकमान्यांनीं वापरला आहे एरवीं पुंज शब्द घालण्याचें कांहींएक कारण नाहीं शिवाय असें कीं, वरील उतारा 'अपूर्ण' असून तो मडाले येथें १९१३ मध्यें लिहिला गेला त्यानंतर दोन वर्षानीं १९१५ मध्यें प्रख्यात 'गीतारहस्य' प्रसिद्ध झालें, त्यांतहि वेदांगांतील विभागारंभाचा निर्देश अनिश्चितच आहे ( पान ५४७ मध्यें ) लोकमान्य लिहितात कीं, 'वेदांगज्योतिषांतील उदगयनस्थिति इसवी सनापूर्वी सुमारें १२०० किंवा १४०० वर्षांची आहे असें ज्योतिर्गणितावरून सिद्ध होतें ' ह्यावरून लोकमान्यांचे मत धनिष्ठाविभागाचा आरंभ अमुक एका तारेजवळ आहे अशा निश्चित स्वरूपाचें नव्हतें तसें असतें तर वरील उल्लेखामध्यें जो कालनिर्णय आहे तो त्यानीं निश्चितच दिला असता कारण अमुक तारे-जवळ उदगयन आणि विभागारंभ आहे हें निश्चित ठरल्यावर मग कालनिर्णय संदिग्ध कसा राहील ! अर्थात्

गीतारहस्याच्या पुराव्यावरून तर असें खात्रीनें म्हणतां येते कीं, धनिष्ठापुंजातील एकाद्या विशिष्ट तारेपासूनच वेदांगकाली विभागारंभ होत होता अशा प्रकारचें त्यांचें मत ठाम बनलें नव्हतें. व म्हणूनच वरील उताऱ्यामध्यें 'पुंज' असा मोघम शब्द त्यांनीं वापरला आहे व काल निर्णय मोघमच सांगितला आहे.

अर्थात् लोकमान्यांच्या Vedic Calendar मधील उतारा केतकीपक्षास अनुकूल तर नाहींच पण प्रतिकूल मात्र आहे, आणि त्यावरून पुढील अनुमानें स्पष्टपणें निघतातः--

१ धनिष्ठाविभागारंभ अमुक एका तारेजवळ आहे. असें लोकमान्यांच ठाम मत नव्हतें.

२ वेदांगकालीं जी विभागपद्धति होती तीच तत्त्वतः तैत्तिरीय संहिताकालींहि होती.

३ म्हणजे लोकमान्यांच्या मताप्रमाणें संहिताकालीं देखील विभागपद्धति प्रचलित असून विभागारंभ कृत्तिकेपासून होता. त्यावरून हें सहज सिद्ध होतें कीं संहिताकालानंतरचें जें मैत्र्युपनिषत् त्यात जी विभागपद्धति आहे तीहि कृत्तिकादिच असली पाहिजे; आणि धनिष्ठेपेक्षां कृत्तिकादि विभागगणना हीच अधिक प्राचीन असल्यामुळें सर्वांस अत्यंत आदरणीय असली पाहिजे.

वरील अनुमानें केवळ लोकमान्यांच्याच ग्रंथावरून निघतात असें नसून ज्योतिषशास्त्रदृष्टयाहि तींच अनुमानें निघतात तरी तीं कशीं सत्य आहेत तें दाखवितों.

मैत्र्युपनिषदात जी अयनस्थिति वर्णिली आहे तिच्यावरून मघाविभागाचा आरंभ कोणत्या ठिकाणीं असण्याचा संभव आहे हें पाहिलें पाहिजे. मघा नक्षत्राचे अधिष्ठाते पितर आहेत असें वचन तैत्तिरीय श्रुतीमध्यें आहे.

"उपहूताः पितरो ये मघासु मनोजवसः सुकृतः सुकृत्यः ते नो नक्षत्रे हवमा--गमिष्ठाः । स्वधाभिर्यज्ञ प्रयतं जुषंताम्"

दक्षिणायन बिंदु ज्या नक्षत्र पुंजामध्यें असतो ते पितृनक्षत्र असतें असें ओरायन ह्या ग्रंथामध्यें लोकमान्यांनीं सिद्ध केलें आहे. (ओरायन पृ. ५५)

यावरून तैत्तिरीय श्रुतिकालींहि दक्षिणायन-बिन्दु मघापुंजामध्यें होता हें सिद्ध होतें. तो बिन्दु मैत्र्युपनिषत्कालीं मघाविभागाच्या आरंभीं येण्यापर्यंत पश्चिमेकडे हटला. मैत्र्युपनिषत्काल हा लोकमान्याच्या मताप्रमाणेंहि निश्चित नव्हता; त्याचा काल गीतारहस्यांत (पान ५४७) लोकमान्यांनीं केवळ स्थूलमानानेंच इ. स. पूर्वी १६८० ते १८८० पर्यंत असा अनिश्चित दिला आहे. ह्यावरून तीन अंशांचा जो फरक पडतो तो कमींत कमी किती पडेल तें दर्शविणारें अनुमान आपणास काढलें पाहिजे.

मघाविभागाचा आरंभ पश्चिमेकडे व शेवट पूर्वेकडे होतो हें सर्वांना मान्यच आहे. म्हणून मघापुंजामध्यें जितक्या ठळक तारा असतील तितक्या सर्व विभागाच्या आंत समाविष्ट होतील अशा रीतीनें विभागाचा आरंभ ठरविला पाहिजे. अर्थात् मघापुंजामध्यें ठळक तारा किती, आणि त्या सर्वच तारा विभागमर्यादेमध्यें समाविष्ट केल्या पाहिजेत कीं काय असे दोन प्रश्न उपस्थित होतात. दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर "अस्ति" पक्षींच दिलें पाहिजे. कारण सूर्यसिद्धान्ताप्रमाणें मघा योगतारा विभागमर्यादेपासून ९ अंश पूर्वेस आहे. आणि सुदैवाची गोष्ट अशी कीं, मघा योगतारेचा शर शून्य म्हणजे अल्पकलात्मक असल्यानें ध्रुवाभिमुख आणि कदंबाभिमुख हे दोनहि प्रकारचे भोग जवळ जवळ सारखेच येतात. वराहमिहिरोक्त मूळ सूर्यसिद्धांतामध्यें मघा तारेचे भोग दिले आहेत. परंतु तो मूळ ग्रंथांतील मघाविषयक श्लोक अशुद्ध असल्यानें त्यांतील खऱ्या पाठाचा निश्चय होत नाहीं. वराहोक्त श्लोकांचा पाठ पित्र्यस्य स्वर्क्षे स्वाष्टे (चांद्रे) समायोगः असाहि कोणी करितात. स्वाष्टे ह्याचा अर्थ विभागाचा आठवा अंश घतला तरीहि हरकत नाहीं. कोणताहि पाठ घेतला तरी एप्सायलॉन्, थीटा, ग्यामा, ईटा आणि आल्फा ह्या पांच तारा मघा विभागांत अन्तर्भूत झाल्या पाहिजेत. म्हणजे एकंदरींत मघा योगतारेच्या पश्चिमेस ८।९ अंशांच्या आंत जितक्या ठळक तारा येतील तितक्यांचा समावेश मघापुंजामध्यें केलाच पाहिजे असें स्पष्ट होतें.

आतां पहिला प्रश्न मघापुंजामध्यें ठळक तारा किती त्याचा निर्णय करूं. ज्यो. दीक्षित लिहितात 'मघाच्या तारा कोणी ५ व कोणी ६ मानतात.' म्हणून तारा ५ मानाव्या किंवा ६ मानाव्या असा उपप्रश्न पुनः उत्पन्न होतो. त्यासाठीं मघापुंजाचा आलेख ( नकाशा ) दिला आहे त्यावरून मघापुंजामध्यें तारा किती घ्याव्या त्याचा सहज निर्णय होईल. आलेखाच्यासालीं तारांच्या चकाकीची वर्गवारी दिली आहे. त्यावरून पुंजामध्यें सहा तारांचा अन्तर्भाव करण्यास कांहींच हरकत नाहीं. आतां पांच तारा जर मानावयाच्या तर एक तारा वगळावी लागेल, आणि ती कोणती असाहि प्रश्न पडेल. परंतु मघापुंजाच्या आकृतीचें वर्णन जें ग्रंथामध्यें आहे त्यावरून पुंजामध्यें सहा तारांचा समावेश केला आहे असें दिसतें. "ज्योतिर्निबन्ध" हा ग्रंथ आनंदाश्रम पुस्तकावलीमध्यें छापला आहे. त्यांत नक्षत्रप्रकरणीं श्रीपति ह्याच्या वचनाचा उल्लेख आहे. तो उल्लेख असाः—

"मणि–गृह–शर+चक्रामानि–शालोपमं भम्" ह्या उल्लेखामध्यें मघापुंजाची आकृति शालेप्रमाणें म्हणजे चतुष्कोणी गृहाप्रमाणें आहे असें वर्णन आहे. अशी आकृति एप्सायलॉन तारेचा समावेश पुंजामध्यें केल्याशिवाय बरोबर जमत नाहीं हें नकाशावरून वाचकांच्या सहज लक्षांत येईल. परंतु वराहमिहिराच्या "बृहत्संहिते"त मघाच्या पांचच तारा सांगितल्या आहेत. म्हणून पाच तारांशीं ह्यांचा मेळ जर घालावयाचा असेल तर म्यू सोडून दिल्यास चालेल पण एप्सायलॉन ही म्यूपेक्षां तेजस्वी असल्यानें ती वगळणें शक्य नाहीं. म्हणून एप्सायलॉन तारे जवळच मघाविभागाचा आरंभ होता असें समजलेंच पाहिजे हें एक अनुमान; व मघाविभागारंभाजवळ जी तारा आपण निश्चित करूं त्या तारेसंनिध मैत्र्युपनिषदुक्त दक्षिणायन होत होतें त्यावरून विभागाची मर्यादा ठरविणें हें दुसरें अनुमान; याप्रमाणें दोनहि अनुमानांचा मेळ घालून मग जर विभाग–मर्यादा निश्चित केली तर ती विनचूक आणि सूक्ष्म येईल. म्हणून प्रथम एप्सायलॉनचे शके १८५० ह्या वर्षारंभाचे स्पष्ट सायनभोग काढूं.

शके १८५० च्या आरंभींचे विषुवांश व क्रांतिः—
विषुवांश = १४५° ३०′ क्रांति = + २४° ६′
विषुवांशांचा पूरक–कोन ३४° ३०′
ला. को–भु. ३४° ३०′ = ९·९१६५९९४
ला. को–भु. क्रांति = ९·९६०३९२

ला.को–भु.कर्ण ४१° १३′ = ९·८७६३८६

ला. स्प. ३४° ३०′ = ९·८३७१३४
ला. को. स्प. कर्ण = १०·०५७५२२

को–भु.क्रांतिभुज ३८° १९′= ९·८९४६५२
क्रांतिभुज–कोन = ३८° १९′
—( उणे ) परम क्रांति २३° २७′

शराभिमुख कोन = १४° ५२′
ला. को–भु. शर. कोन = ९·९८५२११
ला. कास्पे. कर्ण = १०·०५७५२२

स्पष्ट. भोग–पूरक ४०° १५′= ९·९२७६११
एप्सायलॉनचा स्पष्ट सायनभोग=( १८०–४०° १५′)
= १३९° ४५′

म्हणजे वर दर्शविलेल्या पहिल्या अनुमानानुरूप विभागारंभ स्थूलमानानें निश्चित होईल व कसर आहे ती काढून टाकिली असतां अपनाश बरोबर येईल.

मघाविभागारंभभोग ( शके १८५० ) १३९° उणे कृत्तिका सायनभोग ५८° ५९′ = ८०°१′ म्हणजे मघाविभाग कृत्तिका योगतारेपासून बरोबर सहा नक्षत्राइतक्या अंतरावर येतो म्हणून मैत्र्युपनिषन्निर्दिष्ट मघाविभागारंभ कृत्तिका योगतारेपासूनच मोजला होता. आणि गणनाहि कृत्तिकादिच होती असें सिद्ध होतें.

याचप्रमाणें "म्यू." तारेचे शके १८५० चे विषुवांश १४७° १५′, व क्रांति + २६° २१′ इतकी आहे त्यावरून वरील गणितपद्धतीनें "म्यू."चा सायनभोग ( शके १८५०चा ) १४०° १०′ इतका येतो. ह्याहि भोगावरून मघाविभागारंभ कसा निश्चित होतो त्याचा विचार करूं.

## आक्षेप निरसन.

मैत्र्युपनिषत्कालीं दक्षिणायन बिन्दू मघारंभीं आणि उदगयन बिन्दू धनिष्ठा विभागाच्या मध्यभागीं अशी स्थिति होती. मैत्र्युपनिषत् कालीं मघायोगतारा मघाविभागारंभीं होता असा जर "मघाद्यं" या पदाचा अर्थ केला तर संपातबिन्दु कृत्तिकायोगतारेमध्यें येतो याबद्दलचें गणित वर दाखविलें आहे. तेव्हां मैत्र्युपनिषत् हा ग्रंथ कृत्तिका गणना कालीन आहे ह्याबद्दल शंकाच उरत नाहीं. परंतु मघा योगतारा मघाविभागाच्या आरंभीं नसून विभागाच्या आत होता असें मानून "मघाद्यं" याचा अर्थ केवळ "मघा विभागाचा आरंभ" असा केला तरीही प्रत्यवाय नाहीं. परंतु मग मघाविभागाचा आरंभ, किंवा तदनुरोधानें अश्विन्यादि नक्षत्र विभागाचा आरंभ त्या त्या नक्षत्राच्या योगतारेपासून किती अंतरावर येतो हें पाहिलें पाहिजे.

ह्याचा विचार करतांना वेदांगज्योतिषावर गर्गाचार्यांनीं ज्या कारिका लिहिल्या आहेत त्याचा अत्यंत उपयोग आहे. कारण त्या कारिकांवरून वेदांगज्योतिषकालीन नक्षत्रचक्राचें आरंभस्थान देखील कृत्तिकानक्षत्राची योगतारा हेंच होतें असेंच पुनः सिद्ध होतें.

गर्गाचार्यांच्या कारिकांत चन्द्राची युति सांगितली आहे. त्यामुळें अयनें आणि विषुवें हीं एकमेकांपासून किती दिवसांच्या अंतरावर होतीं ह्या प्रश्नाला अतिशय महत्त्व आहे. परंतु येथें केतकरांनीं असत्याचाच आश्रय केला आहे. ते म्हणतात कीं, अयनें हीं एकमेकांपासून हल्लींच्या सायन वर्षमानाच्या "अर्धा" इतक्या अंतरावर म्हणजे १८२ दिवस ३७ घ. आणि १५ पळें इतक्या अंतरावर होतीं परंतु हें विधान

निखालस खोटें आहे

याविषयीं कै० ज्यो० दीक्षित यांचीच साक्ष आम्ही देतों. ज्यो० दीक्षित लिहितातः—

"मध्यम गतीमुळें वेदांगज्योतिषांतील अयनें आणि विषुवें हीं परस्परांपासून १८३ दिवसांच्या अंतरावर आलीं आहेत. परंतु इ. स पूर्वी १४०० सुमारास तीं पुढील अंतरानें होत असत."

| | |
|---|---|
| उदगयनापासून दक्षिणायनापर्यंत | १८५ दिवस १० घटका |
| दक्षिणायनापासून उदगयनापर्यंत | १८० दिवस ५ घटका |
| एकूण | ३६५ दिवस १५ घटका |

कै० दीक्षितांच्या ग्रंथांतील उतारा याप्रमाणें आहे. याचा अर्थ असा कीं, गर्गानें चंद्राची स्थिति त्याच्या मध्यम गतीनें वर्णन केली. कारण वेदांग ज्योतिषांत मध्यममानच दिलेलें आहे. म्हणून अर्थ

वर्षाचें मान १८३ दिवसच धरले पाहिजे. असा ज्यो० दिक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे. आता कोणी म्हणेल कीं, १८२ दिवस ३७ घटका, आणि १८३ दिवस यांत कितीसे अंतर आहे? तर याचें उत्तर असें कीं आरंभस्थानाचा वाद चार अंशाचाच आहे. आणि चन्द्र गतीमध्यें १७ घटकांतहि चार अंश अंतर पडतें म्हणून १८२ दिवस ३७ घटका १५ पळें आणि १८३ दिवस यांतील जें २२।२३ घटकांचें अंतर आहे त्याला फारच महत्त्व येतें. म्हणूनच केतकरानीं जी लटपट केली आहे, त्या बेजबाबदार लटपटीच्या चिंधड्या उडविणें भाग पडलें आहे. म्हणून पुढील विवेचनात दक्षिणायन आणि उदगयन यांच्यामधील अंतर सांगितलें असेल तेव्हां तें अंतर १८३ दिवस मानून त्या अनुरोधानें चन्द्रगति मध्यम मानानें ६ चक्रें-२५१ अंश-१७ कला इतकी मानलीच पाहिजे. त्यापेक्षा कमी मानून चालणार नाही.

आता मैत्र्युपनिषत्कालीं ज्याप्रमाणें अयनें, विषुवें किंवा रविचंद्र यांची नक्षत्रासंबधानें स्थिति विभागात्मक पद्धतीनें सांगितली असल्याचें सिद्ध होतें तशीच वेदांग ज्योतिषांतील उदगयनाची स्थितिहि नक्षत्रासंबधानें विभागात्मक पद्धतीनेंच सांगितली असल्याचें स्पष्ट झालें आहे. परंतु येथें धनिष्ठा नक्षत्राची योगतारा तरी धनिष्ठा विभागाचे आरंभीं होती कीं काय असा एक संशय उपस्थित होतो. या संशयाचें निराकरण जें एक उत्तम साधन उपलब्ध आहे तें साधन गर्गाचार्यकृत वेदांगज्योतिषकारिका हें होय. त्या कारिकांत वेदांग ज्योतिषांतील वचनाची फोड उत्कृष्ट रीतीनें केलेली आहे. त्या कारिकांत गर्गानीं निरनिराळ्या वेळची चन्द्रतारायुति वेदांगज्योतिष पद्धतीप्रमाणें मध्यम गणितानें सांगितली आहे. त्यावरून धनिष्ठा योगतारा धनिष्ठा नक्षत्र विभागाच्या आरंभीं नसून आरंभ मर्यादेच्या पुढें सुमारें

तीन अंशावर होती

असें निर्विवाद सिद्ध होतें. म्हणून त्या कारिका अत्यंत महत्त्वाच्या आहेत. त्या कारिकांत उदगयनारंभ, दक्षिणायनारंभ, रविनक्षत्र, तिथि आणि चन्द्रतारायुति यांच्या वेळा दिलेल्या आहेत त्यावरून एक निर्विवाद अनुमान निघतें. तें अनुमान कोणतें हें कारिका प्रथम देऊन नंतर सांगतों.

यदा माघस्य शुक्लस्य प्रतिपद्युत्तरायणम् ।
सहोदयं श्रविष्ठाभिः सोमार्कौ प्रतिपद्यतः ॥
तदात्र नभसः शुक्लसप्तम्यां दक्षिणायनम् ।
सार्पार्द्धे कुरुते युक्तिं चित्रायां च निशाकरे ॥

" माघ शुक्ल प्रतिपदेच्या दिवशीं जेव्हां उदगयन सुरू होतें तेव्हां धनिष्ठा नक्षत्राबरोबर रविचन्द्र उदय पावतात " आणि जेव्हां श्रावण शुक्ल सप्तमीचे दिवशीं आश्लेषाच्या अर्धावर रवि असताना दक्षिणायन सुरू होतें त्या दिवशीं चन्द्राची चित्रा तारेशीं युति होते. " असा या कारिकाचा अर्थ आहे. यांत धनिष्ठा नक्षत्र तारात्मक किंवा विभागात्मक असा प्रश्न उपस्थित होत नाहीं. कारण नक्षत्र विभागात्मक असलें तरी त्यांत तारका पुंज आणि योगतारा असतातच. तेव्हां श्रविष्ठाभि. असें जें पद आहे त्यानें विलक्षण उलथापालथ होतें असें समजण्याचें मुळींच कारण नाहीं. धनिष्ठेचा योगतारा हा धनिष्ठा विभागारंभीं होता कीं काय इतकाच येथें प्रश्न आहे. रविचंद्र हे जेव्हां एकदम उदय पावतात तेव्हां चंद्र किंवा कोणतीहि तारा जर दिसत नाहीं तर धनिष्ठासह रविचन्द्र उदय पावतात हें वाक्य कधींहि प्रत्यक्ष वेधानें सिद्ध होऊं शकणार नाहीं. म्हणून तें अनुमानावरच आधारलेलें आहे असें मानलें पाहिजे. चित्रा चंद्रयुति ही गोष्ट दृक्प्रत्ययाची आहे म्हणून याच गोष्टीला ज्यास्त महत्त्व दिलें पाहिजे. याप्रमाणें पाहता पुढील स्थिति दिसून येते. धनिष्ठा विभागारंभापासून शततारका, पूर्वाभाद्रपदा इत्यादि अनुलोम क्रमानें चित्रा विभागारंभ २४० अंश आहे आणि रविचंद्र हे उदगयन बिन्दूच्या आरंभीं आहेत हीहि गोष्ट निश्चित आहे. आणि रवि आश्लेषार्धावर पोंचला त्या दिवशीं म्हणजे उदगयनारंभापासून १८३ दिवसांत चंद्राची सहा चक्रें अथवा फेरे पुरे होऊन उदगयन बिन्दूपासून त्याच्या सातव्या फेऱ्यास आरंभ होऊन त्याचें २५१ अंश इतकें अंतर तो चालून गेला आणि चित्रा तारेशीं त्याची युति झाली. त्यामुळें पुढील गोष्टी अगदीं निश्चित ठरतात.

( १ ) धनिष्ठारंभ आणि उदगयन बिन्दु यांचें ऐक्य.

( २ ) उदगयनापासून दक्षिणायनारंभाचा काल मध्यम मानानें १८३ दिवस.

( ३ ) चंद्राची १८३ दिवसातील धनिष्ठारंभापासून गति; ६ चक्रें आणि २५१ अंश.

( ४ ) धनिष्ठा योगतारा आणि चित्रा तारा यांच्यातील अंतर जर २५१ अंशाइतकें असलें तरच धनिष्ठारंभ आणि धनिष्ठा योगतारा हें एक होऊं शकतील. धनिष्ठा योगतारा आल्फा डेल्फिनी आणि चित्रा यांच्यांतील अंतर २४७ अंश आहे. आणि चंद्राची स्थिति धनिष्ठा विभागारंभापासून २५१ अंश इतकी आहे. अर्थात् धनिष्ठा विभागारंभ धनिष्ठा योगतारा आल्फा डेल्फिनी हिच्यामागें ४ अंशावर येतो. म्हणून धनिष्ठारंभ हा वेदांगकालींहि विभागात्मकच होता हें अगदीं स्वतंत्र प्रमाणानें आणि पूर्ण निर्णायक रीतीनें सिद्ध झालें. आणि म्हणून धनिष्ठा विभागारंभापासून योगतारेचें अंतर ४ अंश+१८० अंशावरील दक्षिणायन बिन्दू + अश्विन्यादि आरंभस्थानापासून आश्लेषार्धापर्यंतचें विभागात्मक अंतर ११३° २० कला =२९७° २० कला इतका धनिष्ठेचा निरयन भोग वेदांगज्योतिषाप्रमाणें येतो. तोच रैवत भोगाशीं तंतोतंत जमतो तेव्हां रैवत पक्षानें स्वीकारलेलें आरंभस्थान हेंच खरें आरंभस्थान होय हें सिद्ध झालें.

# वराहमिहिराचे परिश्रम.

वैदिक काळाच्या पुष्कळ ज्योतिषविषयक दुर्बोध गोष्टींचा उलगडा अगदीं अलीकडे वैदिक वाङ्मयाच्या अभ्यासानें थोडा थोडा होऊं लागला आहे. अशा तऱ्हेची परिस्थिति अनेक कारणामुळें शालिवाहन शकाच्या पांचव्या शतकारंभीं म्हणजे वराहमिहिराचार्यांच्या वेळीं नव्हती.त्यावेळीं वैदिक पंचांगपरंपरा बहुतेक लुप्त झाली होती. बौद्ध धर्माच्या वावटळींतून वैदिक धर्म नुकताच पुनरुज्जीवित झालेला होता, आणि नवीन पद्धतीचें पंचांगहि प्रचारांत आणल्याशिवाय अन्यगति नव्हती. कारण वैदिक पंचांगपद्धतीचें मर्म फारच थोड्यांना अवगत होतें. अशा वेळीं सूर्यसिद्धांत हा जो ग्रंथ प्रचारांत होता त्यांतील अश्विन्यादि आरंभस्थानाचा, जुन्या वैदिक आरंभस्थानाशीं मेळ घालण्याचा प्रथम प्रयत्न झाला. परंतु बृहत्संहितेच्या वेळेपर्यंत कृत्तिकादि गणना अगदींच लुप्त झाली नव्हती, आणि सिद्धांताचें आरंभस्थान जुन्या वैदिक आरंभस्थानाशीं निगडित झालें नव्हतें. ही कामगिरी वराहमिहिरानें जुन्या सूर्यसिद्धांताचे क्षेपक आणि भगण कृत्तिकारंभ स्थानाशीं पूर्णपणें अनुरूप करून केली. म्हणजे अश्विन्यादि आरंभस्थान कृत्तिकादि पुरातन आरंभस्थानाशीं सुसंगत होईल अशा तऱ्हेनें आरंभवर्ष प्रथम वराहाचार्यानें निश्चित केलें. तेंच शून्यायनांश वर्ष होय हें काल्पनिक गणितावरून ठरलें नाहीं तें परंपरेवरून ठरवलें गेलें आहे. जुनें आरंभस्थान आणि अश्विन्यादि आरंभ यांचा मेळ वराहानें कसा घातला हा शोध प्रो० सार्देक यांनीं लावला आहे. शालिवाहनशकाचीं वर्षे जुन्या वेदांगज्योतिषाच्या युगपद्धतीशीं जुळती करण्याचा नियम प्रथम वराहाचार्यानें बसविला. आणि सिद्धांतपद्धति आणि वेदांगज्योतिषपद्धति यांचा बेमालूम सांधा जुळवून दिला. प्रगति आणि परंपरा यांचा मेळ घालण्याचा समंजसपणाचा जो मार्ग तो हाच.

वराहमिहिरानें, शालिवाहनशकाच्या वर्षाचें नांव वेदांगज्योतिषाच्या युगपद्धतीस अनुसरून कोणतें येतें तें काढण्याची रीति एका श्लोकांत वर्णिली आहे. त्यामुळें पंचांग वैदिक पद्धतीस अनुसरून कोणतें तें समजण्यास उत्कृष्ट साधन झालें आहे. केतकी पंचांगाचा रवि-वेदांगज्योतिष पद्धतीनें काढलेल्या रवीशीं जुळत नाहीं असें पाहून केतकरांनीं वराहाचा श्लोकच फिरवून त्यांत आपल्याच पदरचा मनसोक्त पाठ घुसडून दिला. जुन्या निर्दोष आधारभूत श्लोकांत आपणच बदल करून तो बदललेला पाठ लोकांना खरा म्हणून भासविण्याची कृति अत्यंत निषेधार्ह आहे. वराहमिहिरासारख्या अग्रमान्य ज्योतिषाचार्यांच्या रीतीला अनुसरून टिळकपंचांग आहे आणि म्हणून तेंच खरें वैदिक पंचांग होय.

वराहाचार्यांचा मूळ श्लोक असा:—

व्यूनं शकेन्द्रकालं पंचभिरुध्दस्य शेषवर्षाणाम् ।
युगणं माघसिताद्यं कुर्यात् युगणस्तदन्ह्युदयात् ॥

अर्थः—शककालांत दोन उणे करून बाकीला पांचांनीं भागावें आणि भागाकाराची जी बाकी राहील तो आंकडा युगात्मक वर्षाच्या नांवाचा दर्शक असतो. शून्य म्हणजे संवत्सर; १ परिवत्सर, २ इदावत्सर, ३ अनुवत्सर आणि ४ इद्वत्सर याप्रमाणें भागाकारशेषावरून वर्षाचें नांव ठरवावें. हें नांव चालू वर्षाच्या पौषअमावास्येपर्यंतच राहतें. कारण माघापासून वेदांगपद्धतीनें नवें वर्ष सुरू होतें. या संबंधीं विस्तृत विवेचन ग्वाल्हेरचे प्रि० गोविंदराव आपटे यांनींहि केलें आहे.

वेदांगज्योतिष पद्धतीच्या पंचांगसंबंधानें कै. व्यं. बा. केतकर यांनीं " चित्रमय जगत् " मध्यें कांहीं वर्षांपूर्वी दोन लेख प्रसिद्ध केले होते. त्याचें खण्डन श्रीमंत पंतप्रतिनिधी यांचे अध्यक्षतेखालीं पुणें येथें भरलेल्या सभेंत रैवतपक्षाकडून केतकर यांचे समक्ष करण्यांत आलें. " चित्रमयजगत् " मधील लेखांत " द्व्यूनं शकेन्द्र कालम् " या श्लोकाबद्दल एक निराळाच चुकीचा पाठ देण्याचें धाष्टर्य केतकर यांनीं केलें. त्याचें कारण हेंच दिसतें कीं, केतकर यांना द्व्यूनं या श्लोकाचा वास्तविक अर्थ कळलाच नाहीं. अशा रीतीनें निराधार पाठभेद करून वेदांगपद्धति ही आपल्या पक्षाला अनुकूल आहे असें भासविणें हें नव्हे होय. *" चित्रमय जगत् " मधील लेखांत केतकर हे असें म्हणतात कीं, शकारंभीं शालिवाहन वर्षारंभ माघापासून होत असे. यावर आम्ही असें म्हणतो कीं, हे विधान अगदीं निराधार आहे. "द्व्यूनं" हा श्लोक वराहानें लिहिला त्यावेळीं म्हणजे शके ४२७ च्या सुमारास शालिवाहन वर्षारंभ आता प्रमाणेंच चैत्र-शुक्लादि होती ही गोष्ट ज्यो. दीक्षित यांनीं सप्रमाण सिद्ध केली आहे.* आणि वराहानेंहि त्याच्या वेळीं प्रचलित असलेल्याच पद्धतीस अनुसरून " द्व्यूनं " हा नियम बसविला या गोष्टीकडे लक्ष दिलें म्हणजे शकारंभीं शकवर्ष हें माघ महिन्यापासून सुरू होत असे, असलें वाह्यात विधान करून वराहाचा श्लोक बदलण्याचें कांहींच कारण पडत नाहीं; केतकरांना " द्व्यूनं शकेन्द्र कालं " या श्लोकाचा अर्थ कळला नाहीं किंवा तो श्लोक त्यांच्या विरुद्ध आहे म्हणूनच त्यांना बनावट पाठभेद करण्याची बुद्धि झाली. असा भ्रममूलक पाठभेद केतकरांनीं आणखीहि एका ठिकाणीं केला आहे. एवंच आपल्या पक्षाचें समर्थन करण्याकरिता भलतेंच पाठभेद करणें हा त्याचा एक उद्योग होऊन बसला होता असें यावरून म्हणण्यास कांहीं एक हरकत नाहीं.

चित्रमयजगत्मधील लेखांत आणि धारवाडास केतकर यांच्या पुत्राच्या नावावर प्रसिद्ध झालेल्या चोपड्यांत अनेक लटपटी आणि परस्परविरुद्ध वचनें भरलेलीं आहेत. अशा लटपटी करणें त्यांना भागच आहे. कारण त्याशिवाय त्यांना गत्यंतरच नाहीं.

पहिली लटपट अशी कीं—*त्यांनीं चित्रमयजगतांत* विठे यांच्या पुस्तकावरून जें सूर्यसिद्धांत पद्धतीचें गणित दिलें आहे त्यावरून रवि निरयन येतो तो सायन करून घेतांना वर्तमान सूर्यसिद्धांताचें *घेऊन अयन गति मात्र आधुनिक म्हणजे ५०" २ विकला याप्रमाणें घेतली आहे आणि भेसळीचें* गणित करून आपला भेसळीचा पक्ष सजविला आहे. त्याबद्दल ज्योतिषशास्त्रज्ञांनीं केतकरांच्या गणिताची परीक्षा करून त्यातील खोटेपणा प्रसिद्धपणें निदर्शनास आणला पाहिजे.

दुसरी लटपट अशी कीं—" त्रिंशत् कृत्वो युगे भानां " या श्लोकान्वयें येणारें शकवर्ष ४२१ हें शून्यायनांश वर्ष म्हणून कबूल केल्यावर तेथून पुढें येणारे अयनांश मात्र नाकबूल करणें हा धादांत खोडसाळपणा होय. चित्रमयजगत्मधील लेखांत केतकरांनीं ४२१ हें वर्ष शून्यायनांश वर्ष म्हणून कबूल केलें आहे. तेव्हां त्या वर्षापासूनच त्यांनीं अयनांश मोजले पाहिजेत. यासंबंधानें तज्ज्ञांनीं केतकरांस स्पष्टपणें असें विचारलें पाहिजे कीं, तुम्ही ४२१ हें वर्ष शून्यायनांश वर्ष म्हणून " चित्रमयजगत् " मधील लेखांत मानलें आहे कीं नाहीं ? ते " नाहीं " असें उत्तर देतील तर " चित्रमय जगत् मधील त्यांच्या लेखांतील पुढील वाक्य पहा:—" अयनांश शके १ = शक ( − ४२१ + १ ) ÷ ७२ = − ५·८३ अंश " ( पहा. चित्रमयजगत् जानेवारी १९२४. )

**तिसरी लटपट**—ही कीं, केतकरपुत्रानें आपल्या नावावर प्रसिद्ध केलेल्या चोपड्यात शकवर्ष १ या वर्षाच्या पौष ३० च्या दिवशीं प्रातःकाळचा सायन चंद्र २८९°. २४′ दिला आहे तो खोटा आहे. अमावास्येच्या दिवशीं प्रातःकालचा सायनचंद्र २७८ अंश इतका येतो. याप्रमाणें व्यं. बा. केतकरांचें चित्रमयजगत्मधील, आणि केतकरपुत्राचें चोपड्यातील अशीं दोन्हीं गणितें खोटीं आहेत.

**चवथी लटपट**—शके १ या वर्षी पौष ३० च्या दिवशीं प्रातःकाळीं मंगळवार होता, असें केतकर व त्याचीच री ओढून केतकर पुत्रहि म्हणतात, परंतु 'ज्या दिवशीं पौष ३० संपली तो वार मंगळवार नसून सोमवारच होता. याप्रमाणें दोन्ही वेळीं अगदीं खोटा वार दिला आहे. शके १ या वर्षाची पौष ३० सोमवारीं सुमारें ५५ घटकांनीं म्हणजे मंगळवारच्या सूर्योदयापूर्वीच संपते. मंगळवारीं सकाळीं मुळींच शिल्लक रहात नाहीं. तदनूद्युदयात या पदात मंगळवारचा अर्थाअर्थी देखील संबंध नाहीं. 'मंगळवार' हा केतकराचा जावई शोध आहे.

**पांचवी लटपट**—ही कीं-अल्फा डेल्फिनी या तारेचा सायन भोग शके १ या सालचा २८९ अंश दिला आहे तोहि खोटा आहे. आल्फाचा सा० भोग २९०–४३ म्हणजे पावणेदोन अंश जास्त होता.

**सहावी लटपट**—चित्रमय जगत्मधील लेखांत व्यं. बा. केतकर यानीं शके ४२१ हें शून्यायनांश वर्ष असें कबूल करून सायन रवि जुळवून घेण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु श्री पतप्रतिनिधि यांचे समोर यासंबंधानें केतकरावर आक्षेप घेतला गेला त्यास उत्तर नाहीं असें पाहून केतकरपुत्रानें ४२१ हें शून्यायनांश वर्ष अशी जी त्याच्या पित्याची कबूली तिचा या चोपडयात मागमूसहि लागू दिला नाहीं. हा त्याच्या सत्यप्रीतिचाच मासला आहे. वास्तविक ४२१ हें शून्यायनांश वर्ष म्हणून कबूल केल्यावर केतकरी पक्षाचा पूर्ण पाडाव झाला असाच निर्णय कोणीहि सुज्ञानें दिला पाहिजे.

याप्रमाणें धनिष्ठापक्षाचें थोताड व केतकरी अयनांश याची सर्व मदार छपवाछपवी व खोटे गणित यावर उभारलेली आहे, आणि जेथें कोणास गणित कळत नाहीं तेथेंच केतकरी पक्ष चिकटण्याचा प्रयत्न करतो.

या प्रयत्नास अनुसरूनच शके १ पौष व॥३० अमावास्या ही मंगळवारीं प्रातःकाळीं संपते असें त्यानीं जें म्हटलें आहे तें आमूलाग्र खोटें आहे. शके १ या वर्षाची पौष ३० सोमवार संपण्यापूर्वीच समाप्त होते. अर्थात् अमावास्या आणि आल्फा डेल्फिनी ह्याचा कदंबसूत्रीय योग होतच नाहीं. आणि अल्फा डेल्फिनी हा धनिष्ठेचा योग ताराच नव्हे; व शकाचें पहिलें वर्ष हेंहि वेदांग पद्धतिप्रमाणें पंच वत्सरा त्मक युगाचें आरंभ वर्ष नव्हे. टिळक पंचांग हेंच वैदिक पद्धतिप्रमाणें शुद्धपंचांग होय या संबंधानें दोन्ही पंचांगातील रवीची तुलना मोठी महत्त्वाची आहे. तिचा अवश्य विचार करावा.

| शके | | वैदिक रवि | टिळक पंचांगांतील रवि |
|---|---|---|---|
| १८११ | आश्विन ३० | १८० अं. ६ क. | १८० अं. ६ क. |
| १८२३ | आषाढ ३० | ११३ २० | ११३ २० |
| १८४३ | आश्विन १५ | १८५ ५५ | १८५ ५५ |
| १८५६ | आषाढ ३० | ११९ ९– | ११९ ६ |

टिळक पंचांगांतील रवि वैदिकपद्धतिप्रमाणें साधलेल्या रविशीं इतका तंतोतंत जुळण्याचें कारण दोन्ही पंचांगाचे आरंभस्थान अगदीं एकच आहे हेंच होय. वैदिककालीं नक्षत्रविभाग ठरले ते कृत्तिका योगतारेपासून ठरले आणि तेच विभाग मैत्र्युपनिषत् कालींही प्रचारांत होते. वेदांग ज्योतिष मैत्र्युपनिषत् काळानंतरचे आहे हें वर दाखविलेंच आहे.

तेव्हां वेदांगज्योतिर्गातील नक्षत्र विभाग हे धनिष्ठा योगतारेपासून केलेले नव्हेत. कारण कृत्तिकायोग-तारेवरून केलेले विभाग शकापूर्वी २००० तीन हजार वर्षांपासून प्रचलित असतांना शकापूर्वी १४०० किंवा १२०० या वर्षी नवीनच विभाग कोण प्रचारांत आणूं देणार ? आणि कोणी आणण्याचा प्रयत्न केला तर ते

सर्वमान्य कसे होणार ? कृत्तिकादि विभाग तैत्तिरिय संहिता कालीन आहेत म्हणजे वैदिक वाङ्मय ज्या कालीं खुद्द ऋषिमुखांतून बाहेर पडत होतें त्या काळचे म्हणजे अत्यंत प्राचीन काळचे होय. हेंच कृत्तिकाविभाग वराहाचार्यांनें मान्य करून त्याला अनुसरून आश्विनादि विभाग ठरविले व तेंच आरंभस्थान पंचांगप्रवर्तक कमेटीनें स्वीकारलें आहे. सांप्रतमयनं पुनर्वसुतः असें वराहानें लिहिले आहे. त्याचा नीट अर्थहि तें चोपडें लिहिणाराला करता आला नाहीं अथवा त्या लेखकानें मुद्दाम लटपटही केली असेल. "पुनर्वसुतः" म्हणजे "पुनर्वसुच्या अर्धावर" असा अर्थ कोणीहि शुद्धीत असणारा मनुष्य करणार नाहीं. जोपर्यंत असा डेल्फिनी म्हणजेच धनिष्ठा विभागारंभ हें सिद्ध झालें नाहीं तोपर्यंत अल्फा डेल्फिनीच्या सायनभोगाशीं धनिष्ठा विभागारंभाची तुलना करणें हा लपंडाव होय. अशानें वाटेल ते अयनांश जुळवून दाखवितां येतील.

वेदांगज्योतिषकालीन दक्षिणायन आश्लेषार्धापासून मागें पुनर्वसुच्या तिसऱ्या चरणांत आलें होतें म्हणजे वेदांगकालापासून वराहाच्या काळापर्यंत संपात गति २२ अंश २५ कला झाली होती, हीच गति निराळ्या रीतीनें सिद्ध होतें.

| | |
|---|---|
| शके १८३० धनिष्ठा ( बीटा ) तारेचा सायनभोग | ३१४ अं. ५४ क. |
| शके ४२७ पर्यंतची अयनगति | १९ २९ |
| वराहकालीन धनिष्ठा सायनभोग | २९५ २५ |
| वेदांग कालीन धनिष्ठा ताराभोग | २७३ |
| वेदांगकालापासून संपात चलन | २२ अं. २५ |

याप्रमाणें बीटा डेल्फिनी इचें गणितही जुळतें; परंतु येथें तो प्रश्न नाहीं. वेदकालीन नक्षत्रविभाग कृत्तिकेपासून केलें होते कीं, धनिष्ठेपासून केले होते हाच मुख्य मुद्दा आहे. आणि वेदांगज्योतिषापेक्षां मैत्र्युपनिषत् प्राचीन आणि मैत्र्युपनिषदापेक्षां तैत्तिरीय संहिता प्राचीन हे सिद्ध आहे तर

तैत्तिरीय संहिताकालीन

जे कृत्तिका विभाग त्यांचाच स्वीकार करणें शास्त्रशुद्ध होय. इतर विभाग हे वेदविरुद्ध आणि पाखांडप्रचारी होत. आणि म्हणूनच श्रुतींत नक्षत्रचक्राचा आरंभ म्हणून पुढील मंत्र पठित आहे.

अग्निर्नः पातु कृत्तिकाः । नक्षत्रंदेवमिंद्रियम् ॥

# अश्विन्यादि गणना

ग्रहलाघवीय अयनांश हल्लीं सुमारें २३-२३॥ अंश आहेत त्या अयनांशांशी आपले चालू अयनांश दडवून घेऊन ग्रहलाघवाप्रमाणें पंचांग ओढून ताणून तयार करणारा जो पक्ष त्याला विमपक्ष असें नांव आहे परंतु परंपरागत शून्यायनांश वर्षाच्या दृष्टीनें निमापक्षापेक्षां ग्रहलाघवीय पक्ष शुद्ध व श्रेष्ठ आहे. ग्रहलाघवाचें ग्रहगणित स्थूल असो. परंतु त्यांतील परंपरेचा भाग म्हणजे शून्यायनांशवर्ष व तारांचे निरयन भोग हे परंपरागत व शुद्ध आहेत म्हणून निमापक्षीय वनारट व जुळवाजुळवीच्या पंचांगापेक्षां ग्रहलाघवाचा दर्जा फार उच्च आहे.

भारतीय नक्षत्रचक्राचें प्रस्तुत आरंभस्थान अश्विन्यादि म्हणजे निःशर रेवती तारा हें आहे अथवा तें आरंभस्थान रेवती योगतारेच्या समीप आहे म्हणण्यासहि हरकत नाहीं. हें रेवतीनिर्दिष्ट आरंभस्थान शास्त्रशुद्ध व परंपराशुद्ध आहे. हें आरंभस्थान सूर्यसिद्धांत, ब्रह्मसिद्धांत, सिद्धांतशिरोमणि, ग्रहलाघव या ग्रंथांतील नक्षत्रांच्या भोगांवरून निश्चित होतें. हें रेवतीनिर्दिष्ट परंपरागत आरंभस्थान स्थापित करणारा पक्ष तो रैवत पक्ष होय. रेवती योगतारेला इंग्रजी ज्योतिषशास्त्रांत "झीटा पिसियम' असें नांव आहे व चित्रेला "स्पायका हें नांव आहे.

चित्रा अथवा स्पायका तारेपासून आक्रमवृत्तावरील जो पडभातरित बिंदु तो अश्विनी नक्षत्राचे आरभ स्थान नव्हे. यवन लोकाची जी मेषरास तिचा आरभ चित्रेसमोरील बिंदूपासून होतो अशी खुद्द रा. केतकराचीच कबुली आहे. चित्रा अथवा स्पायका निर्दिष्ट आरंभस्थान यवनमतानुसारी आहे तें आम्हा आर्यांचे अश्विन्यादि स्थान नव्हे.

जेव्हा हजारों वर्षांपूर्वीच्या ग्रहस्थितींचा व नक्षत्र विभागाचा आपण विचार करतो तेव्हा कोणत्याही प्रतिपादनावर मुळींच आक्षेप घेता येणार नाहींत असें नाहीं. आक्षेप हे निघणारच पण ते आक्षेप निर्मूळ ठरले किंवा तसाच आक्षेप आक्षेपकाच्या विचारसरणीवरहि येतो असें दाखविलें म्हणजे आक्षेपाचें निरसन झालें. या दृष्टीनें पाहता रेवती आरंभस्थानावर जे आक्षेप येण्याचा सभव आहे त्याचें थोडक्यात निराकरण करूं.

आक्षेप (अ) रेवती तारा "झिटा" पिशियम ही रेवती विभागांतील अखेरची तारा नाहीं. रेवती पुजात तारा एकदर ३२ आहेत. परतु 'झिटा' ही तारा बत्तिसावी नाहीं.

यास उत्तर असें कीं, रेवती ताऱ्याची सख्या निश्चित नाहीं ज्योतिर्विद दीक्षित म्हणतातः—"रेवतीच्या तारा पुष्कळ ग्रथात ३२ सागितल्या आहेत. परंतु काहीं ग्रथांत एकच तारा व एका ग्रंथात चार तारा सागितल्या आहेत." तथापि दीक्षितांनीं आपल्या कोष्टकात रेवतीच्या ३२ तारा दिल्या आहेत व त्या यादीवरूनच हा आक्षेप आक्षेपकास सुचला असेल. यांत शेवटच्या तारेचे सायनभोग सुमारें २९° येतात. रेवतीची शेवटची ताराच जर धरावयाची तर अयनांश २९ मानले पाहिजेत त्यावाचून गत्यतर नाहीं आणि २९ अयनाश मानण्यास कोणीहि आक्षेपक तयार होणार नाहीं, कारण हा आक्षेप आक्षेपकावरच उलटतो म्हणून तो त्याज्य व अप्रयोजक ठरतो यात आश्चर्य कसलें!

आक्षेप (आ) सूर्यसिद्धातात रेवतीचा भोग ३५९°–५०′ इतका आहे. बरोबर ० शून्य भोग नाहीं. यावर आमचें म्हणणें असें कीं, १०′ कलाचेच काय पण प्राचीन ग्रथाचा विचार करतांना ३०′ कलाचे अतरहि उपेक्षणीय मानले पाहिजे कारण त्या वेळची वेधादि साधनें व सध्याची साधनें यात भयंकर तफावत आहे. त्या कालीं इतकी साधनें नसताना दिलेले हे भोग आहेत हें लक्षात टेविलें पाहिजे. नाहीं तर कोणतीहि तारा खोटी ठरविता येईल.

आक्षेप (इ) सूर्यसिद्धातांत रेवतीचा शर शून्य व उत्तर दिशेचा सांगितला आहे व "झीटा" तारेचा शर १३′ कला असून तो दक्षिणेचा आहे.

उत्तरः—हाही आक्षेप अगदीं अयोग्य आहे. १३′ कलाचेंहि अतर उपेक्षणीय नाहीं काय? अगदीं कला विकलापर्यंत भोग किंवा शर कोणत्या तारेचें जुळत आहेत ते आक्षेपकानें दाखवून द्यावें. खुद्द चित्रा तारेच्या शरातही रेवती शरा इतकीच तफावत आहे याचें कारण असें कीं, पूर्वाचार्यांनीं क्रांतिवृत्ताचे जे वलय कायम केलें तें पुष्य, मघा, शततारका व रेवती यांच्या वेधावरून केलें. त्यानीं ठरविलेलें क्रांतिवृत्त व हल्लींचें क्रांतिवृत्त यात थोडा फरक पडतो आणि त्यामुळें हल्लींच्या क्रांतिवृत्ताच्या दक्षिणेकडील फक्त १३′ कला सूक्ष्म शर असणारी रेवती तारा प्राचीन क्रांतिवृत्ताच्या किंचित् उत्तरेस निदान त्या क्रांतिवृत्तावर तरी येते. आतां शरशून्य मानला तरी दिशा उत्तर सागण्याचें प्रयोजन काय? या प्रश्नाला असें उत्तर आहे कीं, शून्य शराला दिशाच नाहीं. तथापि सूर्यसिद्धांताचे वेळीं रेवती तारा क्रांतिवृत्ताच्या किंचित् उत्तरेसच होती.

खुद्द सूर्यसिद्धातांत योगताऱ्याचे भोग दिले आहेत किंवा ब्रह्मगुप्त व भास्कराचार्य यांनीं जे भोग दिले आहेत त्यांचीही तुलना करण्यासारखी आहे. मात्र अशी तुलना करतांना ज्या तारा स्पष्ट व ठळक आहेत व ज्यांच्याविषयीं वाद नाहीं किंवा सदिग्धपणा नाहीं अशाच तारा तुलनेकरिता निवडून घेतल्या पाहिजेत. कै० दीक्षित यांच्या पुस्तकात निरनिराळ्या विद्वानांनीं कोणकोणत्या योगतारा मानल्या आहेत त्यांची यादी दिली आहे. ही यादी चित्रापक्षाचा वाद उत्पन्न होण्याच्या फार पूर्वी प्रसिद्ध केली असल्यानें

तीच तुलनेकरिता घेतली पाहिजे. त्या यादींत ज्या योगतारा ठळक व असंदिग्ध आहेत त्यांच्या भोगाच्या तुलनेवरून रैवत पक्षच निर्विवाद व स्वतंत्रपणें सिद्ध होतो.

**मूल सूर्यसिद्धांत, अर्वाचीन सूर्यसिद्धांत, आर्यभट, ब्रह्मगुप्त, राजमृगांक, मुंजाल, भास्कराचार्य व गणेश दैवज्ञ या सर्वांच्या गणितपद्धतीवरून शून्यायनांश वर्षें ४४० ते ५०० पर्यंत येतात आणि रेवती आरंभ हें या वर्षांपैकींच असल्यामुळें शास्त्रशुद्ध व परंपराशुद्ध आहे.**

शुद्ध आरंभस्थान शके ४४० च्या सुमारास ठरविलें असें नसून तें कृत्तिकेवरून वेदकालापासूनहि निश्चित झालेलें आहे म्हणून तेंच ग्राह्य धरलें पाहिजे.

मूल सूर्यसिद्धांतांत म्हणजे पंचसिद्धांतिकेंत वराहानें जे " वेध प्रकरणीं " श्लोक दिले आहेत ते असे.

" बहुलाः पञ्चाशान्ते " याचा अर्थ असा कीं, कृत्तिकेची तारा आपल्या विभागाच्या सहाव्या अंशात आहे म्हणजे कृत्तिकेचा भोग ३२° ४०′ येतो.

" रोहिण्यष्टदलान्ते " अष्टदल म्हणजे आठ असा कोणी अर्थ करतात. अष्टदल म्हणजे आठाचे अर्ध म्हणजे चार असा अर्थ केल्यास यावरून रोहिणीचा भोग ४४° ४८′ अंश येतो.

" हस्तेष्टमेऽष्टमेंशे पुनर्वसौ " याच्या अर्थावरून पुनर्वसूचा भोग ८८ येतो.

" पुष्यस्योदक् चतुर्थेंशे म्हणजे पुष्य भोग ९७° २०′ " सार्पस्यांशे तथोत्तरातारा " यावरून आश्लेषाचा भोग १०७° ४०′ येतो.

यानंतर मघा व चित्रा याची भानगड पहा.

**पित्र्यस्य ( त्वाष्ट्रेचत्रे ) षष्ठे वांशे समायोगः॥ असा पाठ आहे.**

**चित्रार्धाष्टमभागे हा एक पाठ आहे.**

**चित्रार्धाष्टभागे हा दुसरा पाठ भेद आहे.**

याप्रमाणें " मघा " आणि " चित्रा " या दोन्ही नक्षत्राचे भोग अपभ्रष्ट पाठामुळें श्लोकावरून निश्चित होणें शक्य नाहीं.

प्रथमतः केतकरांनीं " चित्रार्धाश्रम भागे " असा कल्पित पाठ घेऊन " चित्रा आपल्या विभागाचे अर्ध्यावर आहे " असा अर्थ करण्याचा प्रयत्न केला होता. परंतु " आश्रम " या शब्दाचा अर्थ विभाग असा होत नाहीं. आणि त्याचा कांहीं अर्थ झालाच तर " चार " असा अर्थ होईल व त्यावरून चित्रा आपल्या विभागात " अर्धाश्रम " म्हणजे साडेतीन अंशावर आहे असा अर्थ निघतो असें जेव्हा रैवतपक्षानें सिद्ध केलें तेव्हा केतकरांचा नाइलाज झाला. त्यामुळें " चित्रात्मभभागे " असा नवाच पाठच घुसडून देण्याचा त्यांनीं प्रयत्न चालविला होता. परतु स्वमतपुष्टयर्थ ग्रंथाचा पाठ फिरविणें हें किती अश्लाघ्य आहे हें तत्त्वजिज्ञासूस सांगावयास नकोच.

कोणीकडून तरी चित्रेचे भोग १८० अंश आणण्याची केतकरपक्षीयांची खटपट एकसारखी चालू आहे. आणि ती खटपट इतकीच कीं, मघाचे भोग १२६ व चित्रेचे १८० असे घोकीत आणि घोटीत बसावयाचें. परंतु शास्त्रनिर्णयात घोकपट्टीला कांहींच किंमत नाहीं म्हणून अपपाठानें दुष्ट किंवा दुर्बोधतेमुळें क्लिष्ट झालेले मघा व चित्रा विषयक दोन श्लोक बाजूसच ठेविले पाहिजेत. शिवाय दुसरें असें कीं, या श्लोकांवरून येणारे भोग कदम्बसूत्रीय आहेत किंवा ध्रुवसूत्रीय आहेत कीं सायन आहेत हेंही निश्चित नाहीं. परंतु केतकरपक्षाचें म्हणणें असें दिसतें कीं, त्यांना कदंबसूत्रीय निरयन मानावें. " मानावें " म्हणाले कीं निराधारता आलीच. परतु एक क्षणमात्र असें धरून चालू कीं, मघा नक्षत्राचे केतकरी भोग १२६ व चित्रेचे १८० आहेत असें धरून चाला म्हणजे काय घोंटाळा उडतो तो पहा:—

ज्योतिषशास्त्रांत ही गोष्ट सर्वमान्य आहे कीं, ताऱ्यांचें परस्परांतील अंतर हजारों वर्षांत देखील किंचितही बदलत नाहीं. म्हणून श्लोकांची संगति लावण्यास हीं सापेक्ष अंतरें ताडून पहाण्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं. त्याप्रमाणें सापेक्ष अंतरें ताडून पाहिल्यास अपपाठामुळें अनिश्चित परंतु केतकरी पक्षाच्या आग्रहामुळें कांहीं तरी मानलेले मघा आणि चित्रा यांचे भोग अगदीं चुकलेले आहेत असेंच ठरतें.

| नक्षत्र. | वराहोक्त भोग. | मघा नक्षत्राचा केतकरी भोग. | अंतर. | आधुनिक प्रत्यक्ष अंतर |
|---|---|---|---|---|
| कृत्तिका | ३२° ४०′ | १२६ | ९३° २० | ९०° |
| रोहिणी | ४४° ४८′ | १२६ | ८२° | ८० |

| नक्षत्र. | वराहोक्त भोग. | चित्रेचे केतकरी भोग. | अंतर. | वास्तविक अंतर. |
|---|---|---|---|---|
| कृत्तिका | ३२° ४०′ | १८० | १४७° २०′ | १४४° |
| रोहिणी | ४४° ४८′ | १८० | १३६ | १३४ |

पंच सिद्धांतिकोक्त श्लोकांवरून पाहिल्यास मूळ सूर्यसिद्धांतावरून देखील मघा व चित्रा यांचे केतकरी भोग खोटे आहेत असेच ठरतें. कृत्तिकेस अनुलक्षून केतकरी भोग ३ अंशांनीं चुकले आहेत आणि रोहिणीसंबंधानें २ अंश चुकले आहेत. पुनर्वसू आणि पुष्य यांचे वरूनहि तीच स्थिति येते. तेव्हां वराहोक्त सूर्य सिद्धांतातील भोग निरयन नसून सायन असावे असें दिसतें. केतकरांनीं आपल्या गुप्त हेतुसाठीं त्यांना निरयन मानले हीच गोष्ट अगोदर अशास्त्रीय आहे आणि त्यांतूनहि हे भोग निरयन मानले तरी केतकरांचे अयनांश त्यावरून जुळत नाहींत. एकंदरीनें पाहतां हल्लींच्या अश्विन्यादि आरंभस्थानाला महत्त्व आलें तें आदि सूर्यसिद्धांतांच्या कालापासून आलें. त्यापूर्वी कृत्तिकादि गणना प्रचारांत असल्यानें कृत्तिका भोगांना आरंभस्थानानिर्णयांत अतिशय महत्त्व आहे.

वेदांगज्योतिषपद्धति शककालानंतर लुप्त झाली परंतु त्या पद्धतीला अनुसरून अश्विन्यादि आरंभस्थानाचा पुनः निर्णय शके ४५० चे सुमारास झाला म्हणून तेंच शून्यायनांश वर्ष ठरलें. अर्थात् आरंभस्थानचा निर्णय शून्यायनांश वर्षावरूनच केला पाहिजे. आणि शुद्धपंचांगप्रवर्तन कमिटीनें जें आरंभस्थान स्वीकारलें आहे तें शके ४४४ या शून्यायनांश वर्षाशीं अत्यंत सुसंगत आहे म्हणून शास्त्रशुद्ध पंचांग तेंच होय.

रा० केतकर आणि केतकरपुत्र यांनीं आपल्या बनावट आरंभस्थानाशीं जुळवून घेण्याकरितां शके १ यावर्षीच्या पौष वद्य अमावास्येचें गणित दिलें आहे व वारहि भलताच दिला आहे. परंतु वस्तुस्थिति एकदम लक्षांत येण्यासाठीं केतकरी खोटीं विधानें आणि खरी वस्तुस्थिति यांचा थोडक्यांत पुनः निर्देश करतों:—

## केतकरी विधानें.

शके १ या वर्षी पौष व॥ ३० अमावास्या मंगळवारीं प्रातःकाळीं संपते. हें विधान खोटें.

शके १ यावर्षी अल्फा रेग्युलसचा सायनभोग २८९ अं. होता. हें विधान खोटें.

शके १ यावर्षी पौष ३० चे दिवशीं रविचंद्र आणि अल्फा यांची कदंब युति झाली. हें विधान खोटें.

## खरी वस्तुस्थिति अशी आहे.

शके १ या वर्षीची पौष व॥ ३० ही सोमवारींच समाप्त झाली.

शके १ यावर्षी अल्फा रेग्युलसचा सायनभोग २९० अं. ४४ क. इतका होता.

शके १ यावर्षी पौषी ३० स युति झाली नाहीं. कारण रवि आणि अल्फा रेग्युलस यांच्यांत अंतर सुमारें २ अंश होतें.

याप्रमाणें चुकीचें गणित देऊन वेदांगज्योतिष हें आपल्या पक्षास अनुकूल आहे असें भासविण्याचा केतकरद्वयाचा हेतू आहे. परंतू त्यांत कांहीं एक अर्थ नाहीं. गणित खोटें देऊं लागलें व तें डोळे मिटून कबूल केलें म्हणजे कोणताहि पक्ष वेदांगाशीं जुळवून दाखविता येईल. आपलें पंचांग चांद्रसौर पद्धतीचें निरयन असल्यानें अधिक मास घालून ज्यावर्षी चद्र सौर वर्षांचा मेळ पडतो त्यावर्षी रवि, चद्र आणि तारा याचे अंतर पर्वांतीं जवळ जवळ तेंच तेंच पुन. येतें. म्हणून अमुक वर्षी रविचंद्र आणि तारा यांची साधारण तरी युति झाली असें ज्याचें म्हणणें असेल त्यानें ते तिन्ही अर्ध्या अंशाइतके तरी जवळ होते असें दाखविलें पाहिजे. दीड अंशापेक्षा जास्त अंतराला कोणीहि युति म्हणणार नाहीं. अर्थात् शके १ यावर्षी पौष अमान्तीचा रवि आणि अल्फा डेल्फिनी याचे अंतर दोन अंश असल्यानें शकाचें पहिलें वर्ष हें वेदांग-पद्धतीचें युगादि वर्ष होतें हें म्हणणें चुकीचें आहे. इतकेंच काय पण शकापूर्वी १४९९ ह्या वर्षाच्या पौष अमांतापासून वेदांगपद्धति प्रचारांत आली असें केतकर प्रतिपादन करतात आणि या विधानाला आधार काय तर पूर्वोक्त अमांतीं रवि–चद्र–तारका युति ततोतंत जमली असें ते सांगतात. आणि हें शक पूर्व १४९९ चे गणित केतकरानीं चित्रमयजगत्च्या १९२५ च्या फेब्रुवारीच्या अकांत दिलें आहे. पण गमत अशी कीं, यावेळीं त्यानीं आपल्या बनावट अयनांशाना धरून निरयन गणित आणि तेंहि

## मध्यम मानाचें दिलें आहे.

धारवाडास वाटलेल्या चोपड्यांतील शके १ या वर्षांचें गणित स्पष्टग्रहांचे सायनपद्धतिचें दिलें आहे. पण शकपूर्व १४९९ चें गणित मध्यमग्रहाचें आणि आपल्याच अयनांशाला अगोदरच जुळवून घेऊन दिलें आहे. कोणीकडून तरी आकड्यांचें गौडबंगाल देऊन गणित जुळवून दाखवावें हाच एक उद्देश दिसतो. पण तो दोन्हीं ठिकाणींही साधला नाहीं. शके १ या वर्षाचें गणित ग्रहसाधनकोष्टकावरून केल्यास केतकरी गणितांतील खोटेपणा निदर्शनास येतो. त्याचप्रमाणें शकपूर्व १४९९ या वर्षाचें गणित केल्यासही येतो. ते गणित ग्रहसाधन कोष्टकावरून केल्यास पौष अमान्तीचा सायन स्पष्ट रवि २७१ अं. ४८ क. इतका आणि अल्फाडेल्फिनीचा सायन भोग २६९ अं. ५२ क. इतका येऊन दोहोंतील अंतर सुमारें २ अंश येतें. अर्थात् शकापूर्वी १४९९ या वर्षीही पौष कृ. ३० स धनिष्टा आणि रवि यांची कदंब युति झाली नाहीं. आणि म्हणूनच शकापूर्वी १४९९ या वर्षापासून वेदांगपद्धति अल्फा डेल्फिनी धरून प्रचारांत आली नाहीं असें म्हणणें भाग आहे.

*वास्तविक पाहतां असली विचारसरणीच सदोष आहे. आपल्याला अत्यंत प्राचीन विभागपद्धति* कोणती हें शोधून पहावयाचें आहे. वेदांगज्योतिषांत विभागपद्धतीचेंच गणित आहे. परंतु एवढ्यावरून विभागपद्धति त्याचवेळीं ठरली असें नव्हे. मैत्र्युपनिषत् वेदांगाच्याहि पूर्वीचें आहे परंतु त्यांतहि विभाग-पद्धतीचा उल्लेख आहे. म्हणून मैत्र्युपनिषदोक्त नक्षत्र विभागच मान्य केले पाहिजेत. मैत्र्युप-निषदापेक्षांहि

### तैत्तिरीय संहिता आणि तैत्तिरीय ब्राह्मण

प्राचीन होत. त्याकाळीं कृत्तिकादि गणना होती आणि तेव्हांहि विभागपद्धति प्रचारांत होती. कारण, चैत्रादि संज्ञा शतपथब्राह्मणकालींहि अस्तित्वांत होत्या. विभागपद्धतिशिवाय चैत्रादि चांद्र–सौर महिने प्रचारांत येणें शक्य नाहीं. म्हणून अत्यंत प्राचीन

### विभागपद्धति कृत्तिकादिच होय.

आणि म्हणून शुद्धपंचांगांत तीच मानली आहे.

जी विभागपद्धति तैत्तिरीय संहिता ब्राह्मणकालीं असेल तीच मैत्र्युपनिषत्कालीं किंवा वेदांग-ज्योतिषकालींहि प्रचारांत असली पाहिजे. प्रत्येक वेळीं नक्षत्रविभाग बदलणें शक्य नाहीं. कृत्तिकादि

विभागावरून येणारे अधिक महिने सध्याच्या ग्रहलाघवाशीं जुळत नाहींत त्याचें कारण वैदिकपंचागपद्धति लुप्त होऊन उच्चानुवर्ती सौरवर्षमान प्रचारात आलें हें होय. वैदिकपंचागपद्धतींत गणित म. तिथ्यादि आणि अधिक महिने ठरीव अशा प्रकार होता. त्यावेळीं नक्षत्र विभागाच्या मर्यादा वारवार प्रत्यक्ष वेधानें पाहून त्यावरून गणित शुद्ध करून घेत असत; आणि वेधपरंपरा कायम ठेवीत. शके ४२७ च्या सुमारास कृत्तिकादि गणनानुरोधानेंच वराहाचार्यांनीं अश्विन्यारंभ पुनः निश्चित केला. परंतु पुढें वेधपरंपरा बुडाली आणि उच्चानुवर्ती सौरवर्षमानामुळें हें आरंभस्थान वराहाचार्यांचे वेळेपासून चळूं लागलें, म्हणून चळलेलें प्राचीन आरंभस्थान आणि कृत्तिकादि विभागपद्धति पुनः प्रचारात आणणें हेंच प्रत्येक समजस हिंदूचें कर्तव्य होय. राजसत्तेच्या पाठिंब्याच्या अभावीं हें शक्य नसेल पण कृत्तिकादि विभाग हे अत्यंत प्राचीन होत असें स्पष्टपणें मान्य केलेंच पाहिजे. "न बुद्धिभेदं जनयेत्" या न्यायानें ग्रहलाघवीय अधिकमास मानणें प्रस्तुत परिस्थितींत कितपत ग्राह्य होईल हा प्रश्न अगदीं स्वतंत्र आहे. परंतु चित्रापक्षाला वेदांगाचा आधार आहे असें म्हणणें हे अगदीं थोताड होय. आणि पंचांगविषयक ऐक्य होण्यास हे थोताड प्रथम नष्ट झालें पाहिजे.

(१९२७) जुलै महिन्याच्या "चित्रमयजगत्" मध्यें वृद्ध केतकरानीं पुनः तेंच तेंच चर्वित चर्वण केलें आहे. आणि त्यातील वस्तादगिरी हुडकून काढण्याकरिता प्रो॰ नाईक यांना पाचारण केलें आहे. या चमत्कारिकपणाचा आम्हांस मुळींच अचंबा वाटत नाहीं. सूर्यसिद्धातानुसारी वर्षारंभाचा विन्दु दरसाल ८॥ विकला पूर्वेकडे चळतो. तो कलियुगारंभापासून किती चळला हें ज्योतिषशास्त्राच्या पहिल्या इयत्तेंतील एखादें पोरही सागू शकेल. केतकराचा चळ हाच कीं $\frac{६}{६}\frac{५१}{००}$ × ५०२८ या गुणाकार भागाकाराचें त्यानीं भलतेंच स्तोम माजविलें आहे. ह्या भ्रमाचा भोपळा फोडण्यास प्रो॰ नाईक कशाला ? या उठाठेवीनें सिद्ध काय झालें ? हेंच ना कीं, कलियुगारंभीं रेवतीतारेपाशीं चलवर्षारंभ नव्हता. नसेल; पण तुमच्या "चित्रे" च्या पद्मान्तरितावर तरी तो होता काय ! मुळींच नव्हता ! मग तुमचें आरंभस्थान तरी खरें कसें ?

ही सर्व उठाठेव लटपटीची आहे. कलियुगारंभीं कृत्तिकारंभप्रयुक्त पंचांग होतें. त्यानंतर वेदांगज्योतिषानुवर्ती झालें. नंतर पितामह सिद्धांत प्रचारात आला. ही गोष्ट सर्वमान्य असतां कलियुगारंभीं सूर्यसिद्धांत चालू होता असें भासवून लोकास, अज्ञजनास केतकरानीं का चकवू पहावें !

वस्तुस्थिति अशी आहे कीं, कलियुगारंभीं सूर्यसिद्धांत किंवा कोणताच सिद्धांत प्रचारात नव्हता. म्हणून त्या स्थूलवर्षमानावरून पाच हजार वर्षांपूर्वीचें गणित केवळ त्रैराशिकाचें देऊन तेंच आकडे लोकास खरे मानावयास लावणें म्हणजे पवित्र ज्योतिषशास्त्राशीं दगलबाजी करणें होय. सूर्यसिद्धांताचीच गोष्ट कशाला हल्लींचें नॉटिकलचें सूक्ष्म वर्षमान घेऊनही केवळ त्रैराशिकानें १०००० हजार वर्षांपूर्वीचें गणित केल्यास तें देखील चुकेल. कारण हजारों वर्षांपूर्वीचें कोणतेंहि त्रैराशिकी गणित कालान्तर संस्कारानें ऊर्फ बीजसंस्कारानें शुद्ध करावेंच लागतें आणि तोच न्याय सूर्यसिद्धांतालाहि जर लागू केला तर त्याचा वर्षारंभहि कृत्तिकातारेपाशीं किंवा कोणत्याहि अचल बिंदूपाशींच येतो ही गोष्ट सर्व प्रामाणिक ज्योतिषी कबूल करतील. सूर्यसिद्धांतोक्त वर्षमान चल आहे म्हणूनच केरोपतानीं अचल आरंभस्थानाला सुसंगत असें 'पटवर्धनी शुद्धपंचांग' महाराष्ट्रांत प्रथम सुरू केलें.

केतकराचा दुसरा उपद्व्यापहि त्याच मासल्याचा आहे. श्री भास्कराचार्यांच्या ग्रंथात कलियुगारंभीं सग्रह मध्यम मानानें एकत्र होते असें लिहिलें आहे. पण हा म्हणण्यानें तरी काय बोध होणार ! तो केवळ अर्थवाद आहे. तेव्हां हास्यवधानें ज्योतिर्विद दीक्षित काय म्हणतात तें डोळे उघडे ठेवून वाचा नाहींतर निःपक्षपाती गृहस्थांकडून तुम्हांला दूषण आल्याशिवाय राहणार नाहीं. ज्यो॰ दीक्षित म्हणतात. "कलियुगारंभीं आमच्या ग्रंथाप्रमाणें सर्वग्रह एकत्र होते असें आहे. परंतु वास्तविक स्थिति तशी नव्हती."

---

# शुद्धपंचांग व कृत्तिकारंभस्थान

मघापुंजातील 'म्यू'लिऑनिस ह्या तारेचे सायनभोग (शके १८५० सालाचे) १४०° ३०' येतात हें पूर्वीच्या लेखात दाखविलें, त्यावरून मैत्र्युपनिषदुक्त मघाविभागाचे भोग आणि कृत्तिकाप्रयुक्त विभाग हे दोनहि निःसंदेह सिद्ध होतात. परंतु आक्षेप असा निघण्याचा संभव आहे कीं, 'म्यू' तारेचा समावेश मघाविभागामध्यें का करावा ? हा आक्षेप ज्यो. दीक्षित यानीं (भा. ज्यो. इ. पान ६० मध्यें) एक वाक्य उद्धृत केलें आहे त्यावरून सुचण्यासारखा आहे. दीक्षितांनीं. उद्धृत केलेलें वाक्य असें आहे कीं, "दुसरीं नक्षत्रें एक, दोन, तीन, चार; पण कृत्तिका मात्र बहुत.' ह्यावरून कृत्तिका सोडून इतर नक्षत्रपुंजात ताराची संख्या चोहोंपेक्षा अधिक असू नये, असा आक्षेपकांचा कोटिक्रम आहे. परंतु हा आक्षेप सयुक्तिक नाहीं. कारण ज्यो. दीक्षिताच्या मतानेंच त्या वाक्याचा अर्थ, इतर नक्षत्रांतील तारा चोहोंहून जास्त नाहींत' असा करावयाचा नसून 'तारांची संख्या कोणत्याहि पुंजांत निदान कृत्तिकेहून जास्त नसावी' असा करावयाचा आहे. कृत्तिकेव्यतिरिक्त कोणत्याहि नक्षत्रांत तारांची संख्या वैदिककालीं चोहोंहून जास्त मानीत नव्हते हें म्हणणें तर्कदृष्ट्या टिकणें शक्य नाहीं. 'मघापचक' हें मघापुंजाचें नांव तर प्रसिद्धच आहे. म्हणून त्यात तारांची संख्या पांचापेक्षां कमी असणें संभवनीयच नाहीं. इतर नक्षत्रपुंजांतहि तारांची संख्या जास्तींत जास्त सहा आहे; इतकी संख्या खुद्द वेदकालीं होती. आणि 'हस्त' नक्षत्राचें नांवच असें दर्शवितें कीं, त्यांतील ताराची संख्या पाच असलीच पाहिजे. कारण पांच अंगुलीनिदर्शक ताराशिवाय 'हस्त' हें नांव पडणेंच शक्य नाहीं. तेव्हां वैदिककालीं कृत्तिका सोडून इतर नक्षत्रांतील ताराची संख्या चोहोंपेक्षां जास्त मानीत नव्हते असा वरील वाक्याचा बिलकुल अर्थ नव्हे.

तथापि सर्वांपेक्षा वाचनिक प्रमाण हें केव्हाहि श्रेष्ठ; म्हणून अथर्ववेदाचें परिशिष्ट"नक्षत्रकल्प" म्हणून आहे त्याचा आधार आपल्या उपयोगी पडतो. अथर्ववेदाच्या ह्या परिशिष्टाला वेदांगाइतकेंच प्रामाण्य आहे. "नक्षत्रकल्प' ग्रंथांत मघापुंजांतील ताराची संख्या सहा दिली आहे. आणि ती प्रत्यक्ष प्रमाणानेंहि सिद्ध होते, तेव्हां मघापुंजात चारच तारा माना, सहा मानूं नका हा आग्रह बाष्कळ ठरतो, त्याला यत्किंचितहि महत्त्व उरत नाहीं. मघापुंजामध्यें तारांची संख्या सहा आहे ही गोष्ट स्वतंत्र पुराव्यानें सिद्ध होणें ह्याला अत्यंत महत्त्व होतें, आणि ती सिद्धता नक्षत्रकल्प ह्या वैदिककालीन ग्रंथावरून वाचनिक प्रमाणानें ठरते, तेव्हां मघापुंजामध्यें आल्फा, ईटा, ग्यामा, झीटा, म्यु आणि एप्सीयलॉन ह्या सहाहि तारांचा समावेश केलाच पाहिजे.

मघापुंजांत सहा तारा आहेत ही गोष्ट जरी कबूल केली, तरी मघाविभागामध्यें त्या सर्वच तारा अन्तर्भूत होतात कीं काय असा आणखी एक प्रश्न राहतो. परंतु त्याला उत्तर हेंच कीं, जोंपर्यंत अमुक तारांचा अन्तर्भाव होत नाहीं असें कोणी दाखविलें नाहीं तोंपर्यंत सर्वच तारांचा अन्तर्भाव विभागांत झालाच पाहिजे आतां कोणी 'मघापचक' ह्याच नांवावर जोर दिला, तरी 'म्यू' ही तारा तरी निर्विवाद रीतीनें मघाविभागाची आरंभमर्यादा ठरते शेवटची 'एप्सीयलॉन' तारा ही मुद्दां वगळण्याचें कारण नाहीं परंतु 'म्यू' आणि 'एप्सीयलॉन' ह्यांच्या दरम्यान मघाविभागाची सीमा स्वाधीनें असली गेली होती असें म्हटलें तरी आमचे विधानास बाध येत नाहीं.

ह्याप्रमाणें मघानक्षत्रविभागाची आरंभमर्यादा अगदीं अनपेक्षित परंतु स्वतंत्र प्रमाणानें वैदिक वाङ्मयांतील ग्रंथावरूनच सिद्ध होते, आणि मैत्र्युपनिषदामध्यें मघाविभागारंभ मध्यम भोगाप्रमाणें निर्दिष्ट केला आहे, म्हणून त्याचा स्पष्ट भोग काढल्याशिवाय आरंभस्थाननिर्णयाच्या कामीं त्याचा द्वारा तितका उपयोग होणार नाहीं. तेव्हां 'म्यु' तारेचा भोग १४०°३०' हे मध्यम समजून मैत्र्युपनिषत्कालीन स्पष्ट भोग किती झाले असते तें पाहिलें पाहिजे.

मघाविभागाच्या आरंभाचा भोग १४०° ३०′ ( शके १८५० ), ह्यातून दक्षिणायनबिन्दूचा भोग ९०° कमी केला म्हणजे बाकी ( १४०°३०′−९०= ) ५०° ३०′ राहते हें अन्तर मैत्र्युपनिषदापासून आतापर्यंतचें अयनचलन होय. त्यावरून मैत्र्युपनिषत्काल (५०° ३०′×७२= ) ३६३६ वर्षांपूर्वी, किंवा शकापूर्वी सुमारें १८०० वर्षांइतका येतो. ह्या वेळीं रविउच्च ४०° अंश होतें, त्यावरून दक्षिणायनकालीं रविकेन्द्र ५०° अंश येतें, आणि परमफल १२७′ असल्याकारणानें मंद फल−१२७′भुजज्या ५०°=१° ३५′ ऋण येतें, त्याचा संस्कार मध्यमभोग १४०° ६०′ याला केला म्हणजे १३८° ५५ हे मघाविभागारंभाचे सायन स्पष्ट भोग होतात. मघारंभाच्या पश्चिमेस नक्षत्रकालाच्या पूर्णपटीइतक्या अन्तरावर असणारी तारा कृत्तिकेशिवाय नाहींच. वरील भागातून कृत्तिकेचा स्पष्ट सायनभोग वजा केला असता बाकी ८० म्हणजे बरोबर सहा नक्षत्रांइतकी बाकी राहते म्हणून मैत्र्युपनिषदुक्त मघाविभाग हे कृत्तिकाप्रयुक्तच होत हें निर्विवाद ठरतें. ह्यावरून एक आक्षेपक असें म्हणतो कीं, पूर्वी कृत्तिकादि गणना किंवा विभागपद्धति प्रचारात असली तरी पुढें विभागपद्धति झाली नसेल असें काय म्हणून म्हणावें ? लो० टिळकाच्या पुस्तकात 'सर्वेषां नक्षत्राणां कर्मसु कृत्तिका प्रथमम् आचक्षते। श्रविष्ठा तु सख्यायाः॥' असें गर्गवाक्य दिलें आहे. परंतु त्याचा अर्थ आक्षेपकास समजला नाहीं. उदगयनाचा मूळ अर्थ 'उत्तरगोलात प्रवेश' हा नष्ट होऊन परमदक्षिणक्रांति असा प्रचारात आला तरी नक्षत्रेष्टि जुन्या अर्थाप्रमाणेंच होत असत, ह्याला उद्देशून वरील वाक्य आहे. तेथें विभागपद्धतीचा संबंधच नाहीं. वेदांगकारानें जे काहीं केलें आहे तें इतकेंच कीं, धनिष्ठाविभागारंभीं उदगयन असल्यानें त्यानें पंचांगाचें गणित उदगयनापासून अर्थात् धनिष्ठा विभागापासून दिलें आहे. वेदांगगणितामध्यें विभागपद्धतीच आहे. वेदांगकारानें गणिताची पद्धति बदलली, परंतु तेवढ्यावरून नक्षत्रविभाग बदलला हें म्हणणें खोटें तर आहेच, पण अप्रामाणिकपणाचेंहि आहे. कारण नक्षत्रविभाग वेदांगापूर्वींच निदान पाचशें वर्षें तरी ठरले होते हें मैत्र्युपनिषदाच्या वाचनिक प्रमाणानेच सिद्ध आहे. कृत्तिकेवरून नक्षत्रविभाग ठरले, म्हणूनच कृत्तिकादि गणना प्रचारात आली. नाहीं तर कृत्तिकादि गणनेचें कारण काय ? त्या गणनेप्रमाणें पूर्वी गणितहि करीत असलेच पाहिजेत. त्याशिवाय मघाविभागाच्या आरंभीं दक्षिणायन असा उल्लेख संभवला नसता. पुढें कालाच्या चक्राप्रमाणें धनिष्ठाविभागारंभीं उदगयन होऊ लागल्यापासून वेदांग प्रथकर्त्यानें पंचांगगणिताची पद्धति बदलली. परंतु विभागपद्धति बदलली नाहीं आणि बदलणें शक्य नव्हतें. 'सर्वेषां नक्षत्राणां कर्मसु कृत्तिका प्रथमम् आचक्षते' ह्याचा अर्थच हा कीं, यज्ञकर्म आणि नक्षत्रविभाग यांच्या संबंधानें कृत्तिकेचें महत्त्व नष्ट झालें नाहीं. तें कायमच राहिलें. 'श्रविष्ठा तु सख्यायाः' म्हणजे गणितपद्धति मात्र वेदांगज्योतिषानें धनिष्ठाविभागारंभ धरून बसविली, परंतु पूर्वीच नक्षत्रविभाग बदलणें शक्य नसतें. धनिष्ठारंभीं ज्याप्रमाणें उदगयन होत होतें त्याप्रमाणें शकापूर्वी ४०० वर्षांच्या सुमारास तें श्रवणविभागारंभीं होऊ लागलें, आणि श्रवणादि गणना सुरू झाली. श्रवणादि गणनेचा उल्लेख महाभारतातहि आहे.

प्रतिश्रवणपूर्वाणि नक्षत्राणि चकार सः।
श्रवणादीनि ऋक्षाणि ऋतवः शिशिरादयः॥

ह्या श्लोकार्धात श्रवण आणि शिशिर ऋतु यांचें साहचर्य आणि श्रवणादीनि असा शब्दप्रयोग, श्रवणारंभीं उदगयन होऊ लागलें त्या कालाला उद्देशून आहे. ज्यो० दीक्षित ह्यांचाहि अभिप्राय असाच आहे. श्रवणादि पद्धति धनिष्ठादि पद्धतीनंतर प्रचारात आली, आणि श्रवणादि पद्धतीनंतर अश्विन्यादि पद्धति सुरू झाली. ह्या गणिताच्या निरनिराळ्या पद्धती झाल्या तरी मूळची विभागपद्धतीच कायम राहिली आणि म्हणूनच तिच्या परंपरेला अत्यंत महत्त्व आहे. सर्वांत जुनी पद्धति पाहिजे असेल तर कृत्तिकादि घ्यावी लागेल आणि त्या मानानें आपल्याला अगदीं निकटची हवी असेल तर श्रवणादि घेतली पाहिजे आणि श्रवणाच्या योगतारेपासून विभाग मानले पाहिजे. असें असतां ही मर्यादेच उपस्तंभ धनिष्ठा कोण ? वास्तविक पाहिलें तर जशी कृत्तिकादि गणनेनंतर धनिष्ठा, तशीच धनिष्ठेनंतर श्रवणादि गणना चालू झाली. तिचा काल शकापूर्वी ४०० वर्षांचा आहे. मग श्रवणादि विभाग कां मानू नयेत ? तर ह्याचें

कारण इतकेंच कीं, कृत्तिकादि विभाग हे अत्यंत प्राचीन आहेत, आणि मैत्र्युपनिषत् आणि शुद्ध वेदांगज्योतिष ह्यांतहि तीच विभागपद्धति आहे. **सर्वांत प्राचीन पद्धति पाहिजे असेल तर कृत्तिकादि पद्धतीच घेतली पाहिजे,** आणि अर्वाचीन पाहिजे असेल तर श्रवणादि पद्धतीचा स्वीकार केला पाहिजे. मधल्याच कोठल्या तरी खोट्या आणि निराधार अशा धनिष्ठादि पद्धतीचें स्तोम कोणिहि चालू देणार नाहीं. कारण 'धनिष्ठा' पद्धति ही कृत्तिकापद्धतीहून स्वतंत्र आणि भिन्न नव्हे. कृत्तिका योगतारेपासून केलेल्या विभागानुसार जो धनिष्ठाविभागारंभ तेथें मध्यम उदगयन होऊं लागल्यापासून वेदांगज्योतिषकारानें जी पद्धति सुरू केली तिलाच धनिष्ठापद्धति कोणी कोणी म्हणतात. परंतु ती आणि कृत्तिकाप्रमुख विभागपद्धति ह्या स्वरूपतः एकच आहेत हें आतां वेदांगावरूनच ठरतें असें दाखवितों.

मैत्र्युपनिषदांत कृत्तिकारंभस्थान विवक्षित असलें तरी तें वेदांगज्योतिषांतहि आहे हें कशावरून? ह्याला उत्तर असें कीं, *विभागपद्धति मूळ जेथून सुरू होते तेथें आरंभस्थानीं तारा असते.* परंतु इतर विभागारंभीं तारा असतेच असें नाहीं. यामुळें धनिष्ठाविभागारंभीं तारा नाहीं. आणि धनिष्ठारंभींची उदगयन स्थिति ज्या श्लोकानें वर्णिली आहे त्या श्लोकावरून पाहतां धनिष्ठविभागारंभीं तारा मानिली नाहीं हें उघड आहे. वेदांगकालीं जर विभाग नवीन पाडलेले असते तर विभागारंभीं तारा अवश्यमेव मानिली पाहिजे होती. परंतु वेदांगकालीन नवीन विभाग पाडण्याचें कारण नव्हतें आणि नवीन विभाग सर्वमान्य होणेंहि अशक्य होतें. म्हणून वेदांगांतील विभाग देखील कृत्तिकाप्रमुखच आहेत. "प्रपद्येते श्रविष्ठादौ सूर्याचन्द्रमसावुदक्" ॥ ह्या श्लोकामध्यें श्रविष्ठादौ ह्या पदानें धनिष्ठाविभागच दर्शविला आहे. तेथें *तारापुंज असा अर्थ विवक्षित नाहीं. तारापुंज जर विवक्षित असता तर श्रविष्ठादौ असें पद न घालतां* 'श्रविष्ठायां' किंवा 'श्रविष्ठासु' असें पद निश्चितपणें तेथें ज्योतिषकाराला लिहितां आलें असतें. परंतु तेथें 'श्रविष्ठादौ' असें पद असल्यानें तारका-शून्य, किंवा तारकाविरहित धनिष्ठाविभागाचा आरंभ असाच अर्थ तेथें केला पाहिजे. हा अर्थ केतकी पक्षाचा प्राणघात करील, परंतु खोट्या पक्षाचा प्राणघात झाल्यास हळहळण्याचें मुळींच कारण नाहीं. 'स्वराक्रमेते सोमार्कौ यदा साकं सवासवौ' ह्या श्लोकांत "वासव" म्हणजे 'धनिष्ठा नक्षत्र' येवढाच अर्थ, तेथें विभाग किंवा तारा असा कोणताच अर्थ विवक्षित नाहीं. वेदांगामध्यें जेव्हां तारा विवक्षित असते तेव्हां पदरचना त्या अर्थाला अनुकूल अशीच असते. उदाहरणार्थ.—

श्रविष्ठाभ्यो गणाभ्यस्तान् प्राक् विलग्नान् विनिर्दिशेत् ॥ ह्या श्लोकांत 'श्रविष्ठाभ्यो' ह्या पदाचा अर्थ विभाग असा होणारच नाहीं, तारापुंज असाच तेथें अर्थ होतो. हा श्लोकहि केतकी पक्षाचा मारक आहे. ह्या श्लोकार्धाचा अर्थ ज्यो दीक्षित यांनीं ज्योतिःशास्त्राच्या इतिहासांत दिला नाहीं व लोकमान्यांनींहि दिला नाहीं. परंतु लोकमान्यांनीं Vedic Calendar ह्या ग्रंथांत केलेल्या विवेचनामुळें ह्या श्लोकाच्या अर्थाविषयीं मुळींच संशय राहात नाहीं ह्या श्लोकाचा अर्थ येथें देण्याची तूर्त आवश्यकता नाहीं. कारण बार्हस्पत्य, *सुधाकर द्विवेदी, इत्यादि पंडितांनीं केलेल्या निरनिराळ्या अर्थांचा ऊहापोह करावा लागेल व उगाच लेख* विस्तार होईल. तथापि विभाग आणि तारापुंज असे दोनहि अर्थ दर्शविण्याची पद्धति वेदांगामध्यें निर *निराळी आहे एवढें सिद्ध होण्यास आणि श्रविष्ठादौ ह्या पदानें तारानिरपेक्ष विभागारंभ असाच अर्थ विवक्षित* आहे. येवढें निश्चित समजण्यास वरील विवेचन पुरेसें आहे.

वेदांगामध्यें आरंभ-धनिष्ठा हें आरंभस्थान मानलें नाहीं ह्याचें एक प्रमाण धनिष्ठाविभागारंभीं ती तारा नाहीं हें तर आहेच, पण ह्या शिवाय दुसरेंहि अत्यंत महत्त्वाचें प्रमाण असें आहे कीं, धनिष्ठारंभ आणि चित्रा तारा ह्यांतील अन्तर वेदांगामध्यें अगदीं स्पष्टपणें सांगितलें आहे. ह्याला चित्राचंद्रयुति असेंहि कोणी म्हणतात. परंतु वास्तविकपणें ही युति नव्हे. कारण हा चंद्र स्पष्टचंद्र नाहीं, मध्यमचंद्र आहे. ह्या युति *वर्गनाथ्या कारिका गर्गाचार्यांनीं दिल्या आहेत त्यावरून पांच युतींचें कोष्टक करतां येतें, परंतु त्यांतील दोनच युति निश्चित आहेत म्हणजे पहिल्या युतीमध्यें धनिष्ठाविभागारंभापासून चित्रा तारेचें अंतर, आणि दुसऱ्या* युतीमध्यें श्लोकाच्या अर्धांपासून अनुराधा तारेचें अंतर दिलें आहे. आक्षेपार्यबिंदु धनिष्ठाविभागारंभापासून बरोबर १८० अंश असल्यानें दुसऱ्या युतीवरून धनिष्ठारंभ आणि अनुराधा योगतारा यांचेंच अंतर निघतें.

बाकीच्या तीन युतींमध्यें दिलेले अंतर कोणत्याही निश्चित विभागापासून नाहीं. म्हणून प्रस्तुत निर्णयाला त्या निरुपयोगी आहेत.

चित्रा तारा आणि अनुराधा तारा याचें अंतर कोष्टकरूपानें देतों.

| माघ | चंद्र | नंतर | श्राव | मध्यम चंद्र |
|---|---|---|---|---|
| शु. १ आरंभ | धनिष्ठारंभीं | १८३ दिवसांनीं | शु. ७ आरंभीं | चित्रा तारेशीं |
| माघ कृष्ण १० | चंद्र अनुराधा तारेशीं | त्यानंतर १८३ दिवसांनीं | श्रावण शु. १ आरंभीं | चंद्र आश्लेषार्धीं |

यामध्यें धनिष्ठारंभापासून चित्रा तारा आणि आश्लेषार्धापासून अनुराधा तारा याचे भोग वेदांगामध्यें सांगितले आहेत. वैदिक वाङ्मयामध्यें हे भोग अत्यंत प्राचीन होत. पैकीं अनुराधेचा भोग केतकीपक्षाच्या लक्षातच आला नाहीं आणि चित्राभोगाच्या गणितांत त्यानीं भयंकर चुका केल्या आहेत म्हणून वाचकांना त्यातील चुका कळण्यास वेदांगगणिताच्या पद्धतीची थोडक्यांत माहिती येथें दिली पाहिजे.

( १ ) त्रिंशत्यन्हां सषट् षष्टिः अब्दः षड्ऋतवोऽयने
मासाः द्वादशाः सौराः स्युरेतत् पंचगुणं युगम् ॥

अर्थ—वर्षाचे सावन दिवस ३६६, ऋतु सहा, अयनें दोन आणि महिने बारा याप्रमाणें विभाग आहेत. अर्थात् एका अयनामध्यें १८३ दिवस येतात. ज्यो. दीक्षितानींहि १८३ च दिवस मानले आहेत (भा. ज्यो. इ. पान ९६). परंतु केतकीपक्षाचे अग्रणी केतकर ह्यांनीं आपल्या पक्षाच्या गणितात १८२ दि. ३७ घटि, १६ पळें इतके अयन मानून वेदांगगणिताच्या विरुद्ध जाऊन २३ घटका नष्ट केल्या आहेत.

( २ ) ससप्तकं भयुक् स्योनः सूर्यो शूनि त्रयोदश ।
नवमानि च पञ्चान्हः ॥

अर्थः—एक सप्तक आणि एक सावन दिवस इतका काल चंद्र एका नक्षत्रीं राहतो; आणि सूर्य १३$\frac{5}{9}$ दिवस राहतो (नक्षत्राचे लव १२४, किंवा अंश १३° २०').

( ३ ) सावनेन्दु-स्तृ-मासानां षष्टिः सैका द्विसप्तिका ॥

अर्थ—एका युगांत सावन मास ६१, चान्द्रमास ६२, आणि चंद्राचे नक्षत्रमास ६७ होतात. ३० दिवसांचा सावनमास, आणि ३० तिथींचा चान्द्र मास होतो.

कोष्टकाच्या पहिल्या स्तंभात असें आहे कीं, चन्द्र हा वेदांगकालीं उदगयनाच्या सुरुवातीस धनिष्ठा-विभागारंभीं असतो आणि दक्षिणायनाच्या वेळीं चित्रा तारेशीं युक्त होतो म्हणजे (क) उदगयनापासून दक्षिणायनापर्यंत जितके दिवस, आणि (ख) त्या दिवसांची जी मध्यम चन्द्रगति तितकें (ग) धनिष्ठारंभापासून चित्रा तारेचें अन्तर असावयाचें; आणि इतकेंच अन्तर जर आल्हा आणि चित्रा ह्यांच्यामध्यें असेल तरच आल्का तारा धनिष्ठाविभागारंभीं आहे असें ठरेल; आणि जर तसें नसेल तर धनिष्ठाविभाग आल्हापासून केलेला नाहीं हेंच सिद्ध होईल. म्हणून वेदांगपद्धतीप्रमाणें चित्रा आणि अनुराधा ह्यांचें धनिष्ठाविभागापासून किती अन्तर येतें तें पाहूं.

वर उद्धृत केलेल्या वेदांगांतील ( १ ) श्लोकाप्रमाणें अयनातील दिनसंख्या १८३ होते. म्हणून वेदांगपद्धतीप्रमाणें १८३ दिवसांची जी चन्द्राची मध्यमगति हेंच धनिष्ठारंभापासून चित्रा तारेचें अंतर होय. अथवा उदगयनारंभापासून दक्षिणायनापर्यंत १३ पर्वें आणि ६ तिथी होतात तर इतक्या अवधीची चन्द्रगति काढली तरी अन्तर तेंच यावयाचें.

ही चन्द्रगति आधुनिक गणितानें ६ चक्रें २५१° १७′ इतकी येते. आणि आश्चर्याची गोष्ट अशी कीं तितकीच गति वेदांगगणितानेंहि येते. एका युगात अयनें १०, चन्द्राचे नक्षत्रफेरे ६७, आणि एका नक्षत्रांत १३° २०′ म्हणून एका अयनात

$$\text{चंद्रगति} \frac{६७ \times २७ \text{ नक्षत्रें} \times १३° २०′}{१० \times ३६०} \text{ ६ चक्रें २५२°}$$

आता दुसऱ्या रीतीनें तीच गति येते. एका युगात १२४ पर्वें, एका अयनात १२ पर्वें आणि सहा तिथी आणि युगामध्यें चन्द्राचे फेरे ६७ म्हणून

$$\text{१२ पर्वांमध्यें चन्द्राचे } \frac{६७ \times १२}{१२४} \text{ ६ } \frac{१५}{३१} \text{ चक्रें होतात.}$$

एका चक्रामध्यें ३६० अंश, म्हणून $\frac{१५}{३१}$ चक्रात १७४° ११′ ३६″ होतात. आतां एका युगात तिथी १८६० आणि चंद्राचे फेरे ६७×२७ म्हणून

$$\text{६ तिथींमध्य } \frac{६७ \times २७ \times ६}{१८६०} \times १३° २०′ = ७७° ४८२३′$$

इतके अंश येतात आणि एका तिथींमध्यें १२° ५८′ ४″ इतके येतात. आधुनिक गणितानें ६ तिथींमध्यें चन्द्रगति ७७° ४७′ २५″ इतकी आहे. असें असता केतकी पक्षांतील एक जोशी ह्यांनीं एका तिथीची चन्द्रगति १२° च मानून ६ तिथींची चन्द्र गति त्यांनीं आपल्या गणितामध्यें ७२ अंशच दिली आहे. आणि अशा रीतीनें सहा तिथींमध्यें त्यांनीं जवळ जवळ सहा अंश गाळून टाकून चुकीचे आंकडे दिले आहेत. ७७॥ अंशाचे ऐवजी त्यांनीं दिलेली ७२ अंश गति चुकीची आहे. अर्थात् त्याच्यावरून काढलेलें अनुमानाहि चुकीचें आहे.

याप्रमाणें दुसऱ्या रीतीनेंहि चन्द्राची अयनगति १७४° ११′ ३६″ + ७७° ४८′ २३″ म्हणजे सुमारें २५२ अंशच येते. यावरून चद्राची आधुनिक गति २५१° १७′ हीच वेदांगामध्येंहि आहे असें दिसतें.

कोष्टकांतील दुसऱ्या स्तंभात आश्लेषार्धापासून अनुराधा तारेपर्यंतचें अन्तरहि चंद्राच्या एका अयनगतीइतकें म्हणजे आतां सिद्ध केल्याप्रमाणें २५१ अंश होतें. आणि आश्लेषार्धापासून धनिष्ठारंभ १८० अंश असल्यानें अनुराधा तारा आश्लेषार्धापासून वेदांगगणिताप्रमाणें ( २५१–१८० = ) ७१ अंश पूर्वेस येते. त्याचप्रमाणें धनिष्ठारंभापासून चित्रा तारेचें अन्तर वेदांगगणिताप्रमाणें चन्द्राच्या एका अयनगतीइतकें म्हणजे २५१° येतें तर हीं दोनहि अंतरें, किंवा वेदांगाप्रमाणें चित्रा आणि अनुराधा ह्यांचे धनिष्ठारंभापासूनचे भोग, आणि आल्हा तारेचें चित्रा आणि अनुराधा ह्यांच्यापर्यंतचे अन्तर यांची तुलना करूं.

धनिष्ठारंभ आणि चित्रा तारा ह्यांच्यांतील अन्तर वेदांगाप्रमाणें———२५१°.
आल्हा धनिष्ठा आणि चित्रा ह्यांच्यांतील अन्तर———२४६° २८′
ह्यावरून वेदांगांतील धनिष्ठारंभ आल्हाच्या पश्चिमेस ४॥ अंशावर येतो.
धनिष्ठारंभ आणि अनुराधा तारा ह्यांच्यातील अन्तर वेदांगाप्रमाणें———७१°
आल्हाधनिष्ठा आणि अनुराधा ह्यांच्यांतील अन्तर———७४–४१

म्हणजे वेदांगांतील धनिष्ठारंभ आल्फाच्या पश्चिमेस ३॥। अंश आहे असें ठरतें. अर्थात् एकंदरीनें वेदांगांतील धनिष्ठारंभ आल्फा तारेच्या पश्चिमेस सवा अंशांवर आहे असें निःसंशय सिद्ध होतें.

धनिष्ठा–पुंजांतील योगतारा बीटा आहे. ती आल्फाच्या पश्चिमेस सवा अंशावर आहे. आणि वेदांगमध्यें जें उदगयन निर्दिष्ट आहे तें मध्यम असल्यानें स्पष्ट उदगयन धनिष्ठारंभापासून दीड अंश पूर्वेसच असणार हे उघड आहे. म्हणून स्पष्ट उदगयन बीटा तारेंत होत होतें असें मानलें तरी मध्यम उदगयन आल्फाच्या पश्चिमेस ( १। + १॥ = २॥। ) निदान २॥। अंश तरी होतें, तेव्हां याहि दृष्टीनें आल्फा तारा धनिष्ठाविभागारंभीं येत नाहीं. एवंच वेदांगोक्त धनिष्ठारंभ आल्फाच्या पश्चिमेस

## चार अंश असल्यानें

वेदांगकालीन आरंभस्थानहि कृत्तिका योगताराच होय यांत आतां लवमात्रहि संदेह उरला नाहीं. (कारण कृत्तिकाप्रयुक्त धनिष्ठारंभ देखील आल्फाच्या पश्चिमेस चारच अंशांवर येतो.

ह्याप्रमाणें सर्व बाजूंनीं केतकी पक्षाची बाजू लंगडी पडत आहे. म्हणून निराशेच्या भरांत त्यांनीं शकापूर्वी १४९९ या वर्षाचें आणि शकाच्या पहिल्याच वर्षाचें, ह्याप्रमाणें दोन गणितें दिलीं आहेत. त्यांना केतकीपक्षीय युतिगणित म्हणतात. हीं दोन्ही गणितें अगदीं चुकीचीं आहेत. हें कोणत्याही गणितशास्त्रें सिद्ध करून देतां येईल म्हणून स्थलसंकोचास्तव त्याचा विचार येथें करीत नाहीं.

आतां एकच मुद्दा शिल्लक राहिला आहे. तो असा कीं, कृत्तिकाविभाग हेच प्राचीन विभाग कशावरून ! कृत्तिकेच्या पूर्वी रोहिणी, तिच्या पूर्वी मृग, आर्द्रा आणि पुनर्वसु ह्यांच्यामध्यें संपात असल्यानें ह्या निरनिराळ्या गणना अत्यंत प्राचीनकाळीं होत्या. परंतु नक्षत्रांचे समान विभाग त्या काळीं प्रचारात नव्हते. त्या वेळीं वर्ष ऋतुमानाप्रमाणें धरीत असून महिने मधु–माधव ह्याप्रमाणें असत. पुढें जेव्हां चैत्रादि मास उत्पन्न झाले तेव्हांच अधिक चान्द्रमासांची प्रवृत्ति पडली. परंतु नक्षत्रांचे समान विभाग झाल्याशिवाय चैत्रादि मासांच्या प्रवृत्तीची उपपत्तीच लागत नाहीं. ज्यो० दीक्षित ह्यांच्या मतानें चैत्रादि संज्ञांचा काल शकापूर्वी २०००–३००० वर्षांचा आहे. म्हणून समान नक्षत्रविभाग हे संपांत कृत्तिका योगतारेसन्निध असण्याच्या काळीं प्रचारांत आले असले पाहिजेत.

याप्रमाणें कृत्तिकाविभागच सर्वांत प्राचीन ठरतात. मैत्र्युपनिषदांतील मघा, श्रविष्ठा हे विभाग कृत्तिकेपासूनच असल्याचें पूर्वी दाखविलें आहे, आणि प्रत्यक्ष वेदांगज्योतिषांतील धनिष्ठादि विभाग हे देखील कृत्तिका तारेपासूनच केले आहेत हे वर पूर्णपणें सिद्ध झालें आहे म्हणून

## कृत्तिकेचें सिंहासन अढळ

होय. प्राचीन सूर्यसिद्धान्तकारानें सुद्धां आपलें अश्विन्यादि आरंभस्थान घेतलें तें देखील कृत्तिकातारेवरूनच आणि निःशर रेवती योगतारा कृत्तिका प्रयुक्त अश्विन्यादि स्थानाच्या अत्यंत सन्निध असल्यानें आदि सूर्यसिद्धान्तकारानें रेवतीपासूनच अश्विनीमेषादि पद्धति नवीन प्रचलित करून आपला सिद्धांत शककालानंतर लवकरच प्रचारांत आणला. सूर्यसिद्धांताच्या कालापूर्वी कृत्तिकादि नक्षत्रगणना चालू होती. त्यानंतर मेषादि राशिगणना झाली तीच अजूनही चालू आहे. मेषादि आरंभस्थान हें अश्विन्यादि म्हणजे कृत्तिकाप्रयुक्तच आहे. अर्थात् कृत्तिकेची प्राचीन परंपरा सूर्यसिद्धांतकारानेंहि मेषादि गणनेमध्यें कायम केली. आपण हल्लीं मेषादि गणनाच मानीत असल्यानें सूर्यसिद्धांतसंमत जें कृत्तिकादि प्राचीन आरंभस्थान तेंच आपणास मान्य झालें पाहिजे. म्हणजे वैदिक परंपरा आणि सिद्धांतपरंपरा आपण पाळल्या असें होईल.

पूर्वी वर्ष गणितसोकर्यासाठीं जरी ३६६ दिवसांचे मानीत तरी महिने चान्द्र असल्यानें आणि ते दर ५ वर्षांनीं शुद्ध होत असल्यानें आरंभस्थान चलित झालें नाहीं. सूर्यसिद्धांतानें वर्षमान अधिक सूक्ष्म केलें, पण त्यांतील कसर सूर्यसिद्धांतपद्धति चालू झाल्यापासून साचू लागली. तथापि शके ४९६ या वर्षी आरंभस्थानीं संपात आल्यानें ती कसर निःशेष झाली म्हणजे श्रीयुत ज. स. करंदीकरांच्या मार्गेत सांतें

## ४९६ या वर्षी खाते बाकी पूज्य व अयनांश शून्य.

बाकी पूज्य होऊन आरभस्थान पुन शुद्ध झालें परतु येथें हें लक्षात ठेवलें पाहिजे कीं, वर्षारंभाचे चलन आणि अयनाश अथवा अयनचलन या दोन गोष्टी अगदीं स्वतत्र आहेत सध्या येथें विचार स्थिर आणि चल आरभस्थानाचा आहे, अयनाशाचा नाहीं.

सूर्यसिद्धांतातील आरभस्थान दरवर्षी ८॥ विकलांनीं पूर्वेकडे चळतें म्हणून त्याचें अचलस्थान निश्चित करता येत नाहीं अशी केतकीपक्षाची एक कोटी आहे परतु तिच्यामध्यें कांहीं अर्थ नाहीं. कारण सूर्यसिद्धात काहीं अनादि नाहीं. त्याची गणितपद्धति शकारभापासून चालू झाली असावी असें म्हणण्यास आधार आहे. कांहीं असलें तरी ८॥ विकलाची कसर शककालानतर साचत आली आहे. ती आरभ-स्थानाचा निश्चय झाल्यानें दूर होतें. सूर्यसिद्धाताचें मूळ अचल आरभस्थान बिनचूक व निश्चित होतें तें असें—

अचल आरभस्थान रेवती तारेंत किंवा तिच्या पूर्वेस असलें पाहिजे किंवा पश्चिमेस अतिसंनिध असलें पाहिजे. कोणीकडेहि तें असलें तरी निदान अर्ध्या अशापेक्षा जास्त अतरावर पाहिजे. कारण त्याशिवाय फरक दृष्टोत्पत्तीस येणार नाहीं.

तें आरभस्थान पूर्वेस अर्धा अश आहे अशी कल्पना केली तर सूर्यसिद्धाताचा काल शकानतर पांचव्या शतकात जातो. परतु हें विसगत आहे. कारण वराहकालाच्या वेळीं (शके ४२७) देखील सूर्य सिद्धात प्राचीन म्हणून गणला होता अर्थात् तो वराहापूर्वी तीनशें वर्षे तरी झाला असला पाहिजे. बरें, खरें अचल आरभस्थान रेवतीच्या पश्चिमेस मानलें, तर मेषारभ रेवती नक्षत्राच्या आंत पडतो परतु रेवती तारा हाच मीनान्त होय. त्यामुळें आरभस्थान रेवतीच्या पश्चिमेसहि मानता येत नाहीं म्हणून सूर्यसिद्धांतोक्त अचल आरभस्थान

रेवती तारा जयंती ( झीटापिसिसम ) हेंच ठरतें

आणि तेथपासूनच वर्षारंभ पूर्वेकडे सरकू लागला. आरभस्थान आणि सपात ह्याचा मीलनकाल तेंच शून्यायनाश वर्ष अशी व्याख्या पुढें प्रचारात आल्यावर खातेबाकी दोनदा पूज्य झाली. एकदां, शके ४४४ ते ४५० पर्यंत ह्यावेळीं सिद्धांतातील चल आरभस्थान रेवतीपासून फक्त अर्ध्या अशावर होतें. दुसरा प्रसग शके ४९६ साली झाला. या वेळीं सपात शुद्ध रेवती तारेसंनिधच म्हणजे अचल आरभस्थानींच होता. आणि म्हणूनच शके ४४४ ते ४९६ च्या पूर्वी साचलेल्या चुकीचा विचार करण्याचें कारण नाहीं असें श्रीयुत करंदीकर म्हणतात तें अगदीं शास्त्रशुद्ध आहे. परतु हें स्पष्ट दाखविण्यास येवढा विस्तार करावा लागला. वरील विवेचनावरून वेदांगापासून ते सिद्धातकालापर्यंत कृत्तिकाप्रमुख आरभस्थानाची परंपरा कशी अव्याहत आहे तें अगदीं विशद होते परतु मुख्य मुद्दे सकलित रीतीनें ध्यानात राहण्यासाठीं पुनरुक्तिदोष पत्करूनहि ते पुन सागतों.

१ कृत्तिकाप्रमुख नक्षत्रविभाग हेच सर्वात प्राचीन होत

२ मघापुजामध्यें सहा ताराचा अतर्भाव होतो

३ त्यांतील म्यू तारेच्या पश्चिमेस दीड अशावर मैत्र्युपनिषदुक्त मघाविभागाचा प्रारभ कृत्तिकादि विभाग पद्धतीप्रमाणें होत होता.

४ वेदांगामध्येंही नक्षत्रविभागपद्धति कृत्तिकादिच आहे.

५ वेदांगामध्यें ही धनिष्ठारभापासून चित्रा तारेचें अन्तर आणि अनुराधा तारेपासून आश्लेषार्धबिंदूचें अन्तर २९२ अशच दिलेलें आहे

( अ ) त्यावरून वेदांगोक्त धनिष्ठारभ हा आल्फा डेल्फिनीच्या पश्चिमेस सुमारें चार अशावर येतो.

( आ ) धनिष्ठापुजातील योगतारा बीटा डेल्फिनी होय, आल्फा नव्हे.

६ धनिष्ठादि कालानतर शकापूर्वी ४०० वर्षांपासून श्रवणादि पद्धति सुरू झाली. परतु नक्षत्रविमाग मात्र कृत्तिकादीच कायम राहिले.

७ शकारंभी किंवा शकापूर्वीपासूनच सिद्धांतपद्धति चालू झाली. त्या पद्धतींत गणित मेषादि राशिपद्धतीनें होऊं लागलें, आणि अश्विन्यादि तोच मेषादि ठरला.

( अ ) परंतु अश्विन्यादि आरंभाची तारा ही कृत्तिकाविभागावरूनच ठरविली गेली.

( आ ) सूर्यसिद्धांताचें अचलस्थान रेवती तारा हेंच आहे. दुसरें आरंभस्थान होऊंच शकत नाहीं.

८ वर्षमानाच्या आधिक्यानें होणारें चलन शके ४४४ च्या सुमारास जवळ जवळ शून्य होतें. पण शके ४९६ सालीं तें पूर्णपणें शून्य झालें; कारण संपात हा आरंभस्थानींच आला.

याप्रमाणें वैदिक आरंभस्थानाचा इतिहास आहे. त्यावरून टिळक पंचांगाचें आरंभस्थान तेंच खरें वैदिक आरंभस्थान कसें तें स्पष्ट होते. हेंच आरंभस्थान केवळ अर्ध्या अंशाच्या फरकानें भास्कराचार्य व ग्रहलाघवकार ह्यानीहि स्वीकारलें आहे. म्हणून टिळक पंचांगाची जी परंपरा तीच ग्रहलाघवाचीहि होय. चुकी साचली ती शके ४४४ पासून किंवा ४९६ पासून पुढें साचली, तेवढी काढली म्हणजे आरंभस्थानासंबंधानें राशिचक्राच्या बाबतींत पंचांग शुद्ध झालें.

याप्रमाणें कृत्तिकेचें सिंहासन अढळ होऊन संहिताकाराची भविष्यवाणी जी खरी ठरली ही कीं—

अग्निर्नः पातु कृत्तिकाः । नक्षत्रदेवामिन्द्रियम् ॥

---

# वेधसिद्ध–अयनांश–निर्णय.

आरंभस्थान व शून्यायनांशवर्ष या बाबतींत वेधसिद्ध पुरावा व तोही निर्विवाद असा खालीलप्रमाणें आहे.

( १ ) शून्यायनांश वर्ष कोणतें या बाबतींत ग्रंथोक्त अनेक आधार आहेत व त्यावरून ४५०ते५०० च्या दरम्यान शून्यायनांश वर्षकाल येतो. ४५० ते ५०० हें वर्ष प्रत्यक्ष वेध घेऊन दिलेलें नाहीं असें कांहीं म्हणतात पण तें म्हणणें एकांगी असून सत्य स्थिति मुद्दाम दडविणारें आहे, असें म्हणावें लागतें. प्रत्यक्ष वेधसिद्ध अशा निश्चित पुराव्यावरून शके ५०० च्या जवळ शून्यायनांश वर्ष आहे हें सिद्ध होतें. तो पुरावा असा कीं, ग्रहलाघव आणि सिद्धांतशिरोमणीकार श्री. भास्कराचार्य यांच्यापूर्वी अनुक्रमें ९०० वर्षे व ५०० वर्षे म्हणजे शके ५५० मध्यें ब्राह्मस्फुटसिद्धांत झाला. ब्रह्मसिद्धांताचा कर्ता अत्यंत वेधकुशल होता याबद्दल सर्वांचें एकमत असून त्यानें स्वतः वेध घेतलेले आहेत. श्रीमत् भास्कराचार्यांनीं ब्रह्मगुप्ताचा उल्लेख "कृती जयति जिष्णुजो गणकचक्रचूडामणिः" अशा अलौकिक आदरदर्शक विशेषणानें केला आहे. त्यावरून त्याची योग्यता व वेधकुशलता किती श्रेष्ठ दर्जाची होती हें ध्यानांत येईल.

( २ ) अशा वेधज्ञ पुरुषानें वेध घेऊन प्रत्यक्ष प्रत्यय पाहिला तेव्हां त्यास असें आढळलें कीं, शके ५५० मध्यें वेधानें येणारी सायन संक्रांत ही प्रथागत निरयन संक्रांतीच्या ५४ घटका आधीं येते. व ही वस्तुस्थिति त्यानें स्पष्ट सांगितली आहे. या आरंभस्थान व शून्यायनांश निर्णायक वेधसिद्ध गोष्टीचें महत्व विशेष आहे. कारण सायन आणि निरयन संक्रांत एकाच वेळीं होणारें जें वर्ष तें शून्यायनांश वर्ष श्री. ब्रह्मगुप्तानें सायनसंक्रांतींत व निरयन संक्रांतींत ५४ घटिका फरक पडतो असें वेधसिद्ध दिलें आहे. शके ५५० मध्यें निरयन संक्रांतीच्या पूर्वी ५४ घटका सायन संक्रांत झाली. संपात विलोमगती असल्याकारणानें मागें हटत जातो अर्थात् तो ५४ कला मागें हटला. यावरून अचूक निश्चित सिद्ध होतें कीं, शके ५५० च्या पूर्वी ५४ कला मागें हटण्यास जितकीं वर्षे लागतील तितकीं वर्षे ५५० यांतून वजा केलीं म्हणजे जें वर्ष येईल तें शून्यायनांश वर्ष होय. व त्या वर्षी सायन संक्रांत आणि निरयन संक्रांत एका कालीं असलीच पाहिजे.

( ३ ) ५४ कला संपात मागें हटण्यास वार्षिक १ कला अयनगतीनें ५४ वर्षें लागतात ती ५५० यातून वजा करतां शके ४९६ हेंच शून्यायनांश वर्ष येतें.

साम्प्रतची सूक्ष्म वार्षिक अयनगति ५० विकला याप्रमाणें ५४ कलास सुमारें ६५ वर्षें लागतात तीं ५५० यातून वजा करतां शके ४८५ हा शून्यायनांशवर्ष काल येतो.

( ४ ) शके ५५० मध्यें ५४ घटका म्हणजे ५४ कला सायन व निरयन संक्रातींत अंतर, याचा अर्थ त्या वर्षी फक्त ५४ कला अयनांश होते हाच होय. यात वार्षिक १ कला गती व वार्षिक ५० विकला गती यामुळें ९ कलांचे अंतर येईलच. पण जरी शके ५५० मध्यें ५४ कला हेच अयनांश गृहीत धरले व तेथून शके १८५० पर्यंतच्या १३०० वर्षास ५० विकला अयनगतीनें गुणून अयनांश काढले तरी ते १९ अंश १ कला इतकेंच येतात. व त्यात ५४ वर्षांत स्थूल गतीमुळें वाढलेली कसर ९ कला वजा केली म्हणजे अयनांश १८ अं. ५२ कला हें शके १८५० सालीं आहेत ही गोष्ट वेधसिद्ध प्रमाणावरून सिद्ध होते. अर्थात् १८५८ सालीं अयनांश १८ अं. ५८ क. ५३ वि. येतात.

( ५ ) अशा तऱ्हेचा भरभक्कम व प्रत्यक्ष वेधाचा पुरावा असतांही तो नाकारून भलतेंच अयनांश धरणें केव्हाही योग्य होणार नाहीं. १-२ दुराग्रही व्यक्तींनीं आपल्या हट्टाकरितां शून्यायनांश वर्ष २५०, २२५ अगर २१५ आहे असें प्रतिपादन करण्याचा चंग बांधला आहे. पण तो निरर्थक, विनबुडाचा, निराधार, शास्त्रद्रोही व निष्फळ असा प्रयत्न आहे. शून्यायनांश वर्ष जर २५०-२१५ अगर २२५ असते तर ब्रह्मगुप्ताचे वेळीं अयनांश अनुक्रमें ५॥। अंश अगर ५॥ अंश आले असते. अर्थातच सायन व निरयन संक्रांतींतही ५॥, ५॥। दिवसांचा फरक आला असता. पण तशी गोष्ट घडलेली नाहीं. शके ५५० मध्यें फक्त ५४ घटकांचा म्हणजे ५४ कलांचाच फरक सायन व निरयन संक्रांतींत पडला हें वेधसिद्ध आहे व यावरूनच शके २५०, २२५ अगर २१५ हे शून्यायनांश वर्ष खोटें असून बनावट व त्याज्य आहे असें निखालस ठरतें शून्यायनांश वर्ष २५०-२२५ अगर २१५ आणण्याची ओढाताण केवळ स्वमताभिमानी स्वार्थी वृत्तीची आहे. त्यांत शास्त्रशुद्ध दृष्टी बिलकूल नाहीं.

( ६ ) आतां ब्रह्मगुप्ताच्या वेळचा निरयन मेषार्क हा चुकीच्या वर्षमानावरून आलेला आहे असें जे कोणी पेटीनें म्हणत असतील त्यांनीं हें चुकीचें वर्षमान कोणत्या शकापासून प्रचारांत आलें हें अगदीं निर्विवाद सिद्ध केलें पाहिजे. त्याखेरीज त्यांच्या मतास कार्डाचेंही महत्त्व नाहीं.

आमचें म्हणणें व सिद्धांत तत्त्व असें आहे कीं, शून्यायनांश वर्षकाल हा रवि आणि नक्षत्र यांच्या प्रत्यक्ष वेधावरून ठरलेला आहे. व तो यथायोग्य असा आहे.

( ७ ) सांप्रत वेधसिद्ध येणारी वार्षिक अयनगती ५०·२ ही सर्वांना मान्य आहे. आतां श्रीमत् भास्कराचार्य व ग्रहलाघवकार यांनीं वार्षिक अयनगति किती घेतली आहे हें पाहू.

( ८ ) शके ११०५ मध्यें भास्कराचार्यांनीं आपल्या काळचे घेतलेले अयनांश ११ अंश ० कला आणि शके १४४२ मध्यें ग्रहलाघवकारांनीं आपल्या वेळेचे दिलेले अयनांश १६ अंश ३८ कला म्हणजे या दोन ग्रंथांच्या दरम्यानच्या ३३७ वर्षांत सु ३३७ कला अयनांशाची वाढ झाली. अर्थात् त्यांची अयनगति वर्षास १ कला आली. यावरून असें सिद्ध होतें कीं, अयनगति शून्यायनांश वर्षापासून १कलाच धरण्यांत आली आहे. पण खरी वेधसिद्ध अयनगति ५० वि. १० प्र. विकला इतकी आहे. म्हणजे शून्यायनांश वर्षापासून शके १८५० पर्यंतच्या कालास दरवर्षास जास्त धरलेली ९ वि. ५० प्र. विकला इतक्या गतीनें येणारें फल ब्रह्मगुप्ताच्या वेधानें सिद्ध झालेल्या शून्यायनांश शक वर्ष ४९६ या वर्षापासून १८५० पर्यंत १ कला गतीनें येणाऱ्या अयनांशांतून वजा केलें पाहिजे. तसें केलें असतां शुद्ध व प्रत्यक्ष वेधोपलब्ध अयनांश शके १८५० मध्यें १८ अंश ५२ कला इतकेच बरोबर येतात. ( पूर्वीच्या बऱ्याच ग्रंथांत अयनगति १ धरली आहे ती स्थूलच आहे.)

( ९ ) तात्पर्य निरनिराळ्या प्रकारानें व निरनिराळ्या पद्धतीनें, त्याचप्रमाणें वेधाचार्य श्री ब्रह्मगुप्त

" गणकचक्रचूडामणी " यानीं दिलेल्या प्रत्यक्ष वेधसिद्ध गणितानें शून्यायनाश वर्ष ४९६ व शके १८५० चे शुद्ध अयनाश १८ अश ५२ कला हेच येतात.

श्रीमत् भास्कराचार्यांच्या वेधावरून व श्रीगणेशदैवज्ञाच्या वेधावरूनही तेंच सिद्ध होतें अर्थात् कोणी कितीहि लटपट व गडबड करून लोकाना मुरळ पाडण्याचा प्रयत्न केला तरी वर जीं प्रत्यक्षप्रमाणें दर्शविलीं आहेत त्याला केव्हाही बाध येणार नाहीं, तीं अबाधितच राहणार व त्या प्रमाणावरून प्रामाणिक पचागशोधकाकडून एकच निर्णय निघणार कीं, शके १८५० सालीं शुद्ध अयनाश १८ अश ५२ कला हेंच आहेत व १८ अश ५२ कला ज्या पचागाचे अयनाश आहेत तेंच पचाग श्रुतिसमत व सिद्धातसमत खरें शास्त्रशुद्ध पचाग होय

( १० ) साप्रतच्या ग्रहलाघवा अयनांशावरून शके ४२० पासून किंवा ४५० ते ५०० हा शून्यायनाशाचा काल निश्चित येतो, पण तो चुकीच्या अयनगतीनें येतो असा कांहीं व्यक्तींचा खोटा आक्षेप आहे. या आक्षेपाच्या खडनार्थ ब्रह्मस्फुटसिद्धाताचा पुरावा फार महत्त्वाचा आहे कारण ब्रह्मगुप्तच्या वेळीं अयनाश जास्त वाढलेले नव्हते व त्यामुळें चुकीच्या अयनगतीनें चुकीचे शून्यायनांश वर्ष निघते असा फोल व खोटा आक्षेप घेण्यास कोणास जागाच राहत नाहीं, ब्रह्मगुप्तकालीं फक्त ५४ कला अयनाश असल्यानें १ कला अगर ५० विकला या दोन्ही गतीनें पाहिलें तरी शून्यायनाश वर्ष ४९६ अगर जास्तीत जास्त ४८५ याच्या पूर्वी जात नाहीं अर्थात् शून्यायनाश वर्ष ४९६ च्या अगदीं सन्निध आहे. एवढेंच नव्हे तर ४९६ हेंच आहे ही गोष्ट ब्रह्मगुप्ताच्या वेधावरून सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट होते व चुकीच्या अयनगतीवरून शून्यायनाश वर्ष काढण्याबद्दलचा आक्षेपही सर्वस्वी खोटा व निर्मूल ठरतो

## अखिल भारतीय ज्योतिष्यांच्या मतानें चित्रापक्ष अशास्त्र.

( १२ ) हिंदुस्थानातील सर्व ज्योतिष्याच्या मतानें चित्रापक्ष व तत्सबधीं ऐक्यवर्धक पक्ष हे दोन्ही पक्ष अशास्त्र व धर्मविरोधी आहेत शके १८२६ मध्यें मुबईस जी ज्योतिष परिषद श्रीमदजगद्गुरु श्रीशकराचार्य मठ द्वारका यांच्या अध्यक्षतेखालीं झाली त्यात सर्वानुमतें खालील निर्णय दिला गेला आहे.

" पौष्णाते भगण स्मृत " इति सूर्यसिद्धातोक्ते । प्रमाणबलेनोतिष्ठमान. रैवत पक्ष । क्रातिवृत्ते यो मीनात स्त रेवती ताराया निवेश्य इति भास्कराचार्योक्त्या भगणादिभूतमूलस्थानस्थरेवतीयोगताराया एवायनांशानयन वास्तव स्यादिति एक मत सप्रमाणमिवोद्भासते । मघाचित्राभ्यामयनाशानयनंतु काल्पनिकमेव ततोऽयनाश ग्रहण वाचनिकप्रमाणस्यानुपलभात् ।

असा स्पष्ट निर्णय प्रमुख अशा १५० ज्योतिषानीं दिला असून पचाग कमिटीनें स्वीकारलेला नि शर रेवती योगतारा ( झीटापिशियम् ) युक्त रैवतपक्ष हाच प्रमाणयुक्त व शास्त्रशुद्ध पक्ष आहे असें निर्णित केलें आहे

( १३ ) रा चिंतामणराव वैद्य यानीं सन १९२७ जानेवारीच्या चित्रमयजगत्मध्यें साप्रत अयनांशात ४ अशाची चूक पडत आहे हें कबूल केलेलें आहे

( १४ ) तात्पर्य रैवतपक्ष व शके १८५० मध्यें १८ अ ५२ क० हे अयनाश हाच खरा पक्ष होय ऐक्यवर्धक व केतकी हे दोन्ही पक्ष खोटे व शास्त्रविघातक आहेत

( १५ ) शके १८५८च्या शुद्ध अयनाशाचे शास्त्रोक्त गणित केलें असता खरें अयनांश १८ अश, ५८ कला, ५३ विकला इतकें येतात अर्थात् याच्यापेक्षा कमी अगर जास्त येणारे कोणतेही अयनांश अशास्त्र व चुकीचे होत यात शका नाहीं

## शुद्ध आरंभस्थानाचे बाबतींत इंदूरपरिषदेंत रैवत पक्षातर्फे जोरदार समर्थन केलें गेलें तें असें —

रैवत पक्षाच्या येथें उपस्थित असलेले पुढाऱ्यांस, सूर्यसिद्धांतातील " सूर्यसिद्धांतोक्त जें राशीचक्राचें आरंभस्थान त्याचाच स्वीकार करावा." हे जे शब्द ठरावांत आहेत ते (रैवतपक्षास) अवश्य मान्य आहेत.

आता हें सिद्धान्तोक्त आरंभस्थान निश्चित कसे करावयाचे असा प्रश्न आपणापुढें येतो, त्याचें उत्तर असे आहे कीं, रेवतीपुंजांतील योगतारेचे ध्रुवक सूर्यसिद्धान्तात ३५९° ५०–इतके दिलें आहेत. आणि रेवती नक्षत्र विभागाची जी अन्तिम मर्यादा तीच राशीचक्राचीही अंतिम मर्यादा असे ज्या वचनामध्यें स्पष्टपणें सांगितले आहे तें वचन पौष्णान्ते भगण' स्मृत: हे होय. पौष्णान्त म्हणजे रेवती नक्षत्र विभागाचा शेवट. आता जर रेवती योगतारेचे ध्रुवक ३५९° अंश ५०' कला इतके निश्चित सांगितले आहेत तर राशी-चक्राचीही अंतिम सीमा रेवतीयोगतारेच्या पूर्वेस फक्त दहा कला इतक्याच अंतरावर आहे असे निःसंदेहपणें ठरतें. चक्राचा शेवट व आरंभ हे दोन्ही एकाच बिन्दूत समाविष्ट असतात अर्थात् सूर्यसिद्धान्तोक्त राशी-चक्रारंभ हा ज्या तारेचे ध्रुवक सीमान्तापासून केवळ दहा ( १० ) कलाच कमी आहेत अशी जी रेवती-तारा त्याच तारेपासून ठरतो असें निर्विवाद निश्चित होते. येथें मतभेदाला अगर शंका कुशंकांना जागाच नाहीं. रेवती तारेला हल्लीं शर आहे तो दक्षिण आहे. परंतु तो केवळ १३' कला मात्र आहे. येवढ्याच क्षुल्लक गोष्टीवरुन जयन्ती तारा ही रेवती योग तारा नव्हे असा आक्षेप घेणें समंजसपणाचे नाहीं. म्यूपिसियमचा शर दक्षिणेचाच, व तोही तीन अंश आहे. अशा स्थितीत म्युपिसियमला जे आक्षेपक रेवतीची योगतारा मानू इच्छितात त्यांनी जिचा विक्षेप ( शर ) केवळ १३ कलाच आहे अशा तारेला योगतारा मानण्यास कांकूं करावें हे अत्यंत अयोग्य होय. सूर्यसिद्धांतातील कोणत्याही योगतारेचा शर, प्रस्तुत वेधाशीं जयती तारेचा शर जितका जुळतो तितका देखील जुळत नाहीं. प्रत्यक्ष चित्रा तारेचा सिद्धांतोक्त शर १° ५०' इतका दिला असून प्रत्यक्षत: तो २° अंश ३ कला आहे.

मग ती तारा तरी योगतारा कशी होऊ शकेल ! एतावता सिद्धांतात "रेवतीतारा" जी जयन्ति हिलाच रेवतीयोगतारा मानलें पाहिजे. हे मान्य करावयाचें नसेल तर जिचा ध्रुवक ३५९° ५०" आणि विक्षेप (शर) ० शून्य परंतु उत्तरेचा आहे अशी दुसरी तारा तरी दाखविली पाहिजे. नुसते पौष्णान्ते भगण: स्मृत: असें प्रतिपादन करावयाचे, परंतु व्यवहारांत मात्र तो खरा आरंभबिन्दू मानावयाचा नसेल तर सिद्धांतग्रंथ टाकून द्या. चित्रापक्ष हा केवळ तडजोडीचा आहे त्याची उत्पत्ति कशी झाली हे ज्यो० दिक्षि-तानी आपल्या ग्रंथात पान ४३९–४४० यांत विस्तारानें सांगितलें आहे. त्या मताचा तुम्ही त्याग केला हें उत्तमच झालें. परंतु सूर्यसिद्धांत जर तुम्ही मानणार आहा तर पौष्णान्ते भगण: स्मृत: हे वचन आणि रेवतीयोगतारेचे ध्रुवक व विक्षेप यांना अनुसरुनच रेवतीतारेचा निर्णय करून राशीचक्राचा सूर्य-सिद्धांतोक्त आरंभबिंदू निश्चित केला पाहिजे.

काही लोकाचा असा कोटिक्रम ऐकण्यात येतो की, सूर्यसिद्धांतप्रमाणें गणित करण्याचा प्रचार मूळ ज्या वर्षापासून सुरू झाला असेल तेंच आरंभवर्ष मानलें पाहिजे. याचें उत्तर असें कीं, आपला प्रश्न आरंभ वर्षाचा नाहीं, शून्यायनांश वर्षाचा आहे. आणि अयनांश निश्चित करणें असतील तर शून्यायनांश वर्षच बिनचूक समजलें पाहिजे. असें शून्यायनांश वर्ष शक ४५० ते ५०० हेंच आहे. आणि सूर्यसिद्धांताचें प्रचार वर्ष कोणतेंहि मानलें, तरी शून्यायनांश वर्ष मुळींच बदलत नाहीं, हा त्यात विशेष आहे. राशीचक्राच्या आरंभीं रेवती योगतारा माना, अथवा तिच्यापासून पूर्वेकडे १० कला अंतरावर असणारा बिंदु माना, किंवा शके ४५० ते ४९६ ह्या वर्षाच्या स्पष्ट मेषार्कांचे स्थान आरंभस्थानीं निश्चित करा, एकंदर मतलब एकच. ह्या तिहींपैकीं कोणती तरी एक गोष्ट स्वीकारल्याशिवाय पौष्णान्ते भगण: स्मृतः ह्या वाचनिक प्रयोक्त प्रमाणास सार्थकता येणार नाहीं. आणि राशिचक्राचें आरंभस्थान सूर्यसिद्धांतातील घेतले पाहिजें हा जो आपला योग्य निर्धार तोही आचरणात येणार नाहीं.

ह्याशिवाय आणखीहि एक तिसरा स्वतंत्र मार्ग आहे. पण तो बराच त्रासाचा आहे. तो असा कीं, सूर्यसिद्धांतामध्यें सर्व नक्षत्र योगतारांचे ध्रुवक व विक्षेप दिलेले आहेत. त्यावरून त्या तारा हल्ली कोणत्या ठरतात तें समजतें ह्या ध्रुवक विक्षेपावरून, कोलब्रुक, बर्जेस, केरोपंत, बापूदेव, केतकर, दीक्षित इत्यादि विद्वान् ज्योतिष्यानीं त्यांच्या निश्चिती संबधानें बराच उहापोह केला आहे. ह्या योगतारांपैकीं ज्या ठळक आणि आणि निर्विवाद असतील त्याच घेऊन त्यांच्या भोगशरांची तुलना करून आरंभस्थान निश्चित करावें. बारीक किंवा विवादास्पद तारा ह्या कामास अगदीं निरुपयोगी आहेत. म्हणूनच ठळक आणि निर्विवाद अशा ज्या कृत्तिका, रोहिणी, पुनर्वसु, मघा, उत्तरा फाल्गुनी, स्वाती, अनुराधा, ज्येष्ठा, श्रवण, शततारका, पूर्वाभाद्रपदा आणि रेवती ह्या नक्षत्रांच्या ज्या योगतारा त्यांच्या परस्पर तुलनेनें आरंभस्थान सहज स्पष्ट ठरतें. तें आरंभस्थान म्हणजे कृत्तिका योगतारेच्या पश्चिमेस ४० अंश अंतरावरील रेवती तारा हेंच होय. (ह्या संबधानें मैत्र्युपनिषदांतील नक्षत्रविभाग, कृत्तिकारंभस्थान, श्रीयुत आपटे ह्यांचे तत्संबंधी निर्णायक लेख हे सर्व आम्ही अध्यक्षांकडे सादर करीत आहो. ) ह्यांत चित्रातारेचे सूर्यसिद्धांतांतील भोगशर चुकीचे आहेत असें स्पष्टपणें दिसून येईल. आणि अशा रीतीनें आपणास आरंभस्थानाची निश्चिती करिता येईल. व शुद्धपंचांगांत त्याप्रमाणें निर्णय केलेला आहे.

---

## वैजयंती पक्षाची पांच हजार वर्षांची वैदिक परंपरा

(१) आपल्या ज्योतिषाचें मूळ आपल्या पवित्र वेदांत आहे वेदाचा आश्रय हजारों वर्षांपूर्वी रचिलेल्या सिद्धान्ताच्या ग्रंथकारांना आपल्यापेक्षा उत्तम प्रकारें समजला होता असें समजणें अवश्य आहे. तेव्हा ज्या ज्योतिषविषयक कल्पना सिद्धान्तग्रंथाशीं सुसंगत असतील, त्यांना वैदिक परंपरा आहे असें मानिलेंच पाहिजे. या सिद्धान्तग्रंथांपैकीं सर्वांत प्राचीन असून थोडा व्यवस्थेशीर लिहिलेला असा आद्यसूर्यसिद्धान्त होय. तथापि त्यांत नक्षत्रारंभस्थान कोणतें मानिलें होतें, तें निश्चित कोठेंच सांगितलेलें नाहीं. वराहमिहिरकृत पंचसिद्धांतिका ग्रंथांतील १४ व्या अध्यायांत आद्यसूर्यसिद्धांतांतील ताराचंद्रयुती सांगताना फक्त ७ नक्षत्रांचे ध्रुव व शर दिले आहेत ते असे —

बहुला पञ्चांशान्ते सार्धे हस्तत्रये च भगणोदक् । रोहिण्यष्टदलान्ते दक्षिणतश्चार्धपञ्चेषु ॥३४॥
हस्तेऽष्टमोऽष्टमेऽंशे पुनर्वसोर्दक्षिणोत्तरे तारे । अर्धचतुर्थे हस्ते पुष्यस्योदकृचतुर्थेऽंशे ॥३५॥
दक्षिणतारा हस्ते सार्पस्यांशे तयोत्तरा तारा । पित्र्यस्य सक्षेत्रे पञ्चेवांशे समायोग. ॥ ३६ ॥
चित्रार्धाधमभागे दक्षिणतः संस्थिते त्रिभिर्हस्तैः ।

( २ ) या पद्यावरून जो सरळ अर्थ लक्षांत येतो तो असाः—( १ ) कृत्तिका तारा सहावे अंशाचे शेवटीं आहे व तिचा शर $+३^{\circ}$ १०' आहे. ( २ ) रोहिणी ४ थ्या अंशाचे शेवटीं आहे. व तिचा शर $-४^{\circ}$ ५९' आहे. ( ३ ) पुनर्वसूचे दक्षिण व उत्तर असे दोन्ही ८ व्या अंशात आहेत, व प्रत्येकाचा शर $७^{\circ}$ १५' आहे. ( ४ ) पुष्य ४ थ्या अंशात आहे व त्याचा शर $+३^{\circ}$ १०' आहे. ( ५ ) आश्लेषाचे दक्षिण व उत्तर असे तारे पहिल्या अंशात आहेत व प्रत्येकाचा शर °०५४' आहे. ( ६ ) मघा ६ वे अंशात असून तिचा शर ० आहे. ( ७ ) चित्रा अर्धे आश्रमभागे म्हणजे ३॥ अंशावर आहे व तिचा शर$-२^{\circ}$ ४३' आहे. मूळ पद्यात शर हस्ताच्या प्रमाणांत सांगितले आहेत. २४ अंगुलें = १ हस्त हें प्रसिद्धच आहे. व १५ अंगुलें = ३४ कला हें प्रमाण त्याच अध्यायांत पुढें लिहिलें आहे. त्यावरून कला काढल्या आहेत. ताऱ्यांचीं अंतरें दिलीं आहेत त्यापैकीं पहिल्या दोन तारा अमूक अंशाचे शेवटीं आहेत असें सांगितलें आहे. पण बाकीच्या अमक्या अंशात आहेत इतकेंच लिहिलें आहे. म्हणजे त्या अंशांत कोठें तरी त्यांचें स्थान आहे. इतकेंच सांगितलें आहे. याकरिता पुढें दिलेल्या गणितांत ५ कला इतकेंच अल्प मान घेतलें आहे त्यावरून कांहीं अधिक किंवा कमी प्रमाणाचें अनुमान वाटल्यास करता येईल.

(३) ताऱ्याची वरील अंतरें किंवा ध्रुव कोणत्या स्थानापासून मोजिले आहेत हें कोठें लिहिलें नाहीं. डॉ. थीबो व पंडित सुधाकर द्विवेदी यांनीं आपल्या कल्पनेप्रमाणें ते ध्रुव त्या नक्षत्रांच्या विभागारंभापासून मानिले आहेत. आमची कल्पना अशी आहे कीं, ज्याप्रमाणें तालुक्याचें मुख्य ठिकाण तालुक्याच्या मध्यावर असेल असें वाटतें, त्याप्रमाणेंच, ग्रंथात कांहीं उल्लेख केला नसल्याकारणानें नक्षत्रविभागाचे मध्यावर त्याची योगतारा असावी अशी साधारणतः अपेक्षा असते. याकरिता या अपेक्षित स्थानापासून किती अंतरावर तारा आहे हें वरील पद्यात सांगितलें आहे. डॉ. थीबो व प. सुधाकर यांच्या कल्पनेस १ ली कल्पना व आम्ही आपल्या कल्पनेस २ री कल्पना असें पुढील कोष्टकात व विवेचनात म्हटलें आहे. तुलनेकरितां खालील कोष्टकांतील अंक पहावे.

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
|---|---|---|---|---|---|---|
| ताऱ्याचें नांव | नक्षत्र ध्रुव कल्प १ ली अं. क. | नक्षत्र ध्रुव कल्प. २ री अं. क. | कदंबाभिमुखध्रुव कल्प. २ री अं. क. | कंद. भोग वैज पक्ष अं. क. | कंद भोग चित्रा पक्ष अं. क. | को.४भोग कोणत्या पक्षास अनु. |
| कृत्ति. | ३२ ४० | ३१ २० | ४० १० | ४० ७ | ३६ ९ | वैज. रै. |
| रोहि. | ४८ ० | ५० ४० | ४९ २० | ४९ ५५ | ४५ ५७ | वै" रै. |
| पुन. | ८८ २० | ९३ ४५ | ९३ ३२ | ९३ २२ | ८९ २४ | वैज. रै. |
| आश्ले- | १०७ ४० | ११३ २५ | ११३ ३४ | ११३ ४६ | १०९ ४८ | वै" रै. |
| मघा | १२६ ० | १३१ ४५ | १३१ ४५ | १२९ ५८ | १२६ ० | वै" रै. |
| चित्रा | १८० ५० | १८३ ३० | १८४ ३५ | १८३ ५८ | १८० ० | वै" रै. |

( ४ ) या वरील कोष्टकात स्थाना ४ व ५ यांची तुलना केली असता असें दिसून येईल कीं, कृत्तिका भोग केवळ ३ कलांच्या अंतरानें रैवतपक्षाशीं जुळतो. रोहिणी, पुनर्वसु, आश्लेषा व चित्रा यांचे भोग पाऊण अंशाचे आंत जमतात. मघामध्यें १॥। अंशानें अंतर आहे. पुष्यास १ अंशांचा शर सांगितला आहे. यावरून तो ताराच भिन्न आहे. तेव्हां त्याची तुलना करणें व्यर्थ आहे. कै. केतकर यांनीं चित्रेसंबंधीं "चित्रार्धाश्रमभागे" असा पाठ बदलून चित्राध्रुव १८० अंश दाखविला आहे. परंतु या ध्रुवापासून चित्रेचा कादंबाभिमुखभोग $१८०^{\circ}$ ४८' येतो. म्हणजेच चित्रापक्षासमर्थनार्थहि तो कुळत नाहीं. शिवाय कोणत्याहि ग्रंथात चित्रेचा कदंबाभिमुख भोग १८० विर्विवादपणें सांगितला नाहीं. यामुळें हा पाठ पाठभेदाच निराधार ठरत आहे. कृत्तिकेचा दोनहि कल्पनेप्रमाणें आलेला कदंबाभिमुख भोग

चित्रापक्षीय कृत्तिका भोगाशीं जमत नाहीं. त्यांत ४ अंशापर्यंत अंतर आहे. याचा अर्थ असा कीं, कृत्तिका काळीं जेव्हा नक्षत्रविभाग झाले तेव्हांहि चित्रेला गणितदृष्ट्या महत्त्व दिलें जात नसे.

(५) चित्रेकरिता वेदांतील जे त्रोटक आधार दाखविले जातात ते काव्यकल्पनेच्या स्वरूपाचे असल्याकारणाने चित्राभोगाची गणिताला अवश्य असणारी सूक्ष्मता त्या आधारांनीं सिद्ध होत नाहीं. वेदांत कृत्तिकेचा उल्लेख चित्रेपेक्षां कित्येक पटींनी अधिक वेळा आला आहे. कृत्तिकेची देवता अग्नि आहे व अग्निसंबंधी वेदांत ऋचा रेलचेल भरल्या आहेत. देव म्हणजे आकाशांत चमकणारीं नक्षत्रें असें लक्षांत आणिलें म्हणजे "अग्निमीळे पुरो हितं" "अग्निर्देवानामभवत्पुरस्तात्" अशा प्रकारच्या वर्णनावरून असें स्पष्ट होते की, कृत्तिकेच्या मागोमाग इतर नक्षत्रें जात असतात. म्हणजे कृत्तिका नक्षत्राला लागून रोहिणी व त्यानंतर मृगादि नक्षत्रें आहेत. कृत्तिका विभागाच्या शेवटीं म्हणजे ४० अंशावर कृत्तिका तारा असल्याशिवाय त्यानंतर लागलीच रोहिणी विभाग येणार नाहीं. वर सिद्धांताधारे कृत्तिकाभोगहि तितकाच आला आहे. कृत्तिकेनंतरच्या २४ नक्षत्रांचा भोग ३२० अंश हा या ४० अंशांत मिळविला म्हणजे रेवत्यंत ३६० किंवा ० अंशावर येतो. वैजयंती ( झीटापिशियम ) ताराहि तेथेच आहे म्हणून "रेवती योगतारातु सदामीनाऽजसंगमा" या गोलानंदांतील वचनानुसार तीच रेवतीची ग्रंथोक्त रेवतीयोगतारा होय, या विषयीं शंकाच नाहीं. वरील वेदमंत्रांचा याप्रमाणें कृत्तिकाद्वारां आधार मिळत असल्याकारणानें हा कृत्तिक निर्णीतरैवतपक्ष वेदसंमत व शास्त्रशुद्ध आहे.

( ६ ) अशा प्रकारचा कोणताच आधार चित्रापक्षास नसल्याकारणानें तो पक्ष वेदबाह्य व शास्त्रास असंमत असा आहे, हें कोणाहि समंजस मनुष्यास समजून येईल. या कारणानेंच शके १८२६ सालीं मुंबई येथें भरलेल्या निखिल भारतीय पंचांगशोधन सभेंत "मघाचित्राताराभ्यामयनांशानयनं तु काल्पनिकमेव ततोऽयनांशग्रहणें वाचनिक–प्रमाणस्यानुपलंभात्" असा चित्रापक्षास शेरा मिळाला व त्याज्य ठरला.

( ७ ) चित्राध्रुव १८०° मानिला तर तो कदंबाभिमुख १८०°'४८' इतका येतो व त्यामुळें चित्रापक्षाचा एक मोठा कृत्रिम आधारहि ढासळतो. ही आपत्ति टाळण्याकरितां चित्राध्रुव १८० अंश हा कदंबाभिमुखच आहे असें प्रतिपादन करण्याचा कोणास मोह उत्पन्न होईल, तर त्यांनीं असा विचार केला पाहिजे कीं, द्वितीय म्हणजे हल्लींचा सूर्यसिद्धांत हा आद्य सूर्यसिद्धांतच होय असें "शास्त्रमाद्यंतदेवेदं यत्पूर्वं प्राह भास्करः" या वचनावरून व्यक्त होतें. द्वितीय सूर्यसिद्धांतातील अध्याय ८ मधील नक्षत्रध्रुव ध्रुवाभिप्रायानें सांगितलें आहेत, असें टीकाकार रंगनाथ, शंकर बाळकृष्ण दीक्षित इत्यादि सर्व ज्योतिषी देतात. व तसेंच कोणासहि दिसतील. परंतु ते ध्रुव सुद्धां कदंबाभिप्रायचे आहेत असें कमलाकरासारखे एक दोन हट्टी ज्योतिषी प्रतिपादन करणारे असतील. तथापि त्यांचा हा भ्रम दूर होण्याकरितां त्यांनीं ते ध्रुव सार्वभौम सिद्धांतांतील ध्रुवांशीं ताडून पाहावेत. कारण त्यांतील ध्रुव कदंबाभिप्रायाचे आहेत असें त्या ग्रंथांतच स्पष्ट सांगितलें आहे. तसेंच सिद्धांतशिरोमणींतील ध्रुवांशींहि ताडून पाहावेत; कारण त्या ग्रंथांतील ध्रुव ध्रुवाभिमुख आहेत असें भास्कराचार्यांनींच आपल्या स्वतःच्या टीकेंत सांगितलें आहे. म्हणजे असें सहज लक्षांत येईल कीं, द्वितीय सूर्यसिद्धांतांतील नक्षत्र ध्रुव ध्रुवासंबंधींचे आहेत. कदंबासंबंधींचे नव्हेत. ध्रुव या शब्दांतहि हाच अर्थ गर्भित असावा असें वाटतें. अश्विनी, भरणी, उत्तराभाद्रपदा व विशेषतः स्वाती व धनिष्ठा यांचे ध्रुवावरून ही गोष्ट स्पष्ट होते. उदाहरणार्थ, सूर्यसिद्धांतात स्वाती ध्रुव १९९°. दिला आहे. ब्रह्मगुप्तसिद्धांतातहि तितकाच आहे. परंतु सार्वभौमसिद्धांतात १८२°.२४' व आधुनिक वेधाप्रमाणें तो वैजयंती पक्षाचा १८४°.२२' आहे. सूर्यसिद्धांतांतील सर्व नक्षत्रध्रुव ब्रह्मगुप्तसिद्धांतांतील नक्षत्रध्रुवांशीं जुळतात. मात्र चित्रेचा ध्रुव जुळत नाहीं. परंतु तो इतर कोणत्याहि ग्रंथातील चित्राध्रुवाशीं जमत नाहीं, यावरून सूर्यसिद्धांतांतील चित्रेचा ध्रुव चुकीचा आहे असें म्हणणें भाग आहे. याप्रमाणें चित्रापक्षाचा जो चित्राकदंबभोग १८० होण्याचा मुख्य आधार तोच नाहींसा होतो.

८. वेदांगज्योतिषापूर्वी सुमारें ५०० वर्षांचा जो मैत्रेय उपनिषद् ग्रंथ आहे त्यांत धनिष्ठार्धी उत्तरायण होतें असें लिहिलें आहे. यावरून नक्षत्रांचें विभागीकरण त्या काळाचे पूर्वी कृत्तिकादि काळांत

म्हणजे ५००० वर्षांपूर्वीच झालें होतें असें स्पष्ट होतें. यावरून कृत्तिकाविभागान्तीं कृत्तिका तारा आहे, हें त्या उपनिषत्‌काळाच्या पूर्वी ठरलें होतें असें निष्पन्न होतें. म्हणून वेदांगकाळाचा धनिष्ठानिर्णीत, किंवा धनिष्ठा–चित्रा–निर्णीत–रैवत पक्ष हादि कृत्तिका निर्णीत–पक्षाला सर्वस्वी अनुसरूनच असला पाहिजे. कारण तो कृत्तिका निर्णीत पक्षानंतरचा आहे. अर्थात् चित्रापक्षानें रैवतपक्ष स्वीकारला पाहिजे, त्यांशिवाय चित्रापक्षास शास्त्रशुद्धता येणार नाहीं.

या रैवतपक्षाचें वेदांगत्व प्रि. आपटे यांनीं सर्वानंदकरण पृ. १६५ ते १६९ यांत वेदांगमंजरी या सदराखालीं व्यक्त करून दाखविलें आहे, तें सुज्ञांनीं पाहावें.

( ९ ) कै. केतकर यांस खरोखर रैवतपक्ष संमत होता असें ज्योतिर्गणितावरून स्पष्ट दिसतें, पुढें ग्रहलाघव पंचांगाशीं जुळवून घेण्याकरिता त्यांनीं चित्रापक्ष उत्पन्न केला. तथापि ग्रहलाघवाच्या अनुयायांचाहि त्याच्यावर विश्वास नाहीं असें स्पष्ट झालें. कारण निर्भेळ ग्रहलाघवी पंचवार्षिक पंचांगांत यावर असें सर्टिफिकेट आहे कीं, केतकी व ऐक्यवर्धक पंचांग यांतील संक्राति सांप्रत ग्रहलाघवाशीं जुळवून घेणें हें " कौटिल्य " आहे.

( १० ) वर जो निरनिराळ्या दृष्टींनी विचार केला आहे त्यावरून वाचकांच्या लक्षांत येईल कीं, वैजयंती पक्षाचें पंचांग म्हणजेच पुणें शुद्धपंचांग कमिटीचें शास्त्रशुद्ध टिळक पंचांग; व हेंच खरें शास्त्रसमत पंचांग होय. याकरितां याच पंचांगाचा जनतेनें स्वीकार करावा.

## पौष्णांत जयंती

' मघाद्यं श्रविष्ठार्धमाग्नेय क्रमेणोत्क्रमेण सार्पाद्य श्रविष्ठार्धान्तं सौम्यम् ' । मैत्र्युपनिषद ६।१४

अर्थ—" मघाच्या आरंभापासून क्रमानें श्रविष्ठा म्हणजे धनिष्ठाच्या अर्ध्याभागावर येईपर्यंत दक्षिणायन होतें, आणि सार्प म्ह. आश्लेषापासून उलटक्रमानें मागें मोजित धनिष्ठाच्या अर्ध्याभागापर्यंत उत्तरायण होतें. "

'ओरायन' पहा; त्यात नक्षत्र चक्राच्या आरंभस्थानाची जन्मकथा सापडेल. 'ओरायन' म्हणजे 'अग्रहायन' ( हायनाचें–वर्षाचें अग्र–टोंक. ) वैदिककालीं वर्षारंभ ( वसंतारंभ ) मृगावर होत असे. ही स्थिती १ हजार वर्षें टिकली. नंतर आरंभस्थान २ ऱ्या सहस्रकांत रोहिणीवर व तिसऱ्यांत कृत्तिकांवर आलें. जणूकाय परमेश्वरानें हिशोबाच्या सोईकरितां एकएक सहस्रकाच्या २७ टप्प्यांवर २७ नक्षत्रांची योजना केली आहे ! आज वसंतसंपात उत्तराभाद्रपदांवर आहे. म्हणजे वेदकालापासून आजपर्यंत संपात-चलन ६।७ हजार वर्षांत ६।७ नक्षत्रें म्हणजे पावचक्र झालें. चार हजार वर्षांपूर्वी मैत्र्युपनिषत्कालीं ( वेदांग ज्योतिषापूर्वी ) कृत्तिकावर संपात येतां कृत्तिकादिनक्षत्र विभागव्यवस्था झाली हें वरील मैत्र्युपनिषद्वचनावरून व कृत्तिकादि अवकहडा चक्रावरून उघड दिसते. अवकहडाचक्र कृत्तिकादि आहे, अश्विन्यादि नाहीं. हें स्वर व्यंजन क्रमावरूनहि स्पष्ट आहे. कै. दीक्षित ( भा. ज्यो. पृ ८७ ) अश्विन्यादि विभाग व्यवस्था समजतात तीच कृत्तिकादि. कृत्तिकादिकालीं नक्षत्र विभाग व्यवस्था झाली व अश्विन्यादिकालीं मेषादि गणना झाली हें विसरतां कामा नये १३°–२०′ चा एक विभाग असे कृत्तिका ते रेवती ४० अंश होतात. कृत्तिकेपासून ( ईटाटारीपासून ) जयती तारा ( झिटापिसियम ) ४०°–७′ होतात. ७ कला अल्प व उपेक्षणीय आहेत. तेव्हां झिटा हीच 'पौष्णांते भगणः स्मृतः.' सूर्यसिद्धान्तोक्त मर्यादा होय. यांत शंका नाहीं. याचवेळीं ( शके ४९६ ) झिटेवर संपात आला व मेषादिगणना स्थिर झाली. २७ नक्षत्रविभाग व १२ मेषविभाग एकेकाळीं झाले ही समजूत भ्रमात्मक आहे. 'अश्विनीभरणी–कृत्तिकापादं मेषः' पाठांतरामुळें झाली असेल. 'रैवतपक्षाची ऐतिहासिक जुनी परंपरा' १५।७।१९२४ च्या केसरींत व शके १८४६ आषाढच्या 'ज्योतिर्भूषणां'त सविस्तर दाखविली आहे, त्यांत " अवकहडाचक्रांत कृत्तिकादि गणनेपासून नक्षत्रचरण विभागव्यवस्था सुरू झालेली स्पष्ट दिसते ..कृत्तिकेवर संपात असतां मघेवर दक्षि·

णायन व धनिष्ठार्धावर उत्तरायण असल्यामुळें' मघाद्यं श्रविष्ठार्धं' हें मैत्र्युपनिषद्वचन रैवतास अनुकूल आहे, चित्रास नाहीं, असें स्पष्ट म्हटलें आहे. याचप्रमाणें ३ वर्षांनंतर १९२७ सालीं 'वैदिक आरंभस्थान' या उत्तम निबंधात ग. वि. पटवर्धन यांनीं व १९३५ सालीं काव्यमयगोड 'अयनमंजरींत' रा. सा. गो. स. आपटे यांनीं उत्तमप्रकारें सिद्ध केलें आहे.

नक्षत्र योगताराचे कदंबाभिमुख भोग सूर्यसिद्धांतोक्त व आधुनिक सूक्ष्म ताडून पाहतां कृत्तिका, रोहिणी, पुनर्वसू, मघा, उत्तराफाल्गुनी, हस्त, स्वाती, ज्येष्ठा, मूळ, पूर्वाषाढा, अभिजित्, श्रवण, धनिष्ठा, पू. भा. रेवती, अशीं ठळक व मतभेदरहित निम्म्याहून अधिक नक्षत्रें जुळतात. यांवरूनहि रैवतपक्ष सबळ ठरतो.

---

# आधानकाल प्रकरण.

भविष्य कथनाचें कामीं जन्मकालाचे जितकें महत्व आहे तितकेंच किंबहुना थोडेंसें अधिकच महत्व आधानकालाला म्हणजे गर्भसंभव कालाला आहे. गर्भसंभवच झाला नसेल तर जन्मतरी कशाचा होणार ! यासंबंधीं साधक बाधक प्रमाणाचा चिकित्सामय विचार करावयाचा तो पुढें करूं. प्रथमतः याबाबतींतील ग्रंथोक्त वचनें देऊं.

# ''सारावलीं''तील आधानकाल विवेचन.

राश्यादिफलविभागः कस्य विधेयो विना समुत्पत्तेः।
आधानमथो वक्ष्ये कारणभूतं समस्तजन्तूनाम् ॥ १ ॥

राशि व स्थानें—ह्यांच्या परस्परानुवर्तित्वानें कोणकोणते परिणाम घडतात तें प्रथम सांगावें लागतें. परंतु—आधानकाल आणि जन्मवेळ जर बरोबर समजले नाहींत तर हीं फलें सांगण्याचा काय उपयोग ! म्हणून जन्माचें मूळ कारण जें आधान त्याची वेळ कशी कळावी तें सांगतों १

अनुपचयराशिसंस्थे कुमुदाकरबान्धवे रुधिरदृष्टे ।
प्रतिमासं युवतीनां भवतीह रजो ब्रुवन्त्येके ॥ २ ॥

कांहीं शास्त्रज्ञांच्या मतानें ३।६।१०।११ हीं स्थानें सोडून बाकीच्या स्थानात चन्द्र असून त्यावर मंगळाची दृष्टि जेव्हां पडते तेव्हांच स्त्रियांना प्रतिमासास ऋतु प्राप्त होतो. २

इन्दुर्जलं कुजोऽग्निर्जलमसृगथवाग्निरेव पित्तं स्यात्॥
एवं रक्ते हीने पित्तेन रजः प्रवर्तते स्त्रीषु ॥ ३ ॥

कारण चन्द्र हा जलरूप आणि मंगळ हा अग्निरूप; किंवा चन्द्र हा रुधिररूप आहे; व मंगळ हा अग्निरूप आणि पित्तरूपहि आहे. म्हणून मंगळाच्या योगानें रुधिरोत्पत्ति कमी आणि पित्ताचें आधिक्य झाल्यानें स्त्रीला ऋतुस्राव होतो. ३

एवं यद्भवति रजो गर्भस्य निमित्तमेव कथितं तत् ॥
उपचयसंस्थे विपुलं प्रतिमासं दर्शनं तस्य ॥ ४ ॥

याप्रमाणें स्त्रियांचा ऋतु हान गर्भोत्पत्तिचें एक कारण आहे आणि त्याची उत्पत्ति महिन्याचे महिन्यास होते. उपचय ( ३।६।१०।११ ) स्थानीं असणाऱ्या ग्रहाच्या योगानें स्राव जास्त होतो. ४

उपचयभवने शशभृद्दृष्टो गुरुणा सुहृद्भिरथवासौ ॥
पुंसा करोति योगं विशेषतः शुक्रसंदृष्टः ॥ ५ ॥

चन्द्रावर उपचय स्थानीं जर गुरुची किंवा त्याच्या मित्रग्रहाची दृष्टि असेल तर आणि विशेषतः शुक्राची दृष्टी असेल तर स्त्रीला पुरुष समागम घडेल. ५

चंद्रे कुजेन दृष्टे पुष्पवती सह विटेन संयोगम् ॥
राजपुरुषेण रविणा रविजेनाप्नोति भृत्येन ॥ ६ ॥

अशा स्थितींत मंगळाची दृष्टी चन्द्रावर असेल तर त्या स्त्रीला नाटकी पद्धतीच्या पुरुषाचा समागम घडेल आणि रविची दृष्टि असली तर अधिकाऱ्याचा, आणि शनिची दृष्टि असेल तर नौकर चाकराशीं संबंध घडेल. ६

एकैकेन फलं स्याद्दृष्टे नान्यैः कुजादिभिः पापैः ॥
सर्वैः स्वगृहं त्यक्त्वा गच्छति वेश्यापदं युवतिः ॥ ७ ॥

ही दृष्टि एकट्या ग्रहाचीच असावी, त्यातहि मंगळ शनि अशा सारख्या पापग्रहाची असूं नये. आणि जर चन्द्रावर बऱ्याच ग्रहांची दृष्टि असेल, तर ती स्त्री घरदार सोडून वेश्येचा धंदा करील. ७

द्विपदादयो विलग्नास्सुरतं कुर्वन्ति सप्तमे यद्वत् ॥
तद्वत्स्त्रीपुरुषाणां गर्भाधाने समादेश्यम् ॥ ८ ॥

लग्नस्थान आणि सप्तमस्थान ह्यांत मनुष्य जातीच्या ( म्हणजे मिथुन, कन्या, तूळ, कुंभ अशा ) कोणत्या राशि उदित आहेत हें पाहून त्या अनुरोधानें कोणाचा समागम कसा होईल किंवा झाला असेल तें सांगावें ८

अस्तेऽशुभयुतदृष्टे सरोषकलहं भवेद्ग्राम्यम् ॥
सौम्ये सौम्यैः सुरतं वात्स्यायनसंप्रयोगिकाख्यातम् ॥ ९ ॥

सप्तम स्थानावर जर पापग्रहाची दृष्टि असेल तर समागमासाठीं मोठीं रडाकणीचीं भाडणें होतील. तीच शुभग्रहाची दृष्टि असेल तर समागम मजेनें होईल आणि तोहि वात्स्यायनानें वर्णन केल्याप्रमाणें घडेल. ९

तत्र शुभाशुभमिश्रैःकर्मभिराधिवासिता विषयवृत्तिः ॥
गर्भावासे निपतति संयोगे शुक्रशोणितयोः ॥ १० ॥

कारण विषयवासना ही कर्मानुसार बऱ्या वाईट प्रकारची मिश्र वृत्तिची असते, आणि तिचा ऋतु आणि वीर्य ह्यांच्यावर जो परिणाम घडता, त्याचीच छटा संभोगकालीं गर्भावर उमटते. १०

उपचयगौ रविशुक्रौ बलिनौ पुंसः समांशसंप्राप्तौ ॥
युवतेर्वा कुजचन्द्रौ यदा तदा गर्भसंभवो भवति ॥ ११ ॥

रवि, व शुक्र हे पुरुषाच्या कुण्डलीत ३।६।१०।११ ह्या स्थानीं असून बलवान् असतील आणि समांशांत येतील, आणि स्त्रीच्या कुण्डलींत त्याच स्थानात मंगळ व चन्द्र हे असून तेहि बलवान् असतील तर उभयतांच्या समागमानें गर्भोत्पत्ति होईल. ११

शुक्रार्कभौमशशिभिः स्वांशोपचयस्थितैः सुरेज्येवा ॥
धर्मोदयात्मजस्थे बलवति गर्भस्य संभवो भवति ॥ १२ ॥

शुक्र, रवि, मंगळ आणि चंद्र हे ३।६।१०।११ ह्या स्थानात असून आपआपल्या अंशांत असतील किंवा गुरु हा पंचमात अथवा नवमांत असून बलवान असेल तर स्त्रीला गर्भ राहतो. १२

मिथुनस्य मनोभावो यादृग्वदलालसं भवति ॥
श्लेष्मादिभिः स्वदोषैस्तत्तुल्यगुणो निषिक्तः स्यात् ॥ १३ ॥

स्त्रीपुरुषाची जशी मनोवृत्ति, आणि उपभोगवासना कमी अधिक तीव्र असेल त्याप्रमाणें कफ, वात आणि पित्त ह्याचें प्रमाण बदलून त्या प्रमाणें गर्भावर परिणाम त्या त्या दोषाच्या समुचयानें होतो १३

विषमे विषमांशगता होराशशिजीवभास्करा बलिनः ॥
कुर्वन्तिजन्म पुंसां समा समांशे युवति नरजन्म ॥ १४ ॥

चद्र, गुरु आणि रवि हे ज्या भवनात असतील, अगर ज्या होऱ्यात असतील तो राशि विषम असेल तर ग्रह विषमाशात असावे आणि राशी सम असेल तर ग्रह समाशात असावे, असे ग्रह बलाढ्य असल्यास गर्भ राहतो. ग्रह समाशात असल्यास कन्या होते, आणि विषमाशात असल्यास पुत्र होतो. १४

ओजर्क्षे गुरुसूर्यौ बलिनौ पुंसः समे सितेन्दुकुजाः ॥
कन्यानां जन्मकरा गर्भाधाने स्थिता बलिनः ॥ १५ ॥

विषम राशींत ( किंवा तेजस्वी नक्षत्रांत ) गुरु, सूर्य हे बलवान् असतील तर मुलगा होतो आणि जन्मराशींत चन्द्र मंगळ बलवान् असतील तर मुलगी होते. ही स्थिति आधान कालाला अनुलक्षून आहे.

मिथुने चापेऽर्कगुरूबुधदृष्टौ दारकद्वयं कुरुतः ॥
स्त्रीयुग्मं कन्यायां सितशशिभौमाझषेच बुधदृष्टाः ॥ १६ ॥

मिथुन राशींत व धनात अनुक्रमें रवि, गुरु असून त्यावर बुधाची दृष्टि असेल तर जुळे पुत्र होतात; आणि कन्येंत शुक्र, चन्द्र किंवा मंगळ असतील, अथवा मीनामध्यें असूनहि त्याच्यावर बुधाची दृष्टि असेल तर आवळ्या जावळ्या मुली होतील. १६

लग्नं मुक्त्वा विषमे शनैश्वरःपुरुषजन्मदो भवति ॥
योगे विहगस्य बलं संवीक्ष्य वदेन्नरं स्त्रियं वाऽपि ॥ १७ ॥

लग्न विरहित इतर स्थानात विषमराशी असून त्यात शनिचा जोर असेल तर पुत्र होईल. परंतु सतति योग पाहिजे. याप्रमाणें ज्या जातीचा ग्रह असेल त्याचें बलाबल पाहून पुत्र किंवा कन्या होईल तें सांगावें.

अन्योन्यं रविचंद्रौ विषमर्क्षगतौ निरीक्षेते ॥
इन्दुजर विपुलौ वा दृष्टौ बलिनौ नपुंसकं कुरुतः ॥ १८ ॥

विषमराशिमध्यें रविचन्द्र असून ते जर परस्परावर दृष्टिक्षेप करीत असले किंवा बुध व शनि हे बलवान् असून सुद्धा जर ते रविनें दृष्ट असतील तर संतान नपुंसक होईल. १८

पश्यति वक्रः समभे सूर्यं चंद्रोदयौ च विषमर्क्षे ॥
यद्येवं गर्भस्थः क्लीबो मुनिभिः समादिष्टः ॥ १९ ॥

समराशींत सूर्य असून त्याच्यावर वक्रग्रहाची दृष्टि असेल, किंवा चन्द्र राशि व उदयलग्न हे विषम असून त्याच्यावरहि वक्रदृष्टि असेल तर नपुसक संतान होतें असें शास्त्रज्ञ म्हणतात. १९

ओजसमराशिसंस्थौज्ञेन्दू षण्ढं कुजेक्षितौकुरुतः ॥
नरभे निषमनवांशे होरेन्दुबुधाः सितार्किदृष्टा वा ॥ २० ॥

बुध हा विषमराशींत आणि चन्द्र समराशींत असून त्यांच्यावर मंगळाची दृष्टि असली तर, अथवा, मनुष्यराशि विषम असून त्याच्या नवांशात किंवा होऱ्यात बुध चन्द्र असून त्याच्यावर शुक्र शनि ह्याची दृष्टि असेल तर मूल नपुंसक होतें. २०

लग्नेसमराशिगते चन्द्रे च निरीक्षिते बलयुतेन ॥
गगनसदा वक्तव्यं मिथुनं गर्भस्थितं नित्यम् ॥ २१ ॥

लग्नीं समराशींत चन्द्र आणि त्याच्यावर बलवान् ग्रहाची दृष्टि असल्यास गर्भात जुळें आहे असें सांगावें. २१

समराशौ शशिसितयोर्विषमे गुरुवक्रसौम्यलग्नेषु ॥
द्विशरीरे वा बलिषु प्रवदेत् स्त्रीपुरुषमेवैव ॥ २२ ॥

चन्द्र शुक्र हे समराशींत आणि विषमराशींत–लग्नांत–वक्री गुरु व बुध असले, अगर धनु मकर राशींत बलवान असेल तर पुत्र व कन्या असे जुळें आहे म्हणून सांगावें. २२

द्विशरीरांशक युक्तान् ग्रहान् विलग्नंच पश्यतीन्दुसुते ॥
मिथुनांशे कन्यका द्वौ पुरुषौ त्रितयमेवं स्यात् ॥ २३ ॥

धनु मकर राशींत स्वांशांमध्यें बलवान् ग्रह, आणि लग्नावर बुधाची दृष्टि असेल आणि तोहि मिथुनांशांत असला तर एक कन्या आणि दोन पुत्र अशीं तीन मुलें एकदम होतात. २३

द्विशरीरांशकयुक्तान् ग्रहान् विलग्नं च पश्यतीन्दुसुते ॥
कन्यांशे द्वे कन्ये पुरुषश्च निषिच्यते गर्भे ॥ २४ ॥

धनु-मकर ह्यांच्या अंशांत अनेक ग्रह असून त्यांना आणि लग्नाला जर कन्यांशांतून बुध पहात असेल तर दोन मुली आणि एक पुत्र अशी संतति एकदम होते. २४

मिथुने धनुरंशगतान् ग्रहान् विलग्नं च पश्यतीन्दुसुतः ॥
मिथुनांशस्थश्च यदा पुरुषत्रितयं तदा गर्भे ॥ २५ ॥

मिथुन राशींत धनु अंशांत अनेक ग्रह असून त्यांना आणि तनुस्थानाला बुध जर मिथुनांतून पहात असेल तर तिन्ही पुत्रच पण एकदम जन्मतील. २५

कन्यामीनांशस्थान् विहगानुदयं च युवतिभागगतः ॥
पश्यति शिशिरगुतनयः कन्यात्रितयं तदा गर्भे ॥ २६ ॥

कन्या मीनांशामध्यें अनेक ग्रह असून त्यांना आणि तनुस्थालाला जर बुध सप्तमस्थानांतून पहात असेल तर गर्भामध्यें तीन मुलींच असें सांगावें. २६

दिवसे मातापितरौ शुक्ररवी शशिशनी निशायां च ॥
मातृभगिनी पितृव्यौ विपर्ययात् कीर्तितौ यवनैः ॥ २७ ॥

दिवसा गर्भाच्या मातापित्यासंबंधाचीं फलें शुक्र रविवरून आणि रात्रीं चन्द्र-शनि ह्याच्या धोरणानें सांगावीं; किंवा मावशी चुलता ह्यांच्या संबंधाचीं सांगता येतील. यवनाचार्यांचें मत याच्या उलट आहे. ( यवनानां ज्योतिष ज्यानें शिकविलें त्याला यवनाचार्य म्हणतात. ) २७

लग्नाद्विषमर्क्षगतः पितुः पितृव्यस्य खेचरः शस्तः ॥
मातृभगिनीजनन्योः समगृहगोऽन्ये तथा भेषु ॥ २८ ॥

लग्नापासून किंवा पितृस्थानाच्या विषम राशीपासून पित्याचीं त्याचप्रमाणें योग्य ग्रहावरून चुलत्या-संबंधींहि वस्तुस्थिति सांगता येते. पण तेच ग्रह समराशीमध्यें जर असतील तर मावशी आणि मातेविषयींही वस्तुस्थिति सांगतां येईल. २८

मासेष्वाधानादिषु गर्भस्य यथा क्रमेण जायन्ते ॥
सप्तसुकलिलाण्डकशाखास्थित्वग्रोमचेतनताः ॥ २९ ॥

आधानकालापासून जसजसे गर्भाला महिने लोटत जातात तसतसे सातव्या महिन्यापर्यंत क्रमानें गर्भाची वाढ, कलल, लहान अण्डाकार गोळा, हातपाय, हाडें, कातडी, केंस इत्यादि प्रकारानें होते. २९

मासेऽष्टमे च तृष्णा क्षुधाच नवमे तथोद्वेगः ॥
दशमे त्वथ संपूर्णः पक्कमिव फलं पततिगर्भः ॥ ३० ॥

आठव्या महिन्यात गर्भिणीला तहान लागते, नवव्या महिन्यात क्षुधाअसूनहि थकवा येतो. आणि नववा महिन्या सपून गेल्यावर दहाव्या महिन्यात पिकलें फळ झाडावर गळतें त्या प्रमाणें गर्भ पूर्ण होऊन बाहेर येतो—.

शुक्रारजीवरविशशिसौरिबुधविलग्नपोडुपादित्याः ॥
मासपतयःस्फुरेतैर्गर्भस्य शुभाशुभं चिन्त्यम् ॥ ३१ ॥

पहिल्या महिन्यापासून शुक्र, मंगळ, गुरु, रवि, चंद्र, शनि, बुध आणि लग्नाधिप, आणि राश्यधिप हे अनुक्रमानें मासाधिप असतात त्याच्या स्थितिवरून मास फलें सांगावीं—. ३१

उत्पातक्रूरहते तस्मात् स्वस्याधिपे पततिगर्भः ॥
लग्नगृहं वा हेतुर्योगेशो गर्भपतनस्य ॥ ३२ ॥

मासाधिपाला किंवा लग्नेशाला उत्पात, पापग्रह ह्यांची बाधा झाल्यास गर्भपतन पावतो, किंवा त्याचा पापग्रहाशीं योग घडल्यासहि गर्भाचा नाश होतो— ३२

अथवा निषेककाले विलग्नसंस्थौ यदा रुधिर मन्दौ ॥
तद्गृहगतेऽथवेन्दौ तदीक्षिते वा पतति गर्भः ॥ ३३ ॥

किंवा आधानकालीं लग्नीं मंगळ, किंवा शनि असल्यास किंवा त्यांच्या गृहांत चंद्र सांपडला अथवा चंद्रावर त्याची क्रूर दृष्टि पडली तरी गर्भपात होतो.—३३

होरेन्दुयुतैः सौम्यैस्त्रिकोणजायार्थलाभसंस्थैर्वा ॥
पापैस्त्रिलाभयातैः सुखीचगर्भो निरीक्षिते रविणा ॥ ३४ ॥

होरा, अथवा चंद्र ह्याच्याशीं शुभ ग्रहाचा योग घडला किंवा त्रिकोण, सप्तम द्वितीय लाभ इत्यादि ठिकाणच्या शुभग्रहाची दृष्टि असली म्हणजे गर्भ सुखानें वाढतो —३४

क्रूरान्तः स्थः सूर्यश्चन्द्रौ वा युगपदेव मरणाय॥
सौम्यरदृष्टमूर्तिर्युवतीनां गर्भसहितानाम् ॥ ३५ ॥

पापग्रहाच्या कचाटींत सूर्यचंद्र सापडले तर गर्भाला एकदम मृत्यु घडतो, त्यातच शुभग्रहाची दृष्टि नसेल तर गर्भिणीलाहि धोका असतो.

उदयास्तगतैः पापैः सौम्यैरनवेक्षितैश्च मरणं स्यात् ॥
उदयस्थितेऽर्कजे वा क्षीणेन्दौ भौमसंदृष्टे ॥ ३६ ॥

तनुस्थान आणि सप्तमस्थान ह्यामध्यें पापग्रह असून त्याच्यावर शुभ ग्रहांची दृष्टि नसेल, अथवा शनि जर तनुभावारभीं असेल किंवा कृष्णपक्षातील चंद्र मंगळानें दृष्ट असेल तर गर्भाला मृत्यु आहे असें समजावें. ३६

व्ययगेऽर्केशशिनि कृशे पाताले लोहिते सगर्भा स्त्री ॥
म्रियते तस्मिन्नयना शुक्रे पापद्वयान्तः स्थे ॥ ३७ ॥

द्वादशांत रवि, चंद्रक्षीण, चतुर्थांत मंगळ, दोन पापग्रहाच्या कात्रींत शुक्र असा योग असला तर गर्भिणीला मृत्यु येतो. ३७

चंद्रचतुर्थैः क्रूरैर्विलग्नतो वा विपद्यते गर्भः ॥
होराघ्ने क्षितिजे म्रियते गर्भः सह जनन्या ॥ ३८ ॥

तनुस्थानापासून किंवा चंद्रापासून चवथ्या स्थानात पापग्रह असले किंवा ह्यांत मंगळ असला तर गर्भासह गर्भिणीलाच मृत्यु येतो ३८

हिबुकगते धरणिसुते रिःफगतेऽर्के क्षपाकरे क्षीणे ॥
गर्भेण सह म्रियते पापग्रहदर्शनं प्राप्ते ॥ ३९ ॥

मंगळ, द्वादशांत रवि आणि चंद्रक्षीण, असा योग असून त्यातच जर पापग्रहाची दृष्टि शुभग्रहांवर पडली तर ३९

लग्ने रविसंयुक्ते क्षीणेन्दौ वा कुजेऽथवा म्रियते ॥
व्ययधनसंस्थैः पापैस्तथैव सौम्यग्रहादृष्टैः ॥ ४० ॥

लग्नामध्ये रवि, क्षीणचंद्र किंवा मंगळ, आणि द्वितीय व द्वादशस्थानीं पापग्रह आणि ते शुभग्रहांनीं अदृष्ट असा योग जुळला तर गर्भिणी मृत्यु पावते. ४०

जामित्रे रवियुक्ते लग्नगते वा कुजे निषिक्तस्य ॥
गर्भस्य भवति मरणं शस्त्रच्छेदैः सह जनन्या ॥ ४१ ॥

सप्तमस्थानीं किंवा लग्न गत रवि अथवा मंगळ हे ग्रह आधानकालीं असले तर गर्भाला आणि त्याच्या मातेला शस्त्रक्रिया करण्याचा प्रसंग येऊन मृत्यु येईल. ४१

बलिभिर्बुधगुरुशुक्रैर्दृष्टेऽर्केण च विवर्धते गर्भः ॥
मासाधिपबलतुल्यैस्तैस्तैः संयुज्यते भावैः ॥ ४२ ॥

म्हणून ( पंचम किंवा सप्तम स्थानावर ) बुध, शुक्र, गुरु आणि रवि हे ग्रह बलवान् असून त्यांची दृष्टी शुभ असेल तर गर्भाची वृद्धि होते; आणि मासाधिप बलवान् असून त्याचीहि शुभ दृष्टि असेल तर त्या त्या महिन्यात गर्भाची होणारी वाढ उत्तम होते. ४२

मासि तृतीये स्त्रीणां दौहृदकं जायते तथाऽवश्यम् ॥
मासाधिपस्वभावैर्विलग्नयोगादिभिश्चान्यत् ॥ ४३ ॥

गर्भिणींला तिसऱ्या महिन्यात डोहळे लागतातच; पण लग्नाधिप आणि मासाधिप ह्यांच्या योगानुरूप त्यांत कमीज्यास्त होते. ४३

निषेककाले चरराशिगेऽर्के गर्भप्रसूतिर्दशमेच मासे ॥
एकादशेच स्थिरराशिसंस्थेस्याद्वादशे मास्युभयाश्रितेच ॥ ४४ ॥
गर्भाधाने चरे राशौ दशमासैः प्रसूयते ॥
स्थिरेणैकादशे मासे उभये द्वादशे भवः ॥ ४५॥

आधानकालीं रवि चर राशींत असेल तर प्रसूति दहाव्या महिन्यांत होईल, आणि स्थिर राशींत असेल तर नवव्या महिन्यापुढें बऱ्याच दिवसांनीं होईल, आणि द्विस्वभाव राशींत असेल तर ११ महिनेंहि उलटून जाऊन बारावा महिनाहि येईल. ४४,४५.

गर्भप्रसवविधानं तात्कालिकलग्नवर्गतश्चिन्त्यम् ॥
आधानाज्जन्मर्क्षं दशमं वाञ्छन्ति केचिदाचार्याः ॥ ४६ ॥

त्या त्या काळचें लग्न आणि षट् वर्ग ह्याच्या धोरणानें प्रसूति कालाचा विचार करावा. कांहीं आचार्यांच्या मतानें आधान लग्नापासून जन्मकालीन राशी बहुतेक दशम स्थानांत असते. ४६

आधानोदयशशिनोः सप्तममं वादरायणो ब्रूते ॥
तस्मान्नैकान्तोऽयं सर्वेषां संमतं वक्ष्ये ॥ ४८ ॥

बादरायणाच्या मतानें आधान कालीन लग्न आणि चन्द्र राशि ह्याच्यापासून जन्मराशि सप्तमस्थानीं असते, परंतु ह्याप्रमाणें निरनिराळ्या शास्त्रज्ञांचीं वैयक्तिक मतें न सांगता एकंदर निष्कर्ष सांगतों. ४७

यस्मिन् द्वादशभागे गर्भाधानें स्थितो निशानाथः ॥
तत्तुल्यर्क्षे प्रसवं गर्भस्य समादिशेत्प्राज्ञः ॥ ४८ ॥

आधानकालीं ज्या राशींत अथवा स्थानांत चन्द्र असेल तीच राशि अथवा तेंच लग्न प्रसुति कालींहि असतें असें बहुतेक शास्त्रज्ञांचें मत आहे. ४८

लग्ने शनैश्चरांशे शनैश्चरे द्यूनगे यदि निषेकः ॥
वर्षत्रयेण सूतिर्द्वादशभिः स्याच्छशिनिचैवम् ॥ ४९ ॥

शनि लग्नामध्यें त्याच्याच अंशात किंवा द्यूनस्थानीं अशी स्थिति आधान कालीं असेल तर तीन वर्षांनीं ( ! ) प्रसुति काल येईल. परंतु चन्द्र असेल तर बारा ( महिन्यानीं ! ) प्रसुति काल घडेल. ४९

तात्कालिक दिवस निशासंज्ञः समुदेति राशि भागौ यः ॥
यावानुदयस्तावान् वाच्यो दिवसस्य रात्रेर्वा ॥ ५० ॥

( सूर्य राशीपासून सातव्या राशीला ' द्यून ' म्हणतात ) नंतर तात्कालिक लग्नाचा जो उदितांश, किंवा असा लग्नाचा जो अंश त्यापैकीं ज्याच्याशीं प्रश्न कालाचा संबंध येईल त्याप्रमाणें प्रसुतिची वेळ दिवसा किंवा रात्री आहे, असें सांगावें. ५०

मुनिभागे दिवसनिशोर्जन्मनि लग्नं वदेद्युक्त्या ॥
उदयगणात् प्रसवः स्यादिनपक्षमुहूर्तमाससंज्ञर्क्षात् ॥ ५१ ॥

दिवसा किंवा रात्रीं प्रश्न कालावरून प्रसुति काल प्रश्न लग्नापासून सातव्या अंशात इत्यादि निश्चय, बुद्धी चालवून करावा. आणि उदय लग्न, त्याचप्रमाणें दिनाधिप, व पक्ष, मास, मुहूर्त ह्यांचीं नक्षत्रें पाहून सर्वांच्या धोरणानें प्रसव काल वर्तवावा. ५१

इत्याधाने प्रथमं प्रसूतिकालं सुनिश्चितं कृत्वा ॥
जातकविहितं च विधिं विचिन्तयेत्तत्र गणितज्ञः ॥ ५२ ॥

ह्याप्रमाणें आधान कालीन लग्न व ग्रह स्थिति ह्यांच्या अनुरोधानें प्रसूति काल ठरविल्यावर, ज्योतिष्यानें त्या बालकाचें शुभाशुभहि कसें काय आहे तें पाहावें. ५२

स्यातां यद्याधाने रविशशिनौ सिंहराशिगौ लग्ने ॥
दृष्टौ कुजसौरिभ्यां जात्यन्धः संभवति तत्र ॥ ५३ ॥

जर आधान लग्नामध्यें रवि चन्द्र एकत्र सिंह राशींत असून त्याच्यावर मंगळ शनि ह्यांची दृष्टी असेल तर सन्तान उपजताच आंधळें असतें. ५३

आग्नेयसौम्यदृष्टौ रविशशिनौ बुद्बुदेक्षणं कुरुतः ॥
नयनविनाशोऽपि यथा तथाधुना संप्रवक्ष्यामि ॥ ५४ ॥

परंतु अशाच रीतीनें आधान लग्नीं रवि, चन्द्र असून त्यावर बुध, मंगळ ह्या दोघांची दृष्टी असेल तर मुलाच्या बुबुळावर बदल येतो व डोळेहि जाण्याचा प्रसंग येतो. ५४

व्ययभवनगतश्चन्द्रो वामं चक्षुर्विनाशयति हीनः ॥
सूर्यस्तथैव चान्यच्छुभदृष्टा याप्यतां नयतः ॥ ५५ ॥

आधान कुंडलीत द्वादश स्थानी दूषित चन्द्र असेल तर डावा डोळा जातो. आणि दूषित रवि असेल तर उजवा जातो. परंतु ते शुभ–दृष्ट असतील तर औषधोपचारानींच कसें बसें टिकून राहतील. ५५

क्रूरैर्गृहसन्धिगतैः शशिनि वृषे भौमसौररविदृष्टे ॥
मूकः सौम्यैर्दृष्टे वाचं कालान्तरे वदति ॥ ५६ ॥

कुंडलीमध्यें चन्द्र वृषभेंत, परंतु स्थानाच्या अगदीं–संधीवर असून पुनः त्याच्यावर मंगळ, शनि आणि रवि ह्यांची क्रूर दृष्टि असेल तर मूल मुकें होतें परंतु बुधाची दृष्टि असेल तर ( औषधोपचारानें ) बऱ्याच दिवसानीं तें बोलूं लागेल. ५६

क्रूरेषु राशिसन्धिषु शशीन सौम्यैर्निरीक्ष्यते च जडः ॥
बुधनवमभागसंस्थौ शनिभौमौ यदि सदन्तः स्यात् ॥ ५७ ॥

क्रूर राशीच्या संधिमध्यें चंद्र असून त्याच्यावर शुभ ग्रहाची दृष्टि नसेल तर हातापायात निर्जीव असें मूल होतें, मगळ शनि जर बुधाच्या नवमांशात असतील तर मुलाला उपजतच दांत असतील. ५७

सौम्ये त्रिकोणसंस्थे लग्नाच्छेषग्रहैर्बलविहीनैः ॥
द्विगुणास्यपादहस्तो योगेऽस्मिन्नाहितो भवति गर्भः ॥ ५८ ॥

कुंडलींत त्रिकोणात बुध परंतु इतर ग्रह दुर्बल असा योग असेल तर हातापायाना बोटे ज्यास्त आणि शिवाय मुलाची हालचाल अगदीं कमी अशी स्थिति असेल.

वामनको मकरान्त्ये लग्ने रविचन्द्रसौरिभिर्दृष्टे ॥
शशिनि विलग्ने कर्किणि कुजार्किदृष्टेऽथवा कुब्जः ॥ ५९ ॥

मकरराशीच्या शेवटीं रवि चद्र असून त्यावर शनिची दृष्टि असेल तर मूल बुटबैंगण होतें. लग्नीं कर्क राशींत चंद्र परंतु मंगळ रवि आणि शनि ह्याच्या दृष्टीनें दूषित असेल तर मूल कुबडें होईल. ५९

मीनोदयेच दृष्टे कुजार्किशनिभिः पुमान् भवति पङ्गुः ॥
सार्था भवन्ति योगाः सौम्यग्रहवीक्षिताः सर्वे ॥ ६० ॥

लग्नी मीन रास ( तेथें चद्र आणि ) त्यावर मगळ, रवि, शनि ह्यांची दृष्टि असेल तर मूल पांगळें होईल. परंतु शुभ ग्रहाची दृष्टि असेल तर सर्व कुयोग कमजोर होतात. ६०

क्रूरग्रहस्त्रिकोणे त्रिकोणलग्ने शुभेषु बलवत्सु ॥
द्विशिरोद्विबाहुयुग्मः शेषैरबलैर्भवति गर्भः ॥ ६१ ॥

क्रूर त्रिकोणात किंवा लग्नात शुभ ग्रह बलाढ्य असले तरी मुलाचें डोकें, हात किंवा पाय ह्याच्य बोटात कांहीं तरी विचित्र प्रकार असतो इतर ग्रह फार निर्बल असतील तर. ६१

इत्याधान विधानं प्रसूति समयेऽपि योजयेद्योग्यम् ॥
आधाने यन्नोक्तं प्रसवविहितं तदपि चिन्त्यम् ॥ ६२ ॥

ह्याप्रमाणें आधान कुंडलीवरून शुभाशुभ फलें पहावीं. ह्या अध्यायांत उपजलेल्या मुलाविषयीं अधिक सांगितलेलें नसलें तरी न सांगितलेलीं फलेंहि आधान कुंडलीवरून पहावीं. ६२

 ( सारावली १६ ते २० )

# जन्मकाल विवेचन.

आधानं हि मयोक्तं प्रसूतिकालस्य निर्णयार्थपरम् ॥
तस्मिन् सुपरिज्ञाते जन्माध्यायं प्रवक्ष्यामि ॥ १ ॥

प्रसूति काल केव्हां होईल हें समजण्यासाठीं आधानपद्धतीची माहिती सांगितली. तो विषय चांगला लक्षात आला म्हणजे त्यावरून जन्मजातकपद्धति सांगण्यात येईल ती चांगली समजेल ! १

शीर्षोदये विलग्ने मूर्ध्ना प्रसवोऽन्यथोदये चरणैः ॥
उभयोदये च हस्तैः शुभदृष्टे शोभनोऽन्यथाकष्टः ॥ २ ॥

लग्नीं शीर्षोदय राशि असल्यास बालकाचा जन्म डोक्याकडून होईल,—इतर राशि असतील तर पायाकडून होईल. उभयोदय राशि असेल तर हातच अगोदर येतील आणि बाळंतिणीस यातना होतील. परंतु शुभग्रहाची दृष्टी असेल तर कष्ट होणार नाहींत. २

भवनांशसदृशदेशे प्रसवो ज्ञेयः सदात्र युवतीनाम् ॥
मिश्रगृहांशे वर्त्मनि स्थिरराश्यंशे तथा स्वगृहे ॥ ३ ॥

लग्नाचा जो अंश उदित असेल त्याप्रमाणें गर्भिणीच्या प्रसूतीची जागा सांगावी. मिश्रग्रहाचा अंश असेल तर मार्गांत प्रसूति घडेल. स्थिरराशि लग्नीं असेल तर तिच्या घरींच प्रसूति होईल. ३

स्वगृहनवांशे लग्ने स्वगृहेऽन्यस्मिन्यदि प्रथमहर्म्ये ॥
पितृमातृग्रहबलतस्तत्तत्स्वजन गृहेषु बलयोगात् ॥ ४ ॥

लग्नीं त्याचराशीचा नवांश असेल तर ती आपल्याच घरीं प्रसूत होईल. नाहींतर पहिल्या स्थानीं जो दुसरा नवांश असेल त्याप्रमाणें पिता, माता ह्यांच्या स्थानातील ग्रहबलानुरूप त्या त्या नातलगाच्या येथें प्रसूति होईल असें सांगावें. ४

प्राकारतरुनदीषु च सूतिर्नीचाश्रितैः सौम्यैः ॥
नेक्षन्ते लग्नेन्दू यद्येकस्था ग्रहा महाटव्याम् ॥ ५ ॥

नीचराशींत शुभग्रह असतील तर प्राकार, तरु, किंवा नदीच्या ठिकाणीं प्रसूति होईल. एकाचस्थानीं ग्रह असून ते लग्नाला किंवा चंद्राला पहात नसतील तर महा अरण्यात प्रसूत होईल. ५

सलिल भवनेच चन्द्रो जलराशौ वीक्षते तथा पूर्णः ॥
प्रसवं सलिले विद्यात् बन्धूदयदशमगश्च यदा ॥ ६ ॥

लग्नीं जलराशींत चंद्र पौर्णिमेचा असून त्याची दृष्टीहि जलराशिवरच असेल तर जलप्रवासात प्रसूति होईल, किंवा चंद्र भ्रातृ, दशमस्थानात असून वरप्रमाणें दृष्टि असेल तरी तेच होईल. ६

सौम्यैर्लग्ने पूर्णे स्वगृहगते शशिनि सलिलसंयाते ॥
पातालस्थैश्च शुभैर्जलजे लग्नेऽम्बुगेहगे शशिनि ॥ ७ ॥
वृश्चिककुलीरलग्ने सौरे चन्द्रेक्षिते स्वचटे ॥
भवति प्रसवः स्त्रीणां वदन्ति यवनाः सह मणित्थैः ॥ ८ ॥

प्रथम भवनात चंद्रस्वगृहीचा जलराशींत, आणि चतुर्थांत शुभग्रह; किंवा प्रथमस्थानीं शुभग्रह आणि

पाताळ भवनात जलराशींमध्यें चन्द्र अथवा वृश्चिक कर्कराशींत लग्नीं शनि त्यावर पाताल्स्थ चद्राची दृष्टि अशा योग असला म्हणजे प्रसुतिकाल आला असें यवन आणि मणित्थ ह्यांचें मत आहे. ७-८

रविजे जलजविलग्ने क्रीडोद्याने बुधेक्षिते प्रसवः ॥
रविणा देवागारे तथोपरे (!) चैवचन्द्रेण ॥ ९ ॥

*लग्नीं जलराशींत शनि त्यावर बुधाची दृष्टि अशा स्थितींत स्त्रीची प्रसुति एखाद्या सुंदर उपवनांत* होईल, पण रविची दृष्टि असेल तर देवालयात, आणि चद्राची दृष्टि असेल तर रेताड अशा स्थलीं होईल.९

आरण्यभवनलग्ने गिरिवनदुर्गे तथा रवौ लग्ने ॥
रुधिरेक्षिते स्मशाने शिल्पकनिलयेषु सौम्येन ॥ १० ॥

लग्नीं रवि असेल आणि त्यावर उलट दृष्टि असेल तर जगली लोकांच्या घरात, एखाद्या पर्वतावर किंवा निबिड अरण्यात प्रसुति होईल, मगळाची दृष्टि असेल तर मसणवटीत आणि बुधाची असेल तर शिल्पकाराच्या घरात बाळतीण होईल. १०

सूर्येक्षिते गोनृपदेववासे शुक्रेन्दुजाभ्यां रमणीयदेशे ॥
शक्रेज्यदृष्टे द्विजवह्निहोत्रे नरोदये सम्प्रवदन्ति सूतिम् ॥ ११ ॥

लग्नावर रविची दृष्टि असली तर गाई, राजे, देवालय ह्यांच्या सन्निध, बुध शुक्राची दृष्टि असेल तर एखाद्या रम्य प्रदेशात, गुरूची असली तर अग्निहोत्र मदिरांत, पण लग्नीं नरराशि पाहिजे; म्हणजे त्या त्या स्थलीं प्रसुति होईल. ११

स्वोचे दशमे जीवे द्वित्रिचतुर्भूमिके गृहे प्रसवः ॥
मन्दर्क्षांशे साले (!) चतुर्थदशमास्थितैः सौम्यैः ॥ १२ ॥

गुरू दशमांत उच्चीचा, किंवा, द्वितीय, चतुर्थांत ( उच्चीचा ) शनिच्या नवांशात, चतुर्थ, दशमांत शुभग्रह, असले म्हणजे प्रसुति अनेक मजले असलेल्या भव्य मदिरात होतें. १२

द्वौ द्वौ राशी मेषात् पूर्वादिषु संस्थितौ गृहविभागे ॥
कोणेषु द्विशरीरा लग्नन्तु भवेद्धि-तत्प्रमुखैः ॥ १३ ॥

मेषापासून दोन दोन राशि मोजून प्रत्येक दुसऱ्या राशीची फलें सागावीं. दिशा पूर्वेकडून सागाव्या, कोणस्थ भवनांत द्विशरीर राशि, लग्नींसुद्धा जी रास असेल तिच्यावरून फलें सागावीं. १३

दिग्भागराशिमण्डलकेन्द्रेषु खगेषु तच्छाला ॥
अथमृगहयबलवत्वे गृहं द्विशालं त्रिशालं च ॥ १४ ॥

पूर्व—पश्चिम इत्यादि दिशादर्शक राशि किंवा केन्द्रस्थानें ह्या भवनात जसे ग्रह असतील त्याप्रमाणें प्रसुति ज्या घरांत होणार त्याचें स्वरूप, त्याचे किती मजले इत्यादि घरात श्रीमतीदर्शक कोणतीं जनावरें त्याचें वर्णन द्यावे. १४

चित्रं नवंभृगुसुते च दृढं गुरौ च ॥
दग्धं कुजेदिनकरे परिपूर्णकाष्टम् ॥
चन्द्रे नवं च बहुशिल्पिकृतं बुधे च ॥
जीर्णं भवेद्गृहमिहोष्णकरात्मजे च ॥ १५ ॥

अशास्थानीं शुक्र असेल तर प्रसुतिगृह चित्रविचित्र रंगानीं भूषित असेल. गुरू असला तर घर मजबूत. मगळ असला तर जळके. रवि असले तर लाकडी काम दृढ चद्राच्या योगानें नवें करकरीत. बुध असेल तर कलाकुसरीचें, आणि शनि असला तर प्रसुतिगृह जुनें मोडकळीस आलेलें असेल. १५

वासगृहे द्यूनगतात् द्वारे दिक्पालकात् बलोपेतात् ॥
भवनग्रहसंयोगैः प्रतिवेश्माश्चिन्तनीयाः स्युः ॥ १६ ॥

याप्रमाणें द्यून-ग्रहांवरून राहण्याची जागा (द्यून म्हणजे रविपासून सातवें) दिक्दर्शक राशींच्या स्वामींच्या बलाबलावरून घराचीं दारें वगैरे आणि निरनिराळ्या ग्रहयोगावरून शेजारीपाजारी यांचीं घरें सांगावीं. (लग्नापासून ७व्या स्थानासही द्यून ही संज्ञा आहे.) १६

देवालयाम्बुपावककोशविहारास्तथोत्करो भूमेः ॥
निद्राग्रहं च भास्करशशिकुजगुरुभार्गवार्किबुधयोगात् ॥ १७ ॥

ग्रहयोगावरून शिवाय त्याचें वर्णन सांगावें; रवि, चन्द्र मंगळ, गुरु शनि-शुक्र-बुध याचे परस्पर योग असतील त्याप्रमाणें शेजारीं देवालय, पाणी, भटारखाना, द्रव्यनिधि, बागबगीचा, महाल असावा कीं काय तें सांगावें. १७

खट्वास्थितिर्भवनवद्युतविहगसमानि तत्र चिह्नानि ॥
आस्तरणानि च विद्यात् शुभदृष्टिकृतानि दैवज्ञः ॥ १८ ॥

त्याच ग्रहयोगावरून घराच्या पद्धतीनेंच खाटेचें वर्णन सांगावें. घराच्या वर्णनाशीं जुळेल अशीच खाट असते. म्हणून तसेंच तिचें वर्णन आणि पलंग पाघरुणांचें वर्णन ज्योतिष्यानें सांगावें. १८

प्राच्यादिग्रहद्वितयं भद्वितयं राशयश्च गात्राणि ॥
आजानुशिरः शयनं ग्रहतुल्यं लक्षणं तत्र ॥ १९ ॥

दिक्दर्शक भवने दोन, त्याच्या राशिदोन व इतर राशि ह्याच्या अनुरोधानें-खाटेवर डोकें कोणीकडे, गुडघे पाय कोणीकडे कोणत्या कुशीवर बाळंतीण आहे तें सांगावें. १९

ग्रहयुक्तं वा नियतं विनतत्वं च द्विमूर्तिराशिपु च ॥
पद्त्रिनवान्त्याः पादाः पर्यङ्केऽङ्गानि राशयः शेषाः ॥ २० ॥

पलंगाचें सुद्धा बारीक वर्णन सांगावें; ग्रहाचे योग जितके सूक्ष्म तितके वर्णन निश्चित. द्विशरीर राशिवरून तो किती सखल आहे हें सांगावें. त्या राशींच्या त्र्यंश, षडंश, नवांशावरून त्याचे पाय कसे तें सांगावें. इतर राशिवरून इतर भाग सांगावे. २०

नीचस्थे भूशयनं चन्द्रेऽप्यथवा सुखे विलग्ने वा ॥
शशिलग्नविवरयुक्तग्रहतुल्याः सूतिकाज्ञेयाः ॥ २१ ॥

ग्रह नीचीचे असतील तर जमीनीवर झोंपण्याचा प्रसंग येईल, तोच चंद्र, सुखस्थान, लग्न ह्याच्यावरूनहि सांगावा. चन्द्र, लग्न, पाताल ह्याच्याशी होणाऱ्या ग्रहयोगावरून सुइणीचें वर्णन करावें. २१

अनुदितचक्रार्धयुतैरन्तर्बहिरन्यथा वदन्त्येके ॥
लक्षणरूपविभूषणयोगस्तासां शुभैर्योगात् ॥ २२ ॥

ज्या ज्या राशि अनुदित त्यावरून आतील व्यवस्थेचें आणि उदितावरून बाहेरच्या व्यवस्थेचें वर्णन सांगावें. तेथें शुभग्रहाचे जसे योग असतील त्याच्यावरून त्या सुईणीच्या खाणाखुणा, रूप, भूषणें इत्यादि सांगावें.

क्रूरैर्विरूपदेहा लक्षणहीनाः सुरौद्रमलिनाश्च ॥
मिश्रैर्मध्यमरूपा बलसहितैः सर्वमेवमवधार्यम् ॥ २३ ॥

क्रूर ग्रहावरून त्या कुरूप किंवा कुलक्षणी दिसण्यात भेसूर आणि रहाणीनें मळकट असें सांगावें. मिश्र ग्रहांवरून मध्यम रूपाच्या आहेत असें सांगावें. सर्व गोष्टी ग्रहाच्या बलाबलावर आहेत. २३

द्वादशभागच्छन्ने वासगृहेऽवस्थिते सहस्रांशौ ॥
दीपश्चरस्थिरादिषु तथैव वाच्यः प्रसवकाले ॥ २४ ॥

रवि स्वगृहाच्या द्वादशांशात आहे कीं काय तें पाहून खोलींतील दिवे सांगावे, ते चर, स्थिर, राशि-वरूनहि ठरवावे. २४

यावल्लग्नादुदितं वर्तिर्दग्धा तु तावती भवति ॥
दीपः पूर्णे पूर्णः शशिनि क्षीणे क्षयस्तु तैलस्य ॥ २५ ॥

लग्नाचे जितके अंश उदित तितकी दिव्याची वात जळास होते. पूर्णोदयामध्यें दिवाहि पूर्णपणे तेवत असतो. चन्द्र क्षीण असला तर दिव्यातील तेल संपलें म्हणून सांगावें. २५

बलवति सूर्ये दृष्टे बहून् प्रदीपान् वदेत् कुपुत्रेण ॥
अन्यैरपि गतवीर्यैः सूतौ ज्योतिस्तृणैर्भवति ॥ २६ ॥

रवि बलवान् शुभ दृष्ट असला तर अनेक दिवे तेवत असतात. परंतु दुसरे ग्रह निर्बल असतील, तर जवळच गवताची आगटी आहे असें सांगावें. २६

सौरांशेऽथ जलांशे चन्द्रेऽर्कजसंयुतेऽथवाहिबुके ॥
तद्दृष्टे वा कुर्यात्तमसि प्रसवं न संदेहः ॥ २७ ॥

सूर्याच्या किंवा जलाच्या अंशात चन्द्र–किंवा चतुर्थ–स्थानात रवि चन्द्र योग दृष्टियोग असेल तर अंधाऱ्या खोलीत प्रसूति झाली असें निःसंशय सांगावें. २७

होरामनीक्षमाणे शशिनि परोक्षस्थिते पितरि जातः ॥
मेषूरणागते वा चरभे भानौ विदेशगते ॥ २८ ॥

चन्द्र त्याच्याच होरास्थानास पहात नसेल तर पिता जवळ नसतांना जन्म होतो. आणि मेषूरण योग असला किंवा रवि चरराशींत असेल तर पिता परगावीं गेला असेल. २८

द्युनिशोरर्कासितयोः कुजेन सन्दृष्टयोः पिताप्यभवत् ॥
चरराशौ परदेशे युक्तेक्षितयोस्तु तत्र मृतः ॥ २९ ॥

रवि शनि ह्याच्यावर चरराशींत मंगळाची दृष्टि असेल तरी पिता परदेशात असेल, दृष्टि असून पुढें त्याच्याशीं योग घडेल तर पिता परदेशात मृत्यु पावला म्हणून सांगावें. १९

पञ्चमनवमद्यूने पापैरर्कात्तु पापसंदृष्टैः ॥
बद्धः पिताऽन्यदेशे राशिवशात् स्वेऽथवा मार्गे ॥ ३० ॥

रविपासून पञ्चम, नवम आणि सप्तमस्थानीं जर त्याच्यावर पापग्रहाची दृष्टि असेल तर परदेशात पित्याला बद्ध केलें आहे, आणि तें बन्धन राशिपरत्वें त्याच्या देशातून अथवा मार्गातच केलें आहे असें सांगावें. ३०

जायात्रिकोणसंस्थैः क्रूरैरानन्दवर्जितः प्रसवः ॥
दशमचतुर्थोपगतैः सौम्यैः संपत्तयो विपुलः ॥ ३१ ॥

जाया, त्रिकोण स्थानीं पापग्रह असल्यास प्रसूति कष्टमय होते. पण पापग्रह नसून उलट चतुर्थ दशमात शुभग्रह असतील तर विपुल साधन संपत्ति असते. ३१

पश्यति न गुरुः शशिनं लग्नं च दिवाकरं सेन्दुम् ॥
पापयुतं वा सार्कश्चन्द्रं यदिजारजातःस्यात् ॥ ३२ ॥

लग्नावर, चन्द्रावर किंवा चन्द्रासहित रविवर गुरूची दृष्टि नसेल, किंवा पापयुक्त रवि चन्द्राशीं कुयोग करीत असेल तर बालक जारकर्मापासून झालें असतें. ३२

गुरुशशिरवयो नीचे सुतौ लग्नेऽथवार्कसूनुश्च ॥
लग्नोडुपभृगुपुत्राः शुभैरदृष्टास्तथान्यजातश्च ॥ ३३ ॥

गुरु–चन्द्र–रवि हे नीची पचमस्थानीं किंवा शनि लग्नी–,आणि लग्नाधिप आणि शुक्र ह्याच्यावर पापग्रहाची दृष्टि असा योग असला तर बालक जारकर्मापासून झालें असें समजावें. ३३

क्लेशो मातुः क्रूरैर्बन्धवस्तगतैः शशाङ्कयुक्तैर्वा ॥
चन्द्रात् सप्तमराशौ पापा मरणाय वक्रसन्दृष्टाः ॥ ३४ ॥

बन्धु स्थानचे ग्रह अशुभ, किंवा अस्तगत असून चन्द्राशीं युक्त असले तर मातेला क्लेश, आणि चन्द्रापासून सप्तमात पापग्रह वक्री आणि अशुभ दृष्ट असतील तर मृत्यु ओढवेल. ३४

चंद्राद्दशमे भानुर्मातुर्मरणं करोति पापयुतः ॥
शुक्रात् पञ्चमनवमे सौरियुतस्तेन वा दृष्टः ॥ ३५ ॥

चन्द्रापासून दशमामध्यें पापग्रह पीडित, रवि असला तर मातेचें मरण; आणि शुक्रापासून नवपञ्चम स्थानीं रवि हा शनिनें युक्त किंवा दृष्ट असेल तरी तेंच. ३५

चन्द्रात्रिकोणराशौ रविजो मातुर्वधं दिशति रात्रौ ॥
शुक्रात्तथैव दिवसे भौमः पापेन सन्दृष्टः ॥ ३६ ॥

चन्द्रापासून नवपञ्चमांत शनि असेल तर मातेचा वध होईल, पण तो रात्रीं; आणि शुक्रापासून नवपञ्चमात मगळ असेल आणि तो दुष्ट असेल तर तिचा वध दिवसा होईल. ३६

कुजसौरयोस्त्रिकोणे चन्द्रेऽस्तगते वियुज्यते मात्रा ॥
दृष्टे सुरेन्द्रगुरुणा सुखान्वितो दीर्घजीवी च ॥ ३७ ॥

मगळ, शनि ह्याच्या नवपञ्चमात चन्द्र अस्तगत असेल तरी मातेला मृत्यु. परतु ह्या स्थानावर गुरूची पूर्ण शुभदृष्टी असेल तर बालक दीर्घायुषी होते ३७

म्रियते पापैर्दृष्टे शशिनि विलग्ने कुजेऽस्तगेत्यक्तः ॥
लग्नात्स्वलाभगतयोर्वसुधासुतमन्दयोरेवम् ॥ ३८ ॥

पण बालकाचा चन्द्र जर पापग्रह पीडित असेल, किंवा लग्नीं मगळ असून चन्द्र अस्तगत असेल तर बालक पोरके होईल. आणि लग्नापासून चतुर्थात आणि लाभात मगळ शनि असतील तरी तीच स्थिति होईल ३८

पश्यति सौम्यो बलवान् यादृग्गृह्णाति तादृशोजातः ॥
शुभपापग्रहदृष्टे परैर्गृहीतोऽथवा म्रियते ॥ ३९ ॥

कुण्डलींत बुध बलवान् असेल तर त्याच्या धोरणावर बालकाचा स्वभाव जाईल, त्याच्यावर व शुभ ग्रहावर पापग्रह दृष्टि असेल तर तें बालक दुसऱ्याच्या ताब्यात जाईल किंवा मृत्यु पावेल. ३९

एकांशस्थितयोर्वा यमारयोस्त्यज्यतेऽथवा माता ॥
लग्नात्सप्तमभवने भौमे शनिवीक्षिते नियतम् ॥ ४० ॥

शनि मंगळ एकाच अंशात असले म्हणजे आई लेकराला टाकून देते आणि लग्नापासून सप्तमामध्यें मंगळ आणि त्यावर शनिची दृष्टि असेल तर हा प्रसंग खात्रीनें येतो. ४०

यादृक्पश्यति सौम्यस्तत्तुल्यगुणं सुतः समाधत्ते ॥
पितृजननीसादृश्यं रवेःशशाङ्कस्य बलयोगात् ॥ ४१ ॥

बुधग्रहाची जशी शुभाशुभ दृष्टि असेल त्या प्रमाणें बालकाचे गुण उदित होतात आणि रविची व चन्द्राची स्थिति किंवा बलाबल असेल त्याप्रमाणें बाप किंवा आई ह्याच्यासारखें वळणाचे मूल होतें. ४१

सिंहाजगोभिरुदये जातो नालेन वेष्टितो जन्तुः ॥
लग्ने कुजेऽथ सौरे राश्यं (!) समानगात्रश्च ॥ ४२ ॥

सिंह मेष वृषभ ह्याचा उदय ( पूर्ण ) झाला तर मूल गळ्या भोंवतीं नाळ गुण्डाळलेलें असें निपजतें. आणि मंगळ, शनि लग्नीं असतील तर त्याच्या अंशाप्रमाणें मुलाचे अवयव असतात. ४२

भौमशनिद्रेक्काणे पापैलग्ने स्थिते शशियुते वा ॥
त्र्येकादशगैः सौम्यैरभिवेष्टितको भुजङ्गेन ॥ ४३ ॥

मंगळ शनि ह्याचा पाप द्रेष्काण ( दशकोण ) असेल किंवा लग्नातल्या चन्द्राशीं ते कुयोग करीत असतील तर एकादश स्थानाव्यतिरिक्त अन्यत्र सौम्य ग्रह असतील तर भुजंगासारख्या नाळाचें मुलाला वेष्टन पडतें. ४३

सूर्यश्चतुष्पदस्थः शेषा द्विशरीरसेस्थिता बलिनः ॥
कोशैर्वेष्टितदेहौ यमलौ खलु संप्रजायेते ॥ ४४ ॥

सूर्य चतुर्थांत असून आणि बाकीचे ग्रह बलवान् आणि द्विशरीर असले तर एकाच गर्भवेष्टनामध्यें जुळीं भावंडें निपजतात. ४४

लग्ननवभागतुल्या मूर्तिर्बलसंयुतात्ग्रहाद्वापि ॥
नवभागाद्वर्णोक्तिः शशियोगात्र सुतस्य ॥ ४५ ॥

लग्न आणि नवमस्थान ह्याच्या अधिपतिच्या बलाबलाप्रमाणें मुलाची ठेवण असते. त्यांत इतर ग्रहांचाहि संबंध असतोच. परंतु चंद्राच्या नवांशाप्रमाणें बालकाच्या आंग कांतिचा वर्ण होतो. ४५

बहवो यदि बलयुक्ता मिश्रा मूर्तिस्तदा वाच्या ॥
कुलजातिदेशपुरुषान् बुद्ध्वाऽऽदेशं समादिशेत्तज्ज्ञः ॥ ४६ ॥

दुसरेहि ग्रह तसेच बलवान् असले तर त्याच्या मिश्र फलाप्रमाणें मूल असतें असें सांगावें. त्या ग्रहांवरूनच मुलाचें कुल, जाति, देश, पूर्वज इत्यादिहि सांगण्यास हरकत नाहीं. ४६

त्रिंशद्भागे भानुर्गृहस्य यस्य स्थितो भवति ॥
तत्तुल्या प्रकृतिः स्यादेवं मुनयोऽध्यवस्यंति ॥ ४७ ॥

कोणत्याहि ग्रहांच्या त्रिंशांतात जर सूर्य असेल तर मुलाचा स्वभाव त्या ग्रहाच्या स्वभावानुरूप होवा असा निर्णय ज्योतिषशास्त्रज्ञ सांगतात. ४७

तत्कालसुहृदरित्वं वलंच नीचोच्चसंभृतं ज्ञात्वा ॥
ज्ञात्वा ग्रहस्वभावां स्तेभ्यः संचिन्त्यमन्यदपि ॥ ४८ ॥

तात्कालिक मित्रत्व आणि शत्रुत्व, बल, उच्चस्थान, नीचस्थान येथें वास्तव्य, स्वभाव वैचित्र्य ह्याच्या धोरणानें दुसऱ्याहि कित्येक गोष्टी सांगता येतील. ४८

क्षीणे शशिनि सपापे माता म्रियते पिता रवौ तद्वत् ॥
बलिभिर्दृष्टे मिश्रैर्व्याधिः सौम्यैः शुभं भवति ॥ ४९ ॥

क्षीण चंद्र असून पुनः तो पापग्रह पीडित असेल तर आई मृत्यु पावते. आणि रवि त्याचप्रमाणें पीडित होईल तर पिता मृत्यु पावतो. शुभाशुभ अशा मिश्र स्वभावी व बलवान् ग्रहांच्या दृष्टीने व्याधि जडतो पण तो शुभग्रह दृष्टीनें किंवा योगानें नष्ट होऊन शुभ होतें. ४९

विपुलविमलमूर्तिः स्वोच्चगो वा स्वराशौ ॥
गुरुसितयुत इन्दुर्बोधनेनानुदृष्टः ।
अतिशयशुभदाता पञ्चमे वाऽपि मातुः ॥
पितुरपि खलु तद्वत् भास्करः सर्वदैव ॥ ५० ॥

कुंडलींत चंद्र स्वगृहीं किंवा उच्चीचा असून त्याचें बिंब विशाल आणि स्वच्छ तेजस्वी असतें अशा वेळीं जन्म घडला, आणि त्याची गुरु किंवा शुक्राशीं युति, बुधाची दृष्टि, असा योग असला तर तो अतिशय शुभयोग असतो. त्याचप्रमाणें तो मातेच्या पंचमांत असला तरी तिला सुख देतो. अशाच प्रकारचा रवि असला तरीहि तो सुखकारकच होतो. ( सारावली २१-२४ )

निषेकलग्नादिनपस्तृतीये राशौ यदा चारवशादुपैति ॥
आधान लग्नादथ वा त्रिकोणे रवौ यदा जन्म वदेन्नराणाम् ॥३८॥ स. चिं.
आधामलग्नात्सुतभे तु जन्म लग्नंभवेच्छास्त्रविदो वदन्ति ॥
आधानलग्ने शुभदृष्टियोगे दीर्घायुरैश्वर्यधनान्वितः स्यात् ॥ ३९ ॥

आधान लग्नापासून सूर्य जर तिसऱ्या राशींत असेल तर त्या लग्नावर जन्म होईल. अगर आधान लग्नापासून सूर्य त्रिकोणस्थानी म्हणजे ५-९ या स्थानीं असेल तर त्या लग्नावर जन्म होईल. ज्योतिषशास्त्रज्ञ असे सांगतात कीं, आधान लग्नापासून पाचव्या लग्नावर जन्म होतो. आधान लग्नीं शुभग्रह असतील अगर त्या स्थानावर शुभग्रहाची दृष्टी असेल तर ते बालक दीर्घायुषी व ऐश्वर्यसंपन्न होते.

धर्मार्थपुत्रेषु निषेकलग्नाद्दृष्टेषु सौम्यैः पुरुषग्रहैर्वा ॥ पुत्रांशकैर्वापि
निषेककाले पुंजन्म बालाजननं विलोमात् ॥ ४० ॥

आधान लग्नापासून ९-२-५या स्थानावर शुभग्रह अथवा पुरुष ग्रहाची दृष्टि असेल किंवा त्यावेळीं पुरुषांश असेल-तर तो पुत्र जन्म समजावा. तसे नसल्यास व ५-९-२ या स्थानावर स्त्रीग्रहाची दृष्टी असेल किंवा तात्कालीक समराश्यंश-असेल तर अशा योगावर स्त्रीजन्म होतो.

निषेकलग्ने शशिनंदनो वा रव्यात्मजो वा यदिपापदृष्टः ॥
पिंडाकृतिं जन्म वदेत्तदानीं शुभेक्षितश्चेन्न तथाविधंतत् ॥ ४१ ॥

आधान कुंडलींत बुध अथवा शनि पापदृष्ट असतील तर जन्मणारे बालक पिंडाकार होईल. त्या बुध शनि वर जर शुभग्रहाची दृष्टी असेल तर ते बालक पिंडाकार होणार नाहीं. ४१

निषेकलग्नेशतृतीयनाथौ लग्नस्थितौ चेद्यमलोद्भवः स्यात् ॥
तृतीयनाथेन युतो निषेकलग्नेश्वरस्तत्सहजे तथैव ॥ ४२ ॥

आधान लग्नाचा स्वामी आणि तृतीय स्थानाचा स्वामी आधानलग्नात असतील तर यमल म्हणजे जुवळें होईल, आधान लग्नाचा स्वामी तृतीयस्थानींच असेल तरीहि जुवळेच होईल.

लग्नेश्वरे कर्मगते विलग्ने भोगीन्द्रयुक्तः सति पादजातः ॥
रंध्रेश्वरे राहुयुते विलग्ने जातोरगैर्वेष्टितसंभवः स्यात् ॥ ४३ ॥
केंद्रे सराहौ गुलिकेन युक्ते लग्नेश्वरे वा निधनेशयुक्ते ॥
क्रूर ग्रहाणां तु दृकाणलग्ने जातोरगैर्वेष्टितसंभवः स्यात् ॥ ४४ ॥
लग्ने त्रिभागे द्रुजसर्पकाले तन्नाथयुक्ते तु तथा त्रिभागे ॥
शुभग्रहाणां तु दृशा विहीने जातोरगैर्वेष्टितसंभवः स्यात् ॥ ४५ ॥
छागोक्षकंठीरवलग्नभूते भौमान्विते वा रविजेन युक्ते ॥
राश्यंशसादृशसमानदेहो नालेन संवेष्टितसंभवः स्यात् ॥ ४६ ॥

लग्नाधिपति दशमस्थानात आणि राहू लग्नी असता बालकाचा जन्म पायाकडून होतो, अष्टमाधिपती राहूसह लग्नात असेल तर ते बालक सर्पवेष्ठीत असे जन्मास येते सर्पवेष्टीत म्हणजे, अगावर लव त्यास किंवा, सर्पाकार नाळानें युक्त असे असते. केंद्रांत राहु गुलिक युक्त, लग्नाधिपती अष्टमेशानें युक्त, लग्नीं पाप ग्रहाचा द्रेष्काण अशी ग्रहस्थिती असता जन्मणारे बालक सर्पवेष्टित असते. लग्नांत सर्प किंवा अडज द्रेष्काण असेल व तो द्रेष्काण स्वस्वामीनें युक्त किंवा दृष्ट असेल, शुभदृष्टीं रहित असेल, तर ते बालक सर्पवेष्टीत असते. मेष, वृषभ, सिंह, या लग्नापैकीं कोणतेही लग्न शनि किंवा मगळानें युक्त असेल तर त्या राशीनें दिग्दर्शीत होणाऱ्या शरीर विभागास नाळ वेष्ठण असते

लग्ने सपापे बहुपापदृष्टे राहुध्वजाभ्यां सहितेथ वात्र ॥
पापग्रहाणां तु विलग्नभे वा जातो नरो नालनिवेष्टितांगः ॥ ४७ ॥
क्रूरांतरे लग्नगते सराहौ लग्ने कुजे वासरनाथदृष्टे ॥
लग्ने शनौ भूमिसुतेनदृष्टे जातो नरो नालनिवेष्टितांगः ॥ ४८ ॥
परस्परक्षेत्र समाश्रितौ वा देहांबुपौ जन्म वदेत्तदानीम् ॥
लग्नेश्वरे वा हिबुकेश्वरे वा ध्वजाहियुक्ते जननं पशोस्तु ॥ ४९ ॥
पापा बलाढ्या विबलास्तु सौम्या नपुंसकौ केंद्रगतौ तदानीम् ॥
दृष्टिस्तयोर्वाथ वियोनिलग्ने चतुष्पदा जन्मवदंति तज्ज्ञाः ॥ ५० ॥
पापा बलाढ्याः स्वग्रहं प्रपन्नाः सौम्याः स्वगेहेतरराशियुक्ताः ॥
चतुष्पदां जन्मतनौ वियोनौ वदंति शास्त्रांतर पारगम्याः ॥ ५१ ॥

लग्नीं पापग्रह, बऱ्याच पापग्रहानें दृष्ट अथवा राहू-केतु यानीं युक्त असे असतील किंवा लग्नात पापग्रहाची राशी असेल तर जन्मणाऱ्या बालकाचें अग नालवेष्टीत असते. लग्नापासून बाराव्यास्थानीं पापग्रह, लग्नांत राहु अथवा लग्नीं मगळ सूर्यदृष्ट किंवा लग्नी शनि मगळानें दृष्ट अशी ग्रहस्थिती असता राश्यंश समान विभाग नालवेष्टीत असतो. लग्नेश आणि चतुर्थेश परस्पराच्या राशीमध्यें असतील किंवा राहू-केतू नी युक्त असतील तर अशा योगांवर पशूचा जन्म होतो पापग्रह बलवान् व शुभग्रह निर्बल असतील आणि

नपुंसक ग्रह म्हणजे बुध व शनि केंद्रस्थानात असतील अथवा त्यांची दृष्टी असेल तर अशा योगावर पशूचा जन्म होतो. पापग्रह बलवान् असून आपल्याराशीत असतील, शुभग्रह शत्रुराशीत असतील आणि लग्नात चतुष्पद राशी असेल तर तो वियोनि जन्म समजावा.

पक्षीदृकाणे तु विलग्न भूते बलान्वितेनैव ग्रहेण दृष्टे ॥
राशौचरे वा यदि तन्नवांशे वियोनिजन्मेति बुधांशके वा ॥ ५२ ॥

लग्नात पक्षी द्रेष्काण असेल आणि बलवान् ग्रह पहात असतील किंवा चरराशी, चर नवांश अगर बुधाचा अंश असेल तर तो वियोनि जन्म समजावा.

शुक्रे क्षिते गोजननं महिष्याः सूर्यात्मजेनापि युतः स दृष्टः ॥
राहुध्वजाभ्यां सहितोथ दृष्टो मेषस्तु जातोन्यपशुस्तथान्यैः ॥ ५३ ॥

वर दिलेले योग शुक्राने दृष्ट असतील तर गाईची उत्पत्ति, शनीने युक्त किंवा दृष्ट असतील तर म्हशीची उत्पत्ति, राहु केतुने युक्त किंवा दृष्ट असतील तर मेंढ्याची उत्पत्ति, समजावी.

लग्ने बुधक्षेत्रगतेरिनाथे लग्नेश्वरे सोमसुतर्क्षसंस्थे ॥
जातस्तु सस्त्रीकनपुंसकस्याच्छन्यारयोगात् पुरुषस्तु पंढः ॥ ५४ ॥

षष्ठेश लग्नी बुधाच्या राशीत असेल अगर लग्नेश बुधाच्या राशीत असेल तर स्त्रीसहित पुरुष नपुंसक होतो. ह्या योगात शनि मंगळाचा संबंध असेल तर तो पुरुष नपुंसक फक्त होतो.

अन्योन्य दृष्टी शशिवासरेशौ युग्मौ च गाविंदुजभानुपुत्रौ ॥
ओजर्क्षगो भानुसुतो दिनेशं पश्यत्यसौ युग्मगतस्तथैव ॥ ५५ ॥
ओजे तु लग्ने कुमुदात्मबंधुस्तत्र स्थितो युग्मगभौमदृग्नः ॥
युग्मौजगाविन्दुसुतौ कुजेन दृष्टो विलग्नश्च निशाकरश्च ॥ ५६ ॥
पट क्लीबयोगाः पुरुषाशयुक्ताः प्रोक्ता महद्भिर्बहुशास्त्रविद्भिः ॥
लग्नेश्वरश्चंद्रसुतेन युक्तः पंढो भवेत्सौम्यसगेन युक्तः ॥ ५७ ॥

सूर्यचंद्राची एकमेकावर दृष्टी असेल, बुध शनि द्विस्वभाव राशीत असतील, विषम राशीत असलेला शनि सूर्यास पाहात असेल अथवा युग्म ( जुळ्या राशीत असेल ) विषम लग्नात चंद्र मंगळाने युक्त असेल अथवा युग्म राशीत असलेला मंगळ चंद्रास पहात असेल, सम विषम राशीत चंद्र आणि बुध असून त्यास मंगळ पहात असेल, लग्नेश बुधाने युक्त असेल,पुरुषात शुक्र लग्न व चंद्र हे असतील तर हे सहा योग नपुंसकत्वाचे आहेत.

दुःस्थानगो कर्मशुभाधिनाथो बली विलग्नाधिपतिस्तदानीम् ॥
सीमंतकर्मादि विनैव जातो भवेन्नरः प्राथमिकोपितत्र ॥ ५८ ॥

नवमाधिपति आणि दशमाधिपति दुष्ट स्थानात असतील, लग्नेश बलवान् असेल तर ते बालक सीमंत जातकर्मादि धर्म संस्काररहित असते.

लाभे सपापेस्त्वथ तद्गृहे वा जातो नरः प्राथमिकोपि तत्र ॥
सिंहोदये द्वारयुगं गृह तत्कन्योदये नीचगृहेपि जन्मः ॥ ५९ ॥
नवांशपुत्राधिपतिः सराशेर्द्वारं जगुर्लग्नदृकाणराशेः ॥
द्वारं विलग्नाधिपतिः सराशे केंद्रस्थितैर्वीर्यसमन्वितैर्वा ॥ ६० ॥

लाभस्थानात पापग्रह किंवा पापराशी असेल तर वर दिलेले फल समजावे. प्रसुति गृहाचा निर्णय

सांगतो:—सिंह लग्न असेल तर दोन दारे असतील. कन्या लग्न असेल तर हीन प्रकारचे घर किंवा हीन कर्मोपयोगी घरांत जन्म होतो. नवांशाचा अधिपति-त्याचप्रमाणें पंचमेशाच्या राशीच्या दिशेस द्वार समजावें. इतके विकल्प या बाबतींत आहेत. याचा विचार वरीलपैकीं जो ग्रह जास्तीत जास्त बलवान् असेल त्यावरून करावा.

ग्रहैर्धनान्त्यास्पदवेश्मगैर्वा वाच्यास्तदानी मुपसूतिकास्तु ॥
तत्रस्थिते भानुसुतेतुशूद्रा रवौ स्थिते क्षत्रियभामिनीसा ॥ ६१ ॥
राहुध्वजाभ्यामथ जातिहीना त्वन्यैर्ग्रहैर्जातिसमा प्रदिष्टा ॥
धनांत्यबंधुस्थितखेचरेन्द्रैर्वाच्यास्तदानींमुपसूतिकाश्च ॥ ६२ ॥

कुंडलीत जो ग्रह २–१२–१० या स्थानांत असेल त्यावरून उपसूतिका ( सुईणी ) चा– निर्णय होतो. त्यास्थानापैकीं कोणत्याहि स्थानांत शनि असेल तर ती स्त्री शूद्र,सूर्य असेल क्षत्रिय,राहु केतु असतील तर हीन जातीची आणि याखेरीज राहिलेले ग्रह असतील तर समान जातीची समजावी. वर सांगितलेल्या स्थानांत जे आणि जितके ग्रह असतील तितक्या स्त्रिया त्या जातीच्या तेथें असतील असें समजावे.

तत्स्थानपैःसंयुतखेचरेंद्रैः किंचिद्वदेत्यत्र सहास्थितैश्च ॥
जीवेंदुपुत्रासुरदेच पूज्यैस्तत्र स्थितैर्ब्रम्ह कुलाभिरामाः ॥ ६३ ॥
एतेषु पापांशक संयुतेषु तासांतु वैधव्यमुदाहरन्ति ॥
राहुध्वजाभ्यां सहितेषु तेषु शुभास्त्रियस्तत्र शनेस्तु योगात् ॥ ६४ ॥
कृष्णा च कुब्जा विधवा भवेत्सा योगाद्ग्रहाणां प्रवदेच्च संख्याम् ॥
बहिः प्रदेशे ग्रहमध्यभागे दृश्यार्द्धभागस्थितखेचरेन्द्रैः ॥ ६५ ॥
संख्या वदेत्तत्र तदन्ययुक्ते स्त्वेकर्क्षगैस्तत्र बहुत्व माहुः ॥ ६६ ॥

भावाधिपति अथवा स्थानगत बलिग्रह यावरून उपसूतिका, वर्ण आकारादि सांगू. बुध–गुरु–शुक्र असतील तर उपसूतिका उच्च वर्णीय, हेचग्रह पापग्रहाच्या अंशात असतील तर विधवा स्त्री, राहु केतु असतील तर अकाली विधवा झालेली, शनि असेल तर कृष्णवर्णीय विधवा समजावी. जितक्या ग्रहांचा योग होत असेल तितकी स्त्रियांची संख्या समजावी. दृश्यार्ध भागामध्यें जितके ग्रह असतील तितक्या स्त्रिया सूतिकागृहाच्या बाहेर आणि जितके ग्रह अदृश्यार्ध भागांत असतील तितक्या स्त्रिया सूतिका घराच्या आंत, समजाव्या. पुष्कळ ग्रह एकस्थानांत असतील त्यापैकीं कोणी उच्च व स्वराशीस असेल तर त्याठिकाणीं पुष्कळ स्त्रिया असतील.

दीपस्य चांचल्यमुदाहरंति चरे स्थिरे तद्दृढमत्र काले ॥
विदेहराशौ सधृतः करेण तत्संयुतैर्व्योमचरैस्तु संख्याम् ॥ ६७ ॥
तैलं वदेत्तत्र निशाकरेण वार्तिर्विलग्नादितिकेचिदाहुः ॥ ६८ ॥ स. चिं.

सूतिकागृहातील दिव्याचा निर्णय चरलग्न असेल तर चंचल म्ह० इकडे तिकडे फिरविता येण्यासारखा दीप, स्थिर किंवा द्विस्वभावलग्न असेल तर हातांत घेतलेला, लग्नात जितके ग्रह असतात तितके दीप सूतिकागृहांत असतात परंतु बलवान लग्नाप्रमाणें संख्या निर्णय करावा. दिव्यांतील तेल चंद्राच्या अनुरूप म्हणजे तो ज्याप्रमाणें क्षीण, पूर्ण, सपाप जसा असेल त्याप्रमाणें समजावें. त्याचप्रमाणें लग्नावरून वातींच्या संख्येचा निर्णय करावा.

# संकेतनिधींतील आधानकाल विवेचन.

जन्मन्यङ्गगभोग्यलवा ये तत्राब्जस्य च ये गतभागाः ॥
तद्योगोम्बरसिद्धयुतोसौ जन्माधानयुगान्तरहानि ॥ ९ ॥
आधानेन्दुसमजनिलग्नं चेदाधानतनुप्रतिमोब्जः ॥
शुद्धस्यात्समयोत्रतदानींव्यत्यासेन्तरहस्त्वनुपातः ॥ १० ॥
केन्द्रादिभावेषु यताहिभावात् पार्श्वद्वयं खेटयुतं स्फुटं स्यात् ॥
तत्खेटयोरन्तरखण्डमग्र्यग्रहेऋणंपूर्वखगे धनं च ॥ ११ ॥
तद्भावसाम्येत्वजनीष्टशुद्धिर्न्यूनाधिकत्वे तु तदिष्टकाले ॥
स्वमस्वमंशेप्यनुपाततो यत् पलानि ते संस्कृत इष्टकालः ॥ १२ ॥
यद्वाजनेर्यदिहपर्वपुरातदन्ते योंशोधिकारिणइहापिच पञ्च ये स्युः ॥
यश्चौजसैषु सहितोस्य विहायराशीन् खंवाङ्गमंशसदृशंयदिशुद्धमिष्टम् ॥१३॥

पुनरिष्टकाल शुद्ध्यर्थे जन्माधान मध्यवर्ति कालस्या पात ज्ञानायाह । जन्मनी जन्मकाले सूर्योदयमारभ्य घटीपल प्रमाणाद्यत्मकेयेंगगभोग्यलवाः जन्मकालीन राश्यादि स्पष्टलग्नस्य भोग्यांशाः तथाब्जस्य चंद्रस्य तत्रैव ये गतभागाः तद्योगः ये स्पष्ट जन्मलग्न भोग्यांशाः. ये च जन्मचंद्र स्पष्ट भुक्तांशास्तेषा योगः अंबरसिद्धयुतः चत्वारिंशदुत्तर शतद्वय युतः असौ जन्माधान युगान्तर हानि जन्माधानयोर्येद्युग द्वयं तदन्तः तदुभय मध्यवर्तीनि अहानि दिनानि भवन्तीत्यर्थः यानाद्यंगेयुगः पुंसियुगं युग्मेकृतादि श्वितिकोशाद्युगशब्दो- युग्मपरः अहानीति विधेयापेक्षं बहुत्वं अत्र शतत्रयादधिकानाच चत्वारिंशदुत्तर शतद्वयादल्पाना जन्माधान मध्यवर्तिदिनानाप्रायेण भावोभिप्रेतः श्रूयते तु सप्तभिरष्टाभिरपि मासैस्तथा वर्षाद्यधिकं काले नापि प्रसवः अतोऽप्राय । यशंकास्कंदितत्वादस्य ज्ञानस्यापातत्व मितिभावः । क्वचिद्व्यभिचारेपि सर्वत्र प्रसिद्धत्वात् यदेभिरेव दिवसैर्जन्मनामयमिष्ट शुद्ध्युपाय इति न क्वापि व्यभिचारः ॥ ९ ॥ अथ शुद्धेष्टकाल ज्ञानायोपायान्तरमाह आधानेंदुसममिति आधानकालीन चद्र स्पष्ट राश्यादिसमान राश्यादिकं स्फुट जन्मलग्नचेत् एवं जन्म- कालीन चन्द्रस्पष्ट राश्यादि समान राश्यादि स्फुटी कृत माधानलग्नं च स्यात्तदा जन्मकालीन चद्रलग्नाभ्या माधानीय लग्नचद्रयोः क्रमेण तुल्यत्वे जन्मकालिकेष्टकाल शुद्धिरेव व्यत्यासेतयोः साम्याभावे अन्तर हस्तु जन्माधान मध्यदिने ष्वनुपातः कर्तव्यः ॥ अहः शब्दोत्र घटीपलादि कालस्याप्युपलक्षकः अनुपाते कर्तव्येयावताकालेन पक्षद्वय एव चद्रलग्नयोः साम्यं भवतुमर्हति अयमंससमयोवगंतव्यः ततश्चद्रे चान्द्रमास परिवर्तनेन ( लग्नेच दिनादि परिवर्तनेन ) तथाघट्यादीना मुपचयापचयादिना चापाततोऽवगमे कालस्य जातेऽनु पात. तथाहि यद्येभिरेव राश्याद्यवयवैरियान्दिनाद्यात्मकः कालः फलं तदैभिरन्तराशै. कियान् इति कृते दिनादि घट्याद्यात्मक इच्छा फल संपद्यते इति तथाच जन्मलग्न चंद्रमसो- रेव परिवर्तनेन घट्यादेर्वृद्धि न्हासादिना वा साम्य सपाद्य स्वेष्ट जन्मादिकालविशोधन् विधेयं सुधीभिरिति ॥ १० ॥ पुनर्जन्मादाविष्टककालशुद्धिज्ञान प्रकारान्तरेण दर्शयति ॥ कैंद्रादिभावेष्विति सप्तमी निर्द्धारेण कैंद्र- पणफरापोक्लिमसंज्ञभावेषुमध्ये केन्द्रात्परं पणफर परतस्तु सर्वं मापोक्लिमामित्याचार्य निर्दिष्टेषुमध्ये यस्माद्भावा- त्पार्श्वद्वयं द्वितीयद्वादशाविति यावत् ग्रहयुत स्यात् प्रथम द्वितीय द्वादशौ कैंद्रतो ग्रहयुक्तौ द्रष्टव्यौ तदभावे पणफरत तदभावेचापोक्लिमतः पुनर्द्विद्वादशस्थ ग्रहस्पष्टयो राश्याद्यात्मक योरतरं कार्यं तदन्तरस्यांतरस्य खंडम् अग्रग्रहे तस्माद्भावादग्रिमे द्वितीयस्थे ऋणंहीन कार्यम् पूर्वखगे द्वादशस्थे धनं योजनीय एवं संस्कारे कृते द्वितीय द्वादशस्थयोर्ग्रहयोः साम्य राश्यशादिना भवतीत्यर्थः ॥ ११ ॥ ततः किमित्यतस्तत्कृत्यशेषमाह तद्भावसाम्य इति तौ च द्विर्द्वादशस्थौ ग्रहौ खंडयोग वियोगात्मक संस्कारेण समीकृतौ राश्यादि स्पष्टौ

भावश्चतन्मध्यवर्तीशोपि स्पष्टराश्याद्यवयवः तयोस्तद्वारयोर्मंद भावस्पष्टयोः साम्ये राश्यंशादिना तुल्यत्वे जनोष्टशुद्धिः जन्मादाविष्ट कालः शुद्धो निरंतर एवावगंतव्य इत्यर्थः न्यूनाधिकत्वे तु समीकृतद्विद्वादशस्पग्रह-स्पशात् भावस्पष्टस्य न्यूनत्वेऽधिकत्वे चेत्यर्थः तत्र न्यूनत्वेसति अनुपातेन यान्ति पलानि लभ्यंते तानीष्टकाले स्वं धनं कार्याणि योज्यानि अधिकत्वेतु तानि अस्वं ऋणं वियोज्यानीति यावत् एवं संस्कृत इष्टकालः शुद्धो भवतीति अत्रापि त्रिंशतांशे स्वस्योदय पलानि लभ्यंते तदान्यूनाधिकांशैः कतीतिरीत्याऽनुपातः कार्यः॥१२॥ पुनरपि प्रकारांतरेणेष्ट कालशुद्धि मनायासेन दर्शयति यद्वेति यद्वा प्रकारांतरेण तत्र क्रियानिरूप्यते तामाह जनैरिति जन्मप्रश्नादितः पुरा पूर्वं सजातीय पर्यांतराव्यवहित पूर्वकालेऽतीतं यत्पर्व पर्वांतत्वेन प्रसिद्धं दर्श पूर्णिमान्यतरत् तदतेर्योंशः अंशशब्देन तत्कालीन स्पष्टलग्न राश्यादि रुच्यते वस्तुतस्तु तदंतलग्नेधिकारिण इति पाठः साधुः तथाच पर्वांतलग्ने ये पंचाधिकारिणस्तेपि ज्ञातव्याः तथाहि एको जन्मादि लग्नेशः, द्वितीयः पर्वांत लग्नेशः, तृतीय स्त्रैराशिकेशः, सच मेषादि चतुर्णां त्रैराशिक पारविसितार्किभृगवोन्हि निशि गुरुशशि चांद्रयसुर्जोन्यथाहरेः शनिरुज्ञेज्यविधवोग्रे इति रीत्या गणनीयश्चतुर्थः, पर्वान्तहोरेशः रविचन्द्रनवांशेश इति केचित् पुण्यसद्म राशीश इत्यपि केचित् पंचमस्तु दिवा सूर्य राशीशः रात्रौ चन्द्रराशीश इति यद्वा पंचाधिकारिणः सूर्यः १, चंद्रः २, जन्मलग्न ३, पुण्यसद्मेशभं ४, पर्वांतलग्नं ५, इत्यपि मनुष्यजातका-दितो ज्ञेय तथाचैषा मध्ये यः षड्विधादि बलेन बलिष्ठः अस्य राशीन् विहाय तं दशमं अथवा अंग लग्नं अंशसदृशं एषु पंचाधिकारिषुमध्ये बलिष्ठ ग्रहस्याशादिना लग्नदशमान्यतरस्यांशादेः संख्यया साम्यं तुल्यत्वं यदितदा शुद्धमिष्टम् इष्ट कालः शुद्धो निरंतरो ज्ञेय इत्यर्थः ॥ १३ ॥

स्पष्टीकरणः—सकेतनिधि ग्रंथांतील आधानकाल संबंधींचा उतारा वर दिला आहे. निरनिराळ्या महत्त्वाच्या ग्रंथातील आधानकालासंबंधींची वचनें व आधानकाल आणि जन्मकाल याचा संबंध दर्शविणारी प्रक्रिया या प्रकरणात दिली असल्यानें आता प्रत्येकाचें भाषांतर देण्याची आवश्यकता वाटत नाहीं. पण त्या त्या ग्रंथकर्त्यांचें आधाकालासंबंधीं मत कळलें म्हणजे झालें. असो, संकेतनिधिकर्त्यांचे मत असें कीः—

जन्मकालीन स्पष्टलग्नाचें राशि अंशादि भोग्यांश आणि त्याचवेळेच्या स्पष्ट चंद्राचे भुक्तांश यांचा योग म्हणजे बेरीज करून जे येईल तें स्पष्टलग्नाचें जन्मकाली भोग्यांश समजावें. आधानकालापासून जन्म-कालापर्यंत २४० पासून ३००पर्यंत दिवस जातात त्यापैकींचा १ दिवस आधान दिवस ठरविणें मुष्किलीचे आहे. जन्मकालच्या स्पष्ट लग्नाइतका आधानकालचा स्पष्टचंद्र आणि जन्मकालच्या स्पष्ट चंद्राइतकें आधान-कालाचें स्पष्ट लग्न असतें हा एक सर्वसामान्य नियम दिला आहे पण त्यातही अनेक पर्यायमपि सांप-डेल्या आहेत. त्यातून सहज व सुलभपणानें तात्काल निश्चित निर्णयाची पद्धति प्राप्य होण्यासारखी नाहीं. आणि तेंही बरोबरच आहे. कारण आधानकालाचा निर्णय हा विषय सबंध फलज्योतिषशास्त्रांत इतका कठिण, इतका गुंतागुंतीचा, इतका सूक्ष्म आणि इतका चिंतनीय आहे कीं, असा दुसरा कोणताही विषय नसेल. या बाबतींत सर्व बाजूनें आम्ही शेवटीं विस्तृत विवेचन करणार आहों म्हणून येथें जास्त उहा-पोह नको.

योग, प्रतियोग अगर दृष्टीयोग करितो, किंवा मंगळ हा जन्मस्थ चंद्राशीं योग, प्रतियोग अगर दृष्टीयोग करितो, अगर चंद्र व मंगळ यांचा योग, प्रतियोग अगर दृष्टीयोग ज्या दिवशीं होतो त्या दिवशीं स्त्रीला रजोदर्शन होते असा अनुभव येतो. खुलासा:—स्त्रियांचें रजोदर्शन केवळ मंगळ चंद्राच्या योग प्रतियोगावर होत नाहीं. तर ते चंद्राच्या चालित स्थितीवरच अवलंबून असते. वर सांगितलेल्या स्थानात चंद्र बलवान् असता ठराविक मुदतीनें हा काल येतो. अनियमित रजोदर्शनाचे योग तारतम्यानें ठरवावें. ११

यथास्तराशिर्मिथुनं समेति तथैव वाच्यो मिथुनप्रयोगः ॥
असद्ग्रहा लोकित संयुतेऽस्ते सरोष इष्टैः सविलासहासः ॥ १२ ॥

अर्थः—संभोगकालीं जो राशि उदित असेल, त्यापासून ७ व्या राशीच्या स्वभावाप्रमाणें मैथुन होते. त्या सातव्या राशीवर शत्रुग्रहाची दृष्टी असेल किंवा शत्रुग्रह त्या राशींत असेल तर मैथुन रागादि विकारांत होईल व शुभग्रहाची दृष्टी असेल अगर त्या राशींत शुभग्रह असेल तर विलासयुक्त व आनंदानें मैथुन होईल.—स्पष्टीकरण—संभोगकालाची वेळ कळणें सामान्यतः शक्य असलें तरी संधिगत लग्नाच्या वेळीं संभोग लग्न निश्चित करणें सोपें नाहीं. त्या लग्नापासून ७ व्या लग्नाच्या स्थितीप्रमाणें संभोगकालीं वृत्ति राहते येवढाच निर्णय यात दिला आहे. १२

रवीन्दुशुक्रावनिजैः स्वभागगैर्गुरौ त्रिकोणोदयसंस्थितेऽपि वा ॥
भवत्यपत्यं हि विबीजिनामिमे कराहिमांशोर्विदृशा मिवाफलाः ॥ १३ ॥

अर्थः—संभोगकालीं रवि, चंद्र, शुक्र व मंगळ हे ग्रह स्वनवमांशीं असतील किंवा गुरु हा निषेक लग्नाच्या त्रिकोणात असेल तर गर्भधारण होईल परंतु जे निर्बीज असतील, त्यांस अंधास जशीं चंद्रकिरणें त्याप्रमाणें हे योग व्यर्थ होतात. स्पष्टीकरण:—संभोग झाला तरी ग्रहानुकूलतेखेरीज गर्भधारणा होत नाहीं. गर्भधारणा होण्यास तात्कालिक कोणतें ग्रह कशाप्रकारच्या स्थितींत पाहिजेत याचा खुलासा यात आहे. १३

दिवाकरेन्दोः स्मरगौ कुजार्कजौ गदप्रदौ पुंगल योषितोस्तदा ॥
व्ययस्वगौ मृत्युकरौ युतौ तथा तदेक दृष्ट्या मरणाय कल्पितौ ॥ १४॥

अर्थः—संभोगकालीं सूर्याच्या सप्तमस्थानीं मंगळ असेल तर पुरुषास व चंद्राच्या सप्तमस्थानीं शनि असेल तर स्त्रीला रोगप्रद होय. सूर्याच्या द्वितीय व द्वादशस्थानीं शनि आणि मंगळ असेल किंवा ते सूर्याशीं युक्त असतील अथवा त्याची सूर्यावर दृष्टी असली तर हे योग पुरुषास मृत्युकारक होतात. व असेच योग चंद्राला होतील तर स्त्रीला मृत्युकारक होतात. स्पष्टीकरणः—संयोगकालीं पतीपत्नीला रोगकारक किंवा अनिष्टकारक ग्रह कोणते व ते कोणत्या स्थितींत असलें तर अनिष्ट हें या श्लोकांत दिलें आहे. पण केवळ येवढ्या एकाच योगावरून रोग होणें किंवा मृत्यु येणें संभवनीय नाहीं. तें जन्मकालच्या ग्रहाधीन आहे.

दिवार्क शुक्रौ पितृमातृसंज्ञितौ शनैश्चरेन्दू निशि तद्विपर्ययात् ॥
पितृव्य मातृष्वसृसंज्ञितौ तु तावथौजयुग्मर्क्षगतौ तयोः शुभौ ॥ १५ ॥

अर्थः—संभोगकालीं दिवसास सूर्य हा पिता व शुक्र माता होय. रात्रीं शनि हा पिता व चंद्र माता होय. दिवसास शनि हा चुलता व चंद्र मातेची बहिण होय. रात्रीं सूर्य चुलता व शुक्र मातेची बहिण होय. दिवसास सूर्य विषम राशीस असता पित्यास शुभ, रात्रीं तसा असता चुलत्यास शुभ होय. त्याचप्रमाणें दिवसास शुक्र सम राशीस असता मातेस शुभ व रात्रीं तसा असता मावशीस शुभ होय. त्याचप्रमाणें शनि व चंद्र या विषयीं जाणावें. स्पष्टीकरण:—संयोगकाल-कुंडलींतील ग्रहांचें कारकत्व या श्लोकांत दिले असून संभोगकाल दिवसा असता जे कारक ग्रह असतात ते संभोगकाल रात्रीं असता नसतात. रात्रींचें कारकत्व निराळ्याच ग्रहाकडे आहे. त्यांचे शुभाशुभत्व कथन यात आहे.

स्त्रीतज्योतिपि योपितोनुपचयस्थाने कुजेनेक्षिते ।
जातं गर्भफलप्रदं खलुरजः स्यादन्यथा निष्फलम् ॥
दृष्टेऽस्मिन् गुरुणा निजोपचयगे कुर्यान्निपेकं पुमान् ।
अत्याज्येच समूलभे शुभ गुणे पर्वादिकालोज्झिते ॥ १६ ॥

अर्थः—चद्र हा स्त्रीच्या जन्मराशीच्या अनुपचय ( १।२।४।५।७।८।९।१२ ) स्थानीं असता त्यावर जर मंगळाची दृष्टी असेल ( व ती स्त्री वंध्या नसेल ) तर गर्भ राहतो. अन्य योग असतां गर्भ–राहात नाहीं. पुरुषाच्या जन्मराशीच्या उपचय ( ३।६।१०।११ ) या स्थानीं चंद्र असतो त्यावर गुरुची दृष्टी असेल तरीही स्त्रीला गर्भ राहतो. हे सर्व योग लग्नाला शुभयोग झाले असतील व पर्वादि कोणताई कुयोग नसेल तर घडून येतील असे समजावें. स्पष्टीकरणः—या श्लोकांत गर्भ राहण्यास स्त्रीच्या कुंडलींत अनुपचयस्थानांतील चंद्रावर मंगळाची दृष्टी आणि कुंडलींत पुरुषाच्या उपचय चंद्रावर गुरुची दृष्टी पाहिजे हे तत्व सांगितले असून चंद्राची स्थिति स्त्रीच्याकुंडलीत अनुपचय व पुरुषाच्या कुंडलीत उपचय अशी पाहिजे ही गोष्ट यांतील विशेष होय.

विभावरी पोडशभामिनीनां ऋतूद्गमाद्या ऋतुकालमाहुः ॥
नाद्याश्चतस्रोत्र निपेकयोग्याः पराश्च युग्माः सुतदाः प्रशस्ताः ॥ १७ ॥

अर्थः—स्त्री रजस्वला झाल्यापासून सोळा रात्रीपर्यंत ऋतुकाल जाणावा. त्यांतील पहिल्या चार रात्री संभोगास अयोग्य ( वर्ज्य ) आहेत. बाकीच्या समरात्रीं संभोग केल्यास पुत्रसंभव जाणावा.

खुलासाः—( पुढच्या पुढच्या रात्री संभोगास प्रशस्त आहेत. एका रात्रीमध्यें एकच वेळ गमन करावें. ऋतुकालीं श्राद्धदिवस अगर एकादशी येईल व कांहीं कारणानें इतर दिवशीं संभोगास प्रतिबंध होईल तर त्या दिवशीं गमनास मोकळीक आहे. स्त्रियाच्या कामातुरतेचा नाश केल्यास पापी होतो अशी समजूत असेल तर ऋतुकालाव्यतिरिक्त कालींही गमन केल्यास दोप नाहीं. ब्रह्मचर्याचा मात्र नाश होतो. " जो ऋतुकालीं मात्र स्त्रीगमन करितो तो ब्रह्मचारी जाणावा. " असें शास्त्र सांगतें. अष्टमी, चतुर्दशी, पौर्णिमा, अमावास्या, संक्रांत, वैधृति, व्यतीपात, परिघाचें पूर्वार्ध, कल्याणी, संधिकाल, मातापितरांचे मृत दिवस, श्राद्धदिवस, श्राद्धाच्या पूर्वीचा दिवस, जन्मनक्षत्र व दिवस इतक्याकालीं स्त्रीगमन वर्ज्य करावें. याप्रमाणें शास्त्राज्ञा आहे. जो योग्य कालवलानुसार संभोग करील त्यासच तेजस्वी प्रजा होईल. ज्याकालीं लोक शास्त्राप्रमाणें वागत होते त्याचकालीं तेजस्वी पुरुष उत्पन्न झाले आहेत. सध्यांचे लोक शास्त्रत्याग करून स्वेच्छाचारी बनले आहेत. यामुळें दिवसेंदिवस प्रजा अशक्त व मंद बुद्धीची आणि नास्तिक बनत चालली आहे, आणि आयुर्मानाचें प्रमाण उत्तरोत्तर कमी कमी होत चाललें आहे. स्वेच्छाचार, विधिनिषेधाविषयीं बेपर्वा, आणि केवळ कामवासनातृप्तीसाठीं मनःपूतं समा चरेत् या रीतीचें वैमान अशी सध्यांची स्थिति आहे. एकपत्नीव्रत किंवा ब्रह्मचर्य याची कोणास जरूरच नाहीं. अर्थात् वर दिलेले नियम ज्यांना शास्त्राप्रमाणें आपलें वर्तन ठेवावयाचें असेल त्यांच्याकरितां आहेत हें उघड आहे. शास्त्राज्ञा व उत्कृष्ट नियम मोडणारांची दुर्दशा ! प्रत्यक्ष सुकलेले चेहरे आणि कृश तनूंचे सांगाडे या रूपानें सध्यां दिसत आहेतच.

पुत्रोल्पायुर्दारिका वंशकर्ता वन्ध्या पुत्रः सुन्दरीशो विरूपा ॥
श्रीमान् पापाधर्मशीलस्तथा श्रीः सर्वज्ञः स्यात् तुर्यरात्रेः क्रमेण ॥१८॥

अर्थः—चवथ्या रात्रीपासून प्रत्येक रात्रीच्या गमनाची फळें:–४ थी अल्पायु. ५ वी कन्या. ६ वी वंशकर्ता. ७ वी—वंध्या. ८ वी—पुत्र. ९ वी—सुंदर कन्या. १० वी–श्रेष्ठ पुत्र. ११ वी–कुरूप अशी कन्या. १२ वी– श्रीमान् असा पुरुष. १३ वी–पापी अशी कन्या. १४ वी–धर्मशील असा पुत्र. १५ वी–लक्ष्मी सारखी कन्या. १६ वी—सर्वज्ञ असा पुत्र. स्पष्टीकरणः—चार दिवस पूर्ण झाल्या-

नंतर ५ व्या दिवसाच्या रात्रीपासून १६ व्या दिवसाच्या रात्रीपर्यंत कोणत्या दिवशीं स्त्रीगमन केलें असता फल काय आहे हें यात दिलें आहे. पैकीं सम म्हणजे ६ ८-१० १२-१४-१६ ह्या दिवसापैकीं कोणत्याही दिवशीं स्त्रीसंभोग केला असता त्या दिवशीं गर्भधारणा झाल्यास पुत्रसंतती होते असें ग्रंथकाराचें मत आहे.

अष्टमाष्टगमे सूर्ये निषेकर्क्षात् सुतोद्भवः ॥
अथवाऽऽधानलग्नात्तु त्रिकोणस्थे दिनेश्वरे ॥ १९ ॥

अर्थ —संभोग लग्नाच्या अष्टमापासून अष्टम स्थान म्हणजे जें तिसरें स्थान त्यात किंवा त्रिकोणात रवि असेल तर पुत्र उत्पन्न होईल. स्पष्टीकरणः—संभोग लग्नाच्या तृतीय स्थानांत किंवा त्रिकोण म्हणजे ५-९ ह्या स्थानात रवि असेल व गर्भधारणा झाली असेल तर पुत्र होईल (हाच योग चंद्रापासून पाहणेंही युक्त आहे.)

अस्मिन्नाधानलग्नेतु शुभद्दग्युतेऽथवा ॥
दीर्घायुर्भाग्यवान् जातः सर्वविद्यान्तमेष्यति ॥ २० ॥

अर्थ.—वरील आधान लग्नावर ( संभोगकालच्या लग्नावर ) शुभग्रहाची दृष्टि असेल किंवा लग्नींच शुभ ग्रह असतील तर होणारा पुत्र दीर्घायु, भाग्यवान आणि विद्या पारगत असा होतो. स्पष्टीकरणः—संभोगलग्नावर शुभग्रहाची दृष्टि असेल किंवा त्या लग्नात शुभग्रह असतील आणि गर्भधारणा झाली असेल तर तो होणारा पुत्र अत्यंत श्रेष्ठ, सर्वगुण व विद्यासंपन्न होतो.

ओजर्क्षे पुरुषांशकेषु बलिभिर्लग्नार्कगुर्विन्दुभिः ।
पुंजन्म प्रवदेत् समांशकगतैर्युग्मेषुतैर्योषितः ॥
गुर्वर्कौ विषमे नरं शशिसितौवक्रश्च युग्मे स्त्रियं ।
द्व्यंगस्था बुधवीक्षणाच यमलौ कुर्वन्तिपक्षेस्वके ॥ २१ ॥

अर्थ —लग्न, रवि, गुरु व चंद्र हे विषम राशीस पुरुषनवमांशीं असता पुत्र होतो व तेच सम राशीस स्त्रीनवमांशीं असता कन्या होते दुसरा योग –गुरु व रवि हे विषम राशींत असता पुत्र होतो, व चंद्र, शुक्र आणि मंगळ हे सम राशीस असता कन्या होते द्विस्वभाव राशींत हेच ग्रह वरील स्थितींत असून त्याच्यावर जर बुधाची दृष्टि असेल तर जुळें होतें व तें वरील ग्रहाच्या स्थित्यनुरूप पुरुष किंवा स्त्री अथवा एक पुरुष व एक स्त्री असें होतें स्पष्टीकरण —आधान–संयोग–लग्न आणि रवि, गुरु व चंद्र हे १-३-५-७ ९ ११ ह्या राशीस ह्याच नवमांशापैकीं कोणत्याही नवमांशात असता पुत्र जन्म होतो. हेच ग्रह समराशीस समनवांशीं असता स्त्रीजन्म होतो. याच्यापुढें ग्रहपरत्वें पुरुष, स्त्री किंवा जुळें यांचा जन्म कशानें होतो हें दिलें आहे लक्षात ठेवावयाचें तें हे कीं, आधान लग्न व रवि गुरु व चंद्र यांचें प्राबल्य ज्याप्रमाणें असेल तसें फल मिळतें.

विहाय लग्नं विषमर्क्षसंस्थः सौरोऽपि पुंजन्मकरो विलग्नात् ॥
प्रोक्तग्रहाणामवलोक्य वीर्यंवाच्यं प्रसूतौ पुरुषोऽङ्गना वा ॥ २२ ॥

अर्थ.—लग्नाशिवाय विषम राशीस विषमस्थानीं जर शनि असेल, तरीही पुरुष जन्म होतो. वर जे योग सांगितले, त्यांतील ग्रहाचें बल पाहून प्रसूति कालींही पुरुष जन्म आहे कीं, स्त्री जन्म आहे, तें सांगावें. स्पष्टीकरण —आधान लग्नाखेरीज विषमस्थानात व विषमराशींत शनि असेल तर पुरुष जन्म होतो. वर सांगितलेलें योग प्रसूति म्हणजे जन्म लग्नावरूनही पहावें

अन्योन्यं यदिपश्यतः शशिरवी यद्यार्कि सौम्यावपि ।
वक्रो वासमगं दिनेशमसमे चन्द्रोदयौ चेत् स्थितौ ॥
युग्मौ ओजर्क्षगता वर्शीन्दुशशिजौ भूम्यात्मजेने क्षितौ ।
पुंभागे सितलग्न शीतकिरणाः पट्क्लीबयोगास्त्विमे ॥ २३ ॥

अर्थः—या श्लोकांत सहा प्रकारचे नपुंसक जन्माचे योग दिले आहेत, पण ते योग श्लोकातील पदावरून स्पष्ट होत नाहींत, म्हणून बृहज्जातकाला धरून येथें सांगितलें आहेत ते असेः—

( १ ) सम राशीस चंद्र व विषम राशीस सूर्य असून त्यांची परस्परांवर दृष्टी असेल.

( २ ) सम राशीस शनि व विषम राशीस बुध असून त्यांची परस्परांवर दृष्टी असेल.

( ३ ) विषम राशीस मगळ असून तो सम राशिस्थ सूर्याला पहात असेल.

( ४ ) चंद्र व लग्न विषम राशीस असून त्यावर मंगळाची दृष्टी असेल.

( ५ ) सम राशीवर चंद्र व विषम राशीस बुध असून त्या प्रत्येकांस मंगळ पहात असेल.

( ६ ) शुक्र, चंद्र व लग्न पुरुष नवमांशीं असतील.

( येथें मगळ सम राशीवर असला पाहिजे असें बादरायणाचें मत आहे. )

खुलासाः—पहिल्या दोन नियमात सप्तम दृष्टी असणार नाहीं. कारण, चंद्र समराशीवर असतां त्याची सप्तम दृष्टी समराशीवरच पडेल, विषम राशीवर पडणार नाहीं. त्याप्रमाणें सम राशीवरचा शनि फक्त दशम दृष्टीनेंच विषम राशीवर पाहूं शकतो. तृतीय किंवा सप्तम दृष्टी विषम राशीवर पडूं शकत नाहीं. तसेंच विषम राशीच्या बुधाची विषम राशीवरच दृष्टी पडणार हें उघड आहे. सबब वरील योग नीट विचारानें पहावें. दृष्टी कोणती घ्यावयाची ते सांगितलें असतें, म्हणजे या योगाचा उलगडा झाला असता. अपूर्ण दृष्टीनेंहि हे योग होतात असें येथें मानावें लागतें, पण ते विचाराअंतीं असंभवनीय वाटतें.

स्पष्टीकरणः—ह्या श्लोकांत "नपुंसक" योगाचें विवेचन आहे. पण यांत स्पष्ट दिग्दर्शनाचा खुलासा होत नाहीं म्हणून थोडें विस्तृत स्पष्टीकरण करणें जरूर आहे.

कोणत्याही समराशीस चंद्र असता विषम राशींतील रवीची पूर्ण दृष्टी त्याच्यावर येणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें विषमराशींतील सूर्यावर समराशींतील चंद्राची दृष्टीहि येऊं शकत नाहीं. कारण ह्या दोन्हीं ग्रहांची पूर्णदृष्टी फक्त सप्तम स्थानावरच असतें. अर्थात् येथें परस्परावर पूर्ण दृष्टी येणें असंभवनीय आहे.

या ठिकाणीं रविचंद्राची परस्परांवर दृष्टी याचा अर्थ बृहज्जातकांतील ( सारावलींतील किंवा कोणत्याही ज्योतिषग्रंथातील ) त्रिदश त्रिकोण चतुरस्र सप्तमान्यवलोकयंति चरणाभिवृद्धितः । रविजाम-रेज्यरुधिराः परेचये क्रमशोभवंति किल वीक्षणे धिकाः ( अ. २-१३ ) ह्या वचनाप्रमाणें पाहिलें असतांही जमत नाहीं. आणि परस्परांवर दृष्टी येत नाहीं. शनि व बुध यांच्या परस्पर दृष्टीसंबंधींही असाच घोटाळा आहे. येथे एकपाद दृष्टी घेतल्या आहेत कीं काय हा विचार नितर्नीय आहे. याप्रमाणें क्रमांक १-२ हे संदिग्ध आहेत. यापैकीं क्रमांक ३-४-५-६ हे योग मात्र कोणत्याही काळीं होऊं शकतात. त्यात मंगळ-रवि, चंद्र-मंगळ, चंद्र-बुध, मंगळ ह्या ग्रहांचे एकमेकाशीं संबंध सांगितलें आहेत. आणि ६ व्या क्रमांकात शुक्र-चंद्र-लग्न आणि बादरायण मतानें मगळ यांचे प्राबल्य दर्शित केलें आहे.

तात्पर्य यांतील पहिला व दुसरा योग संदिग्ध असून बाकीचे योग ठीक आहेत.

युग्मे चन्द्रसितावथौजभवनेष्वु ज्ञारजीवोदयः ।
लग्नेन्दू नृनिरीक्षितौ च समगौ युग्मेपुवाप्राणिनः ॥
कुर्युस्ते मिथुनं ग्रहोदयगतान्द्वयंशाशकान्पश्यति ।
स्वांशे ज्ञत्रितयं ज्ञगांशकवशाद्युग्मन्त्वमिश्रैः समम् ॥ २४ ॥

अर्थः—( १ ) समराशीस चंद्र व शुक्र असून विषमराशीस बुध, मंगळ, गुरु व लग्न हे अस-

तीच (२) लग्न व चंद्र समराशीस असून त्याच्यावर पुरुष ग्रहाची दृष्टि असेल. ( ३ ) बुध, मंगळ, गुरु व लग्न हे समराशीस बलिष्ट असतील, तर या प्रत्येक योगावर कन्या पुत्रांचें जुळे होतें; तें ग्रह व लग्न द्विस्वभाव नवमांशी असून स्वनवमांशीच्या बुधाची त्याचेवर दृष्टि असेल, तर तीन मुलांचें जुळें होतें, व त्यांत बुध मिथुन नवमांशी असल्यास पुरुष आणि कन्या नवमांशी असल्यास स्त्री असें जाणावें. सर्व ग्रह व लग्न समविषम राशीस असून मिश्र नसतील तर तीनही गर्भ त्या जाती समान होतात. स्पष्टीकरण—ह्या श्लोकद्वयात देहील आधानकाली असणाऱ्या ग्रहयोगावरून "जुळें" होण्याचें योग कोणतें हें सांगितलें आहे व त्याचे अनेक पर्याय दिले आहेत.

धनुर्धरस्यान्त्यगते विलग्ने ग्रहैस्तदंशोपगतैर्बलिष्ठैः ॥
ज्ञेनार्किणावीर्ययुतेन दृष्टे सन्तिप्रभूता अपिकोशसंस्थाः ॥ २५ ॥

अर्थः—धनुराशीचें लग्न धनु नवमांशी असून ग्रहसुद्धा धनुनवमांशी असतील, व त्यांच्यावर बलवान अशा बुध शनीची दृष्टि असेल तर अनेक गर्भसंभव योग होतो. स्पष्टीकरणः—धनुराशीचे लग्न धनुनवमांशी म्हणजे ८ रा. २६ अं. ४० कला पासून ९ रा. ० अं. ० कला यांच्या दरम्यान स्पष्टलग्न आणि ग्रहही त्याच नवमांशात असतील व त्यांच्या वर बुध शनीची दृष्टि असेल तर अनेक गर्भयोग होतो.

द्विशरीरांशसंयुक्तान् ग्रहान् लग्नंच पश्यति ॥
कन्यांशकगतश्चान्द्रि गर्भस्थं त्रितयं वदेत् ॥ २६ ॥

अर्थः—सर्व ग्रह व लग्न द्विःस्वभाव नवमांशी असून त्यावर कन्या नवमांशीच्या बुधाची दृष्टि असेल तर तीन बालकाचा गर्भ होतो. स्पष्टीकरणः—ह्या योगातील स्थिति नवमांश प्रवर्तित आहे. सांगितलेले ग्रहयोग हे नवमांशातच पाहिले पाहिजेत.

युग्मांशकस्तु कन्यैका द्वौ पुमांसौ च गर्भजाः ॥
युग्मांशगान्विलग्नं च गर्भस्थाः पुरुषास्त्रयः ॥ २७ ॥

अर्थः—मागील श्लोकांत सांगि-त्याप्रमाणें सर्व ग्रह व लग्न द्वि.स्वभाव नवमांशी असून मिथुन नवमांशी असलेल्या बुधाची त्याच्यावर दृष्टी असेल तर त्या तीन बालकाच्या गर्भामध्यें दोन पुत्र व एक कन्या असेल. आणि सर्व ग्रह व लग्न मिथुन नवमांशी असून त्यावर मिथुन नवमांशीच्या बुधाची दृष्टी असेल तर त्या गर्भांत तीनही पुत्रच असतील स्पष्टीकरण.—ह्या श्लोकातील योगाचा संबंधही नवमांशाधीन आहे. मिथुन लग्नात सर्व ग्रह मिथुनांशीं व त्यावर मिथुन नवमांशातल्या बुधाची दृष्टी हा योग फक्त बुध समोरच्या राशींत मिथुन नवमांशी असेल तरच होईल.

कन्यायुग्मांशकोपेतां स्तथा युग्मांशको बुधः ॥
कन्यानवांशकः सौम्यस्तिस्रो गर्भगतांगना ॥ २८ ॥

अर्थ—सर्व ग्रह व लग्न कन्या नवमांशीं असून मिथुन नवमांशी बुध असेल व त्याची त्याच्यावर दृष्टी असेल किंवा बुध कन्या नवमांशीं असून सर्व ग्रह व लग्न मिथुन नवमांशी असता बुधाची त्यांच्यावर दृष्टी असेल तर तिसरा गर्भ मुलीचा असेल. स्पष्टीकरण.—ह्या श्लोकांतही ग्रहाचे नवमांश प्राधान्यच आहे. योग आणि त्यावर दृष्टी ही स्थिति नवमांशात संभवत नसल्यास राश्यात्मक पाहिली पाहिजे त्या खेरीज गत्यंतर नाहीं.

द्विःस्वभावगतावर्कगुरू बुध निरीक्षितौ ॥
पुंयुग्मं कुरुतस्तद्वत् शशिशुक्रमहीसुताः ॥ २९ ॥
कुर्वन्ति स्त्रीयुग्मं तत्र बलाबल विशेषतः ॥
स्त्रीनपुंसकरश्चान्द्रिः पुंनपुंसकरार्के जः ॥ ३० ॥

अर्थः—रवि व गुरु हे द्विःस्वभाव राशीत असून त्यांच्यावर बुधाची दृष्टी असेल तर पुत्रांचे जुळें होतें. चंद्र, शुक्र व मंगळ हे द्विःस्वभाव राशीवर असून त्यांच्यावर बुधाची दृष्टी असेल तर कन्याचे जुळें होतें. स्त्री नपुंसकांचा जन्म देणारा बुध असून पुरुष नपुंसकांचा जन्म देणारा शनि हा ग्रह आहे. खुलासाः—केवळ पूर्ण दृष्टीच घेतल्यास बुधाची रविवर साम्प्रतच्या भूमध्यस्थ पद्धतींत दृष्टी पडणें शक्य नाहीं. स्पष्टीकरणः—यांतील बाकीचे योग ठीक आहेत. यांत अंशात्मक स्थिति सांगितलेली नाहीं. राश्यात्मक योग घेतले तरीही रवीवर बुधाची किंवा शुक्रावर बुधाची पूर्ण दृष्टी साम्प्रतच्या प्रचलित भूमध्यस्थ पद्धतींत शक्यच नाहीं. तेव्हा यांतील दृष्टिक्रम हा कांहींतरी स्वतंत्र रीतीना आहे कीं काय याचा विचार केला पाहिजे.

निषेक काले चन्द्रार्कावन्योन्यंयदिपश्यतः ॥
तथैव चन्द्रमन्दो वा क्लीबजन्मप्रदौ तथा ॥ ३१ ॥

अर्थः—संभोगकालीं चंद्र व रवि हे एकमेकास पाहतील किंवा चंद्र व शनि एकमेकांस पाहतील तर या योगानें नपुंसक गर्भ राहील. स्पष्टीकरणः—ह्या श्लोकांत आधानकालीं असणाऱ्या ग्रहयोगा वरून नपुंसक गर्भाचे लक्षण सांगितलें आहे. हा योगकारक चंद्र–रवि आणि चंद्र–शनि हे ग्रह विशेष आहेत. आणि त्यांच्या परस्पर योगापासूनच हा " नपुंसक " योग होतो.

निषेके भ्रातृलग्नेशयोगे यमल संभवः ॥
लग्नेशे भ्रातृपक्षस्थे स्वांचे वा यमलोद्भवः ॥ ३२ ॥

अर्थः—संभोगकालीं तृतीयेश व लग्नेश यांचा योग होईल तर जुळा गर्भ राहील. त्याचप्रमाणें लग्नस्वामी हा तृतीयस्थानीं जो राशि असेल त्या राशीचा नवमांश कुंडलीत असेल किंवा उच्च असेल तर जुळा जन्म होतो. स्पष्टीकरणः—ह्या श्लोकांत केवळ ग्रहांतील योगायोगानेंच आधानकालीन कुंडलींतील लग्नाधिपति व तृतीयाधिपति यांच्या योगानें विवेचन असून आगरींदि अंशात्मक योग सांगितलें आहेत. पण तृतीयस्थानाचें प्राबल्य फार आहे.

षष्टेशो देहसंबंधीं बुधः षष्ठगतो यदि ॥
बुधक्षेत्रे च जननं यस्य स स्त्रीनपुंसकः ॥ ३३ ॥
बुधस्थानेन शनिनापुंनपुंसकता भवेत् ॥

अर्थः—बुधाच्या राशीचें लग्न असून त्या राशींत षष्ठेश असेल व बुध हा षष्ठस्थानीं असेल, तर तो स्त्री नपुंसक ( स्त्री असून नपुंसक असा ) जन्म आणतो व बुध ज्या राशीचा असेल त्याच राशीचा शनि असेल तर पुरुष नपुंसक ( पुरुष असून नपुंसक असा ) जन्म आणतो. स्पष्टीकरणः—ह्या श्लोकांत आधानकालीन ग्रहयोगावरून जनन–लिंग–दौर्बल्य किंवा उत्तेजना ( कमीपणा ) कशामुळें उत्पन्न होतो किंवा जन्मतःच राहतो याचे दिग्दर्शन आहे. स्त्री असून स्त्रीत्वाचा अभाव असणे पुरुष असून पुरुषत्वाचा अभाव कोणत्या ग्रहयोगामुळें उत्पन्न होतो त्याचा निर्णय ह्या श्लोकांत स्पष्ट आहे.

निषेकलग्नेशतृतीयनाथौ लग्नस्थितौ चेद्यमलोद्भवः स्यात् ॥
तुर्यायनाथेन युते निषेके भोगीशियुक्तेयदि पादजातः ॥ ३४ ॥

अर्थः—संभोगकालच्या लग्नाचा अधिपति व तृतीयस्थानाचा स्वामी हे लग्नीं असतील तर जुळा

जन्म जाणावा. सभोगकालीन लग्नीं तृतीय स्थानाचा स्वामी व राहु हे एकत्र असतील तर पायाळू जन्म होईल. स्पष्टीकरणः—ह्या श्लोकात पुन. "जुळ्या" चा जन्म कोणत्या योगानें होतो हे दिले असुन श्लोकाच्या उत्तरार्धात "पायाळू" माणसाचा जन्म होण्यास कारणीभूत होणारा योग दाखल केला आहे.

राहूदये लग्ननाथे कर्मस्थे पादपूर्वजः ॥
सराहौ रंध्रपे लग्ने जातः स्यात् सर्पवेष्टितः ॥ ३५ ॥

अर्थः—राहू लग्नीं असून लग्नस्वामी दशमात असेल तरीही पायाळू जन्म होईल. अष्टमाचा स्वामी हा राहूनें युक्त असा लग्नीं असता जन्म सर्प वेष्टित असा होईल. स्पष्टीकरणः—ह्या श्लोकात वरील श्लोकातील योगाप्रमाणेंच पायाळू जन्म होण्यास कोणता योग कारणीभूत होतो तो दिला असून उत्तरार्धात सर्प वेष्टितजन्म होण्याचे ग्रहयोग सांगितले आहेत.

रंध्रेश्वरेपापयुते विलग्ने जातोरगैर्वेष्टितदेहवान् स्यात् ॥
केंद्रे सराहौ गुलिकेन युक्ते लग्नेश्वरे वा निधनेशयुक्ते ॥ ३६ ॥
क्रूरग्रहाणांच दृकाणलग्ने जातोरगैर्वेष्टितदेहवान्स्यात् ॥

अर्थः—अष्टमाचा स्वामी पापयुक्त असा लग्नीं असता सर्प वेष्टित जन्म होतो. लग्नस्वामी केंद्रीं राहु आणि गुलिक यानीं युक्त असेल किंवा अष्टमेशानें युक्त असेल, किंवा द्रेष्काणलग्न क्रूर ग्रहाचें असेल तर सर्पवेष्टित जन्म होतो. स्पष्टीकरणः—ह्या श्लोकात कोणत्याहि बालकाचा जन्म सर्पवेष्टित होण्यास तीन योग दिले असून त्यात राहूचा व अष्टमस्थानाचा विशेष सबध दर्शविला आहे.

लग्नत्रिभागे बुधसर्पकोलास्तन्नाथयुक्तस्तुतथात्रिभागः ॥
शुभग्रहाणांचदशाविहीनें जातोरगैर्वेष्टित देहवान् स्यात् ॥ ३७ ॥

अर्थः—बुध, राहू, शनि, हे लग्नाच्या द्रेष्काणीं असतील किंवा लग्नाचा द्रेष्काण आपल्या स्वामीनें युक्त असेल व त्यावर शुभग्रहाची दृष्टि नसेल तर सर्पवेष्टित जन्म होतो. स्पष्टीकरणः—ह्या श्लोकातही सर्पवेष्टित जन्म कथन आहे. सर्पवेष्टित जनन हें जरी नेहमींच आणि सर्वं सामान्यत. होत नसले तरी काहीं प्रसंगीं असें जनन होतें आणि अशा जननाचे वेळीं क्वचित् बालकाचा व जननीचा अंतही होतो. म्हणून ह्या सर्पवेष्टित जननयोगाला एका विशेष तऱ्हेचें महत्व आहे.

शशांके पापलग्ने वा वृश्चिकेशत्रिभागगे ॥
शुभैः स्वायास्थितैर्जातः सर्पस्तद्वेष्टितोऽपि वा ॥ ३८ ॥

अर्थः—चद्र हा मगळाच्या द्रेष्काणीं असून त्याच्या द्वितीय व द्वादशस्थानीं शुभ ग्रह असतील-अगर पापग्रहाच्या राशीचें लग्न असून तें मगळाच्या द्रेष्काणीं असेल व त्याच्या द्वितीय आणि द्वादश, स्थानीं शुभ ग्रह असेल तर सर्पवेष्टित जन्म होतो. स्पष्टीकरणः—ह्या श्लोकातही सर्पवेष्टित जन्मकथनाचाच भाग आहे. पण यात वैशिष्ट्य हें कीं, द्रेष्काणाचा सबध आणि तोही चद्र मगळ याच्याशीं दाखविला आहे. पापग्रहाचें लग्न आणि त्याच्याशीं मगळाचा सबध हाही योग आहेच.

चतुष्पदगते भानौ शेषैर्वीर्य समन्वितैः ॥
द्वितनुस्थैश्च यमलौ भवतः कोशवेष्टितौ ॥ ३९ ॥

अर्थः—रवि हा पशुराशीस असून बाकीचे सर्वग्रह द्वि-स्वभाव राशीस बलवान असतील तर कोशवेष्टित जुळें होतें. स्पष्टीकरण —ह्या श्लोकात कोशवेष्टित जन्माचें कारण सांगितलें आहे. यात रवीचा पशुराशीशीं संबध हें त्याचें कारण दिलेलें आहे. कैसाळ मनुष्याचा जन्मही अशाच योगावर होण्याचा संभव असतो.

छागे सिंहे वृषे लग्ने तत्स्थे सौरेऽथवा कुजे ॥
राश्यंशसदृशे गात्रे जायते नालवेष्टितः ॥ ४० ॥

अर्थ —मेष, सिंह किंवा वृषभ राशीचें लग्न असून तेथें शनि अथवा मंगळ असेल तर लग्नाच्या नवमांश राशीनें दर्शविल्या जाणाऱ्या शरीराच्या भागीं नालवेष्टित असा जन्म होईल स्पष्टीकरण — ह्या श्लोकांत नालवेष्टित जन्मकथनाचे योग दिले असून ते अनेक आहेत यांत जसा राशींचा व पापग्रहाचा संबंध आहे तसाच नवमांशाचाही संबंध आहे नालवेष्टन शरीराच्या कोणत्या भागांत असेल याचा निर्णय नवमांशावर अवलंबून आहे

लग्ने सपापे बहुपापदृष्टे राहुध्वजाभ्यां सहितेऽथवात्र ॥
पापग्रहाणां तु विलग्नभे वा जातो नरो नाल विवेष्टितांगः ॥ ४१ ॥

अर्थ —लग्नात पापग्रह असून त्यावर अनेक पापग्रहांची दृष्टि असेल किंवा लग्नीं राहु किंवा केतु असेल तर नालवेष्टित जन्म होतो अथवा पापग्रहाचें लग्न असून त्यावर अनेक पापग्रहांची दृष्टि असेल तर नालवेष्टित जन्म होतो स्पष्टीकरण —ह्या श्लोकांतही नालवेष्टित जन्म होण्यास आणखी कोणते योग कारणीभूत होतात याची मीमांसा आहे यांत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे कीं, नालवेष्टित योग होण्यास पापग्रहांचेच योग विशेषत सांगितले आहेत

क्रूरान्तरेलग्नगते सराहौ लग्नेकुजेवाऽसुरनाथदृष्टे ॥
लग्ने शनौ भूमिसुतेनदृष्टे जातो नरो नालविवेष्टितांगः ॥ ४२ ॥

अर्थ —मंगळाशिवाय क्रूर ग्रह लग्नीं असेल व तो राहुयुक्त असेल, अथवा लग्नीं मंगळ असून तो राहूच्या दृष्टींत असेल, अथवा लग्नीं शनि असून तो मंगळाच्या दृष्टींत असेल तर नालवेष्टित जन्म होतो. स्पष्टीकरण —ह्या श्लोकांतही नालवेष्टित जन्म होण्यास कारण काय ? कोणत्या ग्रहयोगाचें हें फल आहे त्याचा दाखला आहे क्रूर ग्रहाचें प्राबल्य हेंच त्याचें कारण

तत्कालमिन्दुसहितो द्विरसांशकोय–स्तत्तुल्य राशिसहिते पुरतः शशांके ॥
यावानुदेति दिनरात्रिसमानभा(–स्तावद्गते दिननिशोः प्रवदन्ति जन्म ॥४३॥

अर्थ —आधानकालाचा स्पष्ट चंद्र, द्वादशांश कुंडलींत ज्या राशींत असेल, त्या राशींत दहाव्या महिन्यांत जेव्हां तो असतो (येतो) तेव्हां प्रसूति होते व आधानलग्न दिवस किंवा रात्रिसंज्ञक जितक्याच्या अंश असेल तितक्याच्या अंशावर दिवसास अगर रात्रीस जन्म होतो स्पष्टीकरण —हा श्लोक फार महत्त्वाचा आहे यांत आधानकालाच्या चंद्रावरून जन्म केव्हां होतो हें स्पष्ट दिलें आहे. पण याचें विवेचन थोडक्यात होणार नसल्यानें शेवटीं सविस्तर देऊं

उदयति मृदुभांशे सप्तमस्थे च मन्दे यदि भवति निषेकः सूतिरब्दत्रयेण ॥
शशिनि तु विधिरेवंद्वादशाब्दैः प्रकुर्या न्निगदितमिह चिन्त्यं सूतिकालेऽपि युक्त्या ॥४४॥

अर्थ —आधान लग्न शनीच्या नवमांशीं असून शनि सप्तमस्थानीं असतां राहाणारा गर्भ तीन वर्षांनीं प्रसूति पावतो व आधान लग्न, चंद्राच्या नवमांशीं असून चंद्र सप्तमांत असतां राहाणारा गर्भ बारा वर्षांनीं प्रसूत होतो हेंच नियम प्रसूति कालीन लग्नालाही युक्तीनें लागू करावें स्पष्टीकरण —ह्या श्लोकांत सर्व सामान्यत आधान कालापासून प्रसूति कालाची काल मर्यादा जी ९ ते १० महिन्यांच्या दरम्यान असते त्याहेक्षां अधिक काल लागण्यास कारणीभूत होणारे योग सांगितले आहेत पण असा दीर्घकाल हा कांहीं शारीरिक विकारामुळेंच लागतो

पितृकर्मेश्वरौ दुस्थौ देहेशे बलसंयुते ॥
विना सीमन्तकर्मादिजातः पुत्रो न संशयः ॥ ४५ ॥
लाभे पापे पापग्रहे न सीमन्त सुतो भवेत् ॥

अर्थः—नवम व दशम या स्थानांचे स्वामी वाईट स्थानात असून लग्नेश बलवान् असेल तर सीमन्त कर्माशिवाय पुत्र जन्म पावतो. लाभस्थानीं पाप ग्रह हे पापग्रहाच्या राशीस असतील तर तें मूल सीमंत कर्माशिवाय जन्मलेलें आहे, असें समजावें. खुलासाः—सीमंत कर्म हा एक संस्कार आहे. तो ४।५।६।८।९ या महिन्यातून वाटेल तेव्हां पतीनें करावयाचा असतो. हा संस्कार सांप्रत फारच थोडे लोक करीत असतील. बहुशः या कर्मांचा लोपच झाल्यासारखी आजची स्थिति आहे. स्पष्टीकरणः—हा श्लोकात सांगितलेला योग हा साम्रतकालीं पाहण्याचें कारणच दिसत नाहीं. सीमंत कर्म हा संस्कार न होण्यास ग्रह योग कारणीभूत असतील पण त्या संस्काराचे महत्त्व मानलें जात असेल तेव्हा !

पितुर्जातः परोक्षस्य लग्नमिन्दावपश्यति ॥
विदेशस्थस्य चरभे मध्याद्भ्रष्टे दिवाकरे ॥ ४६ ॥

अर्थः—चंद्र जर लग्नास पहात नसेल तर पितृपरोक्ष जन्म जाणावा. आणि रवि हा चर राशीस नवमस्थानीं असेल तर जन्मकालीं पिता परदेशात असेल. स्पष्टीकरणः—जन्म कालीं पिता घरांत नसण्याचे योग ह्या श्लोकात दर्शित केले आहेत. त्यांत चंद्र आणि रवि याचा मुख्यतः संबंध आहे. रवि हा पित्याचा कारक असल्यानें त्यास प्राधान्य मिळणें योग्यच आहे.

उदयस्थेऽपि वा मन्दे कुजे वाऽस्तं समागते ॥
स्थिते वाऽन्तः क्षपानाथे शशांक सुत शुक्रयोः ॥ ४७ ॥

अर्थः—शनि हा लग्नात असेल किंवा मंगळ सप्तमात असेल, किंवा चंद्र हा बुध व शुक्र यांच्यामध्ये असेल तर बाप परदेशात असता जन्म जाणावा. स्पष्टीकरणः—जन्मणाऱ्या व्यक्तीचा पिता त्या व्यक्तीच्या जनन कालीं परदेशीं असण्याचे योग यात दर्शित करण्यात आले आहेत. यात शनि, मंगळ, चंद्र व शुक्र याचा योगसबंध आहे.

स्थिते वायदि शीतांशौ शुभखेचर राशीगे ॥
औरसोयं भवेज्जातो गुरुवर्गे समन्विते ॥ ४८ ॥

अर्थः—जर चंद्र हा शुभ ग्रहाच्या राशीस असेल किंवा गुरूच्या वर्गी असेल तर तो औरस पुत्र जाणावा. स्पष्टीकरणः—ह्या श्लोकात औरस पुत्राचा योग कोणत्या ग्रहस्थितिमुळे होतो, याचे दिग्दर्शन आहे. औरस पुत्र योग होण्यास चंद्र आणि गुरु यांचें बलाधिक्य आणि योग कारकत्व पाहिजे हे ह्या योगातील स्वारस्य होय.

जीवेन भौमसंदृष्टः स्ववर्गे चार्कशीतगू ॥
क्षेत्रजोयंभवेज्जातः ससौम्यो वा बलान्वितः ॥ ४९ ॥

अर्थः—गुरु हा मंगळाच्या दृष्टींत नसून रवि व चंद्र हे आपापल्या वर्गी असतील किंवा गुरु हा बुधानें युक्त असून बलवान् असेल तर क्षेत्राच्या ठिकाणी जन्म जाणावा. स्पष्टीकरणः—ह्या श्लोकात पुण्य क्षेत्रामध्ये जन्म होण्यास कोणते योग कारणीभूत आहेत याचा विचार आहे. यात रवि–चंद्र, गुरु व बुध यांचें परस्परांशीं होणारें योग ग्रथित केलें आहेत.

मन्दवर्गगते चन्द्रे मन्दयुक्ते तु पंचमे ॥
भानुभार्गव संदृष्टे पुत्रः पौनर्भवो भवेत् ॥ ५० ॥

अर्थः—चंद्र हा शनीच्या वर्गी असून शनीसह पचमात असता त्यावर रवि व शुक्र यांची दृष्टी

असेल तर तो पुनर्विवाहित स्त्रीचा पुत्र जाणावा. स्पष्टीकरणः—पुनर्विवाहित स्त्रीपासून होणाऱ्या संततीच्या आधान कालीं कोणते ग्रहयोग आहेत याचा विचार ह्या श्लोकात दर्शित करण्यात आला आहेत.

व्यये भास्कर संदृष्टे वर्गे भास्कर चन्द्रयोः ॥
चंन्द्र सूर्ययुते वापि कानीनोयं भवेन्नरः ॥ ५१ ॥

अर्थः—बाराव्या स्थानावर रवीची दृष्टी असेल, किंवा रवि हा चंद्राच्या वर्गी व चंद्र हा रवीच्या वर्गी असता तो कुमारी पुत्र जाणावा. (कर्ण हा कुमारी पुत्र होता.) स्पष्टीकरणः—अविवाहित स्थितींत म्हणजे कौमार्यावस्थेमध्यें होणाऱ्या संततीचा योग ह्या श्लोकात दिला आहे. पण ह्याचा विचार फार बारकाईनें केला पाहिजे.

चन्द्रदृष्टियुतो मान्दिर्भानुपुत्रसमन्वितः ॥
तद्वीक्षणयुतो वापिदत्तपुत्रो भवेन्नरः ॥ ५२ ॥

अर्थः—मान्दि हा चद्रानें दृष्ट असून शनीनें युक्त किंवा शनीच्या दृष्टींत असेल तर तो दत्त पुत्र जाणावा. स्पष्टीकरणः—ह्या श्लोकात "दत्त" पुत्राचा विचार केला असून दत्त पुत्राचे योग कोणतें हे दिलें आहेत, दत्त पुत्र म्हणजे दत्तक पुत्र की काय, हा प्रश्न चिंतनीय आहे.

शन्यङ्गारकसंयुक्ते सप्तमेवाऽथपंचमे ॥
अन्यैरवीक्षिते खेटैः कृत्रिमं तु विनिर्दिशेत् ॥ ५३ ॥

अर्थः—सप्तम किंवा पचम या स्थानात शनि व मगळ असतील व त्या स्थानावर अन्य ग्रहांची दृष्टी असेल तर तें मूल कृत्रिम जाणावें. स्पष्टीकरण—ह्या श्लोकांतील "कृत्रिम" या पदाचा काहींच अर्थ बोध होण्यासारखा नाहीं. कृत्रिम म्हणजे बनावट अर्थात् यात काहीं तरी शब्दाचा अपभ्रंश झालेला असावा.

परस्परक्षेत्रगतौ तु होरारसातलेशौयदिजन्मलग्नात् ॥
लग्नेश्वरो वा हिबुकेश्वरोवा ध्वजाहियुक्तो जननं परेण ॥ ५४ ॥

अर्थः—होरा व चतुर्थभाव यांचे अधिपति एकमेकाच्या स्थानीं असतील लग्न स्वामी व चतुर्थेश राहू केतूनीं युक्त असतील तर ते मूल जारज जाणावें. स्पष्टीकरणः—ह्या श्लोकांत जारज संतति योगाचे विवेचन आहे. ह्या योगांचे दिग्दर्शन करण्यांतील ग्रंथकर्त्याचा हेतु सर्वथा चिंतनीय आहे.

लग्नं शशांकं सुरराजमंत्री न वीक्षते नैकगृहस्थितो वा ॥
न जीववर्गेण युतं तदानीं जातं वदेदन्यसमागमेन ॥ ५५ ॥

अर्थः—गुरु हा लग्नावर किंवा चद्रावर दृष्टि नसेल किंवा तो लग्नीं अथवा चद्रानें युक्त नसेल आणि लग्न व चद्र गुरुच्या वर्गी नसतील तर त्याची अन्य पुरुषाच्या समागमानें (व्यभिचारानें) उत्पत्ति जाणावी. स्पष्टीकरणः—ह्या श्लोकांत व्यभिचारापासून म्हणजे पर पुरुषापासून होणाऱ्या संततीच्या आधान कालीं कोणत्या ग्रहांचे परस्परकत्व असते याचा उल्लेख आहे. हे सर्वच योग फार बारकाईनें तपासले पाहिजेत. स्वस्त्री खेरीज अन्य स्त्रीशीं संबंध करणें हा पुरुष व्यभिचार योग आणि स्वपती खेरीज अन्य पुरुषाशीं संभोग करणें हा स्त्री व्यभिचार योग हे तारतम्यानें जाणावें.

स्वाती द्वितीया रविवारयुक्तासमसप्तमी सोमजरेवती च ॥
सद्वादशीभानुयुतश्रविष्टा चैतेषु जातः परतो वदन्ति ॥ ५६ ॥

अर्थः—द्वितीयेला स्वातीनक्षत्र असून रविवार असेल, किंवा सप्तमीला रेवती नक्षत्र असून सोमवार असेल किंवा द्वादशीला धनिष्ठा नक्षत्र असून रविवार असेल तर जन्मणारें मूल जारज जाणावें.

**स्पष्टीकरणः**—ह्या श्लोकात जारज जन्माचीं कारणें दिलीं आहेत पण हे योग इतके स्थूल व शंकास्पद आहेत कीं, त्याची छाननी केल्यास ते तत्वमीमांसेच्या दृष्टीनें टिकणार नाहींत म्हणून ते त्याज्य होत.

**भद्राख्यतिथियुक्तेषु त्रिपादर्क्षान्वितेषु च ॥**
**मन्दार्कभौमवारेषु जातमन्योद्भवं विदुः ॥ ५७ ॥**

**अर्थः**—शनि, रवि व मंगळ या वारीं भद्रा ( द्वितीया, सप्तमी व द्वादशी ) तिथी असून त्रिपाद नक्षत्र ( पुनर्वसु, विशाखा व पूर्वाभाद्रपदा ) असेल तर झालेलें मूल जारज जाणावें. **स्पष्टीकरणः**—ह्या श्लोकाची स्थिति देखील वरील प्रमाणेंच आहे. कारण वार, तिथि व त्रिपाद नक्षत्र याचा योग अनेक वेळा येऊं शकतो व त्याची मर्यादा पाऊण दिवस म्हणजे ४५ घटिकापर्यंत राहील. अर्थात् इतक्या दीर्घकालातले सर्व जन्म जारज संज्ञेखालीं येणें अशक्य दिसतें.

**न लग्न मिंदुंच गुरुर्निरीक्षते न वा शशांकंरविणासमागतम् ॥**
**सपापकोऽर्केण युतोऽथवाशशीपरेण जातं प्रवदन्ति निश्चयात् ॥ ५८ ॥**

**अर्थः**—( १ ) लग्न किंवा चन्द्र यावर गुरूची दृष्टि नसेल; किंवा चंद्र हा रवीनें युक्त नसेल; ( २ ) किंवा चंद्र हा पापग्रहासह रवीनें युक्त असेल तर निश्चयानें जारज जन्म आहे, असें ( ऋषि ) सागतात. **स्पष्टीकरणः**—ह्या श्लोकांतही जारज जन्माचेच योग सांगितले आहेत. पण केवळ येवढ्याच योगावरून तशी स्थिति असेल असे संभवत नाहीं. दिलेल्या योगात आणखी सूक्ष्मपर्याय असलेच पाहिजेत. उदाहरणार्थ लग्न-चंद्रावर गुरूची दृष्टि केवळ राश्यात्मक नसून अंशात्मक पूर्ण पाहिजे.

**गुरुक्षेत्रगते चन्द्रे तद्युक्ते चान्यराशिगे ॥**
**तद्रेकाणे तदंशे वा न परैर्जातइष्यते ॥ ५९ ॥**

**अर्थः**—चंद्र हा गुरूच्या ( धनु किंवा मीन ) राशीस असेल; ( २ ) किंवा तो अन्य राशींत गुरूनें युक्त असेस ( ३ ) किंवा तो गुरुच्या द्रेष्काणात अथवा नवमांशात असेल, तर तो जारज जन्म नाहीं. **खुलासा**:—गुरूच्या द्रेष्काणात म्हणजे द्रेष्काणकुंडलींत धनु किंवा मीन राशींत आणि गुरूच्या नवमांशात म्हणजे नवमांशकुंडलींत धनु अगर मीन राशींत असें समजावें. **स्पष्टीकरणः**—कोणत्याही प्रकारें गौणत्व किंवा कमीपणा नसलेल्या जन्माचे योग यात सांगितले आहेत. स्यात गुरूचें प्राधान्य आहे " न परैर्जात इष्यते " याच्या ऐवजीं " जन्मोत्तम विशिष्यते " असे पाहिजे होते. कारण उत्तमाचा योग आहे.

**क्रूरर्क्षगतावशोभनौ सूर्याद्द्यूननवात्मजस्थितौ ॥**
**बद्धस्तु पिता विदेशगः स्वे वा राशिवशादथोपथि ॥ ६० ॥**

**अर्थः**—एखाद्याच्या जन्मकालीं रवीच्या सप्तमात, नवमात किंवा पचमात शनि व मंगळ हे दोन पापग्रह क्रूर राशीस असतील तर त्याचा बाप त्यावेळीं कैदेंत असेल. हा योग रवि चर राशींत असता परदेशीं, स्थिर राशींत असता स्वदेशीं, व द्विःस्वभाव राशीस असता मार्गांत घडून येतो असें समजावें. **खुलासा**:—जन्मकालीन रवीवरून एखाद्याचा बाप जन्माच्या वेळीं कोणत्या ठिकाणीं कोणत्या स्थितींत होता, याची कल्पना करितात. लग्न सप्तम, तृतीय व नवम हीं मुख्यतः प्रवासस्थानें आहेत. या स्थानात रवि हा जर चर राशीचा असेल तर जन्माच्या वेळीं बाप गावीं नव्हता म्हणून समजावें. इतर स्थानीं चर राशीस रवि असेल तर बाप गांवातच होता, पण तो घरीं नव्हता असें समजावें. जन्मकाळीं रवि जर शनीनें दुषित असेल तर त्याचा बाप काहींतरी अडचणींत असेल किंवा आजारी असेल. हा योग जन्मानंतर १ वर्षाच्या आत किंवा गर्भांत असताही घडून येतो. हा योग नवमात अगर दशमात होईल, तर निश्चयानें ही गोष्ट घडून येईल. इतर स्थानीं होईल तर निराळे प्रकार घडून येतात. रवि हा बाप किंवा बापाचे आईबाप यांचाही द्योतक आहे. त्याचप्रमाणें तो राजा अथवा गांवचा अधिकारी अथवा

यजमान किंवा घराचा मालक याचाही द्योतक आहे. म्हणून इतक्या व्यक्तींपैकीं कोणाला तरी हा योग बाधक झाल्याशिवाय राहणार नाहीं.

रवीच्या सप्तमात शनिमंगळ योग असता त्या दोन्ही ग्रहाची रवीवर पूर्ण दृष्टि पडत असल्याकारणानें बापाला बंधनयोग होणें स्वाभाविक आहे. त्याचप्रमाणें लग्न चंद्र किंवा रवि यांचें नवमस्थान हे पितृसंज्ञक असल्याकारणानें या स्थानातील शनिमंगळांची जरी रवीवर दृष्टी पडत नाहीं, तरी बापाला बंधन होणें असंभवनीय नाहीं. पंचमांत मात्र हा योग कसा होतो, तें उपपत्तीनें सिद्ध होत नाहीं.

शनिमंगळाचा योग रवीच्या चतुर्थात, दशमांत अगर व्ययांत झाल्यानेंही बापाला बंधन होऊं शकेल. **स्पष्टीकरणः**—याचे स्पष्टीकरण विशेषच केलें पाहिजे. कारण ह्या श्लोकांत अनेक गोष्टींचें मिश्रण केलें गेलें आहे. ह्या श्लोकांत जन्मकाळीं पित्याची स्थिति काय असली पाहिजे याचें दिग्दर्शन असून लागलीच त्याच्या पुढें पित्यास कोणत्या ग्रहयोगकारणामुळें बंधनयोग प्राप्त होतो याचेंही दिग्दर्शन आहे. पण बंधनयोगाचा येथें कां संबंध जोडला हें समजणेंच कठीण आहे. येथें फक्त जन्मकाळीं पिता बंधनात असेल असें सांगितलें असते तर यथोचित झालें असतें. बंधन म्हणजे काहीं तरी विशेष प्रकारचें संकट अगाच अर्थ घ्यावा कोणत्याही प्रकारची अनिष्ट काळजी हेंही मानसिक बंधनच आहे.

पूर्णे शशिनि स्वराशिगे सौम्ये लग्नगते शुभे सुखे ॥
लग्ने जलजेऽस्तगेऽपि वा चन्द्रे पोतगता प्रसूयते ॥ ६१ ॥

**अर्थः**—(१) पूर्ण चंद्र कर्क राशींत असून बुध लग्नीं व गुरू चतुर्थस्थानीं असेल किंवा (२) जलराशीचें लग्न असून चंद्र सप्तमांत असेल तर गर्भिणी स्त्री नौकेंत प्रसूत होते. **खुलासाः**—जलराशीचें लग्न असतां सप्तमांतील चंद्रही जलराशींतच असावयाचा. हा चंद्र पूर्णच असला पाहिजे असें नाहीं. गर्भिणी स्त्रीनें प्रवास करताना हा योग लक्षांत घ्यावा. **स्पष्टीकरणः**—ह्या श्लोकांत प्रसूतिस्थानाचा निर्देश व तो योग घडविणारें ग्रहयोग यांचे विशदीकरण केलें आहे. त्यांत लग्न चरराशीचें व चंद्रही चर–जलचर–आणि इतर ग्रह चर–राशींत हा दिलेला योग पाण्यांत किंवा पाणवठ्याची जागा दर्शवितो.

आप्योदय आप्यगः शशी संपूर्णः समवेक्षतेऽथवा ॥
मेषूरणबन्धुलग्नगः स्यात् सूतिः सलिले न संशयः ॥ ६२ ॥

**अर्थः**—( १ ) उदित लग्न जलराशीचें असून चंद्रही जलराशींतच असेल, ( २ ) किंवा जलराशीच्या लग्नावर पूर्ण चंद्र पहात असेल; ( ३ ) किंवा जलराशीचें लग्न असून चंद्र दहाव्या किंवा चवथ्या किंवा पहिल्या स्थानांत असेल तर पाण्यामध्यें जन्म जाणावा. **स्पष्टीकरणः**—पाण्यामध्यें किंवा पाण्याच्या अति सन्निध जन्म होणारांच्या लग्नकुंडलींत कोणत्या ग्रहाचे कसकसे योग असतात हे यात दिलें असून त्यात जलराशीचें प्राधान्य आहे.

उदयोडुपयोर्व्ययस्थिते गुप्त्यां पापनिरीक्षिते यमे ॥
अलिकर्किंयुते विलग्नगे सौरे शीतकरेक्षितेऽवटे ॥ ६३ ॥

**अर्थः**—( १ ) लग्नीं चंद्र असून व्ययस्थानीं शनि हा पापग्रहाच्या दृष्टींत असेल तर भुयारांत जन्म जाणावा, ( २ ) शनि हा वृश्चिक किंवा कर्क राशीचा लग्नीं असून त्यावर चंद्राची दृष्टि असेल तर खाणीत ( खाचेंत ) जन्म जाणावा. **स्पष्टीकरणः**—ह्या श्लोकात भुयार, माळी, तळघरें किंवा खोल जागा यांच्यात जन्म होणारांच्या ग्रहयोगाचे विवेचन आहे. ह्या योगांवर कोणत्या ग्रहानें कोणत्या जागेवर स्वामित्व असते याचाही बोध अनायासे होईल.

मन्देऽब्जगते विलग्नगे बुधसूर्येन्दुनिरीक्षिते क्रमात् ॥
क्रीडाभवने सुरालये शर्करभूमिषु च प्रसूयते ॥ ६४ ॥

अर्थ.—जल राशीचा शनि लग्नीं असून त्यावर बुधाची दृष्टि असतां क्रीडास्थानीं, रवीची दृष्टि असता देवालयात व चंद्राची दृष्टि असतां उकिरड्यावर जन्म जाणावा स्पष्टीकरण—ह्या श्लोकांत जन्म कोणत्या स्थानीं होतो याबद्दलचें विवेचन आहे. ह्यावरून ज्याप्रमाणें ज्या ग्रहाचा ज्या स्थानाशीं संबंध दर्शित केला आहे त्याप्रमाणेंच त्या ग्रहाचा संबंध इतर काळीं ही त्या त्या स्थानाशींच येतो ही गोष्ट लक्षात ठेवावी

नृलग्नगं प्रेक्ष्य कुजाः स्मशाने रम्ये सितेन्दू गुरुरग्निहोत्रे ॥
रविर्नरेन्द्रामरगोकुलेषु शिल्पालये ज्ञः प्रसवं करोति ॥ ६५ ॥

अर्थ —मनुष्य राशीचा शनि लग्नीं असून त्यावर मंगळाची दृष्टि असता स्मशानात, शुक्र व चंद्र याची दृष्टि असता रम्यस्थानीं, गुरूची दृष्टि असता होमशाळेंत, रवीची दृष्टि असता राजगृहात किंवा देवालयात किंवा गोशाळेंत आणि बुधाची दृष्टि असता शिल्प शाळेंत जन्म जाणावा. स्पष्टीकरण —ह्या श्लोकातही जन्म कोणत्या जागेंत होतो याचे विवेचन व योग सांगितले आहेत मानव राशीचा शनि लग्नीं हें यात मुख्य तत्त्व असून त्या शनिवर निरनिराळ्या ग्रहाची दृष्टि हे योगकारक आहे.

राश्यंशसमानगोचरे मार्गे जन्मचरे स्थिरे गृहे ॥
स्वर्क्षांशगते स्वमंदिरे बल योगात्फलमंशकर्क्षयोः ॥ ६६ ॥

अर्थ —लग्न व त्याचा नवमांश यांत जो राशि बलवान् असेल तो राशि चर असता त्या राशीनें दर्शविल्या जाणाऱ्या स्थळीं अथवा मार्गांत व स्थिर असता त्या राशीनें दर्शविल्या जाणाऱ्या ( स्थळीं ) घरामध्यें जन्म होतो लग्न जर नवमांशीं असेल तर स्वत त्या घरींच जन्म होतो. स्पष्टीकरण—यात लग्न व त्याचा नवमांश यावरून जन्मस्थलाचे योग सांगितले आहेत. चर नवमांशाचें फल मार्गांत आणि स्थिर नवमांशाचें फल घरांत व स्वनवमांशाचें स्वत त्या घरीं असें आहे.

आरार्कजयोस्त्रिकोणगे चन्द्रेऽस्ते च विसृज्यतेऽम्बया ॥
दृष्टेऽमरराजमन्त्रिणा दीर्घायुः सुखभाक् च सत्कृतः ॥ ६७ ॥

अर्थ —शनि व मंगळ हे एका राशीवर असून त्याच्या त्रिकोणात ( ९ व्या व ५ व्या स्थानात) किंवा सप्तमात चंद्र असता बालकास माता टाकते व जर चंद्रावर गुरूची दृष्टि असेल तर होणारें बालक दीर्घायु, सुखी व पुण्यवान् असे होते स्पष्टीकरण—यात मातेपासून दूर राहण्याचा योग प्रथम सांगितला असून उत्तरार्धांत दीर्घायु योग कोणत्या ग्रहामुळें होतात याचें विवेचन आहे.

पापेक्षिते तु हिनगाउदये कुजेऽस्ते ।
त्यक्तो विनश्यति कुजार्कजयोस्तथाऽऽये ॥
सौम्ये भिपश्यति तथाविधहस्तमेति ।
सौम्येतरेषु परहस्तगतोऽप्यनायुः ॥ ६८ ॥

अर्थ —चंद्र हा लग्नीं असून त्यावर पापग्रहाची दृष्टि असेल व मंगळ सप्तमात असेल तर तें मूल आईनें टाकल्यामुळें मरण पावतें मंगळ व शनि हे अकराव्या स्थानांत असताही हाच योग घडतो त्या चंद्रावर जर शुभ ग्रह पहात असेल तर ते मूल त्या शुभग्रहाच्या धर्माप्रमाणें ज्याचा धर्म अशा पुरुषाकडून पोसलें जातें व पापग्रहाची दृष्टि असेल तर त्याचा दुसऱ्यानें सांभाळ करूनही तें अल्पायु होतें जगत नाहीं ) स्पष्टीकरण —ह्या श्लोकांत आईनें टाकल्यामुळें मूल मरण पावणें, दुसऱ्याकडून मूल सांभाळलें जाणें, आणि अल्पायु होणें असें योग दिग्दर्शित केलें आहेत शेवटच्या योग अल्पायु कशामुळें होतो याचा आहे

पितृमातृगृहेषु तद्बलात् तरुशालादिषु नीचगैः शुभैः ॥
यदि नैकगतैस्तु वीक्षितौ लग्नेन्दू विजने प्रसूयते ॥ ६९ ॥

अर्थ —जो ग्रह बलवान् असेल त्यावरून बाप, आई, चुलता किंवा मावशी याच्या घरीं जन्म

जाणावा. अनेक शुभग्रह नीच असतील तर घराबाहेरच्या स्थलीं जन्म जाणावा. लग्न व चंद्र यांवर एकत्र नसलेल्या सर्व शुभग्रहाची दृष्टि असेल तर निर्जन प्रदेशांत प्रसूति होते. स्पष्टीकरणः—वडील, आई, चुलता, किंवा मावशी याच्या घरीं जन्म होण्यास कोणते योग कारणीभूत होतात याचे योग ह्या श्लोकांत दिलें आहेत. यांत आई आणि वडील असें निरनिराळें दिलें आहे, त्यावरून आई म्हणजे मातुल घर समजावें.

मन्दर्क्षांशे शशिनि हिबुके मन्ददृष्टेऽब्जगेवा ।
तद्युक्ते वा तमसि शयनं नीचसंस्थैश्चभूमौ ॥
यद्वद्राशिर्व्रजतिहरिजं गर्भमोक्षस्तुतद्वत् ।
पापैश्चन्द्रात् स्मरसुखगतैः क्लेश माहुर्जनन्याः ॥ ७० ॥

अर्थः—( १ ) चंद्र हा शनीच्या नवमांशीं असेल, ( २ ) किंवा चतुर्थस्थानीं असेल, ( ३ ) किंवा त्याच्यावर शनीची दृष्टि असेल, ( ४ ) किंवा तो जलराशीस असेल, ( ५ ) किंवा तो शनीनें युक्त असेल तर त्या बालकाची अंधारात प्रसूति होते. अनेक पापग्रह जर नीच असतील तर जमिनीवरच प्रसूति जाणावी. लग्नांत उदित असलेला राशि ज्या जातीचा ( शीर्षोदय, पृष्टोदय किंवा उभयोदय असा ) असेल त्याचप्रमाणेंच गर्भ जन्म घेतो. चंद्राच्या ७त व ४त अनेक पापग्रह असतां प्रसूति झाल्यास मातेला क्लेश होतील असें शास्त्रज्ञ सांगतात. स्पष्टीकरणः—अंधारांत, जमिनीवर इत्यादि कोणत्या ठिकाणीं जन्म कोणत्या ग्रहयोगामुळें होतो हे प्रथमतः सांगून उत्तरार्धांत मातेला प्रसूतिकाली क्लेश देणारे योग कोणते हें सांगितलें आहे. त्यांत चंद्रापासून ४–७ या स्थानीं पापग्रह हा योग आहे.

स्नेहः शशांकदुदयाच वर्तिर्दीपोऽर्कयुक्तर्क्षवशाचराद्यः ॥
द्वारंच तद्वास्तुनिकेन्द्रसंस्थैर्ज्ञेयं ग्रहैर्वीर्यसमन्वितैर्वा ॥ ७१ ॥

अर्थः—चंद्र ज्या राशींत असेल त्या राशीच्या धर्माप्रमाणें दिव्यांत कमजास्त तेल असतें. लग्नाचे उदित अंशाप्रमाणें वात असते. रवि ज्या राशींत असेल, तो राशि चर, स्थिर किंवा द्विस्वभाव असेल, त्याप्रमाणें दिवा चंचल, स्थिर किंवा मधून मधून हालणारा असा असेल. केंद्रांतील ग्रहांवरून किंवा त्यांतील बलवान् ग्रहांवरून त्या ग्रहांच्या दिशेस सूतिका गृहाचें द्वार असतें. स्पष्टीकरणः—ह्या श्लोकांत प्रसूतिकालीं सूतिकेच्या खोलींत असलेल्या दिव्याचें वर्णन आहे. आणि शेवटीं सूतिकेच्या गृहाचें द्वार कोणत्या बाजूस असतें ते दिलें आहे.

जीर्णे संस्कृतकर्मजे क्षितिसुते दग्धंनवं शीतगौ ।
काष्ठाढ्यं न दृढं रवौ शशिसुते चानेकशिल्प्युद्भवम् ॥
रम्यंचित्रयुतं नवंच भृगुजे जीवे दृढं मन्दिरं ।
चक्रस्थैस्तु यथोपदेशरचनां सामन्तपूर्वां वदेत् ॥ ७२ ॥

अर्थः—कुंडलींत जर शनि बलवान् असेल तर सूतिकागृह जुनें व डागडुजी केलेलें असें असेल; मंगळ बलवान् असेल तर तें जळलेलें असेल; चंद्र बलवान् असेल तर नवीन बांधलेलें असेल; रवि बलवान् असेल तर ज्यांत लाकूडकाम विशेष असून बळकट असें असेल; बुध बलवान् असेल तर अनेक कारागिरांनीं तयार केलेलें असें असेल; शुक्र बलवान् असेल तर रम्य, नक्षीदार व नवें असें असेल, गुरु बलवान् असेल तर बळकट असा वाडा असेल. ज्या ग्रहावरून सूतिकागृहाची कल्पना केली असेल त्याच्या आसपासच्या ग्रहांवरून आसपासच्या घरांची कल्पना करावी. गुणदोषः—कुंडलीवरून जन्मस्थलाचें वर्णन देण्याची ही रीति सामान्य दिसते. कारण एकाद्या कुंडलींत एकही बलवान् ग्रह, दोन किंवा अधिक असतील किंवा एखाद्या कुंडलींत एकही बलवान् ग्रह नसेल. म्हणून या पद्धतीनें वर्णन बिनचूक सांगता येईल अशी खात्री देववत नाहीं. यापेक्षां जन्मकालीन चंद्रावरून च वर्णन करावें असें वाटतें. तेव्हां लग्न

बलवान् असेल तेव्हा लग्नावरूनच वर्णन करावें, कित्येक चतुर्थ स्थानावरूनही करितात राशीची जी निवासस्थानें दिलीं आहेत त्यावरून जन्मस्थलाचें वर्णन करता येतें, यांत शंका नाहीं एखाद्या लग्नीं सिंह राशि उदित असून या राशींत जर रवि असेल तर त्या मनुष्याचा जन्म एखाद्या मोठ्या पर्वतावर किंवा तसल्या पर्वताजवळच्या गावीं, किंवा जवळ मोठें रान आहे अशा स्थलीं किंवा राजधानीच्या शहरीं, किंवा जेथें किल्ला आहे अशा स्थलीं, ज्या गावात किंवा ज्या घरीं एखादा सरदार आहे किंवा एखादा मोठा ऑफीसर आहे किंवा जें घर तटबंदी वाडा आहे अशा स्थलीं जन्म होण्याचा संभव असतो लग्नाप्रमाणेंच चंद्रावरूनही विचार होतो अभ्यासानें हें ज्ञान होण्यासारखें आहे कुंडलींत ज्या दिशेला जे ग्रह पडल असतील, त्यांच्यावरून आसपासची स्थितीहि जाणता येतें याबद्दल विशेष विवेचन अनेक निरनिराळ्या ग्रंथात आहे स्पष्टीकरण —ह्या श्लोकात सूतिकेच्या घराचं वर्णन दिलें आहे प्रसुति कोणत्या प्रकारच्या घरांत होईल त्याचे योग दिले आहेत ह्याचा उपयोग अन्य ठिकाणींहि करतां येईल कारण ग्रहांवरून घर चांगलें वाईट इत्यादि हे योग इतर प्रकरणात असेंच येतात

मेषकुलीरतुलालिघटैः प्रागुत्तरतो गुरुसौम्यगृहेषु ॥
पश्चिमतश्च वृषेणनिवासो दक्षिणभागकरौमृगसिंहौ ॥ ७३ ॥

अर्थ —मेष, कर्क, तुला, वृश्चिक व कुंभ ह्या राशींचीं लग्नें असता घराच्या पूर्व बाजूस, धनु मीन, मिथुन व कन्या हीं लग्नें असता घराच्या आड बाजूस, वृषभलग्नीं पश्चिमेस, मकर आणि सिंह हीं लग्नें असता घराच्या दक्षिण बाजूस सूतिकास्थान ( बाळत खोली ) जाणावें स्पष्टीकरण —ह्या श्लोकांत कोणत्या लग्नावर कोणत्या जन्म झाला असता त्या घरात बाळतिणीची खोली कोणत्या दिशेस असते याचा निर्णय आहे पण यवढ्यानें केवळ तें जमणार नाहीं अशावरून पाहणें युक्त

प्राच्यादिगृहेक्रियादयो द्वौ द्वौ कोणगताद्विमूर्तयः ॥
शय्यास्वपि वास्तुवद्वदेत् पादैः षट्त्रिनवान्त्यसंस्थितैः ॥ ७४ ॥

अर्थ —मेष, वृषभ या लग्नीं पूर्वेस, मिथुनावर आग्नेयीस कर्क, सिंह यावर दक्षिणेस, कन्येवर नैर्ऋत्येस, तुला, वृश्चिक यावर पश्चिमेस, धनु राशीवर वायव्येस, मकर, कुंभ या लग्नीं उत्तरेस, मीन लग्नीं ईशान्येस याप्रमाणें बाजेचें ठिकाण जाणावें व सहा, तीन, नऊ, बारा या स्थानातील राशीवरून बाजेच्या पायाची कल्पना करावी स्पष्टीकरण —ह्या श्लोकात बाळतिणीच्या खोलींत बाज कोठें असेल आणि बाजेचे पाय कसे असतील याचे विवेचन आहे पण तें अगदींच सामान्य आहे बाळतखोलींत बाज असणार याबद्दल वाद नाहीं पण बाजेचे पाय किंवा बाज अमुक दिशेस हें सांगण्यात फारसें वैशिष्ट्य नाहीं

चन्द्रलग्नान्तरगतैर्ग्रहैः स्युरुपसूतिकाः ॥
बहिरन्तश्च चक्रार्द्धे दृश्यादृश्येऽन्यथापरे ॥ ७५ ॥

अर्थ —चंद्र व लग्न यांच्यामध्ये जितकी ग्रहसंख्या असेल तितक्या उपसूतिका जाणाव्या त्यांत दृश्यार्धांतील संख्या बाहेरच्या व अदृश्यार्धांतील संख्या आतल्या उपसूतिका जाणाव्या ( कांहीं याच्या उलट मानतात ) स्पष्टीकरण —सूतिकेच्या जवळ प्रसूतिकालीं किती स्त्रिया असतील त्याचे योग यात दिले असून हे योग कुंडलींतील दृश्य भाग आणि अदृश्य भाग यावर बसविलेले आहेत पण याचा सध्या फारसा उपयोग नाहीं

लग्ननवांशपतुल्यतनुः स्याद्वीर्ययुतग्रहतुल्यतनुर्वा ॥
चन्द्रसमेत नवांशपवर्णः कादिविलग्नविभक्तभगात्रः ॥ ७६ ॥

अर्थ —लग्नाच्या नवमांश स्वामीप्रमाणें किंवा कुंडलींत जो ग्रह बलवान् असेल त्याप्रमाणें बालकाचें शरीर जाणावें चंद्र ज्या नवमांशीं असेल त्या नवमांश स्वामीप्रमाणें शरीराचा वर्ण जाणावा. त्याचें इतर

अवयव उदित राशीच्या व इतरराशीच्या ऱ्हस्वदीर्घादि प्रकाराप्रमाणें जाणावें. स्पष्टीकरणः—जन्मणाऱ्या व्यक्तीच्या ऱ्हस्व, दीर्घ शरीराचा विचार यांत आहे. ( लग्नीं अनिष्ट पापग्रह किंवा त्याची दृष्टि असता शरीर कृश असतें. ) यासंबंधीचे अनेक योग निरनिराळ्या ग्रंथांत आहेत.

कन्दृक् श्रोत्रनसाकपोलहनवो वक्रंच होरादयः ।
ते कंठांसकबाहुपार्श्वहृदयक्रोडानि नाभिस्तथा ॥
बस्तिः शिश्नगुदे ततश्च वृषणावूरू ततोजानुनी ।
जंघांघ्रीत्युभयत्र वाममुदितैर्द्रेष्काणभागैं स्त्रिधा ॥ ७७ ॥

अर्थः—शिर, नेत्र, कर्ण, नासिका, गाल, हनुवटी व मुख हा प्रथम द्रेष्काण होय. कंठ, खांदे, दंड, कुशी, हृदय, उदर व नाभी हा दुसरा द्रेष्काण होय. बस्ती, शिश्न, गुद, वृषण, मांड्या, गुडघे, पोटऱ्या व पावलें हा तिसरा द्रेष्काण जाणावा. उदित चक्रार्धास डावें व अनुदित चक्रार्धास उजवें अंग असें म्हणतात. खुलासाः —लग्नाचा पहिला द्रेष्काण तें शिर, दुसऱ्या स्थानाचा पहिला द्रेष्काण तो उजवा डोळा, तिसऱ्या स्थानाचा पहिला द्रेष्काण तो उजवा कान, चवथ्या स्थानाचा पहिला द्रेष्काण ती उजवी नाकपुडी, पाचव्या स्थानाचा पहिला द्रे. तो उजवा गाल, सहाव्या स्थानाचा पहिला द्रेष्काण तो हनुवटीचा उजवा भाग आणि सातव्याचा पहिला द्रेष्काण हें मुख होय. याचप्रमाणें १२व्या स्थानापासून डावीकडील भाग जाणावें. लग्नाचा दुसरा द्रेष्काण तो कंठ (व मान) दुसऱ्या स्थानाचा दुसरा द्रेष्काण तो उजवा खांदा, तिसऱ्या स्थानाचा दुसरा द्रेष्काण तो उजवा दंड, चवथ्या स्थानाचा दुसरा द्रेष्काण ती उजवी कुशी पांचव्या स्थानाचा २रा द्रेष्काण तें उजव्या बाजूकडील पोट व सातव्या स्थानाचा दुसरा द्रेष्काण ती नाभी होय. याचप्रमाणें १२ व्या स्थानापासून डावीकडील भाग जाणावें. लग्नाचा तिसरा द्रेष्काण तो बस्ती ( ओटी पोट ), दुसऱ्या स्थानाचा तिसरा द्रेष्काण तें गुह्येंद्रिय, तिसऱ्या स्थानाचा तिसरा द्रेष्काण तें गुद, ' चवथ्या स्थानाचा तिसरा द्रेष्काण तो वृषण, पाचव्या स्थानाचा तिसरा द्रेष्काण त्या मांड्या, सहाव्या स्थानाचा तिसरा द्रेष्काण तो गुडघा, सातव्या स्थानाचा तिसरा द्रेष्काण पोटरी व पाऊल, हे सर्व उजवीकडील भाग जाणावें, व १२ व्या स्थानापासून डावीकडील भाग जाणावें. स्पष्टीकरणः—ह्या श्लोकांत द्रेष्काण परत्वें शरीराच्या अवयवांचें वर्णन आहे. त्याचप्रमाणें कुंडलीतील उदित चक्रार्धास डावें अंग आणि अनुदित चक्रार्धास उजवें अंग अशी विभागणी केली आहे. त्या त्या स्थानांवर चिन्हादि असतात.

तस्मिन् पापयुते व्रणं शुभयुते दृष्टे च लक्ष्मा(।)दिशेत् ।
स्वक्षांशे स्थिरसंयुते च सहजः स्यादन्यथागन्तुकः ॥
मन्देऽश्मानिलजोऽग्निशस्त्रविषजो भौमे बुधे भूभवः ।
सूर्ये काष्ठचतुष्पदेन हिमगौ शृंग्यब्जजोऽन्यैः शुभम् ॥ ७८ ॥

अर्थः—वर जे भाग सांगितलें त्या भागांत जर पापग्रह असेल तर त्या अवयवावर जखम ( व्रण ) होतें व शुभग्रह असेल किंवा त्याची दृष्टि असेल तर तीळ, मासा वगैरे खूण असते. ग्रह जर स्वराशीचा व स्वनवमांशीचा किंवा स्थिर राशीचा व स्थिर नवमांशाचा असेल तर जन्मतःच खूण असते व तसा नसेल तर ती पुढें होते शनीच्या योगानें दगडानें किंवा वातव्याधीनें.—मंगळाच्या योगानें अग्नि, शस्त्र किंवा विष यांपासून, बुधाच्या योगानें जमिनीवर पडून किंवा ढेकूळ वगैरेपासून, सूर्याच्या योगानें काठ व चतुष्पाद जनावरें यापासून आणि क्षीण चंद्राच्या योगानें शृंग जनावरापासून व जलचरांपासून व्रण होतो. गुरु, शुक्र व पूर्ण चंद्र यापासून व्रण न होता तीळ वगैरे खुणा होतात. स्पष्टीकरण.—कोणत्या शरीर विभागावर कोणत्या ग्रहयोगामुळें कोणत्या खुणा, चिन्ह, व्रण, तीळ, इत्यादि असतील त्याचा निर्णय ह्या श्लोकांत दिला आहे, स्यांत नवमांशपरत्वें फल सांगितलीं आहेत.

समनुपतिता यस्मिन्भागे त्रयः सबुधाग्रहाः ।
भवति नियमात्तस्यावाप्तिः शुभेष्वशुभेषु वा ॥
व्रणकृदशुभाः षष्ठे लग्नात्तनौ भसमाश्रिते ।
तिलकमसकृद्दष्टः सौम्यैर्युतश्च स लक्ष्मवान् ॥ ७९ ॥

अर्थः—राशीच्या ज्या द्रेष्काण भागीं बुधासह तीन ग्रह असतील, त्या द्रेष्काणानें दर्श विल्या जाणाऱ्या शरीराच्या भागावर शुभग्रहांनीं तिळ, मसादि व्रण व अशुभग्रहांनीं व्रण निश्चयानें होतात षष्ठ स्थानीं व लग्नीं असलेला पापग्रह शुभग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असेल तर द्रेष्काणानुरूप अवयवाच्या ठिकाणीं तीळ, मसा अशा प्रकारची व्रण असेल व एकटा पापग्रह असेल तर जखम असेल. स्पष्टीकरणः—शुभग्रहाच्या योगानें शरीरावर तिलादिव्रण आणि पापग्रहाच्या योगानें व्रण इत्यादि उत्पन्न होतात. अशा योगांचे दिग्दर्शन मात्र असून, षष्ठ स्थानातील पापग्रहानें जखम होतें असें दिलें आहे.

वियोनिजन्मविज्ञानं निषेकोदयजं फलं ॥
जन्मकालपरिज्ञानं यत्तदाचार्यभाषितम् ॥ ८० ॥

अर्थः—वियोनि जन्माचें ज्ञान, आधानफल व जन्मकालज्ञान याविषयीं जे आचार्यांनीं सांगितलें तेच मी येथें सांगितलें आहे. ( असें ग्रंथकार म्हणतो. ) खुलासा.—कित्येक " आचार्यभाषितम् " याचा अर्थ " वराह मिहिरानें सांगितलेलें असाही करितात

---

# अथ वियोनिजन्माध्यायः ३.

( वसन्ततिलका )

क्रूरग्रहैः सुबलिभिर्विबलैश्च सौम्यैः
क्लीबे चतुष्टयगते तदवेक्षणाद्वा ।
चन्द्रोपगद्विरसभागसमानरूपं
सत्त्वं वदेद्यदि भवेत्स वियोनिसंज्ञः ॥ १ ॥

अथ वियोनिजन्माध्यायो व्याख्यायते ।

विविधयोनीना तिर्यक्स्थावरादीना जन्म तद्वियोनिजन्मा कालात्मा विधातैव व्यञ्जयति । तथा च सारावल्याम्—

" समभिव्यनक्ति देवः स्थावरजङ्गमं यथा लोकम् ।
कालनिमित्ताकारैर्देशेन च तत्पपञ्चोऽयम् ॥ " इतिः ।

अथ क्रूरग्रहैरित्यादि । क्रूरग्रहैर्बलयुतैर्बलहीनै सौम्यैश्च चन्द्रोपगतद्वादशभागसमानरूप सत्त्व प्राणिन वियोनिजन्मान वदेत् । स द्वादशांशोऽपि वियोनिश्चेत्तदैव वियोनिजन्म वक्तव्यम् न नरभागेनेत्यर्थः । कीदृशोऽसौ सकश्चन्द्रो द्वादशांश एतदुक्तभवने इत्युक्तत्वात्पुष्ट वा सुस्थित नष्ट वा वदेदित्युक्त भवति । जन्माधानयो प्रश्ने चैतदुपयुज्यत इति सिद्ध भवति । तथा च सारावल्याम्—

" आधाने जन्मनि वा प्रश्ने वा द्वादशांशके चंद्रः ॥
यस्मिन्नवस्थितस्तस्य लग्नतोपक्रमसमं सत्त्वम् ॥ " इति ।

लग्नमित्युत्तरश्लोकगतमत्राप्यादेयमथवा स लग्नराशिर्वियोनिसंज्ञश्चेद्बुधमन्दे केन्द्रगते तदवेक्षणाद्वा तयोर्बुधमन्दयोर्लग्नराशाववेक्षणादिति । लग्नराशेः सिद्धत्वाच्च इति लग्नराशिरप्याभिप्रेतस्तथा च सारावल्याम्-

" क्रूरैः सुबलसमेतैरितरैर्निर्बलैर्वियोनिलग्ने ।
सौम्यार्किभ्यां केंद्रे दृष्टे चाभ्यां वियोनिः स्यात् ॥ " इति ।

विबलैश्च सौम्यैरित्युक्तत्वादर्थात्सबलैः सौम्यैर्मनुष्यजातयोऽभ्यूह्याः । तथा च कृष्णीये---

" प्रायेण शुभा बलिनो मानुषचिंतां तदाश्रयैं कुर्यात् ।
देवानामुच्चगतानां लयेषु नीचेषु नारकीयाणाम् ॥ " इति ।

तदाश्रये मनुष्यराश्याश्रय इत्यर्थः । अथार्थान्तरम् । 'चन्द्रोपगद्विरसभागसमानरूपम्' रसभाग-षष्ठांशः द्वौ रसभागौ षष्ठांशौ राशेस्त्र्यंश इत्यर्थः । द्रेष्काण इति सिद्धं भवति । तेन समानरूपम् चन्द्रोपगते-द्रेष्काणसमानरूपमुत्तरश्लोके । लग्नं च वियोनिसंभवमित्युक्तत्वात प्रश्नलग्नद्रेष्काणसमानरूपं वा वदेत् । एतच्चौराद्याकृतिभोजनप्रश्ने मोक्तुराकृतिं च वदेत् ।

" यादृग्भवति विलग्ने द्रेष्काणो भवति तादृशश्चौरः ।
केंद्रगतो वा यादृग्ग्रहस्तु तादृग्विनिर्देश्यः ॥ " इति ।

अथार्थान्तरम् ।

चन्द्रोपगतद्रेष्काणरूपं सत्त्वं वदेदिति । चौरापहृतद्रव्यांतर्गतद्रव्यं वदेदित्यर्थः । धातुमूलेषु यद्द्रव्यधारी द्रेष्काणस्तद्द्रव्य नष्टं वा चिन्तितम् । इति तथा च कृष्णीये---

" दण्डामिषयष्टिधराः शाखाफलमूलधारिणश्च तथा ।
द्रेष्काणा धान्यकरा वृक्षसमीपाश्रिताश्चैव ॥ " । इति

'तदवेक्षणाद्वा' इत्यत्राप्यर्थान्तरमस्ति तदिति क्रूरसौम्यविषयस्तुशब्दः क्रूरसौम्यविलक्षणात्तदुक्तधातु-मूलजीवनष्टमुष्टिचिन्तावगन्तव्यम् ।

तथा च कृष्णीये---

" चंद्रारोरगसौरैर्धातुं मूलं किलार्कशुक्राभ्याम् ।
जीवो जीवबुधाभ्यां होराचार्या वदन्त्येवम् ॥
द्विपदचतुष्पदविहगाः संकुलपापाश्च चिन्तिता ज्ञेयाः ।
द्रेष्काणसदृशरूपा ग्रहरूपाद्वा बलं ज्ञात्वा ॥ "

'चन्द्रोपगद्विरसभागसमानरूपम्' इत्यत्र चन्द्रोपगद्विरसभागमिति वक्तव्ये समानशब्दप्रयोगेनैव सोऽर्थः सूचितः । मेषदादशांशे द्रेष्काणे वा मेषसामान्यं चतुष्पदमपि वदेदिति । मयाहृतावारुतादिभि-र्दृष्टश्रुतैः समानत्वमूह्यम् । नागरारण्यजलस्थमनुष्यचतुष्पदविहगसरीसृपराशिग्रहवशात्निरूप्य वदेदिति सूचितं समागम शब्देन

## ( वैतालीयम् )

पापा बलिनः स्वभागगाः
पारक्ये विबलाश्च शोभनाः ।
लग्नं च वियोनिसंज्ञकं
दृष्ट्वात्रापि वियोनिमादिशेत् ॥ २ ॥

पापानां स्वभागगत्वं सौम्यानां परभागगत्वं च बुधचन्द्रोभयुष्टभागिपतिरेनित्वं च पूर्वश्लोकादस्य श्लोकस्य विशेषः । 'लग्नं च वियोनिसम्भवम्' इत्यत्र पूर्वश्लोकचन्द्रद्वादशांशकस्य वियोनि संज्ञितं लग्नं

दृष्ट्वा चापि वियोनित्वेन न केवलं वियोनिर्वलं दृष्टम्। गुरुदेवशास्त्रसेवापरिशुद्धबुद्धिर्देश कालावस्थानुरूपं वदेत्। ' लग्नं च वियोनिसंभवम् ' इत्यत्र वियोनिलग्नं च वियोनिसंभवं च वियोनेः संभवानां चेति लग्नं दृष्ट्वेति। यथा मेषस्योष्णशाकलघुभोजनं संचारशीलत्वं चिह्नितशिरस्त्वं, जलभीरुत्वं लोके दृश्यते। तथा सर्वेराशीनामाकृतिस्वभावानभ्यूह्य वदेत् इति। तथा च सारावल्याम्—

" मेषतदंशे छागादिप्रसवमाहुराचार्याः।
ततो महिषाणां शने रूपाणां तृतीयेंऽशे॥
तद्वच्चतुर्थभागे कुर्मादीनां भवेदुदग्जानाम्।
व्याघ्रादीनां परतः परतोंऽशे वारणादीनाम्॥
वणिगंशे नररूपं वृश्चिकभागे तथैव भुजगाद्यम्।
नवमे मृगादिमीनास्तथा दशमे ज्ञेयाश्च॥
तत्र च वृक्षा गुल्मास्तृणजातयश्चित्राः।
एकादशे नृपपुंसं मत्स्या नानाविधाश्चान्त्ये॥ २॥ " इति।

( उपभातिः )

क्रियः शिरो वक्त्रगले वृषोऽन्ये
पादांशकम्पृष्ठमुरोऽथ पार्श्वे।
कुक्षिस्त्वपानांघ्रयथ मेढ्रमुष्कौ
स्फिक्पुच्छमित्याह चतुष्पदांगे॥ ३॥

मेषः शिरः वक्त्रगले द्वितियः पादांसकमित्याद्येकैकपादोक्ता मेषादिचतुष्पदांगानि। अपानांघ्रि इत्येकवद्भावः मेढ्रमुष्कौ स्फिक्पुच्छम् इति। तथा च सारावल्याम्—

" मुर्द्धनि मेषो वृषभो मुखगलयोरंशपार्श्वयोर्मिथुनम्।
पृष्ठे चोरसि कर्को हरिश्च पार्श्वद्वये युवती॥
तौलिः कुक्षौ कीटश्चापमपानांघ्रयोर्मेढ्रमुष्कयोर्मकरः।
स्फिचि पुच्छे घटमीनौ राशय एवं चतुष्पदाङ्गेषु॥ " इति।

कुक्षिस्त्वत्र तु शब्देनार्थान्तरं सूचितम्। मेषादितुलान्ता दक्षिणभागे स्थिताः मीनादिवृश्चिकान्ता वामभागे गतास्तथा च सारावल्याम्—

" मेषादयस्तुलान्ता सौम्ये भागे चतुष्पदाङ्गेषु।
वामे त्वनिमिषघटमृगकार्मुकभवृश्चिकाश्रित्याः॥

तु-शब्देनान्यदर्थान्तरमपि सूचितम् पश्वादीना सप्तराशिः शिरसि परिकल्प्य चतुष्पदांगेषु शुभाशुभं चिन्त्यम्। अंघ्रयथेत्यत्राथशब्देन चतुष्पदानामंघ्रिवलं नवमराशिना चिन्त्यम्। मेढ्रमित्युक्तस्थाने चतुष्पदांगानां योनिश्चिन्त्यते॥ ३॥

लग्नांशकाद्ग्रहयोगेक्षणाद्वा
वर्णान्वदेद्बलयुक्ताद्वियोनौ।
दृष्ट्या समानां प्रवदेत्स्वसंख्यया
रेखां वदेत्स्मरसंस्थैश्च पृष्ठे॥ ४॥

लग्नाधिकाद्वियोनौ शुक्लादिवर्णान्वदेत् तथाच सारावल्याम्—

" मेषादिभिरुदयस्थैरंशैर्वा ग्रहयुतैश्च दृष्टैर्वा ।
स्वं स्वं वर्णं ब्रूयात् गात्रे वर्णं व्रणं चापि ॥ इति ॥

रक्तः श्वेतः इत्यादिना राशिवर्णः। रक्तश्याम इत्यादि ग्रहवर्णः अथवा लग्नांशनवांशद्वादशांशात् वर्णान्वदेत् जातिभेदाद्वदेत् । तथा चोराणा बिलवासिनामुच्यते । वृश्चिकनवमांशे वृश्चिकद्वादशांशेच लग्नस्थे वल्मीकादिवासिनां जन्म-वक्तव्यम् ॥ एवमन्येषां राशीनां स्वस्वस्थानजातानां सत्त्वानां स्वसदृशानांच जन्म वक्तव्यम् । तथाच सारावल्याम् ।

" वृश्चिकभवने लग्ने तन्नवभागेऽथवा द्विरस संज्ञे ।
बिलवासिनां प्रसूतिं चोराणां निर्दिशेत्तत्र ॥
गोधानां सर्पाणां लोमशानां शल्यकानांच ।
मूषिकबिलेशयानां राजिमतांचैव कीटानां ॥
तूलानां नकुलानां वृश्चिक षड्बिंदुजाल वृकाणांच ।
अविषाणां सर्पाणां संग्रामनिवासिनां चैव ॥
मृगमकरे लग्नस्थे तन्नवभागेऽथवापि सूर्यांशे ।
आरण्यानां सूतिं सत्त्वानां निर्दिशेत् क्रमशः ॥
नागानां खड्गानां वृकसंभववराहाणां च ।
ऋक्षोमशृगालानां भवेन्नृशंसानां सूतिः ।
मीने मीनांशे वा सज्ञे सूर्यांशकेऽपि वा लग्ने ।
गुरु दृष्टेऽपि ज्ञेया बहूदकोत्थास्तथा सत्त्वाः ॥
मेषे मेषांशे वा भौमेन निरीक्षिते सदा जातिः ॥
वृषभे च वदेत्तद्वत् गोमहिषाद्याः सदा भृगुणा ॥
स्वं स्वं पूर्ववल्लिग्नं स्वैः स्वैर्दृष्टेपि वा भवति ।
स्वभवनसदृशान् सत्त्वान् प्रवदेदविशंकितं तत्र ॥
ग्राम्यग्रहेषु नवांशाः पंचदशमाष्टराशि संयुक्ताः ।
आरण्यानां सूतिं ग्राम्येषु विनिश्चितां कुर्युः ॥

[illegible] स्वकीयं लग्नं कुर्वन्ति । लग्नादात्मवर्णादिग्रहदृष्ट्या विशेषेणवर्णान वदेत् । " [illegible] ग्रहयोगेक्षणाद्वा इत्युक्तग्रहपलस्यान्वये वर्णितोऽर्थः । कथंचहुषु गरवेषु विरम्पिते ध्येको निर्धार्यते । उच्यते नामनिरूपणात्कथं नामनिरूपणमिति चेत्तदप्यनेनैव कथ्यते । लग्नात्कादूदयेगेक्षणाद्वा वर्णान्वदेत्सामाराक्षराणिवदेदुल्लेखन-वादयक्षराणि शास्त्रेनिगोक्तानि--

" आद्वेदशानि युगाभिवर्णयन् पंचवर्णाय चतुष्टयत । क्रमेण मेषादिषु योजनीय . द्वादशतु षष्ठे भगणागमले ॥
एतत् अन्यथा चोक्तम्--

इति शब्दाक्षराणि द्विविधान्युक्तानि ।

त्रिंशद्द्वामित्रायणी मीनाजाद्युत्क्रमेत्क्रमात् ।
कन्या सिंहांतिके मेषे चतुर्विंशद्यथाक्रमं ॥
तुला दि पट्कं पुनरपि द्विवारं योजयेन् बुधः ।
षड्विंशतिप्रमाणेषु वर्णसंमिश्रितैर्दर्शी ॥

अथ ग्रहक्षाणि--

" आई उए ओ भृतावर्णाः सप्तवर्गाश्च सस्वराः

क्रमादकार शुक्रज्ञ जीवार्कादूरगात्मकाः । इति ।

यो ग्रहो लग्नं पश्यति तत्रस्थितोहि तद्वर्णादिनष्टमुष्टिचिंतादिषु नामाद्यक्षरमूह्यम् । राशिवशान्नामाक्षरसंख्या-

त्र्यक्षरंतुचरे राशौ स्थिरेतु चतुरक्षरम् ।

उभये (द्विःस्वे) वर्णत्रयं विंद्यान्नामभेद समन्वितम् ॥

दृष्ट्या समान मित्यादि यावतो ग्रहा बलं लग्नं पश्यति तावन्तो वियोनि लग्नगतान् वदेदिति । यत्रयत्र संख्या करणमिष्यते तत्रतत्र संख्यामनेन वदेदिति । नष्टद्रव्यसंख्या वा लाभद्रव्यसंख्या वा सर्वसंख्या पुत्रसंख्या वा यत्नेन वक्तव्या । यावद्भिः किरणैर्ग्रहो लग्न पश्यति तावतीं संख्यां वदेत इति ।

तथाचोक्तम् । " यावतो वीक्षते पुत्रगृहं पुत्रकास्तु तावत " । रेखावदेत् स्मरसस्थैश्च पृष्ठे सप्तमस्थैश्च पृष्ठे सप्तमस्थैर्ग्रहैर्वियोनौ पृष्ठे रेखा वदेत् ॥

उदयर्क्षान्चंद्रर्क्षं भवति तु यावद्दिनैस्तु तावद्भिः ।

आगमनं स्याच्छत्रोर्मध्ये यदिनग्रह· कश्चित् ॥

याप्रमाणें बृहज्जातकात वियोनिजन्माध्यायातील महत्वाचा भाग आहे ह्या प्रकरणातील आणखी पुष्कळसें विवेचन स्थलसंकोचास्तव येथें देता येत नाहीं त्यातील मथितार्थ वरील श्लोकावरून लक्षात येईल सौरमानाप्रमाणें दिनादि घ्यावें असें पुढील व्यवस्थेंत दिलें आहे.

## भविष्य–दिग्दर्शनाचें अत्यंत महत्त्वाचें साधन-आधानकाल.

फलज्योतिषग्रंथामध्यें फलादेशासंबंधींचें जें विवरण आहे तें बहुधा जन्मलग्न कुंडलींतील ग्रहस्थिती व योगाचें आधारें सांगितलेलें असतें. आणि शेंकडा नव्याण्णव हिस्शानें त्या प्रकारानेंच फलें पाहिलीं जातात. फलादेशाचा आणखी सूक्ष्म आणि जन्म कुंडलीपेक्षांही अति महत्त्वाचा प्रकार आहे. तो प्रकार म्हणजे आधानकालीन सूक्ष्म कुंडलीतील ग्रहावरून फलादेशाचा व भवितव्यतेचा निर्णय करणें हा होय

आधानकुंडलीवरून सबंध ह्यातींतील शुभाशुभ आणि सुखदुःखात्मक भविष्यनिर्णयाचें विधी त्या फलज्योतिष ग्रंथात संपूर्ण तऱ्हेनें सांगितलें नसलें तरी अशास्त्मक रीतीनें तें दिलेलें आहे शिवाय जन्मकालीन ग्रहपरिस्थितिप्रमाणें जे परिणाम घडावयाचे असें विधिलिखित, त्या परिणामाचा व विधिलिखिताचा मुख्य आधार किंवा मूळ पाया म्हणजे आधानकाल हा होय अर्थात् जन्म कुंडलींतील ग्रहाचा जी फलें व्हावयाची त्याचें जन्मकालच्या ग्रहाचीहि होणार यात शंकाच नको. आधान काल म्हणजे बीजारोपण किंवा गर्भस्थापनेचा काल जर नसेल तर त्याचें रोप येणें, वृक्ष होणें इत्यादि सर्व गोष्टी असंभवनीय ! त्याप्रमाणें बीजारोपणच जर नसेल तर जन्म होणेंहि अशक्य म्हणून बीजारोपण काल किंवा आधानकाल यालाच खरें प्राधान्य आहे.

तथापि आधानकाल निश्चितपणें सांपडण्याचे बाबतीत निरनिराळ्या तऱ्हेच्या अडचणी आहेत आणि सध्याच्या स्वैराचरणाच्या काळात तर आधानकालाची निश्चिती फारच अनिश्चित अशी आहे शिवाय केवळ स्त्री पुरुषाच्या संयोगक्षणालाच आधानकाल म्हणावयाचे किंवा स्त्रीपुरुषाच्या संयोगक्षणानंतर काही कालानें आधानकालाचा क्षण येतो–असू शकतो याबद्दलही मतभेद आहेत त्यांत पुष्कळांची समजूत अशी असते किंवा आहे की, संयोगकाल हाच आधानकाल. पण खरी स्थिति अगदीं निराळी आहे

या बाबतींत अनेक सन्मान्य डॉक्टर आणि प्रसिद्ध वैद्य यांशीं वाटाघाटी व सूक्ष्म दर्शनिक विचार विनिमय आम्ही केला आहे आणि त्यावरून असें निष्पन्न झालें आहे कीं, संयोगकालानंतर आधानकाल हा १० तासां पर्यंत असूं शकतो. जीवधारण करणाऱ्या बिंदूचा गर्भस्थान प्रवेश होणें हा आधानकाल जीव धारण करणारा तो रेतबिंदु स्त्रीपुरुषांच्या संयोगस्पर्शी गर्भाशय प्रवेश करतोच असें नाहीं. संयोगक्षणापासून बारा तासापर्यंतच्या कोणत्याही क्षणी ... [illegible] प्रारब्धाप्रमाणें तो जैविक स्वरूप धारण करण्याकरितां गर्भाशयात प्रवेश करतो .

व मूळ ग्रंथ याजवरून येणाऱ्या काळात कोठपर्यंत अंतर क्षम्य मानलें जातें याचें वाचक अनुमान करितीलच. या पचांगचिंतामणि सारणीचा मूळ ग्रंथ सर्वानन्दकरण. या ग्रंथाप्रमाणें येणारे तिथ्यादिकांचे समाप्तिकाळ व या सारणीवरून येणारे काळ, यात या वरील सारण्यांच्या अंतरापेक्षा पुष्कळच कमी अंतर येतें, हें गणित करून पाहणारास तेव्हांच समजून येईल. सारणीवरून केलेल्या गणितात कांहीं पळांच्या अंतरानें घटीपळादि काळ येणें हें वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें अगदीं साहजिक आहे हें कोणासहि कळेल. तथापि या सारणींत सूक्ष्मतेकरीतां जितकी जास्त सूक्ष्मता आणता येईल तितकी आणलेली आहे आणि म्हणूनच ह्या सारणीवरून येणारीं घटीपळें इतर सारण्यांच्या मानानें पुष्कळच सूक्ष्म येतात, हें गणकांच्या लक्षात येईल. १ वर्षाचें पचांग तयार करण्यास त्यास गणिताचा चांगला अभ्यास आहे अशा गणकास ह्या सारणीवरून फारच थोडा वेळ लागतो. एका गणितज्ञानें यावरून पचांग केलें त्यास ७२ तासांपेक्षा अधिक वेळ लागला नाहीं असा अनुभव आहे. सतत ७२ तास गणित करण्यास तशीच तयारी लागते हें खरें, तथापि सर्व सामान्यतः यावरून गणित करणारास २ आठवड्यांत पचांग करता येईल यात शंका नाहीं. सारणीच्या रचनेंत तिथिचिंतामणीचीपद्धत अनुसरली आहे, म्हणून वर्षाच्या तिथि, नक्षत्रें व योग स्वतंत्रपणें काढता येतात. तिथि काढली नाहीं म्हणून नक्षत्र काढिता येत नाहीं किंवा योग काढिता येत नाहीं अशी अडचण या सारणींत पडत नाहीं, त्यामुळें वेळही कमी लागतो.

या सारणीवरून स्पष्टसूर्य व स्पष्टचंद्र थोड्या श्रमानें काढता येतात व त्यामध्यें दोन तीन कलांपेक्षा जास्त अंतर येत नाहीं ही गोष्ट पडताळून पाहण्यासारखी आहे. ग्रहलाघवात चंद्राचा केवळ एकच संस्कार असल्याकारणानें व तोही स्थूलच असल्याकारणानें, तिथिचिंतामणीवरून फार थोडक्या वेळात वर्षाचें गणित करिता येतें हें खरें, परंतु त्या गणितात १०।१०, १५।१५ घटिकांचें अंतर पडतें करिता त्याच्याशीं तुलना करण्यात अर्थ नाहीं व अशा तुलनेचें कांहीं महत्त्वही नाहीं. ही सारणी सूक्ष्म गणिताप्रमाणेंच होणें अवश्य व त्याप्रमाणें मीं या पचांगचिंतामणींत सूक्ष्मता साधिली आहे, असें गणित करणाऱ्याच्या लक्षात येईल. पचांगकर्त्यांनीं व ज्योतिषविषयाच्या अभ्यासेच्छूंनीं याप्रमाणें गणित करून आपआपला अनुभव कळविल्यास त्याचा अवश्य विचार करीन व माझ्या देखत दुसऱ्या आवृत्तीचा सुयोग आल्यास त्याप्रमाणें कांहीं सुधारणाही करीन.

विशेष.—हिंदुलोकांस जातक व मुहूर्त या करितांच मुख्यत्वेंकरून पचांग पाहिजे. रेवतीच्या वैजयन्ती तारेजवळ सूर्य असता वसंतसंपात होत असे त्या काळाच्या सुमारास मुहूर्तग्रंथ व जातकग्रंथ रचिलेले आहेत. यामुळें वैजयन्ती पक्षाचें पचांग मुहूर्तजातक ग्रंथांस कसें अनुकूल व त्याशीं कसें सुसंबद्ध आहे याचें विवरण " महाराष्ट्रीय पचांगैक्य मंडळ, पुणें, प्रथम अधिवेशनाचा वृत्तांत, शके १८४७ " या पुस्तकात पृष्ठ ११५ वर दिलें आहे तें पहाण्यासारखें आहे.

तसेंच वेदात गाई व वाज म्हणजे अन्न यांचे महत्त्व फार वर्णन केलें आहे. वेदकाळीं गवामयन नांवाचा दीर्घकाळ चालणारा यज्ञ करीत असत यामुळेंही तें लक्षात येण्यासारखें आहे. " तैत्तिरीयब्राह्मणा "च्या तृतीयकांडात नक्षत्रांचे " पुरोऽनुवाक्य व याज्यावाक्य " असे मंत्र दिले आहेत त्यांत " गावो नो अश्वान् अन्वेतु पूषा " म्हणजे रेवती नक्षत्राची देवता पूषा ही आमच्या गाई व अश्व यांचे रक्षण करो. व पुष्टिपति पशुपा वाजवत्यौ " म्हणजे रेवती व त्याची देवता पूषा हे पशूंचे रक्षक व अन्नद देणारे आहेत असें सांगितलें आहे. पुढें महाभारतकाळीं ही विराटाच्या गाई वळवून नेण्याकरितांच कौरवांनीं युद्ध केलें. यावरून गोधनाचें महत्त्व आपल्या शास्त्रात व आपल्या पूर्वजांनीं किती मानिलें आहे तें सहज लक्षांत येतें.

याकरितां सर्व गोरक्षकांनीं व गोभक्तांनीं रैवत पक्षाचेंच शुद्धपचांग मानणें उचित आहे व तेंच त्यांना श्रेयस्कर होणार आहे हें निराळें सांगण्याचें कारण नाहीं.

ह्या पचांगग्रंथांत सर्वानन्दकरणांतील वेदांगमंजरी हें प्रकरण पहाण्यासारखें आहे.

मु० उज्जयिनी गो. स. आपटे.

# प्रकाशकाचे दोन शब्द.

शुद्धपचांगाची चळवळ सुरू झाल्यापासून एका अत्यंत महत्त्वाच्या गोष्टीची अडचण वारवार भासत होती. ती गोष्ट म्हणजे शुद्धपचांगसाधन सुलभसारिणी ही होय जुन्या पद्धतीच्या अनेक ज्योतिष्यांशीं पचांगविषयक चर्चेच्या व विचारविनिमयाच्या प्रत्येक प्रसंगीं त्यांच्याकडून अशी अडचण दाखविण्यात येई कीं, शुद्धपचांगाची सारणी नाहीं सारणीवरून पचांग गणित लवकर व सुलभतेनें होते आणि अशी सुलभता आणल्या खेरीज शुद्धपचांग करण्यास ज्योतिषी व पचांगकर्ते धजावणार नाहीं. कोणत्याही करणग्रंथावरून पचांग तयार करण्याचें काम अतिशय त्रासाचें, जिकीरीचें व परिश्रमाचें असल्यामुळें बहुतेक ज्योतिषी सारणीवरूनच पचांग तयार करतात याकरिता शुद्धपचांगाची सारणी तयार करावी म्हणजे त्या सारणीप्रमाणें गणित करण्याकडे ज्योतिष्यांची प्रवृत्ति होईल

वास्तविक जुन्या ज्योतिषांची ही तक्रार खरी आहे हें तेव्हांच सिद्ध झालेल आहे कीं, ज्यावेळीं ग्रहलाघवासारखा ग्रथ तयार असताना जुन्या पद्धतीनी पचांगें तयार करण्याकरिता तिथिचिंतामणि सारणी निर्माण करावी लागली व ग्रहलाघव करणग्रंथावरून गणित करावयाचें सोडून सर्व ज्योतिषी तिथिचिंतामणी सारणीवरूनच पचांग गणित करू लागले ! आणि ही गोष्टही तितकीच खरी आहे कीं, कोणत्याही करण ग्रंथावरून (व अर्थात् ग्रहलाघवादि करणग्रंथावरून) पचांग करण्यास लागणाऱ्या परिश्रमाच्या मानानें सारणीवरून पचांग करण्यास पुष्कळ कमी श्रम व थोडा वेळ पुरतो सारणीचे गणित सामान्यत सूक्ष्म असते पण अतिसूक्ष्म नसते असें जरी आहे तरी सध्या अखिल हिंदुस्थानात प्रसिद्ध होणारी सर्व जुनी पचांगें कोणत्या ना कोणत्यातरी सारणीवरूनच केली जातात. आणि याकरिताच शुद्धपचांग तयार करण्यास उपयुक्त अशी ही सारिणी अत्यंत प्रयासपूर्वक तयार केली गेली आहे

आमचे सन्माननीय सन्मित्र, उज्जयिनीच्या माधव कॉलेजचे प्रिन्सिपाल व श्रीशिवाजी वेधशाळेचे सुपरिंटेंडेंट श्रीयुत रा रा. गोविंद सदाशिव आपटे एम् ए बी, एस्, सी याचा ज्योतिषशास्त्राचा अलौकिक व्यासग, त्या शास्त्रांतील पारंगतता, ग्रथकर्तृत्व, वेधज्ञान, आणि पौर्वात्य व पाश्चिमात्य अशा दोन्ही कडील ज्योतिषविषयक सिद्धांत रहस्याचें पूर्ण परिशीलन इत्यादि अनेक गोष्टींमुळें प्रिन्सिपाल आपटे यांचें नाव व कीर्ति आज सर्व हिंदुस्थानभर गाजत आहे प्रिन्सिपाल आपटे याच्या योग्यतेच्या व्यक्ति ज्ञाताच्या बोटावर मोजण्याइतक्याच निघतील प्रिन्सिपाल आपटे याचा ज्योतिषविषयक व्यासग सतत कमींतकमी ४० वर्षांपेक्षा जास्त आहे व त्यांनी मुंबई, पुणें, सागली इत्यादि ठिकाणीं भरलेल्या ज्योतिष परिषदांतून आपल्या ज्ञानाचा फायदा सर्वांस दिलेला आहे अशा तज्ज्ञ, ज्योतिषविषयांत पूर्ण मुरलेल्या व जन्मभर त्याच व्यासग केलेल्या प्रसिद्ध विद्वान् ज्योतिषाचार्यांकडून ही पचांगचिंतामणी सारणी तयार झाली हे खरो-खरच लोकांचे व विशेषत पचांगकर्त्या ज्योतिष्यांचे सुदैव होय

ही सारणी तयार करण्याबद्दल प्रिन्सिपाल आपटे याच्याशीं आमची वरीच वाटाघाट होऊन सारणी तयार करण्याचें ठरलें व त्याप्रमाणें त्यांनीं सारणी तयार केली इतकेंच नव्हे तर सारणीचें बाबतींत वेळो वेळीं आम्ही ज्या ज्या सूचना केल्या त्या सर्वांचा त्यांनीं विचार करून त्यांचा सारणींत समावेश केला. याबद्दल त्यांचे जितके आभार मानावें तितकें थोडेंच आहेत

सारणीवरून पचांग करणें जितकें सुलभ व सोपें आहे त्याच्यापेक्षा हजारों पटीनें सारणी तयार कर-ण्याचें काम कठीण, दुर्घट, गहनतर व दीर्घपरिश्रमाचें आहे ही गोष्ट तज्ज्ञानाच कळण्यासारखी आहे अशा तऱ्हेची दुर्घटस्थिति व पाठीमागें शेंकडों कामांचा व्याप अशा परिस्थितीत त्यांनीं दगदगीची, श्रमाची, परिश्रमाची किंवा काठिण्याची यत्किंचित् पर्वा न बाळगतां, अत्यतिक नि स्वार्थबुद्धीनें पण आत्मीय भाव नेनें "केवळ लोककल्याणार्थ" ही सारणी तयार केली त्या प्रिन्सिपाल आपटे याचे आभार कोणत्या शब्दानीं

मानावें ! खरोखर त्याच्या कार्याच्या व परिश्रमाच्या मानानें त्याचे कितीही गौरवपूर्वक आभार मानले तरी ते अपुरेंच पडणार ! इतकें मोठें, महत्कार्य त्यांनीं केलें आहे.

प्रिन्सिपाल आपटे यांनीं फक्त येवढी एकच सारणी तयार केली असे नव्हे तर ह्या सारणीच्या पूर्वी त्यांनीं अत्यत महत्त्वाचा असा " सर्वानंदकरण " या नावाचा करणग्रंथ तयार करून तो प्रसिद्धही झाला आहे. ह्या ग्रंथाबद्दल हिंदुस्थानातील प्रमुख विद्वानांनीं त्याचें अभिनंदन केलें आहे. सर्वानंदकरण ग्रंथातील गणित अत्यंत सूक्ष्म असूनही त्यातील गणितपद्धति ग्रहलाघवासारखीच अंगिकारली असल्याने जुन्या पद्धतीनें पंचाग गणितकारासही तो ग्रंथ म्हणजे अगदीं अमूल्य ठेवा असा वाटेल. प्रि. आपटे यानीं बऱ्याच वर्षांपूर्वी केलेला ज्योतिर्गणित वार्तिक नावाचा ग्रंथही प्रसिद्ध आहे. सर्वानंदकरणात ते म्हणतात " **रैवतपक्षस्य श्रेष्ठता निःसंशयं प्रसिध्यति । शास्त्रोक्तायाः क्रांतिवृत्तनिष्ठरेवतीतारायाः श्रेष्ठता ममतु निर्धारितैव । अस्मिन् करणे तस्यावैजयंतीसंज्ञा कृता पाश्चात्यनक्षत्रपटेपुच सा झीटापिशियमे नाम्ना प्रसिद्धा । अस्य ग्रंथस्यादिमे लाघवाभिखंडे पूर्वग्रंथाभ्यासपरिचित गणितप्रकारा एवोपयोजिताः ।** अशा प्रकारचा गणित सूक्ष्मता साधलेला व ग्रहलाघवपद्धतीचा ग्रंथ झालेला नाहीं. इतक्या विविधप्रकारानें सबंध जन्मभर ज्योतिपशास्त्राची सेवा केलेल्या ज्योतिषाचार्यांच्या ह्या कृतीचें महत्व किती आहे हें नुसत्या शब्दांनी वर्णन करणें अशक्य आहे. "विद्वानेवविजानाति विद्वज्जन परिश्रमं" हाच यातील सिद्धांत.

प्रिन्सिपाल आपटे यांनीं प्रस्तावनेंत आमचे बरेंच आभार मानलें आहेत. तो भाग आम्हास गाळूनही टाकता आला असता पण त्याच्यापैकीं कोणताही भाग गाळावयाचा नाहीं असें आम्ही त्याच्याशी ठरवूनच ही सारिणी छापली असल्याने तो भाग कायम ठेवला. प्रि. आपटे याच्या प्रस्तावनेंतील आमच्यासंबंधींच्या उद्गाराबद्दल आम्ही इतकेंच म्हणतो कीं, त्यात प्रिन्सिपाल आपटे याचें सौजन्य, सहृदयता आणि कोणत्याही कार्यकर्त्याविषयीं त्याच्या मनांत असलेले आत्यंतिक प्रेम, सद्भावना विनय ह्याच गोष्टी व्यक्त होत आहेत. सारणीचें प्रकाशन जर इतकें अभिनंदनार्ह व गौरवार्ह आहे तर खुद्द सारणी व सारणीकर्ता याचें अभिनंदन व गौरव किती तरी अनंतपटीनें केला पाहिजे. त्याची योग्यता किती अलौकिक व उच्चदर्जाची आहे हें लक्षात येण्यास त्यास हिऱ्याचीच उपमा शोभेल. अत्यंत तेजस्वी व प्रकाशमान हिऱ्याची अलौकिक उच्चता स्वयंभु असते. तो हिरा एखाद्यानें प्रकाशात आणला म्हणून त्या प्रकाशनात आणणाऱ्याचें महत्त्व जास्त असें कधींच होऊ शकत नाहीं; आणि म्हणूनच प्रिन्सिपाल आपटे यांनीं पंचागचिंतामणिरूपी शुद्धकालदर्शक व धर्मोपयोगी प्रकाशमान तेजस्वी हिरा जनतेला सादर करण्यासाठीं प्रकाशनात आणण्याकरिता आमचे जवळ दिला याबद्दल पुनः एकदा त्यास शतशः धन्यवाद देतो व त्याचे मनःपूर्वक आभार मानतों.

भाद्रपद शु. ४<br>शके १८५५

रघुनाथशास्त्री पटवर्धन

# ॥ पंचांगचिंतामणिः ॥

प्रणम्य शर्वं सुलभप्रसादं दृक्सिद्धसंस्कारकलापशुद्धम् ॥
करोति गोविंदसुगण् सुबोधं पंचांगचिंतामणिकोष्टसंचयम् ॥ १ ॥
रसाक्षिध्रत्यूनशकः समौघस्तेनाद्यकोष्ठात् ध्रुवकान् विलिख्य ॥
१८२६
प्रचाल्य गत्यात्रिकशुद्धिकेंद्रशताल्पवर्पाधिपतीन् लभस्व ॥ २ ॥
शततष्टाः शताल्पांकाः स्युरथाब्दमुखे गताः ॥
तिथयोभानि योगाश्च मेषार्के शुद्धिसंज्ञकाः ॥ ३ ॥
द्वितीयकाद् भोग्यकलाजवेन तिथ्यादिकालान् कुरु भोग्यकाख्यान् ॥
संयुक्तरेखापलकान्निरेकवारान्निधेहीष्टकभोगसंज्ञान् ॥ ४ ॥
" रेखास्वस्थितिमध्ययोजनानि स्वांध्र्यूनानि पलैस्तुतत्प्रमाणैः ॥
हीनाढ्यं विदधीत वर्पनाथं रेखायाः परपूर्वगे स्वदेशे ॥ ५ ॥" ति. चिं.
अत्राब्दतिथ्यादिकसाधनाय तृतीयगैकैकगतिं सुयुंक्ष्व ॥
मध्येदशानां च गतीर्गृहाण तेनात्र शुद्धा गमका भवेयुः ॥ ६ ॥
केंद्रेण तिथ्याच तुरीयकोष्ठात् शताल्पकेनैव तु पंचमाच ॥
पराख्यनाडीः समवाप्य युद्क्ष्व पष्ठात्तिथेर्भस्य युतेर्दिनादि ॥ ७ ॥
तुर्याप्तहारेण तिथेर्युजश्च सिध्यं फलं सप्तमतो गृहाण ॥
हारांककोष्ठांकसमानचिन्हे स्वमन्यथर्णं कुरु तत्पलेपु ॥ ८ ॥
काला एते मध्यमाख्याश्चरपंचपलैर्युताः ॥
व्यस्तवेलांतरेणाऽपि स्युः स्पष्टास्तपनोदयात् ॥ ९ ॥
" चैत्रादिर्गततिथयस्तु भोगतिथ्या हीनाः स्युस्तिथिदिनकोष्ठाकाद् द्विधा ते ॥
स्वांगाग्न्यंशकरहिताः क्रमात्स्वदृग्दृग्भागाप्त्या उदुयुतिजास्त्यजेत्तदग्रम् ॥१०॥
उल्लंघ्यचेद्दिवसमेति तिथिः पराह्नं पूर्वेऽन्हिषाष्टिघटिकाः स्युरियं दिनर्द्धिः ॥
एकान्हि चेत्तिथियुगं परनाडिकास्ताः पूर्वोनिताःस्युरिहपूर्वगमात् क्षयोऽयम्॥११॥
भोगेप्सितांगांकयुताद्यकोष्ठा भयोगिताप्तेभयुती भवेताम् ॥
एकैक युक्ता शतिकोष्ठमत्र क्षये च वृद्धौ विधिवद्विधिः स्यात् ॥१२॥ ति. चिं.
हित्वा वेदोद्गीतामिभमन्यर्क्षात् कृता उडुविभागाः ॥
इति ये वदंति तेपामनादरः पूर्ववेदशास्त्रेपु ॥ १३ ॥
तद्दीर्घपुण्यवैदिककालादयनी परंपरावगता ॥
भानुपथे पौष्णान्ते सुदस्या वैजयन्तिकातारा ॥ १४ ॥

तत्तारासंभूताऽयनलवसंशुद्धकोष्ठका एते ॥
युंज्यात्तान् धर्मफलाकांक्षी जातकमुहूर्तनिर्देशे ॥ १५ ॥
अयं चिंतामणिर्ज्योतिःशास्त्रागमलताफलम् ॥
धारणं सेवनं तस्य गणितश्रमनुद् वरम् ॥ १६ ॥
जिनमितयामैः सुगणौ कर्तुमलं निखिलवर्षपंचांगम् ।
चिन्तामणितः पुण्यं सर्वानन्दप्रपोद्भवं वारि ॥ १७ ॥
पूषा गोधनरक्षान्नदेवता तैत्तिरीययाज्योक्ता ।
तस्माद्रैवतपक्षाश्रयेण सुजना अवाप्नुयुः श्रेयः ॥ १८ ॥
जातकमुहूर्तनिगमाः कृता यदा वैजयन्तिका तारा ।
आसीन्मेषादौ तत्फलकांक्षी रैवतं च सेवेत ॥ १९ ॥

आदौ प्रथम कोष्ठकाच्छुद्धिं रेखापलसंस्कृतमब्दपं च संसाध्य द्वितीयकोष्ठकान्मेष संक्रमाहतिथिभयोगभोगान्नाम तत्समाप्तिकालानानयेत् । चैत्रादेर्वर्तमानतिथिपर्यंतं तिथियस्तिथिशुध्या विहीनाः कार्याः । शेषतिथिषु तृतीयकोष्ठात्पगमकगतीर्युक्त्वाऽभीष्टतिथ्यंतगमकान् प्रसाधयेत् । अनन्तरं चतुर्थपंचमषष्ठसप्तमकोष्ठाश्रयेण यथोपादिष्टं पराख्यानानीय निरेकतिथिभयोगभोगेषु तान् संयुज्य च स्पष्टसमाप्तिकालान् प्राप्नयात् । अथ मेषयाततिथयो द्विः स्थापिता एकत्र स्वषट्त्रिंशद्भागेनराहिता अन्यत्र स्वद्वाविंशतिभागेनान्विताश्च क्रमेण मेषयातनक्षत्राणि मेषयातयोगाश्च भवन्ति । तेषु नक्षत्रयोगशुद्धियोगेन वर्तमाननक्षत्रयोगौ प्राप्येते । ताभ्यां तृतीयकोष्टाद्गतीरानीय नक्षत्रयोगशुद्धिगमकेषु योजयेत् । एवमाप्तगमकैश्चतुर्थादिकोष्ठेभ्य उक्तवत्तयोः समाप्तिकालानानयेत् । एते काला मध्यमाख्यास्तेषु कोष्ठकाष्टमात्प्राप्तान् कालसंस्कारान्युक्त्वा स्पष्टसूर्योदयात् कालांल्लभेत ।

अधुना मेषार्कादि सायनमेषस्यैकोनविंशतिरंशाः प्रयांतीति स्मृत्वेष्टतिथिकालसंस्कारानष्टमकोष्टकान्निश्चिनुयात् । मेषयाततिथयः स्वचतुस्त्रिंशदंशरहिता द्व्यूनाश्च निरयणार्कांशा भवन्ति । तेष्वयनांशयोजनेन सायनसूर्यः सिद्ध्यति । यद्यप्ययमर्को न सूक्ष्मस्तथापि कालसंस्कारसिद्ध्यर्थं स एवालं स्यात् ।

कोष्टकांतील—शके १८२६ चे गमक घेऊन त्यात इष्ट शक १८२६ नून वजा करून येणाऱ्या वर्षांच्या गती मिळवाव्या. त्यात इष्ट स्थळ उज्जनीच्या पश्चिमेस असल्यास रेखांतर पळें वजा करावीं. पूर्वेस असता मिळवावी. म्हणजे अब्दप झाला अब्दपातून १ वार कमी करून तो निरेक करावा. तिथिशुद्धि, केंद्र, शताल्यार व निरेकअब्दपात ( वा. घ प. यांत ) तिथि पूर्ण होण्यास लागणाऱ्या अक्षादिकाने को. २ मधून पळ मिळवावे म्हणजे मेषार्क तिथ्यंतांचा निरेक तिथिभोग झाला.

याप्रमाणें कोणत्याही इष्ट दिवसानें किंवा सबंध वर्षानें शुद्धपंचांग करें करावयानें याबद्दलचीं पुढें अनुक्रमानें नियम १ पासून नियम १५ पर्यंत दिलें आहेत व त्यांची समजूतही दिली आहे, शिवाय कोष्टकाचे अखेरीस प्रत्यक्ष तिथिनक्षत्रयोगाची उदाहरणें करून दाखविलीं आहेत त्यावरून संपूर्ण रीति लक्षांत येतील.

संपत्तीचा वाढता झरा सतत चालू आहे व संतती ऐश्वर्य, मान, अधिकार, वाहनें, नोकर वगैरे सर्व सौख्य असून सध्यां वार्षिक १ लाखाचे उत्पन्न आहे.

कुंडली क्रमांक ५.

## आयुष्यांतील ठळक गोष्टी.

ह्या कुंडलीच्या व्यक्तीचा द्रव्ययोग असा कांहीं दांडगा आहे कीं त्याला खळ म्हणून पडत नाहीं. उठतां, बसतां, जातां, येतां, द्रव्याच्या राशीच्या राशी पुढें येऊन पडणारा असा जबरदस्तयोग व्यवहारांत पडल्यापासून आज तागायत एकासारखा चालू आहे. ह्या व्यक्तीचे आयुष्य अत्यंत सुखमग्न आणि विशेषतः सांपत्तिक व मानमान्यतेच्या बाबतींत इतके उत्तम गेलें आहे कीं, श्रीमान् व धनिक अशा अनेक लोकांत यांचा नंबर बराच वरच्या दर्ज्याचा लागेल. नियमितपणा, कार्यक्षमता, श्रमसाध्य कामाची आवड, एकमार्गी आणि मनावर कसल्याही शुभाशुभ गोष्टींच्या परिणाम न होण्या इतकी मनाची तयारी अशा वृत्तीची व प्रवृत्तीची ही व्यक्ति आहे.

पेशवाई गेल्यानतरच्या ३०।४० वर्षांच्या अवधींत ज्यांच्या उदयकालाला इंग्रजी शिक्षणाच्या वैशिष्ट्यानें एक प्रकारचा तजेला उत्पन्न झाला त्या काळच्या लोकांपैकीं ही एक व्यक्ति असून इंग्रजी शिक्षणाचा यांनीं पुरा फायदा घेतला व त्या काळच्या मानानें मोठे पदवीधर झाले. अर्थात्च अशा पदवीधरांच्या मागें लागणारी वरिष्ठअधिकाराची रौप्यशृंखलाही याच्या गळ्यांत आपोआप पडली आणि क्रमाक्रमानें उदयकालाला जास्त जास्त भरती येऊ लागली. यांच्या वयाच्या ५० वर्षापर्यंतचा काळ आणि त्यानंतरचा काल याचा विचार केला असतां यांच्या पूर्वकालापेक्षा उत्तरवयांतच सर्व प्रकारच्या ऐश्वर्याचा,साधनांचा,सुखसोईंचा आणि सांपत्तिक सुखासीनतेचा रंग चढला.

प्रापंचिक दृष्ट्या याना अत्यंत उत्तम असाच काल गेला. स्त्री, संतति, नातवंडें आणि आप्तवर्ग या दृष्टीनें कसलाही कमीपणा न राहतां समाजांत, कुटुंबात आणि प्रातांत यांनीं आपलें नाव अजरामर करून ठेवलें आहे.

कुंडली अनुक्रमांक६.

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

ह्या कुंडलीच्या व्यक्तीचा नशिबाचा भाग असा काहीं विलक्षण आहे कीं संपत्ति म्हणजे यांच्या घरीं क्षणोक्षणी शुक्लपक्षातील चंद्राप्रमाणें मोठ्या प्रमाणांत सारखी वाढत आहे. जे काम हातांत घ्यावें त्यात यश आणि विशेषतः द्रव्याचा भरपूर लाभ असा याच्या ग्रहांचा गुण आहे. ह्या कुंडलीचे वैशिष्ट्य आणि मातब्बरयोग म्हणजे प्रथमतः दत्तकयोग हा होय. आयुष्याच्या पूर्व वयात म्हणजे १८।२० वर्षांच्या वयापूर्वी याचे दत्तविधान झालें. व्यापारी वृत्ति, व्यापारी पेशा आणि जन्मतः व्यापारी गुणधर्म यांमुळें याच्यात व्यापारी जीवनाचा, जणु आदर्शच असा प्रकार दृष्टीस पडतो. अगदीं साधी राहणी, लहानथोरांपैकीं कोणाशीही वागण्यात अत्यत नम्रपणा, निर्व्यसनी, लोकांस मदत करण्याची तयारी,

घस सोसूनही सार्वजनिक कामाकडे व दानधर्माकडे द्रव्याचा व्यय करण्याची इच्छा व कृति यामुळें या व्यक्तीचे चारित्र्य मोठे नामी झालेले आहे. या व्यक्तीच्या शिक्षणाचा विचार केला तर त्या बाबतींत गौणत्वच आहे. इंग्रजी शिक्षणाचा संस्कार बिलकुल झालेला नसून दत्तक वडील इंग्रजी शिक्षण घेणें म्हणजे भयंकर पाप समजत होते व त्यानींच इंग्रजी शिक्षणास प्रतिबंध केला. तथापि या व्यक्तीची बुद्धि तलख आणि व्यापार धंद्यांतील हातोटी चांगली साधली असल्यानें केवळ आपल्या नैसर्गिक बुद्धि सामर्थ्यावरच यानीं आपला कर्तृत्वाचा गाडा हाकला व त्यांत पूर्ण यश मिळविले.

समाजांत, राजदरबारांतील मोठमोठ्या अधिकाऱ्यांत आणि देशांतील पुढाऱ्यांत यांचे सर्व प्रकारें चांगलें वजन आहे. त्याचप्रमाणें निरनिराळ्या मोठ्या पेढ्या, सार्वजनिक संस्था, बँका, मार्केटें, लोकप्रतिनिधींच्या सभा, आणि प्रातिनिधिक सभा म्हणजे ज्या ज्या ठिकाणीं मोठ्या प्रमाणावर पैशाच्या उलाढाली आहेत व ज्या ठिकाणीं प्रतिनिधिक सत्ता केंद्रीभूत होत आहे त्या ठिकाणीं यांचा सहजसाध्य प्रवेश व अधिकार आहे. यामुळें ज्याप्रमाणें प्रमुख व्यापारी, कोट्याधीश–लक्षाधीश कारखानदार, गिरण्यांचे मालक याच्याशी यांचा जिव्हाळ्याचा संबंध आहे त्याचप्रमाणें उच्च दर्जाचे वरिष्ट अधिकारी आणि राजकारणांतील, समाजकारणातील, धर्मकारणांतील पहिल्या प्रतीचे पुढारी–मग ते कोणत्याही पक्षातील असोत–यांचा सलोख्याचा व मित्रत्वाचा संबंध आहे. आणि म्हणूनच सर्व पक्षांतील लोकांना याच्या मैत्रींत भूषण वाटते.

यांच्या धर्मकारण विषयक वृत्तीचे विवरण करावयाचें म्हणजे हे कहे, धर्मनिष्ठअसून अनाथ अपंगांनां मदत करण्याकडे यांचे अधिक लक्षअसते. गरीब, अनाथ व निराश्रित अशांच्या सोईकरितां यांनीं मदतीच्यारूपानें व दानधर्माच्या स्वरूपात लक्षावधी रुपये दिले आहेत. सर्व महत्वाच्या कार्यांत व सार्वजनिक योग्य संस्थांचे बाबतींतही यानीं पुष्कळ सहाय्य केलेले आहे.

लौकिक आणि मानमान्यता यात यांचा दर्जा वरच्या प्रकारचा आहे. पुढारीपणाच्या यादींत यांचे नांव कायमचे आहे. येवढेंच काय पण कोणत्याही कार्यांत सर्वारंभास्तंडुला: प्रस्थमूला: म्हणून प्रारंभ करावयाचा झाल्यास तो याच्याकडूनच केला जातो आणि त्यामुळें बाकीचे काम सुलभ होते. उच्च प्रतीचा लोकसन्मानही याना मिळाला आहे.

प्रापंचिक सुखाच्या दृष्टीनें सर्वसंपन्नता आहे. आप्तवर्ग, जातभाई, स्त्री, पुत्रसंतती, कन्यासंतती इत्यादि सर्व गोष्टींचें सुख असून बागबगीचे मळे, जमिनी, बंगले, गांवें, घरें, कारखानें, यसाहत्ती, हजारों नोकर चाकर, इत्यादि भौतिक सुखाच्या सर्व गोष्टीं अनेक मोटारींच्या वाहनांसह राजेरजवाड्यांना शोभेल अशा दर्जाच्या आहेत.

ह्या व्यक्तीच्या आयुष्यांतील एकंदर सांपत्तिक परिस्थितीचा विचार आणि पूर्व भाग, मध्यभाग, आणि उत्तर भाग हे तिन्ही भाग लक्षांत घेतले तर इतकेंच सांगतां येईल कीं ज्या वेळीं दत्तक गेले त्यावेळीं ४०।५० हजारांची इस्टेट होती ती यांच्या ४० चाळीसीच्या पुढें ५०।६० लाखांची झाली आणि वार्षिक उत्पन्नही असेंच लक्षावधी रुपये आहे. इतकें तीव्र सांपत्तिक ग्रहयोग या कुंडलींत प्रबल आहेत.

कुंडली अनुक्रमांक ७
शके१८१७ कार्तिक शु १
सू. प्राक् घ ४ प.५६

## आयुष्यांतील विशेष गोष्टी.

ह्या कुडळीच्या व्यक्तीचे दैवयोग फार निलक्षण आणि चकित करणारे असें आहेत. "पुरुपस्य भाग्य" किंवा दैवाधीन जगत् सर्व म्हणतात ते अक्षरश खरें आहे हे ह्या कुडळीच्या अनपेक्षित ऐश्वर्य योगावरून दिसून येतें. पुरुप कर्तृत्वालाही नशिबाचीं जोड इतकेंच नव्हे तर मुख्यत नशीबाची जोड असेल तरच कर्तृत्वाला तजेला व यश येतें. ही गोष्ट अनेक नशीबदार व्यक्तींच्या कुडल्यावरून स्पष्ट दिसून येते. असाच प्रकार ह्या व्यक्तींचा आहे जन्मकालीन स्थिति अत्यत सामान्य व गरीबीची असता दत्तक योगाचा सुप्रसग अशा अचानक रीतीनें व एका परमश्रेष्ठ पुरुपाच्या कृपेनें आला कीं, हजारों रुपयाच्या वार्षिक उत्पन्नाच्या इस्टेटीचे मालक बनले व त्यावरोबरच सर्व प्रकारचे ऐश्वर्यही लाभले वयाच्या १२ वर्षांच्या आत झालेला दत्तकयोग आणि त्या वेळेपासूनच सर्व प्रकारच्या ऐश्वर्याचे स्वामित्व हा योग सामान्य नव्हे ! ह्या कुडलीतील ह्या दत्तक योगाच्या विशेष प्रकारामुळें अर्थातच स्थावर, जमीन जुमला, घरें, बगीचे, बगलें, सर्व प्रकारचीं वाहनें, अमूप सपत्ति, श्रीमान्, जहागिरदार, धनाढ्य अशांची अत्यत मैत्री आणि तशाच थाटाच्या व दर्जाच्या घरदाज घराण्यातील स्त्रीशीं विवाह, राज दाजदरबारांत मानमान्यता, वरिष्ठ व उच्चस्थानीय अधिकाऱ्याचे साह्य, लोकाकडून सन्मान व वरिष्ठ दर्ज्याचे माननीय स्थान, अशा सर्व गोष्टी लाभल्या तरीही विधेमध्यें पदवीधर होतां आलें नाहीं ही गोष्ट ध्यानात ठेवण्यासारखी आहे एका अलौकिक पुरुपाच्या हालअपेष्टानीं व कष्टानीं ह्या दत्तकयोगस्थानाचा कायमपणा आला असें साह्य लाखों रुपये खर्च करूनही न मिळणारे पण तें पूर्व कर्म प्रारब्धानें लाभले ॥

कुडली अनुक्रमाक ८
शके १८०१ आश्विन शु ६

## आयुष्यातील विशेष गोष्टी.

ह्या कुडलीची व्यक्ती देखील दत्तक योगाचींच आहे यांची जन्मकाळाची सापत्तिक स्थिति साधारणच होती । शिक्षणाच्या दृष्टीनें म्हणण्यासारखा कोणताही जोर नाहीं, परतु नैसर्गिक बुद्धिमान, व्यवहारचतुर, एक मार्गी आणि कर्तव्यनिष्ठ, मातापित्याची यत्किंचितही अवज्ञा न करण्याचा निर्धार आणि परमेश्वरावर पूर्ण निष्ठा अशा परिस्थितींत दत्तक जाण्याचा योग जमून आला आणि दत्तक गल्यानतर दत्तक घराण्यातील व्यवहार, सपत्तिची उलाढाल, मोठमोठे व्यवहार यात यांच्या चातुर्याची व व्यापारी सूक्ष्मबुद्धिमत्तेची चागलीच पारख होऊन "बापापेक्षा बेटा सवाई म्हणतात" त्याप्रमाणें ह्या व्यक्तीचे एकदर समाजावर, जातीवर आणि शिष्टविशिष्ट प्रमुख लोकावर चांगलें वजन बसलें पुढें हळूहळू वाढत्या पायरीच्या चढत्या चढावानें सपत्ति, वाहनें, नोकरचाकर मानमतराब, ऐश्वर्य, प्रापचिकसौख्य, लोकानुकूल्य व राजानुकूल्यता इत्यादि सर्व प्राप्त झालें

## विलक्षण उलथापालथ करणारी चमत्कारिक ग्रहयोग कुंडली.

शके १८१० वैशाख शु. १३ भौमे सू. ग. घ. ४२ प. १३ समये जन्म अक्षांश १७-४३ ता. २४।४।१८८८ रात्रौ १०॥ वा.

कुंडली क्रमांक ९

ग्रहांचे अंश

| ल. | र | च. | मं. | बु. | गु. | शु. | श. | रा. | के. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ध. | मे. | कन्या | कन्या | मी. | वृश्चि | मी | कं. | कं | म. |
| १५ | १५ | २४ | २७ | २९ | १६ | २६ | १२ | ९ | ९ |

हर्शेल कन्या २६ वक्री नेपच्यून वृषभ १०.

## -आयुष्यांत घडलेल्या गोष्टी व त्या सुमाराची ग्रहस्थिति.

पहिली बहीण मृत सन १८८९, बहीणीचे डोळे गेले, ( चुकून औषध भलतेंच घातलें गेल्यामुळें ) १८९०. भावाला वेड लागलें १८९१.

**रहातें घर जळालें, जन्मगांवी १८९२** ( ग्रहस्थिति ३१ डिसेंबर १८९१ रोजीं, गुरु कुंभ २५, शनि कन्या ११॥, राहु वृषभ ५॥ ) -

**वडिलांवर भयंकर संकट, फौजदारी होण्याचा प्रसंग व भयंकर फसवणूक. ५००० रु. नुकसान. लेखांकडून मदत १८९३.** ( ग्रहस्थिति २ जानेवारी १८९३ रोजीं, गुरु मीन २७॥, शनि कन्या २४, राहु मेष १६. )

**वेड लागलेल्या भावाकडून वडिलांस कुऱ्हाड मारण्याचा प्रयत्न व याच वर्षी आईस वेड. १८९४** ( ग्रहस्थिति ७ जानेवारी १८९४ रोजीं, गुरु वृषभ ३।, शनि तूळ ६।, राहु मीन २६॥ )

**वडिलांचा मृत्यू १८९५ फेब्रुवारी.** ( ग्रहस्थिति ता. ९ फेब्रुवारी १८९५ रोजीं, रवि कुंभ २, चंद्र कर्क २३, मंगळ वृषभ०, बुध कुंभ २०, गुरु ( व ) मिथुन ८.। शुक्र कुंभ १९, शनी तूळ २० राहु मीन ५ )

**उपनयन, मोठी बहिण व आईचा मृत्यु १८९७ डिसेंबर** ( ग्रहस्थिति ता. ९-१२-९७ रोजीं, रवि वृश्चिक २९, चंद्र, वृषभ २७, मंगळ वृश्चिक २४, बुध धन १५, गुरु. कन्या १९, शुक्र वृश्चिक १२, शनी वृश्चिक १६ राहु मकर ११

दुसरी बहीण मृत सन १८९८. चुलत्याकडे विद्या वगैरे १८९९ व १९०० (वडिलांच्या पश्चात् चुलत्यांनीं पालन केलें ) शिक्षण सुरू १९०१.

वेडा भाऊ मृत १९०२ ( ग्रहस्थिति. ता ९ जानेवारी १९०२ ची. ) गुरु मकर ४॥ शनि मकर ।-, राहु तूळ २१॥.

तीन बक्षिसें ( शाळेंत ) १९०३ ग्रहस्थिति ता. २९ डिसेंबर १९०२ ची. गुरु मकर २९।, शनि मकर ९ राहु तूळ २॥।.

पाळनकर्ते चुलते मृत, फेब्रुवारी १९०५मॅट्रिक परीक्षा पास ( ग्रहस्थिति ता. ४ फेब्रुवारी १९०५ ची ) गुरु मेष ५॥।, शनि कुंभ ३॥।, राहु सिंह २२। कॉलेज १९०६, कॉलेजांतील बक्षिसे १९०६ ते १९०९ ( कॉलेजात असता नेहमीं सेकडक्लास मध्यें पास. )

बी. ए. १९०९ नोव्हेंबर (ग्रहस्थिति ता १३ नोव्हेंबर १९०९ची, गुरु कन्या १७॥।, शनि मीन २९ राहू वृषभ १९॥। )

**कांहीं संबंध नसतां खुनाचे आरोपावरून पकडलें.** मार्च ता. २५ सन १९१० एप्रीलमध्यें जामिनावर सुटका व जूनमध्यें डिसचार्ज जूनमध्यें सुटकेच्याच दिवशीं पुन: पकडलें. फोरजरींच्या आरोपावरून. त्यात आगष्टमध्यें निर्दोषी सोडले. त्याचवेळीं पुन पकडलें. ( ग्रहस्थिति ता. २५ मार्च १९१० ची ) रवि-मीन १५, चद्र-कन्या ६, मगळ-वृषभ १८, बुध-मीन ४, गुरु-कन्या २२, वक्री, शुक्र-कुंभ ३, शनि-मेष ५ राहु वृषभ १३ )

१० हजाराचे जामीन मागितले पण ते देता न आल्यानें एक वर्ष सक्तमजुरी व तुरुगांत रवानगी. त्यावर अपील ता २२ आगस्ट १९१० तोपर्यंत सुमारें २८ दिवस तुरुंगांत ( ग्रहस्थिति ता. २० आगष्ट १९१० ची ) रवि सिंह ७॥, चद्र मकर २८, मंगळ सिंह २०।, बुध कन्या २॥, गुरु २४कन्या, शुक्र १२।कर्क, शनि १८मेष, राहु ५ वृषभ (ता. २१ वक्रीशनी)

**अपिलांत ५०० च्या जामिनावर सुटका**—ता. १६ सप्टेंबर १९१० ( ग्रहस्थिति ता. १९ सप्टेंबर १९१० ची ) रवि कन्या ६॥ चद्र मीन ४॥, मगळ कन्या ९॥, बुध कन्या २०॥। वक्री, गुरु कन्या २९॥।, शुक्र सिंह १९. नतर ब्यांकेंत नोकरी ता २२ आक्टोबर १९१० ( ग्रहस्थिति १८ आक्टोबर १९१० ) रवि तूळ ५।, चद्र मीन २७॥, मगळ कन्या २८॥, बुध कन्या १९, गुरु तूळ ६, शुक्र कन्या २५।, व शनि मेष, १५। वक्री, राहु वृषभ २.

**हायकोर्टांत निर्दोषी.** नोव्हेंबर ता. २७ सन १९१० ( ग्रहस्थिति ता. १ डिसेंबर १९१० ची, रवि वृश्चिक १९। चद्र वृश्चिक १०। मगळ तूळ २८ बुध वृश्चिक २९॥ गुरु तूळ १५। शुक्र वृश्चिक २०॥ शनि मेष १२ (व) राहु मेष २९॥ ब्यांकेची नोकरी सोडून ६० रुपयावर स्कूलमध्यें नोकरी १९११.

फर्स्ट L L B पास **नोव्हेंबर** १९११—( ग्रहस्थिति ता. २० नोव्हेंबर १९११ ) गुरु वृश्चिक ६॥। शनि मेष २७। राहु मेष १०॥।.

**निष्कारण एक दिवस तुरुंगांत ता. २ डिसेंबर** १९११—( ग्रहस्थिती ता. ६ डिसेंबर १९११ ची ) रवि वृश्चिक २४ चद्र वृषभ २३। मगळ वृषभ (व) ९॥ बुध धन १५ गुरु वृश्चिक १०॥ शुक्र तूळ ७॥। शनि मेष २६ (व) राहु मेष १०.

अतिशय दूरचा प्रवास--जानेवारी ते मार्च अखेर १९१२ ( ग्रहस्थिती ता. ४ जानेवारी १९१२ ची ) गुरु वृश्चिक १६॥ शनि मेष २४॥। राहु मेष ८।.

भयंकर आजारी ६ दिवस बेशुद्ध--आगष्ट सप्टेंबर १९१२ ( ग्रहस्थिति ता. २७

आगष्ट १९१२ ) गुरु वृश्चिक १७॥. शनि वृष १५ राहु मीन २५॥ शाळेतील नोकरीतून डिसमिस—आक्टोबर १९१२ दक्षिण महाराष्ट्रामध्यें नोकरी व प्रवास—सन १९१२ आक्टोबर ते १९१३ जानेवारी.

**सब अकौंटंट.** १५ दिवसांचा टाईफॉईड १९१३ ( ग्रहस्थिति ता. ७ जानेवारी १९१३ ची गुरु धन १२। शनि वृषभ ९, राहु मीन १८॥ ) पुनः शाळेंत नोकरी मास्तर ५० रु. अकौंटंट परीक्षा, घरांतील सर्व लोक प्रतिकूल असतां ११०० कर्ज काढून पुतणीचें लग्न, M. A. परिक्षा ( यईक्लासमध्यें पास ) नोव्हेंबर १९१३, दुसऱ्या दोन परिक्षा सन १९१३ ( ग्रहस्थिति ता. १३ नोव्हेंबर १९१३ ची. ) गुरु धन २६। शनि वृषभ २८ राहु मीन २।. )

**व्यापाऱ्याकडे नोकरी**—१२० रु. पगार डिसेंबर १९१३. ( ग्रहस्थिति ता. १३ डिसेंबर १९१३ ) गुरु मकर २। शनि वृषभ २५॥ राहु मीन ॥.

**त्याच जागेवर पगार**१५० **फेब्रुवारी** १९१४. विवाह ता. २५ मे१९१४ (ग्रहस्थिती ता. २५ मे १९१४ ) रवि वृषभ १४। चंद्र वृषभ १३॥ मंगळ कर्क २३। बुध वृषभ २३॥ गुरु कुंभ ३। शुक्र मिथुन १० शनि मिथुन ॥ राहु कुंभ २२.

एका व्यापाऱ्याच्या सहाय्यानें व्यापारांत सु. ८०० रु. मिळून कर्ज फिटलें. निराळ्या विषय घेऊन पुनः एम्. ए. च्या परीक्षेस बसले, शेवटच्या एका पेपरचें वेळीं आजारी पडल्यानें इतर सर्व पेपर्समध्यें सेकंडक्लास मार्क असूनही M. A. नापास नोव्हेंबर १९१४. मिलमध्यें सेक्रेटरीची नौकरी पगार २२५ रु. आगष्ट १९१४.

**नोकरीचा राजिनामा पण एका संस्थानांत नोकरी रु.** २७५ शाळाखातें. त्याचवेळीं Excise चें काम शिकणें. त्यात यश व गुरु कुंभ ॥ शनि मिथुन १९॥ राहु कुंभ ११।

**मार्च एप्रील मे जून** १९१५ चौकशी कमिशन बद्दल २५०० रु. मिळाले. ( ग्रहस्थिति ता. २९ एप्रील १९१५. गुरु मीन ॥ शनि मिथुन १० राहु कुंभ ४.

नंतर शाळा व एक्साइज अशा दोन्ही खात्यावर नेमणूक ३५०रु. शिवाय एका संस्थानिकांचा प्रायव्हेट सेक्रेटरी म्हणून १०० रुपये जास्त. १९१५.

सर्व तीर्थे व लावचा प्रवास—मार्च सन १९१६अधिकाऱ्याशीं भाडण व मे मध्यें राजिनामा.

नंतर १ महिन्यानें मोठ्या संस्थानांत नेमणूक, पण गेले नाहींत. नंतर पुनः मोठ्या संस्थानांत नेमणूक रु. ५२५. सहा महिन्यानें राजिनामा. सन १९१६ आक्टोबर सुमारे ( ग्रहस्थिति ता. ११ आक्टोबर १९१६ ) गुरु मेष १३॥ शनि कर्क ११ राहु मकर ७.

भागीदारींत धंदा—१९१७ एप्रील ते १९१८ सप्टेंबर. पाऊण **लाख रु. फायदा.** (ग्रहस्थिति ता. ५ जून १९१७ गुरु वृषभ ५॥ शनि कर्क ९ राहु धन २३॥ )

**नुकसान** १॥ **लाख रुपये**—१९१८ आक्टोबर ते १९१९ एप्रील. ( ग्रहस्थिति ता. १९ आक्टोबर १९१८ ) गुरु मिथुन २६॥, शनि सिंह ७।, राहु वृश्चिक २६॥

**व्यापाऱ्याकडून क्रिमिनल, त्यांत पकडणें २ दिवसांनीं सुटलें.** मे. ता. २५ सन. १९१९ (ग्रहस्थिति ता. २९ मे. १९१९) रवि वृषभ १८ चंद्र वृषभ १०।।।, मंगळ वृषभ १३, बुध वृषभ २।।, गुरु मिथुन २७, शुक्र मिथुन २९।।।, शनि सिंह ३।।।, राहु वृश्चिक १५.

**३० हजारांपेक्षांही जास्त देणें व जवळ कांहीं नाहीं**—जून १९१९ (ग्रहस्थिति ता. १३ जून १९१९). गुरु कर्क ५, शनि सिंह ४।।।, राहु वृश्चिक १४।.

**विलायतेस अकस्मात् प्रयाण**—ता. १० आगष्ट १९१९ (ग्रहस्थिति ता. ११ आगष्ट १९१९) रविकर्क २८।।, चंद्र मकर २०।, मंगळ कर्क ३।।, वक्री बुध सिंह ६।।, गुरु कर्क १३।, शुक्र कन्या, ६, शनि सिंह ११, राहु वृश्चिक ११।

विलायतेहून परत—सप्टेंबर १९२०.

कलकत्ता—आक्टोबर, नोव्हेंबर, डिसेंबर १९२०.

दलालीचा-व्यापार धंदा सुरू—१९२१ जानेवारी.

प्रथम संतति सप्टेंबर ता. ४ सन १९२३) ग्रहस्थिति ता. १० सप्टेंबर १९२३ रवि सिंह २८, चंद्र सिंह १६।।, मंगळ सिंह १७, बुध कन्या २३, गुरु तूळ, २६, शुक्र सिंह २७।। शनि कन्या २९।।।, राहु सिंह २२।.

नफा नुकसान चालू तथापि ४५ हजार रुपये कर्ज फेडलें—१९२४ अखेर. धंदा कमी पडूं लागला—१९२५ च्या आरंभापासून. बायको टायफाईडनें आजारी—आक्टोबर १९२५.

हायकोर्ट वकीली पास—१९२६ फेब्रुवारी. (ग्रहस्थिती ता. १२ फेब्रुवारी १९२६) गुरु मकर २० शनि वृश्चिक ६।।।, राहु अर्क ५। Second L. L. B. Pass आक्टोबर १९२६.

नातेवाईक परदेशीं गेला व धंद्यास त्याची मदत झाली.—सप्टेंबर १९२६, बायकोचा मृत्यु. ७ नोव्हेंबर १९२६ (बाळंतीण होऊन मुलासह) (ग्रहस्थिति आश्विन कृ. ३० ता. ५।११।२६) रवि तूळ २३, चंद्र तूळ १६।।, वक्री मंगळ वृषभ २२ बुध वृश्चिक १६।, गुरु मकर २९।, शुक्र तूळ १९, शनि वृश्चिक ८ राहु मिथुन २१

मोटारीचा अपघात. १९२२ सप्टेंबर यांत दुसरे दोघे मेले पण यांस कांहीं झालें नाहीं. झाडावरून पडून अपघात; १८९८, पाण्यांत बुडतांना वांचले १९०२.

विवाहाची तारीख २५ मे १९१४.

प्रथम संतति ४ सप्टेंबर १९२३.

ता. ३१ आक्टोबर १९२६ भाच्याचें ऑपरेशन, ता. ७ नोव्हेंबर १९२६ स्त्रीचा मृत्यु, ता. २३ नोव्हेंबर १९२६ भावजय हॉस्पिटलमध्यें, १६ डिसेंबर, भावजयीस ऑपरेशन. ता. २९ डिसेंबर भावजयीची भयंकर स्थिति.

**सांपत्तिक क्रांतिकारक कुंडली.**

**कुंडली अनुक्रमांक १०**

शके १८११ माघ शु. ५ शनिवार इ. घ. ५ प. ३२

जन्म पुणें ता. २५ जानेवारी १८९०

वयाच्या तीन वर्षांपर्यंत अत्यंत आजारी. वय वर्षे ७ उपनयन. वय वर्षे ८ प्लेग. अगोदर बहीण. ही बहीण वय वर्षे १२।१३ ह्या वर्षी वारली. पाठीवर भाऊ तो जन्मानंतर १ वर्षांनीं मयत.

एकंदर भावंडें ११. बहिणी ४. भाऊ ७. त्यांपैकीं ता. १३।१२।२६ रोजीं हयात भाऊ १ बहिण १.

हयात असलेला भाऊ वकील आहे. आई जिवंत आहे. वडील सन १९०५ जानेवारी ता. १३ रोजीं प्लेगनें वारले. चुलते ३ त्यांपैकीं आज हयात कोणी नाहींत. चुलत्यांचीं नांवें (१) केशव (२) सदाशिव व (३) विष्णु.

नंबर १ चे चुलते सन १८९६ सालीं क्षयानें वारले.

नंबर २ चे चुलते आषाढ ३० च्या सुमारास म्हणजे वडिलांच्या पूर्वी सहा महिने मधु-मेहानें वारले.

नंबर ३ चे चुलते ता. १४ जानेवारी १९०५ रोजीं प्लेगनें वारले.

आत्या २. कुसाताई, ताई.

कुसाताई सन १९१५ सालीं वारली.

मामा ३. रामचंद्र, लक्ष्मण, दामोदर.

दामोदर सन १९१३ मध्यें मयत.

रामचंद्र सन १९१७ मध्यें मयत. (अकस्मात् मृत्यु).

लक्ष्मण सन १९२४ जानेवारीमध्यें मयत.

मावशी २. ताई, बहिणी. आज हयात नाहींत.

विवाह सन १९१० वैशाख शुक्ल पक्ष. सासरची सांपत्तिक स्थिति चांगली. सासऱ्यांचा मुलगा एक, तो सन १९१८ मध्यें मयत. सासरे विवाहापूर्वीच वारले.

मेव्हण्या २; पैकीं थोरली १ इला संतति मुळींच नाहीं. दुसऱ्या मेव्हणीस मुलगा १ व मुलगी १ दोघींची सांपत्तिक स्थिति चांगली.

संतति सन १९२२ व १९२३ गर्भपात व सन १९२४ आषाढ कृ. १४ संध्याकाळीं ७ वा. पुत्रसतति, जन्म खेड जि. पुणें.

अपघात वयाच्या २१ व्या वर्षी म्हणजे सन १९११ डिसेंबरमध्यें यंत्रांत डावा हात सांपडून दोन बोटें गेलीं. सन-१९१६-१७ हीं दोन्हीं वर्षे दातास भयंकर विकार व ऑपरेशन. तेव्हांपासून दाताची व्यथा नाहींशी झाली.

जन्मापासून दिसण्यांत डोळे अधु परंतु दृष्टी चागली.

सन १९२४ एप्रील चैत्र कृ. २ सोमवार सकाळीं ५।६ च्या सुमारास अर्धांगवायूचा विकार. (याच दिवशीं १५० रुपयाची आर्डर (नोकरी) आली) व अंथरुणावर पडून अशी स्थिती पुढें ४ महिनें होती. त्यानंतर हलुहळू प्रकृती सुधारूं लागली.

बायको सन १९२३ मार्च पासून चार महिने तापानें आजारी.

बायको सन १९२६ आगष्ट ते आक्टोबर अखेर गळूं झाल्यानें आजारी. याच वेळीं मुलगाही आजारी होता.

जन्मापासून त्रय वर्षे ३० पर्यंत वडिलार्जित सांपत्तिक स्थिती चागली होती. वय वर्षे ३२।३३ च्या दरम्यान धंद्यांत नुकसान आल्यानें वडिलार्जित इस्टेट विकावी लागली. सन १९१७ नोव्हेंबर वयो वर्षे २७-२८ च्या दरम्यान यांत्रिक धंद्यास सुरवात. वऱ्हाडांत......येथें कापसाची गिरणी.

**सन १९१८ हें सबंध वर्ष अतिशय उत्तम गेलें यांत महिना उत्पन्न सरासरी ७००।८०० रुपये होतें. याच्या इतकें चांगलें वर्ष अद्याप गेलेलें नाहीं.**

सन १९१९ या वर्षांत धंद्याची स्थिति साधारण, महिना उत्पन्न सुमारें २०० रु.

१९२० हें वर्षही १९१९ प्रमाणेंच होतें.

१९२१ मार्च ते सप्टेंबरपर्यंत सुमारें १५००० रुपये नुकसान व विश्वासघातानें फसवणूक. (कृष्ण या नांवाच्या इसमाकडून) **याच वेळीं स्थावर इस्टेट सर्व विकावी लागली.**

सन १९२२-२३ या वर्षाचा सप्टेंबर ते जानेवारी हा काळ साधारण फायदेशीर गेला. महिना उत्पन्न ५० रुपये,

सन १९२४-२५-२६ या वर्षी १९२२-२३ प्रमाणेंच सांपत्तिक स्थिति आहे व मासिक उत्पन्नही तसेंच आहे.

### कुंडली क्रमांक ११

१८०२ चैत्र कृष्ण पक्षे नवम्यां तिथौ मंदवासरे सूर्योदयात् ग० घ. ३८ प. १० समये जन्म—शुद्ध पंचांगाप्रमाणें.

| र. | च. | म. | बु. | गु. | शु. | श. | रा. | ल. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ११ | ९ | २ | ११ | ११ | १० | १० | ८ | ७ |
| २६ | १४ | ७ | १६ | ११ | २९ | ० | २३ | ६ |
| ४ | १२ | २० | ३९ | ५७ | २८ | ५ | ० | ० |

वक्री

ह. ४—१७—८ ने. ०—२२—४२

वडिलांचा मृत्यु ता. २४–८–१९१९ सकाळीं ४ वाजता.
आईचा मृत्यु ता. ३–२–१७ रात्रौ १० वाजता.
लग्न—सन १८९९ एप्रिल अगर जूनमध्यें.
बहिणीचा मृत्यु—खुर्दाद महिना. शेहरवर दिवस सन १९०८ शके १८२९ अ. चै.कृ.
भयंकर नुकसान सन १९१८ व जाने० १९२५
विवाहानंतर ६ महिन्यांपासून आजपर्यंत स्त्रीपासून विभक्त
बहिणीचीं मुलें सभाळलीं आहेत.
इष्टेट बापापासून व स्वत मिळविली आहे. एकंदर आज इष्टेट १० लाख रुपयांची आहे.

### कुंडली क्रमांक १२

वरील गृहस्थांच्या स्त्रीची कुंडली. (शुद्ध पंचांगाप्रमाणें)

स्प. ल. १ २५॥ दशम १० १४

| र. | च. | म. | बु. | गु. | शु. | श. | रा. | ह. | ने. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वृ. | कं. | मे. | ध. | कु | तू | मी. | ध. | सिं. | मे |
| २३ | ८ | २७ | ७॥ | १६ | ॥ | २१ | २९॥ | २१ | २२ |

### कुंडली क्रमांक १३

## श्री स्वामी श्रद्धानंद यांची कुंडली.

शके १७७७ फाल्गुन शु० ३ रविवार ता. ९ मार्च १८५६ सूर्यास्तकालीं जन्म. मृत्यु. ता. २३ डिसेंबर १९२६ दिल्ली शहर.

(ही कुंडली एका गृहस्थानीं पाठविली आहे.)

कुडली नं १४

शके १८२१ कार्तिक शु. १२ भौमे सू ४५।१९

ही कुडली एका श्रीमान् गृहस्थाच्या मुलाची आहे शिक्षणकोर्स डॉक्टरीकडील पूर्ण झाला असून वार्षिक उत्पन्न पूर्वार्जित १५—२० हजाराचें आहे वडील फर्स्टक्लास मॅजिस्ट्रेट आहेत.

कुडली क्रमाक १५

## श्रीनिवास अय्यंगार ( १९२६ च्या ) कांग्रेसचे अध्यक्ष.

शके १७९६ भाद्रपद शु १ शुक्रवार ता ११।९।१८७४

श्रा कृ २० ची ग्रहस्थिति.

| रवि | म | बु | गु | शु | श. | रा |
|---|---|---|---|---|---|---|
| ४ | ४ | ५ | ५ | ६ | ९ | ० |
| २९ | ७ | ० | १८ | १४ | २० | १० |
| १ | ५८ | ५९ | ३३ | ३२ | ३२ | ४० |
| ५८ | ३८ | ११ | १२ | १४ | ३ | ३ |

कुडली क्रमाक १६ कुडली क्रमांक १७

एका संस्थानचे महाराज ता ४।३।१८८३, त्यांची पत्नी ता २६।२।१८९६

पूर्वाषाढा चरण २

विशाखा चरण २

यांची ग्रहस्थिति प्रातिकूल होऊन एकाएकी याना सन१९२४मध्यें सस्थानहान व्हावें लागलें !

कुंडली क्रमांक १८

शके १८१९ चैत्र शु. ८ रात्री ९॥

९ ; ८ शनि ; ७ ; १० रा. ; ६ ; ११ ; ५ गु ; ४ चं के ; १२ र ; २ ; बु १ शु ; ३ मं

**आई**--३ ऱ्या वर्षी वारली.

**वडील वारले**--संवत् १९६४ कार्तिकमास.

**पालनपोषण**--थोरल्या सावत्र बंधूनीं केलें. त्यांचा धंदा सराफी, शेतकी वगैरे. आधी भाऊ ( हयात ), पाठीवर भाऊ ( जन्मत: च मयत ), सावत्र माता. ३; एकंदर भावंडें ६, त्यांत सख्खी ३, सावत्र ३ **जन्मकाळीं सांपत्तिक स्थिति उत्तम**, सुमारें लाख--दीडलाखाची संपत्ति.

**वडिलांचा धंदा**--व्याजबट्टा सरकारी व जमीन. **लग्न**--संवत् १९६८ वैशाख.

**संतति**--प्रथम जुळें. त्या मुली ( जन्मत: मयत ; नंतर मुलगी-(मयत ) मुलगी (हयात) संवत् १९७८. नंतर मुलगी ( हयात ) संवत् १९८०. नंतर मुलगा संवत् १९८२ अधिक चैत्र शु. ३ मंगळवार.

**विद्या**--मराठी ७ इयत्ता.

**धंद्याला सुरुवात**--वयाच्या १८ व्या वर्षापासून किराणा व भुसार. संवत् १९७५ माघ महिन्यांत मोठ्या प्रमाणावर जन्मस्थळाच्या उत्तरेस असलेल्या गांवीं धंदा सुरू. हें वर्ष फायद्याला उत्तम गेलें. मुंबईशीं व्यवहार सुरू.

संवत् १९७६ सालीं कार्तिकांत दागिने वगैरे चोरीचा माल विकत घेतल्याबद्दल स्वत:वर व बायकोवर फौजदारी फिर्याद. त्यांत ४।५ हजार रुपये नुकसान. ही फिर्याद भागीदार असलेल्या पण त्याचा भाग काढून टाकलेल्या इसमानें केली. फिर्यादीचा निकाल ३ महिन्यांनीं होऊन निर्दोष. या प्रकरणाचे वेळीं स्वजातीय व परजातीय मंडळी--विशेषत: शत्रुत्वकरणाऱ्यांची व अधिकाऱ्यांचीही खरा गुन्हेगार शोधण्याचे कामीं मदत झाली. व फिर्यादीवर व फौजदारावर खोटी फिर्याद दिल्याबद्दल रुकार मिळाला.

जन्मापासून घरात वाहनें, घोडे, गाडी, जनावरें वगैरे सर्व आहेत, पण संवत् १९७५ मध्यें घोडे विकले. १९७७ संवत् व्यापारास मध्यम गेला.

१९७८ मार्गशीर्षापासून नुकसानीला आरंभ. १९७९ साधारण. १९८० साधारण बरें. १९८१--१९८२ हीं वर्षें भयंकर नुकसानीचीं गेलीं.

५--६ हजार नुकसान. या खेरीज घरच्या देवघेवीच्या व शेतकीच्या धंद्यांत संवत १९७८ ते १९८२ पर्यंत सुमारें १५--२० हजार नुकसान झालें. संवत् १९७५ ते ८२ पर्यंत

सुमारें २५।३० हजार रुपये कर्ज झालें. त्यातच लोकाकडे येणें असलेले पैसेही बुडाले. आणि सापत्तिक नष्ट काळ आला.

१९७९ जमीन खरेदी २५००—गिरणी खरेदी ५०००. या वेळेपासून रोकडीस ओहोटी लागली.

**बायको प्लेगनें भयंकर आजारी.** सवत् १९७२.

१९७९ मध्यें दुसऱ्यावर पैसे वसुलीकरिता फौजदारी केली. ती हायकोर्टपर्यंत गेली व आपसात मिटली. त्यांत २५०० रु. खर्च होऊनही रुपयात फक्त २ आणे वसूल झाला. ४००० बुडाले. व एकदरींत अति त्रास झाला.

सवत् १९८१ मध्यें शेंगदाणे, तेल व पिठाची चक्की असलेली गिरणी माघ—फाल्गुनात जळाली; त्यात ४००० नुकसान आलें, पण तें पुढील वर्षी भरून निघालें. त्याच जागेंत एक देवस्थान आहे.

# कोट्याधीश योग.

कुंडलीक्रमांक १९

शके १७९९ चैत्र कृ.५ इंदुवासरे इ. घ. १ पळें ३६ समये जन्म तारीख २।४।१८७७.

| र. | च. | मं. | बु. | गु. | शु. | श. | रा. | ल. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ११ | ७ | ९ | ११ | ८ | ११ | १० | १० | ० |
| २४ | १२ | २ | २० | १४ | १५ | २६ | २१ | ६ |
| १६ | ५१ | १५ | १८ | ५९ | ९ | १५ | ९ | ० |

## आयुष्यांत घडलेल्या गोष्टी.

(१) जन्माच्या वेळीं वडील परगावीं. (२) सावत्र माता २.

(३) बहिणी ३; पैकीं १ मोठी २ लहान. पाठीवर व आधीं बहीणच. भाऊ नाहीं.

(४) विवाह—ता. २ मे १८९६ सकाळीं १०।११ वाजतां.

(५) आई ह्यात आहे.

(६) वडिलांचा (अपघात होऊन नंतर) मृत्यु. ता. १६ आक्टोबर १८८०. दुपारीं १२ व १ च्या दरम्यान. वडिलांची जन्म तारीख २९ आक्टोबर १८३४

(७) स्त्रीचा मृत्यु जानेवारी १९२०.

(८) संतति—एक मुलगा व एक लहान मुलगी. एक मुलगा ८ महिन्यांचा होऊन मयत.

(९) सन १९१६ जानेवारीमध्यें राजद्वारीं श्रेष्ठत्व व विशेष उच्चतादर्शक मान मिळत असतां नाकारला.

कुंडली क्रमांक—२०.

( १० ) मुलीचा जन्म—ता. २ आक्टोबर १९०७ सू. ग. घ. ३८ पळें ५२...
या मुलीचा विवाह ता. १३ नोव्हेंबर सन १९२४ रोजीं झाला.

कुंडली क्रमांक—२१.

( ११ ) मुलाचा जन्म—ता. ३० मे १९०२ सू. ग. घ. ४५ पळें ५

( १२ ) सन १९१२ मध्यें विशेष सन्मान. समाजांत व सरकारांत विशेष दर्जाची प्राप्ति व पुढारीपणा.

( १३ ) १९१२ ते १९१६ हा काळ आयुष्यांत अतिशय उत्कृष्ट.

( १४ ) १९१३ एप्रीलमध्यें परदेशांत व विलायतेस प्रयाण व नोव्हेंबरमध्यें परत.

सन १९१९ एप्रीलमध्यें विलायतेस प्रयाण नोव्हेंबरमध्यें परत.

सन १९२० डिसेंबरमध्यें विलायतेस प्रयाण व १९२१ एप्रीलमध्यें परत.

ह्या गृहस्थांची स्थिति जन्मापासून आजपर्यंत अत्यंत श्रीमंतीची व ऐश्वर्यकारक अशी आहे. गर्भश्रीमंत, पूर्वार्जित व्यापार-धंदा, कारखाने, नोकरचाकर, वाहनें, विपुल संपत्ति, इत्यादि सर्व गोष्टींची पूर्ण अनुकूलता असून, सरकारांत, समाजांत, संस्थानिकांत, व्यापाऱ्यांत व मोठमोठ्या लोकांत प्रतिष्ठा व मानमान्यता पूर्ण.

सन १९२० पर्यंत कोणत्याही गोष्टीची कमतरता अगर प्रतिकूलता नव्हती. उलट अल्पश्रमानें अगर विनप्रयासानें पाहिजे त्या गोष्टी आपोआप घडत असत.

मोठमोठ्या संस्था आणि कारखाने यांच्या डायरेक्टरचा मान, त्याचप्रमाणें स्वतः च्या मालकीचे कारखाने ही पुष्कळ आहेत. वार्षिक व्यवहार कोट्यावधी रुपयांचा व सन १९२० पर्यंत लाखों रुपये मिळविले. सन १९२१ पासून काळ हळूहळू फार मोठ्या प्रमाणांत बदलत चालला व काळजी आणि व्यग्रता भासू लागली. तथापि विशेष परिणाम १९२५ पर्यंत झाला नाहीं. उलट सन १९२४ सालीं लाखों रुपये खर्चून स्थावर खरेदी व बंगले वगैरे बांधण्यांत आले,

सन १९२५–१९२६ हीं वर्षे मात्र द्रव्यदृष्ट्या अत्यंत खडतर व प्रतिकूल गेलीं १९२९ भयकर आपत्तिभय–अशा परिस्थितीतील ही कुंडली असून या कुंडलींत जन्मादारभ्य असलेला धनयोग फार विचार करण्यासारखा आहे फलज्योतिष जिज्ञासूनीं ही कुंडली निरीक्षणीय आहे.

कुंडली क्रमांक—२२

श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्य (डॉ. कुर्तकोटी) शके १८०१ वैशाख वृ १४ भौमे ता. २०–५–१८७९

## आयुष्यांतील ठळक गोष्टी.

श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्य मठ करवीर याचा पूर्वाश्रमींचा आधुनिक प्रवृत्तींचा इतिहास ज्याना माहीत आहे त्यानीं यानीं हा चतुर्थाश्रम कसा स्वीकारला याचें वारवार आश्चर्य वाटते पण दैवयोगापुढें कोणाचें काय चालणार !

ता. ३ जून १९१७ रोजीं पीठारोहण. सन १९१८ आश्विन शु १० रोजीं कोल्हापूर सोडलें नंतर हिंदुस्थानात संचार व नाशिक येथें मठात वास्तव्य

सन १९१७ च्या जूनमध्यें सन्यास घेण्यापूर्वीचा डॉ. कुर्तकोटीचा लौकिक व प्रसिद्धी फिलासफर व विद्वान् म्हणूनच होती यांचे पूर्वाश्रमींचे घरदार उत्तम वगैरे आहे फिलासफीमुळेंच याचा मोठमोठ्या अधिकाऱ्याशीं इतकेंच नव्हे तर ना० व्हाईसरॉयसारख्या वड्या अधिकाऱ्याशी अत्यत स्नेह व मैत्री जमली तशीच मैत्री श्रीमत छत्रपति कोल्हापूरकर महाराज यांच्याशींही जमली आणि त्यांच्याच आग्रहावरून ३०।४० हजार रु. कायम उत्पन्नाची आचार्य पीठाची गादी यानीं पत्करली ! पण पुढें सर्वच चमत्कार घडला व याना कोल्हापूर सोडवें लागलें ! सध्यां ८ हजारांचा ब्रिटिश हद्दींतील संकेश्वर मठापैकीं वार्षिक भाग त्याना मिळत आहे

कुडली क्रमाक २३

शके १८२१ मार्गशीर्ष कृ ७ भानुवासरे ६ घ० २३ प. ४५ ता. २४।१२।१८९९

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

पाठीवर बहीण--मयत लहानपणींच. आधीं भाऊ--मयत लहानपणींच. एकंदर भावंडें १३ पैकीं २ बहिणी हयात भाऊ ६. बहिणी ६; पैकीं भाऊ ६ व बहिणी २ मयत.

चुलते ३ सर्व निर्वंश, चुलत्याची इस्टेट (घर) सन १९०८।१९०९ मध्यें मिळालें. किं. सु ३,००० .

वडिलार्जित घर गणेशवाडी येथें, जमीन जुमला उगार येथें सागळी स्टेटमध्यें वर्षाचें उत्पन्न ३५०

आईच्या आईचा (म्हणजे आजीचा) मृत्यु १९१०. आईच्या वडिलाचा मृत्यु. १९२१। २२ (अदमासें)

मामा २, पैकीं १ मयत १९२१, मावशा ३ पैकीं १ मयत, २ हयात.

वडिलांचा मृत्यु १९१३ श्वासोदरानें.

शिक्षण--इंटर सायन्स् सन १९२१।२२।२४।२६ परीक्षेंत अपयश सन १९२३।२५ परीक्षेंत यश.

सन १९२३ मार्चपासून एका मोठ्या अधिकाऱ्याशीं परिचय व फायदा.

जन्मकाळीं जी स्थावर इस्टेट होती ती आज कायम आहे रोकड मात्र खलास झाली. सन १९१०-११मध्यें मिळचा एक शेअर ४॥हजारास विकला. त्याची किं. आज १८हजार आहे

सांप्रत उत्पन्न शेताचें व शेअरचें मिळून १ हजार व नौकरी ९०० रु.

भयकर आजार--सन १९२५ एप्रील न्युमोनिया. सन १९१ , टाइफाइड.

आई जिवंत आहे. सन १९२४ आगष्टमध्यें आजारी होती.

सन १९२४ मध्यें भयकर त्रास, आपत्ति व वेअब्रूकारक परिस्थिति.

सन १९२५ जून, बहिणीचें लग्न, खर्च ३००० रु.

सन १९१८ बहिणीचें लग्न, खर्च १६०० रु.

अद्याप लग्न झालेलें नाहीं.

## *वरील कुंडलीचें ज्योतिषशास्त्रदृष्ट्या विवेचन.*

या कुंडलीच्या अष्टमस्थानीं चार ग्रह असून ते परस्परविरोधी गुणधर्माचे व एकमेकाचे शत्रुत्वकारक असे आहेत अष्टमातील रवि राहु व दशमस्थानावर शनीची पूर्ण दृष्टि, हा योग सामान्यत पितृसुखास घातक असा झालेला असून दशमाधिपती शनि अष्टमातच मंगळानें युक्त असल्यामुळें पितृसुख अल्पवयात नष्ट करणारा योग या कुंडलींत कोणासही दिसून येईल.

मातृसुखाचा अधिपति रवि हा बिघडलेला असला तरी चंद्र पंचमस्थानात शुभयोग करीत असल्या कारणानें पित्यापेक्षा मातेचें सुख अधिक मिळणार याबद्दल शंका नाहीं पित्याच्या पश्चात् या कुंडलीच्या मनुष्याचें पालनपोषण म्हणा अगर देखरेख म्हणा, आईनेंच केलेली असली तरी या मनुष्याच्या आजाकडून, मामाकडून व बहिणीच्या नवऱ्याकडूनही साह्य झालेलें आहे. याचें

कारण शास्त्रदृष्ट्या असें आहे कीं, षष्ठाधिपति म्हणजे मातुलस्थानाचा स्वामी याच्या भाग्यस्थानीं आहे व तृतीयस्थानाचा आणि लाभस्थानचा स्वामी या दोघांचे योग लग्नाशीं शुभ असे होत आहेत.

पंचम, सप्तम आणि नवम हीं स्थानें फार महत्त्वाचीं असून तेथें शुभग्रहयोग जन्मतःच आहेत. त्यामुळें या मनुष्यास संकटकाळीं देखील साहाय्य व मदत मिळाली.

भावंडें नष्ट करणारा योग म्हणजे एकादशस्थान व तृतीयस्थान या भावंडाच्या स्थानावर मंगळाची पूर्ण दृष्टि आणि तृतीयाधिपतीवर शनीची पूर्णदृष्टि हा होय. कांहीं भावंडें जगण्याचें कारण भावंडाचे स्वामी केंद्र त्रिकोणांत बलवान् आहेत.

धनयोग व दारिद्र्ययोगाच्या दृष्टीनें विचार करतां वयाच्या १४ वर्षांपर्यंत, म्हणजे वडील हयात असेतोंपर्यंत धनयोग बरा होता. वयाच्या १४ वर्षांपासून २४ वर्षांपर्यंत धनहानि, धनचिंता व धनव्यग्रता असा योग उत्पन्न होऊन पुनः २४ वर्षांपासून सांपत्तिक स्थिति सुधारूं लागली. पण मधल्या १० वर्षांच्या अवधींत कर्जबाजारीपणा अगर ऋणयोग मात्र आलेला नाहीं. कारण कुंडलींत जन्मत ऋणयोगाचें दर्शक असे कोणतेही ग्रह नाहींत. संकट आणणारे ग्रह जरी अष्टमांत बरेंच असले व त्यामुळें कित्येकवेळा भयंकर काळजीचे प्रसंग उत्पन्न झाले तरी संकटमुक्त करणारे व परिस्थिति हितकारक आणणारे ग्रहही केंद्र त्रिकोणांत बसलेले असून त्यांत लग्नाधिपति भाग्यस्थानीं बलवान् आहे व हाच सरक्षक योग आहे. या मनुष्याच्या आयुष्याच्या ३२ वर्षांपासूनचा काल, परिस्थिति सुखकारक व जास्त भरभराटीची आणणारा निघतो. गुरुधनस्थानीं आल्यापासूचा काल ( सन १९३० ) भरभराटीचा झाला पण अग्नीचा धोका आला.

ह्या व्यक्तीस १९२८ ते १९३५ हा काल, कांहीं कर्ज स्वजनविरोध आणि अत्यंत अपमानकारक गेला. एका प्रसिद्ध स्त्रीशी मैत्री. व त्यात फायदा.

कुंडलींतील धनयोगाचा विचार करता खंडित झालेला धनयोग आहे. त्यामुळें एकच परिस्थिति सदैव टिकणार नाहीं. चढउतार चालू राहील. कायम दारिद्र्ययोगाचा संभव नाहीं.

## कुटुंबकुंडलीसंग्रह.

कुंडली क्रमांक नं. २४

शके१७८९ चैत्र कृ.१२ इ. सू. ध.३६प.२

(पती) वडिलांची कुंडली.

कुंडली क्रमांक नं. २५

शके १७९७ पौष शु. ७ घ. ४४ प. ५१

(कुं. नं. १ ची पत्नी) मातोश्रीची कुंडली.

कुंडली क्रमांक नं. २६

शके १८१३ भाद्रपद शु. २ हस्त ४ चरण.

( पती ) मुलाची कुंडली.

कुंडली क्रमांक नं. २७

शके १८२० आश्विन कृ. २कृत्तिका २चरण.

( पत्नी ) कुं. नं. २६ ची.

कुंडली क्रमांक नं.२८

शके१८१९फाल्गुन शु.६सू.इ.घ.१५प.४५

( पती ) मुलाची कुंडली.

कुंडली क्रमांक नं. २९

शके १८२९ कार्तिक शु. ६

( पत्नी ) कुं. नं. २८ ची.

कुंडली क्रमांक नं. ३०

शके१८२१भाद्रपद शु.७सू.इ.घ.४८प.३७

( पती ) मुलाची कुंडली.

कुंडली क्रमांक नं. ३१

( पत्नी ) कुं. नं. ३० ची.

कुंडली क्रमांक नं. ३२

शके १८२९ अ. चै. शु. २ सू. इ. घ. २५

मुलाची कुंडली.

कुंडली क्रमांक नं. ३३

शके १८३४ पौष कृ. २ सू. इ. घ. ३८.५

मुलाची कुंडली.

वर दिलेल्या कुंडलीसंग्रहात कुंडली नंबर २४ हे कुटुंबांतील कर्ते पुरुष असून कुं. नं. २५ ही कुटुंबांतील कर्ती स्त्री आहे. कुं. नं. २४ हे गृहस्थ गरिबींत शिक्षणक्रम आटोपून सरकारी नोकरी करून अधिकाराची जागा मिळवून हल्लीं पेन्शनर आहेत. यांचा स्वभाव करारी, निस्पृह, वेदांताची आवड, धार्मिक गोष्टींकडे विशेष लक्ष असा आहे. एक बंधु आहेत. भगिनी एक. सन १९१२ ते १९२४ सांपत्तिक भरभराट. कुं. नं. २५ ही कुं. नं. २४ ची पत्नी असून या कुंडलीस अल्पवयांत मातृवियोग झाला व सापत्न मातायोगही होता. नं. २५ च्या कुंडलीचे वडील हयात आहेत. भावंडें फक्त सापत्न दोन भगिनी आहेत. बंधु नाहींत. या कुंडलीच्या स्त्रीस सध्या पांच पुत्र व दोन कन्या आहेत.

कुं. नं. २६ हे कुं. नं. २४।२५ चे ज्येष्ठ चिरंजीव असून त्यांचें शिक्षण एल. एल. बी पास होऊन हल्लीं ते वकील आहेत.

कुंडली नं. २८–३० हे सख्खे बंधू असून प्राथमिक शिक्षणापासून म्याट्रिक, स्कूलफायनलचें शिक्षण दोघांचें सारखें झालेलें आहे व म्याट्रीक व स्कूलफायनलची परीक्षा दोघेही बंधू एकाच वर्षी पास झाले आहेत. नंतर कॉलेजचा कोर्स घेऊन त्यांत एका बंधूस परीक्षेत अपयश आल्यानें दोघा बंधूंनीं तो कोर्स सोडून डॉक्टरचा कोर्स घेतला. व दोघेही हल्लीं डॉक्टरची परीक्षा पास होऊन सध्या स्वतंत्र धंदा करीत आहेत.

कुं. नं. ३२ हे म्याट्रीकपर्यंत शिक्षण घेऊन त्यांत उत्तीर्ण होऊन हल्लीं इंजिनियरिंग कॉलेजमध्यें शिक्षण घेत आहेत.

कुं. नं. २६–२८–३०–३२ हे सखे बंधू असून कुं. नं. ३३ ही या व्यक्तींची भगिनी आहे.

कुटुंबकुंडलीसंग्रहाचा उपयोग फार होतो कारण त्याचें योगानें कुटुंबांतील मंडळींचे ग्रहयोग एकमेकाशीं कोणते योग करतात, सर्वांच्या कुंडल्यांत वैशिष्ट्य काय, कोणता ग्रह जोरदार आहे इत्यादि सर्व गोष्टी अशा संग्रहानें नजरेसमोर राहतात.

कुंडली क्रमांक नं. ३४

शके १७८४ पौष-कृ ३/४ सू. इ. घ. ३६-प. २३

या कुंडलीस पितृसुख सु० ३० वर्षे मिळालें. मातृसौख्य वयाचे ५० वर्षापर्यंत मिळालें. बंधूसौख्य नाहीं. भगिनी चार होत्या. शके १८३५ चे वैशाख मासीं भगिनीसौख्य नाहींसें झालें. कन्या संतति दोन आहे. पुत्र घरेच झाले परन्तु हयात नाहींत. विद्येंत, लेखनव्यवसायांत पूर्ण पारंगत, परन्तु कारकुनी पेशांत जन्म गेला. स्वभाव सोशीक, कष्टाळू, शरीरयष्टी उंच, गौरवर्ण. या कुंडलीच्या पत्नीची शरीरयष्टि स्थूल; स्वभाव हेकेखोर असा आहे. वडिलार्जित इस्टेट असून कुंडलीस त्याचा उपभोग घ्यावयास मिळाला नाहीं. जन्मापासून अखेरपर्यंतची सांपत्तिक स्थिति अडचणीची व हलाखीची. ( मृत्यु शके १८५४ )

शके १८०५ भाद्र. कृ. ३ सू. प्राक्. घ. १ प. ४५

कुंडली क्रमांक नं. ३५

या कुंडलीस श्रावण शुद्ध १३ शके १८०६ भ्रातृवियोग. श्रावण शुद्ध १४ शके १८०६ स पितृवियोग. श्रावण वृ. ४ शके १८०६ मातृवियोग. त्यानंतर सुमारें सहामहिने सरकारची देखरेख. त्यानंतर आजोबा ( बापाचे वडील ) कडे रवानगी. तेथें पंधरा दिवस वास्तव्य. पुढें आईचे बापाकडे येऊन वयोवर्षे १६ पर्यंत तेथेंच वास्तव्य. वयोवर्षे ४ आईचे आईचा मृत्यु. वयोवर्षे १४ आईचे बापाचा मृत्यु. वयोवर्षे १६ वडिलांचे बापाचा मृत्यु. वयोवर्षे १७ पितृव्य-वियोग वयोवर्षे १८ ते २८ प्रसिद्ध शहरांत वास्तव्य. वयोवर्षे २९ पासून आजपर्यंत पुन्हां दुसरें प्रसिद्ध शहरांत वास्तव्य. वयोवर्षे ३२ ते ३६ सर्व बाजूनें पूर्ण सुखावह असा काल गेला. वयोवर्षे ३७ ते आजपर्यंत काल फारच कष्टकारक गेला. वडिलांचा धंदा सरकारी नोकरी.

कुंडली क्रमांक नं. ३६

शके १८०७ आषाढ कृ. १४ सू. इ. घ. १९ प. ३०

या कुंडलीस मातृपितृसुख अल्प मिळालें. विवाह एकच, सासरची सांपत्तिक स्थिति चांगली शरीर कृश, डोळे अधू, कटीव्यसन जबरदस्त. वडिलार्जित सांपत्तिक स्थिति चागली. त्यावरच आज तागायत उदरनिर्वाह. संतति आजपर्यंत झाली नाहीं. पितृव्यसुख बरेंच दिवस चांगले मिळालें. वडिलार्जित स्थावर इस्टेट व वतनी इस्टेट आहे.

सांप्रत वतनी हक्काच्या अधिकारावर आहेत.

कुंडली क्रमांक नं. ३७

शके १७९२ माघ शु. १५ रविवार सू. ग. घ. २ प. ३० जन्म.

॥ जन्म लग्न चक्र ॥

आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

शके १७९८ फा. कृ. ९ आजोबा वारले.
१८१० माघ कृष्ण पक्षांत विवाह.
१८१६ श्रावण कृ. २ वडील वारले.
१८१७ श्रावण कृष्णांत पहिली कन्या झाली.
१८१९ वैशाख कृष्ण मुलगा ६ वे दिवशीं मृत.
१८२० चैत्र शु ११ कन्या अपुऱ्या दिवसाची मृत.
१८२१ चैत्र शुक्लांत पुत्र. तो आठ महिन्यांनीं मृत.
१८२३ अधिक श्रा. शु. ६ पुत्रजन्म.
१८२६ भाद्रपद कृ. ३० कन्या जन्म. शके १८४३ मार्ग. शु. वैधव्य.
१८२८ चैत्र शु. १० कन्या जन्म.

१८२९ माघ शु. ११ पत्नीचा मृत्यु पुत्रासह.
१८३० आश्विन शु. ९ भावजयीचें मरण.
१८३० कार्तिक कृ. ७ बधु मरण.
१८३१ माघ शु ३ ,,
१८४३ माघ शु. १५ मातृमरण.
१८४४ ज्येष्ठ शु. भावजयीचें मरण.
१८४८ नतर मुलीचा विवाह आणि ३ वर्षांनें जावयाचा मृत्यु.
१८५२ मुलाचा विवाह १८५४ नतर परमार्थ योग.

ह्या कुडलीच्या गृहस्थाची सांपत्तिक स्थिति अगदीं साधारण असून शके १८३९ सालीं एका प्रमुख व प्रसिद्ध व्यक्तीशीं मैत्री घडली. व तेव्हापासून द्रव्यदृष्ट्या स्थिति सुधारली. शके १८४५ सालीं विद्वान् लोकांच्या सभेकडून सन्मान झाला व पदवी मिळाली. समाजात मान्यता व दर्जा चांगला. गणित विषयांत प्रावीण्य. धदा स्वतत्र

ह्या कुडलींतील वैशिष्ट सांगावयाचे तर तें असे सांगतां येईल कीं, जन्मापासून आज तागायत द्रव्यदृष्ट्या परिस्थिति बेताबाताची व कांहीं कांहीं वेळांतर हलाखी आणि कर्ज करणारीं अशी झाली. गणित विषयांत परपरा प्राप्त पारगतता पण द्रव्याचा मात्र अभाव मोठ्या शहरांत वास्तव्य, उत्कर्षाचा काल म्हटला तर तो १८४० पासून १८५४ पर्यंतचा, सबध आयुष्यांत द्रव्यदृष्ट्या हाच काल चांगला गेला. शके १८५३ पासून पुत्र सततीचा उत्कर्ष आणि नांव लौकिकांत वाढ व प्रसिद्धि. शके १८५७ ते पुत्र सततीचा विशेष उदय. मोठ्या प्रमाणावर चाललेल्या सस्था व व्यक्ती याच्याशीं सबध. शके १८५२ पासून एका मोठ्या सत् पुरुषाच्या सान्निध्यात व परमार्थिक आचार, विचार, उपासना यात उत्कृष्ट काळ जात आहे. सत्पुरुषाची पूर्ण कृपा.

निरयन भावचलित ( सधिविरहित ) जन्मकुडली.

कुंडली क्रमांक नं. ३८

शु. ३-४७
सिंह ९
१४ कर्क
बु ११ र. २१-१०
मि
मिथुन १४
नै. १२
कन्या ७
रा ३-९
तुला १०
म. ९ ३
वृषभ १३
११ वृश्चिक
च २१ ३९
ह ७-४३
मकर १४
मेष १०
धु ५-७
धनु १४ श १२-३०
कुंभ ११ गु ५-७ म ७

**जन्म ३-८-१९०३ करजगांव सूर्योदयापूर्वी २५ मिनिटें. मृत्यु १०-१२-१९२३ सकाळीं ९-१५.**

वर दिलेली कुंडली एका स्त्रीची आहे. ह्या कुंडलीच्या दिग्दर्शनानें ज्योतिषशास्त्राच्या तत्त्वांचें सत्यत्व बरेंच पटण्यासारखें असल्यामुळें ती देत आहों. आयुष्य फारच थोडें लाभल्यामुळें तिचें चरित्र अर्थातच लहानसें आहे. तें निराळें न देतां कुंडलींतील योगांचा विचार करतांनांच त्यांचा उल्लेख होईल. ह्या लेखांत अल्पायुषी मृत्युकालच्या योगांचेंच (संक्षिप्तपणें) विशेष विवरण करण्याचें योजिल्यामुळें बाकीच्या गोष्टींचा फक्त स्थूल विचार होईल.

लग्नस्थ रवीच्या गुणधर्माप्रमाणें स्वाभाविकतः शरीरकाठी मजबूत होती. पण ती फार काळ तशीच राहून शरीरसौख्य मिळणें शक्य नव्हतें; कारण रवि मंगळाच्या केंद्रांत व शनीच्या सप्तमांत असून चंद्र मंगळाशीं अर्धकेंद्र व गुरुशीं केंद्र करीत होता. इतकेंच की, ह्या योगांची कक्षा थोडी बहुत लांब होती, रवीनें व्यक्त होत असलेली जीवनशक्ति शनीकडून ग्रासली गेल्यामुळें शनीच्या मंदत्वाला अनुसरून हळूहळू क्षीण होणें साहजिकच होतें. तशांत शनि अष्टमेश व चंद्रास पीडा करणारा गुरु षष्ठेश असल्यामुळें तसें होणें अपरिहार्यच. हळूहळू जीवनशक्ति कमी करणारे व दीर्घकाल टिकणारे क्षयासारखे रोग शनीचे होत. म्हणूनच क्षयाची बाधा झाली. ही बाधा वयाच्या १८ व्या वर्षाच्या उत्तरार्धांत झाली. त्या वेळेस परिभ्रमणाचा रवि शनीशी तंतोतंत प्रतियोग (मूळ कुंडलींत असलेला) करीत असून षष्ठाधिपति जो गुरु तो चतुर्थ स्थानांत नुकताच प्रवेश करीत होता. क्षय फुप्फुसें बिघडवितो पण शनीचा अंमल हाडावर विशेष असतो. म्हणूनच लोलेल्या क्षयाच्या बाधेंत फुप्फुसें बिघडूनहि पाठीच्या कण्यांतील हाड वांकल्यासारखें होऊन बिघडलें होतें. २० महिन्यांच्या औषधोपचारानें क्षयाचा बहुतेक नाश झाला होता. फक्त काय तें हाडांत थोडेंसें व्यंग राहिलें होतें व तें कधींही निघणें शक्य नव्हतें. ह्यापासून मुळीच धोका होण्यासारखा नव्हता.

क्षयाच्या औषधोपचाराकरितां कुटुंबांतील मंडळीपासून व इतर आप्तेष्टांपासून ६०० मैल दूरवर पांचगणीस 'वेल एअर' सॅनेटोरिअममध्यें एकटेंच सतत २० महिने रहावें लागलें. हे वीस महिने सतत पलंगावर पडून असावें लागत असे. उठण्या बसण्यास किंवा फिरण्यास मुळींच परवानगी नव्हती. ह्या एक प्रकारचा भर्तृवियोग, एकांतवास व बंदिवासच होय. हा प्रकार जन्मकालच्या व्ययस्थानांतील नेप्च्यूनच्या वास्तव्यामुळें घडला.—ह्याच वेळेस तिच्या अष्टमस्थानांतून हर्शेल गोचरीनें व परिभ्रमणानें जात होता. स्त्रीचें अष्टमस्थान म्हणजे पतीचें धनस्थान होय. म्हणून त्या स्थानांतील हर्शेलचें भ्रमण पतीच्या धनास ओहोटी लावतें. त्याचा परिणाम असा झाला कीं, औषधोपचाराप्रीत्यर्थ एकंदरीत जवळजवळ ६००० रुपये खर्च आला. (खरोखरीच तो हर्शेल ह्या स्त्रीच्या पतीच्या धनस्थानांतून जात होता; त्याचप्रमाणें नेप्च्यूनचें भ्रमण सप्तमांवरून चालू होतें.)

सप्तमस्थ शनीशीं मंगळाचा केंद्र आहे. हा योग आजन्म कौमार्य दर्शवितो. याला मारक असा गुरु-शुक्राचा प्रतियोग नसता तर ही स्त्री अविवाहितच राहिली असती. शुक्र-गुरु प्रतियोगानें लग्न होतें. व तेंहि लवकर म्हणजे बाराव्या वर्षी होतें. त्याप्रमाणेंच तिचें लग्न अकरावें वर्ष संपतें न संपते तेंव्हांच झालें. लग्न झालें, पण वैवाहिक सुखाची हानी करणारे बरेच योग होते, ते असे—

आपल्या नीचांत शुक्र, चतुर्थांत मंगळ, शुक्र हर्शल केंद्र, अष्टमेश सप्तमांत. ह्यामुळें वैवाहिक सुख दीर्घकाळ मिळणें शक्य नव्हतें. पुन्हा अत्यंत वाईट असा रवि---शनीचा वियोगकारक सम-सप्तम योग होता. लग्नांत रवि म्हणून रवीला लग्नेशाचे ( Ruler चे ) हक्क येतात. शनि सप्तमेश आहेच. परिणाम हा कीं, तिला वैवाहिक आयुष्य जेमतेम ९ वर्षेंच मिळालें व उभयतां अनेक अडचणीमुळें एकत्र असे २॥ वर्षांच्या वर राहिलें नाहींत. वीस महिन्यांचा वर दिलेला वियोग परिभ्रमणानें रवि, शनीशीं प्रतियोग करतांनाच घडला हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

शिक्षण मराठी चवथे इयत्तेपर्यंतच झालें. इंग्रजीची फक्त अक्षरओळखच होती असें म्हटलें असतां चालेल. आपण पुष्कळ शिकावें अशी इच्छा फार पण ती सफल झाली नाहीं. पंच-मस्थ चंद्र व गुरुच्या पंचमेशत्वामुळें बुद्धियोग बरा होता. बुद्धि चांगली होती. पण हर्शल पंचमांत होता. पंचमस्थ हर्शल शिक्षणांत व्यत्यय व अडथळे आणतो; तथापि त्यानें शेवटीं यश दिलें असतें; पण पंचमेश गुरु वक्री होता व चंद्र त्यास केंद्र करण्यास जात होता. ( चंद्रहि आपल्या नीचांत आहे.),हीच संततीअभावाचीहि कारणें आहेत. वक्री गुरु संततीसुखास प्रतिकूल असतो. पंच-मस्थ हर्शल संतति प्रतिबंध करतो व झालीच तर तो आपल्या धर्माप्रमाणें तिचा नाशहि करतो.

चतुर्थांतील मंगळाचें वास्तव्य आयुष्याचा शेवटचा भाग तापदायक दर्शवितो व त्याप्रमाणें तो झालाहि. तशांत तो तूळेचा म्हणून अशुभ असून त्याचा रवीशीं केंद्र, गुरुशीं ( षष्ठेशाशीं ) षडाष्टक, चंद्राशीं अर्धकेंद्र, व सर्वांत वाईट असा अष्टमेश शनीशीं केंद्रयोग होत असल्यामुळें चतुर्थ-स्थान अगदीं भयानक असें झालें. शेवट दुःखपर्यवसायी चमत्कारिक होईल हें ह्यावरून स्पष्ट दिसत होतें.

प्रकृति नीट होऊन ही स्त्री ता. २२ अक्टोबर १९२३ ला परत आली व ता. १० डिसेंबर १९२३ ला इहलोक सोडून निजधामास परत गेली. मृत्यु क्षयामुळें झाला नाहीं हें निर्विवाद आहे. ह्यांवेळी औषध देणारे डॉक्टर व वैद्य ह्यांचेंहि तेंच मत आहे. पण मृत्यु कशानें झाला हें कोणालाच सांगतां येत नाहीं. मृत्यु सकाळीं १० ला झाला; पण ९ वाजेपर्यंत काम करीत असलेले डॉक्टर व वैद्य म्हणत कीं, रोग क्षुल्लक खोकल्या पडशासारखा व सुसाध्य आहे. एक दोन दिवसांत सहज बरा होईल असें डॉक्टरांचें ठाम मत होतें. असो.

१९२३ सालांतील ग्रहस्थिति पुढीलप्रमाणें होती.

| ता. १०-१२-२३ चे सकाळी १० वाजताचे गोचर ग्रह | | ता. १०-१२-२३ चे परिभ्रमण ग्रह | ता. ३-८-२३ चे दिनवर्ष पद्धतीचे ग्रह |
|---|---|---|---|
| ने | सिंह १-३१ | कर्क २३-१५ | |
| ह | कुंभ २४-५८ | मीन ३-१५ | |
| श. | तुळा १०-१५ | कन्या १६-३१ | मकर ११-१८ |
| रा | सिंह १७-२३ | तुळा १-२१ | कन्या २०-५ |
| गु. | वृश्चिक १४-१६ | वृश्चिक १५-२९ | मीन ३-३७ |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मं | तुळा | १५—९ | वृश्चिक | ४–२८ | तुळा | २१—३ |
| र | वृश्चिक | २८–२१ | सिंह | १६–३५ | सिंह | १०–२० |
| शु | धनु | २१–११ | मीन | १९—४ | कन्या | ७–१२ |
| बु | धनु | १०–३४ | सिंह | १३–३१ | ,, | ५–५८ |
| चं | धनु | २७–५० | धनु | २३–१५ | सिंह | १३–४२ |

वर दिलेल्या ग्रहस्थितीवरून त्याचे आपआपसांत व जन्मस्थ ग्रहाशीं कसकसे योग होत होते हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे. त्यांत प्राणहानिकारक अनेक योग दृष्टीस पडतील. फक्त एखाद दुसरा मोठा योग घेऊन मृत्यूचें विवरण करतां येईल.

चलित ग्रहांच्या मूळ ग्रहाशीं झालेल्या अनिष्ट योगांत व मंगळानें रविशीं केलेला केंद्र अति वाईट आहे. ह्या योगाविषयीं लिओ म्हणतो. A very evil and unfortunate period fraught with disastrous tendon cies etc ..a very critical period necessitating the excercise of great care ? रवि हा जीवनशक्तिदर्शक ग्रह लग्नस्थ असल्यामुळें शरीरकष्ट व प्राणघातक योगाचा प्रकारच यांत विशेष आहे. दुसरा वाईट योग गुरूचा शुक्राशीं तंतोतंत प्रतियोग गुरू षष्ठेश म्हणून दर्शविल्या जाणाऱ्या वियोगांत शरीरप्रकृतीचा सबब येतो. ग्रहांतील आपसातल्या योगांत महत्त्वाचा म्हटला म्हणजे शनीचा रवीशीं पूर्ण षडाष्टक: शनि सप्तमेश व अष्टमेश असल्यामुळें पतीशीं वियोग. व तोहि निधनामुळें दर्शवीत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्या योगाविषयीं लिओ म्हणतो Loss by death ह्या योग पहिल्या व दुसऱ्या योगास दुजोरा देत आहे. या तीन बृहत् योगावरून प्राणांतिक शारीरिक कष्ट व पतीशीं निधनामुळें वियोग एक दोन वर्षांत घडावा असें दिसत होतें. ( पतीच्या कुंडलींत कुटुंबस्थानांत त्यावेळीं राहू मंगळ असून राहु चलित होऊन मंगळाशीं तंतोतंत युति करीत होता व त्याचप्रमाणें पतीचा सप्तमेश रवि चलित होऊन हर्शलशीं केंद्र करीत होता.)

परिभ्रमणद्वारा पाहिलें असतां व रवि परिभ्रमणपद्धतीच्या वार्षिक कुंडलींत षष्ठ स्थानांत येऊन, बुधाशीं युति व मूळ षष्ठेश जो व गुरु ह्याच्याशीं केंद्र करीत आहे. मूळ षष्ठेश असा परिभ्रमणाचा गुरु मूळ चंद्राच्या युतीस जात आहे व शुक्र गुरूच्या अगदीं सन्निध आला आहे. हे योग दिनचर्यापद्धतीच्या योगास दृढ करीत आहेत. ह्याचप्रमाणें आणखी कांहीं योग होत होते.

हे सर्व योग लग्नेश षष्ठेश अष्टमेश यांच्यात असल्यामुळें भयावह होते. या शिवाय हर्शल मूळ अष्टमांतून भ्रमण करित होता. हें भ्रमण साधारणत: मृत्युदर्शक असतें. एकंदरींत परिभ्रमण-द्वारा मृत्यु व वियोग ह्याच वर्षीं घडावा असेंच दिसत होतें. ( पतीच्या कुटुंबस्थानांत व हर्शल भ्रमण करीत असून अष्टमेश सप्तमांत फिरत होता. )

परिभ्रमणानें काळाचें स्थूलत्व सूक्ष्म झालें. अधिक सूक्ष्मता आणण्यास या परिभ्रमणाचा थोडा जास्त विचार करून गोचरग्रहस्थितीही अवश्य आहे. परिभ्रमण रीतीनें डिसेंबर महिन्याची कुंडली खालीलप्रमाणें बसते.

ह्या कुंडलींत स्पष्ट दिसणारा पहिला योग म्हणजे षष्ठ, अष्टम व व्यय स्थानांतील ग्रह. ह्यांचें वर्णन निराळें नकोच. तें वरच्या पॅऱ्यांत आलेंच आहे. स्थानाधिपत्य मूळ व ह्या कुंडलीचें घ्यावें.

गोचरीनें शनि मूळ चतुर्थांत डिसेंबरांत आला, चतुर्थस्थान लय व आयुष्याचा शेवट दर्शविणारें असल्यामुळें त्यांत शनीचें भ्रमण आधींच वाईट. तशांत मूळचें अष्टमाधिपत्य असल्यामुळें तें मृत्यु किंवा मृत्युसम पीडा दर्शवितें यांत शंकाच नाहीं. चतुर्थस्थान मंगळानें अगोदरच बिघडलेलें होतें. मंगळ-शनीचा जन्मत:च केंद्र होता. पष्ठेश गुरुचें भ्रमण ह्या स्थानांतून नुकतेंच संपलें होतें (चलित चतुर्थांतून चालूच होतें.) प व च मंगळ अजून चतुर्थांतच होता. गोचरीचा मंगळ पहिल्या तारखेस चतुर्थांत शिरला होता. ह्या अशा ग्रस्त चतुर्थस्थानांत ता. १ डिसेंबरला शनैश्वरानें प्रवेश केला व मूळ व गोचर मंगळावरून जाऊं लागला. अशा परिस्थितींतील शनीचें भ्रमण म्हणजे प्रत्यक्ष मृत्युचेंच आगमन होय (गोचरीचा हर्शल यांच्या अष्टमांतून व पतीच्या कुटुंबस्थानांतून जातच होता) पहिल्या आठवड्याच्या अखेर अखेर ह्या योग अति तीव्र झाला होता व ता. १० ला अनेक प्राणघातक कुयोग तंतोतंत होत होते, त्यापैकीं कांहीं—गो. चंद्र मूळ षष्ठांत शनीच्या राशीत असून गोचर गुरु (षष्ठेशाशी अर्ध केंद्र.)

प रविगुरु केंद्र; च रवि षडाष्टक च शनि.
,, राहु युति च मंगळ; च शनि केंद्र गो शनि.
,, केंद्र गुरु.

हे योग तंतोतंत होतांच जन्मत्रारीच, जन्मकालीन् सप्तम स्थानाचा अंश जन्म लग्नावर येतांच प्राणोत्क्रमण झालें.

आजार, गोचरीचे मंगळ व शनि चतुर्थांत शिरतांच म्हणजे ता. १।१२।२३ ला आला. गो मंगळ मूळ मंगळावरून जातांना ताप आला. तो लवकरच शमला म्हणून कांहींच वाटलें नाहीं. लगेच शनीचा शीत प्रकार सुरु झाला. पाठींत व मानेंत दुखूं लागलें. औषधोपचार चालूंच होते.

ता. ६ ला फार वेदना झाल्या व वात झाला. एव्हापासूनच खरा आजार म्हटला पाहिजे. तशातच ( गो नेप्च्यून बुधावरून चालला होता म्हणून ) मेंदूवर परिणाम होऊन डेलिरिअम् झाला. ता. ९ ला कफ होऊन ता. १० ला प्राणोत्क्रमण झालें. आश्चर्य हें कीं, कोणालाच रोगज्ञान वर सांगितल्याप्रमाणें झालें नाहीं. हा चमत्कार कशाचा ? मगळाचा !

ही कुंडली एका वरिष्ठ अधिकाऱ्याच्या पत्नीची आहे. विवाहानंतर पतीचा उत्कर्ष व उदय काल फार चांगला आला पण नशीब असें खडतर कीं ह्या स्त्रीस त्या वाढत्या ऐश्वर्याचा आणि उच्चस्थितीच्या सुखाचा लाभ दुर्दैवानें घेतां आला नाहीं. कारण ही स्त्री क्षयानें अल्पायुषी झाली. विस्तृत विवेचन वर केलेले आहेच.

### कुंडली क्रमांक नं. ३९.

शके १७९९ चैत्र कृष्ण ११ घ. ३० प. ३२ इंदुवासरे श्रीसूर्योदयात् गत घटि ४२ पळें ५४ यावेळीं जन्म.

जन्मलग्न कुंडली

१०म ८
च श११ र ९ गु ७
१२शु र ६
१ बु ५ के
२ ३ ४

अंश.

गु. १२—५३
म. ३—१९
च. १२—३४
श. २०—२४
रा. १६—४२
र. १८—५८
शु. २१—३१
बु. ४—१०

आई—लक्ष्मी. भाऊ—*भास्कर. बहिणी—वेणू ( १ ), दुर्गा ( २ ).

आजा—*गणेश. आजी—*यशोदा.

आते—*बया ( १ ). *काशी ( २ ). पत्नी—सगुणा. मुलगी—काशी.

मामा—विष्णु, हरी. मावश्या—आवडा ( १ ), *काशी ( २ ), *गोदू ( ३ ), *द्वारका ( ४ ), चिमणी ( ५ ).

सासरा—*विनायक. सासू—लक्ष्मी. मेव्हणे—( १ ), परशराम ( २ ), महादेव ( ३ ), राम ( ४ ) निवर्क.

* या खुणांची मंडळी मयत आहेत.

भावडांत हेंच शेवटचे आहे. यांचेमागून भावंड झालेलेंच नाहीं. जन्माचे वेळीं मातोश्रीचें पोटांत दोन दिवस दुखत होतें, त्यावेळीं वडील बाहेरगांवीं होते. सुवेरांतच आई फार आजारी पडली ती सुमारें ३ महिने आजारी होती. जन्मानंतर एका महिन्यानें वडील घरीं आले. यांचे जन्मानंतर सुमारें ६ महिन्यांनीं वडील आजारी पडले. तेथपासून त्यांचा अंत (३ व १० म. ) जाहला. तेथपर्यंत आजारीच होते.

पहिले वर्ष अखेर गाईनें लोटून देऊन दोन दिवस बेशुद्ध होतों. वयाचे ३ वर्ष ७ महिनेपर्यंत सर्व बाजूनें चांगली स्थिति होती.

वयाच्या ३ वर्ष ७ महिन्यानंतर वडील स्वतः, आजी, भाऊ, बहिण व मी अशी मंडळी घेऊन बाहेरगांवीं राहण्यास जाण्यासाठी घरीं माझे मातोश्रीस एकटीला ठेवून निघाले. रात्रीं मचव्यामध्यें सामान भरून आम्ही सर्वजण त्यांत बसलो. मचवा हाकारण्यास दोन तास अवकाश होता. करितां खलाशी जेवणाकरिता घरीं गेलेले होते. इतक्यांत भरतीचे समयीं मचव्यास खालून गावडी (भोंक) पडून आंत पाणी आलें व मचवा बुडण्याचे स्थितींत आला. त्यावेळीं आरडाओरड करून लोक जमले व माणसें तेवढीं बाहेर निघालीं. आणखी थोडा वेळ गेला असता म्हणजे सर्वच आटपलें असतें. नंतर दुसरे मचव्यात बसून वडील भाइप (मुंबई) येथें माझे आतेकडे आले तेथें वडीलांचा आजार जास्त होऊन माघ वद्य १० स (वयाचे व. ३ म. १०) मयत जाहले.

पाचवे वर्षांत देवी येऊन आजारी पडलों, तो सुमारें १॥ वर्ष अतिशय आजारी होतों. त्या आजारांतच मला मातोश्री घरीं घेऊन गेली. यांतून बरा होणेचे सुमारास उजवी बाजूची शीर अंतरगळ उतरली, ती सुमारें व १॥ वर्षांनीं बसली. ती पुनः वयाचे सतराव्या वर्षी उतरली; ती अद्याप तशीच आहे.

वयाचे सातवे वर्षाअखेर किंवा ८ वे वर्षाचे आरंभीं मुंज धर्मार्थ जाहली. आठवे वर्षाचे सुमारास शाळेंत जाऊं लागलों. अकरावे वर्षीं मराठी चारयत्ता जाहल्या. बाराव्या वर्षी विद्येसाठीं म्हणून बंधूनें बाहेरगांवीं आपले जवळ नेला. दोन तीन वर्षें फुकट गेलीं. सोळाव्या वर्षीं मराठी ६ वी पास जाहली. हा काळ माधुकरी मागून गेला!

चवदाचे सुमारास भावाचें लग्न झालें, व आजी मयत झाली.

सतरावे वर्षीं शाळाखात्यांत नोकरी धरली. वीस वर्षांपर्यंत जास्त शिकण्यासाठीं फार खटपट केली; पण यश आलें नाहीं.

वीस वर्षाचे सुमारास झाडावरून पडलों. तो दीड महिना आजारी होतों;

**चोविसावे वर्षीं फाल्गुण शुद्ध ३ स लग्न झालें.** लग्नास आईशिवाय सर्व मंडळी विरुद्ध होती **आकस्मिक योगानें सकाळीं ६ वाजतां जमलें व ९ वाजतां झालें. सदरहू** मुलीचें लग्न दुसरीकडे जमून याच मुहुर्तावर व्हावयाचें होतें. आदले दिवशीं आमंत्रण देखील मीच केलें होतें, पण कांहीं आकस्मिक कारणानें तें मोडलें व माझ्याशीं लागलें.

पंचविसाव्या वर्षाच्या फाल्गुनांत साडेसातीस सुरवात जाहली. लगेच नोकरी सुटून सव्वीसाव्या वर्षाच्या ज्येष्ठ अखेरपर्यंत (चार महिने) फारच भयंकर त्रास जाहला. मटकणें फार होऊन आषाढांत नोकरी धरली. त्याच वर्षी आषाढ वद्य ५ स बंधु मयत जाहला. सत्ताविसाव्या वर्षाच्या पौषापर्यंत सदरहू नोकरी केली. सत्ताविसाव्या वर्षाच्या चैत्र शु० १ स व्यापाराकडे नोकरी धरली. तीं पंचेचाळीसावे वर्षी आषाढमध्यें भागीदारी मिळेपर्यंत होती. एकोणतीसावे वर्षी **कार्तिक शुद्ध १ अर्दितवाताचे विकारानें उजवे बाजूचें तोंड वांकडें होऊन त्यांतच विषमताप सुरू**

**होऊन १।। महिना फार आजारी होतों.** नंतर नोकरीवर जाऊं लागलों; पण सुमारें सवा वर्ष आजरीपणांत गेले. तिसाव्या वर्षी पौषमध्यें कांहीं दैवी प्रेरणेनें धार्मिक बाजूकडे मन जाऊन स्नानसंध्या सुरू जाहली, व तेव्हांपासून आजपर्यंत ती चालू आहे. हल्लीं रोज सुमारें तीन तास लागतात. त्याचे अगोदर संध्या वगैरे कांहीं करीत नव्हतों.

**एकतिसावे वर्षी श्रावण शु. १४ स पहिली मुलगी जाहली. त्यावर आजपर्यंत मूल झालेंच नाहीं.**

एकेचाळीसाव्या वर्षामध्यें वडिलांचें ४०० रुपये कर्ज होतें तें फिटलें.

बेचाळीस-त्रेचाळीसमध्यें नोकरी असून खाजगी रीतीनें दुसरा धंदा केला होता. त्यांत आरंभीं नफा होतो असें वाटलें; पण **अखेरीस दोन हजार रुपये नुकसान झालें.**

त्रेचाळीस फाल्गुनमध्यें मुलीचें लग्न जाहलें.

पंचेचाळीसावें वर्षी आषाढमध्यें नोकरी सोडून व्यापारांत भागीदारी मिळाली. पौषमध्यें छातींत वात विकारानें ५।६ दिवस जास्त आजारी होतों व पुढें सुमारें ३ महिनें हिंडता फिरता आजारी होतों.

पंचेचाळीसाव्या वर्षी चैत्र शु. १ पासून शेचाळीस वर्षाच्या जेष्ठ शु. १५ पर्यंत सुमारें २।। महिने व्यापार चांगला चालून सुमारें चार हजार रुपये मिळालें. पुढें भागीदाराचें व माझें भांडण होऊन भागीदारी सुटली. कोर्टांत गेला.

शेचाळीस आषाढ व. ५ स मी माझे स्वतःचेच नांवानें धंदा सुरू करून दुकानाचा मुहूर्त केला. दीड वर्षाचे गडबडींत माझे जांवयाची मला फार मदत झाली.

एकंदरींत शरीरसौख्य मध्यम प्रमाणांत आहे. शरीर किडकिडीत व उंच आहे.

भावाचा माझा नेहमीं खटका उडावयाचा. माझें प्रेम त्याचेवर होतें; पण तो मला शत्रूसारखा मानीत असे.

वडिलांचें व आजीचें प्रेम माझेवर होतें असें मातेचे सांगण्यांत आहे. मातोश्रीचें व माझें एकमेकांवर खरें प्रेम आहे. पण नेहमीं खडाष्टक असतें. मातुल वर्गाचें माझेवर प्रेम नाहीं.

स्वभाव—तापट, करारी, बाणेदार मोकळा असा आहे, खोटें बोलणें लबाडी वगैरे मला खपत नाहीं. त्यामुळें बहुतेक लोकांशीं भांडण होतें. राग येत नाहीं, पण आला म्हणजे तो अनावर असतो. सामनेवाल्यानें चूक कबूल केली म्हणजे मी माझे मनांतील तेढी काढून टाकली तरी त्याचे मनांत असते, त्यामुळें एखाद वेळ नुकसान होतें. जाणूनसवरून मी कोणाचें नुकसान केलें नाहीं. इतकेंच नव्हे तर एखादे वेळ मी माझें नुकसान करूनही दुसऱ्याचें हित साधत असेल तर केलेलें आहे. पहिल्यानें कोणतेही भानगडींत मी पडत नाहीं. पण एकदां पडलों असत त्यांत माघार घेतलेली नाहीं, आजपर्यंत झोपेची कुरकुर नाहीं.

लहानपणीं शिळें अन्न खाल्लें असेल तेवढेंच; पण समजूं लागल्यापासून ताजें अन्न खात आहें. ओशाळें अन्न केव्हांही खाल्लेलें नाहीं.

उच्च स्थितीसंबंधानें महत्वाकांक्षा फार आहे वाईट मार्गाबद्दल मनांत लहरी येतात. पण लगेच अदृष्ट देवतेची थप्पड बसून ताळ्यावर येतों. कुकर्म होऊं नाहीं. संकट अगर एखादि आपत्ति येणार असेल तर स्वप्नांत दृष्टांत होऊन सावधगिरी होते. व सुखकर रस्ता सांपडतो.

कुंडली क्रमांक नं. ४०

ता. २७ नव्हेंबर १८८२. शके १८०४ मार्गशीर्ष. शु. १५ शनिवार श्रीसूर्योदयात् गत घ. ४६ प. ३८ समये जन्म ल. ५. १. २८. ९.

जन्म कुंडली

मंगळ अस्तंगत. शु. गु. श. वक्री.

१८९६ मे ता. २१ रोजीं वडील वारले. नव्हेंबर डिसेंबर आजार कठीण.
१९०१ मार्च पहिलें लग्न.
१९०१ डिसेंबर मॅट्रिक पास.
१९०३ डिसेंबर प्रिव्हिएस पास.
१९०४ डिसेंबर इंटर.
१९०७ डिसेंबर ते १९०८ मे फिरती ( सातपुडा ).
१९०७ डिसेंबर बी. ए. पास.
१९१० जानेवारी अखेर शिक्षणसंस्थेत तंटा होऊन नौकरी सोडलें.
१९१० एप्रील पोष्टांत उमेदवार.
१९१० नव्हेंबर पोष्टात इन्स्पेक्टर ( बेळगाव ).
१९१२ फेब्रुवारी प्रमोशन.
१९१२ मार्च मलेरियानें आजारी ( रजा ) ६ महिनें.
१९१२ नव्हेंबर वाटेंत ८० रु. चोरी व शरीर क्लेश चोरांकडून मारहाण.
१९१५ एप्रील पुण्यास बदली.
१९१५ डिसेंबर अखेर राजिनामा दिला.
१९१६ एप्रील ता० ४ नोकरी सोडून चार्ज दिला.
१९१६ मे ता० २१ दुसरा विवाह.
१९१६ जून ता० १ फर्ग्युसन कॉलेज ( नोकरी ).
१९१७ जून स्कॉलरशिपचा अर्ज.

१९१७ जुलै ता० १४ साहेबाची भेट ( स्कॉ. शि. क. ).
१९१७ नव्हेंबर ता० २६ स्कॉलरशिप.
१९१८ सप्टेंबर ते १९१९ जानेवारी हिंदुस्थानांत प्रवास, क्षेत्रवास.
१९१९ जून ता० १३ विलायतेस प्रयाण.
१९२० जुलै ता० १६ ते १९२० आगष्ट अखेर विलायतेस ( मेंदूचा ) डोक्यानें आजारी.

१९२१ जून ता० ३० विलायतची परीक्षा पास डिप्लोमा मिळाला:—१९२२जानेवारी ता० ७ विलायतेहून इकडे येण्यास निघालो–१९२२ फेब्रुवारी ता० १ हिंदुस्तानांत घरीं परत आलो.–१९२२ फेब्रुवारी अखेर प्रथम पत्नीचा मृत्यु,–१९२१ नव्हेंबर ता० ४ पासून सरकारशीं तटे ( पैशाचे बाबतींत ) १९१९ जुलै ता० ११ विलायतेस पोहोचलो.

ह्या व्यक्तीच्या दैवयोगाची कहाणी मोठी केविलवाणी आहे. आयुष्यांत उलथापालथ, कल्पना नसलेल्या गोष्टी घडून त्यांत कल्पनातीत फायदा दिसत असतांही अखेर त्याचे पर्यवसान अपयश, नाश, नुकसान आणि मनोभंगात्मक उदासीनता व विपण्ण स्थिति अशा प्रकारांत झाले आणि त्याचाच परिणाम मनावर होऊन त्यांत यांच्यावर मृत्यूची झडप पडली. यांचे घराणें प्रसिद्ध आणि चुलते मोठे वरिष्ट अधिकारी होते त्याचप्रमाणें चुलत्यास सरकारी कितावही मिळाला होता. वयाच्या ३० वर्षांपर्यंत साधारणतः ३०.४० रु. प्राप्ति पण थोरल्या भावास नौकरी पगार सुमारे ८० वय वर्षे ३० ते ३४ पर्यंत दरमहा १०० ते १५० प्राप्ति सरकारी नोकरींत आणि हाच काल कायतो द्रव्यदृष्ट्या चांगला गेला. वयाच्या ३६ वर्षांपर्यंत यानां कर्जाचे नांवही नव्हते. घरदार, नोकर, नौकरी, मानसन्मान अशी सुस्थिती वयाच्या ३६ वर्षअखेरपर्यंत होती पण स्कालर्शिप मिळून विलायतेस जाण्याचे ठरले आणि उतरती कळा सुरू झाली. विलायतेस जाण्या-करितां कर्ज काढावें लागलें. विलायतेस परीक्षा पास झाली असतांही यांच्या स्पष्ट वक्तेपणामुळें कांहीं वरिष्ठांचा रोष होऊन डिप्लोमा मिळाला नाहीं. व त्यामुळेंच हिंदुस्थानात आल्यावरही यांना सर्वत्र खो बसला !

कर्ज सारखें वाढत चाललें. धंदा नौकरीचे कोठेंही, जमेना. प्रत्येक ठिकाणीं विघ्नांच्या राशी येऊं लागल्या. सावकारानीं पिच्छा पुरवला. व जिकडे तिकडे, निराशा अंधःकार आणि नुकसान व नाश यांचा प्रादुर्भाव झाल्यामुळें दीर्घ प्रयत्नवादी असलेल्या ह्या व्यक्तीच्याही मनावर व शरीरावर परिणाम होऊन सन १९२९ साली यांनीं परलोकाची वाट धरली. हयातीपर्यंत यांना पूर्णत्वानें मातृसौख्य, भ्रातृसौख्य आणि भगिनी सौख्य मिळालें. मृत्यूच्यापूर्वी दोन वर्षे एक कन्या संतती झाली तोपर्यंत संतती नव्हती. विलायती वातावरणाचा व आहार विहाराचा यांच्या-वर चांगलाच परिणाम होऊन त्यापैकीं आहारादि प्रकार येथेंही चालू होते; ह्या सर्व गोष्टींचा कारक योग शनिचंद्र केतु मुळे झाला असून त्याच्या समोरच्या प्रतियोग दृष्टीनें अखेर त्यांचा सर्व-नाश झाला. यांच्या मृत्युनंतर सर्व स्थावरही गेलें.

शके १८२० श्रावण कृ. १० शुक्रवार सूर्योदयापूर्वी १ घटका जन्म ता. १२।८।१८९८

कुंडली क्रमांक नं. ४१

नवमांश कुंडली

जन्मकालचे स्पष्ट ग्रह.

| लग्न. | रवी | चंद्र. | मं | बु. | गु. | शु | श. | रा. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ३ | ३ | १ | १ | ४ | ५ | ५ | ७ | ८ |
| २२ | २६ | २५ | २३ | २२ | १८ | ९ | १३ | २३ |
| | ३३ | ४२ | २८ | ५९ | १ | १२ | २१ | ६ |
| | ३४ | ५१ | ५४ | ४७ | १० | ३० | ४४ | ५६ |

या गृहस्याची वडिलोपार्जित सांपत्तिक स्थिति फारच चांगली असून स्थावर इस्टेट, घरदार जमीन जुमला वगैरे होतें. इस्टेट सुमारें ६०।७०हजारांची जन्माचे पूर्वी १ वर्ष म्हणजे सन१८९७ पर्यंत होती व जन्माचे वेळीं त्यापैकीं ९।१० हजारांची कमी होऊन ५०।६० हजाराची राहिली. **पुढें सन १९०४ जून पर्यंत एक फुटकें भांडेही राहिलें नाहीं.** घरदार, जमीन जुमला होतें नव्हतें तें सर्व नाहींसें झालें व लोकाचे घरोघर भटकण्याची पाळी आली. शिक्षण मधुकरी मागून झाले वडील सन १९०८ मध्यें मयत. भावडें सन १९१८ पर्यंत सर्व मयत हल्लीं कांहीं नाहीं. मातृसौख्य चांगलें आहे. हल्लीं सरकारी नोकरी करीत आहेत. सन १९२० सालांत वडिलोपार्जित कांहीं इस्टेट कोर्टाकडून परत मिळाली. बाकी इस्टेटीबद्दल काम चालू आहे लग्न, सन १९२२ मार्च मध्यें झालें प्रकृति नेहमीं आजारी असतें. हल्लीं कर्जबाजारी आहेत

बापाचे धनस्थान म्हणजे आपले अकरावें स्थान. तेथें चंद्र मंगळ योग असून धनेश व लग्नेश पंचमात म्हणजे आपले तृतीयात आहे व यांचा नव पंचम योग आहे म्हणून वडिलाची मूळची स्थिति चांगली असली पाहिजे आता या गृहस्थाच्या धनस्थानांत बुध असून धनेश त्याच्या १२ व्या स्थानात आहे व धनस्थानावर मंगळ व शनी पूर्ण दृष्टीनें पाहतात, म्हणून हे गर्भात असल्यापासून पुन्हा रवि, शनिची समोरासमोर दृष्टी होईपर्यंत सर्व निकाल लागला. व बुध धनस्थानात असल्यानें दुसऱ्याचे घरीं राहावें लागून मधुकरी मागावी लागली। गुरु तृतीयात असल्यानें स्वपराक्रमानें आजपर्यंत चाललें आहे व अखेर चालणार. रवि व शनी याचा अशानें पूर्ण केंद्रयोग झाल्यानें सन १९०८ सालीं कायमची संसाराची जबाबदारी पडली तसेच जन्मकालीं दशमेस मंगळ शनीनें दृष्ट असून अशानें पितृकारक रवीला शनी पूर्ण बघतो व तो पुन्हा, सन १९०८ साली जन्मकालचे मंगळास दूषित करून पितृकारक रवीशी युती झाल्याबरोबर बापाचें सौख्य

कमी झालें. तृतीयाचा स्वामी बुध त्यापासून १२ वा आहे व त्या बुधाचा शनी मंगळाचा केंद्रयोग होऊन पूर्ण पाहातात त्यामुळें भावडें गेली. मातृकारक चंद्र उच्च असून मातृस्थानाचा स्वामी गुरुशीं युत असून त्यापासून अशानें तो ११ वा आहे व त्यावर कोणीही पापग्रह पहात नाहीं, त्यामुळें मातृसौख्य उत्तम आहे. दशमेश लाभात असून शनी पचमांत आहे, म्हणून सरकारी नोकरी करीत आहेत. तसेंच या कुंडलींत लग्नेश भाग्येश, भाग्येशदशमेश, धनेशाशीं--भाग्येश, दशमेश लग्नेश, व चंद्र भाग्येश गुरु यांचे शुभ योग झालेले आहेत. जरी अशानें हे योग होऊन गेलेले आहेत तरी थोडेबहुत प्रमाणात फळ चांगलें मिळण्यास हरकत नाहीं. चंद्र (लग्नेश)दशमेश एकादशमस्थानीं असून पचमेश लाभेश याचा लक्ष्मीयोग उत्तम झालेला आहे. यामुळें सदर गृहस्थाची वडीलोपार्जित इस्टेट खात्रीनें परत मिळाली पाहिजे. दिवाणी कोर्टांतील खटल्याचा निकाल चांगला लागून वयाचे २८ वर्षापासून उत्तम प्रकारच्या ऐश्वर्यांत दिवस जातील व कोणत्याही प्रकारची कमतरता भासणार नाहीं. लग्नेश चंद्र मगळानें युत असून शनीनें दृष्ट आहे व लग्नीं रवी असल्यानें प्रकृती नेहमीं आजारी असते. सन १९१९ सालीं शनी धनस्थानांत गेल्याबरोबर सापत्तिक स्थिती भयकर बिघडली. नोकरी सुटली, काहीं दिवस घरीं स्वस्थ बसावे लागले ४।५ डिपार्टमेंट झाले. लोकांत अपमान कारक स्थिती. जवळ होते नव्हते ते सर्व पैसे खलास, दिवाणी कोर्टांत दावा सुरू झाला वगैरे परिस्थिती बदलून सन १९२१ अखेर फारच दिवस हालात गेले व कर्ज फारच झाले त्यामुळें हल्लीं कर्जबाजारी आहेत. याचा सर्व वचपा तूळेला शनी गेल्यावर निघून येईल. कर्ज वगैरे सर्व फिटेल व चांगल्या स्थितीस सुरवात होऊन ऐश्वर्यांत दिवस जातील.

शके १८१७ मार्गशीर्ष मासे कृष्णपक्षे ३ गुरुवासरे सूर्योदयात घ०५. २८समयेजन्म. जन्मस्थळ सातारा.

कुंडली क्रमांक नं. ४२

आई--राधाबाई. भाऊ--सखाराम, सीताराम, दत्ताराम, आत्माराम, व शिवराम, **चुलते**--रघुनाथ, रामचंद्र, गोविंद **मामा**--एक आहे नाव माहीत नाहीं. **मावशा**--दोन. नावें माहित नाहींत. **आत्या**--नाहीं **वहिणी**--नाहींत. **आजा**--अताजी ( मयत ) आईचा बाप नाव माहीत नाहीं (मयत.) **आजी**--अनुसया ( मयत ) आईची आई हयात नाव माहीत नाहीं.

सन १९११-१२-१९२१-२२ यात पहिलीं दोन अत्यंत मानसिक त्रास देणारीं व दुसरीं दोन शारीरिक त्रास देणारीं वर्षे गेली.

**सासरा**--मयत ( १९२१ ) **आई**--मयत ( १८९६ ) **वडील**--मयत १९०१.

**भाऊ**--आत्माराम मयत ( १९०१ ) दयाराम मयत ( १९१६ ).

सांपत्तिक स्थिति—हल्लीं साधारण.

सन १९१६ सालीं इस्टेट रु. ५००० किंमतीची विकावी लागली.

सन १९२० ट्रेनिंग कॉलेज कोर्स पुरा झाला.

ता. १४ सप्टेंबर सरकारी नौकरी सोडली.

आज दरमहा सुमारें ९० रुपये मिळतात.

शके १८१५ कार्तिक वद्य १४ सह गुरुवार सायंकाली साडेसात वाजतां, अनुराधा नक्षत्र, देवगण, वृश्चिक राशि, मिथुन लग्न. तारीख ७ डिसेंबर सन १८९३ ई.

कुंडली क्रमांक नं. ४३

ल. र. इ. घ. प.
२ ७ २२।२०
१३ २२

आजपर्यंतच्या ठोकळ परिस्थितीचे वर्णन खालीलप्रमाणें:—

१. जन्म मुंबईस झाला. जन्मतः स्थिती चांगल्यापैकीं श्रीमंतीची.

२. वयाचे ६ वर्षापर्यंत एकंदर चार अपमृत्यु गेले आहेत.

३. वयाचे ६ व्या वर्षी वडिलांचा अपघातानें मृत्यु. (पुण्यास)

४. वडिलांचे पश्चात होतें नव्हतें तेवढें मामांनी व चुलत्यांनी लांबविल्यामुळें मधुकरी मागून दिवस काढण्याची पाळी.

५. नोकरीला सुरवात वयाचे १८ व्या वर्षापासून म्हणजे सन १९११.

६. शिक्षण मराठी ६ इयत्ता व इंग्रजी ६ इयत्ता. वयाचे १८ वे वर्षी शिक्षण सोडलें.

७. आज पर्यंतची सर्व नोकरी रेल्वेंत परंतु एक कायम नोकरी टिकत नाहीं एक सुटते व दुसरें तावडतोब मिळते. बी. बी. आणि सी. आय्.मध्यें आतां २ वर्षे कायम होतों परंतु हीसुद्धा कायम नोकरी रेल्वेनें नोकर कमी केले म्हणून आमच्यावर गदा येऊन ता. १ जून १९२२ पासून नोकरी सुटली व घरी बसावें लागलें. पण तावडतोब ह्या लाइनीत तशीच नोकरी ता. १० जून १९२२ पासून मिळाली आहे.

८. लग्न वयाचे २० वे वर्षी फाल्गुन महिन्यांत नागपुरास झालें सन १९१३.

९. सासू, सासरा लग्नाचे आधींच मयत.

१०. एकंदर भावंडें वडील ४ (२ भाऊ २ बहिणी) व धाकटी २ (१ भाऊ व १ बहीण) पैकीं, हयात ३. एक वडील भाऊ, एक धाकटा भाऊ आणि १ धाकटी बहीण.

११. माझ्या आधी बहीण व पाठीवर बहीण.

१२. मातोश्रींचा मृत्यु पुण्यास ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमा शके १८४१.

१३. पहिलें अपत्य पुत्र जन्म भाद्रपद वद्य १३ शके १८४१ व तो आठ महिने जगून नतर मेला. वैशाख शके १८४२.

१४. जन्मापासून पहिल्या ६ वर्षांखेरीज आजपर्यंत सर्व वर्षें साधारण द्रव्यदृष्ट्या जेमतेम गुजारा होण्यासारखीं.

१५. बधू सौख्य मुळींच नाहीं.

१६. शरीरामध्यें उष्ण विकार फार.

कुंडली क्रमांक नं. ४४

शके १८१६ आश्विन शु ३ मगळवार घ २ प ५ विशाखा नक्षत्र घ. ३३ प ३० श्रीसूर्योदयात इ घ ९ प. ३० ता. २ आक्टोबर १८९४.

॥ जन्म लग्न चक्र ॥

९ | श७ चबु
१० | ८ | ६शुके
११ | ५
१२रा | २ | ४
१ म | ३ गु

| स्प र. | स्प. ल. |
|---|---|
| ५ | ७ |
| २० | १२ |
| ३४ | ३३ |
| २० | ५ |

जन्माचे वेळीं वडिलाची सापत्तिक स्थिती चांगली होती. स्वत स जन्मापासून पानथरीचा आजार. वयाच्या २ ऱ्या वर्षी पानथरीचे आपरेशन केले. शके १८१९ भाद्रपद शु ४ स बधूचा जन्म शके १८२१ माघ शु ११ स दुसऱ्या बधूचा जन्म शके १८२४ आश्विन शु. ३ स तिसऱ्या बधूचा जन्म शके १८३३ ज्येष्ठ कृ. ७ ला एक भाऊ व एक बहीण असे जुळे झाले. शके १८३९ मध्यें एक भाऊ झाला. सर्व भावडापेक्षां एक मोठी बहीण आहे. शके १८२१ मध्यें जन्मलेल्या भावाच्या जन्मानतर वडिलाच्या सापत्तिक स्थितीस उतरती कळा लागली व शके १८२५ मध्यें एकदम पैशाची टचाई.

शके १८२७ आषाढ शु ८ स विवाह झाला. शके १८३३ मध्यें दत्तक जाण्याचा योग आला. नतर तीन वर्षांनीं दत्तक आईशी बेबनाव. दत्तक आईकडून सु. १५।२० हजाराची इस्टेट मिळाली घरांतील भांडण तत्यामुळें व्यापाराकडे दुर्लक्ष व त्यामुळें सावकारी बुडाली. दत्तक आईच्या सवतीच्या भावाबरोबर भागिदारीत दुकान होते ते कायम राहिले ता. ३०।६। १९१८ रोजी दत्तक आईशी तडजोड होऊन तिनें अन्नवस्त्राकरता घरील मामाचे दुकानांतून दरमहा पचवीस रुपये घेत जावे असे ठरले व्यापारात आलेल्या नुकसानीमुळें कलकत्यास भावाकडे प्रयाण. तेथें भावास व्यापारात नुकसान आल्यामुळें जवळचे डागडागिणे सर्व जाऊन सन १९२१ मध्यें पुन्हा स्वदेशी आले व नागपूर येथें दरमहा ७५ रु. पगारावर नोकरीस सुरवात १९२५ च्या

आक्टोबरमध्यें आजारी व त्यामुळें नोकरी सोडावी लागली सन १९२६ च्या सप्टेंबरमध्यें पुन नोकरीस सुरवात आणि सन १९२६ ता २१ नव्हेंबर रोजी मालकाकडून चांगल्या पगाराच्या बढतीवर परदेशी प्रयाण सन १९३० च्या एप्रीलपासून नव्हेंबरपर्यंत अतिशय नुकसान व त्यामुळें ता ३।११।३० ला नोकरी सुटली सन १९३० च्या डिसेंबर महिन्यात पुत्रप्राप्ति, ता. २।४।३१ रोजीं बधूनीं विश्वासघात केला आणि परत स्वदेशी आले त्यावेळीं नगदी बरीच रक्कम जवळ होती पण येथें आल्यावर मागील कर्जाची फेड व शके १८५५ फाल्गुनमासी मुलाचे व मुलीचे लग्न केले त्यात जवळचे सर्व पैसे खर्च झाले ता ९।१२।३३ रोजी मामाकडून दुकानचा तुमचा सबध तोडला म्हणून नोटीस आली व त्यामुळें दत्तक आईस अन्नवस्त्राचे पैसे मिळत होते ते रद झाल्यामुळें त्यानीं अन्नवस्त्राचा कोर्टांत दावा केला तो हल्ली कोर्टांत चालू आहे. मामाकडून दुकानचे बाबतींत नोटीस आल्यामुळें त्यावर ता १०।७।३४ रोजी कोर्टांत दावा दाखल केला त्याचा निकाल ता ४।१।३५ रोजी झाला त्यात मामास आम्हास हिशेब समजावून सागण्याचा कोर्टानें हुकूम दिला पण त्याप्रमाणें हिशेब न दाखविता दत्तक मातोश्रीस आमच्याशी भाडणाचे कामात उत्तेजन देत आहे व याचे पैसे मामा दाबून बसला आहे

नियमबद्ध विशेष अशी दैनिक आराधना करण्यास सुरवात केल्यास त्यात हटकून खड पडतो.

कुडली क्रमांक ४५

शके १८०३ वैशाख शु ५ श्रीसूर्योदयी जन्म ता. ३ मे सन १८८१.

जन्म-लग्न कुडली.

वयाच्या ५।६ वर्षाच्या दरम्यान द्रव्याच्या बाबतींत वडिलांचे डोके फिरून नोकरी जाण्याची वेळ आली पण डॉक्टरनें हा मनुष्य कामास लायक आहे असे ठरविल्यानें नोकरी पुन कायम झाली एकदर भावडे ७ त्यात बहिणीची सख्या जास्त ह्यात फक्त एक बहीण पण तिचेही प्रेम नाहीं. उलट तिचे बाबतींत पैशाचे नुकसान.

वडिलांचा मृत्यु सन शके १८२४ मार्ग कृ ३० प्रेगनें.
मातोश्रीचा मृत्यु पौष कृ २ शके १८२४ प्रेगनें
बहिणीचा मृत्यु शके १८२४ पौष शु ११ प्रेगनें
विवाह शके १८२१ ज्येष्ठ शु ३
प्रथम सततिकन्या शके १८३६
कु. स. ६

आतापर्यंत एकदर सतति ५ पैकीं हयात ३ पुत्र. दोन कन्या अपघातानें मयत त्याच्या वयाच्या ५ व्या वर्षी. प्रथम कन्येचा मृत्यु शके १८४१ आश्विन शु. ११ जलाघात.

द्वितीयकन्येचा मृत्यु आश्विन कृ ३० शके १८५२.

शिक्षणास सुरवात वयाच्या ६ वर्षी, शिक्षण समाप्त वयोवर्षे २१ मराठी शिक्षण संपूर्ण, बाकी शिक्षण परिस्थितीमुळें अर्धवट सोडावें लागले. शिक्षणाकरिता श्रीमान व घरंदाज घराण्यात आश्रय पण काहीं आकस्मित कारणामुळें तो लवकरच सुटला.

प्रथम नोकरीस सुरवात वयोवर्ष २१ व्यापाऱ्याकडे, वयोवर्ष २२ एका कंपनीची एजन्सी व अतिशय नुकसान वयोवर्षे २३मध्यें सोने, मोती, जवाहीर वगैरेचा व्यापार व त्यात भागिदाराचे कारस्थानामुळें स्वत वर भयकर प्रसग पण दैविक आराधनेमुळें त्यातून पूर्ण निर्दोषी सुटका.

वयोवर्षे २४ ते २७ नवीन धद्यास सुरवात, त्यात अतीशय प्रवासाचे योग. मानसन्मानाचे प्रसग, लौकिकांत भर, द्रव्याची अतिशय उलाढाल व फायदा पण शेवटीं नुकसान भागिदारामुळें, याच कालात परस्त्री समागमाचे योग.

वयोवर्ष २८ पासून व्यापाऱ्याकडे पुन नोकरीस सुरवात ती वयोवर्षे ३५ पर्यंत त्यांत मान सन्मान, लौकिक, द्रव्यदृष्ट्या फायदा व पूर्ण सुखदायक असा काल गेला.

वयोवर्षे ३७ पासून भागीदारींत पुन धद्यास सुरवात तो धदा ४ वर्षे व्यवस्थित चालु होता नतर त्यातही तटे बखेडे उत्पन्न होऊन अनेक आपत्ती व द्रव्यदृष्ट्या अतिशय नुकसान.

वयोवर्षे ४१ प्रथम पुत्र प्राप्ति. वयो वर्षे ४३ द्वितीय पुत्र प्राप्ति.

वयोवर्षे ४२ पुन स्वतत्र धद्यास सुरवात. वयोवर्षे ४४ पर्यंत धदा फायदेशीर चालून त्याच वर्षी स्वत च्या आजारपणामुळें धदा बद करावा लागला.

वयोवर्षे ४९ पुन भागिदारीत नवीन धद्यास अश्विन शु. १० स सुरवात व तो सुमारें सात महिने चालून द्रव्याभावामुळें बद करावा लागला.

वयोवर्षे ५३ पासून पुन एका श्रीमान व्यापाऱ्याकडे नौकरीस सुरवात झाली असून ती आजपर्यंत कायम आहे.

आजपर्यंतच्या घडलेल्या सर्व हकीकतीचा त्रोटक आढावा वर दिला आहे त्यावरून विचार करता असे स्पष्ट दिसते कीं, या कुडलीचे मनुष्यास भागिदारीत धदा करणें केव्हांही फायदेशीर झालेले नसून उलट त्यामुळें नुकसानीचे व आपत्तीचेच प्रसग ओढवले आहेत. या कुडलीचे इसमानें यापुढें तरी कोणताही धदा करावयाचा तो भागिदारीत न करता स्वतत्रच करणे श्रेयस्कर आहे

वरील कुडलींत लग्नात असलेले पांच ग्रह व सातल्या त्यांत रवि शनीचा एकत्र योग हाच भागिदारीचे धद्यात नुकसान देण्यास कारणीभूत झाला आहे. रवी हा प्रबल ग्रह लग्नी उच्च असल्यानें स्वभाव धाडसी मानी व हेकेखोरपणा, जास्त नवमस्थानचा अधिपति गुरु लग्नी मित्रक्षेत्रात असून त्याची पूर्ण दृष्टी नवमस्थानीं स्वक्षेत्री असल्यामुळें, धार्मिक गोष्टींवर श्रद्धा, धार्मिक कृत्याची आवड, धर्मावर प्रेम व धर्मासबंधी आदर या सर्व गोष्टी असल्या तरी गुरु

स्वतंत्र नसून निरनिराळ्या वृत्तीच्या पांच ग्रहानें युक्त असल्यामुळें धार्मिक गोष्टी नेहमीं हातून घडाव्या अशी इच्छा प्रबल तरी त्यांत अनेक अडचणी उत्पन्न होऊन घडणें मात्र दुरापास्त होईल असें योग.

वरील कुंडलीत कुटुंबस्थानीं केतु हा खलग्रह असून त्या स्थानचा अधिपति शुक्र लग्नांतील पंचग्रहींत सामील झालेला असल्यामुळें कौटुंबिक सौख्य या कुंडलीचे इसमास पूर्ण समाधानकारक असें मिळणें दुरापास्त आहे. उलट कुटुंबांतील मंडळीकरतां द्रव्याचे बाबतींत नुकसानीचे प्रसंग जास्त.

• वरील कुंडलींत मंगळ व्ययस्थानीं असून त्याची पूर्ण दृष्टी तृतीयस्थानीं, षष्ठस्थानीं व सप्तमस्थानीं असल्यामुळें या कुंडलीचे मनुष्यास, भावंडांचे व स्त्रीचे सौख्य पूर्ण समाधानकारक केव्हांही मिळणें दुरापास्त आहे.

## बॅरिस्टर रामराव ऊर्फ अण्णासाहेब देशमुख एम्. एल. सी.

कुंडली क्रमांक नं. ४६

ता. ५ नोव्हेंबर १८९२ सूर्योदयात् गत घ. ३१ प. ३३ जन्म उमरावतीनजीक.

संधिरहित निरयन भाव कुंडली.

४
२ने
रा
१
३
५
१२गु
६ श.
ह
शु ७
के
बु. ९
११म
२ ८
चं १०

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| प्रथमभाव | २।१३।२५।३७ | | | सप्तमभाव | ८।१३।२५।३ | | |
| द्वितीयभाव | ३ | ८ | ० | अष्टमभाव | ९ | ८ | ० |
| तृतीयभाव | ४ | ४ | ० | नवमभाव | १० | ४ | ० |
| चतुर्थभाव | ५ | ४ | ० | दशमभाव | ११ | ४ | ० |
| पंचमभाव | ६ | ५ | ० | एकादशभाव | ० | ५ | ० |
| षष्ठभाव | ७ | ४ | ० | द्वादशभाव | १ | ४ | ० |

रवि. ७-१५-२६-५३ बुध ८–७–२–३ रा. ०-१७-५६-३७
चंद्र. ९-२३–३-३७ गुरु ११-२६-५७-५१ हर्शल ६-१९-४३–७
मंगळ १०-२१–७-४२ शुक्र ६–८-१३–६ नेप. २-२१-४१-३७
शनि ५-२१-४४-३

किं कुर्वंति ग्रहाः सर्वे यस्य केंद्री बृहस्पतिः
मत्तमातंगयूथानां भिनत्त्येकोपि केसरी

वरील कुंडलीचा कांहीं अंशीं स्वतंत्र विचार केलाच जाईल. पण प्रथम तिचा एका दुसऱ्या कुंडलीशीं तौलनिक विचार करण्याचें ठरविलें आहे. अर्थात हा विचार करतांना त्यांनीं आपल्या ध्येयसाफल्यार्थ जे मार्ग स्वीकारले आहेत ते चांगलें किंवा वाईट अथवा त्यांचें वैयक्तिक महत्त्व किती ह्या विचारांशीं मुळींच कर्तव्य नाहीं. बहुजनसमाजासमोर आणण्यास कोणते योग कारणीभूत होतात, कांहीं एक काल अथवा सर्व आयुष्यभर एकाच किंवा समान ध्येयाच्या मार्गे लागलेल्या, मोठमोठालीं अचाट कृत्यें करणाऱ्या पुरुषांच्या जन्मकाळीं ग्रहयोग कसे असतात, ते फलद्रुप कसे होतात हें पाहून त्यांत सर्वसामान्य अशीं तत्त्वें कोणतीं निघतात, हेंच फक्त आपणांस क्रमाक्रमानें पहावयाचें आहे. हा उद्देश तौलनिक विचारपद्धतीनें उत्तम साधतो म्हणून हा विशिष्ट प्रकार योजिला आहे.

अण्णासाहेब ब्यॉरिस्टर आहेत व राजकारणांत पडले आहेत. ते रावबहादुराप्रमाणें एकदां दिवाणही झाले आहेत व महत्पदास पोंचले आहेत. प्रस्तुतकाळीं ते जनतेसमोर चमकत आहेत. अर्थात त्यांचे कुंडलींत महत्पददर्शक योग असला पाहिजे व रावबहादुराप्रमाणेंच तो योग म्हणजे दशमस्थ गुरु होय. दशमस्थ गुरु मोठेपणा, राजमान इ. देतो हें तर सुप्रसिद्धच आहे. तथापि एक गोष्ट विशद करावयाची आहे. गुरु हा समुच्चयावाचक ग्रह आहे. दशमस्थान हें कर्मक्षेत्र आहे. यामुळें दशमस्थ गुरु कर्मक्षेत्राचा समुच्चयापाशीं संबंध आणतो. अशा मनुष्याचें कर्मक्षेत्र *वैयक्तिक नसून त्याचा संबंध बहुजनसमाजाशीं व संस्थाशीं येतो. दुसऱ्या शब्दांत म्हणावयाचें* म्हणजे असा मनुष्य लोकांपुढें येतो व आपल्या मताप्रमाणें लोकहित अमुक मार्गांत अगर ध्येयांत आहे हें ठरवून लोकहिताकरितां श्रम करितो. दशमस्थ गुरु मोठेपणा, राजमान, समुच्चयसंबंध देतो ही गोष्ट खरी असली तरी त्या मोठेपणाची मातब्बरी ठेवण्यास बुद्धियोगाची, चिकाटीची व सतत परिश्रमाची जोड लागते हें सांगावयास नकोच आहे. ती जोड रावबहादुरांच्या कुंडलीप्रमाणें ह्यांतही आहे. गुरु बुध त्रिकोण व बुध शुक्र लाभ हे बुद्धीयोग व शनि नेपच्यून त्रिकोण हा अध्यात्मिक पण व्यवहारांत चिकाटी स्वरूपानें प्रगट होणारा योग ह्याहि कुंडलींत आहे. ह्या *योगामुळें दशमस्थ गुरुनें एऱ्हवीं येणारा नामधारी मोठेपणाच दिसत नसून* प्राप्त झालेल्या मोठेपणानें लोकांवर छाप बसविण्याची, योग्यतेनुरूप महत्त्वाचीं कृत्यें करण्याची, मोठेपणाचें खरें खरें सार्थक करण्याची शक्तीहि व्यक्त होत आहे. अर्थात हीं शक्ति चलित ग्रहयोग जसजसे फलद्रूप होत जातील तसतशी प्रगट व प्रखर होत जाईल यांत शंका नाहीं.

कोणत्याही कुंडलींत राजकारणांत पडणारे योग म्हणजे दशमस्थ गुरु असून एकादशस्थ ग्रह हे होत. आंग्लज्योतिर्विद राहूला शुभग्रह मानतात. तो या कुंडलींत एकादशांत असल्यामुळें अण्णासाहेबांस राजकारणांत पाडण्यास कारणीभूत झालाच असेल. तेंच पंचमेश शुक्राच्या पंचमांतील *वास्तव्याविषयीं म्हणतां येईल. ह्या कुंडलींतील राजकारणाचे विशिष्ट योग म्हणजे मूळ तारकापुंजांतील* ( नक्षत्रांतील ) बुध, व लग्नेश ( बुध ) दशमश ( गुरु ) यांचा शुभकारक त्रिकोण योग हे होत. मूळ नक्षत्र हें राजकीय उलाढाली करणारें आहे. लग्नेश दशमाचे योग राजकारणी पुरुषांच्या, पार्लमेंट अगर कायदेकौन्सिल अशा संस्थांच्या सभासदांच्या कुंडल्यांत सांपडतात. तसेंच केंद्रांतून झालेला शनि व दशमेश गुरु यांचा समसप्तम हा योग या बाबतींत महत्त्वाचा आहे. या योगा-

विषयीं सूर्यनारायणराव म्हणतात. "If Shani is in trines, Quadrants of Mool trikona is exalted or aspected by the lord of 10 the person becomes a statesman" शेवटच्या or ऐवजी and *असारें असें आम्हांस वाटतें. यावरून जन्मकाळीं राजकारण योग किती* बलवान होते व अण्णासाहेब कौन्सिलांत का गेले व दिवाण कां झाले हें स्पष्ट दिसेल.

कोणत्याही महत्त्वाच्या कुंडलींत प्रधानकीचा योग म्हणजे दशमस्थ गुरुशीं झालेला दशमेश व पंचमेश मंगळाचा त्रिकोण. अधिकारप्राप्तीस दशमस्थानाशीं रवीचा किंवा मंगळाचा संबंध जवळ जवळ आवश्यक दिसतो. प्रस्तुत कुंडलींत अधिकाराचे योग * मनोहर झालेले आहेत. गुरु दशमांत व तोच स्वतः दशमेश, अशा गुरुशीं चंद्रानें किरण परिवर्तन करून (कारण तो रवी गुरूच्या अगदीं मधोमध आहे) रवीशीं अत्यंत शुभ असा त्रिकोण योग घडवून आणला आहे. लग्नेशाविषयीं वर लिहिलेंच आहे ह्यावरून अनुकूल चलित ग्रहयोग प्रसंगीं यानाहि प्रधानकी आहे हे स्पष्टच दिसून येतें. तसें जेव्हां होईल तेव्हां दशमेश गुरु विद्यावाचक असल्यामुळें व त्याचा रुग्णालयदर्शक व्यय व षष्ठस्थानातील नेप्च्यून बुधाशीं संबंध असल्यामुळें तशाच प्रकारचा अधिकार योग त्यांना आहे. वर्त हें सांगून ठेवलें पाहिजे कीं, ज्याचा दशमेश गुरु असतो *त्याचा शिक्षणविषयक संस्थाशीं कोणत्या तरी प्रकारें निगडित संबंध येतो अण्णासाहेबांचा* नागपूर युनिव्हर्सिटीशीं आतापर्यंत बराच संबंध आला असून ते सध्या युनिव्हर्सिटी कोर्टाचे सभासद आहेत.

रावबहादुरांना विपन्नावस्थेंतून व 'भिक्षांदेही' करून वर यावें लागलें. अण्णासाहेब श्रीमंत स्थितींत उत्पन्न झाले असून पैशाची विवंचना त्यांना कधींच पडली नाहीं याचीं कारणें स्पष्टच आहेत रावबहादुरांचा लग्नेश चंद्र व धनेश रवि हे शनि व धनस्थ मंगळानें ग्रस्त झाले होते, पण अण्णासाहेबांचे कुंडलींत धनेश चंद्र शनीशीं व सुर गुरूशीं शुभसंबंधित आहे.

सर्वांस हे माहीतच आहे कीं, कर्तृत्वान पुरुषांच्या कुंडल्यांत कांहीं महत्त्वाचे कुयोग असतातच. रवि मंगळ केंद्र हा दोन्ही कुंडल्यांत सांपडतो. शिवाय अण्णासाहेबांचे कुंडलींत स्वतंत्र असे दोन कुयोग सांपडतात ते रवि, नेपच्यून व शनि गुरु याचे प्रतियोग हे होत. ह्या योगांचे परिणाम म्हणजे वैयक्तिक रूपानें येणारे अडथळे आणि विरोध हे होत. नेपच्यून व्ययांतून तर शनि चतुर्थांतून प्रतियोग करीत आहे. म्हणून हे योग आयुष्याच्या शेवटच्या भागावर विशेषतः परिणाम करतील चतुर्थस्थ शनि आयुष्याचा शेवट कटाळवाणा व त्रासदायक दर्शवितो. व्ययस्थ नेपच्यून एकांतवास (मग तो शरिर प्रकृतिमुळें हॉस्पिटलांत असो किंवा कसाही असो.) व कांहीं प्रसंगीं लोकमत विरुद्ध कर्में दर्शवितो. हीं फळें अर्थात् मिळतीलच, पण ह्या प्रतियोगांत एक वैचित्र्य आहे. चतुर्थस्थ शनीवरील गुरूचा प्रतियोग साधुवृत्ति देतो. रविनेप्च्यून प्रतियोग त्यागशील बनवितो.

---

* जन्म कालांत ८-९ मिनिटांचा फरक असल्यास बुध मध्यमांत येतो व मग सूर्यनारायणरावांच्या मताप्रमाणें अर्ध चंद्र योग होतो. ह्या योगाचें फल "Popular handsome repected in, great minister or Secretary to, the Government" असें आहे. त्यावरून जन्मकालांत थोडा फरक असावा असें वाटतें

कारक आहे. तो बुद्धिस्थानांत असल्यामुळें वर सांगितलेल्या उपासनेंत व धार्मिक कल्पनांत स्थित्यंतर ( नास्तिकपणा नव्हे. कारण मं. ह. शुभ संबंधित आहेत. ) होणें अपरिहार्य होतें व तें तसें झालेंहि. कारण आतां पूजाअर्चादि विधि सुटले असून बुद्धितत्वांतच कायतें आस्तिकत्व व धर्मनिष्ठा बीज रूपानें वास करीत आहेत. ह्यावरून असें दिसतें कीं, पंचमस्थ ( किंवा नवमस्थ ) हर्शल सगुणापासून निर्गुणाकडे वळवीत असावा. हा अनुभव इतरत्र पडाण्यासारखा आहे.

मागें सांगितलेल्या मं. गु. च्या समक्रांतीच्या काळांत पुढील योग अमलांत आले असतां ह्यांचे रामेश्वर, पंढरपूर, कुंभकोणादि अनेक तीर्थक्षेत्रांस जाणें झालें. "चर त्रिकोण गु; च चं. लाभ ने, श त्रिकोण गु र च मं युति इ; च बु शु हा काल म्हणजे सन १९०५ होय.

सन १९१०-११ मध्यें चं च युति गु चं श त्रिकोण चं ह योग होत असतां त्याचें बडोदास जाणें होऊन राजेरजवाड्यांशीं मुलाखती झाल्या.

नवमस्थान परदेशगमनाचे, जलपर्यटणासारख्या लांबच्या प्रवासाचें आहे. त्यांत मंगळ हा चरस्वभावी ग्रह आहे. चंद्र सागरेश्वर नेप्च्यूनशीं सख्य ठेवीत आहे. ह्यामुळें त्यांना लांबलांबचे प्रवास, परदेशगमन व जलप्रवास व्हावयाचे होते व तसें झालेंहि. सन १९११ एप्रिलमध्यें जल-प्रवासदर्शक ' च द लाभ चं ने ' योग होत असतांना त्यांचें विलायतेस शिक्षणाकरितां प्रयाण झालें. अजूनहि लांबलांबचे प्रवास चालूच आहेत. त्याचें कारण म्हणजे जन्मकालीन योगाला सहाय्यक असें त्यांच्या नवमस्थानांतील हर्शलचे भ्रमण हें होय.

ते विलायतेस बॅरिस्टरीकरितां गेले. बॅरिस्टरीचे योग त्यांचे जन्मकाळीं स्पष्टच दिसत होते. दशमस्थ गुरु, धनेतला बुध, पंचमेश शुक्र पंचमांत आपल्यापरी कार्यांत प्राविण्य दर्शवीत होते. पण त्यांना बॅरिस्टर करणारा सर्वांत प्रमुख योग म्हटला म्हणजे उपजीविकेश गुरूचा कायदे पंडित धनुस्थ बुधाशीं झालेला नवपंचम योग होय. विलायतेस अभ्यासक्रम चालला असतांना लवकरच विषेत यश देणारें व धनोत्पादक योग १९१५-१६ चें दरम्यान आले तें असे.

झालेला नवपंचम योग होय. विलायतेस अभ्यासक्रम चालला असतांना लवकरच विषेत यश देणारे व धनोत्पादक योग १९१५-१६ चें दरम्यान आले ते असे.

'चरयुति बु लाभ शु' ,च च युति बुध लाभ शु' 'च द युति गु'

ह्या योगांवर ते बॅरिस्टर झाले, व स्वदेशास परत येऊन धंदा करूं लागले.

अर्थात् तेव्हांपासून त्यांचा उत्कर्ष सुरू झाला व जसजसे शुभग्रहयोग येऊं लागले तस-तसें यश व कीर्तीची एकेक पायरी ते चढूं लागले. त्या वेळचे योग येणेंप्रमाणें:—

| | |
|---|---|
| १९१७ नोव्हेंबर<br>च द युति गु, च गु युति च द<br>श शु अर्धलाभ गु. च च लाभ च मं. शु. | बेळगांव येथील मराठा परिषदेचे अध्यक्ष झाले. |
| १९२० नोव्हेंबर<br>च च लाभ द, च बु सम च<br>च च सम ने. शु. बु. | दोन्ही वेळां कौन्सिलांत आले. |

१९२२ नोव्हेंबर
च शु युति र च चं त्रिकोण शु. चं
च च सम श. चं
} ऑल इंडिया कांग्रेस कमेटीचे मेंबर झाले.

उपजीवकेश गुरू हा शनीकडून पीडित आहे, म्हणून त्यांच्या बॅरिस्टरींत मधून मधून व्यत्यय येणें साहजिक आहे. आणि तसला व्यत्यय गोचरीनें शनि गुरूशीं मूळचा प्रतियोग करीत असतांना आलाहि पण होता.

नवमेश व शेतीशीं संबंध दर्शविणारा शनि स्थावरवाचक चतुर्थांत असून त्याचा धनेशाशीं शुभ संबंध झाला आहे. त्यामुळें यांना भूमिलाभ व शेतीवाडीचें सुख व्यक्त होत आहे. त्याप्रमाणें आहेही. ह्या योगामुळें व हर्शल शुक्राच्या पंचमांतील व चंद्राच्या अष्टमांतील वास्तव्यामुळें भूमिगत किंवा लाटरी वगैरेंत, मृत्युपत्राधारें किंवा अशाच कांहींतरी प्रकारे अचानक द्रव्यलाभ होण्याचा संभव दिसतो.

चंद्र हर्शलनें पीडित आहे. सप्तमेशाचा प्रतियोग झाला आहे. हे योग लग्न उशिरां दर्शवीत होते. गुरू-शुक्राचा प्रतियोग फार दूरचा असल्यामुळें तो लवकर लग्न घडवून आणण्यास समर्थ नव्हता. म्हणून त्यांचे लग्न वयाच्या ३० व्या वर्षी झालें. सप्तमेश दशमांत बलवान असून तो लग्नेशाशीं शुभ संबंधित आहे. म्हणून पत्नि राजकुलांतली मिळाली. पतिपत्निप्रेम बरें राहील. विवाह काळी लग्नवाचक 'च शु युति र' हा योग चालू होता. लग्न १९२२ मे मध्यें झालें.

पंचमांत शुक्र व केतु आहेत. हे दोन्ही प्रथम कन्यासंतति दर्शवितात. त्याप्रमाणें शनि गुरू पंचमांत गोचरीनें येतांच त्यांना जुलै १९२३ मध्यें कन्यारत्न झालें.

## विशेष महत्त्वाचें योग.

बॅरिस्टर देशमुख यांचा आयुष्यक्रम फार विलक्षण झालेला असून त्यांच्या आयुष्याचा चढता काळ सारखा वाढत आहे. लोकमान्य टिळकांच्या राष्ट्रीय पक्षाचे, लो० टिळकांच्या राष्ट्रीय तत्वांचे आणि टिळक परंपरेचे ते कट्टे पुरस्कर्ते असून वऱ्हाड–मध्यप्रांतांत यांची राष्ट्रीय कामगिरी अत्यंत उज्वल अशीच आहे व ती परंपरा त्यांनीं अद्याप चालविली आहे. त्यांच्या राष्ट्रीय उज्वल कामगिरीस प्रारंभ झाला आणि राष्ट्रीय सार्वजनिक कामांत यांनीं मोठ्या धडाक्यानें सुरवात केली ती साताऱ्याच्या प्रांतिक परिषदेच्या अधिवेशनापासून. ह्या राजकीय परिषदेचे हे अध्यक्ष होते आणि अध्यक्षस्थानावरून यांनीं केलेले भाषण फार जोरदार, सडेतोड आणि राष्ट्रीय विचारानीं ओथंबलेले होते. तेव्हांपासून आज तागायत हिंदुस्थानच्या राजकीय चळवळींत वऱ्हाड मध्यप्रांताचे प्रमुख पुढारी म्हणून एकसारखें चमकत आहेत. ह्यांची घरची इस्टेट दांडगी असून, म्युनसिपालिट्या, लोकलबोर्डे, प्रांतिक कौन्सिले, राष्ट्रीयसभा, प्रांतिक कमिट्या, ऑलइंडिया कांग्रेस कमिटी इत्यादि संस्थांत त्यांनीं जोरदार काम केले असून मध्यंतरी हे वऱ्हाड--मध्यप्रांताचे दिवाणही झाले होते. इतक्या उच्च दर्जाला पोंचलेल्या ह्या महनीय पुढाऱ्याची कुंडली खरोखरच विचार करण्यासारखी आहे व त्यांतील योगही उच्चस्थानदर्शक, व योगकारक आहेत.

कुंडलीक्रमांक ४७

स्वस्ति श्रीमन्नृपशालीवाहन शके १७९६ भावनाम संवत्सरे, कार्तिकेमासे शुक्लपक्षे १३ तिथौ घ. ५१ प. ४३ सह १४ मंदवासरे, अश्विनी न. घ. ५२-४ परंभरणी न. व्यतिपात योगे घ. ३६-४२ कौलवकरणे घ. २४ ता. २१।११।१८७४ इ. रोजीं श्रीसूर्योदयात् ग. घ. ५६ तत्समये रा. रा. वासुदेव रामचंद्र पेठे याचा जन्म. जन्मठिकाण वरसई. वरसई हा गांव पेणच्याजवळ आहे.

जन्मलग्न कुंडली

शुभभंवतु.

(१) या कुंडलीवाल्याचे वडील रामचंद्र जनार्दन पेठे हे मुक्काम **श्रीगणपतीचें महड, तालुका कर्जत, जि. कुलाबा, पेटा खालापूर,** येथें राहणारे होते.

(२) **वरसई** हें कुंडलीवाल्यांचें आजोळ असल्यामुळें त्याचा जन्म तेथें झाला.

(३) रामभाऊ पेठे यांची अत्यंत गरीबी होती. स्वत जमीन करून ४।५ खंडी मात्र ते उत्पन्न करीत असत.

(४) रामभाऊ पेठे हे अत्यंत मेहेनती होते. ते श्रीगणपतीचे पूर्ण भक्त होते. त्यांनी स्वहस्तें विहीर खणून फुलझाडें व इतर केळीं, आंबे, फणस वगैरे झाडें लावून गरीबींत उत्तम तऱ्हेनें संसार चालविला होता.

(५) एकंदर चार भावंडें झालीं. त्यात वडील भाऊ, त्यानंतर बहीण, त्यानंतर कुंडलीवाले व त्यानंतर एक बहीण. या चार भावंडांपैकीं वडील बहीण, ही ता. १८।११।१५ रोजीं मयत झाली. बाकीचीं सर्व हयात आहेत.

(६) कुंडलीवाल्यांचे आजोबा (आईचे वडील) हे गणपतिभक्त होते. त्यांचा नित्यपूजेंतील गणपती कुंडलीवाल्यानीं वयाचे ३।४ थे वर्षी आजोबाजवळ पूजेकरितां मागितला, तो त्यांनीं दिला नाहीं. म्हणून चोरून आणून तुळशींत पुरून ठेविला. आजोबांस उपवास घडले व ते महाड मुकामीं आले. ते वेळीं वरील गणपति तुळशींतून काढून दिला परंतु श्रीगणपतीचे सूचनेवरून तो आजोबांनीं कुंडलीवाल्यांस दिला. तो गणपती अद्याप पूजेंत आहे.

(७) कुंडलीवाल्यांस मावशा, आजोळचें गोत व इतर नातेवाईक मंडळी वरीच होती, व ती सर्व त्यावेळीं उत्तम सांपत्तिक स्थितींत होती. परंतु कोणाचाही उपयोग न होतां, कुंडलीवाल्यांची मुंज एका धनाढ्य सद्गृहस्थांनीं फार मोठा खर्च करून धर्मार्थ केली. वय वर्षे ११ असावें.

( ८ ) कुडलीवाले याना वडिलाप्रमाणेंच श्रीगणपतीची भक्ती जडली व १०।११ वे वर्षी तेथेंच ११२ तपस्वी सत्पुरुषाचें दर्शन घडून आशिर्वाद मिळाला

( ९ ) कुडलीवाल्याची बुद्धि जन्मापासून तीव्र होती. मराठी ३।४ इयत्तेपर्यंत अभ्यास १०।११ वर्षांपर्यंत झालेला होता.

( १० ) पुणें येथें वडिलांचा पूर्वापार कांहीं एक सबंध नव्हता. पुणें शहरही त्यांनीं पाहिलेलें नव्हतें.

( ११ ) आनदराव केशवराव खासगीवाले, फर्ड क्लास सरदार, हे पुणें येथील राहणारे होते. ते निपुत्रिक मयत झाले होते

( १२ ) आनदराव याची विधवा स्त्री सरस्वतीबाई होती त्यानीं दत्तक घेण्याचा बेत केला व कारकून, गडी वगैरे मडळीबरोबर पत्रें देऊन खेडोखेडीं मुलाचा शोध चालविला

( १३ ) शोध करितां करितां ही मडळी महाड मुक्कामीं आली व रामभाऊ पेठे यांचें मन वळवून कुडलीवाल्यांस व त्यांचे जनक आईबापांस बरोबर घेऊन पुणें मुक्कामीं आली तारीख ९।१० मार्च सन १८८६ असावी

( १४ ) कुडलीवाल्यांस सरस्वतीबाईनीं ता. १५।३।१८८६ रोजीं सशास्त्र विधीनें दत्तक घेतलें.

( १५ ) कुडलीवाल्याचें मूळचें **वासुदेव** नाव बदलून त्याचें नांव **केशव** ठेविलें अर्थात ता. १५।३।१८८६ रोजीं **केशव आनंदराव खासगीवाले** हें नाव मिळून कुडलीवाले हे १ लाख रुपये किंमतीच्या इष्टेटीचे मालक झाले नेसावयास पुरती लगोटीही मिळत नव्हती, त्या ठिकाणीं सोनें, मोती, जरीचे व रेशमी कपडे वगैरे पालखीपदस्थ स्थिति या दिवशीं प्राप्त झाली ही स्थिति प्राप्त होईल ही कल्पनाही मार्च सन १८८६ चे पूर्वी कोणास नव्हती असा हा अचानक योग वरील तारखेस घडून आला

( १६ ) दत्तविधान झाल्यानतर ५।६ महिनेच ही स्थिति कायम राहिली नतर दत्तक घेणार मातोश्रीचे कुडलीवाल्यांच्या जनक–वडिलाचें पटेनासें झालें व हें कृत्य एका त्रयस्थ मनुष्याच्या कारस्थानामुळें झालें

( १७ ) *या त्रयस्थ मनुष्यानें कुडलीवाले, त्यांचे जनक वडील व मातोश्री याना दत्तक* मातोश्रीपासून काढून आपले घरीं नेलें व कोर्टात तटे सुरू केले

( १८ ) सरस्वतीबाई यास भाऊ होता, तोच सरस्वतीबाई पगु असल्यामुळें वाद भांडू लागला व दत्तकच घेतला नाहीं असें म्हणू लागला

( १९ ) सन १८८७ सालीं त्रयस्थ मनुष्यानें कुडलीवाल्याचे जनक वडिलाकडून सरस्वतीबाईचे ताब्यांतून इष्टेट मिळविण्याबद्दलचा दावा पुणें येथील फ स कोर्टात मुकादमा न ३१५ चा आणला.

( २० ) या दाव्याचा निकाल ता ६।११।८८ रोजीं झाला या निकालानें दत्तक कायम झाला, परतु इष्टेटीचा कबजा सरस्वतीबाई हयात असेपर्यंत अगर दत्तक सज्ञान होईपर्यंत मागतां येत नाहीं असें ठरलें म्हणजे निकाल विरुद्ध झाला

(२१) या ठरावावर ना. हायकोर्टांत अपील नं. १३० सन १८८८ चें झालें. त्यांतही खालील ठराव कायम झाला (१।७।१८९१).

(२२) सरस्वतीबाई ह्या ता. १८।१२।१८८९ रोजीं मयत झाल्या.

(२३) पुन्हां पुणें फ. स. कोर्टांत मु. नं. ३८२ सन १८९१चा दावा एक दुसराच मुलगा मी दत्तक आहे असें म्हणूं लागल्यामुळें त्याचेवर व सरस्वतीबाईचे भावावर आणला. त्याचा निकाल होऊन दुसरा दत्तक रद्द झाला व इस्टेट कबजात मिळण्याचा हुकूम झाला. हा ठराव ता. ११।४।१८९२ रोजीं झाला. हा दावा चालूं असतां कुंडलीवाल्याचे जनक वडील परलोकवासी झाले (ता. ९।८।१८९२).

(२४) यावेळीं त्रयस्थ मनुष्यानें आपले नांवचें सर्टिफिकिट काढून काम चालविलें. ना. हायकोर्टांत अपील नं. १२५।८२२ चें झालें. त्याचा निकाल कुंडलीवाल्याचे तर्फे झाला. (ता. १।८।१८२२).

(२५) याप्रमाणें ता. १।८।१८९४ रोजीं सर्व इस्टेट कबजांत मिळावी वगैरे ठराव झाला. व कुंडलीवाले अज्ञान असल्यामुळें या त्रयस्थ मनुष्यानें सर्व इस्टेट डि. कोर्टाचे नाझर यांचे ताब्यांतून आपले ताब्यांत घेतली. कुंडलीवाले अज्ञान असल्यामुळें इस्टेटची वहिवाट नाझरसाहेबांकडे होती. ८।१० हजार रुपये रोख व दरसाल ३।४ हजार रुपये उत्पन्नाची इस्टेट या त्रयस्थ मनुष्याचे कबजांत आली (सन १८९४)

(२६) या वेळीं कुंडलीवाले हे इंग्रजी ४ थे इयत्तेंत होते. सन १८९६।९७ सालीं मॅट्रिक वर्गांत गेले. बुद्धिमत्ता उत्तम असल्यानें विलायतेंत जाऊन बॅरिस्टर होऊन येण्याची महत्वाकांक्षा होती.

(२७) कुंडलीवाले यांचें लग्न ता. २०।५।१८९५ रोजीं एका नामांकित सद्‌गृहस्थाचे मुलीबरोबर झालें. ही मुलगी अत्यंत सुरेख होती; परंतु तिचे एका बोटास देवीनें गुल झाला होता व त्यामुळें तें बोट पूर्णपणें वाढलें नाहीं.

(२८) या वेळेपासून त्या त्रयस्थ मनुष्याचे मनांत पातक उत्पन्न झालें व बरीच मोठी रक्कम शिल्लक असतां ती खाऊन जाऊन लग्नाकरितां कर्ज बरेचसें कोर्टाची परवानगी घेऊन त्यानें काढलें व इस्टेटीवर बोजा उपस्थित करून टेविला.

(२९) या गृहस्थानें ता. २३।११।१८९५ रोजीं डि. कोर्टांत अर्ज करून कुंडलीवाले सज्ञान झाल्याचें ठरवून घेतलें. कोर्टानीं कुंडलीवाले सज्ञान ठरविल्यावर कुंडलीवाल्यांच्या कडून सर्व हिशेब पाहिले व कागदपत्र पाहून घेतले वगैरे मजकुराच्या पावतीवर सही घेऊन सदर प्रकरण निकालांत काढविलें ता. १२।१२।१८९५. परंतु खरा प्रकार तसा कांहींच घडला नव्हता. विश्वासानें ह्या सह्या केल्या गेल्या.

(३०) नंतर ता. १७।१२।१८९५ रोजीं एका १०,००० दाहाहजार रुपयांचे दोन घरांचे खरेदीखतावर कुंडलीवाल्यांच्या सह्या घेऊन हें खरेदीखत रजिस्टर करवून घेतलें व ता. १९।१२।१८९५ रोजीं दुसरें १०,००० दहा हजार रुपयांचें पुण्यानजीक असलेल्या बागाचें खरेदीखत त्यानें आपल्या एका श्रीमान स्नेह्याच्या नांवचें लिहून त्यावरही सही घेऊन तेंही रजिस्टर

करून घेतलें. वास्तविक या खरेदीखतांची बिल्कूल आवश्यकता नव्हती. परंतु सर्व इष्टेट खाऊन जाण्याचे दुष्टबुद्धीनें कुंडलीवाल्यास फसविलें. १८८६ पासून १८९४ पर्यंत कुंडलीवाल्याचें पालन-पोषण केलें, त्यामुळें वडिलाप्रमाणें त्यांस मान देत असतांही द्रव्याचा मोह पडून ता. १७।१२।९५ व १९।१२।९५ रोजीं वर लिहिल्याप्रमाणें दगा केला गेला.

( ३१ ) मॅट्रिक परीक्षेचा अभ्यासक्रम योग्य रीतीनें चालू होता. सर्व व्यवस्था कुंडलीवाले जेरी कायदेशीर सज्ञान झाले होते तरी त्या त्रयस्थ मनुष्यानेंच चालविलेली होती. त्यामुळें त्या व्यवहाराबद्दल शंकासुद्धां आलेली नव्हती. परंतु पहिली सहामाहीची परिक्षा झाल्यानंतर एका मोठ्या सुप्रसिद्ध वकिलानीं कुंडलीवाल्यांस बोलावून सर्व चित्र डोळ्यासमोर उभें केलें व लग्नाकरितां राहता वाडा गहाण व इतर सर्व इष्टेटी खरेदी करून पालन करणाऱ्यानें घात केल्याचें सांगितलें व हे सर्व दस्तऐवज नकला आणून प्रत्यक्ष दाखविले, व आतां जर कोर्टांत फिर्याद ६ महिन्याचे आंत आणिली नाहीं तर सर्व इष्टेट गेली असें सांगितलें. त्यावरून पालन करणारानें कपटानें कसा गळा कापला हें ध्यानीं आलें व त्या मार्गास लागणें भाग झालें. येथें बुद्धीचें खोबरें झालें. विद्याभ्यास संपला. ( सन १८९७।९८ ) संकटें व कष्टास प्रारंभ झाला.

( ३२ ) ह्यावेळीं फिर्यादीचे खर्चाकरितां बरीच मोठी रक्कम कर्जाऊ काढण्याचा प्रसंग आला. फार यातायातीनें ही रक्कम मिळून पुणें फ. स. कोर्टांत ही खरेदीखतें रद्द करून घेण्या-बद्दल दावे दाखल केले. ( ता. १७।१२।९८ व १९।१२।९८ ).

( ३३ ) ह्या दोन्हीं दाव्यांचे निकाल ता. ३।११।१९०० रोजीं होऊन ही खरेदीखतें रद्द झालीं व हीं इष्टेट कबज्यांत मिळण्याचा हुकूम झाला.

( ३४ ) ह्या वेळींही पुन्हा अत्यंत तखलीफ उत्पन्न झाली. पूर्वीं फिर्यादीकरितां ज्यांचें कर्ज काढलें होतें त्यांनीं दरखास्त दिली व इष्टेटीचे लिलावापर्यंत पाळी आणली. त्यावेळीं रक्कम मिळ-ण्याकरितां रानोरान गांवोगांवीं हिंडण्याचा प्रसंग आला, अखेरीस एका परममित्रानें योग्य ती मदत केली ( १९०१ चा जानेवारी ). परंतु याच बाबतींत दुसऱ्याकडून पुन्हा फसलों गेलों व हें ग्रहण सन १९०४ मध्यें सुटलें. ह्यावेळीं जो मजवर प्रसंग आला तो लिहितां येत नाहीं. परंतु या आलेल्या प्रसंगामुळें तीन वर्षें स्वस्थ झोंप आली नाहीं.

( ३५ ) कलम ३३ मध्यें ज्या दाव्यांचा निकाल झाला असें लिहिलें आहे त्या दाव्यांवर नामदार हायकोर्टांत अपीलें झालीं. त्यांचा निकाल आपसांत तडजोडीचा झाला ( ता. २५।१२।१९०३ ). या निकालामुळें सर्वस्वी नुकसान झालें.

( ३६ ) पालन करणारानें पूर्वीं गहाणावर कर्ज काढलेलें होतें तें व्याजासुद्धां व या दाव्याचा झालेला खर्च याचा विचार करितां जवळ जवळ रक्कम ३५।३९ हजार रुपये झाली. हें कर्ज फिटण्यास साधन नाहीं. त्यामुळें इष्टेटी विकून कर्जमुक्त झालों ( सन १९०६।१९०७ ).

( ३७ ) सर्व वैभव नष्ट झालें. दत्तविधानानंतर वाडा सोडून बाहेर निघालों. सन १८८६ नंतर पुन्हा वाड्यांत परत राहण्यास गेलों ( सन १८९४ ) व पुन्हा वाडा विकून भाड्याचे घरीं राहण्यास गेलों ( ता. २।८।१९०६ ).

( ३८ ) भाड्याचे घरीं ३ वर्षे राहिलों. नंतर एक ल्हानसें पडीक घर घेऊन बांधून त्यांत राहण्यास गेलों ( ता. १।८।१९१० ). या दिवशीं पुन्हां स्वतःचें घर झालें.

( ३९ ) नाशिक जिल्ह्यांतही जमीनीचे तंटे सन १८९८ सालापासून चालूं झाले. त्यांत कांहीं आपसांत तुटले. कांहींचे निकाल अनुकूल झाले व कांहींचे प्रतिकूल झाले. ह्या दाव्यांपैकीं एक दावा सन १९१५ पासून सुरू आहे. त्याचाही प्रकार एकदां जिंकणें, पुन्हां बुडणें, पुन्हां जिंकणें, पुन्हां बुडणें असा क्रम चालू आहे. सन १९१५ पासून आजपर्यंत हा दावा चालू असून व निकाल कागदोपत्रीं सहीशिक्यांनिशीं अनुकूल असूनही कांहीं तोतये उभे राहिले आहेत. उत्पन्न व जमिनी मिळत नाहींत. पुन्हा कोर्टांत लवकरच हें काम चालूं करावयाचें आहे.

( ४० ) सन १९०३ सालीं एका अनाथ मुलीस संभाळली. तिच्या पुष्कळ खस्ता खाल्या. परंतु ती मुलगी जगली नाहीं. सन १९०६ सालीं ही मुलगी वारली.

( ४१ ) ह्याच वेळीं एका महान्सत्पुरुषांची ( श्री सद्‌गुरु बळभीमबोवा साडेकर ) भेट झाली. त्यांच्या अगाध ज्ञानसामर्थ्यामुळें व सहवासामुळें चित्तास स्वस्थता आली व सर्व आपत्तींस तोंड देण्यास धैर्य उत्पन्न झालें.

( ४२ ) ह्या सत्पुरुषांचे सहवासानें वेदान्तविषयाचें ज्ञान झालें व त्याचा परिणाम भक्ति, ज्ञान, वैराग्यपर लेख मुमुक्षु पत्रद्वारें लिहून प्रसिद्ध केले आहेत.

( ४३ ) उपासनेमुळें ईश्वरी साक्षात्कारही झालेले आहेत.

( ४४ ) पहिली बायको अपेंडिसाइटिसचे विकारानें ता. १९-१०-१९१२ रोजीं निवर्तली. तिला मूल वगैरे कांहीं झालें नव्हतें.

( ४५ ) ता. ११-२-१९१३ रोजीं दुसरें लग्न झालें. ही बायको कुलशीलवान घराण्यापैकींच मिळाली.

( ४६ ) या बायकोस ता. ११-४-१९१५ रोजीं मुलगी झाली व ही मुलगी ता. २७।३।१९१८ रोजीं देवीचे आजारानें निवर्तली.

( ४७ ) दुसरी मुलगी ता. १।१।१९ रोजीं झाली. ही मुलगी सुरेख आहे, बुद्धी फार तीव्र आहे. हिला देवी काढल्या असतांनाही ता. ७।१।१९२४ रोजीं देवी आल्या; परंतु त्यांतून ती बरी झाली आहे.

( ४८ ) तिसरी मुलगी ता. ४।८।१९२३ रोजीं झाली आहे. ही मुलगी सुरेख आहे.

( ४९ ) ज्योतिष्यशास्त्र काय आहे हें पाहाण्याची तीव्र इच्छा उत्पन्न झाली (४।८।२३).

( ५० ) ता. ५।८।२३ रोजीं कांहीं ज्योतिषविषयक पुस्तकें आणून अन्य मदतीशिवाय सर्व याचून थोड्या काळांच्या आंत पत्रिका मांडून फलें काढण्यास सुरवात झाली व ज्योतिषविषयक भाग गळीं उतरून कामास सुरवात झाली.

( ५१ ) मुलीचा जन्म ता. ४-८-१९२३ रोजीं झाला व दुसरे दिवशीं ज्योतिषविषयास आरंभ झाला या ज्योतिषामुळें या चार महिन्यांत पुष्कळ थोर व सज्जन मंडळींच्या ओळखी झाल्या आहेत व पुष्कळ मंडळी जिवलग स्नेही बनली आहेत. ह्या गोष्टींचा अनुभव वयाचे ४९ वे वर्षी झाला आहे. यापूर्वी पंचांगसुद्धां पूर्णपणें पाहतां येत नव्हतें.

( ५२ ) जनक बाप श्री. रामभाऊ पेठे यांना वनस्पतींची अत्यंत माहिती होती, ती त्यांनीं मरणापूर्वी करून दिली. त्यामुळें असाध्य रोगही बरे करणारीं औषधें व कांहीं न होणारीं भस्मेंही करीत होतो खोकला, दमा, मूळव्याध वगैरे पुष्कळ रोगांवरील औषधें पुण्यांत शेंकडों लोकांना आजपर्यंत दिलेली आहेत.

( ५३ ) हिंवताप वगैरे गंडे व लहान अगर मोठ्यास झपाटलें, भूतचेष्टेचे उपद्रव होत असले तर तोडगा करून देत असे. त्याचाही गुण येतो.

( ५४ ) एकंदरींत औषधें, भस्में, मंत्र, यंत्र, ज्योतिष, वेदांत वगैरे सर्व गूढ विषय अवगत झाले आहेत. जो विषय हातीं घ्यावा त्यात मती फार जलद होते. याप्रमाणें बुद्धीचा चमत्कार आहे.

( ५५ ) जेवढे स्नेही झाले व होत आहेत त्यांतील पुष्कळांनीं मजला बुडविलें आहे. नातलगांपासून उपयोग कधींच झालेला नाहीं व होतही नाहीं. माझी शरीरप्रकृति उत्तम आहे. मोठाली २—३ दुखणीं आजपर्यंत आलीं आहेत. तीं वयाच्या १५ ते २१ पर्यंतचीं आहेत. यावेळीं विषम वगैरे झाला होता. सन १८९८—९९ सालीं प्लेग झाला होता. त्यामुळें डोक्यास बराच त्रास झाला होता.

( ५६ ) पूर्व घरचे थोरले बंधू हे स्वभावानें विक्षिप्त आहेत. त्यांनीं पूर्व घरची जमीन घालविली आहे. १।२ वेळां मी बरेचसें द्रव्य देऊन सोडविली होती. त्यांचें लग्न मींच केलें आहे. त्यांचे कुटुंबाचे पोषणाचा बोजा माझेच शिरावर आहे. मधून मधून ते येथें येऊन राहतात व भांडण वगैरे करून निघून जातात. याप्रमाणें ४।५ वेळां घडून आलेलें आहे. परंतु सन १९२३ पासून ते सरळपणानें माझ्याशीं वागूं लागले आहेत व हल्लीं ते माझ्याजवळ राहत असून आनंद देत आहेत.

( ५७ ) माझी वडील बहीणही याच नमुन्याची होती. ती तारीख १८।११।१९१५ रोजीं गत झाली.

( ५८ ) जनक मातोश्री स्वभावही याच नमुन्याचा होता. तिचेपासून मला सुख लागलें नाहीं. नेहमीं तंटे करीत असे. ती ता. ४।८।१९०३ रोजीं परलोकवासी झाली.

( ५९ ) वर एकंदर सर्व हकीकत दिली आहे, त्यांत एक गोष्ट देण्याची राहिली आहे व ती न दिल्यास ज्योतिषविषयक अभ्यास करणाऱ्यांस शंका उत्पन्न होण्याजोगी आहे. ती न रहावी म्हणून देतों. ही गोष्ट ७ व्या स्थानाबद्दलची म्हणजे स्त्रीविषयक होय. या विषयासंबंधीं तारीखवार जत्री नाहीं. परतु सन १८८९।१८९१।९३।९५ पासून आजतागाईत निरनिराळे तऱ्हेचे प्रसंग आहेत. सन १९२०।२१ सालीं तसेंच सन १९०४ सालीं अनुभव अगदीं चमत्कारिक तऱ्हेनें आलेले आहेत, व ते पुरुषानीं पुरुषार्चा इच्छा करावी या कोटींतले आहेत. बरेच बुद्धिसामर्थ्यानें टळलेले आहेत; परंतु अगदींच देहास बाट लागला नाहीं, असें मात्र नाहीं. स्त्रियाचे बाबतींत प्रश्न नाहीं; परंतु इतर जे योग वर लिहिले आहेत त्याबद्दल विलक्षण अचंबा वाटतो.

येणेंप्रमाणें एकंदर आयुष्याच्या घडामोडी आहेत. वर कुंडली व जन्मवेळा नक्की दिली आहे.

असे ठरवून घेतले पण परिक्षक माझे विरुद्ध असल्यानें त्यांनीं मला नापास केले. सन १९३० मध्यें मुलींचे लग्न केले. माझी परिक्षा नापास झाल्यामुळें मी पुनः खालच्या जागेच्या नोकरीवर काम करूं लागलो व त्यामुळें सांपत्तिक हलाखी व कौटुंबिक माणसाकडून बेसुमार त्रास झाला. विशेषतः सन १९३२ पासून सांपत्तिकदष्टया व घरांतील माणसांच्या वागणुकीमुळें सतत तीन वर्षे अतीशय त्रास होत आहे. पत्नी साधारण सुशिक्षित पण विचार पटत नाहींत. संततिः—दोन मुली, दोन मुलगे. माझ्या आयुष्याचे सर्व निदान म्हणजे अपयश. सन १९०७ साली रेल्वेतील चांगली मान-सन्मानाची नोकरी दोनदा मिळण्याचा योग आला असता नाकारला. सन १९१६ साली खात्याच्या वरिष्ठांच्या अनुमतीनें बढती मिळण्याचा फार मोठा प्रयत्न केला परंतु त्यांत अपयश. असेच आणखी दोन तीनवेळ प्रयत्न केले पण त्यातही यश मिळालें नाहीं.

*ह्या व्यक्तीच्या कुंडलींतील ग्रहयोगवैशिष्ट्य असे आहे कीं, यानीं जिवापाड मेहनत करून आप्तवर्ग व कुटुंबातील मंडळी यांचें पालनपोषण करावें, ऐषआराम चालवावेत, पण याना कोणाकडूनही सुखासमाधानाचें शब्द नाहींत. ही फलें केंद्रस्थानांतील पापग्रहांची आहेत. रवि-शनि प्रतियोग जन्मतःच असल्यानें यांच्या कर्तबगारीला यावी तशी वैभवाची फलें आली नाहींत. पण दशमावर दृष्टी ठेवणाऱ्या गुरुनें संरक्षण व संवर्धन केले, यात शंकाच नाहीं. याच्या आयुष्याचा पुढील काल म्हणजे तूळ आणि धनुराशींतील गुरूचे परिभ्रमण याच्या अतृप्त इच्छा, व न घडलेल्या महत्वाकांक्षा यानां दीर्घ परिश्रमानें यश देईल व काळजीचे कारण उरणार नाहीं.

कुंडलीक्रमांक ४९

शके १८३० ज्येष्ठ शु. २ सोमवार श्रीसूर्यो. इ. घ. ३९ प. ४०

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

वरील कुंडली एका गरीब व दरिद्री मनुष्याची आहे. या कुंडलीचे आईबाप अद्याप हयात आहेत. बधू तीन व बहिणी चार आहेत. या कुंडलीचे आजाचे वेळीं गजात लक्ष्मी होती. माऊबंदकीमुळें यांचे वडिलांचे वेळेपासून सर्व संपत्ति जाऊन आज दारिद्र्यांत दिवस काढावे लागत आहेत.

वडील १०।१२ रुपयाची खाजगी नोकरी करून प्रपंच चालवित असत. सन १९२१ साली जमिनीसंबंधी दावा केला त्याचा निकाल १९२७ साली यानां अनुकूल असा झाला. १९२८ मध्यें त्यावर अपील होऊन त्याचा निकाल सन १९३० च्या डिसेंबरमध्यें अनुकूल झाला. निकालानंतर ३ रे दिवशी वडील बहिणीचा मृत्यु. पुढें १९३१ चे फेब्रुवारींत दाव्याचे बाबतीत ज्यानीं सर्व बाजूने साह्य केले ते या कुंडलीचे मामा मयत झाले.

त्यानंतर भाऊबंदांनी (वडिलांचे चुलत भायानी) ता.२९।८।३१ मध्यें मुंबई हायकोर्टात अपील केले. सन १९३२ साली अपील करणारा व त्याचा मुलगा आठ दिवसाचे अंतराने मयत झाले. सध्या अपील करणाऱ्यांचे नातू आहेत. अद्याप दावा बोर्डावर आला नाहीं. दाव्यातील आमचे हिश्शाचे उत्पन्न सालीना नऊशे रुपयांचे आहे. शिक्षण मराठी अपुरे. १९२६–२७ साली अत्यंत हलक्या दर्जाची नोकरी करावी लागली. ता. ५।११।१९२८ रोजीं रेल्वे पोलीसमध्यें वीस रुपयावर नोकरीस सुरवात झाली. ती अद्याप कायम आहे. १९२९ साली बदली. तेथें ३।४ महिने व्यवस्थेशीर नोकरी झाली. पुढें मलेरियाने १९३० अखेर सारखे आजारी नंतर डॉक्टर सरटिफिकिटावरून चांगले हवेचे ठिकाणी बदली झाली. याच वेळी वडिलानां वार्धक्यामुळें नोकरी होणें अशक्य झाल्यानें ते नोकरी सोडून सर्व मंडळीसह यांचे जवळ येऊन राहिले व त्यामुळें प्रपंचाचा बोजा यांचेवर पडला. १९३२ चे पूर्वार्धात संधिवातामुळें शारिरीक यातना फार व त्यामुळें दोन महिने आजारी. १९३२ डिसेंबर पासून एका हीन परस्त्रीशी संबंध व त्यामुळें उष्णविकारानें १९३३ सप्टेंबरपर्यंत आजारी. प्राणांतिक जिवावरचे दुखणे गेले ! १९३३ चे उत्तरार्धात पुनः बदली त्यामुळें शरीरसुख मिळूं लागले. १९३४ च्या एप्रीलमध्यें रेसमध्यें फायदा झाला व त्यावर जूनमध्यें धाकटे बहिणीचे लग्न केले. स्वतःचे लग्न अद्याप झालेले नाहीं. बदलीचा पुनः योग आला. सध्यां पुनः उष्णविकारानें त्रास सुरू झालेला आहे. नोकरींत मात्र अद्याप पर्यंत कोणतीही भानगड वगैरे झालेली नाहीं. यांचे वडिलांची राशी वृश्चिक आहे.

कुंडलीक्रमांक ५०

## रावबहादुर एन्. के. केळकर

### माजी दिवाण [ सं. फ. कऱ्हाड. ]

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

अत्यंत विपन्न स्थितींतून उच्च पदास पोंचलेल्या, किंवा वैभवाच्या शिखरावर यथेच्छ विहार करीत असतांना कडेलोट झालेल्या पुरुषांच्या कुंडलींचें क्षणभर अवलोकन केलें असतां, ईश्वरेच्छा किती प्रबल आहे, दैव किती बलवान आहे, किंवा ज्योतिषशास्त्र किती सत्य आहे. याची थोडक्यात पण खात्रीपूर्वक जाणीव तेव्हांच होते. प्रस्तुत कुंडली ह्या वर्गांतली आहे. रावबहादूर मूळचे विपन्न स्थितींतले असून ते उच्च पदास गेले आहेत. त्याना प्रतिकूल परिस्थितीशी झगडून स्वत्व स्थापन करावे लागलें. त्यांत त्यांची कर्तबगारी, त्यांचें आत्मतेज प्रगट होत आहे. ते वकील झाले, रावबहादूर झाले. त्यांनीं अनेक सार्वजनिक संस्थेंत भाग घेतले, को-ऑपरेटिव्ह फेडरेशनचे गव्हर्नर झाले, तीन वेळ लोकनियुक्त सभासद म्हणून प्रांतिक कौन्सिलांत गेले व शेवटीं प्रधान झाले. विशेष नवल हे कीं, आधुनिक कल्पनेप्रमाणें सुशिक्षित व विद्वान् गणलें जाण्यास अवश्य लागणारी डिग्र्याची सामुग्री त्यांच्याजवळ नसूनही त्यानीं तीन वर्षे विद्याखात्याची प्रधानकी केली. ह्या सर्व चमत्कार कशाचा ? 'प्राक्तन' म्हणून कांहीं तरी विशेष आहे. म्हणून हें असें.' हेंच थोडक्यात उत्तर देतां येईल प्राक्तनाचें द्योतक ज्योतिषशास्त्र आहे व तेंच याचें सविस्तर उत्तर देऊ शकेल.

अशा तऱ्हेच्या गोष्टी घडण्यास चांगल्या योगांची जितकी आवश्यकता आहे, तितकीच वाईट योगांचीही आहे. अनिष्ट परिस्थितिदर्शक कुयोग असले पाहिजेत व ते असतातच. पण ते अशा प्रकारचे असतात कीं, त्यात पुढील प्रगतीचे बीज गोवलेले असते त्यांतच कर्तृत्व, शक्तिस्फुरण पावत असते. प्रस्तुत कुडलींत ते योग कोणते व कसे फलद्रूप झाले हे पाहू.

रावबहादुरांचे कुडलींत रवि, चद्र, मगळ आणि शनि यांचे केंद्रप्रतियोग झालेले आहेत. हे योग नाना प्रकारच्या अडचणी व सकटें आणून आयुष्य खडतर करतात. पण ह्या योगांनीं मनुष्याच्या अगात धमक येते किंवा असते. विरोधाची किंवा प्रतिकूल मतांची फारशी परवा न करता, कसलीहि परिस्थिति प्राप्त होवो, तिला तोंड देण्याची व दोन हात दाखविण्याची असे योग असलेल्या मनुष्यांची तयारी असते. अशा मनुष्यांत पुढारीपणास आवश्यक असे बहुतेक गुण असतात व तो आयुष्यांत कधीना कधी तरी पुढारी बनतो. त्याची महत्वाकांक्षा जबर असते व त्याचें आयुष्य धडामोडीचें जातें. ह्या योगाला सहाय्यक असा शनि-नेपच्यूनचा त्रिकोणयोग आहे. हा वास्तविक आध्यात्मिक योग म्हटला पाहिजे. कर्त्या पुरुषाला आवश्यक असा त्यांत एक विशेष गुण आहे. तो म्हणजे विलक्षण चिकाटी. एखादी गोष्ट करावयाची असा सकल्प केला असतां तिच्याशीं तन्मय होऊन, माघार न घेता तिच्या सिद्धीकरतां प्रयत्नांची परमावधि करणें— हा होय. वरील सर्व कर्तृत्वशक्तीचे कर्ममार्गाचे योग होत. पण त्यांचेबरोबर त्याच प्रतीचे कांहीं बुद्धियोग नसते तर त्या कर्तृत्वशक्तीचा फारसा उपयोग झाला नसता. रावबहादुरांच्या कुंडलींत दोन बुद्धियोग आहेत. बुधगुरुच्या व बुधमगळाच्या त्रिकारेदश योगानें त्यांना सात्विक पण तीव्र बुद्धि लाभून त्यांना आपल्या ह्या सर्व योगांचे तेज तें नांवलौकिकास आले तेव्हां तर व्यक्त झालेंच, पण आयुष्याच्या पूर्वार्धांतही ते चमकत होते तिकडे आपण वळू.

रावबहादुरांचें कुंडलींत धनयोग, ऐश्वर्ययोग, उच्चस्थिति इत्यादि योग आहेत. धनेश* रवि-शनीनें व तसाच तो धनस्थ मंगळानेंहि पीडित आहे. लाभेश बुध व्ययांत आहे. ह्या योगामुळें त्यांना विपन्न स्थिति भोगणें भाग होती. स्वतःचें कांहीं नसल्यामुळें ते लहानपणीं आपल्या चुलत्याच्या घरीं होते. अर्थात त्या वेळेस त्यांना दारिद्र्य जाणवलें नाहीं. पण जन्मकालचे अशुभ योग गोचरीनें अथवा परिभ्रमणानें फलद्रूप होत असतांना त्यांच्या परिणामांचा अनुभव घेतल्याशिवाय त्यांना गत्यंतर नव्हतें. असा काल म्हणजे गोचर शनि, रविचंद्राला साडेसाती बसवून ह्या दोन ग्रहांवरून तो प (परिभ्रमण) मंगळ जात असतांनाचा होय. हे योग १८८३ पासून सुरू झाले. त्या वेळेस अ २ रवि ( चलिताचा ) व्यय स्थानांतून भ्रमण करूं लागला व धनस्थानांतून दर्शलचें भ्रमण चालू होतेंच, म्हणजे दारिद्र्ययोग उद्दीपित होत असतांना त्यांना मर घालीत होते. अशा परिस्थितींत दुःखदायक स्थित्यंतर करणारे व निधन–वियोगदर्शक च ( चलित ) चंद्राचे मूळ रवि व शनीशीं योग चालू असतां त्यांचे आधारभूत चुलते परलोकवासी झाले, व लगेच त्यांना घराबाहेर घालविण्यांत आलें. रावबहादुर आतां उघडे पडले ! निराश्रित झाले ! आणि तेही १४ वर्षांच्या कोंवळ्या वयांत ! ! जवळ किंवा वडिलोपार्जित एक पैसाही नव्हता. ही परिस्थिति अत्यंत भयानक होती. रावबहादूर लेचेपेचे असते, तर हायहाय करून आपल्या आयुष्याचा सोनेरी काळ वणवण भटकण्यांत घालविला असता किंवा एखादी छोटीशी नौकरी पत्करून संसारास लागले असते. आज रावबहादुर किंवा मिनिस्टर या नांवानें संबोधिल्या जाण्याऐवजीं ' नारायणाची ' फार झालें तर ' नारायणराव ' येथपर्यंत मजल गेली असती. मग दशमस्थ सुर-गुरूची काय बरें वाट लागली असती ! कदाचित् रावबहादूर झाले असते, राजमान मिळाला असता; पण प्रत्यक्ष नलराजाची बरोबरी तसबिरींतील नलराजाचें चित्र करूं शकेल काय ! अ ९ अशा दशमस्थ गुरूनें आणि त्याच्या अ ५ व अ १० अशा मंगळाशीं झालेल्या त्रिकोण योगानें दर्शित होत असलेल्या महत्वाच्या यथार्थ पात्रतेस लायक झाले असते काय !

निष्कांचन, निराधार व निराशाजनक परिस्थितींत सांपडलेल्या फेळकरांस भावी फेळकरांच्या भाग्यास जोडणारा दुवा कुठें तरी असला पाहिजे. आणि तो दारुण आपत्तिदायक ग्रहयोगांतच होता. ज्या वेळेस वर निर्दिष्ट केलेले संकटयोग उद्दीपित झाले, त्याच वेळेस त्यांच्यांत बीजभूत असलेल्या मनुष्यत्वास स्फुरण आलें. त्याला अंकुर फुटला व परिस्थितीला न जुमानता रावबहादुर वडील नाहीं नाहीं म्हणत असतांदेखील तडक कोल्हापुरास गेले व तेथें ते " माधुकरी मागून व वार लावून " आपला अभ्यासक्रम चालवूं लागले. हाच त्यांच्या भाग्याचा गरा पाया ! हाच तो अशुभ योगांचा शुभ परिणाम ! ! अशा तऱ्हेचे दारिद्र्य उत्पन्न करणारे कुयोग हिणकस असते तर ही हिंमत, ही कर्तृत्वशक्ति, ही धडाडी दिसली नसती. कर्तृत्ववान पुरुषांच्या कुंडलींत तसले नामर्दयोग नसतातच. असो; कर्तृत्ववान पुरुषांचें कुंडलींत कुयोग असावे लागतात. त्याचा अर्थ हा कीं, ते योग एक प्रकारची वाईट परिस्थिति निर्माण करून भावी श्रेष्ठ व भाग्यकालास

* कधीं कधीं अ १ = लग्नेश, लग्नाधिपति.
अ २ = धनेश, धनाधिपति इ०. असा संकेत केला आहे.

जरूर असलेले गुण शिकविण्याच्यां रूपानें उत्पन्न करितात. ज्या बड्या लोकांच्या कुंडलींत असे योग नसतात, ते 'बडेबापके बडे बेटे' असून त्यांच्यांत खरी मर्दुमकी नसते.

कोल्हापुरास रावबहादुरांनीं आपला अभ्यासक्रम नेटानें सुरू केला व त्यांना लौकरच चलित व गोचरीचे शुभ ग्रहयोग आले. सन १८८८ सालीं ग्रहयोग पुढीलप्रमाणें होते.

च दशम युति गुरु त्रिकोण मंगळ (अ. ५).
,, रवि ,, बुध
,, चंद्र त्रिकोण च बुध.
प. व. गो. (गोचर) गुरु, चंद्रास सातवा व कुंडलीच्या पंचमांत.

हे सर्व ग्रह विद्येंत यश दर्शविणारे योग आहेत व म्हणूनच ते १८८८ मध्ये म्याट्रिकच्या परिक्षेत पसार झाले. लगेच ते मध्यप्रांतांत गेले व तेथें रा. बळवंतराव महाजन यांच्या मदतीनें कायद्याचा अभ्यास करूं लागले. येथें एवढें सांगणें जरूर आहे कीं, जन्मतः ३–५–९–११ या स्थानांतील शनि मनुष्याला वकिली किंवा तत्सम धंदे करावयास लावतो. रावबहादुरांच्या पंचमांत शनि आहे म्हणून ते वकिलीकडे वळले व वकील झालेहि. वर नमूद केलेले योग चालू असतां शनीची साडेसाती व इतर कुयोग हळूहळू कमी होऊन १८९० त निरभ्र झाले व त्यांत दैदीप्यमान ग्रहयोग १८९० च्या अखेर व १८९१ आरंभीं प्रकाशित होऊं लागले. ते असेः—

च चंद्र त्रिकोण व हर्शल व शुक्र (अ ११).
,, ,, नवमांत भ्रमण (भाग्यवृद्धिकारक).
,, रवि अ २, लाभ गुरु अ ९.
पैकीं पहिल्या योगाविषयीं लिओ म्हणतोः—

A very prosperous and successful time when all things will go will...Native will obtain his desires......an Epoch in career etc.

रवि धनेश व गुरु भाग्येश, म्हणून हा धनोत्पादक योग होय. परिणाम असा झाला कीं-रावबहादूर १८९० मध्यें लोकल-प्लीडरशिपची परिक्षा पास होऊन १८९१ सालीं एप्रिल महि, न्यांत बाळाघाट येथें त्यांनीं वकिली सुरू केली. यानंतर त्यांची उत्तरोत्तर भाग्यवृद्धि झाली. त्याचे संकलितच विवरण करूं.

१८९१ पासून चलित झालेला हर्शल रवीशीं लाभयोग करूं लागला. व तो योग थेट १९२० पर्यंत अंमलांत होता. गुरु चलित होऊन रवीशीं अर्धलाभयोग १९१२ पासून करूं लागला व तो १९२४ पर्यंत अंमलांत होता. अर्थात् या दोन मोठ्या शुभयोगांचा काल सुखावह व प्रगतिपर असलाच पाहिजे हें सांगणें नको. मध्यंतरी गोळ्यावद्दल कौटुंबिक आपत्ति घडल्या, त्यांचें विवरण मागाहून करूं. वर दिलेल्या सर्वसाधारण शुभयोगाला धरून यांचें दिग्दर्शन सध्या करावयाचें आहे. प्रथम हें सांगितलें पाहिजे कीं, पुढील सर्व गोष्टींची मांडणी जन्मकालीन ग्रहयोगांत प्रादुर्भूत झालीच होती. फक्त तत्सम-योगांची (चलित, गोचर किंवा भ्रमणानें) जरूरी होती.

**सन १९०८**

च चंद्र त्रिकोण च रवि* च हर्शल.
लाभ च मंगळ.
,, गुरु लाभ हर्शल
,, चंद्र त्रिकोण च बुध
,, शुक्र अर्धलाभ चंद्र
,, दशम त्रिकोण च मंगळ*

डिसेंट्रलायझेशन कमीशनपुढें साक्ष झाली.
रावबहादुरीचा किताब मिळाला.

जन्म-पूर्वयोगांत च रवि, बुध व शुक्र गुरुशीं युति करीत होते.
जन्मकाळीं एकादशस्थ रवि व दशमस्थ गुरु अशी पदवी व असा मान दर्शवीत होते.

**सन १९१४**

च दशम युति चंद्र*
,, चंद्र त्रिकोण च मंगळ

तिन्ही वेळां कौन्सिलांत निवडून आले

**सन १९१७**

च दशम अर्धलाभ बुध
,, रवि लाभ चंद्र*
,, बुध लाभ च गुरु*
,, चंद्र त्रिकोण हर्शल
,, चंद्र लाभ गुरु
,, चंद्र त्रिकोण बुध

१९१६ सालीं इंडस्ट्रियल-कमिशन व पा. डब्ल्यु डी आर्गनाईझेशन कमिटीपुढें साक्षी झाल्या.

**सन १९२०**

च दशम अर्धलाभ गुरु
,, चंद्र त्रिकोण रवि*
,, मंगळ ,, ,,
,, बुध युति दशम*
,, बुध लाभ रवि

हे जन्मपूर्व-योग होत.

१९२० सालीं मिनिस्टर झाले.

एकादशस्थ चंद्र राजकारणाशीं संबंध आणतो. राजकीय पुढाऱ्यांच्या किंवा राजकारणी पुरुषांच्या एकादशांत बलवान ग्रहयोग सांपडतात. रवि-शुक्राची युति राजवैभवकारक व राजकारणाशीं संबंध आणणारी असते. त्रिकोणस्थ शनि मुत्सद्देगिरी देतो.

एज्युकेशन व मेडिकल खात्याची प्रधानकी घेण्यास पुढील कारणें दिसतात.

मंगळ पंचमेश म्हणजे शिक्षणविषयक आहे. तो दशमेशहि आहे म्हणजे सत्ताधीश आहे; म्हणून शिक्षणखात्यावर अधिकार दर्शविला जातो व तो प्राप्त झाला. तसेंच विद्याकारक ग्रह गुरु आहे. तो राजभुवनांत असून दशमेश–( अधिकाराशीं ) अगदीं निगडित शुभ-संबंध करीत आहे;

* हे योग महत्त्वाचे आहेत.

हा दुसरा योग. द्वादशांत तीन ग्रह आहेत. द्वादशस्थान जेल-इस्पितळें वगैरेशीं संबंध ठेवतें. व्ययस्थ हर्शलबुधाशीं दशमेश मंगळाचा शुभसंबंध आहे, म्हणून मेडिकल खातें यांचेकडे आलें.

१९२३ च्या कौन्सिल निवडणुकींत रावबहादुरांचा पराभव झाला. त्याची कारणें पुढीलप्रमाणें आहेत.

१ गो गुरु सहावा; २ च दशमप्रति शनि.
३ गो शनिप्रति दशम, ४ च रवि केंद्र गुरु.

असो. नेपच्यूनच्या दशमस्थ फलाविषयीं थोडें विवेचन करून घरगुती गोष्टींकडे वळूं. तो दशमांत चमत्कारिक आयुष्यक्रम दर्शवितो. त्याचा रवि-शनिशीं शुभसंबंध असल्यामुळें आयुष्यक्रम चमत्कारिक खरा, पण प्रगतिपर झाला. रवीशीं शुभसंबंध, लोकप्रियता व आध्यात्मिक उन्नति दर्शवितो; तो दशमांत म्हणून राजकीय वातावरणाशींहि संबंध दर्शवितो. हा असा दशमस्थ नेपच्यून लग्नांतून भ्रमण करीत होता ( सन १९१० ते सन १९२४. ) तेव्हां त्याची फळें विशेष दृष्टोत्पत्तीस आली. हें वरील विवेचनावरून उघडच आहे.

रवि, चंद्र, मंगळ, शनि यांच्या केंद्रप्रतियोगाचा दुसरा असा परिणाम होतो कीं, त्यामुळें मातृपितृसुख फार कमी लाभतें. तशासारखे पुन्हा योग होतांना तें सुख नष्ट होतें. परिभ्रमणानें व गोचरीनें असे योग १८८३–१८९० पर्यंत घडत होते. कारण रवि चंद्राला साडेसाती चालली होती. या अवधींत च मंगळानें रविशी १८८६ सालीं तंतोतंत केंद्र केला. त्या वेळेस पितृनिधन झालें. व पुढें १९००–१९०४ चे दरम्यान चलित चंद्र-मंगळांचे शनीशी अशुभ योग चालले असतां मातृनिधन झाले. त्या वेळेस हर्शल मातृ म्हणजे चतुर्थस्थानांतून भ्रमण करीत होता.

ह्या कुंडलींत एकापेक्षां जास्त लग्नें होण्याचा योग उघड दिसत आहे. अ १ चंद्र व अ ७ शनि यांचा वियोगकारक प्रतियोग रविशुक्राचें द्विस्वभाव राशींत वास्तव्य, कुटुंबधनस्थानांत मंगळ व त्याचा अ ७ शनि व अ १ चंद्र यांच्याशीं केंद्र, सप्तमांत केतु, है... सर्व योग त्याचे द्योतक आहेत रविशुक्राचा योगही दोन भार्या देतो, असें बऱ्याचठिकाणीं पाहण्... ांत आले आहे. ह्यामुळें रावबहादुरांचे दोन विवाह झाले. १८९० त च रवि लाभ मंगळ, च द... शम युति गुरु व चंद्र त्रिकोण च शुक्र इत्यादि. विवाहकारक योग चालू असतांना गुरु सप्तमांत ... भ्रमण करीत असतां पहिला विवाह झाला पण ते विवाहसुख फार काळ टिकलें नाहीं. अ ७ परि... भ्रमणानें व गोचरीचे स्वस्थानीं येऊन अ १ चंद्राशीं मूळचा योगकारक प्रतियोग सन १८९९ ... तोमध्यें करीत असतां भार्या निधन झाले त्यावेळेस योगदर्शक पुढील योग चालूं होते.

च चंद्र ( अ १ ) समक्रांति शनि ( अ ७ ) ... ग्राम
च रवि युति मूळ हर्शल. ... ३ ६

लगेच पुढें १९०० मध्यें पुन्हा विवाह झाला. हा बहुतेक नेपच्यूनच्या शुक्राव... ... न हील परिभ्रमणाचाच प्रकार आहे.

पंचमस्थ बहुप्रसव राशीमुळें संततियोग बरा आहे. पण पंचमांत शनि असल्यामुळें ... पंचमस्थ ... व अ ५ मंगळाशी केंद्र असल्यामुळें सर्वच मुलामुलींचें सुख मिळणें शक्य नसतें. पंचमेशानें व लाभ ... व प्रहाधिक्य पुरुषराशींत असल्यामुळें पुरुषसंततिच विशेष ... ... त्व केंद्राकडे असल्यामुळें ...

ह्या नियमानुसार रावबहादुराना आजतागायत ११ अपत्यें झालीं असून यापैकीं आज ५ मुलें व २ मुली हयात आहेत. त्यांत शेवटली दोन अपत्यें जुळी आहेत. *एक अपत्य मृतावस्थेंतच निपजलें. ह्या प्रकार बहुधा शनीचा असावा असें दिसतें. (?) ज्या ज्या काळीं संतति झाली त्या त्या काळीं असें दिसतें कीं, गुरु व शनि बहुधा लग्न, तृतीय, पंचम, सप्तम, नवम, एकादश ह्या स्थानांत होते. (१८९९, १९०२, १९०४–७–८–९–११–१४–१७–२०. हे ते काल होत.

रावबहादुरांचे आयुष्यांत १८८० ते ८६ व १८९९ ते १९०४ हे काल विशेष खडतर व कष्टदायक गेले. पैकीं पहिल्या कालासंबंधीं विवेचन झालेंच आहे. दुसऱ्या कालासंबंधीं पूर्वी थोडेंबहुत आलें असलें तरी एवढें सांगणें जरूर आहे कीं, ह्या वेळेस चंद्रवीथीशीं शनीचा असलेला मूळचा प्रतियोग ह्या वेळेस उद्दीपित झाला होता. अष्टमेश शनीचा ह्या मूळ व चलित ग्रहाशीं व शुक्राशीं प्रतियोग बसत होता. शुक्र व हा चतुर्थेश म्हणजे माता व स्थावर-दर्शक असल्यामुळें व लाभेश म्हणजे भाऊ व चुलते ह्यांचा दर्शक असल्यामुळें स्थावरांची नासाडी व आई, भाऊ आणि चुलते यांचे मृत्यु झाले. ह्याच वेळेस हर्शलचें चतुर्थांत भ्रमण कांहीं काल चालू होतें.

असो. आतां येथवर मागें काय झालें याचा विचार झाला. भावी परिस्थिति कशी काय आहे ह्याचा थोडा विचार करूं.

महत्वाच्या योगांचें दिग्दर्शन करावयाचें म्हणून प्रथम हें सांगितलें पाहिजे कीं,: आपत्ति व विपन्नावस्था सोसून कां होईना, पण रावबहादूर आपल्या आयुष्यांत सरकार व प्रजा ह्या दोहोंच्या दृष्टीनें विशेष महत्पदास पोंचतील असें त्यांच्या जन्मकालीन ग्रहयोगावरून स्पष्ट दिसत होतें. त्यांच्या कुंडलींतील धनमार्गांत ११ ग्रहांपैकीं ९ ग्रह वास्तव्य करीत होते. संपत्तिमान् व राज्यकारभारांतले मोठमोठाले मुत्सद्दी अशांच्याच कुंडलींत असल्या प्रकारचे योग दृष्टीस पडतात. एकादशांतील रवि-चंद्र अनुक्रमें पदवी व राजकारणाशीं संबंध दर्शवीत होते. राजकीय पुढारी किंवा राजकारणी पुरुष यांच्या कुंडल्यांत एकादशस्थानांत बलवान् ग्रहयोग सांपडतात. रवि-शुक्राची युतिही राजवैभव व राजकारणाशीं संबंध दर्शविते. त्रिकोणस्थ शनि मुत्सद्देगिरी देतो. दशमांतील नेपच्यून आयुष्यक्रम विलक्षण तऱ्हेचा पण रवि-शनीशीं शुभ योग करीत असल्यामुळें प्रगतिपर दर्शवीत होता. तोहि राजकारणाशीं संबंध आणणाराच होता. एकंदरींत ह्या सर्व ग्रहयोगांमुळें रावबहादुरांना कधीं ना कधीं तरी राजकारणांत पडणें अपरिहार्य होतें व म्हणूनच ते पडलेहि. त्यांच्या दशमांतील गुरु हा सर्वांत वरचढ योग होता. तो. राजसन्मान व एका प्रकारचें अधिपत्य दर्शवितो. धनधान्य गृहवाहनादि सौख्य देतो. दशमस्थ गुरु असलेल्या मनुष्याची जिकडे तिकडे कीर्ति होते. व तो जगांत पुढें आला नाहीं असें विरळाच दिसेल.

अशा गुरुविषयीं ॲलन लिओ म्हणतोः—

Jupiter in the 10th house devides much success and prosperity the moral standard is very high and the nature holds a very secure and important position at some period of his life.

ह्या योगांत गुरु नवमेश म्हणून हा उच्च तऱ्हेचा राजयोग झाला होता. अशा भाग्येश राजयोग करणाऱ्या सुर-गुरुशीं, पंचमेश व राजभुवनेश मंगळाशीं अत्यंत शुभ असा त्रिकोण झालेला

ह्या नियमानुसार रावबहादुरांना आजतागायत ११ अपत्यें झालीं असून यापैकीं आज ५ मुलें व २ मुली हयात आहेत. त्यांत शेवटलीं दोन अपत्यें जुळी आहेत. *एक अपत्य मृतावस्थेंतच निपजलें. हा प्रकार बहुधा शनीचा असावा असें दिसतें. (?) ज्या ज्या काळीं संतति झाली त्या त्या काळीं असें दिसतें कीं, गुरु व शनि बहुधा लग्न, तृतीय, पंचम, सप्तम, नवम, एकादश ह्या स्थानांत होते. ( १८९९, १९०२, १९०४–७–८–९–११–१४–१७–२०. हे ते काल होत.

रावबहादुरांचे आयुष्यांत १८८० ते ८६ व १८९९ ते १९०४ हे काल विशेष खडतर व कष्टदायक गेले. पैकीं पहिल्या कालासंबंधीं विवेचन झालेंच आहे. दुसऱ्या कालासंबंधीं पूर्वी थोडेंबहुत आलें असलें तरी एवढें सांगणें जरूर आहे कीं, ह्या वेळेस चंद्रवीशीं शनीचा असलेला मूळचा प्रतियोग ह्या वेळेस उद्दीपित झाला होता. अष्टमेश शनीचा ह्या मूळ व चलित ग्रहाशीं व शुक्राशीं प्रतियोग बसत होता. शुक्र व हा चतुर्थेश म्हणजे माता व स्थावर-दर्शक असल्यामुळें व लाभेश म्हणजे भाऊ व चुलते ह्यांचा दर्शक असल्यामुळें स्थावरांची नासाडी व आई, भाऊ आणि चुलते यांचे मृत्यु झाले. ह्याच वेळेस हर्शलचें चतुर्थांत भ्रमण कांहीं काल चालू होतें.

असो. आतां येथवर मागें काय झालें याचा विचार झाला. भावी परिस्थिति कशी काय आहे ह्याचा थोडा विचार करूं.

महत्वाच्या योगांचें दिग्दर्शन करावयाचें म्हणून प्रथम हें सांगितलें पाहिजे कीं,: आपत्ति व विपन्नावस्था सोसून कां होईना, पण रावबहादूर आपल्या आयुष्यांत सरकार व प्रजा ह्या दोहोंच्या दृष्टीनें विशेष महत्पदास पोंचतील असें त्यांच्या जन्मकालीन ग्रहयोगावरून स्पष्ट दिसत होते. त्यांच्या कुंडलींतील धनमार्गांत ११ ग्रहांपैकीं ९ ग्रह वास्तव्य करीत होते. संपत्तिमान् व राज्यकारभारांतले मोठमोठाले मुत्सद्दी अशांच्याच कुंडलींत असल्या प्रकारचे योग दृष्टीस पडतात. एकादशांतील रवि-चंद्र अनुक्रमें पदवी व राजकारणाशीं संबंध दर्शवीत होते. राजकीय पुढारी किंवा राजकारणी पुरुष यांच्या कुंडल्यांत एकादशस्थानांत बलवान् ग्रहयोग सांपडतात. रवि-शुक्राची युतिही राजवैभव व राजकारणाशीं संबंध दर्शविते. त्रिकोणस्थ शनि मुत्सद्देगिरी देतो. दशमांतील नेपच्यून आयुष्यक्रम विलक्षण तऱ्हेचा पण रवि-शनीशीं शुभ योग करीत असल्यामुळें प्रगतिपर दर्शवीत होता. तोहि राजकारणाशीं संबंध आणणाराच होता. एकंदरींत ह्या सर्व ग्रहयोगांमुळें रावबहादुरांना कधीं ना कधीं तरी राजकारणांत पडणें अपरिहार्य होतें व म्हणूनच ते पडलेहि. त्यांच्या दशमांतील गुरु हा सर्वांत वरचढ योग होता. तो. राजसन्मान व एका प्रकारचें अधिपत्य दर्शवितो. धनधान्य गृहवाहनादि सौख्य देतो. दशमस्थ गुरु असलेल्या मनुष्याची जिकडे तिकडे कीर्ति होते. व तो जगांत पुढें आला नाहीं असें विरळाच दिसेल.

अशा गुरुविषयीं ॲलन लिओ म्हणतो:—

Jupiter in the 10th house devides much success and prosperity the moral standard is very high and the nature holds a very secure and important position at some period of his life.

ह्या योगांत गुरु नवमेश म्हणून हा उच्च तऱ्हेचा राजयोग झाला होता. अशा भाग्येश राजयोग करणाऱ्या सुर-गुरुशीं, पंचमेश व राजभुवनेश मंगळाशीं अत्यंत शुभ असा त्रिकोण झालेला

होता, हा नि सशय उच्च प्रतीचा राजयोग होय. हाच तो प्रधानकीचा द्योतक होय म्हणूनच त्याना प्रधानकीसारखी महत्पद-प्राप्ति झाली हाच योगानें मूळच्या विपन्न स्थितींत चमत्कृतिजन्य स्थित्यतर केलें जन्मकुडलींतील कुयोगानें ज्या स्थितीकरितां रावबहादुराना शिकवण दिली, ती स्थिति दर्शित करणारा हाच योग होय आणि ग्रहयोगाचा चमत्कार तो हाच !

प्रधानकींत रावबहादुराना मेडिकल व एज्युकेशन खाती का आली, याचा पुढीलप्रमाणें निर्णय होतो मगळ= ( पचमेशशिक्षणविषयक ) + ( दशमेश=सत्ताधीश अधिकारसपन्न ) =शिक्षणखात्यावर अधिकार

गुरु = (विद्याकारक) + (दशमेशाशीं त्रिकोण = अधिकार) = शिक्षणखात्यावर अधिकार

द्वादश स्थान-जेल इस्पितळें वगैरेंशीं सबध ठेवतें व्ययस्थ बुध हर्शलशीं दशमेशाचा शुभ-सबध आहे, म्हणून मेडिकलखातें त्यांचेकडे गेलें.

ह्या सर्व ग्रहयोगाला फलद्रूप होण्यास तत्सम गोचर व भ्रमण ग्रहयोगांची जरूर होती, ते फलद्रूप पुढीलप्रमाणें झाले.

| | |
|---|---|
| **सन १९०८**<br>च चद्र त्रिकोण च रवि, च हर्शल<br>लाभ च मगळ<br>च गुरु लाभ हर्शल, च चद्र त्रिकोण च बुध<br>,, शुक्र अर्धलाभ चद्र; च दशम त्रिकोण च मगळ | डिसेंट्रालायझेशन कमीशन पुढें साक्ष झाली. रावबहादुरीचा किताब मिळाला. |

परिभ्रमण मगळ स्वस्थानीं येऊन मूळ गुरुशीं पुन्हां त्रिकोण करीत होता. जन्मपूर्व योगांत च रवि, बुध शुक्र गुरुशीं युति करीत होते

| | |
|---|---|
| **सन १९१४.**<br>च दशमयुति चद्र, च चद्र त्रिकोण च मगळ<br>**सन १९१७.**<br>च दशम अर्धलाभ बुध, च रवि लाभ चद्र<br>च बुध लाभ च गुरु, च चद्र त्रिकोण हर्शल<br>च चद्र लाभ च गुरु, च चद्र त्रिकोण बुध.<br>परिभ्रमणानें गुरु स्वस्थानीं येऊन मूळ मगळाशीं त्रिकोण करीत होता गोचरीनें तो चद्रास पहिला होता<br>**सन १९२०**<br>च दशम अर्धलाभ गुरु, च चद्र त्रिकोण रवि<br>च बुध युति दशम च मगळ त्रिकोण रवि.<br>च ,, लाभ रवि शेवटले तीन जन्मपूर्वयोग होत. गोचर गुरु जन्मस्थ मगळाच्या सन्निध होता. चलित चद्र नवमांत व दशमांत भ्रमण करीत होता | तिन्ही वेळा कौन्सिलांत निवडून आले. १९१६ साली इन्डस्ट्रीयल कमीशनपुढें व पी डब्ल्यू डी. ऑर्गनायझेशन कमिटीपुढें साक्षी झाल्या<br><br>१९२० साली मिनिस्टर झाले. |

राजदरबारचें व राजकारणाचें विशेष वैभव व तेज, मूळ दशमस्थ नेपच्यून परिभ्रमणानें त्यांतून भ्रमण करीत असतां म्हणजे १९१४ ते १९२४ पर्यंत विशेष दृष्टोत्पत्तीस पडलें.

१९२४ मध्यें शनि चतुर्थ स्थानांत गेला. तो चतुर्थांत भ्रमण करीपर्यंत व तशाच पुढें त्याचा रवि-चंद्राशीं प्रतियोग पूर्ण होऊन जाईपर्यंतचा काळ त्रासदायक व वाईट. शनि अष्टमेश व चंद्र लग्नेश, म्हणून हा प्रतियोग वाईट आहे. असा काळ शनि सायन धनुराशीच्या अखेर जाईपर्यंत म्हणजे जवळ जवळ १९२८ मध्यापर्यंत होता. त्याच वेळीं हर्शलचें अष्टमांतून भ्रमण चालू होतें. ह्या काळांत शरीर-प्रकृतीविषयीं व अपघाताविषयीं विशेष काळजी. त्याचप्रमाणें हा काल कौटुंबिक सुखास प्रतिकूल. जवळपास चलिताचें मुख्य शुभयोग दोन घडतात ते असे:—

'च दशम युति रवि'

'च शुक्र लाभ बुध गुरु'

चलित रवीचे व मंगळाचे चलित शनीशीं शुभयोगहि घडतात, पण जन्मतः ते शुभकारक नसल्यामुळें त्यांपासून फारसा फायदा होणार नाहीं.

वरील दोन मुख्य शुभयोगांचा काळ म्हणजे १९२७ व १९२८ हीं वर्षें होत. हा काळ सांपत्तिक सुखाला, मानमरातबाला चांगला.

Increase of honour, desire for achievement, elevation as regards sphere of influence, added breadth of views.

अशी पहिल्या योगाची फळें आहेत. अशाच प्रकारचीं 'च रवि त्रिकोण शनि' (जो योग १९२६ च्या मध्यांत सुरू झाला) त्या योगाचीं आहेत. पण वर दिलेल्या कारणास्तव ह्या फलसिद्धीविषयीं शंका येते. १९२७ साल मात्र निःसंशय चांगलें प्रगतिपर. पुढील दोन-तीन वर्षांत चलित च चंद्राचे कांहीं शुभयोग घडणार. त्याचप्रमाणें त्यांचे जन्मकालीन अशुभ योगही उद्दीपित होत आहेत. मे, जून, जुलै, आक्टोबर, नोव्हेंबर १९२४ ह्या महिन्यांत त्याचे मंगळ-शनीशीं केंद्रप्रतियोग घडतात. ह्या काळात दुःखाचे प्रसंग उद्भवणें साहजिक. एप्रिल १९२४ हा महिनाही तसाच. जानेवारी, फेब्रुवारी, मार्च १९२५ आक्टोबर, नोव्हेंबर १९२५ हे महिने शुभ होत. मनावरचा भार कमी होऊन कौटुंबिक व इतर परिस्थितींत शुभकारक फरक. प्रवास, मंगलकार्यें, घडून आनंदाचे प्रसंग, ह्यावरून नवीन व जबाबदारीची कामें, मनांतील बऱ्याचशा इच्छा व संकल्प सफळ होण्याचा काळ. कारण ह्या वेळीं च चंद्र रवि दशम व शुक्राशीं युति करील ह्यानंतर 'च रवि युति दशम' योग घडेपर्यंतचा काळ वाईट व दुःखकारक. हा व यापुढील काळ अध्यात्माकडे लक्ष लागण्यास चांगला आहे.

## कुंडलीक्रमांक ५१

श्रीशके १८१६ ज्येष्ठ शुक्ल अष्टमी, सोमवार, सूर्योदयावृगत घ. ११ प. २२, जन्म-तारीख ११ माहे जून सन १८९४.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शरीरयष्टी—उंच, कृश, हृदयावर विशेष रोम, केश कडक, छातीवरील रोम आजा-पासून अनुवंशिक आहेत वर्ण मध्यम, साधारणत गोरा, चंचल मन, परंतु विचार करून काम करणें, सदाचाराची आवड, निर्व्यसनी, मित्र फार, निर्व्यसनी मित्र, समाज, देश व धर्माभिमानी, अशक्त, लाजाळू, वाचनप्रिय, १८३३ व १८४१ या सालीं ११ महिन्याचा आजार–मरणांत कष्ट.

आईचामृत्यु—शके १८२२ कार्तिक शु॥ १३, मारवाडांत, वडीलसौख्य उत्तम, वडि-लांचा स्वभाव प्रसंगीं क्रोधी, परंतु अतिशय माया ज्या वर्षांत मातेचा मृत्यु झाला त्या वर्षी दोन लहान असलेले बंधूचा वियोग (सर्वांत लहान कार्तिक वद्य ५ व त्यापेक्षां वडील कार्तिक वद्य१स) तसेंच त्याच वर्षांत आजा व आजी यांचा वियोग आषाढांत.

सांपत्तिक स्थिति—साधारण परंतु सौख्य १८२० पर्यंत उत्तम. पुढें १८२२ भार्यावियोग पुन द्वितीय लग्न १८२७ त झालें. परंतु ती २॥ वर्षांनीं मृत्यु पावली १८३४ पर्यंतचा काल त्रासदायक, मन स्वास्थ्य कमी, आर्थिक अडचणी, १८३५ पासून साधारण बरें, १८३७ या वर्षी द्रव्यप्राप्ती उत्तम, शके १८४० द्रव्यनाश

वडिलाचाधंदा—व्यापार, धान्य व सावकारी भावंडें–३ बंधु, सर्वांत वडील मीच. विवाह—शके १८३५ वैशाख शुद्ध १३ ला, मारवाडांत विवाह झाला. स्त्रीची प्रकृति अशक्त, मोळसर, कृश, शरीरयष्टी मध्यम, वर्ण साधारण गौर, तापट स्वभावाची.

संतती—शके १८४४ चे भाद्रपद शु १५ पावेतों ४ संतति, त्यांत ३ हयात व १ मृत २ कन्या व १ पुत्र हयात आहेत. १ कन्या मृत.

विद्या मराठी ५ यत्तेपर्यंत २१ वे वर्षी द्रव्यलाभ श्रेष्ठ. व्यवहारिक जबाबदारी—२० वे वर्षी स्वत वर पडली.

परिस्थितींत बदल—वडिलांचे साडेसातींत शके १८३९ पासून आर्थिक हानि फार, १८४१ चे चैत्रमासांत भयंकर आजार, गांवांत शत्रुत्व, समाजकीर्ति वृद्धिंगत होती १८४० चे वैशाखांत एका कुबेरपुत्राशी मैत्री १८४० मध्यें वडिलांस चोरांनीं लुटलें.

सांपत्तिक वाईट काल—शके १८४० द्रव्यदृष्टया उत्तम काल—१८३५ ते ३७. कार्यांत यश—बहुतांशीं यश येतें व मधून मधून आर्थिक कटकटी होतात सरकार अगर लोकांकडून मान—दोन वेळ तालुका रिलीफ कमेटीनें मेंबर निवडलें व सार्वजनिक लोकमान्य वाचनालय स्थापन केले आवडत्या गोष्टी —वाचन, लेखन, ज्योतिष, सामुद्रिक, वैद्यक वगैरे चमत्कृति-

जन्य विषयाची आवड, वाचन फार, देशोन्नतीबद्दल नेहमीं विचार प्रवास—शके १८३५ चे सालीं रेल्वेनें फारच दूरचा प्रवास. आप्तवर्ग साह्य—फायदा कांहीं नाहीं कोरडी सहानुभूति. धार्मिक प्रवृत्ति—साधारण, धर्मभोळेपणा नाहीं, गायन, गणित वैद्यकादि अनेक विषयाची आवड. सासरची स्थिति—ठीक असून लाभही थोडा झाला आहे. सख्खे चुलते—नाहींत. आत्या २ आहेत. सावत्र आई—होती, पण हयात नाहीं, तिजला संतति झाली नाहीं. मामा व मावशा—मामा २ व मावशा ३. आई व भाऊ—लहानपणीच वारली. वडिलांचा स्वभाव तापट असल्यानें मनमोकळें भाषण नाहीं.

कुंडलीक्रमांक ५२

शके १८०५ आषाढ शुद्ध दशमी शनिवार, जन्म रात्रीं ११ वाजता जन्म तारीख १४ जुलई १८८३.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

साधारण शरीर, खन्याची आवड, अविवर्णी, तोंडावर देवीच्या खुणा, व्यंग नाहीं. नववे वर्षीं मुदतीचे तापानें आजारी वयमान दहा महिने असतांना देवी येऊन आजारी झाले.

शके १८३१ भाद्रपद वद्य १० रोजीं वडील वारले. १८३९ वैशाख वद्य १४ ला आई वारली. आईस दम्याचा विकार व त्यांतच अंत. वडिलांचा हर्निया रोगानें अंत [अंतरगळ]

मूळ स्थिति—चांगली वडिलाचा धंदा—शेती व देवधेव वर्षाचें उत्पन्न सुमारें ७।८ हजार. भावंडें—एकदर ९ मागे पूर्वी ४ बहिणी व नंतर ४ विवाह—ता १९–११–९५ मार्गशीर्षमध्यें विवाह झाला. शके १८२५ पर्यंत स्त्रीस आजार नव्हता संतति—एकच मुलगा. स्त्रीस सतत ज्वर व पोटदुखी धंदा—शके १८३३ पासून सर्व जबाबदारीनें धंद्यास सुरवात सांपत्तिक स्थिति—शके १८३८ ते १८४३ वैशाख हे दिवस वाईट गेले. शिक्षण—मराठी ६ इयत्ता. कार्यांत नेहमीं अपयश, सरकार वगैरेकडून अद्याप मान नाहीं. आवडत्या गोष्टी—व्यापार धंद्यांत यश येऊन मोठेपणा मिळणें. अत्यंत वाईट काल—शके १८४३ वैशाख, श्रावण, पौष, माघ व फाल्गुन. व्यापार—शके १८४२ नारळाचा व्यापार, प्रथम वर्षी नुकसान, दुसरे वर्षी प्राप्ती. पानसुपारीचें व्यसन, परंतु अडत नाहीं शरीरांत व्यंग नाहीं. आप्तवर्गाकडून कधीं कधीं त्रास मुलगा इंग्रजी शिकत आहे. सासरची

स्थिति—चांगली परंतु लाभ नाहीं. चुलते व आत्या नाहींत. पूर्वार्जित घर, नोकरचाकर, गाडी यांचें सुख आहे. मामा १, मावशा ५, त्यांचेकडून दुःख. हल्लीं २ मावशा हयात. आई व वडील ह्यांवर प्रेम. पैशांचे टंचाईमुळें सर्वांकडून विरोध, ह्यांत व्यवसाय बंधुकडून जास्त.

कुंडलीक्रमांक ५३

श्रीशके १८०५ आश्विनेमासे शुक्लपक्षे दशम्यांतिथौ गुरुवासरे सकाळीं १० वाजून ३१ मि. जन्म, तारीख ११ आक्टोबर १८८३.

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

वर्ण साधारण काळा, शरीर मजबूत, आरोग्य चांगलें. स्वभाव प्रेमळ. शके १८४० मध्यें उष्ण घातानें ६ दिवस श्रावणमासांत आजार. शके १८२६ मार्गशीर्ष वद्य ८ रोजीं वडील वारले. आईस नेहमीं मस्तकशूळाची व्यथा असे. १८४२ सालांत मार्गशीर्ष व॥ ८ रोजीं आई मृत झाली. वडिलांचा धंदा शेती व देवघेवीचा व्यापार. भावंडें एकंदर ११, त्यापैकीं हयात ३. शके १८२० मार्गशीर्ष व॥ ५ रोजीं विवाह झाला. व शके १८३० मध्यें बाळतपणांतच बायकोचा अंत झाला. संतति—प्रथम पुत्र हयात, व ५ मृत भार्येस मस्तकशूळ व स्वतःस उष्णविकार. शिक्षण— मराठी ५ वी यत्तेपर्यंत. भाग्योदय सोळावे वर्षापासून पुढें शके १८३३ पासून स्वतः जबाबदारीनें शके १८४४ पर्यंत स्वतःच्या कर्तबगारीनें प्रपंच चालविला आहे. सरकाराकडून मान असून लोकांकडूनही मान आहे आहे, परंतु स्वतःचे भावाचें सुख नाहीं. ज्योतिष व वैद्यकीकडे लक्ष जास्त असून लोकांस औषध फुकट देतों. दिवाणी कोर्टांत जाण्याचे वारंवार प्रसंग येतात. जलप्रवासांत संकट व खोटी फिर्याद होऊन ५० रु. दंड झाला होता. स्नेही लोकांकडून जास्त साह्य. धर्मवृत्ति चांगली मोठ्या मुलाचें शिक्षण इंग्रजी चालू आहे. घर–जमीन जुमला वगैरे वडिलोपार्जित असून स्वकष्टार्जितही आहे. आई, वडील व भावंडे यांच्याशी प्रेम.

कुंडलीक्रमांक ५४

श्रीशके १८०८ आश्विन शुक्लपक्ष अष्टमी, भौमवासरे, सूर्यो. घ. ५ प. ४ जन्म. जन्म–तारीख ५–१०–१८८६.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शरीर साधारण, मध्यम देहबांधा, सात्विक स्वभाव, आवड व रुचि गोड पदार्थांची, वर्ण निमगोरा, तोंडावर देवीचे वण, व्यंग नाहीं. महत्वाचा जिवावरचा आजार बिलकूल नाहीं. वडील-सौख्य वय वर्षे ३१ पर्यंत. आईचें सौख्य ३६ वर्षांपर्यंत. वडिलांस आजार ज्वर व दोघांसही पुत्रशोकाचें दु:ख. वडिलोपार्जित पटवारीपणाची गांवें ९ व शेती ह्यांवर चरितार्थ चालू. वडलांचा धंदा पटवारीपणा व शेती, उत्पन्न वर्षाचें १५००. भयंकर काळजीचे प्रसंग, राजदंड वगैरे आले नाहींत. भावंडे--एकंदर ७, हयात २. विवाह दोन. एक १९०२ सालामध्यें व दुसरा १९१२ मध्यें. पहिले स्त्रीचा मृत्यु बाळंतरोगानें; व दुसरी नेहमी गंडमाळानें आजारी व त्यांतच मृत्यु. पहिल्या स्त्रीचा एक मुलगा व एक मुलगी, दोन्ही हयात. दुसऱ्या स्त्रीस मुलगा व मुलगी, परंतु मुलगा वारला. विद्या—मराठी सहावी व इंग्रजी दुसरीपर्यंत, १९०४ साली विद्या सोडली. धंदा---पटवारीपणा व मास्तरकी, हल्ली शेती; नोकरीस सुरुवात १९०६ पासून. जबाबदारीचीं कामें वयाच्या ३२ व्या वर्षापासून (वडील गेल्यामुळें). परिस्थितींत बदल कांहीं नाहीं. सांपत्तिक अत्यंत वाईट काल वयाच्या ३५ व्या वर्षापासून. यश मिळतें, परंतु फार कष्ट व त्रास होतो. वेदांतचर्चा, विनोद, वाचनाची गोडी, विषयलोलुपता जास्त. अत्यंत वैतागाचे व त्रासदायक प्रसंग घरातील मृत मंडळींच्या वेळीं. स्थिति साधारण असून वडलोपार्जित शेतीवर उपजीविका. तीर्थयात्रा, जलप्रवास वगैरे कांहीं प्रसंग नाहीं. व्यसनें—विड्या ओढणें, पानसुपारी खाणें, शारीरिक व्यंग नाहीं. आप्तवर्गाकडून त्रासही नाहीं व सुखही नाहीं. धार्मिक प्रवृत्ति बरी, वेदान्त व गायन याची आवड बरी. मोठा मुलगा इंग्रजी शिकत आहे. भावंडाचा व्यवसाय पटवारीपणा. सासरची स्थिति बरी, लाभ नाहीं. चुलते नाहींत. आत्या १ आहे. सत्तेचें घर, जमीन, वाहनें व नौकर व वडिलार्जित कमाई यांचें सौख्य. मामा १ परंतु त्याचेकडून सुख नाहीं. आई व वडील यांवर प्रेम. शत्रुपीडा व विरोध क्वचित्.

### कुंडलीक्रमांक ५५

श्रीशके १८०२ चैत्रकृष्ण षष्ठी, जन्मतारीख ३० एप्रील १८८०—

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

कडकडीत स्वभाव, रंग काळसर, डाव्या बावळ्यावर तीळ.—चातुर्थिक हिवानें बरेच दिवस आजार, शिवाय पाण्यांत बुडण्याचें मोठें गंडांतर गेलें.—शके१८१५भाद्रपद ११ वडिलांचा मृत्यु व आईचा मृत्यू शके१८३३आषाढ २. वडिलांस विशेष आजार कांहीं नाहीं. परंतु २०।२१दिवस आजार व त्यांतच मृत्यु. आईस दमा खोकला व शेवटीं त्यांतच मृत्यू. वडलांचा धंदा—नोकरी. वडील गुजरार्थेत नोकर होते, पुढें त्यांनीं पेन्शन घेतले. एकंदर भावंडें—१२ त्यांत हयात २.विवाहांत अडथळे—वयवर्षे ३३ मातोश्री मृत्यू पुढें ३९वर्षांपर्यंत प्रवास. विद्याभ्यास—मराठी ६ यत्तेपर्यंत व इंग्रजी साधारण. नौकरी—सुमारें ४ वर्षे १८१७ ते २१ पर्यंत व प्लेगमुळें फार नुकसान. शके१८२२ पासून व्यावहारिक जबाबदारी मजवर पडल्यामुळें थोडेच दिवसांत भिक्षुकीस सुरवात केली. परिस्थितींत पुष्कळ बदल पडून प्रवासही पुष्कळ झाला व यात्राही झाल्या. द्रव्यदृष्ट्या वडिलानंतर अनिष्ट काल गेला. व्यवसायांत बरेंच यश, परंतु अन्य कामांत अपयश. सरकारकडून सन्मान व लोकांकडूनही मान मिळाला. कोर्टामधून साक्षी देण्याचा प्रसंग आला. अपमान व वैतागाचे प्रसंग फार, त्यामुळें परदेशांत निघालों. नोकरी वगैरे कांहीं केली नसून बरींच वर्षे भिक्षुकीच केली. संकटें येऊन जलप्रवास फार झाला व तीर्थयात्राही झाल्या. दृष्टीत थोडेसें व्यंग व चहा व विडी ओढणें हीं व्यसनें व निरंतर व्यग्रता. विशेष द्रव्यलाभ कोणताच झाला नाहीं. आवडीचे विषय वेदांत, गणित, गायन, शास्त्रीय व धार्मिक प्रवृत्ति. गणित विषय जास्त आवडीचा. चुलते—३ व आत्या २, परंतु हल्लीं कोणी नाहीं. वडिलोपार्जित घर व जमीनजुमला थोडाबहुत आहे. सावत्र आई होती, पण ती हयात नाहीं. मामा २ व मावश्या २ आहेत परंतु दुःख वगैरे कांहीं नाहीं.

कुंडली क्रमांक ५६

शके १८१९ कार्तिक शु. ५ शनिवार घ. २७ प. २४ मूळ नक्षत्र घ. २१ प. ४८ ता. ३० आक्टोबर सन १८९७ रोजीं रात्रौ ९ वा. ३० मि. जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

वरील कुंडलीच्या गृहस्थाची लहानपणीं सर्व परिस्थिति अत्यंत समाधानकारक व ऐश्वर्यवान अशी होती. गाडी, घोडे नोकर वगैरे असून सांपत्तिक स्थितीही विशेप उच्च दर्जाची होती. याना तीन गांवें इनाम असून इतर स्थावर इस्टेटही चांगली आहे. यांचे वयाचे सातवे वर्षी याना मातृसुखाला मुकावें लागले. त्यानंतर तीन वर्षांनीं म्हणजे सन १९०७ सालीं पितृसुखही नष्ट झालें, यानंतर १९०७ ते १९१२ पर्यंतचा काळ सापत्न मातुळगृही काढावा लागला. या काळांत अतीशय कष्ट, मानहानी सहन करून मराठी चार यत्तापर्यंत शिक्षण केले, वरील त्रासास कंटाळून हे गृहस्थ एका नातेवाईकाच्या सल्ल्यानें १९१२।१३ मध्यें एका मोठ्या संस्थानच्या शहरांत विद्याभ्यासाकरतां आले पण ज्यांच्या भरंवशावर हे आपले गांव सोडून या शहरांत आले ते गृहस्थ यानां सामान ठेवण्यासही जागा देण्यास तयार झाले नाहींत. अशा विकट स्थितींत तेथील एका विद्वान व सत्शील ब्राह्मणानें याना आश्रय दिला व त्याचेकडे यांनीं मराठी विद्येचा संपूर्ण अभ्यास करून इंग्रजीचे शिक्षण घेण्यास सुरवात केली. या काळांतही हालांतच दिवस काढावे लागले, त्यानंतर तेथीलच एका सुप्रसिद्ध वकिलांचा यानां आश्रय मिळाला व या आश्रया वर मॅट्रिकपर्यंत शिक्षण झालें. सन १९१४ च्या महायुद्धाचे वेळी हे गृहस्थ मिलिटरीमध्यें गेले व तेथेही रेजिमेन्टल ट्रेनिंग स्कूलचा कोर्स पुरा करून दोन वर्षे नोकरी केली नंतर नोकरीचा राजिनामा देऊन हे खाजगी नोकरीकडे वळले. सन १९२०।२१ पासून आजपर्यंत हे गृहस्थ महाराष्ट्रातील एका मोठ्या शहरात एका सुप्रसिद्ध कॉन्ट्राक्टरकडे नोकरी करीत आहेत. यांचा प्रवास दक्षिण हिंदुस्थानचा संपूर्ण झाला असून रत्नागिरी ते गोंवा थोडा जलप्रवासही यानी केला आहे. यांचा प्रथम विवाह ता. १३ मार्च १९२३ रोजीं झाला. ही स्त्री १९२८ ते १९३२ पर्यंत क्षयानें अत्यंत आजारी त्यांतच दोन वेळा पोटाची आपरेशन्स करावी लागलीं व त्या प्रीत्यर्थ ४।५ हजार रुपये खर्च झाला. सन १९३२ च्या जानेवारीमध्यें प्रथम पत्नीचा मृत्यु. दुसरा विवाह सन १९३२ च्या जूनमध्यें झाला. या गृहस्थांना नृत्य, गायन, संगिताची आवड फार असून ह्याच कलेच्या व्यवसाई मंडळीत यांची बरीच घसरट आहे. सन १९३४ मध्यें एका लहानशा नव्या धंद्यात भागिदाराच्या विश्वासघातामुळें याना ठोकर बसली. स्वतंत्र तऱ्हेनें गायन-वादनाच्या कामांतील कॉन्ट्राक्टचा धंदाही हे गृहस्थ करतात व त्याना त्यांत यश व कीर्तिही चांगली मिळते. हे गृहस्थ एका सुप्रसिद्ध नाट्य संस्थेचे कायमचे व कांहींचे तात्पुरते व्यवस्थापक असून

त्यांच्या डायरेक्टर मंडळीतही यांची गणना चांगले प्रकारे आहे. यानां स्वतंत्र धंदा करण्याची हौस असून यांची वृत्ती उदार व दिलदार आहे. सरकारी अधिकाऱ्यांत यानां मानसन्मान चांगला आहे.

कुंडलीक्रमांक ५७

श्रीशके १७९२ फाल्गुन कृ. ११ शुक्रवार, सूर्योदयात् ग. घ. २० प. २०. जन्म

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

प्रथम कुटुंबाचा मृत्यु १८२४ मार्ग. व॥ ४ गुरुवार रात्रौ.

तृतीय कुटुंब. शके १८१३ फा. व १३ शनिवार, सूर्यो. पूर्वी घ. ५ ता. २६ मार्च १८९२.

मातेचे पोटी जन्म परन्तु १।२ वर्षेंही तिचें सुख मिळालें नाहीं. वडलांचें सदरहूप्रमाणें. १७९६ धाकट्या बंधूचा मृत्यु. १७९८ मार्गशीर्ष शु॥ ११ रोजीं प्रात.काळीं मातृवियोग.१७९९ श्रावण शु॥ १३ दुपारीं १ वाजता पितृवियोग, वडिलार्जित इस्टेट चोरापोरी गेली. वडील बंधु व भगिनी होत्या, पण विशेष फायदा नाहीं. १८०२ पर्यंत उनाडपणा व हट्टीपणा, पुढें शिक्षणयोग १८०८ सालीं इंग्रजी अभ्यास सोडला. १८०८ सरक्षणकर्ता ( धर्ममातेचा मृत्यु ). १८०९ पर्यंत अल्पव्यापार. १८१० सालीं ड्राईंगचें अभ्यासास सुरवात. उत्तरोत्तर त्यांत भरभराट. बक्षिसें मिळाली व नंबर पहिला आला. १८१३ वनप्रवास, अल्प राजाश्रय मिळाला. संरक्षणकर्त्याचा ( धर्मपित्याचा ) मृत्यु, १८१४ जमीनीचा लाभ. १८१५ लेखास व वक्तृत्वास सुरवात. द्रव्यलाभ सडकून. १८१६ नोकरी मिळाली, पण जाणें झालें नाहीं. १८१८ वैशाख वद्य १२ शुक्रवार दुपारीं लग्न. नाशीक येथें अकल्पित, स्वत. पूर्ण विरोध करूनही घडलें. मित्राचा उपयोग फार झाला. आप्तांचा नाहीं. भगीनी मृत्यु. १८२१ द्वितीय भगिनीचा मृत्यु. जमीनीचा लाभ. १८२३ पुन्हां नोकरी मिळाली, पण जाणें घडलें नाहीं. स्त्रीला गर्भपात. घोडागाडी व पशूंचा लाभ. १८२४ मार्गशीर्ष व॥ ४ गुरुवार रात्रौ ९–९॥ वाजता स्त्रीचा मृत्यु, जमीनीचा लाभ. १८२५ ज्येष्ठ व॥ ९ गोरज मुहूर्तावर मुबईस लग्न, जमीनीचा लाभ. १८२६ नोकरी, ग्रंथलेखन व द्रव्यलाभ. १८२८ ( २६ मार्च १९०३ ) द्वितीय कुटुंबनाश–कन्यानिधन. १८२८ ( जून १९०६ ) तिसरें लग्न, १८३० द्वितीय कन्या, १८३१ तृतीय कन्या, द्रव्यलाभ, द्वि. क. मृत्यु. १८३६ चतुर्थ कन्या. संकटाला सुरुवात, ब्यांका बुडून द्रव्यनाश. १८३८ पचम कन्या. १८३९ नोकरी सोडली. भूमिलाभ व द्रव्यलाभ, पचम कन्या मृत्यु. प्रकृती फार बिघडली. १८४३ नोकरी. मार्गशीर्ष शु॥ ६–बंधु वियोग १८४५ भूमिलाभ १८१४ पासून कोर्टांत जमिनीसबंधीं तटे. पण नेहमी बऱ्याच त्रासानें जय होतो. मूळव्याधीचाच रोग.

कुंडलीक्रमांक ५८

श्रीशके १८१८ दुर्मुखनामसंवत्सरे श्रावणेमासे कृष्णपक्षे त्रयोदश्यांतिथौ मंदवासरे आश्लेषा नक्षत्रे घ. ४ प. ३९ अत्रदिनेसूर्य—अस्तानंतर घ. ९ प. ५ समये जन्म. जन्मस्थळ ब्राह्मणवाडा ९ वाजून ५४ मि. जन्मतारीख ५ माहे ९ सन १८९६.

| स्प. सू. | स्प. चं. | स्प. ल. |
|---|---|---|
| ग. ४ | ३ | ० |
| अं. २० | २० | ७ |
| क. ५१ | ४३ | २२ |
| वि. २६ | २४ | ७ |

जन्मकुंडली

२ म, १२, ११ रा, ३, १, ४ चं, १०, गु के ५ र, ७ श, ९, बु ६ शु, ८

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—उत्तम रंग गोरा, स्वभाव दयाळू, परंतु राग लवकर येतो, गंडांतरें व मोठाले आजार—अज्ञानपणामध्यें कांहीं विशेष झालें नाहीं; परंतु सन १९११ इ. मध्यें विषमज्वरानें पुनर्जन्म. आई व वडिलांचें सौख्य—आई व वडिलांचें सौख्य वर्ष २५ पर्यंत. ता. ३१।७।२१ ला वडील कॉलऱ्यानें मयत झाले. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—जन्म त्यापासून भरभराट, पुढें कर्ते झाल्यापासून विशेष भरभराट व पुढें वय वर्ष ५६ पासून भावंडांत कलह, भाऊबंदींत तंटा सुरु झाल्यानें उत्पन्न कमी झालें. वडिलांचा धंदा—शेती व सावकारी, महिन्याचें उत्पन्न १,००० एक हजार. भावंडें एकंदर—४ त्यांत हयात २, पाठीवर नाहीं, आधीं भाऊ. भाऊ २, बहिणी २. विवाह—एक विवाह झाला, संवत् १९६९ मध्यें. स्त्रीची प्रकृति—उत्तम, गौरवर्ण, बाळंत रोग एक वेळ ईनल्फुएनझा एक वेळ. संतति—प्रथम पुत्र व द्वितीय पुत्र दोन्ही हयात आहेत. विद्या—इंग्रजी पांचवी पूर्ण, विद्याभ्यास सन १९१३ मध्यें बंद. भाग्योदय व स्थिति—गर्भश्रीमंत. स्वतःवर जबाबदारी—सन १९२१ माहे ऑगष्टपासून. उत्पन्न सांगतां येत येत नाहीं ! कारण वाटणीसंबंधीं तंटा सुरू आहे. सांपत्तिकदृष्ट्या अत्यंत वाईट काळ—सन १९१८ पासून चालू आहे. आवडत्या गोष्टी—द्रव्य, घोड्यावर बसणें, गायन, वादन, वैद्यकग्रंथ, ज्योतिष, मानसिक स्थिति चंचल. अत्यंत अपमानकारक गोष्टी अगर वैतागाचे प्रसंग—वडील वारल्यामुळें ता. ३१।७।२१ ते ता. ३१।१०।२१. नौकरी व व्यापार फक्त सावकारी आहे, स्थिति उत्तम. तीर्थयात्रा—१९१५ मध्यें केली. निरंतर व्यग्रता—निरंतर वाटणीसंबंधानें व्यग्रता. व्यसन कोणतेंही नाहीं, शारीरिक व्यंग नाहीं. आप्तवर्ग यांजकडून त्रास—भाऊबंदांकडून सर्वदा त्रास, मित्रांचें साह्य. भावंडांची स्थिति—फक्त वडील बहीण हयात आहे व तिचे घरीं सावकारी सराफीचा धंदा आहे. सासरची सांपत्तिक स्थिति—सासरची स्थिति मध्यम आहे. चुलत्यांची परिस्थिति—एकत्रांतील धन सर्व त्यांचें जवळ असल्याकारणानें हल्लीं परिस्थिति बरी म्हणणें भाग आहे, चुलतचुलत्यांची संख्या ३ आहे, सख्खा चुलता अगर आत्या नाहीं. सत्तेचें

घर, वाहनें, नोकरचाकर, जमीनजुमला यांचें सौल्य—घरें, जमीन, वाहनें वगैरेचें सौल्य पूर्वार्जित आहे. मामा व मावशा—मामा १ व मावश्या २ यांचे सुख आहे. शत्रुपीडा व विरोध—चुलतचुलत्याकडून.

कुंडलीक्रमांक ५९

श्रीशके १८१६ कार्तिकेमासे शुक्लपक्षे अष्टम्यांतिथौ चंद्रवासरे श्रवणनक्षत्रे घ. ४५ प. ३२ अत्रदिने श्रीसूर्योदयात्गत घ. ९ प. ५२ समये जन्म. जन्मवेळ स. १० वा. जन्म ता. ५ माहे ११ सन १८९४.

जन्मकुंडली

१०च, ८, ११, ९, ७ श शु बु ह, १२ रा, ६ के, १ म, गु ३, ५, २ ने, ४

| स्प. सू. | स्प. चं. | स्प. ल. |
|---|---|---|
| ६ | ९ | ८ |
| २० | १६ | १३ |
| १० | १० | ४८ |
| ३४ | २९ | ५ |

जन्मनक्षत्र श्रवण भुक्त ३०।४६ भोग्य ३५।४० जन्मतःचंद्रमहादशा मुक्तवर्षादि ४।७ १७।१२ भोग्यवर्षादि ५।४।१२।४८,

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—साधारण, स्वभाव मनमिळाऊ, जरा रागीट, वर्ण गोरा. गंडांतरें व मोठाले आजार—सन १९१२ ता, ७ मे रोज मंगळवार "टायफॉईड" तापास सुरवात, आजार १ महिना ताप, १९१९ फेब्रुआरींत कॉलरा, सन १९१७ आगष्टपासून डिसेंबरपर्यंत "मेंटल डेबिलिटि, १९१८ आगष्ट लिव्हरचें दुखणें, आई व वडिलांचें सौल्य— आई ६ आगष्ट १९१६ रोजीं जलोदर व कावीळ यानें वारली, वडील हयात आहेत, वडिलांस मोठाले आजार—सन १९१२ फेब्रुवारींत किडनीचा विकार, मार्च डोळ्यावर शस्त्रक्रिया (मोतीबिंदू) १९१४ मार्च, दुसऱ्या डोळ्यावर ऑपरेशन, मुळव्याधीचा विकार आहे, वडिलांचा धंदा—सरकारी नोकरी, महिन्याचें उत्पन्न १०००, भावंडें एकंदर—८, त्यांत हयात ४, पाठीवर बहिण, आधीं भाऊ, जास्त भाऊ व त्यांची संख्या ७ पहिला भाऊ, पाठीवरील बहिण व तिच्या मागें झालेले दोन जुळे भाऊ हीं मयत, विवाह—१२ जून १९१६ रोजीं विवाह, स्त्रीची प्रकृति—प्रकृति बरी, देखणी, शेवटचा आजार बाळतरोग, ( ता. १४ नोव्हेंबर १९२१ ) संध्याकाळीं ६ स्टॅं. टा. वाजता वारली । संतति—एकंदर संख्या दोन मुलगे हयात, विद्या—बी. सी. ओ. एम. पर्यंत Bachelor of Commerce शेवटच्या परिक्षेस आजारामुळें दोन तीन वर्षें बसतां आलें नाहीं. भाग्योदय—आजपर्यंत ८ नोकऱ्या झाल्या, सध्यां घरीं बसून आहे, सांपत्तिकदृष्ट्या अत्यंत वाईट काल—जून ते डिसेंबर १९२०, द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल—जून १९१९ ते मे १९२०, सरकार अगर लोकांकडून मान १९२०सालीं गव्हर्नरचें पर्सनल अकाऊंटंट, अत्यंत आवडत्या गोष्टी—ज्योतिषाचा नाद, फौजदारींत, कोर्टांत जाण्याचा प्रसंग—१५।९।१९२० रोजीं आफि-

सांत सोन्याचें २१० रु. किंमतीचें घड्याळ चोरीस गेलें, तें पुनः मिळालें, आरोपी ५ वर्षांचा वृद्ध, त्यास महिन्याची शिक्षा व ३० रु. दंड, वैतागण्याचे प्रसंग—९शा मंगळ आला कीं घरां-तून हकालपट्टी होते, नोकरी खातें—Speciae subject, accounting and auditing, त्रास—आप्तवर्ग व स्नेही यांजकडून त्रास, भावंडाचा व्यवसाय—विद्या—हयात असलेले वडील बंधू डॉक्टर आहेत, त्याच्या मागचे इले, इंजिनिएर, धाकटे शाळेंत, सासरची सांपत्तिक स्थिति—श्वशुर एका संस्थानचे दिवाण आहेत, लाभ कांहीं नाहीं, गणपतिभक्त, धार्मिक, सावत्र आई—३ दिसेंबर १९१६ रोजीं झाली व २५ सप्टेंबर १९१८त एन्फ्लुएंझानें मयत, मामा व मावशा—एक मामा, दोन मावशा, एकीचा नवरा डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्ज, दुसरी विधवा,

### कुंडलीक्रमांक ६०

श्रीशालिवाहनशके १८०९ माघेमासे शुक्लपक्षे अष्टम्यांतियौ शनिवासरे घटि ३८ पळे ९ अश्विनीनक्षत्रे घ. ३१ पळ १ अत्रदिने श्रीसूर्यास्तात्गत घ. १८ प. ३० समये जन्म.

जन्मस्थळ उंब्रज जिल्हा सातारा.

स्पष्ट रवी १०–१३
स्पष्ट चंद्र १–२६
स्पष्ट लग्न ६–२–५६

जन्मकुंडली

गु ८ शु
६ म
९
७
५
१० बु के
रा ४ श
११
चं १
३
१२
२

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति—निकोप, सुदृढ एकतंत्री व हट्टी, वर्ण सामान्य काळा. गंडांतरें—वय ३१ महिने ७ ताप. वय ३४ महिने २ ताप. प्रत्येक वेळेस तीन महिने निजून गेले. आई व वडिलांचें सौख्य—वय २ शके १८११ वडिलांचा मृत्यू. आई वय ३५ पर्यंत हयात वडिलांचा धंदा—पोलिस इन्स्पेक्टर. महिन्याचें उत्पन्न ८० ते १००. भावंडें—एकंदर ७ त्यांत हयात ५ पाठीवर १ बहिण आधीं ४ भाऊ व त्यांची संख्या भाऊ ६ बहिण १ सर्वांत वडील भाऊ ५५ वर्षांचा होऊन वारला. नं. ३ भाऊ वय ५२ वर्षांचा होता. विवाह—विवाह दोन झाले. पहिला विवाह वय २० असतां झाला. लग्नसमयीं बायकोचें वय १० होतें. पहिल्या बायकोस २ मुली. त्या हयात आहेत. यांचीं वय १७ व १४, वय ३० असतां मुलगा होऊन बायको व मुलगा मेला. दुसरा विवाह—ता. २६ मार्च १९१९ फाल्गुन व ९ शके १८४० वय ३१ महिना १–दिवस १ असतां गोरज मुहुर्तावर पुणें येथें झाला. वय ३२ असतां त्रीस बाळंतपण आजार, पहिला मुलगा मेला. संतति—प्रथम कन्या. एकंदर संख्या ३ मुली + १ मुलगा, सुरी रोगानें मुलगा मेला. स्वतःस विकार मूळव्याधीचा. विद्या—विद्या वय १७ असतां इंग्रजी ६ यत्ता नापास झाल्यामुळें नोकरी धरली, उमेदवारीस पगार रु. ९ वर

लागलें. कायम पगार वय २१ ला पगार रु. २५. भाग्योदय—बिहार प्रांत मानभूम जिल्हा धंदास सुरवात रेल्वे ओव्हरसियर खातें. महिना उत्पन्न वय ३० असतां ९० रु. महिना पगार. अनपेक्षित बदल—वय २० नोकरी लागली. भावाची सांपत्तिक मदत झाली. सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत वाईट काळ—वय २० ते २५ व वय ३१ ते ३३. द्रव्यादृष्ट्या उत्कृष्ट काळ—वय २५ ते २८. वैतागण्याचे प्रसंग—वर्ष ३१ बायको वारली. संसाराची वाताहात झाली. चोऱ्या दोनदां झाल्या. व्यसनें—विडीचें व्यसन—वय १४ असतां घोड्यावर अति बसल्यानें व घोड्यावरून हापटल्यापासून मूळव्याधीचा आजार. सांपत्तिक व औद्योगिक सदोदित व्यग्रता. भावंडांचा व्यवसाय, विद्या व वैभव–सर्व सरकारी किंवा संस्थानांत नोकर. सत्तेचें घर नाहीं–वडिलार्जित थोडी शेती आहे पण त्याचा फायदा वडिलांस अगर स्वतःस केव्हांच नाहीं.

कुंडलीक्रमांक ६१

श्रीशके १८१२ कार्तिकेमासे कृष्णपक्षे त्रयोदश्यांतिथौ बुधवासरे विशाखानक्षत्रे घ. ५५ प ५८ अत्रदिनेश्रीसूर्योदयात्गत घ. ३८ प. २५ समये जन्म. जन्मवेळ रात्रौ, ता. १० माहे डिसेंबर सन १८९०

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति—उत्तम, रागीट, तिखट व आंबट पदार्थांची आवड, नीटनेटकेपणाची विशेष गोडी. गंडांतरें व मोठाले आजार—वयाचीं ९ वर्षें ४ महिने झाल्यावर देवीनें १५ दिवस. वयाचे १२ ते १५ वर्षांपावेतों पाप वाढविणारी अशक्तता, वयाचे २१ वर्ष पूर्ण होण्याचे बेतांत १० दिवसापूर्वी अपघात, व्हिक्टोरियाखालीं बराच वेळ बेशुद्ध व प्राणावरील. गंडांतर वयाचे २६ वे वर्षी आषाढांत विषमज्वर २० दिवस. वडील वयाचीं ११ वर्षें पूर्ण झाल्यावर येणारे आश्विन वद्य ५ स वारले. मातोश्री हयात. आई व वडिलांस मोठाले आजार—वडिलांस माझे वयाचे ८ वे वर्षी श्वासदम्याचा फार मोठा आजार. आईची प्रकृती चांगली. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—वडील त्यांचें बालवयांत फार गरीब नंतर आजोबा वकील झाल्यामुळें स्थितींत अचानक बदल. वडीलाचे वयाचे अंदाज २०।२२ वे वर्षी (वडील मरणाचेवेळीं ५१ वर्षांचे.) वडिलांचा धंदा—सावकारी महिन्याचें उत्पन्न ४००।५०० रुपये. भावंडें—एकंदर ३ त्यांत हयात १ पाठीवर १ बंधु आधीं २ बहिणी. जास्त बहिणी व त्यांची संख्या २, १ बंधु व बहिण मृत, बंधु १९०० सालीं, बहिण १८८८ सालीं. सांप्रत जिवंत बहिण १

तिचा जन्म १८८३. विवाह एक १९०६ साली झाला. स्त्रीची प्रकृति नेहमी आजारी, स्वरूप बऱ्यापैकी, सन १९०९, १९१३, १९१८ या तीन वर्षांत आजार बाळंतरोग व त्यापासून उद्भवणारें दुःख. संतति—प्रथम ५ कन्या ३ हयात व २ मृत्यु. एक दहाव्या दिवशीं व एक ६ वे तापानें मयत. कन्या जास्त. पुत्र १, हयात ३ कन्या व १ पुत्र. विद्या—मॅट्रिक पावेतों नेहमीं यश. पण फक्त म्याट्रिकचे वर्गांत अपयश. भाग्योदय—भाग्यांतच जन्म. जन्मतांच भाग्योदय. स्वतःवर व्यावहारिक जबाबदारी १२ वे वर्षी, ८००।९०० रुपये दरमहा उत्पन्न—सांपत्तिक दृष्टया अत्यंत वाईट काल गेलाच नाहीं. द्रव्यदृष्टया उत्कृष्ट काल अज्ञानपणांतील वयाचे १० वर्षांचे पूर्वीचा व हल्लींचा. कोणत्याही कार्यांत यश येतच नाहीं, आलें तर कचित्. अपयश हटकून, अत्यंत आवडत्या गोष्टी—राजकारण. कोर्टांत जाण्याचा प्रसंग फौजदारींत आलाच नाहीं. दिवाणींत नेहमीं व्यवहारामुळें येतो. अत्यंत अपमानकारक गोष्टी—केव्हांही नाहींत. व्यापार—कापसाचा ९।१० वर्षे केला. बहुतेक नेहमीं नुकसान, नेहमीचा उद्योग सावकारी, जवारी व इतर दाणागोटा. त्यांत यश बेताबाताचें व शेतीचे लागवणीचे उत्पन्न. त्यांतही फायदा बेताबाताचा. विशेष उत्कर्ष कोणतेच व्यापारांत नाहीं. अपघात—पूर्वी वर्णन केलेला सन १९११ साली दिसेंबरचे १ ले तारखेस मुंबईस झालेला अपघात. तीर्थयात्रा अशी विशेष नाहींच पण काशी, अयोध्या, प्रयाग, नाशिक वगैरेची झाली. साल नाशिक १९०९ व इतर १९१६. चुलता आत्या कोणी नाहीं. सत्तेचें घर, वाहन, नोकरचाकर जमीनजुमला घर, यांचें सौख्य उत्तम. सर्व सौख्य अनुकूल पूर्वार्जित.

### कुंडलीक्रमांक ६२

श्रीशके १८१५ आश्विनेमासे कृष्णपक्षे तृतीयासह चतुर्थ्यांतिथौ भृगुवासरे कृत्तिकानक्षत्रे घ. २५ प. २४ परं रोहिणी अत्रदिने श्रीसूर्योदयात्गत घ. २८ प. २५ समये जन्म. जन्मवेळ सायंकाळीं ५ वाजून २२ मि. मुंबई जन्म तारीख २७ माहे आक्टोबर सन १८९३,

| स्प. सू. | स्प. चं. | स्प. ल. |
|---|---|---|
| ६ | १ | ० |
| ११ | १० | ११ |
| ४२ | ४३ | ६ |
| ४० | ६ | १२ |

जन्मकुंडली

जन्मनक्षत्र रोहिणी भुक्त घ. ३ पळ १ जन्मतः शुक्र महादशा भुक्तवर्षादि ७-४-१५-४५-५४ भोग्यवर्षादि १३-७-१४-६ अष्टोत्तरीप्रमाणें.

### आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति—शरीरबांधा मध्यम, लहानपणीं शारीरिक व्यायाम केल्यामुळें कसलेला, स्वभाव अत्यंत शांत पण वेळ आल्यास इतका तापट कीं, कोणत्याही नुकसानीची पर्वा रहात नाहीं, ललितकला व गूढ विद्या फार प्रिय. उजव्या भुजावर, कटिवर व डाव्या मनगटावर आणि

गळ्याखालीं तीळ, चेहरा पाणीदार, गौर आणि देखणा, डोळे अति पाणीदार. गंडांतरें व मोठाले आजार—लहानपणीं ३ वर्षी गोंवर, १५ व्या वर्षी मुदतीचा ताप, त्याचप्रमाणें नोव्हेंबर १९१६ त विषमज्वर २१ दिवसांचा, याशिवाय १४ व्या वर्षी पोहोण्यास शिकतांना जलापघात, सन १९१७ साल सबंध संकटांत. आई व वडिलांचें सौख्य—वडील ह्यात, मातोश्री ता. ७ फेब्रुवारी १९१७ ला पहांटे ५ वाजतां गुरुवारी मृत. माता अत्यंत प्रेमळ व साध्वी व्रतनियमस्थ. आई व वडिलांस मोठाले आजार—मातेस सन १९०२ सबंध वर्ष आजारपणाचें; त्यानंतर मृत्यूपूर्वी १ वर्ष सारखा आजार. रोगप्रदर, त्यांतच मृत्यू. क्षयी होऊन वडिलांस किरकोळ तापाचे आजार होतात. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—मूळचें खानदाणी घराणें. श्रीमंत गायकवाडसरकार गोविंदराव महाराजांनीं कान्हीगांव वंशपरंपरा जहागीर सर्व हक्कासह दिला आहे. ही सातवी पिढी आहे. गेल्या १५ वर्षांपासून सांपत्तिक स्थिति उत्तरोत्तर उतरत्या दशेस अगदीं जुन्या कर्जामुळें, वडिलांस मामलेदारी हुद्याची नोकरी. वडिलांचा धंदा—गायकवाड स्टेटमध्यें नोकरी, उत्पन्न जहागिरी उत्पन्न दरसालीं रु ४ हजार, वडिलांनीं २० वर्षांपासून नोकरी स्वीकारली असून आज वर्ष ५४ पर्यंत नोकरींतच दिवस गेले आहेत, नोकरीची फार आवड. भावंडें—एकंदर २ त्यांत ह्यात कोणी नाहीं, पाठीवर कोणी नाहीं. आधीं दोन बंधू. जास्त भाऊ व त्यांची संख्या—२ पहिल्या बंधूचा जन्मकाल शके १८०७ अश्विन शुद्ध ४ तूळलग्न ( अंश २४ ) दुसऱ्या बंधूचा जन्मकाळ शके १८१० द्वितीय चैत्र वद्य २० लग्न मीन ( अंश १७ ) दोन्ही बंधू वारले पहिले सन १९१९ आगष्ट व दुसरे सन १९०९ मार्चमध्यें वारले. विवाह—शके १८४१ वैशाख वद्य ५ मंगळवार, श्रीची प्रकृति अति अशक्त, देखणी, कर्तव्यशील, कर्मधर्मनिष्ठ, सडसडीत, श्वासाचा विकार, ७।८ वर्षी कपाळास पत्रा लागून मधोमध चंद्रकोरीसारखी खोंक पडली आहे व तिची खूण स्पष्ट असून उलट ती चेहेऱ्यास शोभते. स्वभाव अति तापट व तडफी. संतति—प्रथम संतति कन्या, शके १८४२ फाल्गुन वद्य ९ लग्न कर्क ( अंश १२ वर ) कन्या देखणी आहे. कन्येस उष्णतेपासून फार त्रास होतो व प्रकृति पण उष्ण आहे. विद्या—मॅट्रिकपावेतो, फोटोग्राफी चांगली येते. गायनकला अवगत, चित्रकला, गूढ शास्त्रांची फार आवड, ज्योतिषफलशास्त्र. भाग्योदय—इ. सन १९१६ पासून नोकरी. पहिली नोकरी मुंबईस ६ महिने पुढें मेसापोटेमियाच्या युद्धभूमीवर सन १९१७ सबंध साल नोकरी फोटोग्राफर म्हणून केली. त्यांत प्राप्ती बरी, परंतु शारीरिक हालअपेष्टा फार झाल्या. स्वतःवर व्यावहारिक जबाबदारी—तेथून सन १९१८ आरंभास परत आल्यावर वडिलांनीं सर्व जहागिरीची व्यवस्था आमच्यावर सोंपविली आहे व आम्हींच सर्व कारभार पहात आहोंत. अनपेक्षितरीतीनें परिस्थितींत बदल—गेल्यावर्षी सरकारी ( गायकवाडी ) कर्जग्रस्त कायद्याखालीं सर्व जहागिरी सरकारांत सोंपली व आतां निर्वाहास सरकारांतून जहागिरी पोशिंदानप्रमाणें १२५ ते १५० मिळणार आहे. सांपत्तिकदृष्ट्या अत्यंत वाईट काल—सन १९१४-१९१५ व सन १९२१ हा काल अत्यंत वाईट गेला आहे. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल—१९१७-सन १९१९ अत्युत्तम काळ होते. कोणत्याही कार्यांत यश अपयश—कोणतेंही कार्य हातीं घेतल्यावर अपयश येत नाहीं याबद्दल बऱ्याच लोकांस कित्येकवेळां आश्चर्य पण वाटतें. सरकार अगर लोकांकडून मान—सन १९२१ सप्टेंबरपासून सरकारानें लोकांतर्फे म्हणून लोकलबोर्ड

संस्थेचे तालुक्याचे अवलदार तर्फे जागा आम्ही सहज दिली. दिवाणी अगर फौजदारी कार्टांत जाण्याचा प्रसंग—सन १९२० पासून जुन्या सावकारांच्या देण्याचा निकाल सरकारतर्फे सरकारांत २० वर्षे जहागिरी सोंपून करण्यासाठीं दिवाणी कोर्टांत वारंवार जाणें सुरू. गेल्या कांहीं वर्षापासून रसायनशास्त्राचे प्रयोग करीत असून विलायतीप्रमाणें कांहीं पदार्थ बनविण्यांत यश आलें आहे. त्याप्रमाणें या बाजूस एक व्यापारी संस्था काढून हातमागांचा कारखाना काढण्याचा प्रयत्न केला आहे व विणकामाची माहिती घेत असतोच; त्यांत पाश्चिमात्यांप्रमाणें रसायनमिश्रीत dying चे प्रयोग करीत असतो. बुद्धि कोणत्याही विषयांत उत्तम चालते व त्या त्या विषयाचे उपलब्ध मराठी इंग्रजी ग्रंथांच्या सहायानें यशही चांगलें येतें. अपघात, संकटें, जलप्रवास—सन १९०७ सालीं मेसापोटेमियांत ( अरबस्थानांत ) गेलों तेव्हां २॥ हजार मैलांचा जलप्रवास घडलाच; शिवाय एकंदर १२ महिने रणभूमीवर जीव धोक्यांत होताच. व्यसन—तपकिरीचें आहे, बाकी कोणतेंच नाहीं. सासरची सांपत्तिक स्थिति—घराणें पूर्वापार मोठें. सावकारी म्हणून प्रसिद्ध असलेले व मुंबईच्या बाजूस प्रसिद्ध आहे. चुलत्यांची परिस्थिति—चुलते अप्रतिम गाणारे व पुण्यांत गाणाऱ्या मंडळींत प्रसिद्ध होते. ते प्लेगनें १९०७ सालीं वारले. चुलती हयात पण स्वतंत्र राहते. आत्या कोणी नाहीं. मावश्या तीन आहेत व मामा पण चार आहेत. सत्तेचें घर, वाहनें, नोकरचाकर जमीनजुमला—गांवीं सत्तेचा वाडा आहेच, पुण्यास मोठा वाडा होता तो १९०८ सालीं विकला गेला. नोकरांचे सुख आहेच जमीन सबंध गांवच मालकीचें आहे पण पूर्वार्जित, जहागिरी सत्तेप्रमाणें गांवापुरती मॅजिस्ट्रेट पॉवर आहे. वडील बंधू चित्रकलेचे भोक्ते व त्यांतच त्यांची नोकरी ३।४ वर्षे झाली. ते १६ तासांत अकस्मात कॉलऱ्यानें वारले, मधले मॅट्रिकमध्यें असतां पुण्यास १९०८ सालीं क्षयानें झिजून वारले. मामा व मावश्या—मावश्या ३ सर्वांचें आमच्यावर अत्यंत प्रेम. मामाचें तितकें नाहीं. शत्रुपीडा व विरोध—शत्रु फार होतात, गेल्या ३ वर्षांपासून ही संख्या अत्यंत वाढली आहे त्यांत भाऊबंद मुख्य आहेत. आजपावेतों शत्रुचें कांहीं चाललें नाहीं, उलट आमच्याशीं शत्रुत्व करण्यांत शत्रूला हार खावी लागते व नुकसानीचें माप त्याच्या पदरांत शेवटीं पडतें असे अनुभव आहेत.

कुंडलीक्रमांक ६३

श्रीशके १८०५ सुभानुनामसंवत्सरे आश्विनेमासे शुक्लपक्षे दशम्यांतिथौ गुरुवासरे श्रवणनक्षत्रे घ. २८ प. ० अत्रदिने श्रीसूर्योदयात्प्राक् घ. १ प. ० समये जन्म. जन्म तारीख ११ माहे १० सन १८८३. ( ६ वा. १२ मि. सकाळीं. )

जन्मकुंडली

शु ७ रा
५
मं ४ गु
र ६ बु
८
९
३
१२
११
१ के

शारीरिक स्थिति—ठेंगू, नेहमीं शांत पण एखादे वेळीं फार तापट, शॉर्ट साईटमुळें चष्मा एकतीस वर्षें वापरीत आहे. गंडांतरें व मोठाले आजार—देवी, एप्रिल १९०५ वयाचे बत्तिसावे वर्षीं आल्या होत्या. आई व वडिलांचें सौख्य—वडील नोव्हेंबर १८०७ सालीं वारले. मातोश्री ह्यात आहेत. आई व वडिलांस मोठाले आजार—वडील मधुमेहानें वारले. मातोश्रीस १९१९सालीं कॉलरा झाला होता. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—साधारण बरी होती. वडिलांचा धंदा—फर्स्ट क्लास सबजज्ज. महिन्याचें उत्पन्न—रुपये पांचशें. स्वतःचे धंद्यांत अगर नोकरींत भयंकर काळजीचे प्रसंग—जून १९१९ नंतर वांई येथें सबजज्ज व फर्स्ट क्लास मॅजिस्ट्रेट असतांना पोलिसशीं तंटा होऊन राजिनामा द्यावा लागला. भावंडें एकंदर—सहा त्यांत ह्यात-चार, पाठी-पर—तीन भाऊ आधीं-एक होते ते वारले. जास्त भाऊ व त्यांची संख्या—तीन थोरले भाऊ १८९० सालीं वारले, बहीण १८९० सालीं वारली. विवाह—विवाह वांई येथें मे १९००मध्यें सतरावे वर्षीं झाला, स्त्री सुस्वरूप, १९०१ सालीं फार आजारी होती. संतति—प्रथम पुत्र १९०२ सालीं झाला तो वारला, तिसरा पुत्र १९०७ सालीं वारला. आतां तीन पुत्र व चार कन्या एकंदर सात. विद्या—१९०६ सालीं बी.ए., एल्एल्. बी. फक्त १९०१ सालीं इंटर मिजिएट परीक्षा एकदां नापास. भाग्योदय—वकिली मुंबईस १९१७ सालीं. १९१९ सालीं पगार दरमहा रुपये २५० अडीचशें, आतां पगार रुपये पावणेदोनशें. स्वतःवर व्यावहारिक जबाबदारी—१९०७ सालीं नोव्हेंबर महिन्यांत वडील वारले त्यानंतर सर्व जबाबदारी अंगावर पडली. आज पगार दर महिना रुपये १७५. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल—१९१९सालीं पोलिसशीं भांडण होऊन राजिनामा द्यावा लागला. सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत वाईट काल-सहा महिने. १५ एप्रिल १९२० ते १८ आक्टोबर १९२० ह्या वेळेंत अधिकारच्युत होतो. द्रव्य-दृष्ट्या उत्कृष्ट काल—१९११ ते १९१४ पर्यंत. कोणत्याही कार्यांत यश—१८२० पर्यंत यश फार चांगलें होतें. सरकार अगर लोकांकडून मान—१९०७ ते १९२० पर्यंत सरकारांकडून चांगला मान मिळाला १८ आक्टोबर १९२० पासून संस्थानाकडून मान. दिवाणी अगर फौजदारी कोर्टांत जाण्याचा प्रसंग—१९१९ सप्टेंबर मध्यें पोलीस इन्स्पेक्टरनें बेअब्रूबद्दल फौजदारी खटला केला व तो मग काढून घेतला. १९१९ जूनपासून १९२० आक्टोबरपर्यंत सरकारशीं भांडण. नोकरी—१९०७ पासून नोकरी. अपघात, संकटें, जलप्रवास—१९०५ मध्यें देवी आल्या. १९१९ मध्यें पोलिसशीं भांडण होऊन राजिनामा द्यावा लागला. १९०१ मध्यें यात्रा. वारसा, बक्षीस मृत्युपत्र अगर अशाच दुसऱ्या कोणत्याही प्रकारानें अकस्मात द्रव्यलाभ—१९११, १९१५ व १९१६ सालीं. भावंडांचा व्यवसाय—प्रत्येकाची विद्या चांगली झाली आहे व सुखस्थिति. सासरची स्थिति—चांगली आहे. चुलत्यांची परिस्थिति—अगदीं साधारण, सत्तेचें घर, वाहनें—कांहीं जमीनजुमला नाहीं. वडिलार्जित घर १९१४ सालीं विकलें.

कुंडलीक्रमांक ६४

श्रीशके १८१२ संवत १९४६ ज्येष्ठेमासे कृष्णपक्षे दशम्यांतिथौ गुरुवासरे रेवतीनक्षत्रे घ. २२ प. २९ अत्रदिने श्रीसूर्योदयातगत् इष्ट घ. ४१ प. ३१ समये जन्म. जन्मस्थळ उमरावती. जन्मतारीख १२ माहे ६ सन १८९०.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—शारीरिक स्थिति उत्तम, स्वभाव उत्तम, रूप गौरवर्ण, व्यंग कांहीं नाहीं. गंडांतरें व मोठाले आजार—१९१८ मध्यें. तापानें इनफ्ल्युइन्झानें आजारी पडलों होतों. आई व वडिलांचें सौख्य—आई वयाचे १० वर्षी मृत (म्हणजे संवत् १९५६) झाली. वडील सोळावे वर्षी म्हणजे संवत् १९६२ सालांत वारले. आई व वडिलांस मोठाले आजार—आई तापाच्या आजारांत वारली. वडील संवत् १९६२ सालांत प्लेगनें वारले. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—साधारण ठीक. माझे वयाचे सहावे वर्षी स्थिति बदलली. म्हणजे मला दत्तक दिलें संवत् १९५१ या सालांत. वडिलांचा धंदा—दलाली. महिन्याचें उत्पन्न सरासरी शंभर रु. धंद्यांत भयंकर काळजीचे प्रसंग—धंद्यामध्यें बरेंच वेळा काळजीचे प्रसंग येऊन त्यामध्यें निभावून निघालों. भावंडें एकंदर—५. त्यांत हयात—३, जास्त बहिणी, त्यांची संख्या—२. भाऊ संवत् १९६७ चे सालांत प्लेगनें वारले. व वडील बहीण संवत् १९७० चे सुमारास वारली. विवाह—पहिला विवाह संवत् १९६२ सालांत वैशाखमासीं झाला. पहिले कुटुंब बाळंतपणामध्यें वारलें. दुसरे लग्न संवत् १९७१ सालांत झालें. संतति प्रथम पुत्र—सध्यां दोन मुलें आहेत, एक पहिले कुटुंबाचे. दुसरे कुटुंबापासून एक कन्या झाली होती ती वारली. आतां एक मुलगा आहे (बारा वर्षे सात महिन्याचा) पहिला २२ पूर्ण. तेवीसावें लागलें. विद्या—विद्या इंग्रजी तिसरे यत्तेपर्यंत संवत १९६० चे सुमारास. भाग्योदय—भाग्योदय उमरावती जिल्ह्यांत संवत १९७२ सालांत. स्वतःवर व्यवहारिक जबाबदारी—स्वतःवर जबाबदारी संवत १९६७ सालापासून सालीना उत्पन्न पंधरा हजारापर्यंत आहे. सरकारांतून मान सन १९२२ सालीं मिळाला आहे. स्थावरचा जास्त शौक आहे. सन १९१९ सालामध्यें अचानक फौजदारींत जाण्याचा प्रसंग आला होता. सुरवातीपासून व्यापार—शेतीचा व सावकारी. भावंडांचा व्यवसाय—दुकानदारी. सासरची सांपत्तिक स्थिति—साधारण, लाभ कांहीं नाहीं. आत्या आणि चुलता—कोणी नाहीं. सत्तेचें घर, वाहनें, नोकरचाकर—पूर्वीचा जमीनजुमला व कमाविलेला जमीनजुमला चांगला आहे.

### कुंडली क्रमांक ६५

श्रीशके १७८१ पौषमासे कृष्णपक्षे पंचम्यांतिथौ मध्य रात्रीं जन्म.

मृत्यू ता. १० नोव्हेंबर १९०७ शके १८२९ कार्तिक शु. १४ (हे गृहस्थ फर्स्टक्लास सबजज्ज होते.)

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

आई व वडिलांचें सौख्य—वडील १८९७ सालीं वारले. मातोश्री १९१३ सालीं वारली. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—अगदीं साधारण. वडील नामांकित वकील होते पण १८७५ सालानंतर वकिली करता आली नाहीं. वडिलांचा धंदा—वकील. भावंडें—एक भाऊ व दोन बहिणी. संतति—प्रथम पुत्र मृत. शेवटीं चार पुत्र. कन्या होती ती वारली. विद्या—हायकोर्ट प्लीडरची परीक्षा झाली होती. सरकारकडून मान मिळे पण द्रव्यलाभ बेताचा. १९०१ सालीं दिवाणी दावा लावला त्यांत यश आलें. व्यसनें—मधुमेहाचा आजार. व स्त्रीसंबंधीं व्यसन. आप्त-वर्गाचा भार सोसावा लागला.

### कुंडलीक्रमांक ६६

श्रीशके १८१० श्रावणेमासे शुक्लपक्षे द्वितीयातिथौ पहाटे जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

आई व वडिलांचें सौख्य—वडील १९०२ सालीं वारले. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—अगदींच साधारण. वडिलांचा धंदा—रेल्वे क्लार्क, महिन्याचें उत्पन्न रुपये तीस. भावंडें—एकंदर चार. त्यांत हयात म्हार पाठीवर बहीण, आधीं कोणी नाहीं. भाऊ,२ बहिणी २. विवाह—मे १९१२ चोवीसावे वर्षी. स्त्री सुस्वरूप आहे. संतति—दोन पुत्र--एक मुलगी मृत. विद्या—१९०७ सालीं स्कूल फायनलपर्यंत. भाग्योदय—१९०८ सालीं नोकरी लागली. आज महिना उत्पन्न—पगार रुपये २०० सांपत्तिकदृष्ट्या अत्यंत वाईट काल—१९०१ ते १९०५. चुलत्यांची संख्या—दोन. सत्तेचें घर—वगैरे कांहीं नाहीं. दोन मामा त्यांचेकडून मदत.

कुंडली क्रमांक ६७
जन्म तारीख ८ माहे जानेवारी सन १८८०.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—शार्ट साईटमुळें चष्मा. आई व वडिलांचें सौख्य—वडील १९१३ सालीं वारले. मातोश्री १९१८ सालीं वारली. वडिलांचा धंदा—वकील. भावंडें एकदर—पांच पर्यंत हयात—दोन. विवाह—१९०४ मार्च. विद्या—डिस्ट्रिक्ट प्लीडरची परीक्षा १९१२ सालीं. स्वत वर व्यावहारिक जबाबदारी १९१३ सालीं. व्यसनें—मदिरा व्यसन. वाचनाची आवड. सत्तेचें घर, जमीनजुमला—वडिलार्जित घर आणि जमीन आहे

कुंडलीक्रमांक ६८
श्रीशके १७९६ पौषमासे शुक्लपक्षे चतुर्थ्यांतिथौ चंद्रवासरे पूर्वाभाद्रपदा नक्षत्रे जन्मवेळ सूर्योदयापूर्वी १॥ घ. जन्मस्थळ रानतळें (चिपळूण) जन्मतारीख १० माहे जानेवारी सन १८७५.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति—सुदृढ (मध्यम) काटक, स्वभाव—तापट, गोड पदार्थांची आवड, रंग तांबूस व गोरा यांचा मिश्र डाव्या पायावर लहानपणाच्या नारूच्या खुणा, नाकावर व कांही ठिकाणी देवींचे वण, अलीकडे तीन वर्षांपासून दृष्टी कमी. गडांतरें व मोठाले आजार—वर्ष २-३ देवी, वयाचे ११-१२ हिवताप (२-३ महिने, १८वें वर्षी विंचवाचे निमित्तानें महामृत्यु टळला; १८ वें वर्षी डोळे. २२ दिवस) १७ ते १८ भूतसंचार (२ महिने), १८९८ सालीं प्लेग ३ महिने पौष ते फाल्गुन १९१२ऑगस्ट नव्हंबर एक महिना. आई व वडिलांचें सौख्य—

वडिलांचें सौख्य वयाचे सोळावे पर्यंपर्यंत मातोश्रीचें ३९ पर्यंत आई व वडिलांस आजार— वडिलांस मूठ मारली गेली होती त्यापासून कांहीं दिवस आजार; त्यांतून बचाव; मातोश्रीस काळपुळी झाली होती त्यांतून बचाव. म्हातारपणीं पोटदुखीची व्यथा. सांपत्तिक स्थिति—गरिबी. वडिलांचा धंदा—भिक्षुकी, दशग्रंथी. भावंडें—एकंदर ६ सापत्न २, सख्खी ४, त्यांत हयात–२ पाठीवर—भाऊ आर्धी बहीण जास्त भाऊ—धाकटा भाऊ १८०१ सालीं १॥ वर्षाचा होऊन मेला; वडील बहीण आठरावें वर्षीं वारली. विवाह—प्रथम आठरावें वर्षीं, द्वितीय विवाह एकतीसावें वर्षीं पहिल्या स्त्रीची प्रकृति; स्वरूप मध्यम, ठेंगू, १९०० सालीं काळपुळी होऊन त्यांतून बचाव, ४ महिन्याच्या गर्भपातानें ४० दिवस आजार व त्यांत मृत्यु, दुसरे स्त्रीची प्रकृति–कफविकार, स्वरूप मध्यम. संतति—प्रथम पुत्र, पाहिले स्त्रीपासून ४ अपत्यें. पैकीं एक मुलगा हयात दुसरीपासून—पहिलें ५ महिन्याचें उपजत मृत्यु नंतर ५ त्यातलें मधलें मृत एकंदरींत आतांपर्यंत ११ मुलें. आईस पोटदुखीचा विकार. विद्या—मराठी सहा इयत्तापर्यंत व इंग्रजी ३ वयाचे एकोणीसावें वर्षांपर्यंत. भाग्योदय—२०वें वर्षापासून नोकरीस सुरवात १८९६-९७ मुंबई; ९८–९९ पुणें; १९००–१० नाशिक जिल्हा; १०–१३ खानदेश; १९१३ सातारा ८ महिने; १९१३–१६ सोलापूर; १६–१७ नगर; १७ ते २० सोलापूर; पी. डब्ल्यू. डी-मध्यें हल्लीं पुणें. वयाचे २० वर्षांपासून जबाबदारी हल्लीं महिना रु. ५०. सांपत्तिकदृष्टया अत्यंत वाईट काल—१९१३ सालचे शेवटचे ३ व १९१४ पहिलें ५ महिने वाईट काल; चिंताजनक इत्यादि. द्रव्यदृष्टया उत्कृष्ट काल—१९१४ चे शेवटचा अर्ध ते १९१६ अखेर. अपघात संकटें—अपघात होतात, सकटें येतात, खोटे आरोप येतात, संकटें २–२ महिनेपर्यंत राहतात. १९१६ सालीं मार्च महिन्यांत झोपडीस आग लागून नुकसान, १९१३ सालीं सप्टेंबरमध्यें भिंती पडून व पत्रे उडून पायावर व डोक्यावर दगड पडून दुखापत, कांहीं वेळ मूर्च्छित, २ महिने आजारी. चुलते ६, आत्या ३, मामा २, मावशी १. सत्तेचें घर आहे १९१४ ते २० घोड्याचें वाहनसौख्य. सध्यां सायकल.

### कुंडलीक्रमांक ६९

श्रीशके १८२१ अश्विने मासे शुद्ध पक्षे एकादश्यां तिथौ रविवासरे शततारकानक्षत्रे घ ५२ प. २ अत्रदिने श्रीसूर्योदयात् गत घ. ३९ प. ३० समये जन्म. जन्मस्थळ मुंबई जन्म वेळ रात्रो १० वा. १८ मि. जन्मटाईम मुंबई जन्म तारीख १५ माहे आक्टोबर सन १८९९.

जन्मनक्षत्र शततारका भुक्त ४३।६ भोग्य १२।३२ जन्मतः राहु—महादशा भुक्तवर्षादि १३।११।१५ भोग्यवर्षादि ४।०।१५

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—मध्यम उंची, बांधा सुदृढ स्वभाव हळवा. जरा रागीट, चंचल, निमगोरा. गंडांतरें ६ वे वर्षी डावा दंड फार सुजला. १४ वे वर्षी तोंडावर डांस चावल्यामुळें गांधीमुळें फार सुजलें. १५ वें वर्षी जिन्यावरून पडून २० दिवस बेशुद्ध; १८ वर्षी ताप भयंकर अर्धशिशी दुखणे वर्ष अखेरचे वेळीं. २० वें वर्षी अखेर ६ महिने अतिशय आजारी जिवावरचें दुखणें. मलेरिया, डिस्पेप्शिया, इन्फ्लुएन्झा ॲनीमिया व ब्रेनफीव्हर; अतिशय विचारतरंग व घेन्या येणें। आई व वडिलांचें सौख्य—वयाचे १८ व्या वर्षी शेवटच्या महिन्यांत १९१७ सप्तेंबर ता. १७ वडील वारले. मातोश्री अद्याप हयात. आई व वडिलांस मोठाले आजार—मातोश्री यांस माझे वयाचे १४ व्या वर्षी तापाचा आजार. १९१८।१९।२० मातोश्री मलेरियानें आजारी. पुढें डोळे बिघडले. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—जन्मत: अतिशय गरीब (मधुकरी) २० वर्षे, नौकरी २५ वर्षी. लग्न झालें. ३३ व्या माझा जन्म. ४२ वें वर्षी बढती, ४५ वे वर्षी पेन्शन, ४५ ते ५१ पर्यंत साधारणच स्थिति ५१ वें वर्षी मृत्यु. वडिलांचा धंदा—नौकरी पोस्टऑफिस. महिन्याचें उत्पन्न पेन्शनपर्यंत १०० नंतर ४५ रु. भावंडें एकंदर ५ त्यांत हयात ४, पाठीवर भाऊ १ व वहिणी ३, आधीं भाऊ. विवाह—विवाहाचे प्रसंग बरेच आले त्यांत ३ कायम पण ऐनवेळीं फिसकटले. मॅट्रिक व एस्. एफ्. १९१८ सालीं पास फर्ग्युसन-कॉलेज नापास १९१७ सालीं म्हणजे १८ वर्षी मॅट्रिक नापास. नंतर १९१९ एप्रिलपर्यंत ग्रीव्हियसमध्यें होतों. वयाचे १९ व्या वर्षापासून महिना उत्पन्न कांहीं नाहीं म्हटलें तरी चालेल परंतु २ हजार रुपये कर्ज आहे. ( १९१० नोव्हेंबर १८ पासून १९२१ सप्तेंबर ७ पर्यंत नोकरी १ कायम, या टाईमामध्यें रु. ५४० उत्पन्न. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल—१८ व्या वर्षाचे शेवटचे महिन्यांत वडील वारले. नंतर ५।६ महिने द्रव्याचा थोडासा फायदा परंतु एकाएकी २० व्या वर्षी आजारीपणामुळें स्वस्थ बसावें लागलें व त्यांत १॥ हजार रु. खर्ची पडले. सांपत्तिकदृष्ट्या २० व २१ वें वर्ष, व २३ व्या वर्षी वाईट काल. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल—१९ वे वर्षी व २२ वें जरा साधारणपैकीं. नौकरी टिकत नाहीं—कोणती गोष्ट मनाचा हिय्या करून हातीं घेतल्यावर यश नक्की येतें पण प्रसंग पडेपर्यंत हातीं घेण्याची इच्छाच होत नाहीं. २० वें वर्षी व २१ वें पहिले ६ महिने आजार. द्रव्याची कमतरता, परीक्षेंत फेल्युअर, प्रत्येक कामांत अपेश, ठरून २ लग्नें मोडल्यामुळें व्यग्रता. अपघात, संकटें, ८।१६।२१ जलप्रवास, १५ व २० अपघात, ९ वें वर्षी तीर्थयात्रा, २१ वें वर्षी ६ वें महिन्यांत १५ एप्रिल ते १९ मे खोटे आरोप. १९ वें वर्षी वडिलोपार्जित थोडेसें द्रव्य व त्याची ७ एकर जमीन उत्पन्न वारसामुळें ताब्यांत आली. फक्त १ आत होती ती १९१३ त वारली, परिस्थिति गरीबीची. सत्तेचें घर वगैरे पूर्वार्जित ७ एकर जमीन, वाटणी झालेलें एक द्वितीयांश घर (सत्तेचें) फक्त आहे, माझे ताब्यांत १९ वें वर्षी आले. शत्रुपीडा—शत्रू फार उत्पन्न होतात पण स्वत: हार खाण्याची इच्छा नसलेमुळें व शेवटपर्यंत टिकाव धरण्याची नेहमीं संवय असल्यामुळें कांहीं कालानें शत्रू मित्र व्हावयासाठीं प्रयत्न करतात शत्रुत्व ठेवण्याची इच्छा नसल्याकारणानें मित्रत्व घडतें, शत्रू होतात परंतु चिरकाल नसतात.

### कुंडलीक्रमांक ७०

श्रीशके १८१८ वैशाखमासे कृष्णपक्षे एकादश्यां तिथौ भृगुवासरे पूर्वाभाद्रपदा नक्षत्रे घ. ५ प. ४४ अत्र दिने श्रीसूर्योदयातगत घ. २ पळे ३५ समये जन्म. जन्मस्थळ प्रकाशे जन्मवेळ दिवसां ( मद्रास ) ६ वा. ३६ मि. जन्मतारीख ८ माहे मे सन १८९६.

जन्मकुंडली

३ | १ शु | ४ गु | २ बु | १२ च | ५ के | ११ म रा | ६ | ८ | १० | ७ श | ९

| स्प. सू. | स्प. चं. | स्प. ल. |
|---|---|---|
| ० | ११ | १ |
| २५ | २ | १२ |
| ४० | ४२ | ३२ |
| ४४ | ७ | ९ |

जन्मनक्षत्र पूर्वाभाद्रपदा भुक्त ६२।३५ भोग्य ३।९ जन्मतः राहु महादशा भोग्यवर्षादि ३। १०।२१।१०।२१.

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—शरीरबांधा मध्यम असून शरीर रोगी असणें, सत्वबुद्धि गौर शामवर्ण, हस्तावर तीळ लांछन, चरणावर शस्त्रचिन्ह, जंघेवर शस्त्रचिन्ह. गंडांतरें व मोठाले आजार—जन्मापासून १।५ वर्षापर्यंत मृत्युतुल्य पीडा, १२वें वर्षी जलघात, १४ वें वर्षी उष्णतेपासून अतिशय पीडा, २३ वें वर्षी ऊष्णवात मृत्युतुल्य पीडा एक मासभर. आई व वडिलांचें सौख्य—पितृमरण वयाचे ६ वे वर्षी शके १८२८ चैत्र शु. ३ गुरुवार, मातृमरण वयाचे १५ वे वर्षी शके १८३२ पौष शु. ५ गुरुवार. आई व वाडिलांस मोठाले आजार —आईस आजार माझे वयाचे ४ थें वर्षी, ७ वें वर्षी व १२ वे वर्षी झाले प्रत्येक आजार उष्णवातानें झाले, आजारही एक वर्ष १४ महिनेपर्यंत असायचा, फक्त १२ वे वर्षी ८ महिने आजारी झाली. वडिलांची मूळ स्थिति—वडिलांची सांपत्तिक स्थिति, वडिलांचे घर सोडून सासऱ्याचे घरीं आल्यानें चांगली स्थिति प्राप्त झाली. वडिलांचा धंदा स्वतंत्र, महिन्याचें उत्पन्न १००।१२०. भावंडें—एकंदर ८ त्यांत बंधु जास्त, भावंडें मृत शके १८०३–१८०४–१८०७–१८०९–१८१३–१८१५, १८१८ माझा जन्म. सर्व भावंडें अज्ञान असतांनाच वारली. फक्त वडील बंधु माझे वयाचे २३ वर्षी शके १८४० भाद्रपद कृष्ण ३० शुक्रवार रोजीं मृत. विवाह—शके १८३५ वैशाख शु. ९ मंगळवार वयाचे १७ वे वर्षी विवाह झाला, त्या वर्षाचे स्पष्ट सुर्यावरून १८ वें वर्ष अक्षय्यतृतीयेलाच लागलें यावरून १८ वें वर्षी विवाह झाला. सांपत्तिकदृष्ट्या अत्यंत वाईट काल—२४ वें वर्ष २२।२५ वर्षी द्रव्यलाभ उत्तम. फौजदारींत जाण्याचा प्रसंग—२६ वें वर्षी फौजदारींत जाण्याचा प्रसंग आला, अत्यंत अपमानकारक गोष्टी—२४।२६ वर्ष वाईट. अपघात जलघात १२ वें वर्षी, तीर्थयात्रा मोठी वयाचे १० वें वर्षी व विधेनिमित्तानें गंगास्नान १९ वें वर्षी. व्यग्रता—शारीरिक दुःखानें, व्यसन नाहीं, जलघातानें उजवा पाय मुरगळला, त्याचे दुरुस्तीचे उपायही केले गेले, तें व्यंग दिसण्यासारखें नाहीं, २४।२५ वें वर्षी धर्मार्थ जमीन मिळाली

आहे, मावंडाचा व्यवसाय—वडील बंधुचा व्यवसाय ज्योतिष असुन मानमरातबही चांगला होता. विवाह—प्रथम विवाह १९ वे वर्षी, द्वितीय विवाह ३६ वें वर्षी, प्रथम स्त्री मयत ३२ वे वर्षी, सावळ्या रंगाची, स्थीर प्रकृति, शैत्य वातविकार. संतति—प्रथम कन्या. शके १८४२ भाद्रपद शु. ५स मृत झाली, आईला दम्याचा विकार, वडिलास मूळव्याधी, स्वतःस मूळव्याधीचा विकार आहे, विद्या—पूर्ण २५ वे वर्षी, वैधकी, भाग्योदय—गांवांत २५ वें वर्षी सुरवात, प्रत्येक वर्ष चांगलें गेलें नुकसान वैद्यक्रियेंत व कापडधंद्यांत २३ वे वर्षी, चुलते ३ पैकीं १ मयत, वडील चुलत्याची परिस्थिति चांगली, मधले चुलते यांची परिस्थिति बिकट, कनिष्ट मयत, सत्तेचें घर—मी राहतों तें घर आजोबाचें असून त्यांची इष्टेट जमीनजुमला वगैरे यांचें सौख्य आहे, मामा व मावशा—मातुलसौख्य जन्मापासुन नाहीं, मावश्या दोन त्यांपैकीं वडील मावशी जन्मापूर्वी मयत, दुसरी माझे वयाचे ४ थे वर्षी मयत झाली,

## कुंडलीक्रमांक ७१

श्रीशके १८१३ श्रावणेमासे कृष्णपक्षे सप्तम्यांतिथौ बुधवासरे कृत्तिका घ, ३४ प, ४४ अत्रदिने श्रीसुर्योदयात् गत घ, ४५ प, १२ समये जन्म, जन्मस्थळ सिंदखेडे जन्मवेळ रात्री, जन्म तारीख २६ आगष्ट सन १८९१.

जन्मकुंडली

भौमदशा भोग्यवर्षादि, ८।४।२०।३।०

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति—सुदृढ, मनमिळाऊ रजोगुणी, गौरवर्ण, उजव्या गुडघ्यावर पाउण इंचाचा काळा लांछन, ( जन्मखूण ), गडांतरें—अज्ञानपणांत तीन वेळ थंडीतापामुळें, सोळाव्या वर्षी जळघात, वडिलांचा धंदा—कारकून ( कचेरींत ) महिन्याचें उत्पन्न तीस रुपये; भावंडें—एकदर ७ त्यांत हयात ३ पाठीवर बहिण आधीं भाऊ विवाह—प्रथम १४ वे वर्षी द्वितीय अठ्ठाविसावे वर्षी स्त्रीची प्रकृति ( द्वितीय ) फार वाईट अतिशय कष्ट शरीरांत विकार आहे; संतति—प्रथम पुत्र वयाचें २५ वे वर्षी त्यानंतर नाहीं; शिक्षण—म्याट्रिकपावेतों । बावीसावे वर्षी विद्या पूर्ण झाली; भाग्योदय—खानदेश जिल्ह्यांत तेवीसावे वर्षी नोकरी, नोकरीपासून सुख, फक्त नोकरीचे ५ वे वर्षाअखेर दुःख, आज महिना उत्पन्न सुमारें ७० रु, पावेतों, वारसा—( दत्तक गेल्यानें ) मिळाला, सासरची सांपत्तिक स्थिति—( प्रथम कुटुंबापासून बराच लाभ ), चुलत्यांची परिस्थिति—चांगली, ४ आत्या, दोन चुलते, सत्तेचें घर एक जमिनजुमला आहे,

पूर्वार्जित सौख्य आहे, मामा व मावशा—मामा दोन, मावशी एक, [ हल्लीं मृत ] दत्तकयोग—दत्तकयोग दोन वर्षांचा असतांना झाला.

कुंडलीक्रमांक ७२

श्रीशके १७८० आश्विनमासे शुक्लपक्षे द्वादश्यांतिथौ भौमवासरे पूर्वाभाद्रपदा नक्षत्रे अत्रादिने श्रीसूर्योदयातगत् घ. ३९ प. ४५ समये जन्म.

जन्मकुंडली

जन्मतः गुरु महादशा भोग्यवर्षादि. २।४।१५।४१।३३.

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति—शरीर सुदृढ, चंचल, तमोगुणी, सांवळा रंग. आई व वडिलांचें सौख्य—वडिलांचा मृत्यु वयाचे ३९ वें वर्षी. आईचा मृत्यु २९ वें वर्षी झाला. वडिलांचा मृत्यु—उपद्रवानें ( महामारीनें ) आईचा मृत्यु दम्यानें. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—वैद्यकीच्या योगानें सांपत्तिक स्थिति चांगली. वडिलांचा धंदा—वैद्यकी, महिन्याचें उत्पन्न ४०।५०. भावंडें एकंदर किती—५, त्यांत हयात १, पाठीवर भाऊ, वडील बंधु वयाचे ४४ वें वर्षी मयत, लहान बंधु बहीण त्यांत बहीणही ४२ वें वर्षी मयत. बंधु ४५ वें वर्षी मयत, लहान बंधु ३१ वें वर्षी मयत. सांपत्तिकदृष्ट्या अत्यंत वाईट काल—वयाचे ५९।६० वें वर्षी. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल—वयाच्या २९ वर्षी. कोर्टांत जाण्याचा प्रसंग—४० ते ४५ पर्यंत मुलकी खात्यात प्रसंग आला तो ५ वर्षे. जलप्रवास—महायात्रा १ वयाचे २८ वें वर्षी लहान लहान तीर्थ ३५।५१ वें वर्षी. वारसा, बक्षीस, वुईलनें—वयाचे ४५ वें वर्षी द्रव्यलाभ झाला. भावंडांचा व्यवसाय—कापडाचा व्यापार, आरंभीं नौकरी, नंतर कापड व्यापार, वडील बंधु ज्योतिषी, लहान भावाचा धंदा वैद्यकी व ज्योतिषी. सासरची सांपत्तिक स्थिति—प्रथम कुटुंबाचे घरची सांपत्तिक स्थिति फारच चांगली, द्वितीय सांपत्तिक स्थिति साधारण. चुलत्यांची परिस्थिति—चुलते २ मयत, आत्या २ मयत, परिस्थिति उत्कृष्ट. स्वतःचें घर वाहनें—स्वतःचें घर आहे, जमीनजुमला व पूर्वार्जित इस्टेट यचें सौख्य आहे.

१,३,५,८,१०,११

## कोणत्याही कुंडलींत

५।८।१०।११

जन्मस्थानाचा, भाग्यस्थानाचा आणि उपचयस्थानाचा स्वामी जेव्हां जन्म-कालीं बलवान् असतो तेव्हांच त्यास संपत्तियोगश्रेष्ठत्व येते.

कुंडलीक्रमांक ७२

श्रीशके १८०९ ज्येष्ठ मासे शुक्लपक्षे ६ तिथौ ४४-१९ मंदवासरे पुष्य ०-६ आश्लेषा घ. ५७-७ अत्रदिने श्रीसूर्योदयात्गत घ. ५४ प. १० समये जन्म, जन्मस्थळ धामक उमरावती जिल्हा, जन्म वेळ रात्रौ जन्मतारीख २८ माहे ५ सन १८८७.

जन्मकुंडली

जन्मनक्षत्र आश्लेषा भुक्त ५४-४ भोग्य ३-३ जन्मत: बुध महादशा भुक्तवर्षादि १६ २-२३-४२-२ भोग्यवर्षादि ०-९-६-१७-५८.

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—सडपातळ, थोडा तामसी, काळासावळा, डावे डोळ्यांत वयाचे ८ व वर्षी देवी निघून फूल पडले. गंडांतरें व मोठाले आजार—वयाचे ८ वे वर्षी, वैशाख महिना, देवी निघून ६ महिने आजारी झालों, त्याचवेळीं डावे डोळ्यांत फूल पडलें. आई व वडिलांचें सौख्य—वडील जिवंत आहेत, ( वय ७० ) आई ता. ३०-१०-१९१७ इ. रोजीं प्लेगनें मृत. आई व वडिलांस मोठाले आजार—आई निरोगी, वडील नेहमीं कोणते ना कोणते विकारानें आजारी असतात. पित्तविकार जास्त आहे. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—साधारण माझे जन्मापासून दिवसेंदिवस कमी कमी होत गेली. वडिलांचा धंदा—याज्ञिकी, महिन्याचें उत्पन्न—४० रुपये. विवाह—एकच ता. २०-४-१९०४ रोजीं वय वर्षे १७, स्त्रीची प्रकृति—स्वरूप गौरवर्ण नीटस, सन ( १९२२ ) बाळंतरोगाचा विकार आहे. संतति—पहिला मुलगा ता. २१-७-१९१३ ला झाला, व ६-६-१९१४ ला मृत, दुसरी कन्या, १४-११-१९१७ ला झाली, व २४-११-१९१७ ला मृत, तिसरा गर्भांत ता. २४ ६-१९१९ मृत. विद्या—मराठी सातवी व इंग्रजी ४ थी, इ. स. १९०५ मध्यें पूर्ण. भाग्योदय—वऱ्हाडांत आकोला जिल्हा, भिक्षुकीस प्रारंभ १९१२ पासून, पुढील वर्षे साधारण बरी गेली मात्र हीं तीन वर्षे अनिष्ट गेली. स्वत.वर व्यवहारिक जबाबदारी— सन १९१५ पासून, आज महिना उत्पन्न २० ते २५ पावेतों. सांपत्तिकदृष्ट्या अत्यंत वाईट काल—गेली तीन वर्षे, व चालू वर्ष. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल—साधारण १९१२ ते १९१८ पावेतों. अपघात, संकटें, जलप्रवास—फेब्रुवारी मार्च १९२१ मध्यें. शारीरिक व्यंग—देवी निघाल्यामुळें डावे डोळ्यांत फूल पडलें. सासरची स्थिति—गरिबीची. चुलत्यांची स्थिति—चुलते २ मृत, आत्या २ मृत सचेचें घर, वाहनें—सचेचें घर पूर्वार्जित, वाहनाचें सौख्य नाहीं. मामा व मावशा—मामा हयात, मावशा ३ मयत.

कुंडलीक्रमांक ७४

श्रीशके १८०३ फाल्गुनमासे शुक्लपक्षे ११ तिथौ भौमवासरे पुनर्वसु नक्षत्रे घ. ५४ प. ४४ अत्रदिने श्रीसूर्योदयात् गत घ. ३० प. १५ समये जन्म. जन्मस्थळ भुसावळ जन्मवेळ मद्रास ७ वा. ४८ मि. जन्मतारीख २८ माहे फेब्रुवारी सन १८८२.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—स्थिति चांगली निरोगी, स्वभाव मनमिळाऊ, रंग गोरा. आई व वडिलांचें सौख्य—आई हयात, वडील माझे वयाचे १२ वर्षे ३ महिन्यांनी मृत. आईस बाळंत-रोगाचा आजार—माझे जन्माचे नंतर ३ महिन्यांनीं वडिलास पोटांत वायूचा गोळा होऊन मृत्यू. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—गरिबीची, त्यांना पहिला मुलगा झाल्यावर स्थिति सुधारली. वडिलांचा धंदा—मास्तर, नोकरी महिन्याचें उत्पन्न ४० रुपये. भावंडें एकंदर—८ त्यांत हयात ५, पाठीवर मुलगी, थोरले भाऊ ४, भावंडें मृत ३. विवाह—१२।१७।३१।३८ वयाचे त्या त्या वर्षी एकूण चार विवाह झाले. पहिली तापानें, दुसरी बाळंतीण होऊन, क्षयानें मृत. संतति—पहिल्या बायकोस ३ मुली १ मुलगा, एकूण ४ संतति सर्व मृत. १ मुलगी ५ वर्षाची कॉलरा, २ री अंगावर फोड येऊन, ६ वर्षांची ३ री दूध नसल्यामुळें ३ महिने, ४ मुलगा ५ महिने पोटांतील विकारानें. विद्या—म्याट्रिक वयाचे १६ वे वर्षी. भाग्योदय—वऱ्हाडांत आकोला जिल्हा १६ वे वर्षी नोकरीस सुरुवात व्यापारी नोकरी. स्वत.वर व्यावहारिक जबाबदारी—१७ वे वर्षापासून १३० रुपये पगार. सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत वाईट काळ—सुरवातीची १२ वर्षे (नोकरीची) जलप्रवास, तीर्थयात्रा—काशीयात्रा ३९ वे वर्षी (वयाचे) पंढरपूर, पंपासरोवर वगैरे. आप्तवर्ग व स्नेही यांजकडून विशेष त्रास. भावंडांचा व्यवसाय, विद्या—वडील बंधु ग्राज्युएट, नोकरी जिल्हा बोर्डाचे सेक्रेटरी; कनिष्ठ बंधु इंजिनीअर. चुलते दोन मृत. आत्या २. सत्तेचें घर—नाहीं. मामा व मावशा—मामा २ मावशा २.

कुंडलीक्रमांक ७५

१८११ आषाढ शु. २ भानु. सू. ग. घ. ५९ पळें १०.

जन्मकुंडली

### आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

आईचा मृत्यु—सन १८९० कार्तिक शु. ६ सायंकाळीं. याच दिवशीं सकाळीं चुलतीही वारली. वडिलांचा मृत्यु—सन १८९५ ज्येष्ठ शु. ७ दुपारीं १२ वाजतां. देवी निघाल्या सन १९०५ वैशाख. विवाह—सन १९०६ वैशाख कृ. ४ सकाळीं ७ वाजतां. प्रथम संतती—मुलगा सन १९१० वैशाख कृ. १० रात्रौ. आजीचा मृत्यु—(वडिलांचे आईचा) १९१० मार्ग. शु. १५ वडील बहिणीचा मृत्यु—१९१२ चेत्र शु. १० सकाळीं ७. धंदा—वकील. महिना उत्पन्न सुमारें ३००-४०० रु.

कुंडलीक्रमांक ७६

श्रीशके १७९६ कार्तिक कृ. ३ सूर्योदयात् घ. ३ प. ० ता. २६ नोव्हेंबर १८७४.

जन्मकुंडली

### आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

वडील अगर मातोश्रीस न समजतां विवाह सन १८९२ मध्ये झाला. जपानचा प्रवास विद्येसाठीं. १८९९ ते १९०१. जून १९१० मध्यें राजकीय भयंकर संकट. × × × × संस्थानिकाशीं वैर सन १९१० ते १९१३ सन १९१३ अखेरपासून पुनः राजाश्रय आणि भरभराट. हयात संतती—२ मुलगे १ मुलगी (ता. ६ जुलै १९२३) रोजीं १ मुलगा वारला.

कुंडलीक्रमांक ७७

शके १८०१ आषाढ शु. पौर्णिमा गुरुवार (म्हणजे शुक्रवारीं पहांटे ५ वा. १५ मिनिटांनीं मद्रास टाईम, नागपूर येथें, इ. घ. ५७—५२—३० ता. ४ जुलै १८७९.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

वयाचे ८ वें वर्षी कॉलरा, २-२-३-३ वर्षांनीं उष्ण ताप, वयाचे १५ वें वर्षापासून २८ पर्यंत कुस्तीचा शोक, शरीरसंपत्ती दांडगी, कुस्तीचे कलेंत प्रवीण, २८ वें वर्षी उष्णवातांनीं आजारी निमोनियानी, ६ महिन्यांनीं प्रकृति ठीक, ४२ वें वर्षी आकस्मिक मृत्युयोग, मृत्युपत्र-देखील झालें, डॉ. कुर्तकोटींच्या ( शंकराचार्यांच्या ) कृपेनें पुनः एक तासांत उष्णता आली. वर्ण साधारण तांबूस व गोरा, २० वें वर्षी मुसलमानांकडून जंगलांत खुनाचा प्रसंग. शत्रूंनीं दगड मारल्यामुळें समोरचा दांत पडला, शत्रूंना पकडून ( स्वतः ) शहरांत आणलें, मुकदम्यांत यश, २० वें वर्षी प्रवास व वाद, ( परोपकारार्थ ) फार, वीस वीस कोसांची पायीं मजल. फौजदारी मुकदमे, सर्वांत यश, याच वर्षी वैश्य बाळोत्तेजक धर्मसभा, याच सभेचे अध्यक्ष त्यांत अनेक मत-भेदांचे पुष्कळ वर्षांचें असलेलें ऐक्य, स्वभाव बाणेदार, करारी, धार्मिक ( यांत समाज सुधारणा हाच त्यांचा विषय ) घोरणी, सज्जनास पटणारे वक्तृत्व, ईशप्राप्तीकडे विशेष लक्ष, मित्रत्वयोग फार, ब्राह्मण व त्यांत कोंकणस्थ ब्राह्मणांचीच मैत्री जास्त ( विद्वान व तात्विक व धार्मिक विचारें करणारेच कोंकणस्थ ) जिवास जीव देणारे मित्र, डाव्या हाताच्या कोपऱ्याखालीं डबल पैशाएवढें चिन्ह, कौटुंबिक कष्ट जास्त, एक पत्नी, वयाचे २७ वें वर्षी एक पुत्र, पुढें नाहीं, व तोही एक वर्षांतच मेला. ( द्वितीय भार्यायोग–वडिलाज्ञा अमान्य केल्यामुळें लग्न केलें नाहीं.) पत्नीचें पतीवर अपवादात्मक प्रेम, परस्परांचें प्रेम फार. वडिलाचे मातोश्रीपेक्षांही प्रेम फार. पत्नीला गर्भाशय विकार ऑपरेशन झालें. राजाश्रयामुळें वडिलोपार्जित घर कीर्तनावद्दल मिळालें.

अनेक अडचणी, मूळचे वऱ्हाडी, ५-७ पिढ्यांपासून नागपुरासच वस्ती ( राहणें ) कीर्तनामुळें हरदास हें आडनांव पडलें. सतार वाजविणार, आवाजी चांगली ( म्हणजे गाणें येतें ) अलीकडचे २ पिढ्यापासून कीर्तन बंद, व्यापार कौशल्य चांगलें. बंधुसुख—बंधु ६, बहिणी ३, २ बंधु यांच्या जन्मापूर्वींच वारले. ३ रे बंधु ३६ वे वर्षी, ४ थे बंधु ५० वे वर्षी म्हणजे यांचें २० वे व ३० वे वर्षी वारले. यांचे वयाचे १६ वे वर्षी १ बहिण वारली, दुसरी वयाचे २० वर्षी. सारांश आप्तांची मदत व सुख नाहीं, आप्त हितशत्रू. जातींत, समाजांत व घरांत हेच पुढारी.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति--शरीर बांधा ठेंगणा, साधारण रोड, स्वभाव तामसी वातविकार रंग साधारण काळा, डावे हाताचे मनगटावर आंतले बाजूस काळे एक लहानसें गुल्म. गंडांतरें व मोठाले आजार--सुमारें ११ वे वर्षी तापानें जास्त आजारी म्हणजे सहा सात महिने होतो. त्यानंतर साधारण शीकपणा वर्ष दोन वर्षांनीं येतो व ३।४ महिने पर्यंतचा. आई व वडिलांचें सौख्य--वडील शके १८२२ सालीं वारले. आई शके १८२७ सालीं वारली. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति--वडिलांस सांपत्तिक काळ वाईट असा त्यांचे अन्त समयाचे पूर्वी १० वर्षे पासून उतरती कळा सुरू झाली होती. वडिलांचा धंदा--व्यापार महिन्याचें उत्पन्न--१०० पासून ५०० पर्यंत वडिलांचें अंतसमई फारच जिकीरीचा वेळ होता. भावंडें एकंदर--६ त्यांत हयात--हल्लीं ४ पाठीवर--नाहीं. आधीं--बहीण. विवाह--विवाह शके १८१९ सालीं जाहला. स्त्रीची प्रकृति--साधारण, आजार वाताचा. संतति--पुत्र हल्लीं १ वय वर्षे ४ चा व कन्या २ वय ७ व वय १० व एक कन्या गत शके १८३७ सालीं. स्वतःस, कायमचा विकार--स्वतःस आजार उष्ण धातुविकार. स्वतःवर व्यावहारिक जबाबदारी--स्वतःवर जबाबदारी शके १८३६ सालीं पडली. आज सालीना उत्पन्न सुमारें पांचशेंपर्यंत, धंद्यांत व भात शेतीचे सुमारें ५०० रुपयेपर्यंत आहे. अनपेक्षित रितीनें बदल केव्हां झाला ? व त्यांत काय घडलें ! साधारण काळ बरासा शके १८४०।४१।४२ सालीं फेरबदल झाला. सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत वाईट काळ कोणता गेला--वडील मयत शके १८२२ सालीं म्हणजे माझे वय १५ वर्षाचे सुमार पासून तो २८ वर्षे पर्यंत काळ फारच जिकीरीचा. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काळ कोणता गेला--शके १८४०।४१।४२।४३।४४ पासून आहे. कोणत्याही कार्यांत यश--मोठ्या धंद्यांत यश नाहीं लहानसहान धंदे करून साधारण फायदा होतो असें वाटतें. सरकार अगर लोकांकडून मान मिळाला असल्यास केव्हां--सन १९२२ ता. २२।२।२२ रोजीं सरकारी व लोकलबोर्ड मेंबर होतो. मानमान्यता साधारण ठीक आहे. सत्तेचें घर, वाहनें, नौकरचाकर जमीनजुमला यांचें सौख्य आहे कीं नाहीं ? असल्यास पूर्वार्जित कीं स्वकष्टार्जित व तें केव्हांपासून--वडीलार्जित मिळकत जवळ आहे नोकर वगैरे गाडी वाहन आहे स्वसंपादीत मिळकतही थोडी आहे परंतु कर्जही आहे. सावत्र आई व भावंडें वगैरे आहेत.

कुंडलीक्रमांक ७९

श्रीशके १८१५ अधिकआषाढ शु.॥ १४ सौम्यवासरे इ. घ. ५२ प. २४ जन्म ता. १२ जुलै १८९३

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

मातोश्रीचा मृत्यु—सन १९०२, वडिलांचा मृत्यु—शके १८४१ आश्विन कृ. ४, पालनपोषण—वडिलानीच केले. आधीच्या दोन वहिणी, पाठीवर—दोन बहिणी. एकंदर भावंडे—४ पैकीं आज हयात तीन बहिणी, एक मयत, जन्मकाळीं सांपत्तिक स्थिती—बरी, आजची सांपत्तिक स्थिती—साधारण, आज महिना उत्पन्न—शंभर रुपये, सांप्रतचा धंदा—नोकरी. विद्या—स्कूलफायनल परिक्षा पास, मुंबईची सॅनिटरी इन्स्पेक्टरची परिक्षा पास. विशेष यशयेणारी वर्षे—सन १९११ व १९१६ अत्यंत संकटाचा काल—सन १९०२ व १९०६, प्रथम विवाह—सन १९१३ द्वितीय विवाह—सन १९१९ संतति—प्रथम कुटुंबास एक मुलगी ती मयत, द्वितीय कुटुंबास दोन मुली व दोन मुलगे सर्व हयात आहेत. नुकसानीचा काल—सन १९१५ व गेली दोन वर्षे, ता. ३०।३१ जुलै रोजीं सहा महिन्याकरतां कामावरून कांहीं कारण नसतां एकाएकी काढले आहे. फायद्याचा काल— सन १९२०-१९२१

कुंडलीक्रमांक ८०

शके १८२४ पौष शु. १० शुक्रे सूर्यास्तानंतर घ. ० प. १० ता. ९।१।१९०३.

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शाळेंत शिक्षण सुरू असल्यानें सन १९२० पर्यंत काळ सुखांत गेला. त्यानंतर अनिष्ट

कालास सुरवात झाली ती स्थिती अद्याप कायम आहे. १९२० साली अकस्मात शाळा सोडली. त्यापूर्वी थोडे दिवस मला दत्तक घ्यावे असा माझ्या मातोश्रींच्या वडिलांचा [ आजोबांचा ] विचार चालू होता व माझे दत्तविधान होतांच एका गृहस्थानी आपली एकुलती एक कन्या मला देण्याचे कबूल केलें होते पण मी अकस्मात शाळा सोडली व पुनः सरकारी शाळेंत जाण्याचे नाकारलें, त्यामुळें वरील दोन्ही गोष्टी घडल्या नाहीत. शाळा सोडण्याचे सुमारासच वडिलांची नोकरी सुटली. सन १९२२ मध्यें पुनः संस्थानी शाळेंत कांहीं दिवस शिक्षण घेतलें पण कांहीं दिवसांनीं तेही सोडल्यानें व चळवळींत भाग घेत असल्यानें घरांतील मंडळींचा जाच होऊं लागला त्यामुळें घर सोडून वैद्यक शाळेंत प्रवेश मिळविला. तेथें ३।४ महिने शिक्षण मोठ्या अडचणीनें मिळविल्यावर तें शिक्षण सोडले पुढें चळवळीत भाग घेतल्यानें ता. ९।९।१९२२ रोजी सायंकाळीं अटक होऊन ता. १२।९।१९२२ रोजी तीन महिन्याची शिक्षा झाली. तुरुंगांत अतिशय हाल झाले. ता. ११।१२।१९२२ रोजी सुटका होऊन घरीं आलो व आठ दहा दिवसांनीं बहिणीकडे गेलो तेथें एक वर्ष होतो. पुढें आमच्या वडिलांनीं एका संस्थानांत शेती सुरू केल्यामुळें तिकडे दोन वर्षें होतो त्यातही हाल व नुकसानच झालें. नंतर मोटार डायव्हरचें शिक्षण घेऊन ता. २२।१२।१९२६ रोजी लायसेन्स मिळविलें. हें शिक्षण घेत असतां विमान शिक्षण घेण्याची कल्पना मनांत आली. पुढें कांहीं महिने उमेदवारी व कांहीं महिने मोटारड्रायव्हरची नोकरी केली. वहिणीकडे पुनः गेलो असतां १९२८ आक्टोबरमध्यें एक विमान कोसळून जमिनीवर पडलें, काम शिकण्यास ही संधी बरी असें समजून मी तेथें थोडें शिक्षण मिळविलें व त्याचबरोबर एक सर्टिफिकिट मिळविलें. ता. ८।११।१९२८ रोजी मी प्रथम विमानांत बसलो. ता. १।५।१९२९ प्रवास [ कारवारकडे जावयास निघालो ] ता. ७।५।२९ रोजी श्रीजनार्दनस्वामींचे दर्शन व त्याचेवर भक्ती बसली. ता. १९।७।२९ पासून पुनः नोकरी ता. ९।१०।२९ रोजी व ता. २३।१२।२९ रोजी मोटारीस अपघात. ता. २११।२।२९ रोजी वडिलांचा मृत्यु. ता. ३।१।३० विमान शिक्षणसाहाय्यार्थ एका संस्थानिकाची भेट व त्यांत निराशा ता. ८।२।३० रोजी श्रीजनार्दनस्वामींची सासऱ्याकडे जाण्याची आज्ञा व त्यावरील भक्ती दृढ झाली. ता. ५।१०।३१ पगाराकरता सत्याग्रह व त्यांत यश. चैत्र शु. १ शके १८५४ नवीन धंद्यास सुरवात. शके १८५६ का. शु १ हिंदुधर्मोद्धारक मठाची स्थापना, ता. ८।८।३४ शके १८५६ आषाढ कृ. १३ स ९ वा. ५० मि. पुत्रप्राप्ती. स्वभाव—मानी, नम्र पण प्रसंगी फार हट्टी, कृतज्ञ, स्वधर्माच्या उत्कर्षाची तळमळ फार, धाडसी कामे करून कीर्ति मिळविण्याची आवड. कोणत्याही तऱ्हेचें व्यसन न जडू देण्याची दक्षता व दुसऱ्याचें व्यसन सोडविण्याची इच्छा. अलीकडे आत्मिकबल वाढविण्याची इच्छा. स्वतंत्र वृत्तीने रहाण्याची आवड. स्त्रीकडून व सासऱ्याकडून मदत.

---

कोणत्याही जन्मकुंडलींत राष्ट्रीय, राजकीय, सार्वजनिक अशा चळवळींत पडण्याचे जे अनेक योग असतात त्यापैकीं ह्या कुंडलींत चतुर्थांत मंगळराहुचा योग हा योग आहे. आणि यामुळेंच आगाऊ कोणताही संबंध नसतां यांना चळवळींत पडण्याची बुद्धि सुचली !

कुंडलीक्रमांक ८१

ता. ६ जून १८९३ जन्मवेळ शके १८१५ अधिक आषाढ शु. १३ सूर्योदयात् गत घ. ० प. १

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

( सुरवातीस ३ वर्षे शनी–महादशा व अंतर्दशा होती. यामुळें देवी आल्या आहेत. ( विंशोत्तरीप्रमाणें ) अष्टोत्तरीप्रमाणें बुध महादशा अंतर्गत शनिमहादशा होती. ) वर्ष १ देवी. येणें, वर्ष ३ ते ८ पाठीवरचे २ भावांचा मृत्यु, वर्ष १७ मॅट्रिक परीक्षा व स्कालरशिप, वर्ष १८।१९।२० परीक्षा पास परंतु अपेक्षेप्रमाणें यश नाहीं, वर्ष २१ नोकरी, वर्ष २२।२३ परीक्षा यशस्वी एलएल. बी. व एम. ए वर्ष २४ युनिव्हर्सिटी कंपनींत लष्करी शिक्षण, वर्ष २७ आजारीपण. वर्ष २७ वकिलीस सुरवात, वर्ष २८ एका दानशूर श्रीमंत गृहस्थाशीं स्नेह, पुढील दोन वर्षांत जास्त, वर्ष २५ लग्न, हुंडा वगैरे मिळाला पण बायकोशीं चांगलें पटत नाहीं व बायको सुंदर अगर सुशिक्षित अगर आनंदी नाहीं, वर्ष २९ वडिलांचा मृत्यु, वर्ष ३१ नातलगांशीं तंटे व मानसिक त्रास होण्यासारख्या गोष्टी, सांपत्तिक अडचणीस वर्षअखेर सुरवात.

( जन्मराशीवरून शुभाशुभ ग्रह—जन्मकाळीं रवि ८ विशेष अनिष्ट. चंद्र १ शुभ, मंगळ ९ शुभाशुभ नाहीं, बुध शुभाशुभ नाहीं, गुरु ६ विशेष अनिष्ट, शुक्र ८ शुभ, शनि ११ शुभ, केतु १२ अशुभ, राहु शुभाशुभ नाहीं यांत गुरु आणि केतु एकमेकांचे वेधस्थानीं म्हणून अशुभाचे शुभ होतात यांत मंगळ व चंद्र नीच राशींत आहेत. )

वर्ष ३–८ या वर्षी साडेसाती होती या मुदतींत दोन पाठचे भाऊ वारले व अति त्रास. वर्ष १७ यांत मॅट्रिक परीक्षा पास होऊन स्कालरशिप मिळाली, या वेळीं गुरु ११ वा होता, त्याचें फळ. पुन गुरु ५ वा व सातवा आला तेव्हां एल्. एल्. बी. व एम्. ए पास होऊन २२–२३ वर्षी स्कालरशिपही मिळाली. दरम्यानचे मुदतींत परीक्षेत साधारण यश मिळालें. २४ व्या वर्षी लष्करी शिक्षणाची संधि मिळाली. त्या काळीं मंगळ बलवान होता. २५ वर्षी लग्न. जायास्थानांत कोणताच ग्रह नाहीं, त्याचा स्वामी गुरु व कारक ग्रह शुक्र शुभ आहेत, त्यावर गुरु राहू पूर्णदृष्टीनें पहातात, फक्त वाईट योग शनीची दृष्टी आहे एकंदरींत जायास्थानचे योग बरे दिसतात, यामुळें वैवाहिक सुख चांगलें, प्रथम नाहीं तो,

साडेसातीचा परिणाम होता. साडेसाती संपल्यावर स्थिती बदलली. २७ व्या वर्षाच्या अखेरीस वकिलीस सुरवात त्या वेळीं गुरु १० वा होता, पुढें २८ व्या वर्षी श्रीमंताशीं स्नेह झाला, तेव्हां गुरु अकरावा होता. पुढें २९ व्या वर्षी वडील वारले, एकच गोष्ट लिहावीशी वाटते हल्ली ५।६ वर्षे मनोवृत्ति एका प्रकारच्या तात्विक समाधानाची आहे, जगांतील सर्वच गोष्टी असार व मनास कोठल्याच गोष्टीचा त्रास मानून न घेणें हे ध्येय अशी प्रवृत्ति वाढत आहे, त्यास वाचन हेंच कारण आहे. शिवाय प्रापंचिक स्वस्थता नाहीं हेंही कारण असावें.

कुंडलीक्रमांक ८२

शके १८१२ भाद्रपद शु. १३ भृगुवासरे सू० गत घ. ४९ प. १९

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

वयवार गोष्टी—१ ते ५ बालपण सुखांत, शरीरस्थिति साधारण. ५ ते ८ शरीरास पीडा, ९ मौंजीबंधन, सुख. १० शिक्षण, ११ रामेश्वरयात्रा, सुख. १२ पितृवियोग, दुःख. १३ प्रेमळ चुलत्याचा मृत्यु, १४ ते १९ इंग्रजी शिक्षण, शरीरपीडा, गृहस्थिति बिघडून ऋणयोग. २० प्रथम विवाह. २१ शिक्षण सोडून संसारप्रवेश, चुलत भावांवून विभक्तपणा, वडिलोपार्जित जमीनजुमला, घरेंदारें, सांपत्तिक स्थिति खालावलेली, ऋण अतिशय, कष्टमय संसार, प्रथम कुटुंबापासून पुत्र व त्याचा मृत्यु, व प्रथम कुटुंबाचा मानसिक त्रास होण्यास सुरवात, २२ वडिलोपार्जित कुलकर्णी वतनावर कुळकर्णी म्हणून नेमणूक. २३ ते २४ सांपत्तिक स्थिति वाईटच. २५ कुळकर्णी वतनाचा त्याग, सावकारीचा धंदा करणेस सुरवात. २६ सांपत्तिक स्थिति सुधारणेस सुरवात, शेतीची उत्तम तऱ्हेनें मेहनत होऊन जास्त पीक येऊन ऋण हटूं लागलें. २७ सांपत्तिक फायदा, शेतींत व सावकारींत फायदा. २८ चुलत भावाकडील सर्व माणसांचा वियोग, प्रथम कुटुंबापासून मुलगी, व तिचा मृत्यु, व प्रथम कुटुंबाशीं क्षुद्र कारणामुळें बेबनाव घुसपुस होऊन वियोगाला सुरवात व इकडे सांपत्तिकदृष्टया शेतीचे मालांत मोठा लाभ होऊन ऋणमुक्तता, सावकारी धंद्यांतील वाढ, मनास सांपत्तिकदृष्टया आनंद, तर प्रथम कुटुंबाचे स्वभावामुळें विनसलेमुळें मनाचा संसाराविषयीं अस्थिरपणा. २९ चळवळींत भाग, सरकारी नोकरशाहीशीं विरोध, सांपत्तिक स्थिति उत्तम. ३० शेतींत व सावकारीचे धंद्यांत नफा, प्रथम कुटुंबाशी बेबनाव झाल्यामुळें संसारांत मनाची व्यग्रता. ३१ द्वितीय विवाह, असहकारितेचे चळवळींत भाग घेऊन वतनी उत्पन्न बुडालें, पूर्ण स्वतंत्रता मिळाली. द्वितीय विवाहामुळें मनाची

व्यग्रता नाहींशी होऊन स्वतंत्रतेचा, संसाराचा व सांपत्तिक आनंद मिळाला, प्रथम कुटुंबाच्या ग्रास कायम. ३२ सांपत्तिक स्थिति उत्तम. ३३ द्वितीय कुटुंबापासून पुत्ररत्न, श्रीकाशीयात्रायोग, सांपत्तिकदृष्ट्या शेती-सावकारींत नुकसान, धंदा शेती व सावकारी पूर्ण स्वतंत्र, सरकारसंबंध सर्व कमी येणेंप्रमाणें वरील कुंडलीवरून स्थिति—धंदा स्वतंत्र, शेती मुख्य, सावकारी, किरकोळ, इस्टेट तीसपस्तीस हजारांची, सावकारी पांच–सात हजार उत्पन्न २ ते ५ हजारांपावेतों. खर्चही तितकाच. वडिलोपार्जित इस्टेट—इस्टेटीवर पांच हजारांपावेतों कर्ज येणेंप्रमाणें स्थिति आहे. जात ब्राह्मण, ऋग्वेदी देशस्थ, काश्यप गोत्र. १ मातोश्री, १ बहीण, १ लहान विधवा, २ कुटुंब, पहिले कुटुंबास १ मुलगी, दुसरे कुटुंबाचा हल्लीं एक मुलगा, श्रीगुरुमहाराज संस्थान चातुर्मास्य महाराज, पंढरपूर. यांचा भक्तिमार्गाचा सदाचरणाचा सहवास, येणेंप्रमाणें कुंडलीची स्थिति आहे. मोठा धंदा—शेती सर्व घरीं, शेती अजमासें १०० एकर पूर्ण माळकीची आंब्याची झाडें ७५ सावकारी.

कुंडलीक्रमांक ८३

रावबहादूर केशवराव गोविंद दामले, C. I. E; हायकोर्ट वकील, अकोला. (वऱ्हाड) जन्म शके १७९० आषाढ शु. ५ इष्ट घ. ५८ पळे ५.

१८६८

जन्मकुंडली

र. २–१२
चं. ४–२१
मं. १–४
बु. ३–४

बु४ शु ह ३ र २ प्र. ५ चं ४ ६ १२ गु ने १ ११ के ७ ९ वक्री श ८ १०

गु. ११–२०
शु. ३–१२
श. ७–९ वक्री
रा. ४–७

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

अत्यंत विपन्नावस्थेंत परगृहीं विद्यार्जनासाठीं दिवस काढून सात्विक, सरळ, सचोटीच्या व बुद्धिमत्तेच्या जोरावर राजकृपा संपादन करून श्रेष्ठ दर्जाच्या राजसन्मानास पोचलेल्या सन्माननीय सद्गृहस्थांपैकींच रा. ब. दामले हेही एक आहेत. अशी श्रेष्ठ राजसन्माननीयता प्राप्त होण्यास जन्मकाळीं कोणते ग्रहयोग असावे लागतात व ते आपल्या चलित व गोचर गतीनें कसकसे परिणामकारक होतात व यापासून सर्वसंमत अशी ज्योतिषशास्त्रदृष्ट्या कोणती विधानें दृष्टोत्पत्तीस येतात हें मुख्यत्वेकरून यात देत आहो. रा. ब. दामले हे नुसते हायकोर्ट वकीलच काय, परंतु रावसाहेब रावबहादूर, सी. आय. ई. या बहुमानाच्या पदव्यांनीं मंडित झाले असून ते पुष्कळ वर्षे आकोल्याच्या डिस्ट्रिक्ट कौन्सिलचे व्हाइस प्रेसिडेन्टही होते.

रा. ब. दामले यांच्या कुंडलींत दशमेश व दशमस्थ गुरु आहे, व हाच मुख्य राजयोगकारक ग्रह आहे. दशमस्थान हें बहुविध कार्याचें क्षेमस्थान असतें. या दशमेश गुरुशी आणखीहि राजकारण ग्रहांचा सुयोग आहे. तो नसता तर रा. ब. दामले हे शाळाखात्यांत एखादे अधिकारी होऊन कनिष्ठांकडून वरिष्ठांस संबोधिल्या जाणाऱ्या "रावसाहेब" या व्यावहारिक

मान्यतादर्शक पदवीच्या प्राप्तीपुढें गेले नसते. परंतु हा दशमेश गुरु–शनि, शुक्र व बुद्धिकारक बुध यांनीं सुयोगी बनल्यामुळें सात्विक, सरळ, सचोटीच्या बुद्धिमत्तेच्या जोरावर सरकारांतून वर दर्शविलेल्या बहुमानाच्या पदव्यांनीं मंडित झाले आहेत. राहुग्रस्त व शनि मंगळांसारख्या खुनशी ग्रहानें दृष्ट अशा चंद्रानें पूर्ववयात विपन्नावस्था दर्शविली; परंतु याच विपन्नावस्थेंत याच चंद्राचा रवीशीं सुयोगामुळें मोठमोठ्या सरकारी अधिकाऱ्यांच्या ओळखीची दिशा दर्शविली. शुक्राच्या उच्चांत गुरु व गुरुच्या उच्चांत शुक्र ही अत्यंत श्रेष्ठपणाची कुंडलींतील स्थिति अत्यंत बहारीची आहे. सुयोगाप्रमाणें कुयोगही या कुंडलींत आहेत. गुरु चं. र. श. षडाष्टक; व श. चं. व मं. चं. हे ते केंद्र होत.

## बालपण व भाग्योदय काल

भाग्येश शनि, मंगळांतून जात असतांना व रवीशीं योग करीत असतांना रा. ब. दामले यांस विद्यार्जनासाठीं परगृहीं वास करावा लागला. तो काल म्हणजे सन १८८३ ते ८६. गोचरीचा शनि तूळेंतून जात असतांना, रा. ब. दामले यांनीं आकोल्यास हायकोर्ट वकिलीची सनद घेतली, व येथून त्यांच्या भाग्यास आरंभ झाला. इ. सन १८९४. गोचरीचा शनि वृश्चिकेंतून दशमेश–गुरूशीं योगकारक होण्याच्या वेळीं रा. ब. दामले हे आकोला–म्युनिसिपल सेक्रेटरी झाले १८९८. व पुन्हां धनस्थानातून जात असतांना व एकादशमेषराशी योग करीत असतांना आकोला डि. कौन्सिलचे व्हाइस चेरमन झाले १९०२. रावसाहेब ही पदवी मिळाली १९०७. त्या वेळची ग्रहस्थिति:—शनि कुंभस्थ, गुरु मिथुनेंत यांचा त्रिकोण. रा. ब. दामले दिल्लीस कारोनेशनकरितां गेले १९११. त्या वेळची ग्रहस्थिति—शनि मेषेंतून जात असून, तूळेंतून जाणाऱ्या गुरूशीं समसप्तकयोग करीत होता. रा. ब. हा किताब मिळाला त्या वेळची ग्रहस्थिति—१९१४ शनि गोचरीनें मिथुनेंत व गुरु कुंभेंत यांचा त्रिकोण. रा. ब. दामले वॉर-कान्फरन्सकरितां दिल्लीस गेले १९१८. गुरु गोचरीनें वृषभेंतून मूळच्या शुक्राशीं त्रिरेकादशयोग करूं लागला, रा. ब. दामले यांस C. I. E. हा श्रेष्ठपणाचा किताब मिळाला १९२१. मंगळ मेषेंतून जात असून गुरुशनि राजराशींतून जाऊन योगकारक बनले, अशा रीतीनें मूळचे गु. शु. श. बु. सुयोग गोचरीनें उत्तमोत्तम प्रकारें राजमान्यकारक फलद्रूप झाले.

## शारीरिक व प्रापंचिक सुखदुःखाचा काल.

गोचरीनें बुध मिथुनेंत, राहु शनि कुंभेंत, यावेळीं रा. ब. कावऱ्यानें अत्यंत आजारी होते. सन (१८७७-७८). राहु-ग्रस्त-चंद्रामुळें अनुभवलेल्या स्थितीचे वर वर्णन दिलेंच आहे. अष्टमेश षष्ठस्थानीं व षष्ठेशानें दृष्ट व रवीशीं षडाष्टकयोगी; सबब रवीशीं ग्रहणयोग करीत असतांना रा. ब. दामले यांस (१८८५-८६) सालीं Prospetjonailments झालेंच होतें. रा. ब. दामले हे कालेजांत असतांना (१८८७) उंचावरून पडून हाड मोडल्यामुळें १५ दिवस अत्यंत आजारी होते. (त्यावेळीं शनि राहूंतून जात होता.) राहु चलितातें रवीशीं योगकारक होण्याच्यावेळीं (१९०३) रा. ब. यांचे धाकटे बंधु व यांची पत्नी व रा. ब. यांची प्रथम पत्नी व धाकटी वहीण असे १५ दिवसाचे अंतरानें प्लेगनें वारले. र. गु. केंद्र यामुळें गुरु चलित होऊन रवीशीं योग करूं लागल्यावेळीं. (१९०७) रा. ब. यांचे एकाएकी डाका पडल्यामुळें ६००० चें वित्त

गेलें. गु. चं. षडाष्टक असतांना जामीन कोणासही होऊं नये हा पक्का अनुभव रा. ब. दामले यांस आलेला आहे. १९१२ सालीं रा. ब. यांची द्वितीय पत्नी गेली. शुक्राच्या धन द्वादशांत पापग्रह अनेक भार्यायोग दर्शवितो. त्याप्रमाणें रा. ब यांची हल्लीची पत्नी तिसरी आहे. उपासनाधिपती बुध शनीशीं सुयोगी यामुळें रा. ब. यांस देवीची पूजा स्पष्ट दिसते. व ते स्वतः देवीप्रीत्यर्थ दरसाल कांहीं नक्त रक्कम खर्च करीत असतात.

## राजकारण.

एकादशांत राजकारक ग्रह किंवा दशमेशाचा रविमंगळाशीं शुभ संबंध असणारीं माणसें राजकारणांत पडत असतात. रा. ब. च्या कुंडलींत एकादशाधिपति व्ययांत व रवि गुरु केंद्र यामुळें रा. ब. राजकारणापासून अलिप्त राहिले हे ग्रहयोगच दर्शवीत आहेत. व याच परिस्थितीनें रा. ब. दामले यांस प्रधानकीचा योगही आजपर्यंत आणून दिला नाहीं. हल्लीं शनिमहाराज आपल्या उच्च राशींतून भ्रमण करीत असतां व गुरुही धनराशींतून जात असतां, अशावेळीं शनी गुरु सुयोग स्थिती आयुष्यांतील अत्यंत श्रेष्ठ दर्जाची मानमान्यतेची परिस्थिती उत्पन्न केल्याशिवाय राहत नाहीं असें जन्मकाळचे ग्रहयोग स्पष्ट ग्रहस्थिति दर्शवितात.

*कुंडलीक्रमांक ८४*

शके १७९६ ज्येष्ठ शुद्ध १४ सह पौर्णिमा, अनुराधानक्षत्र, तिसरा चरण इष्ट ४८-२१,

जन्मकुंडली

| स्पष्ट रवि | श; | चं; | रा; | के; | शु; |
|---|---|---|---|---|---|
| ग्रह १ | ९ | ७ | ० | ६ | २ |
| १७ | १९ | १२ | १२ | १२ | १२ |
| १२ वक्री | | | | | |

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

बाळपण—अडीच महिन्यांच्या वयाचे वेळीं वडील वारले, दप्तरदार होते, २॥ महिन्यापासून ९ वर्षांच्या वयापर्यंत मातोश्रीनें लोकांचे घरी स्वयंपाक करून माझी सोय केली. विद्याभ्यास—चुलत्याच्या घरीं १९ वर्षांपर्यंत झाला, या वयापर्यंत झालेले हाल मीच व ईश्वर जाणे. लग्नयोग—१९ वे वर्षी लग्न झालें, बायको कुरुप, मूर्ख व अर्धवट, फक्त पवित्र आचरणाची. वडिलांची सांपत्तिक स्थिति—घर व शेती होती; अजूनही आहे, परंतु चुलते व चुलत भाऊ कांहीं हातीं लागूं देत नाहींत. उद्योगधंदा—पुण्याचे रा............... यांची बन्हाडांत बदली झाली; त्यांचे आश्रयानें बन्हाडांत आलों व २१ वे वर्षी नोकरी लागली, २३ वे वर्षी कायम झाली, हाल संपले. फौजदारी खटला—वयाचे ३५ वे वर्षी म्हणजे सन १९०९ सालीं कांहीं चुकीच्या आरोपामुळें फौजदारीचा योग आला होता, त्याच वेळीं ज्योतिष शिक्षणाची महति वाटली; व मी माहिती घेऊं लागलों. त्या वेळीचे ग्रहयोग गोचरीचा राहू १६ अंशांत येऊन मूळच्या रवीशीं ग्रहणयोग करीत होता; परंतु तो गुरु दृष्ट असल्यामुळें मी त्यांतून

बचावलों. अधिकारप्राप्ति—१९१७ सालीं नायब तहशीलदाराची जागा मिळाली, गो. शनीचा मूळच्या शनीशीं समसप्तकयोग, पुन्हा १९२१ सालीं तशीच जागा मिळाली, गोचर राहूचा मूळच्या राहूशीं त्रिकोण. ईश्वरी कृपा—१९२३ मध्यें पुण्याचे श्रीमाधवनाथ महाराज यांनीं मुद्दाम येऊन उपदेशामृत पाजलें, तेव्हापासून वैराग्याचा अभ्यास सुरू. संततीयोग—२ मुली ३ मुलगे, मुली उत्तम स्थितींत पडल्या असून मुलें शिकत आहेत आजोळचा परिवार—मामा नाहीं, मावश्या ५, पैकीं एकीनें सर्वस्वी माझा सांभाळ केला, ती आमच्याच घरीं १० वर्षांपूर्वी वारली. धनस्थिति—कर्ज नाहीं पण संचयही नाहीं, सरकारी काम संपल्यावर ईश्वर भजना शिवाय व्यासंग नाहीं, ज्योतिषशास्त्राचा अभ्यास थोडासा केला होता, परंतु तो फारच कमी, व्यसन—कांहीं नाहीं, सुपारीसुद्धा नको, फक्त एखादे वेळीं विडी ओढतों

कुंडलीक्रमांक ८५

संवत १९५२ शके १८१८ तारीख १३ जुलै सन १८९६ उत्तरायणे ग्रीष्मऋतौ शुभकारक आषाढे मासे शुक्लपक्षे ३ घटि ३७ प. २१ जन्मतिथौ, चंद्रवासरे, आश्लेषा घटि १५ प. २० पर मघा जन्मनक्षत्रे सिद्धि घटि ३३ प ४० जन्मयोगे गीरकरणे श्रीसूर्योदयात्गत घटि ३० प. ३१ समये जन्म ॥ चंद्रमहादशेमध्यें जन्म॥ भोग्य वर्षे १३ मास ९

| रवि | चंद्र | मंगळ | बुध | गुरु | शुक्र | शनि | राहु | ल. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २ | ४ | ० | २ | ३ | ३ | ६ | १० | ८ |
| २९ | ३ | १४ | १४ | २३ | १ | २१ | ३ | १७ |
| ० | ३० | ५२ | २२ | ९ | ३० | ३२ | ५४ | २५ |
| ५६ | ७८७ | ४१ | ८६ | ११ | ७२ | १ वक्री | ३ | |
| ५८ | ३४ | ५० | २० | ४६ | २९ | २८ | ११ | |

जन्मलग्नम्

चलितचक्रम्

नवमांश

होरा चक्रम्

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

वडिलांचा मृत्यु तारीख १९।१।१८९८ बुधवारी दुपारीं २ वाजतां बडोदे येथें झाला। मामाचा मृत्यु तारीख २९।३।१८९८ मंगळवारीं रात्रीं १० वाजतां बडोदे येथें झाला. आमची जमीन, घर, दागदागिने इत्यादि तारीख २८।६।१८९६ रोजीं सरकारजमा झाली. सन १८९९ मध्यें देवीचा आजार. सन १९०१ मध्यें बाहेरील बाधा. सन १९०२ मध्यें प्लेगचा घात. सन १९०४ वरून पडण्याचा घातयोग व कुटुंबावर फौजदारी खटले, सन १९०५ मध्यें लक्षाधीश दत्तक होण्याचा योग. सन १९०७ मध्यें विषमज्वराचा घात. सन १९०९ मध्यें सर्प चावणें. सन १९११ मध्यें अमेदरोग दोन महिनेपर्यंत; व सद्गृहस्थाचा मुलाप्रमाणें आश्रय मिळणें. सन सन १९१५ मध्यें आत्महत्येचा घात, नर्मदेंत बुडून मारण्याचा घात. सन १९१६ मध्यें घरीं चोरी होणें, फौजदारी आरोप येणें, उत्तर दिशेला ( परगांवी ) जाणें व शुभकीर्ति होणें व दोन वर्षे मोडणें. तारीख २३।२।१९१८ पासून तारीख १।३।१९१८ पर्यंत शरीरास मृत्युतुल्य पीडा, घरीं चोरी होणें, फौजदारी कोर्टांत साक्ष. तारीख २२।७।१९१८ पासून तारीख १०। २।१९१९ पर्यंत हरएक तऱ्हेचा माल अंगउधार मिळणें, लायब्ररी काढणें व पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर दिशेकडे कीर्ति होणें व लक्षाधीश होण्याचा योग. तारीख १३।५।१९११ रोजीं उत्तर दिशेला ( परगांवीं ) जाणें शुभ कीर्ति होणें. तारीख १३।८।१९१९ रोजीं ब्राह्मण शत्रु होणें व त्यापासून फारच त्रास. तारीख १७।८।१९१९ रस्त्यांत पैसे सांपडणें. तारीख ६।९।१९१९ रोजीं त्रास, कष्ट व भयंकर पश्चात्ताप होणें. तारीख २०।९।१९१९ रोजीं दोन महिनेपर्यंत व्यापाऱ्याच्या येथें नोकरी धरणें. तारीख ७।१०।१९१९ रोजीं घोडागाडींत मरतां मरतां वाचणें. तारीख १५।११।१९१९ रोजीं दुर्दैवी आप्यास वांचविणें. तारीख १४।१२।१९१९ पासून तारीख १।१।१९२० पर्यंत पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर दिशेला कीर्ति होणें व लक्षाधीश होण्याचा योग. तारीख २९।१।१९२० रोजीं क्लेश व पीडा होऊन पश्चात्ताप होणें. तारीख १०।२।१९२० पासून तारीख ११।२।१९२० पर्यंत भयंकर त्रास. तारीख २०।३।१९२० रोजीं भयंकर त्रास घेऊन दुर्दैवी आप्यास मदत करणें. तारीख १२।४।१९२० रोजीं दक्षिण दिशेला ( परगांवीं ) जाणें व कीर्ति होणें आठ दिवसपर्यंत. तारीख ६।४।१९२० व ता. ७।४।१९२० रोजीं दुर्दैवी ब्राह्मण प्राण्यास स्वतःवर संकट घेऊन मदत करणें. तारीख २३।६।१९२० पासून ता. ३।३। १९२१ पर्यंत दवाखान्यांत कंपाऊंडरची नोकरी. तारीख ६।७।१९२० रोजीं पुरभय्या ब्राह्मण दुष्मन होऊन आरोप येणें व तारीख १०।७।१९२० पर्यंत फौजदारी त्रास. तारीख ८।१।१९२० रोजीं आजीचा मृत्यु होणें. तारीख २२।६।१९२१ पासून ता. १३।८।१९२१ पर्यंत ब्रिटिश-राज्यांत मी गुन्हेगार झालों व ५०० रुपयांच्या जामीनावर सुटलों, परंतु सुदैवानें माझें कांहींएक न होतां ता. १४।८।१९२१ ला निर्दोष झालों. तारीख १८।९।२१ रोजीं चमत्कारिक बनाव अचानक दृष्टीस पडणें व दुर्दैवी स्त्रीस मदत करण्याचा प्रयत्न होणें. तारीख १९।९।१९२१ रोजीं भयंकर तब्येत बिघडणें. तारीख १२।६।१९२२ पासून ता. १५।६।१९२२ पर्यंत शरीरास भयंकर संताप उत्पन्न होणें, त्यामुळें भयंकर त्रास. तारीख १६।६।१९२२ रोजी फौजदारी अटक ५ कलाकपर्यंत होणें, व त्यांतून मुक्त होणें. तारीख २१।९।१९२२ पासून ता. २०।२।१९२३

पर्यंत भयंकर चैन करणें. तारीख २३।६।१९२३ पासून ता. २८।३।१९२४ पर्यंत दक्षिण दिशेकडे (परगांवीं) अतिशय प्रवास होणें. तारीख २७।१०।१९२३ रोजीं वडील वधूचा मृत्यु होणें.

कुंडलीक्रमांक ८६

शालिवाहन शके १८१९ हेमलंबी संवत्सरे भाद्रपदेमासे कृष्णपक्षे प्रतीपदां तिथौ, रविवासरे उत्तराभाद्रपदानक्षत्रे अत्रदिने श्रीसूर्योदयात्‌गतघटिका २२ पळे ५१ समये जन्म. ॥ जन्मस्थळ मागळ [ जि. बेल्लारी ] दुपारी ३।२१ वाजण्याच्या सुमारास.

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—शरीरयष्टी साधारण, कृश, रंग गोरा, साधारण चंचल मन. सदाचाराची, सुंदर वस्तूची, गूढविद्येची, ज्योतिषाची आवड, मिष्टान्नप्रियता, अशक्त, चिंताजनक, शांतस्वभाव, मान प्रसंगी नुकसानीची पर्वा राहत नाहीं. औदासिन्य बाकी व्यंगें नाहींत. केस साधारण कडक असोन, अंगावर व छातीवर फार कमी गडांतरें व मोठाले आजार—आजार इ. सन १९१६ मध्यें मार्च महिन्यांत भयंकर आजार, मरणांत कष्ट. पुन इ. सन १९१८।१९ मध्यें पाळीचे तापानें फार दिवस आजारी. जनक आई व वडिलांचें सौख्य—तारीख २०।७।२० इ. रोजीं वडिलांचा मृत्यु. हयात असेपर्यंत माझेवर प्रेम जास्त. आई हयात आहे, परंतु वडिलांचा वियोग झाल्यानंतर वेड लागलें आहे. दत्तक आई हयात. माझ्याशीं विरोध. जनकआई व वडिलांचे आजार—वडिलास काळन्याचा आजार. शके १८२८ मध्यें फार दिवस कष्ट सोसले. दुसरे आजारामध्यें इ. स. १९२० मध्यें मरणच पावले. जनकवडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—साधरण होती परंतु त्यापासून सुख नव्हतें, दत्तक घराण्याची सांपत्तिक स्थिति चांगली असून व्यवस्था बरोबर नसल्यानें साधारण प्राप्ति. त्यापासून सर्व व्यवहार. जनक वडिलांचा धंदा—कुळकर्णी. भावडें—एकदर ६ बहिणी, पहिलें मयत, बाकी पांच हयात, व एक भाऊ हयात, विद्याभ्यास करीत आहे. दत्तकयोग—आईच्या आईस इ. १९०४ मध्यें दत्तक गेलों. विवाह—शके १८३७ सन १९१६ मध्यें, स्त्रीची प्रकृती अशक्त, सुस्वभावी, कर्तव्यशील, धर्मनिष्ठ, शांत, रोगी, सहनशील, स्वच्छतेची आवड, सुस्वरूपी, रंग साधारण संतति—प्रथम कन्या, दुसरा मुलगा हे दोन्ही गर्भपातानें अनुक्रमें ५।६ महिन्यांतच गेले.

तिसरा मुलगा ता. १५।१२।२३ इसवी रोजीं जन्मला. ता. १०।९।२४ इ. रोजीं मरण पावला, पुनः संतति नाहीं. विद्या—कुळकर्णी कामापुरती मराठी चांगलें. चित्रकला साधारण, यंत्र कामाची आवड फार, इंग्रजी ३ री इयत्ता झाली आहे. कानडी ५ व्या इयत्तेपर्यंत. भाग्योदय—सन १९२० जूनपासून नोकरी तीन गांवची व दत्तक झाल्यापासून प्राप्ति बरी होती. सन १९२१ पासून मात्र साधारण. स्वतःवर व्यावहारीक जबाबदारी—सन १९२० पासून वडील वारल्यानें एकंदर वतनाचा [ जनक घराण्याचा व दत्तक घराण्याचा ] सर्व कारभार मीच करीत आहे. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल—वडिलांनीं + + पैसा + + + १९२० इ. मध्यें दोन गांवचे कुळकर्णी कामास राजिनामा देणेचा प्रसंग आला. त्याच तडाक्यांत तीन हजार रु. चें कर्ज झालें आणि परावलंबित्व करणें पडलें. सन १९२३ मध्यें व्यवसाय बंद करून जमीन लागणीस देऊन ३/४ कर्ज फेडून टाकलें. तेथपासून प्राप्ति साधरण. कोणत्याही कार्यांत बहुतेक यश नाहीं. सन १९२१।२२ मध्यें आप्त, शत्रूपासून फार नुकसान झालें. हल्लीं एक गांवचे कुळकर्णीपणाचे काम करीत असून चिंताजनक स्थिति फार झाली आहे. सत्तेचें घर, वाहनें, जमीनजुमला—सत्तेचीं घरें दोन आहेत. वाहनें नाहींत. जमीन पुष्कळ वतनाची आहे. यांपैकीं दत्तक घराण्याचीच फार आहे. नोकर चाकर स्वतःचे नाहींत, × × चाकर आहेत. त्यांचेवर सत्ता चांगली आहे, आणि वतनी पांच गायें आहेत. कोर्टांत जाणेचे प्रसंग—११।११।१९१७ दत्तक झाल्याबद्दल वारस सरटीफिकेट घेणेकरितां गेलों होतो. व्यसनें—विडी ओढणेची सवय फार आहे. बाकी कोणतेही नाहीं. सासरची सांपत्तिक स्थिति—साधारण बरी असून सासऱ्याचें माझ्यावर प्रेम चांगलें आहे. दरमहा पगार—सात रुपये असून स्वतंत्र गांव आहे.

### कुंडलीक्रमांक ८७

श्रीशके १८१६ भाद्रपदेमासे शुक्लपक्षे तिथौ ४ चंद्रवासरे घ. २४ प. २४ नक्षत्र चित्रा घ. ३५ प. ५५ नंतर स्वाति, योग शुक्ल घटि १४ प. ४२ नंतर ब्रह्मा, करण वणीज घ. ५ दिनमान प्रमाण घ. ३० प. ५२ अस्मिनशुभदिने श्रीमन्मार्तंडमंडलोदयात्इष्टकाल घ. ४८ प. ३ समये जन्म॥ जन्म नाम रूमदेव

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति—शरीर बांधा ठेंगणा, स्थूल, रंग साधारण काळा, नेत्र पिंगट रंगाचे,

केस अल्प व कुरळे, वातविकार, मेदवृद्धि, स्वभाव शांत, व्यंग कोणतेंच नाहीं. गंडांतरे—लहानपणीं चार वर्षेपर्यंत हमेशा बिमार, दहावें वर्षी डोक्यास खांडूक, आठराव्या वर्षी पोहोण्यास शिकतांना जलापघात. वडिलांचे सौख्य—वडील शके १८३४ भाद्रपद वा॥ ३० रोजीं काळज्यानें वारले. वडिलांचे अतिशय प्रेम होतें, आईही त्याच वेळीं काळज्यानें बिमार परंतु हयात आहे. आजा हयात आहे, आजी मृत शके १८१९, मामा एक हयात, मावशी नाहीं, चुलता नाहीं, आत्याहि नाहीं. वडिलांची मूळची सांपत्तिक स्थिति—गरिबीची, धंदा सरकारी नौकरी, शाळा मास्तर व शेती, पगार महिना २५ रुपये. कीर्ति व मान फार चांगला होता. भावंडें एकंदर दहा—त्यांत हयात हल्लीं तीन भाऊ, दोन बहिणी, आधीं दोन बंधु वारले, तिसरा कुंडलीवाला, जन्म शके १८१६ भाद्रपद शु. ४, चवथा भाऊ जन्म शके १८१९, दहा महिन्यांनीं वारला, पांचवी बहीण जन्म शके १८२०, फा. शु. ११ हयात, सासरची स्थिति संपत्ति संततीयुक्त, सहावी बहीण जन्म शके १८२३ पौष वद्य दशमी हयात सासरची स्थिति साधरण, संतति युक्त. ७ वी बहीण वारली, ८ वी बहीण वारली, ९ वा भाऊ, जन्म शके १८३०, आषाढ वद्य ३ हयात. शिक्षण मराठी ४ यत्ता. १० वा भाऊ, जन्म शके १८३३. भाद्रपद वद्य १३, हयात, शिक्षण मराठी ४ यत्ता. भावंडांचे सुख—आतांपर्यंत सर्व आज्ञेत आहेत. उत्तम आहे. प्रथम विवाह—शके १८३० वैशाख शुद्ध १५ स्त्रीसुख उत्तम. सासरची स्थिति चांगली. संतति—शके १८४०, आश्विन शुद्ध ११ ला मुलगा झाला; तो ४ दिवसांनीं मरण पावला. कुटुंबहि शके १८४० आश्विन वद्य २ ला इन्फ्लुएंझानें वारलें, नंतर दुसरा विवाह—शके १८४१ फा. व. ५, स्त्रीचा स्वभाव क्रोधी, अतिशय तापट, प्रकृति अशक्त, वर्ण गौर, सासरची स्थिति गरीबीची. संतति—शके १८४५.ज्येष्ठ शु. १४, ता. २७।६।२३ कन्या, हयात आहे. सुंदर, सशक्त. विद्यासुख—मराठी व इंग्रजी मॅट्रिक पर्यंत, प्रत्येक वर्षी प्रत्येक वर्गांत यश; परंतु मॅट्रिक मध्यें ४ वर्षे अपयश. 'ड्रॉइंग यर्ड ग्रेडची परीक्षा पास, यांत इनाम रुपये २५. आवडत्या गोष्टी—गारुडी विद्या, पोहणें, वैद्यकी, ज्योतिष, पत्ते खेळणें, चौसर खेळणें. अतिशय आवडता विषय—वाचन. व्यसन—तपकीरीचे व विडीचें. कोर्टांत जाण्याचा प्रसंग—फौजदारींत हिंदु मुसलमानांचे झगड्यांत ६ महिनेपर्यंत त्रास परंतु अखेर निर्दोष सुटका, शके १८४४ ज्येष्ठ शु. १४. तीर्थयात्रा—विशेष नाहीं; फक्त वयाचें १० वे वर्षी व १७ वे वर्षी दोनदां पंढरपूरची यात्रा झाली. लोकांकडून मान—तालुका कांग्रेस कमेटींतील कार्यकारी मंडळाचा सभासद; अध्यक्ष शाळाकमेटी. शिवाय गावांत लोक चाहतात. सरकाराकडून मान—अद्याप नाहीं. वडिलार्जित घर व स्थावर जमीन वगैरे आहे. नौकरचाकर सुख उत्तम आहे. स्वसंपादित मिळकत खालील तारखेस खरेदी. एक शेत ता. १६।१।२० रोजीं आडाची २४ एकर. एक घर ता. २१।५।२४ रोजीं. एक शेत ता. २८।१२।२४ रोजीं आ. २१ एकर. याची इसार-चिठ्ठी होऊन खरेदी खत झालें. बक्षिस चुलत चुलतीकडून शेत ता. १४।५।१९ रोजीं ७ एकर. धंदा शेतीचा, वार्षिक उत्पन्न सालीना दोन हजार रुपये. भाग्योदय—वयाचे ११ वे वर्षी-

पासून द्रव्यदृष्ट्या फायदा शेतीपासूनच. नुकसान नाहीं. कर्ज वगैरे नाहीं. शत्रुपीडा व विरोध—धुळत चुळत्याकडून. ता. १४।५।१९ चे बक्षिसावदल.

कुंडलीक्रमांक ८८

जन्मः—शके १८१६ जयनामसंवत्सरे, आषाढ वद्य ५ रोज सोमवार ता. २१।७।९४, सूर्योदयात घ. ५७ प. ३० जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

जन्मानंतर ४।५ वर्षेपर्यंत शरीर अत्यंत रोगी व अशक्त होतें. पाठीवरील २ भाऊ व जन्मापूर्वीचे २ भाऊ मयत, ६ वे वर्षापासून शिक्षणास सुरवात. १२ वे वर्षापासून इंग्रजी शिक्षणास सुरवात. १६ वे वर्षापासून एका आप्ताच्या साहाय्यानें पुण्यास इंग्रजी शिक्षण. सन १९१५ मार्चांत मॅट्रिक परीक्षा पास. सन १९१६ मार्चपर्यंत कॉलेजशिक्षण, पुढें कॉलेजची परीक्षा नापास झाल्यामुळें शिक्षणास फारकत, सन १९१६ जूनमध्यें इंग्रजी मास्तरची नोकरी लागली. पुढें ता. ३ डिसेंबर सन १९१६ रोज रविवारी सायंकाळीं प्रथम विवाह, त्याच आप्ताच्या साहाय्यानें झाला. हा विवाहयोग अगदीं अचानक ५ महिन्यापूर्वी निश्चित झालेला होता. इंग्रजी मास्तरची नोकरी आतांपर्यंत ५।६ ठिकाणीं झाली. नोकरी लागण्यास फारच खटपट पडते व नोकरी लागल्यावर वर्ष दीड वर्षानीं कांहींतरी क्षुल्लक कारणानें नोकरी सुटते. ता. २३ डिसेंबर १९२० सोमवारी रात्रीं ९॥ वाजतां प्रथम कन्या झाली. ती आज हयात आहे. ता. २६ नो. १९२२ शनिवारी एक घर विकत घेतलें. ता. २६ जानेवारी सन १९२३ शुक्रवारी रात्रीं १० वाजतां पत्नीचा ( माहेरी द्वितीय प्रसूतिकालाचे समयीं ) मृत्यु. मूल जन्मण्यापूर्वीच मयत. मुलगा होता असें मागाहून समजलें. वडील व मातोश्री हयात. ३ बहिणी व दोन बंधु हयात. ते सर्व माझ्यापेक्षां कनिष्ठ आहेत, घरची स्थिति अगदीं गरिबीची, सर्व कुटुंबाचा मी एकटा चालक आहे. वडिलांचे हातची एक पैचीही इस्टेट नाहीं. हल्लीं मी इंग्रजी मास्तरची नोकरी करीत असून दरसाल उत्पन्न ७।८ शें रुपये मिळते. ते सर्व कुटुंबाप्रीत्यर्थ खर्च होतें. जवळ कांहीं शिल्लक रहात नाहीं. घरांतील सर्व मंडळींचें मजवर दिखाऊ प्रेम आहे, मी मात्र सर्वांकरितां निष्कपटपणानें झटतो व प्रेम करितों. आप्तसोयरे पुष्कळसे मोठमोठे श्रीमंत आहेत पण ते कधीं कवडीच्याही उपयोगी पडत नाहींत. माझे शरीर सडपातळ असून वर्ण साधारण गोरा आहे, शरीर बहुतेक अव्यंग असून रोगराई कित्येक वर्षे होत नाहीं, डोळ्याची मात्र कमीदृष्टि असून आज ८ वर्षांपासून चष्मा

लागतो. कोणतेही व्यसन नसून चहा व विडी मात्र फार आवडते, बुद्धि वरीच तरतरीत असून शास्त्रांचा व गाणें, वजावणें इत्यादिकांचा नाद आहे. विद्यार्थिदशेंत गणित फार चांगले येत असे, बुद्धि फार चौकस असून दूरदृष्टी विशेष आहे. स्वच्छता, टापटीप अति आवडत असून खाण्यापिण्यांत चांगल्या चांगल्या वस्तूंची आवड असते. दागदागिन्यांचा तिटकारा आहे कपडेलत्यांवर जास्त लक्ष आहे, स्वभाव अत्यंत दयाळू असून आजपर्यंत कोणाचेही रतिभर नुकसान न करतां शक्य तितकें प्रत्येकाला साह्याय्य करीत असतों. वाणी वरीच तेजस्वी असून मार्मिकपणाचा मोठा अभिमान आहे. विद्वान, साधु, शास्त्र, पुरातन चालीरीती यांचा अत्यंत अभिमान आहे. देवावर अत्यंत भरवसा आहे.

### कुंडलीक्रमांक ८९

स्वस्ति श्रीनृपशालिवाहनशके १८१४ नंदननामसंवत्सरे उदगयने वसंतऋतौ वैशाख शुक्ल ९ गुरौ घटी २८।५४ वर्तमानायां दशम्यां मघानक्षत्रे ३८।५३ वर्तमाने पूर्वानक्षत्रे ध्रुवयोगे ५३।३१ कौ. २८-५४ वर्त. तैतिलकरणें दिनमान ३१।५२ ता. ५ माहे मे सन १८९२ एवं पंचाग० अस्मिन्दिनेसूर्यास्तात्‌रात्रौगतघटी १९।५ तदांकुंभोदये शनिक्षेत्रे चंद्रहोरायां बुधत्रिंशांशे

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

माझे वडील १८३९ भाद्रपद व॥ २ या रोजीं निवर्तले. सर्वांत वडील बंधु १८४० भाद्रपद वद्य ३० निवर्तले. त्याचवेळीं मरणप्राय स्वतःस दुखणें, पुढें १८४१ भाद्रपदांत वरीलप्रमाणें दुखणें. छातींत विकार सन १९१३ डिसेंबर महिन्यांत झाला होता, तो अद्याप तसाच आहे. वडील बहीण मी अदमासें २।३ वर्षांचें वय असतांना वारली. त्यानंतर माझा लहान भाऊ १९०८ किंवा १९०९ सालीं वारला. त्याचें वय मृत्युसमयीं अदमासें १४।१५ वर्षांचें होतें. त्यानंतरचा भाऊ हयात आहे. सन १९११ पासून सरकारी व कंपनीची नोकरी केली, सन १९१७ पर्यंत. त्यानंतर घरी. वयाच्या २३ वे वर्षी लग्न झालें. शके १८४० ते १८४२ पर्यंत भागी धंदा केला, त्यांत नुकसानी झाली. १८४२ मध्यें चुलते वारले. त्यावेळीं भागीदारीचा धंदा बंद करून मुंबईस पेढीचें वडिलोपार्जित धंद्याचें सूत्र हातांत घ्यावें लागले. त्यांत आमच्या सासऱ्यानें आम्हांस दगा दिला. व त्यानंतर बाकीच्या कुंळांनीं १८४३ पर्यंत दगा दिला, व १८४४ धंदा एकदम बसला. सध्यां २ वर्षे वडिलोपार्जित धंद्याची चमुटी किंचित् मिळेल तर त्यावर गुजरण होत आहे. पैशाची प्राप्ति बिलकुल नाहीं.

कुंडलीक्रमांक ९०

शके १८१० परिधावीसंवत्सरें वैशाख शुक्ल १३ बुधवासरे ४५।४० चि. २।५९ तारिख २३ मे सन १८८८ अस्मिनदिनेसूर्योदयात्गत घ. ५४ प. १० तत्समये मीनलग्ने जन्म.

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

जन्मापासून वयाचे ३४।३५ वर्षेपर्यंत ऐपआरामांत व जोरदार घरांत गेलो, वडील वयाचे ३५ वे वर्षी वारले, वडिलांचा धंदा कापडाचाच असून उत्तम चालला, परतु वडील वारल्यानतर लौकरच वर लिहिलेल्या धंद्याशिवाय मुंबईस पेढी होती त्या पेढीपैकीं लोकांनीं बरीच रक्कम बुडविली, म्हणून सदरहू इसमानें घरांतील इस्टेट वगैरे वगैरे खर्च करून लोकांचे देणें फेडलें, परंतु अजून देणें आहे व घरांतील आई वगैरे सर्व्या स्नेहभावानें फारच कमी वागतात. मित्र, सोयरे शत्रुत्वानें वागत आहेत. गुप्त शत्रु फार आहेत, सर्व प्रकारें पुढचा काल कोणत्या प्रकारें जाईल याची अहोरात्र काळजी. दिवसेंदिवस परिस्थिति बिकट होण्याचा प्रसंग येईल ही धास्ती, पुष्कळ स्नेही लोकांनीं समजूत घातली तरी पटत नाहीं, वारंवार परदेशागमन करणेचा विचार मनांत घोळत आहे.

कुंडलीक्रमांक ९१

शके १८१६ मार्गशीर्ष शु. १२ सूर्योदयात्गत घ. १ प. ५ समये जन्म.

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

जन्म अत्यंत गरीब स्थितींत, जन्मोत्तर लौकरच वडील बंधूचा मृत्यु, वयाचे ५ वे वर्षी आईचा मृत्यु, सरकारी नोकरी ४ वेळ लागूनही अधिकाऱ्यांशीं न जमल्यामुळें पुनः पुनः सुटली,

वयाचे २० वे वर्षी वडिलांचा मृत्यु, अद्याप अविवाहित वृत्ति, साधारण अमिष्ट, हल्लीं याज्ञिक वृत्तीवर निर्वाह, वडिलांची इस्टेट वगैरे सर्व विकून खाल्ली, हल्ली कफल्लक, कायम टिकून कोणताही उद्योग होत नाहीं व कोणाशींही जमत नाहीं.

ज्योतिषशास्त्रदृष्ट्या विवेचन—जन्मस्थानचा स्वामी गुरु सप्तमांत असल्यानें स्वतःचा शरीर वर्ण गौर. साधारणपणें प्रकृति निरोगी चतुर्थस्थानीं राहु असल्यानें मातृसौख्य नाहीं. पंचमांत चंद्र मंगळ असल्यानें मराठी शिक्षण पूर्ण होऊन निरुपयोगी, पंचमांत मे राशीही वंध्या राशि असल्यानें अद्याप विवाह जमत नाहीं. सप्तमांत गुरु असूनही त्यास राहुकेतु पूर्ण दृष्टीनें पाहातात, म्हणून तें स्थान फल देण्यास असमर्थच, दशमांत केतु म्हणून पितृसुख अल्प, वडीलही अमिष्टच होते. आयस्थानी शनि असल्यानें नीच सेवेशंचून उदरंभरणास उपाय नाहीं. द्वादशांत रवि, बुध, शुक्र युति व्ययस्थानीं पडल्यानें निरुपयोगी व कोणतीही अस्थिरता.

कुंडलीक्रमांक ९२

शके १८२१ आषाढ शुद्ध १२ सूर्योदयात्गत घ. १९ प. ४७.

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

जन्म मध्यम स्थितींत, वडिलांची कर्जबाजारी स्थिति विशेष. जन्मतःच पुनर्जन्म होण्याइतका आजार झाला, पण एका महात्म्याच्या कृपेनें आजारांतून बचाव, प्रकृति उत्तम. ८ वे वर्षी उपनयन होऊन एक वर्षपर्यंत ब्रह्मकर्मांचें शिक्षण. मराठी शिक्षण सुरु असतांच इंग्रजी, उर्दू, गुजराथी शिक्षण व गायनाचे अभ्यासास सुरुवात; परंतु सर्वच अपूर्ण. वयाचे १२ वे वर्षी मराठी शिक्षण पूर्ण होऊन पितृनाश. आप्तांचा वियोग होऊन मामांचे खटपटीनें व आश्रयानें मराठी शाळेंत सरकारी नोकरी. वयाचे १७ वे वर्षी एकाएकीं नोकरीचा कंटाळा येऊन वैद्यकशिक्षणाची आवड उत्पन्न होऊन स्वत.चे तंत्रानेंच परदेशी वैद्यकीय शिक्षणास प्रारंभ, ते सुरू असतांच सार्वजनिक कार्यें व राजकारणांत पडण्याची आवड उत्पन्न होऊन राजकारणांत राजदंडाचा लाभ. ( शिक्षा नव्हे ) वैद्यकशिक्षण लोकांचे आश्रयास राहून व मधुकरी वगैरे मागून आणि वार लावून संपादन झाले; त्यांत प्रगति चांगली, मध्यंतरीच वयाचे २० वे वर्षी पुन्हां भयंकर आजार विषमाचा झाला, शिक्षण सुरू असतांच सार्वजनिक कार्यांत पडल्यामुळें मोठमोठ्या पुढाऱ्यांशीं व धनिक लोकांशीं परिचय व स्नेहसंबंध, आणि त्यांचे प्रेमसंपादन. शिक्षण ६ वर्षें संपादन करून स्वदेशीं आगमन, येतांना यात्रा वगैरेचा मातुश्रीसह लाभ, परत आल्यावर कांहीं दिवस एका सद्गृहस्थाचे आश्रयानें राहून वैद्यक धंद्यास सुरुवात व त्यांत थोडी थोडी प्रसिद्धी.

कांहीं कालानंतर स्वतंत्रपणें राहून धंद्यास सुरुवात व प्रगति आणि वयाचे २५ वे वर्षीं विवाह. त्यांत धंद्याचे दृष्टीनें लोकांची मदत विशेष होऊन विशेष कर्जबाजारी स्थिति न होतां कार्य झालें.

ज्योतिषशास्त्रदृष्ट्या विवेचन—तनुस्थानीं गुरु असल्यानें शरीरसंपत्ति चांगली व निरोगी. धनस्थानीं शनि असल्यानें द्रव्यसंचय नसला तरी द्रव्याची टंचाई भासून येत नाहीं. तृतीयस्थानीं राहुचंद्रयुति असल्यानें भावंडसौख्य अल्प, पाठचे भाऊ जगू नयेत, नवमस्थानीं शुक्र–केतुयोग धर्मश्रद्धा साधारण असून तीर्थयात्रायोग, अर्तगळासारखी थोडी व्यथा दशमांत रवि असल्यानें पितृसौख्य अल्प व सरकारी नौकरीयोग अल्प, एकादशांत मंगळ-बुधयुति असल्यानें वैद्यकासारखा स्वतंत्र धंदा व त्यांतही विशेषत हीन जातीकडून द्रव्यलाभ, मितव्ययी.

कुंडलीक्रमांक ९३

शके १८२४ कार्तिक वद्य ५ सूर्योदयात्गत घ. २

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

आयुष्यांतील गोष्टी —जन्म चांगल्या स्थितींत, जन्मत च मोठा आजार, वयाचे २ रे व ३ रे वर्षीं त्रिस्थळी यात्रा व उत्तर हिंदुस्थानचा प्रवास, प्रकृति उत्तम, ८ वे वर्षीं उपनयन, बालपणीं शिक्षणाची नावड, मराठी ५ वीनंतर इंग्रजी शिक्षणास प्रारंभ, त्यांत यश पूर्ण येऊन गुरुकृपा पूर्ण, शिक्षण मॅट्रिक, स्कूलफायनल संपूर्ण, उपनयनापूर्वीच मातृवियोग व आजीचा मृत्यु. वयाचे १५ वे वर्षीं आजोबांचा मृत्यु व १६ वे वर्षीं विवाह, वयाचे १९ वे वर्षीं सहा महिने कॉलेजचा सहवास, परंतु त्यांत अपयश आल्यामुळें शिक्षणाची इतिश्री होऊन शेतीबद्दल उत्सुकता, परंतु लौकरच गांवांत निमसरकारी संस्थेंत नोकरी, वयाचे एकविसावे वर्षीं पुत्ररत्नलाभ व लगेच पुढील वर्षीं वियोग, स्थावर इस्टेटलाभ.

ज्योतिषशास्त्रदृष्ट्या विवेचन —तनुस्थानीं रवि असल्यानें जन्मत पीडा, धनस्थानीं शनि असल्यानें धनवृद्धि, तृतीयस्थानीं गुरु असल्यानें पराक्रम विशेष, तो पंचमाधिपति असल्यानें विद्येंत यश, षष्ठांत केतु असल्यानें मातुलसौख्य कमी व गुप्तशत्रु पुष्कळ परंतु त्याचा नाश, सप्तमांत चंद्र वृषभेचा अर्थात उच्चीचा असल्यानें भार्यासौख्य उत्तम, भार्या उत्तम कुळांतील व गौरवर्ण, दशमांत मंगळ असल्यानें कीर्तिमान व उद्योगधंद्यापेक्षां जमिनींत लक्ष जास्त, राजसन्मान, व्ययस्थानीं बुधशुक्रराहुयुति असल्यानें अतिशय विचारानें खर्च व अनाठायीं झाल्यास हळहळ, बुधशुक्र असल्यानें पत्रव्यवहारलेखनवाचनाची आवड.

कुंडली क्रमांक ९४

शके १८१७ फाल्गुन वद्य १४ सूर्योदयात्प्राक् घ. ३

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

जन्म मध्यम स्थितींत, जन्मापासून कुटुंबाचे भरभराटीस प्रारंभ, जन्मतः शरीर पीडा, ८ वे वर्षी उपनयन, विद्या साधारण, परंतु बुद्धि तीव्र, कलाकुशलतेची आवड, वयाचे पधरावे वर्षी विवाह, पांच वर्षांनीं पुत्रलाभ, व स्वतःचा महत्वाचा भयंकर आजार, वयाचे तेविसावे वर्षी दुसरा पुत्रलाभ, वयाचे सत्ताविसावे वर्षी कन्यारत्नलाभ व वियोग, वयाचे सत्ताविसावे वर्षी भागीदारीनें धंदा करण्यास सुरुवात, परंतु त्यांत भागीदाराकडून दगा मिळाल्यानें नुकसान, हल्लीं स्वतंत्रपणें उद्योग करण्याची इच्छा असून वडील मडळीचे आडकाठीमुळें नाइलाज.

ज्योतिषशास्त्रदृष्ट्या विवेचन:—जन्मत रवि असल्यानें नेहमीं किरकोळ आजार; उष्णप्रकृति, धनस्थानाचा स्वामी मंगळ आयस्थानीं, शुक्रयुक्त असल्यानें धनसंचय बरा व शेतींत द्रव्यलाभ. पंचमस्थानीं कर्केचा गुरु असल्यानें संततिसौख्य उत्तम, मुत्सद्दीयोग, अष्टमांत शनि असल्यानें दीर्घायुषी व सासुरवाडीकडून लाभ, आयस्थानीं मंगळशुक्र असल्यानें कंजुषपणा व कृतीपेक्षां बडबड फार, परोत्कर्ष सहन न होणें.

कुंडलीक्रमांक ९५

शके १८१३ फाल्गुन वद्य १४ सूर्योदयात्गत घ. १० प. ५

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

जन्म साधारण मध्यम स्थितींत, जन्मतः साधारण पीडा, जन्मापासून वरील ओंठ चिरून शिवल्याप्रमाणें व्रण, शरीर निरोगी, साधारण उंच, वयाचे आठवे वर्षी उपनयन होऊन दहावे वर्षी मातृवियोग, उपनयनोत्तर दोन वर्षांनीं धाकटा बंधु मृत, नंतर दोन वर्षांनीं मामा व वडील

आला, ह्यांचे एका महिन्यांत एकामागून एक प्लेगनें मृत्यु. मराठी शिक्षण संपवून साधारण इंग्रजी शिक्षणास प्रारंभ, परंतु परिस्थितीचें प्रतिकूलतेमुळें अपूर्ण, वयाचे आठरावे वर्षी विवाह; नंतर कांहीं दिवस शिक्षकाची नोकरी, कचेरींत उमेदवारी, पुन्हां शिक्षकाची नोकरी करून कनिष्ठ बंधूचे मृत्यूनंतर तलाठ्याचे नोकरींत प्रवेश. नोकरींत असतांच एकाएकीं सरकारचे अवकृपेमुळें संपाचे वावटळींत सांपडल्यानें नोकरींतून मुक्तता व स्वतंत्र धंदास आरंभ; आणि त्यांतच साधारण अर्थलाभ चांगला. वडिलांचे मृत्यूपूर्वी एका शेताचा लाभ.

(ज्योतिषशास्त्रदृष्ट्या विवेचन—वृषभलग्नावर जन्म असल्यानें शरीरयष्टि उंच, मध्यम गौरवर्ण, पंचमांत शनि असल्यानें विद्येत अपयश, स्त्रीसंतति, कष्ट, षष्ठस्थानांत केतु असल्यानें मातुलसौख्य अल्प, नवमस्थानीं मंगळ असल्यानें मध्यमायु, दशमांत चंद्र असल्यानें नोकरीपेक्षां स्वतंत्र वृत्तीची आवड, आयस्थानी सूर्य व गुरु असल्यानें व त्या सूर्यास पंचमाचा शनि पूर्ण दृष्टीनें पहात असल्यानें एकदम सरकारी नोकरींतून कामांत कमतरता नसतांना निष्कारण आरोप येऊन कमी, परंतु एकादशांत स्वगृहींचा गुरु असल्यानें त्यानें स्थितींत फरक न पडूं देतां स्वतंत्र व्यापारांत प्रवेश व त्यांतच यश, व्ययस्थानीं बुध, शुक्र व राहु असल्यानें मितव्ययी, राजदंड-भीति, वादविवादाची आवड.)

### कुंडलीक्रमांक ९६

शके १८१२ मिति आषाढ व॥ १३ सकाळीं नऊ वाजतां.

जन्मकुंडली

### आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

जन्म मध्यम स्थितींत, प्रथम मराठी शिक्षण व घरीं इंग्रजी शिक्षण स्वतःचे जबाबदारीवर. बी. ए. पावेतों अपयश नाहीं. वयाचे सोळावें वर्षी विवाह, वयाचे तेवीसावे वर्षी प्रथम पुत्रलाभ, ष लागलाच त्याचा मृत्यू, पंचवीसावे वर्षी दुसरा पुत्रलाभ, पंचविसावे वर्षी कन्यालाभ, एकोणतिसावे वर्षी पुन्हा पुत्रलाभ, बत्तिसावे वर्षी मुलगा होऊन मृत, पंचविसावे वर्षी एल्. एल्. बी. नापास झाल्यामुळें शिक्षण सोडून कायमचे सरकारी नोकरीस प्रारंभ. वडील वयाचे तिसावे वर्षी वारले, नोकरींत वेळोवेळीं सन्मान.

ज्योतिषशास्त्रदृष्ट्या विचार—तनुस्थानीं शनि असल्यानें कृष्णवर्ण व शरीर निरोगी, तृतीय स्थानाचा स्वामी शुक्र जन्मस्थ असल्यानें बंधुसौख्य उत्तम, पाठीवर भावंडें—सहा, चतुर्थ स्थानीं स्वगृहींचा मंगळ असल्यानें मातृसुख उत्तम व स्थावर इस्टेट वडिलार्जित, नवमस्थानीं केतु

असल्यानें विधेंत शेवटीं अपयश, रवि पूर्ण दृष्टीनें पहात असल्यानें प्रथमापत्याचा नाश, षष्ठस्थानीं गुरु असल्यानें शत्रुत्व करणारे लोक फार, दशमात उच्चीचा चंद्र असल्यानें उद्योगप्रियता, पितृसुख, एकादशांत धनस्थानाचा स्वामी बुध स्वगृहीं रवीनें युक्त असल्यानें सरकारी नोकरी व राजसन्मान.

कुंडलीक्रमांक ९७

शके १८०९ कार्तिक शु. १४ सूर्योदयीं जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

जन्म उत्तम स्थितींत, शारीरिक पीडा लहानपणापासूनच फार, जन्मानंतर लौकरच वडील वहिणीचा मृत्यु. वयाचे आठवे वर्षी उपनयन, त्या वेळीं वडिलांनी धार्मिक विधि व धर्मादाय बराच केला, नंतर मराठी शिक्षण संपल्यावर इंग्रजी शिक्षणास आरंभ, वडील बंधु बी. ए. च्या क्लासांत असतांनाच मृत झाल्यामुळें स्वत:चे शिक्षणाची इतिश्री होऊन वयाचे सोळावें वर्षी विवाह, वयाचे एकवीसावे वर्षी पितृनाश, कांहीं दिवस स्टेशनरी व्यापार व त्यात नुकसान म्हणून त्याचा त्याग व सरकारी नोकरींत प्रवेश, त्यांत बढती व अधिकाऱ्यांची सुप्रसन्नता, वयाचे चोवीसावे वर्षी प्रथम मुलगा होऊन वारला. नंतर स्थावर इस्टेट खरेदी, एकोणतिसावे वर्षी दुसरा पुत्रलाभ, तिसावे वर्षी मातृवियोग, पुढें सरकारी नोकरींत उच्च दर्जाची प्राप्ति, परंतु नेत्रपीडा होऊन नोकरीस रामराम, नंतर उदरनिर्वाहाकरितां भागीदारींत शिरकाव.

ज्योतिषशास्त्रदृष्ट्या विवेचन—तनुस्थानी रविबुधशुक्र असल्यानें शरीरसौख्य मध्यम, बहु-भाषित्व, द्वितीयस्थानीं मंगळ असल्यानें नेत्रपीडा, चतुर्थांत केतु असल्यानें मातृसौख्य मध्यम, षष्ठांत चंद्र असल्यानें विरोधी लोक फार, भाग्यस्थानीं शनि असल्यानें धर्मश्रद्धा तीर्थयात्रादि योग, दशमांत राहु असल्यानें पितृसुख अल्प पण राजसन्मान, द्वादशांत गुरु असल्यानें सन्मार्गी व्यय अधिक.

कुंडलीक्रमांक ९८

शके १८०५ भाद्रपद वद्य ५ सकाळीं १० वाजतां.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

जन्म साधारण गरीब स्थितींत. शरीरास वारंवार व नेहमीं पीडा. वयाचे ५ वें वर्षी दत्तकयोग झाल्यानें एकदम परिस्थितींत बदल. वयाचे ८ वे वर्षी उपनयन, बरेच दिवस दत्तकाचे खरेपणाबद्दल भांडण व त्यांत यश. वयाचे १६ वे वर्षी विवाह. तोंपर्यंत शिक्षण साधारणच. वयाचे २०वे वर्षापासून वतनाचे गांवावर देखरेख व त्यांतच लांच खाल्याचा आरोप येऊन निर्दोष मुक्तता व नोकरीसही रामराम. वयाचे ३१ वे वर्षी ६० वर्षापासून वतनांवरील जप्ती उठून संपूर्ण वतनाचा ताबा व तेव्हांपासून सांपत्तिक भरभराटीस आरंभ. वयाचे ३६ वे वर्षी द्वितीय विवाह. तो झाल्यानंतर दोन्ही कुंटुंबांस संतति होऊन मृत होण्याचा योग.

ज्योतिषशास्त्रदृष्ट्या विवेचन—तनुस्थानीं राहुशुक्र असल्यानें अशक्त. भार्यास्थानीं शनिचंद्र केतु असल्यानें भार्यासौख्यांत विघ्न व द्विभार्यायोग. अष्टमस्थानीं गुरु असल्यानें आकस्मिक लाभ, दत्तकयोग. एकादशांत रवि असल्यानें राजसन्मान व सरकारांतून उत्पन्न, व्ययस्थानीं मंगळबुध असल्यानें राजदंड व अनिश्चित खर्च.

कुंडलीक्रमांक ९९

शके १८११ कार्तिक शुद्ध १४ रात्रौ ८ वाजतां

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

आयुष्यांतील गोष्टी—जन्म उत्तम स्थितींत. जन्मत पीडा, त्यानतर पाठीवर बहीण होऊन तिचा मृत्यु; नंतर उपनयन. मराठी शिक्षण वगैरे होऊन वयाचे १३ वे वर्षी विवाह. मराठी शिक्षण संपल्यावर ६ महिनेपर्यंत शिक्षकाचा धंदा, त्यानंतर ५।६ वर्षेपर्यंत भयंकर शारिरीक

पीडा उद्भवून औषधोपचारानंतर आरोग्य. १९ वे वर्षी प्रथम कन्या रत्न जन्म २४ वे वर्षी पुन्हां सरकारी नोकरी तिच्यांत बढती व स्वतंत्रता. वयाचे ३१ वे वर्षी वडील बंधु वारल्यामुळें नोकरी सोडून त्यांचे पूर्व व्यवसायास सुरुवात. वयाचे २८ वे वर्षी पितृवियोग.

ज्यो. वि —शरीर उंच व सडपातळ, कारण वृषभलग्न. द्वितीयस्थानीं गुरु दृष्टीनें धनसंचय चतुर्थांत शनि असल्यानें मातृसुख व पूर्वार्जित इस्टेट पुष्कळ, पंचमांत मंगळ-शुक्र असल्यानें विशेषत शुक्रामुळें कन्यासंतति जास्त, पुत्रलाभ उशीरा होण्याचा योग. षष्ठांत बुध सूर्य असल्यानें शत्रुत्व करणारे लोक पुष्कळ पण निरुपयोगी मातुलसौख्य चांगलें, घराणें प्रसिद्ध. अष्टमस्थानीं केतु गुरु असल्यानें दीर्घायुषी, आकस्मिक लाभ द्वादशांत चंद्र असल्यानें राजसन्मान व मितव्ययी.

कुंडलीक्रमांक १००

शके १८०६ श्रावण व॥ १० सकाळीं ८ वाजतां.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

जन्म उत्तम स्थितींत, शरीर निरोगी मराठी शिक्षण साधारण वयाचे १३ वे वर्षी लग्न. १७ वे वर्षी परीक्षेत अपयश पुढें २ वर्षे सुद्धां परीक्षेत यश नाहींच. पुढें कांहीं दिवस उमेदवारी नंतर १९ वे वर्षी कायम नोकरीस आरंभ नोकरी स्वतंत्र व मुखत्यारगिरीची नोकरीत असतांना खासगी द्रव्यलाभ विशेष नोकरी लागण्यापूर्वी मध्यंतरी आजार महत्वाचा होऊन ४।६ महिने औषधोपचारानंतर आरोग्यप्राप्ति मधून मधून अंतर्गळासारखी व्यथा. वयाचे ३१ वे वर्षापासून नोकरीतून मुक्तता नंतर १।२ वर्षे स्वतंत्रपणें घरीं बसून ३५ वे वर्षापासून शेती बागाईत करण्यास आरंभ व त्यांत साधारण लाभ

ज्यो वि —तनुस्थानीं बुध असल्यानें शरीर प्रफुल्लित व निरोगी सुगंध प्रिय धनस्थानीं राहु असल्यानें धनसंचय साधारण अष्टमांत केतु असल्यानें दीर्घायुषी. नवमांत शनि असल्यानें भाग्यवृद्धि व तीर्थयात्रा, प्रवासयोग दशमांत मंगळ व चंद्र असल्यानें राजसन्मान, उद्योगप्रियता, स्वतंत्र धंद्यांत यश. एकादशस्थानीं गुरु असल्यानें द्रव्य मिळवितांना न्यायबुद्धि जागृत व सन्मार्गानें द्रव्यलाभ व राजसन्मान. द्वादशांत रविबुध असल्यानें प्रसंगोपात फाजील खर्च क्वचित कंजूषपणा.

कुंडलीक्रमांक १०१

शके १७९५ चैत्र शुद्ध ३ सूर्यास्तादगतघटि १ प ५

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

जन्मतः साधारण मध्यम स्थिति. मराठी शिक्षण होऊन शिक्षकाची नोकरी. ती सुटून वतनाचे गांवाचीं वहिवाट व तेव्हांपासून भरमराटीस प्रारंभ. १८ वें वर्षीं प्रथम विवाह, स्त्री कायमची रोगी. वयाचे ३० वर्षापासून स्थावर इस्टेट मिळविणेस प्रारंभ. वयाचे ४० वे वर्षी संतती करितां द्वितीय विवाह. पुढें ४ वर्षानंतर पुत्र होऊन त्याचा व द्वितीय भार्येचा मृत्यु. नंतर वयाचे ४९ वे वर्षी पुन्हां तृतीय विवाह. १ वर्षानें मुलगा होऊन त्याचा १ वर्षाचे आंतच मृत्यु. वयाचे ४० वर्षापावेतों चा काळ बाहेरख्यालीपणांत गेला. त्यांत द्रव्याचा व्यय फार.

ज्यो. वि.—शरीरसंपत्ति उत्तम. धनसंचय, स्थावरलाभ, विद्या अल्प, अधिकारयोग विशेष. बहुभार्यायोग; दीर्घायुष्य, आकस्मिक लाभ, धर्मश्रद्धा कमी, नीति अनीति दोन्ही मार्गानीं द्रव्यसंपादन व तसाच व्यय.

### कुंडलीक्रमांक १०२

शके १७९५ चैत्र व. १३ सूर्योदयातगतघटी ३, पळें १०.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

जन्म उत्तम स्थितींत वयाचे २५ वे वर्षापावेतों निष्काळजीपणा व सुखोपभोगांत काळ गेला. लग्न लहानपणींच झालें. शिक्षण कमी. २५ वर्षानंतर स्वतंत्र धंदा करून त्यांत नुकसान. वयाचे ३५ वे वर्षी पितृवियोग. ४० वे वर्षी मातृवियोग. ४२ वे वर्षी धाकटा बंधु वारला. पुढें परिस्थिति बदलून नीच सेवा, भिक्षुकवृत्तीचा स्वीकार, तथापि मनावर परिणाम नाहीं. जवळ जवळ १०–१२ आपत्त्यें होऊन सर्वांचा नाश.

ज्यो. वि.—शरीरसौख्य उत्तम. वडीलार्जित इस्टेट पुष्कळ; परंतु गमाविली. भार्यासौख्य अल्प, पटत नाहीं ( कलह ). धर्मश्रद्धा कमी. परक्यांबरोबर तीर्थयात्रा व प्रवासयोग. आजपर्यंत अनेक वेळां नोकरी वगैरे मिळूनहि टिकत नाहीं.

कुंडलीक्रमांक १०३

शके १८२५ आषाढ वा॥ १२ दिवसां ११॥ वाजतां जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

जन्म उत्तम स्थितींत. लहानपणापासून निरोगी. वयाचे १० वे वर्षी दत्तकयोग व नंतर उपनयन. १२ वे वर्षी दत्तक पित्याचा मृत्यु. नंतर इंग्रजी शिक्षणास आरंभ. वडील वारतांच आईनें सर्व रोकड वगैरे घेऊन भावाकडे वास्तव्य केलें. १८ वे वर्षी विवाह व शिक्षणसमाप्ति. घरीं राहून पाटिलकीचें वतन काम पाहणें व जनक पित्याचा मृत्यु, विवाहाचे वेळीं आईशीं सख्य व तिची मदत व पुन्हां लगेच विरोध.

ज्यो. वि.—जन्मस्थ मंगळ राहु असल्यानें शरीर काटक. पंचमांत शनि असून रविदृष्ट असल्यानें विद्येंत अपयश. स्त्रीसंततियोग अधिक. सप्तमांत गुरु असल्यानें भार्या उत्तम. नवमांतील चंद्र दूरदूरचे प्रवास, तीर्थयात्रा घडवणार. एकादशांत रवि बुध असल्यानें राजसन्मान व स्वतंत्र धंद्यांत यश, व्ययस्थानी शुक्र असल्यानें जपून खर्च.

कुंडलीक्रमांक १०४

शके १८२४ मार्गशीर्ष शु. १२ सूर्योदयात् गत घ. २ जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

जन्म उत्तम स्थितींत, जन्मतः नेत्रविकार. नंतर ३ वर्षांनीं चुलत्याचा मृत्यु. नंतर ८वे वर्षी उपनयन. १०वे वर्षी पितृनाश. १६वे वर्षी विवाह. त्या वेळीं बहीण व आत्याचा मृत्यु. त्यापूर्वी पुन्हां एका बहिणीचा मृत्यु. मराठी शिक्षण साधारण. पुढें घरीं याज्ञिकी शिकून संस्कृताकरितां इंदोरीं गमन.

ज्यो. वि०—तनुस्थानीं बुध, शुक्र, रवि असल्यानें शरीरास नेहमीं किरकोळ पीडा. तृतीयस्थानीं शनि, गुरु असल्यानें कनिष्ट बंधूंचें सौख्य व पराक्रमाची आवड. पंचमांत केतु असल्यानें विद्येंत अपयश. आयस्थानीं मंगळराहु असल्यानें ब्राह्मणेतर मंडळीकडून द्रव्यलाभ विशेष.

### कुंडलीक्रमांक १०५

शके १८०२ कार्तिक शु. १४ रात्रीं ७ वाजतां जन्म.

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

जन्म उत्तम स्थितींत. ३ रे वर्षी पितृनाश, कर्जाचा बोजा फार. परंतु वडिलार्जित इस्टेटी-मुळें २५।३० वर्षांनीं मुक्तता. मराठी शिक्षण पूर्ण. प्रथम विवाह १३ वे वर्षी. १८ वे वर्षा-पासून सरकारी नोकरी. सहासात वर्षे नोकरी करून सोडिली. नंतर घरीं शेती करण्यास प्रारंभ, पण फायदा न दिसल्यामुळें ती खंडानें देऊन मक्त्याचा वगैरे व्यापार केला, परंतु त्यांतही विशेष लाभ नाहीं. वडिलार्जित इस्टेटीची विक्री करून कर्जाची भरपाई. वयाचे तिसावे वर्षी प्रथम पत्नीचा मृत्यु व लागलीच द्वितीय विवाह. प्रथम पत्नीची एक मुलगी हयात. पस्तीसावे वर्षी मुलगा होऊन वारला. चाळीसावे वर्षी दुसरा मुलगा झाला. जन्मापासून नेत्रविकार, वैद्यकविषय व जारणमारणादि क्रियांची आवड.

ज्यो. वि०:—तनुस्थानीं केतु असल्यानें कृष्ण वर्ण, शरीरास किरकोळ आजार. चतुर्थांत शुक्र असल्यानें मातृसुख उत्तम व वडिलार्जित इस्टेट पुष्कळ. षष्ठस्थानीं रवि असल्यानें शत्रूचा नाश व मातुलसुख उत्तम. सप्तमांत राहु म्हणून द्विभार्यायोग. नवमांत गुरु धर्मश्रद्धा, तीर्थयात्रा, प्रवासयोग दर्शवितो. दशमांत शनि असल्यानें कर्तृत्वांत मंदपणा व राजसन्मान. पितृसुख अल्प. एकादशांत मंगळ स्वगृहींचा इतर धंद्यापेक्षां शेतींत फायदा अधिक दर्शवितो. द्वादशांत चंद्र असल्यानें सन्मार्गानें व्यय. निर्व्यसनी.

कुंडलीक्रमांक १०६

शके १८१४ पौष शु. ८ सूर्योदयात् गत घ ७ प. ५.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

दुसरे वर्षी आई वारली. आठरावे वर्षी वडील वारले. एकदर भाऊ दोन, ते जन्मापूर्वी मयत तीन वडील बहिणी सर्व ह्यात तेरावे वर्षी लग्न झालें. सतती एकदर नऊ, ह्यात सात मुलगे दोन, मुली ५, वर्षे २ ते ७ यकृत, नायटे व प्रकृति अत्यत क्षीण. २३ वे वर्षी फौजदारी खटले २ झाले. पण निर्दोषी ठरून मुक्त झालो सर्व शिक्षण एकंदर ४ वर्षांत झालें. मराठी इयत्ता ७ व इग्रजी इयत्ता ३. हल्लीं सांपत्तिक स्थिति वार्षिक जमिनीचें उत्पन्न ३००, व नौकरी रेव्हेन्यूखात्यांत सरकल इन्स्पेक्टर.

याप्रमाणें आयुष्यांत घडलेल्या गोष्टी आहेत. आतां यांपैकीं कांहींचे ग्रहयोगदृष्ट्या विवेचन खालीलप्रमाणें —

लग्नेश शनीशीं कालनिर्णय भाग १ प्रमाणें चतुर्थेश मगळ चतुर्थस्थानांतून षडाष्टकयोग करीत आहे. तसेंच मातृकारक चद्र मगळानें पीडित, यामुळें मातृशोक.

कालनिर्णय भाग १ या रीतीनें पाहतां पितृकारक रवि ज्या वेळीं पितृकारक राशि मकर व पितृस्थानीं प्रतियोग व पितृकारक दशमेश शुक्र याचें लग्नेशाशीं षडाष्टक असे पितृकारकाशीं अनिष्टयोग झाल्यानें पितृशोक

तृतीयस्थानीं अनिष्ट मगळ असल्यानें पाठीवर भावड नाहीं. या पद्धतीनें सप्तमेश चद्र हा विवाहकारक शुक्राशीं व पचमेश शुक्र भाग्येश बुधाशीं व लग्नेशाशीं शुभयोग करता झाला, त्या वेळीं विवाह झाला पचमस्थानीं स्त्री-राशि असून शुक्राची पूर्ण दृष्टि व सततिकारक गुरु, यांचा जन्मकाळीं शुभयोग झाल्यानें व यांत स्त्रीग्रहाचा जास्त सबध यामुळें स्त्री सतति जास्त. याप्रमाणेंच विद्येचा विचार करतां विद्या जरी कमी असली तरी सदर इसम हे बुद्धीनें चागले आहेत.

ह्या कुडलींतील लग्नेश भाग्यस्थानीं आणि सप्तमेश व चतुर्थेश तृतीयस्थानीं असून ह्या सर्वांचा एकमेकांशीं प्रतियोग ही गोष्ट ह्या कुडलींत विशेष महत्वाची आहे.

कुंडलीक्रमांक १०७

जन्मवेळः—शके १८०६ चैत्र शु. १४ सूर्योदयानंतर सुमारें १५ मिनिटांनीं.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

१८१५ पौष शु. ११ वडील मयत. १८२२ माघ व. १२ आई मयत. १८२८ माघ व. १४ मुलगी झाली, ती मयत. १८३२ श्रावण शु. ५ मुलगा झाला, तो दोन वर्षांनीं मयत झाला. १८३२ सालांत जमीन खरेदी. १८३६ माघ वद्य ११ ला मुलगी झाली, ती मयत. १८३६ सालांत दाव्याचा निकाल विरुद्ध. १८३९ मार्ग व. १४ मुलगी झाली, ती हयात आहे. १८४३ सालीं मुलगा झाला, तो मयत.

येणेंप्रमाणें आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी झाल्या. आतां यांच्यासंबंधीं ग्रह योगदृष्ट्या विचार करावयाचा तो पुढीलप्रमाणें:—

च. रवि षडाष्टक, दशमेश च शनि व ज. शनि च. रवि षडाष्टक ज. मं. व ज. गु. च. रवि केंद्र जन्मस्थ राहू.

याप्रमाणें कालनिर्णय १ प्रमाणें पितृकारक रवीशीं दशमेश शनि व मंगळ व राहूशीं अनिष्टयोग अंशात्मक ज्या वेळीं झाले त्या वेळीं वडिलांचा मृत्यु.

गोचरीनें पाहतां सप्तमस्थानीं गोचरीच्या शनीची जन्मस्थ राहूशीं युति व पितृकारक रवीशी षडाष्टक करीत असून जन्मस्थ शनीशीं षडाष्टकयोग होतो यामुळें पितृनाश झाला.

आईच्या मरणसमयीं गोचरीचे ग्रह पुढीलप्रमाणें होते:—

रवि कुंभेंत, मंगळ कर्केत, बुध मकरेंत, गुरुशनि धनेंत, शुक्र मकरेंत, चंद्र मकरेंत. गोचर मंगळ चतुर्थांत नीचीचा असून शनि गुरूशीं षडाष्टक करीत आहे, व तो मंगळ अष्टमेश असून चतुर्थेश चंद्रावर पूर्ण दृष्टि आहे. तशीच कुटुंबेश–मारकेश शुक्रावरही दृष्टि आहे. यामुळें आईचा मृत्यु. कालनिर्णयपद्धतीनें विचार केल्यास चतुर्थेश (चलित) सप्तमस्थानीं राहूशीं युति करून च. मंगळ कुटुंबस्थानीं शुक्र शनीशीं युति, चलित चंद्राशीं षडाष्टक असे पापयोग होतात, म्हणून मातृनाश झाला.

बुद्धिदायक गुरु व रवि हे ग्रह चांगले असून दोन्ही उंचीचे आहेत. मात्र पंचमेश रवीशीं केतूचा युतियोग व राहूचा प्रतियोग होत आहे. याचा परिणाम असा आहे कीं, शिरा-वर प्रापंचिक जबाबदारी पडून विद्या अपूर्ण राहिली. मात्र बुद्धीनें इसम हुशार. संततीबद्दल बोला-

कुंडलीक्रमांक १०६

शके १८१४ पौष शु. ८ सूर्योदयात् गत घ. ७ प. ५.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

दुसरे वर्षी आई वारली. आठरावे वर्षी वडील वारले. एकंदर माऊ दोन, ते जन्मापूर्वी मयत. तीन वडील बहिणी सर्व हयात. तेरावे वर्षी लग्न झालें. संतती एकंदर नऊ, हयात सात मुलगे दोन, मुली ५, वर्ष २ ते ७ यकृत, नायटे व प्रकृति अत्यंत क्षीण. २३ वे वर्षी फौजदारी खटले २ झाले. पण निर्दोषी ठरून मुक्त झालों. सर्व शिक्षण एकंदर ४ वर्षांत झालें. मराठी इयत्ता ७ व इंग्रजी इयत्ता ३. हल्लीं सांपत्तिक स्थिति वार्षिक जमिनीचें उत्पन्न ३००, व नौकरी रेव्हेन्यूखात्यांत सरकल इन्स्पेक्टर.

याप्रमाणें आयुष्यांत घडलेल्या गोष्टी आहेत. आतां यांपैकीं कांहींचे ग्रहयोगद्वारा विवेचन खालीलप्रमाणें —

लग्नेश-शनीशीं कालनिर्णय भाग १ प्रमाणें चतुर्थेश मंगळ चतुर्थस्थानांतून षडाष्टकयोग करीत आहे. तसेंच मातृकारक चंद्र मंगळानें पीडित, यामुळें मातृशोक.

कालनिर्णय भाग १ या रीतीनें पाहतां पितृकारक रवि ज्या वेळीं पितृकारक राशि मकर व पितृस्थानीं प्रतियोग व पितृकारक दशमेश शुक्र याचें लग्नेशाशीं षडाष्टक असे पितृकारकाशीं अनिष्टयोग झाल्यानें पितृशोक.

तृतीयस्थानीं अनिष्ट मंगळ असल्यानें पाठीवर भावंड नाहीं. या पद्धतीनें सप्तमेश चंद्र हा विवाहकारक शुक्राशीं व पंचमेश शुक्र भाग्येश बुधाशीं व लग्नेशाशीं शुभयोग करता झाला, त्या वेळीं विवाह झाला. पंचमस्थानीं स्त्री-राशि असून शुक्राची पूर्ण दृष्टि व संततिकारक गुरु, यांचा जन्मकाळीं शुभयोग झाल्यानें व यांत स्त्रीग्रहाचा जास्त संबंध यामुळें स्त्री-संतति जास्त. याप्रमाणेंच विद्येचा विचार करतां विद्या जरी कमी असली तरी सदर इसम हें बुद्धीनें चांगले आहेत.

ह्या कुंडलीतील लग्नेश भाग्यस्थानीं आणि सप्तमेश व चतुर्थेश तृतीयस्थानीं असून ह्या सर्वांचा एकमेकांशीं प्रतियोग ही गोष्ट ह्या कुंडलीत विशेष महत्वाची आहे.

मातृकष्ट—चतुर्थेश बुध व मातृकारक चंद्र यांचा नवपंचमयोग व चतुर्थस्थानीं भाग्येश शनि व पंचमेश शुक्र हे युतीत असून लग्नेश, चतुर्थेश यांच्या उच्च राशींत असून गुरु या शुभ ग्रहानें दृष्ट व त्रिकोणयोग होत आहे. यामुळें मातृसौख्य आहे. मात्र चंद्राशीं राहूचा ग्रहणयोग अष्टमेश शनि व षष्ठेस मंगळ या अशुभ ग्रहांची दृष्टी यामुळें तिला जन्मवेळीं कष्ट अतिशय झाले, मात्र शुभ ग्रहांच्या त्रिकोणयोगामुळें नाश झाला नाहीं.

विद्यायोग—रवि व गुरु यांशीं लग्नेश बुध व पंचमेश शुक्र यांचा विशेष अनिष्टयोग नाहीं, मध्यम तऱ्हेचा शुभयोग आहे व त्याप्रमाणें विद्याही मध्यम प्रमाणांतच आहे, गुरुशीं पंचमेश शुक्र व भाग्येश शनि यांचा नवपंचम व लग्नेश बुधाशीं त्रिरेकादशयोग आहे. यामुळें विद्या मराठी सात इयत्ता पूर्ण व इंग्रजी शिक्षण मॅट्रिकपर्यंत झालें, शिक्षण पूर्ण झालें नाहीं, याचे कारण विद्याकारक ग्रह विशेष बलिष्ट नाहींत, पंचमेश नीचीचा, यामुळें विद्या अपूर्ण.

संततियोग—पंचमस्थानावर कोणत्याही पापग्रहाची दृष्टि नाहीं, पंचमेशाशीं लग्नेश बुध व गुरु यांचा शुभसंबंध आहे; यास्तव संतति योग दिसतात. पण हे योग जन्मापूर्वीच होऊन. गेले आहेत. व पंचमेश नीचराशींत व लग्नेश शत्रुगृहीं यामुळें संततियोग विलंबानें. ज्या वेळीं जन्मांगचलित पद्धतीनें बुध पंचमेशाशीं शुभयोग त्या वेळीं संतति योगसंभव विवाह व स्त्रीसौख्य—सप्तमस्थानाशीं रविमंगळ या पापग्रहांचा शुभसंबंध असल्यानें विवाहयोग २९ वे वर्षी आला. शुक्राशीं शनीचा योग असल्यानें व त्यावर गुरूची शुभदृष्टि आहे यामुळें स्त्रीसौख्य अखेरपर्यंत राहणार. नोकरीयोग—दशमाशीं राहूचा योग, त्यावर शनीची दृष्टि व राहूशनीचा गुरूशीं (दशमेशाशीं शुभयोग झाल्यानें उपजीविका नोकरीवर होण्याचा योग आहे व त्याप्रमाणें हल्लीं नोकरीतच आहे. कुंडलींत रवि फार बलवान असल्यानें भाग्योदय वयाच्या २२ वे वर्षापासून झाला.

कुंडलीक्रमांक १०९

शके १८०६ माघ कृष्ण १४ सायंकाळीं ५ वाजतां जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

वयाचे ४ थे वर्षी एडक्यावरून पडल्यामुळें डोक्यास थोडी इजा. १९०१ प्रथम विवाह, १९०३ पत्नीचें निधन, १९०३ द्वितीय विवाह, १९०६ द्वितीय पत्नीचें निधन, १९०६ इंग्लिश मॅट्रिकपर्यंत, नंतर २ वर्षे कांहीं उद्योग नाहीं, १९०८ ते १९११ मेडिकल कोर्स

वयाचे झालें तर लग्नेश मंगळ याच्याशीं गुरु युति करितो, पण मंगळ लग्नेश व अष्टमेश असून नीचीचा व बुधाशीं केंद्रयोग याचा परिणाम गुरूनें दिलेली संतती मंगळ व बुध आपल्या अधिकारांत नाश करितात, यामुळें पुत्रसौख्य नाहीं.

कुंडलीक्रमांक १०८

शके १८१५ श्रावण कृष्ण ३ बुधवार सूर्योदयात्गत घ. ५१ प. ४ नंतर जन्म.

जन्मकुंडली

स्पष्ट ग्रह

| र. | चं. | मं. | बु. | गु. | शु. | श. | रा. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ४ | ११ | ४ | ४ | १ | ५ | ५ | ५ |
| १४ | २८ | १५ | ० | ८ | १७ | २१ | २९ |
| ५९ | ५० | ५० | ५० | ४५ | २७ | ५५ | २३ |
| ४८ | ४६ | ५२ | २० | ५९ | ४८ | २ | ४२ |

स्पष्ट भाव

| प्र. | द्वि. | तृ. | च. | पं. | ष. | स. | अ. | न. | द. | ए. | द्वा. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | ० | १ |
| २७ | २७ | २६ | २६ | २६ | २७ | २७ | २७ | २६ | २६ | २६ | २७ |
| २५ | १० | ५६ | ४१ | ५६ | १० | २५ | १० | ५६ | ४१ | ५६ | १० |
| ३५ | ५२ | ९ | २६ | ९ | ५२ | ३५ | ५२ | ९ | २६ | ९ | ५२ |

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

प्रथमतः कांहीं महत्त्वाच्या गोष्टी ( घडलेल्या ) देऊन त्यांचा ग्रहयोगदृष्ट्या विचार करण्यांत येत आहे.

पितृनाश—शके १८१५ वैशाख कृष्णपक्षांत तिथि ८. दशमेश गुरु याचा नै. पितृकारक राशि मकर ही अष्टमांत असून तिच्याशीं गुरूचा अशामक केंद्रयोग होऊन गेला व पितृकारक ग्रहरवीशींही गुरुचा केंद्रयोग जन्मापूर्वींच झाला व रवी हा लग्नेश व भाग्येश यांच्या कर्तरींत आहे, यामुळें व जन्मतः दशमस्थानीं राहुचंद्र यांचा ग्रहयोग झाला असून त्यावर शनि व मंगळ या पापग्रहांची अशुभ दृष्टि या कारणानें पितृनाश जन्मापूर्वींच दोन तीन महिने झाला.

मातृकष्ट—चतुर्थेश बुध व मातृकारक चंद्र यांचा नवपंचमयोग व चतुर्थस्थानीं भाग्येश शनि व पंचमेश शुक्र हे युतीत असून लग्नेश, चतुर्थेश यांच्या उच्च राशींत असून गुरु या शुभ ग्रहानें दृष्ट व त्रिकोणयोग होत आहे. यामुळें मातृसौख्य आहे. मात्र चंद्राशीं राहूचा ग्रहणयोग अष्टमेश शनि व षष्ठेस मंगळ या अशुभ ग्रहांची दृष्टी यामुळें तिला जन्मवेळीं कष्ट अतिशय झाले, मात्र शुभ ग्रहांच्या त्रिकोणयोगामुळें नाश झाला नाहीं.

विद्यायोग—रवि व गुरु यांशीं लग्नेश बुध व पंचमेश शुक्र यांचा विशेष अनिष्टयोग नाहीं, मध्यम तऱ्हेचा शुभयोग आहे व त्याप्रमाणें विद्याही मध्यम प्रमाणांतच आहे, गुरुशीं पंचमेश शुक्र व भाग्येश शनि यांचा नवपंचम व लग्नेश बुधाशीं त्रिरेकादशयोग आहे. यामुळें विद्या मराठी सात इयत्ता पूर्ण व इंग्रजी शिक्षण मॅट्रिकपर्यंत झालें, शिक्षण पूर्ण झालें नाहीं, याचें कारण विद्याकारक ग्रह विशेष बलिष्ट नाहींत, पंचमेश नीचीचा, यामुळें विद्या अपूर्ण.

संततियोग—पंचमस्थानावर कोणत्याही पापग्रहाची दृष्टि नाहीं, पंचमेशाशीं लग्नेश बुध व गुरु यांचा शुभसंबंध आहे; यास्तव संतति योग दिसतात. पण हे योग जन्मापूर्वीच होऊन गेले आहेत. व पंचमेश नीचराशींत व लग्नेश शत्रुगृही यामुळें संततियोग विलंबानें. ज्या वेळीं जन्मांगचलित पद्धतीनें बुध पंचमेशाशीं शुभयोग त्या वेळीं संतति योगसंभव विवाह व स्त्रीसौख्य—सप्तमस्थानाशीं रविमंगळ या पापग्रहांचा शुभसंबंध असल्यानें विवाहयोग २९ वे वर्षी आला. शुक्राशीं शनीचा योग असल्यानें व त्यावर गुरूची शुभदृष्टि आहे यामुळें स्त्रीसौख्य अखेरपर्यंत राहणार. नोकरीयोग—दशमाशीं राहूचा योग, त्यावर शनीची दृष्टि व राहूशनीचा गुरूशीं (दशमेशाशीं शुभयोग झाल्यानें उपजीविका नोकरीवर होण्याचा योग आहे व त्याप्रमाणें हल्लीं नोकरीतच आहे. कुंडलींत रवि फार बलवान असल्यानें भाग्योदय वयाच्या २२ वे वर्षापासून झाला.

कुंडलीक्रमांक १०९

शके १८०६ माघ कृष्ण १४ सायंकाळीं ५ वाजतां जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

वयाचे ४ थे वर्षी एडक्यावरून पडल्यामुळें डोक्यास थोडी इजा. १९०१ प्रथम विवाह, १९०३ पत्नीचें निधन, १९०३ द्वितीय विवाह, १९०६ द्वितीय पत्नीचें निधन, १९०६ इंग्लिश मॅट्रिकपर्यंत, नंतर २ वर्षे कांहीं उद्योग नाहीं, १९०८ ते १९११ मेडिकल कोर्स

शके १८१४ गुरूची सप्तमावर पूर्ण दृष्टि आहे व सप्तम पापदृष्टिरहित आहे, यामुळें लवकर विवाह घडला. या वर्षीं गुरु ५ वा, शुक्र व शनि दहावा, हे सर्व ग्रह शुभ व अनुकूल होते, सप्तमाधिपति रवि लाभस्थानीं जाऊन तेथून जायास्थानाशीं त्रिकोणयोग करूं लागला म्हणून याच वर्षी विवाह घडला. १८२३ दशमाधिपति मंगळ दशमस्थानी आला व त्याच वेळीं लाभाधिपति व धनाधिपति हा लाभस्थानी आला, हा दशमाच्या धनस्थानीं आला, त्या वेळीं नोकरीचा योग आला. १८२३ रवि मंगळ लग्नी येऊन दशमाशी केंद्रयोग करूं लागले व त्याच वेळीं इतर ग्रहही शुभ नव्हते, म्हणून पितृवियोग झाला. १८२८ गुरु पंचमस्थानीं व शुक्र नवमस्थानी येऊन एकमेकाशीं त्रिकोणयोग करूं लागले, यामुळें बढती मिळाली. १८३४ गुरु दशमभावी आला व शुक्र नवमभावी आला म्हणून बढती. १८३६ पुनः शुक्र नवमभावी स्वगृहीं येऊन बलवान झाला. १८३८ बुध धनुमध्यें व शुक्र तूळेमध्यें आल्यावेळीं इन्स्पेक्टरची परीक्षा पास झाली. १८४० शुक्र धनुराशीस व बुध वृश्चिकेस आल्यावेळीं इन्स्पेक्टर कायम. कुंडलीमध्यें अतिशय उच्चस्थिती दाखविणारा असा योग नाहीं.

कुंडलीक्रमांक १११

शके १८०७ भाद्रपद व॥ ९ सूर्योदयात्गत घ. २७ प.० जन्म कारवारजवळ.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

सन १९०२ विवाह, १९०४ नौकरी, १९०६ अपमृत्यु टळला, १९०७ अनिष्ट काल, २।१०।१९०८ प्रथम संतति कन्या, १८।४।१९११ कन्या, १९१४ संतति मयत, १४।२।१९१६ पुत्र, १९१९ पुत्र, १।७।१९२१ कन्या, २५।४।१९२४ पुत्र,१५।११।२२ वडील मयत, सांपत्तिक स्थिति मध्यम, १ बंधू, २ बहिणी व मातोश्री हयात, २ बहिणी मृत, श्वशुर हयात आहेत.

गोचरीच्या शुक्राचा लग्नामधून जायास्थानाशीं प्रतियोग व नवमांशीं त्रिकोण झाला, व शनि लाभस्थानांतून जायास्थानाशीं त्रिकोण करूं लागला, त्याच वेळीं विवाह झाला, या वेळीं रवि शनि एकत्र होते. दशमेश धनस्थानीं गेला व शनि व्ययस्थानीं जाऊन दशमाशी व दशमेशाशीं त्रिरेकादशयोग करूं लागला, याच वेळीं नोकरी मिळाली. राहु षष्ठस्थानी आला व चंद्र-शनीचा त्या ठिकाणाशीं षडाष्टकयोग होऊं लागला, परंतु बुध-शुक्र त्या वेळीं शुभ होते, या

योगानें अपमृत्यु टळला, शनि आठवा होता, तो काल अनिष्ट असा गेला. पंचमाधिपति नवमस्थानीं जाऊन पंचमाशीं त्रिकोण व नवमाधिपतीशीं त्रिरेकादशयोग करूं लागला, या वेळीं कन्यासंतति, पंचमाधिपति व नवमाधिपति तृतीयस्थानांतून पंचमाशीं त्रिरेकादशयोग करूं लागलें, या वेळीं कन्यासंतति झाली. रवि बुधाचा पंचमाशीं लग्नातून त्रिकोणयोग झाल्यावेळीं पुत्रसंतति झाली. रविबुधयोग पंचमामध्येंच झाल्यावेळीं पुत्रसतति. बुध शुक्र जायास्थानांतून पंचमाशीं त्रिरेकादशयोग करूं लागले, त्या वेळीं कन्यासंतति झाली. रविबुधाचा तृतीयस्थानांतून पंचमाशीं त्रिरेकादशयोग झाल्यावेळीं पुत्रसंतति.

कुंडलीक्रमांक ११२

शके १७८७ कार्तिक शु. १ रात्रौ जन्म घ. १३ प. ५० जन्म कारवार येथें.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

वय वर्षे २० पासून वकीली ३ वर्षे. पूर्वी शिक्षण चालू असतांना शिक्षकाचें काम. २३ वर्षांपासून नौकरी सबजज्ज. भार्या ३ दोन मयत. १९०० दुसरी मयत. त्याचे पूर्वी १०।१२ वर्षे पहिली मयत. पुत्रसंतती १०. कन्या ४, बंधु ४, बहीण १. १८९४ मध्यें वडिलांचें निधन. १९२० पेनशन. ५८ व्या वर्षी मृत्यु. कुंडलींत गुरुमंगळ राजयोग करणारे ग्रह आहेत, शुभ ग्रह गुरु चंद्र बुध आहेत. शनि उच्चीचा आहे. गुरु, राहु, केतु बलवान आहेत. विद्याकारक ग्रह गुरु व पंचमेश मंगळ यांचा त्रिरेकादशयोग हा चांगला आहे, यामुळें विद्या पूर्ण झाली. दशमेश मंगळाची दृष्टि दशमावर आहे व तसेंच गुरूचीहीं दशमावर दृष्टि आहे, यामुळें मोठा अधिकार नौकरीत मिळाला व दिवसेंदिवस वाढ होत गेली. जायास्थानाशीं मंगळाचा केंद्रयोग आहे व जायाधिपतीही अशुभ आहे, यामुळें जास्त भार्यायोग झाला. संततिकारक ग्रह गुरु शुभ आहे व संततिस्थानीं अशुभ दृष्टि कोणाचीही नाहीं. यामुळें संततिसौख्य उत्तम मिळालें. १८९४ सालीं शनि चतुर्थस्थानीं पितृस्थानाशीं प्रतियोग करूं लागला. त्या वेळी वडीलांचा मृत्यु. कन्याराशीला शनि आल्यावेळीं साडेसातींत याचा अंत झाला.

कुंडलीक्रमांक ११३

शके १८२६ पौष व॥ ८ सूर्योदयावगत घ. ११ प. २ जन्म.

(स्त्री) जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

विवाह शके १८३७ मार्गशीर्ष. पुत्रसतति शके १८३९ मार्गशीर्ष; कन्या शके १८४२ आषाढ. २ री कन्या शके १८४४ ज्येष्ठ. मातोश्री आहे. वडील १८४४ पौषमध्यें वारले. ४ मावंडांपैकीं २ बहिणी गेल्या. १ भाऊ व १ बहीण आहे. माहेरची गरिबी स्थिति. सासरचीही गरीब स्थिति. स्थावर जमीनजुमला कांहीं नाहीं. भ्रतारास सरकारी नौकरी. पगार १२५ दरमहा. या कुंडलींत रविगुरु राजयोगकारक ग्रह आहेत व ते केंद्री आहेत. म्हणून शुभ व बलवान् आहेत. शुक्र मीन राशींत बलवान् आहे पण तो मारक आहे. तसेच बुध तृतीय षष्ठाधिपति म्हणून अशुभ. लग्नेशाशीं चंद्राचा योग आहे पण तो पूर्ण नाहीं, म्हणून चंद्र पूर्ण बलवान् नाहीं. राहू केतू अशुभच. संततिस्थानीं राहू आहे. तो संततीस अडथळा करणारा आहे. पंचमेश बलवान असल्यामुळें सततिसौख्य आहे. सासू-सासऱ्यांचें सुख नाहीं. सप्तमस्थानेश व त्यांतील ग्रह यावरून पतीचा जोरदार उत्कर्ष नाहीं.

कुंडली क्रमांक ११४

शके १८१३ आश्विन कृ. ९ रात्रौ १ वाजतां जन्म

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

सातवे वर्षी देवीनें आजारी. १० वे वर्षी प्लेगनें आजारी. १९१२ मॅट्रिक पास. १९१३ पोस्ट खात्यांत नोकरी. १९१८ विवाह. शके १८३८ फेब्रुवारी बंधु मयत. शके १८३४ बहीण मयत. सन १९०३ सप्टेंबर वडील वारले. हल्लीं हयात असलेली मंडळी १ बंधु, १ मावशी, मातोश्री, मेहुणी. रवि व शनि अशुभ आहेत. गुरु कांहींसा अशुभ, पण बराचसा शुभ आहे. चंद्र

मंगळ शुभ आहेत. शनि चौथा असलेवेळीं गंडांतरें आली होती. ती शुभ मंगळामुळें टळली. शके १८३४ सालीं गुरु विद्यास्थानीं आल्यावेळीं परीक्षा पास झाली. १९१३ मध्यें शुक्र व मंगळ दशमस्थानीं आल्यावेळीं व गुरूची त्या स्थानावर दृष्टि असतांना नोकरी मिळाली. १९०३ मध्यें शनि मकरेस येऊन पितृस्थानाशीं केंद्रयोग करूं लागला व रवीचाही त्या स्थानाशीं षडाष्टक योग तृतीय स्थानांतून होऊं लागला. यावेळीं वडील वारले.

कुंडली क्रमांक ११५

शके १८०३ आश्विनवद्य ७ सूर्यास्तात्गतघ. ३३ प. ० जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

| | |
|---|---|
| शके १८०५ देवीनें आजारी. | १९०३ सप्टेंबर, वडील मयत. |
| ,, १८३८ फेब्रुवारी, बंधु मयत. | १८३४ बहीण मयत. |
| ,, १८३२ प्रथम संतती, कन्या. | १८३७ मुलगा मयत. |
| ,, १८३९ मुलगा मयत. | १८३९ आषाढ शु. १५ कन्या. |
| ,, १८४३ पौष, मुलगा झाला. | १८४५ कार्तिक, कन्या. |

सन १९०३ ते १९२० मे पहिली नोकरी. १९२० जूनपासून दुसरी नोकरी. शके १८३० ते १८४७ अनिष्ट काल. मातुलगृहींचें सौख्य शके १८२४ पासून संपलें. भावंड फक्त १; विवाह शके १८२७. रवि बुध व शुक्र याचा योग षष्ठस्थानीं झाल्यावेळीं देवीनें आजारी. वरीलप्रमाणें योग पुनः झाल्यावेळीं मामाचे घरचे सुख सपलें. गुरु लग्नातून जायास्थानाशीं दृष्टि-योग करूं लागला व रवि तृतीयस्थानातून जायास्थानाशीं त्रिकोणयोग करूं लागला यावेळीं विवाह घडला. शनि मंगळाचा योग दशमामध्यें झाल्यावेळीं पितृवियोग घडला. रवि, चंद्र, मंगळ, बुध व शुक्र यांचा योग पंचमस्थानीं झाला. त्या वेळीं स्त्रीग्रहांचें बळ जास्त झालेमुळें कन्यासंतति झाली. रवि बुधाचा नवमस्थानीं योग होऊन त्रिकोणयोग झाला ते वेळीं पुत्रसंतति. १८३० ते ३७ पर्यंत साडेसाती होती. हा काल अनिष्ट गेला.

जन्म कुंडलींत ज्यावेळीं गुरु बलवान असतो त्यावेळीं तो ऐश्वर्यकारक गोष्टींची वृद्धि व सांपत्तिक भरभराट होते. मात्र तो गुरु कुंडलींत कर्ता ग्रह पाहिजे.

कुंडलीक्रमांक ११६

शके १८१६ श्रावणवद्य ५ सूर्योदयात्गतघ. १५ प. ० जन्म कारवार येथें.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

सन १९११ शिक्षण सपलें शिक्षण बेताचेच १९१२ रेल्वेमध्यें नोकरी. १९१३ ते १९१९ फॉरेस्ट-डिपार्टमेंटमध्यें नोकरी. १९१४ पासून वातरोगाचा विकार. १९१६ डिसेंबर विवाह. १९१९ कन्यासतति प्रथम. १९२० दुसरी नोकरी. १९२१ पुत्रसतति. १९२३ मे वडीलांचा मृत्यु. मातृसुख वय वर्षे ७।८ पर्यंत. भगिनी सुख नाहीं. बंधुसुख चांगलें.

—सदर कुंडलींत गुरु, चंद्र व मंगळ शुभग्रह आहेत व ते अशुभस्थानीं आहेत. मंगळ स्वराशीमध्यें बलवान् आहे. रवि दशमांत बलवान आहे व शनि व्ययस्थानीं उच्चीचा आहे. विद्यास्थानाचा स्वामी गुरु अशुभस्थानी, राहु पापग्रह आहे यामुळें विद्यायोग बेताचाच, राहु तनुस्थानीं येऊन मातृस्थानाशीं केंद्रयोग करूं लागला, त्यावेळीं माता मृत झाली, व तोच राहू पितृस्थानाशीं प्रतियोग करूं लागला त्यावेळीं पितृसौख्य सपलें! भावडस्थानावर बुध शुक्राची शुभदृष्टी आहे, यामुळें भावडसौख्य चांगलें आहे. सांपत्तिक योगाला शनि शुक्र चांगले, ते तूळराशींत १९२३ मध्यें आले व त्या वेळींच नोकरीला जोडून आणखी एक उद्योग चालू झाला व त्या योगानें सांपत्तिक स्थिति सुधारली.

कुंडलीक्रमांक ११७

शके १८२२ पौष कृष्ण १२ सूर्योदयात्गत घ. ३७ प. ५९ जन्म कारवार.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

वयाचे १७ वे वर्षी शिक्षण संपलें. व त्याचवर्षी नोकरी. वयाचे ८ वे वर्षी वडील वारले. गंडांतर अजमासे १२ व्या वर्षी. मातोश्री व दोन बंधु हयात. सदर कुंडलींत गुरु मारकेश म्हणून अशुभ. तरी पण तो सुखस्थानीं स्वगृहीं आहे, त्यामुळें चांगला आहे. चंद्र लाभाधिपति असून शिवाय तो नीच राशींत आहे. यामुळें अशुभ. मंगळ ३।८ स्थानचा स्वामी असून शिवाय तो व्ययस्थानीं आहे. यामुळें अशुभ.

कुंडलीक्रमांक ११८

शके १८०७ श्रावण वद्य ६ सूर्योदयात्‌गत घ. २० प. ० जन्म कारवार येथें.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

वयाचे १६ वे वर्षी लग्न. १९१० विणकाम फॅक्टरी चालू केली. १९१३ नोकरी, त्याच वेळीं अपेंडिसायटीजनें आजारी, १९१४ वरील रोगाचे ऑपरेशन. १९१८ नोकरी. १९१८ बायकोचे निधन, संतति—२ पुत्र व १ कन्या. १९२३ वडिलांचा मृत्यु. आज धंदा विणकाम, प्रपंचाची जबाबदारी १९२३ पासून.

सदर कुंडलींत रवि मंगळ राजयोगकारक ग्रह आहेत. रवि भाग्यस्थानीं बलवान आहे. तसेच रवीचा व पंचमेश मंगळाचा त्रिरेकादश योगही शुभ आहे. त्याचप्रमाणें गुरु चंद्राचा त्रिकोणयोग झाला आहे राहू केतू ठीक आहेत. चंद्र, शुक्र व शनि ग्रह अशुभ आहेत. भाग्यस्थानीं रविबुधाचा योग चांगला झाला आहे व तेथेंच लग्नेश व सुखेश गुरु आहे. शनि अशुभ आहे व १९२३ सालीं तो पितृस्थानीं येऊन मूळच्या शनीशीं योग करूं लागला, त्या वेळीं वडील वारले. १९१३ सालीं शनि शुक्राची षष्ठस्थानांत युति झाली त्या वेळीं रोग उद्भवला.

कुंडलीक्रमांक ११९

शके १८१८ फाल्गुन वद्य ७ सूर्योदयापूर्वी घ. १ प. २८ बेळगांव जिल्ह्यांत जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

वयाचे ३।४ वर्षी वडिलांचा मृत्यु. नंतर १–१॥ वर्षांनीं जन्मभूमि सुटून बहीणीचे घरीं वास्तव्य. नंतर २ वर्षांनीं मराठी शिक्षणास प्रारंभ १९०८ ला मराठी शिक्षण संपलें व त्याच-वेळीं ग्वाल्हेरास इंग्लिश शिक्षणाकरितां गमन. १९१५ मार्चमध्ये मॅट्रिक नापास. व त्याचवेळीं मातोश्रीचा मृत्यु ( १९१४ भाद्रपद ) १९१५–१६ सालें अडचणींचीं गेलीं. १९१६ सालीं मिलिटरी खात्यांत नोकरी कारकुनाची, ती १९२० नवंबर पावेतो. नंतर ती नोकरी सुटली व १९२१ पासून एका सूत काढणेचे गिरणींत कारकून, अद्यापपावेतों चालू आहे. विवाह १० जून १९२२, सांपत्तिक स्थिति बेताचीच.

सदर कुंडलींत चंद्र मंगळ हे दोन ग्रह शुभ आहेत. रवि, बुध, शुक्र व शनि हे अशुभ आहेत. पंचमेश चंद्र दशमांत असून त्याच्यावर लग्नेशाची दृष्टि आहे ती चांगली आहे. विद्यास्थानीं पापग्रह आहे व त्याच्यावर पापग्रहाची दृष्टि आहे. यामुळें विद्या अपुरी झाली. रवि शुक्र चतुर्थांत येऊन पितृस्थानाशीं प्रतियोग करूं लागले व राहूही त्याच स्थानीं आला. या वेळीं पितृवियोग झाला. १९१६ त शनि मातृस्थानीं आल्या वेळीं माता गेली.

### कुंडली क्रमांक १२०

शके १८०४ भाद्रपद शु. १० रात्रौ घ. ४ प. ३० जन्म कारवार येथें.

जन्मकुंडली

| | | | |
|---|---|---|---|
| शके | | १२ | ११ |
| ३ | १ | १०चं | ९ |
| ४ | बु७शु | | |
| ५ | र६म | रा८ | |

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

मातृसुख वय वर्षे ५ पर्यंत, वयाच्या ३० वर्षांपर्यंत स्वतंत्रपणें उपजीविका नाहीं १००।१ मध्यें विषमानें आजारी. विवाह वयाचे १८ वे वर्षी. संतति—४ पुत्र, ५ कन्या, १९२३ वडिलांचें निधन. धंदा शिल्पकार. या कुंडलींत रवि गुरु राजयोगकारक ग्रह आहेत. पण ते कांहीं बलवान नाहींत, लग्नेश मंगळ हाही पण अशुभस्थानीं आहे व तो अष्टमेश असल्यानें अशुभ आहे. शुक्र मारक ग्रह आहे बुध अशुभ आहे राहू १८०९ मध्यें मातृस्थानाशीं योग करूं लागला, त्या वेळीं मातृसुख संपलें. धनस्थानीं शनि असल्यामुळें पैसा टिकत नाहीं.

### कुंडलीक्रमांक १२१

शके १८१८ आषाढ वद्य ९ रात्रौ १० ते १२ दरम्यान पुणें येथें.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

वयाचे १२।१३ वर्षी मातोश्री मयत. १९१७ शिक्षण सपलें. १९१८ फाल्गुन विवाह—१९१९ श्रावण वडील मयत. एक सखे बधु, एक सावत्र माता, एक चुलता, एक आत्या, एक मामा, इतकी मडळी हयात आहेत १९१७ नोकरी वयाचे १५।१६ वें वर्षी गंडांतर, १८४५ फाल्गुन प्रथम सतति कन्या. सांपत्तिक स्थिति मध्यम, सदर कुंडली उच्च ग्रहांची आहे. मगळ, चद्र, गुरु व शनि असे चार ग्रह उच्चांचे आहेत. पचमेश व भाग्येश सुखस्थानी एकत्र आहेत.

### कुंडली क्रमांक १२२

श्रीशके १८०९ आश्विन शु. १ सूर्यास्तात मध्यरात्रीं जन्म. कोल्हापूर इ.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

वयाचे ११।१२ वे वर्षी गडांतर गेलें, शके १८२५ वडिलांचा मृत्यु, मातोश्री वयाचे २।३ वर्षांच गेल्या, प्रथम विवाह वयाचे १६।१७ वे वर्षी, द्वितीय विवाह वयाचे १९।२० वे वर्षीं, सतति—२ कन्या, २ पुत्र व कन्या होऊन गेल्या, हल्लीं नातेवाईक १ आत्या, १ चुलता एक बधु, एक मेहुणा, एक सासू व २ मेहुण्या हयात, घरची गरीबी, आज दरमहा प्राप्ति २०।२५. या कुंडलींत फक्त बुध, शुक्र शुभफल देणार आहेत, बाकीचे ग्रह अशुभ आहेत. गुरु अशुभ असा पितृस्थानी आल्यावेळीं राहूची त्याजवर दृष्टि होती यावेळीं पितृवियोग झाला. अष्टमेश शनि धनस्थानी आहे व पंचेश मगळ हाही धनस्थानीं आहे मात्र तो निर्बली आहे या योगानें पैसा विशेष मिळत नाहीं व टिकत नाहीं.

### कुंडलीक्रमांक १२३

शके १८१९ आषाढ वा॥ १३ श्रीसूर्योदयातगत घ ४६ प १३

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

१९१३ शिक्षण संपलें, थपुरे. १९१७।१८ अनिष्ट काळ, १९१८ नोकरी फॉरेस्ट-खात्यांत १९२१ पहिली नोकरी सुटली व दुसरीकडे एका कंपनीत नोकरी. शके १८४५ पौष १५ वडील वारले, मातोश्री हयात. हल्लीं हयात असलेली मंडळी—दोन बंधु, तीन बहिणी, एक बंधु एक बहीण स्वर्गवासी झाली. सांपत्तिक स्थिति—साधारण, आज दरमहा प्राप्ति ४०, विवाह एकच झाला. सदर कुंडलीस रवि गुरु शुभ आहेत, बुध शुक्र अशुभ आहेत, भाग्यस्थानचा स्वामी पंचमस्थानीं लग्नेशयुक्त आहे हा योग चांगला आहे. लग्नेश पंचमस्थानीं शुभग्रहानें युक्त आहे यामुळें प्रकृति चांगली आहे, धनेश स्वगृही बलवान आहे यामुळें सांपत्तिक स्थिति कमी होणार नाहीं.

### कुंडलीक्रमांक १२४

शके १७८९ आश्विन शु. ६ शुक्रवार सूर्योदयातगत घ. ४ प. ५ जन्म

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

जन्माचे वेळीं मूळ नक्षत्र पडल्यामुळें वडील सहा महिने परगांवीं गेले व पुढें लौकरच वडिलांच्या सुस्थितीला उतरती कळा लागली, १७९२ फा. व ११ शुक्रवार मधुलाभ, १७९४ व्रतबंध, १७९६ बंधूचा मृत्यु. १७९८ मार्गशीर्ष शु. ११ प्रात:काळीं मातृवियोग. १७९९ श्रावण शु. १३ दुपारीं एक वाजतां पितृवियोग, वडिलार्जित जंगमाचा लाभ—स्थावर चोरा-पोरी गेलें, नेहमी पहिला नंबर असल्यानें विद्या स्कॉलरशिपवर झाली. शके १८०५ पासून द्रव्य-लाभ, पब्लिक सर्व्हिस पास. १८०७ मॅट्रिक पास व प्रथम विवाह, १८०८ पत्नीवियोग, पुढें

एकसाल नोकरी व एक साल कॉलेज, १८१४ बी. ए. ( भाषाविषय ) व द्वितीय विवाह, कायमची नोकरी, १८१८ अवल कारकून बढती, वरिष्ठाशीं वाद प्रमोशन स्टॉप, १८१९ मामलतदार ज्या गांवी विद्याभ्यास झाला तेथेंच हा प्रथम योग आला. १८३३ प्रथम नोकरी धरली त्याच गांवी राजीनामा. १८३० द्वितीय भार्यावियोग १८३१ पुत्रवियोग, १८३२ तृतीय भार्या,१८३६ एलएल बी. व हायकोर्ट परीक्षा एकदम पास. १८४१ पर्यंत विलक्षण द्रव्यलाभ, स्थावर स्वतःचें नांवें केलें नाहीं तो लाभ मरणोत्तर मुलांना झाला. १८२० प्रथम पुत्र, १८२२ संतति कन्या, १८३३ कन्यावियोग. १८२५ द्वितीय पुत्रलाभ.१८२८ तृतीय पुत्र.१८२९ पुत्रवियोग. स्वभाव तापट, करारी, लढाऊ, आप्तांचे प्रेम यांचेवर, पण ह्यांचे त्या मानानें कमी.

वरील गृहस्थांच्या प्रथम चिरंजीवाची वेळ व कुंडली.

शके १८२० मार्गशीर्ष शु. १३ सह १४ घ. ५२ प. २ रविवार. मध्य रात्रींनंतर जन्म.

जन्मकुंडली

स्पष्टग्रह.

| ल. | र. | चं. | मं. | बु. | गु. | शु. | श. | रा. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ६ | ८ | १ | ३ | ६ | ६ | ७ | ७ | ८ |
| १३ | १० | १८ | १५ | ० | १४ | ५ | २४ | १६ |
| २ | १८ | ५० | ४३ | ५४ | ३४ | १७ | ५ | ३० |
| २१ | ११ | ४ | ,२९ | १२ | ५० | ५१ | ३४ | २२ |
| | | | व. | व. | | | | |

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

जन्मानंतर एक महिन्यानें मातेला प्लेग, परंतु दोघेही जिवंत राहिली. त्याच वर्षी बापाला कायमची मामलत मिळाली. १८२२ सालीं भगिनीलाभ. १८२३ भगिनीवियोग. १८२५ सालीं बंधुलाभ. वडिलांची भरभराट. १८२८ मौंजीसंस्कार विशेष ध्यानांत ठेवण्यासारखा. १८३० मातृवियोग. १८३९ सापत्नमाता. १८१४ पित्यानें मामलतीचा राजीनामा दिला. १८२६ नानाचे वाड्यांतून पडून अपघात. परंतु मृत्यु नाहीं. १८३७ विधेला अडथळा व उनाड वृत्ति बनली. पुन्हां वडिलांची भरभराट. पण गृहकलहाला सुरवात. १८३८ व्यापारांत लाभ व हानि. १८३९ कफक्षयाची व्यथा. १८४० प्रकृतीला आराम. लग्नाचा योग फुकट गेला व व्यसनी

वृत्तीमुळें विभक्त होणें भाग पडलें. १८४३ मार्गशीर्ष शु. ६ दुपारीं १२ वाजतां पितृवियोग. १८४४ पितृधनाचा न मिळणारा भाग अनायासें मिळाला. कायमची नोकरी लागली.

द्वितीय चिरंजीवाची जन्मकुंडली.

शके १८२५ कार्तिक शुद्ध ७ मंगळवार, सू. ग. घ. ३१ पळें १३.

जन्मकुंडली

स्पष्टग्रह

| ल. | र. | चं. | मं. | बु. | गु. | शु. | श. | रा. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ० | ६ | ९ | ८ | ५ | १० | ४ | ९ | ५ |
| १४ | ९ | १ | ४ | २२ | २२ | २५ | ८ | १२ |
| १ | ७ | ३८ | ११ | २६ | ४ | ४८ | २१ | ५४ |
| ५२ | ५७ | ४ | २३ | ४४ | ४४ | १ | २४ | १९. |

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शके १८३० मातृवियोग, १८३४ वित्यानें नोकरी सोडली. विद्येंत विशेष प्रगति, १८३६ वयाचे अडचणीमुळें मॅट्रिकला बसण्यास अडथळा. १८३८ मॅट्रिक पास, स्कॉलरशिप, पुढें सारखी प्रगति; परंतु गृहकलहामुळें विभक्त रहाण्याची इच्छा बळावली, १८४३ मार्गशीर्ष शु. ६ पितृवियोग व पित्याच्या धनाचा लाभ. अभ्यास चालू.

कुंडलीक्रमांक १२५

कुं. नं. १२४ च्या गृहस्थाचें प्रथम कुटुंब.

शके १७९५ श्रावण शु. ६ सौम्यवासरे श्रीसूर्यास्तानंतर घ. ६.

जन्मकुंडली

कुंडलीक्रमांक १२६

शके १७८८ आश्विन शु. मंगळवार श्रीसूर्योदयात् ग. घ. ३६ प. ५

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

मातृसुख उत्तम, तिचा मृत्यु सन १९२० मे वै. व ५, पितृसुख उत्तम मृत्यु सन १९१९ जानेवारी, कुटुंबसुख उत्तम. लग्न १६ वे वर्षी, नौकरी सरकारी सोडली. १९०८नतर टेंपररी इंजिनियरिंग खातें. पगार साधारण, नोकरी सुरुवात १८९७.संतति—१२ मुले झाली. पैकीं हयात दोन मुलगे. १९०६ तीर्थयात्रा.

कुंडलीक्रमांक १२७

शके १७९३ अधिक भाद्रपद व॥ ९ सूर्योदयात् गतघ. ४६ प. ४१ जन्मनक्षत्र आर्द्रा.

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

मातृपितृसुख उत्तम प्रेम अत्युत्तम, लग्न १७ वे वर्षी, स्थलांतर, शिक्षण १८९८ मध्यें पुरें. १८९२।९३ कफक्षय. १८९५ परीक्षा पास. १८९६ ऊर्जितावस्था जानेवारीपासून. नोकरी १८९९ इतर व्यवसायामुळें जास्त प्राप्ति. १९०० बढती कायमची. १९०१ विषम, देशांतर उत्तरेला. १९०४ मेंत कन्यालाभ. १९०६ कुटुंबहानी. पुन्हा विषम. १९०७ द्वितीय कुटुंबलाभ. १९०८ परत बढती व रोगोद्भव उष्ण विकार. १९०९ द्वितीय कुटुंबास कन्या. १९१० बढती. १९११ तृतीय कन्या, १९१२ आजार १९१३ बधूशीं कलह, विभक्त. धर्मार्थ उत्तम काम घडले. १९१६ बढती व इतर कामामुळें द्रव्यलाभ उत्तम. १९१९ वडिलांचा मृत्यु व खाजगी कामामुळें द्रव्यलाभ १९२० मातोश्रीनिधन पुन्हा उत्तम द्रव्यलाभ व तटे. बाहेरील प्राप्ति बुडाली. १९२२ प्रमोशन १९२३ कन्यानिधन. विचारक्रांतीमुळें व्यवसायक्रांती. १९०५ अखेर पुण्यक्षेत्री गमन.

कुंडलीक्रमांक १२८

शके १७९६ भाद्रपद व. ६ गुरुवार श्रीसूर्योदयात् गत घ. २ प. ६.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

लग्न १९ वे वर्षी, परीक्षा तीनदा यत्न करून व्यर्थ. १९०१ खाजगी नोकरी उत्तम. १९०८ मध्यें सरकारी नोकरी कायम. १९१२।१३ बढती १९१४ रिव्हर्ट, १९२०।१९२२। २४ बढती. १९०० सालीं पुत्रलाभ १९०२ कन्यालाभ. १९१३ कुटुंबहानि. १९१४ द्वितीय-भार्यायोग. १९१८ कन्यालाभ व निधन. १९१९ द्वितीय कुटुंबहानि. १९०७ द्वितीय कन्या-प्राप्ति व १९११ मध्यें संततीपैकीं कन्यानाश. १९१३ कन्या नाश. थोडे दिवसानीं प्रथम कुटुंबहानि, वयाचे ४४ चे सुमारास पितृहानि व ४५ चे सुमारास मातृहानि.

कुंडलीक्रमांक १२९

शके १८०० आश्विन शु. १३ बुधवार श्रीसूर्योदयात् गत घ. १६ प. ०

जन्मकुंडली

सदर गृहस्थाच्या तृतीय कुटुंबाची कुंडली खालीलप्रमाणें.

शके १८३३ आषाढ शु १५ सोमे इ. घ. ४५ प ५

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शिक्षण मॅट्रिकपर्यंत, परीक्षेला गेले नाहींत. १८९९ पासून टेंपररी नोकरी. १९०१ कुटुंबहानि व द्वितीयभार्यालाभ. १९०४ स्थलान्तर. १९१३ कुटुंबहानि. १९११ पुत्रप्राप्ति, १९१४ तृतीयभार्यालाभ ( वरील कुंडली पहाणें ) १९२१ तृतीयभार्याहानि. या कुटुंबाला तीन अपत्यें झाली. परंतु सर्व मयत. १९१० खातेंबदल व बढती व स्थलान्तर.

कुंडली क्रमांक १३०

शके १८११ मार्गशीर्ष व. २ इष्ट घटी ३ प. ३ ३० आर्द्रा.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

वयाचे ६ वे वर्षी मुंज. आईबापापेक्षां चुलत्याजवळ रहाणें, मराठी पुस्तकें ५ व इंग्रजी ३ री. १९१३ ड्राइंग सुरवात. १९१४ साधारण हंगामी नोकरी. १९१९ मे लग्न.

कुंडली क्रमांक १३१

शके १८२६ वैशाख वा॥ ७ सू. ग. घ. ४४ प. २५.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

गर्भांत असतांना वडिलांस बढती, जन्माबरोबर वडिलाचे नोकरींत स्थिरता व पुढें दर वर्षी बढती. दीड वर्षांनीं मातृहानि. अडीच वर्षांनीं सापत्नमातायोग, ५ वे वर्षी बापाचे स्थलांतर, ६ वे वर्षी भगिनीलाभ. ७ वडिलांस बढती, ८ वे वर्षी भगिनीलाभ. १३ वे विवाह, धंदा— लाकडे व कोळशाचा.

कुंडली क्रमांक १३२

शके १८२४ पौष शु. ६ सोमवार इ. घ. ४७ प. ५५.

(स्त्रीची) जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

१० वे वर्षी मातृहानी, १५ वे वर्षी लग्न, स्थळ उत्तम त्रिजवर, प्राप्ति त्या वेळची १५०, हल्लीं ४५०, पुढें ८५० पर्यंत.

कुंडलीक्रमांक १३३

श्रीशके १८१३ ज्येष्ठमासे कृष्णपक्षे तिथौ ११ भौमवासरे आश्विनी नक्षत्रे घ. ४. पळें २ पर्यंत अत्रादिने श्रीसूर्योदयात् गत घ. १० प. ५ समये जन्म जन्मस्थळ रत्नागिरी. जन्मतारीख ३० माहे जून सन १८९१.

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति—बांधा मध्यम, उंची मध्यम, चैनी, हेकेखोर, कोणाचीही पर्वा न करणारा, कोणत्याही संकटाची भीति न बाळगणारा, चैनीच्या वस्तूची आवड, रंग, मध्यम तांबूस, कृष्ण, खुणा कोणत्याही नाहींत, व्यंग कोणतेही नाहीं. गंडांतरें—१९१३ सालीं व १९२१ सालीं उष्णतेचा विकार सुमारें तीन महिने. आई व वडिलांचें सौख्य—आई व बाप दोन्ही हयात आहेत. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—सांपत्तिक स्थिति मध्यम, फेरफार नाहीं. वडिलांचा धंदा—पूर्वी नोकरी, आतां शेती, नोकरी सुमारें १९०५ सालीं सोडली, नोकरी गांवामध्येंच खासगी, प्रवास नाहीं, जास्त हलाखीची किंवा जास्त फायद्याची वेळ म्हणण्यासारखी नाहीं. भावंडें—एकंदर आठ त्यांत हयात ६, पाठीवर बहीण, आधीं बहीण, पांच भावंडें, वडील बहीण सन १९०२ साली वारली, लहान बहीण सन १९१६ साली बाळंतरोगानें वारली त्या वेळचें मूल वारलें, अगोदरची मुलगी आहे. ...................... विद्या—मॅट्रिकपर्यंत सन १९१२ साली. भाग्योदय—मुंबईंत सुमारें १९१५ पर्यंत साधारण निर्वाहाची नोकरी,

आफ्रिकेपर्यंत हॉस्पिटलशीप सुमारें एक वर्ष, पुढें एक वर्ष रिकामपण, पुन्हां नोकरी, मिलीटरी खाते अजून चालू आहे. स्वतःवर व्यवहारिक जबाबदारी—व्यवहारिक जोखीमदारी आजपर्यंत नाहीं व कोणावर अवलंबून नाहीं. मासिक उत्पन्न सुमारें शंभरपर्यंत. सांपत्तिकदृष्ट्या अत्यंत वाईट काळ—सन १९२०।२१ व १९२२ हीं वर्षें रेसेसमध्यें सुमारें एक हजारपर्यंत नुकसान. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल—सन १९१८ व १९१९ हीं वर्षें सांपत्तिक स्थितीला अनुकूल गेली. कोणत्याही कार्यांत यश—विरुद्ध वागणाराला यश येत नाहीं. वैतागण्याचे प्रसंग—नेहमीं मागेफिरूपणा असून त्यांत कमजास्ती प्रकार होतात. नौकरी—मिलिटरी खातें.

कुंडलीक्रमांक १३४

श्रीशके १८१६ माघेमासे शुक्लपक्षे ६ तिथौ भृगुवासरे रेवतीनक्षत्र घ. ४ प. ७ अत्रदिने श्रीसूर्योदयात्गत घ.२५.३९समये जन्म जन्मस्थळ बडोदे जन्मतारिख३१माहे जानेवारी सन१८९५.

जन्मकुंडली.

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति—सडपातळ, गौरवर्ण, शांतस्वभाव, नीटनेटका, नाकीडोळीं चांगला गोरा, डाव्या दंडावर उजव्या बाजूवर छातीचे डोक्याला उजवे मिशीला, डाव्या पायाला, तळव्यास तीळ. डोळे अधू, चष्मा लावावा लागतो. उत्तम गोष्टींची आवड, नाजूक प्रकृति. गंडांतरें—सन १९११ त आषाढपासून ते कार्तिकपर्यंत डोळ्याचे आजारानें पछाडलों. डाव्या डोळ्याचें ऑपरेशन आई व वडिलाचें सौख्य—आई व वडील हयात. आई व वडिलांस मोठाले आजार—आईस शके १८१६ त माघांत मोठा आजार, धनुर्वात. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति...... इनामदार, धंदा वैद्यकीचा, मूळ सांपत्तिक स्थिति चांगली, परंतु पांच वर्षांत खर्च फार. अद्याप चालू खर्च वाढत्या प्रमाणांतच आहे. वडिलांचा धंदा—होमिओपाथिक डॉक्टर. महिन्याचें उत्पन्न धंद्यांत पन्नास रुपये. बाकी इनामी उत्पन्न. भावंडें—एकंदर ११ त्यांत हयात ६, पाठीवर सर्व आधीं कोणी नाहीं. जास्त भाऊ त्यांची संख्या सात. प्रथम विवाह धुळें येथें शके १८३७ फाल्गुन शु० २ गोरज मुहूर्तावर, दुसरा शके १८४१ फाल्गुन वद्य ३ सकाळीं स्टँडर्ड टा. साडे अकरा, स्त्रीची प्रकृति चांगली, वर्ण चांगला गौर, मे ५ रविवार चैत्र वद्य ९ शके १८४० पासून प्रथम पत्नीची तब्येत हाड्यात्रणानें आजारी. डावा हात व उजवा पाय, जुलै ता. २९ मंगळवार श्रावण शु० २ शके १८४१ दुपारीं ४ वाजतां प्रथम पत्नी स्वर्गवासी झाली. अद्याप संतति नाहीं. मातेस आजार—मातेचें शरीर स्थूल, वाताच्या योगानें स्वतः डोळ्यानें कमी दिसणें व चष्मा लावणें.

विद्या—मॅट्रिक शके १८३७ वैशाख वद्य १०, प्रिव्हीयस शके १८३८ फाल्गुन वद्य १४. शके १८४० इन्टर आर्टस् वैशाख वद्य १०, बी. ए. पांचवेळां बसलों पण नापास, तारखा पुढें दिल्या आहेत. कोणत्याही कार्यांत यश अपयश—बी. ए च्या परीक्षेंत पांचवळां अपयश आलें. त्याचे दिवस. (१) ज्येष्ठ वद्य १४ शके १८४२, (२) आश्विन वद्य १३ शके १८४२, (३) ज्येष्ठ शु. ८ शके १८४३, (४) कार्तिक शु. ९ शके १८४३, (५) ज्येष्ठ वद्य ४ शके १८४४ दिवाणी अगर फौजदारींत कोर्टांत जाण्याचा प्रसंग—सन १९१८ नोव्हेंबरमध्यें ता. ३० ला. सासूबाई प्रथम पत्नीची माता स्वर्गवासी झाली त्यांनीं चार हजारापर्यंतचा माल माझे पत्नीस दिला असतां स्त्रीचे मामा, व मावसा विरुद्ध होऊन मेव्हणीस दिला. आषाढ शु. १२ शके १८४४ ला स्त्री पाण्यांत बुडत होती, पण वांचली. वारसा, बक्षीस, बुईल अगर अशाच दुसऱ्या कोणत्याही प्रकारानें अकस्मात द्रव्यलाभ—सन १९१८ नव्हेंबर ३० ला तीस हजाराची इस्टेट मिळण्याची असतां आप्त वर्गानें व्यवस्था दुसरी केली. त्यांत कायद्यानें चार हजारांपर्यंत यावे म्हणून म्हटलें पण त्यांत सुद्धां विरुद्ध आप्तवर्ग पडला. व शिवराईसुद्धां मिळाला नाहीं व गांठचे पैसे खर्च झाले असो, सासरची सांपत्तिक स्थिति व त्यांजकडून लाभ. प्रथम सासुरवाडची इस्टेट मिळण्याचा योग आला असतां सासुरवाडची मंडळी विरुद्ध होऊन शिवराईसुद्धां मिळूं दिला नाहीं. सन १९१८–१९१९ चुलत्यांची परिस्थिति, व आत्या आणि चुलत्यांची संख्या—हयात चुलते दोन, आत्या दोन, माझे वडिलांचें वडील बंधूचे नांवें इनामी गांव ते तेथें राहतात. खाऊन पिऊन सुखी वडिलांचें कनिष्ठ बंधूची स्थिति सांपत्तिक दृष्ट्या बरी नाहीं. उत्पन्न इनामी गांवचें येतें त्यावर उदरनिर्वाह, थोरले काका पैसा बाळगून आहेत. सत्तेचें घर, वाहनें, नोकर-चाकर जमीनजुमला यांचें सौख्य आहे कीं नाहीं? असल्यास पूर्वार्जित कीं स्वकष्टार्जित व केव्हांपासून—सत्तेचे घर, इनामी गांवावर व एक बडोदें मुक्कामीं शके १७१२ मध्यें आम्हास ज्योतिषावर × × म्हणून इनामी गांव गोविंदराव गायकवाड यांनीं दिला. त्यावर उपजीविका, नोकर-चाकर वाहनें जमीनजुमला सर्व × × मुक्कामीं आहे. मामा व मावश्या—मामा हयात एक मावशी एक. मामापासून सुख व मदत. शत्रुपीडा. स्वजनांकडून विरोध व त्रास.

कुंडलीक्रमांक १३५

श्रीशके १८०० श्रावणेमासे कृष्णपक्षे दशम्यांतिथौ भृगुवासरे मृगनक्षत्रे, घ. २४ प. २३ अस्मिन्दिने श्रीसूर्योदयात्गत घ. १० प. ५ समये जन्म. जन्मस्थळ–सिन्नर, जन्मवेळ सकाळीं ९ वाजतां. जन्मतारीख २३ माहे ऑगस्ट सन १८७८.

जन्मकुंडली

८ ६ ९ ७ ५ मं बु र के ४ शु गु १० रा ३ १ ११ ४ १२ श २

| स. सू. | स. लग्न |
|---|---|
| ४ | ६ |
| ७ | ३ |
| २७ | ३४ |
| ५५ | २० |

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति—सडपातळ, मानी, एकांतवास, साधारण बरें, वर्ण–तांबूस गोरा, डाव्या गुडघ्यास जखम झाल्याची खुण, छातीवर उजवे बाजूस तीळ. गंडांतरें—शके १८३८ पौष वद्य पक्षांत तापांत वात होणें. १॥ महिना. आई व वडिलांचें सौख्य—वडील ४ थे वर्षी वारले. मातोश्री २५ वे वर्षी प्लेगनें वारल्या. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—मध्यम, वयाच्या ६ व्या वर्षापासून दुःखांत काळ गेला. दारिद्र्यामुळें. वडिलांचा धंदा—नोकरी मृदंगवादनाची, महिन्याचें उत्पन्न १० अगर १५ रु. भावंडें—एकंदर ३, त्यांत ह्यात एक. पाठीवर बहिण, आधी बहिण, जास्त बहिणी, व त्यांची संख्या ३. विवाह—१ ला १३ वे वर्षी; २ रा २३ वे वर्षी. दुसरे स्त्रीची प्रकृति सुदृढ, सुस्वरूप; सन १९१८ सालीं एन्फ्लुएंझा झाला होता. संततीचे वर्णन—पहिला मुलगा, दुसरा मुलगा, तिसरा मुलगा, चौथी मुलगी, पांचवा गर्भपात, सहावी मुलगी, सातवा मुलगा, आठवा मुलगा, नववी मुलगी, दहावा व अकरावा मुलगा. तिसरे मुलाचा जन्म. ७-४०८, मृत्यु ४ ११-०८ ४ थी मुलगी जन्म १९-१-१०, मृत्यु १५-८-१० ५ वा गर्भपात ६ वे मुलीचा जन्म १८-१-१२, मृत्यु १३,७-१२. ८ वा मुलगा जन्म. ७-१२-१५, मृत्यु २-१०-१८ इन्फ्लुएझा. ९ वी मुलगी जन्म २५-३-१८, मृत्यु ४-१०-१८ इन्फ्लुएंझा. विद्या—मराठी व्हर्नाक्युलर फायनलपर्यंत. इंग्लिश साधारण. शिवाय गायन, मृदंगवादन, तंतुवाद्य, सतार, हार्मोनियम वगैरे, ज्योतिषशास्त्राचा नाद. भाग्योदय—महाराष्ट्रांत [ नाशिक ] झाला. २६ वे वर्षी नोकरीला सुरवात, त्यानंतरचे प्रत्येक वर्ष मध्यम स्थितींत गेलें. त्यांत नफा म्हणजे वेळोवेळीं प्रमोशन. स्वतःवर व्यावहारिक जबाबदारी २५ वे वर्षी. सन १९०८ सालीं सेक्रेटरीचा हुद्दा मिळाला. सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत वाईट. वयाच्या ६ व्या वर्षापासून तो १२ वर्षेपर्यंत. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल–शके १८१७ ते शके १८३०. सरकार अगर लोकांकडून मान—सन १९०९ सालीं. सन १९१० सालीं सरकारकडून व जातीचे लोकांकडून. दिवाणी अगर फौजदारींत कोर्टांत जाण्याचा प्रसंग सन १९१२ सालीं, सन १९१५ सालीं सुमारे दहा महिने. नोकरी म्युनिसीपालिटींत. अपघात, संकटें—लहानपणीं पाण्यांत बुडणें, १९१७ सालीं रेल्वेखालीं चेंगरणें. सासरची सांपत्तिक स्थिति मध्यम. सत्तेचें घर, वाहनें—सत्तेची घरें २ जमीनजुमला आहे पूर्वार्जित. सावत्र आई होती. मामा व मावश्या—मामा ३. मावशी १.

### कुंडलीक्रमांक १३६

शके १८०९ आषाढेमासे कृष्णपक्षे ९ म्यां तिथौ गुरुवासरे............भरणीनक्षत्र प्रथम चरण सूर्योदयात् जन्मकाल घटी ४१ पळे १५, जन्मस्थळ मूर्तिजापूर ( जि. अकोला, वऱ्हाड )

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

तनुस्थान—केस राठ, डोळे मोठे व पाणीदार, रंग गौरवर्ण, अंगकाठी सडपातळ, शरीर काटक, चेहरा तेजस्वी. आजपर्यंत जिवावरची दुखणी तीन गेली. पहिलें वयाच्या चौदाव्या वर्षी दुसरें अठ्ठावीसाव्या वर्षी म्हणजे १९१४ साली आगष्ट महिन्यांत तिसरें अग्निमांद्य १९२० च्या जुलै-पासून डिसेंबरपर्यंत. ह्यापैकीं पहिली दोन दुखणी फार त्रासदायक होती व त्या वेळेस विषमज्वर पीडा. घोड्यावरून पडल्यामुळें हात मोडला. ( Distorative ) १९१८ च्या सप्टेंबर महिन्यांत. एकंदर शरीरप्रकृति निरोगी आहे कोणतीच व्यथा नाहीं. धनस्थान—वडिलार्जित इस्टेट मुळींच नाहीं, वडील शाळाखात्यांत नोकर होते, त्याना पेनशन दरमहा ४५ रुपये शेती वगैरे नाहीं, बोलण्याचा नाद फार गाणें आवडतें समाजांत वजन चांगलें असते. सहजस्थान—माझ्या पाठी-वरचा व पहिला, दोघेही भाऊ मेले. मी एकटाच आहे, बहीण देखील नाहीं परंतु सावत्र बहिणी २ व सावत्र भाऊ २ पराक्रमी स्वभाव आपलें वर्चस्व प्रत्येक गोष्टींत असावें अशी महत्वाकांक्षा टेनिस खेळण्याचा फार नाद, मानी स्वभाव समाजांत योग्य मान मिळावा, अशी नेहमी धरपड, स्वभाव तापट, उणे बोलणें सहन होत नाहीं, जेथें मान राहणार नाहीं त्या ठिकाणीं कधींही जाणार नाहीं. मातृस्थान—माता माझ्या वयाच्या चवथ्या वर्षी वारली, आजीनें संगोपन केलें, आजीचें प्रेम जास्त, ( आजी वडिलांची आई, वाहनसुख मधून मधून उत्तम मिळतें, नोकर विश्वासु असतात, अन्नवस्त्राला कमी नाहीं, " खावें, प्यावें, मजा करावी " Eat, Drink, and be merry. हीच आयुष्याची इतिकर्तव्यता बागबगीच्याचा उल्हास, सुंदर बंगला राहण्यास असावा ही इच्छा समाधान वृत्ति ऐहिक सुखें सर्व मिळविण्याची खटपट, एकंदरींत आजपर्यंत ज्याला ' सुख ' म्हणतात ( ऐहिकदृष्ट्या ) त्याला कमी नाहीं, पुढें परमेश्वर समर्थ आहे, आनंदी वृत्ति नेहमी कायम असते. सावत्र आई १९११ मध्यें वारली. पंचमस्थान—विद्या बी. ए. पर्यंत बुद्धिमत्ता श्रेष्ठ दर्जाची वाक्चतुरता साडेसाती आल्यामुळें १९१० स बी. ए. नापास झालों, तेव्हां-पासून कॉलेज सोडलें. भाषाविषय उत्तम गणिताच्या नांवानें आवळ्याएवढें पूज्य. फलज्योतिषाचा नाद गांवांतील लोक नेहमीं ज्योतिष विचारतात, माझीं फलें शेंकडा ६० जमतात, स्वप्नें सूचक पडतात, परमेश्वराविषयीं चिंतन. संतति—पहिला मुलगा १९१० च्या मार्चमध्यें झाला, तो पांचव्या महिन्यांत वारला, १९१२ च्या मार्चमध्यें मुलगी, १९१४ च्या फेब्रुवारींत मुलगी, १९१६ च्या आक्टोबरमध्यें मुलगी, १९१९ च्या जानेवारींत मुलगा झाला, तो पांचव्या महि-न्यांत वारला, १९२० च्या जूनमध्यें पुन्हा मुलगी, १९२३ च्या एप्रीलमध्यें मुलगी, एकुण आजपर्यंत ५ मुली फक्त जिवंत आहेत. षष्ठस्थान शत्रु पुष्कळ असतात, परंतु त्यांचे कांहीं चालत नाहीं, मामा वगैरे कोणी नाहीं. आईकडील नातलग फक्त तिची चुलत बहीण आहे, " त्रिषट् एकादशे राहुः करोति विपुलं धनम् " परंतु आजपर्यंत अनुभव उलट आहे, पैसा

मिळतो पुष्कळ परंतु कवडी शिल्लक राहत नाहीं, उलट, महिन्यास रु. २५ पर्यंत कर्ज होतें. सिगारेट ओढण्याचा नाद फार धार्मिक कृत्यातही खर्च होतो, uptodate राहणी कपडे नेहमीं स्वच्छ पाहिजेत, ऐषआरामी स्वभाव, लोकांत नेहमीं माझ्याविषयीं वाईट मत असतें. सप्तमस्थान—बायको सुंदर अंगानें सडपातळ गृहकार्यांत दक्ष, चतुर प्रेमी, आज्ञेत वागणारी एकंदरींत गृहसुख पूर्ण आहे. बायको मनासारखी हा सप्तमातील शुक्राचा परिणाम असावा. लग्न १९०३ च्या मे महिन्यांत झालें. नवमस्थान—तीर्थयात्रा प्रवास करण्याचा नाद फार. ईश्वरावर निष्ठा, गुरुचरित्राचा एक अध्याय रोज वाचतों. सद्गुरु प्राप्त व्हावा हीच इच्छा. दानधर्म करावा अशी बुद्धि.........परस्त्रीगमनाविषयीं कधीं कधीं इच्छा. नोकरीला सुरुवात १९१२ च्या मे महिन्यात (अबकारी खात्यात). दशमस्थान—पिता जिवंत आहे परंतु त्यांच्यापासून धनलाभ मुळीच नाहीं. कारण सावत्रभाऊ आहेत, फक्त मिळेला व लग्नाला पैसा लावला तेवढाच. १९१२ च्या मे महिन्यांत घराबाहेर नोकरीवर रुजु होण्याकरितां फक्त एक रुपया घेऊन निघालों. नोकरीत वरिष्ठांची मेहेरबानी १९१४ मध्यें नोकरी कायम. स्पेशल प्रमोशन १९१९ मध्यें मिळालें. १९२३ च्या जुलैमध्यें रेव्हिन्यु खात्यात नायब तहसिलदारीकरितां अर्ज करावा असें लिहून आलें. कारण माझें काम फार पसंत पडलें. आबकारीखात्यात वरच्या दर्जाच्या जागा कमी आहेत म्हणून माझी बदली रेव्हिन्यु लाईनमध्यें होणार. Departmental Examinations दोन वेळा म्हणजे १९२४ च्या एप्रिल व नोव्हेंबरमध्यें पास झालों. सिलेक्शनकरितां १९२४ च्या डिसेंबरमध्यें बोलावलें होतें त्या वेळेस १४ उमेदवारांपैकीं ४ घेतले. त्यात मी आहे.

नवमांश कुंडली

एकादशस्थान—आजपर्यंत हातावर मिळवावे व खावें, अशी स्थिति संग्रह मुळींच नाहीं. सध्यां पगार ९० रुपये महिना आहे नायब तहसीलदारीचा हुकूम आला म्हणजे १०० रुपये होतील धनेश व लाभेश भाग्यात असून अजून कांहींच नाहीं. मात्र "गुरु" शत्रूच्या घरीं आहे तरी पण षष्ठातले पापग्रह अजून कसा प्रभाव दाखवीत नाहींत कोण जाणे. द्वादशस्थान—खर्च फार. पुण्यकर्म करावें अशी इच्छा पारमार्थिक नामाचा अभ्यास, सद्गुरुदर्शनाचा हव्यास

ज्यावेळीं सप्तम स्थानामध्यें कोणताही ग्रह जन्मत अत्यंत बलवान असतो व त्या ग्रहाशीं इतर कोणत्याही पापग्रहाचे अनिष्ट योग नसतात त्यावेळीं त्या ग्रहाच्या उदयकालवर्षी फार महत्वाचे ऐश्वर्ययोग येतात.

कुंडलीक्रमांक १३७

८८,शके १८११ पौषमासे कृष्णपक्षे १२ तिथौ सोमवार ७॥ वाजता सकाळीं.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

आई—शारदाबाई, भाऊ—धाकटे कृष्णा व श्रीराम, चुलते—नाहींत, मावशा—३ होत्या त्या मृत. सन १९०० ते १९०६, आत्या–१ मयत १९०४, वहिणी–वडील १ आहे व धाकट्या २, आजी–सन १९०५ मयत, पत्नी–ता. ३।४।१९२४ मयत, सासरा–सन १९२१ मयत, सासू सन १९०५ मयत, मेव्हणे–२ आहेत, संतती–मुली ३ आहेत. सन १९०५ साली ४००० हजार रुपयांचा फायदा झाला व विश्वकर्मा प्रभूची स्थापना झाली. कामास २००० रुपये खर्च झाला. व घर १ हजाराचे घेण्यांत आलें. पुढे सन १९२३ ला सर्व नुकसान झालें जवळचे सर्व द्रव्य खर्च झालें. व ता. ६-४-१९२४ ला पत्नि मरण पावली. हल्ली उत्पन्न दरमहा ६०-७० रु. मिळतात.

कुंडलीक्रमांक १३८

शके १७७९ अश्विन शु. ६ इ. घ २९ प. ३१ ता. २४-९-१८५७

जन्मकुंडली

१गु
११
२
१२रा
१०
३
९
४श
के६बुर
८च
म५शु
७

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

व्रतबंध मार्च सन. १८६५, प्रथम विवाह जुलै सन १८७४. पत्नीवियोग जानेवारी सन १८८३, द्वि विवाह सन १८८३, पितृवियोग नव्हेंबर सन १८७८, जानेवारी १९०४ मातृवियोग काशीक्षेत्री यात्रेस गेलेसमयीं. द्वि. पत्नी मृत ता. ७।९. १९०८, पुत्र तीन, पोटदुखीची व्यथा सन १८९०।९१ पासून.

कुंडलीक्रमांक १३९

शके १७७५ मार्गशीर्ष कृ. २ शनिवार ता. १९।१२।१८५३ स्प. र. ८।४।५।२२

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

मातृवियोग बाळपणीं. सापत्नमातुश्रीयोग. पितृवियोग आषाढ कृ. ६ शके १७९४. सापत्न बंधु एक, हल्लीं पेन्शनर, बंधुप्रेम चांगलें. भगिनी दोन होत्या. भार्या दोन, एक मृत नंतर दुसरी भार्या ही हयात आहे. पुत्र एक, नातू दोघे. धंदा वडिलांपासून सरकारी नोकरीचा, त्यांत अकस्मात कल्पनातींत भाग्योदय सन १८७७ त हल्लीं पेन्शन चांगलें, स्थावर जंगमइस्टेट चांगली. पुत्रास व्यापारांत नुकसान, त्यामुळें मनस्ताप सन १९२२।२३

कुंडलीक्रमांक १४०

शके १८०१ फाल्गुन शु. ९ शनिवार घ. ३० प. १२ पुनर्वसुनक्षत्र घ. ६० सूर्योदयातगत घ. ११ प. ५९

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

मुंज फाल्गुन शु. ९, शके १८०९, विवाह सन १८९८, मार्च ता. ३, पितृवियोग सन १८९९ मे. वडिलार्जित स्थावर इस्टेटीचा दोन पिढ्यांत कबजा नव्हता तो मिळाला जुलै सन १९००. कुटुंबसुख कमी. कन्यासंतती आहे. अद्याप पुत्रसतति नाहीं. मातृवियोग सन १९२१. सन १९०० पासून लाभदायक काळ. हल्लीं सर्वत्र मानमान्यता व द्रव्य संचय चांगला.

कुंडलीक्रमांक १४१

शके १८१३ माघ कृ. ५ गुरौ इ. घ. ३२ प. ४० ता. १८।२।९२.

जन्मकुंडली

### आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

पितृवियोग सन १८९७. व्रतबंध ता. ९-५ १९००. मातृवियोग सन १९२३. विवाह ता. २६।५।१९०८. पुत्रसंतति ५. अद्याप कन्यासंतति नाहीं.

कुंडलीक्रमांक १४२

शके १८१७ आषाढ शु. १३ रात्रीं जन्म.

जन्मकुंडली

### आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

पितृनिधन सन १८९६ ज्ये. कृ. ७. मातृनिधन सन १८९७ आषाढ शु. ११. प्रथम-विवाह सन १९१५ माघ कृ. ७. पत्नीचा मृत्यु जानेवारी २९ सन १९२२. वडिलार्जित इस्टेटी-करितां तंट्यास सुरवात, वयवर्ष २१. वयवर्षे २४ वडिलार्जित इस्टेट त्यांस मिळाली.

कुंडली क्रमांक १४३

शके १८०५, पौष शु. १५

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

मातृसुख अल्प, सापत्नमातृयोग पितृनिधन शके १८२७ ज्ये. कृ ३०, स्त्री स्वरूपवान. स्वभाव तापट महारोगाची व्यथा मृत्यु शके १८३९ पौष शु. १४. निधनसमयी कन्या संतति दोन फक्त हयात वडील तापट व अधिकारी.

• कुंडलीक्रमांक १४४

शके १८१५ पौष शु १० इ. घ ४८ प. ४१

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

पितृनिधन मार्गशीर्ष शु ३ शके १८४० विवाह प्रथम शके १८३७ वैशाख शु. १५ नोकरीस सुरवात ता १९।२।१९१३. प्रथम संतति शके १८४१ कार्तिक शु ५. प्रथमपत्नी मृत शके १८४२ आश्विन शु १, द्वितीय विवाह शके १८४५ माघ कृ. २

कुंडलीक्रमांक १४५

शके १८०४ आषाढ शु ४ पहाटे चारचा सुमार.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—उंच, सडपातळ, वर्ण मध्यम, गोरा, अशक्त परंतु निरोगी वडील शके १८१६ चैत्र कृ ४ रोजीं वारले वडिलांचें प्रेम असे परंतु मनावर दरारा असे वडिलांची स्थिति गरिबीची धंदा शिक्षक, वडिलार्जित स्थावर जंगम इस्टेट नसल्यासारखीच मातोश्री हयात आहेत. प्रेम चांगलें मातोश्रीचे वडील सुस्थितीत होते धंदा सावकारीचा ते शके १८१३ वैशाख शु ८ स वारले त्यांचेकडून मातोश्रीस कांहीं लाभ झाला, मामा १ (दत्तक) व तीन मावश्या

होत्या. कोणी हयात नाहीं. एक मावस बहीण आहे, भाऊबहिणी—वडील बधू दोन, व एक धाकटा होता. सर्वांत वडील बधू शके १८१२ सालीं वारले. दुसरे दत्तक गेले होते ते शके १८२६ कार्तिक शु. १२ स प्लेगनें वारले. धाकटा अल्पायु वारला. बहिणी दोन, एक धाकटी अल्पवयांत शके १८१३ त वारली. थोरली हयात आहे. तिचे प्रेम यांच्यावर चागलें आहे. मात्र ही बहीण दुर्दैवी आहे. तिचा नवरा शके १८२५ त पौष कृ. १३ स प्लेगनें वारला. हीस एक मुलगा व एक मुलगी, मुलगा ३० व्या वर्षी क्षयानें वारला, त्याचे बायकोनेही त्याचवेळीं जीव दिला. तिच्या दोन नाती आहेत. कुटुंब—पहिलें लग्न शके १८२४ वैशाख शु. ८ स झालें. ही बायको त्याचवर्षी पौष कृ. १४ स प्लेगनें वारली. दुसरें लग्न १८२४ फाल्गुन शु. ५ स झालें. ही बायको शके १८४१ आषाढ शु. १३ स बाळत होऊन मृत. पहिला मुलगा शके १८३१ वैशाख शु. ८ स झाला, हा पुष्कळ शिकला:आहे, दुसरा मुलगा शके १८३३ मार्गशीर्ष कृ. ४ स झाला. तो तात्काळ मृत, तिसरी कन्या शके १८३४ आश्विन शु. ११ स झाली. चवथी कन्या शके १८३७ मार्गशीर्ष शु. १४ झाली. पाचवा पुत्र शके १८४० वैशाख शुद्धांत उपजतांच मृत. सहावी कन्या १८४१ ज्येष्ठ शु. ३ उपजतांच मृत. विद्या—सन १९०२ मॅट्रिक. सन १९०४ प्रिव्हिएस. सन १९०६ मध्यें इंटरमिजिएट नापास. सांपत्तिक अडचणीमुळें शिक्षण सोडून उदरंभरणाकडे लक्ष वळवावें लागलें, अद्यापसुद्धां कांहीं तरी अभ्यास करून परिक्षा द्यावी, असें केव्हां केव्हां मनात येते; परतु प्रापंचिक अडचणीनें त्यांत यश येत नाहीं. भाग्योदय—जन्मस्थानापासून बऱ्याच दूर अतरावर २६ वे वर्षी प्रथम नोकरी लागली, ७-७॥ वर्षे परिस्थितींत कोणताही बदल झाला नाहीं. वयाचे ३३ वे वर्षापासून बढतीचे बरेच योग आले, ते ३८ वर्षापर्यंत पुन्हा परिस्थिति कायम, अद्यापि कर्ज कोणाचें नाहीं, आयव्यय बरोबर. शिल्लक फारच बेताबाताची. शके १८४१ ज्येष्ठ वद्यपक्षांत मलेरियानें फारच आजारी होतों, जवळ जवळ पुनर्जन्मच. आप्तवर्ग व स्नेही—यांचेकडून मदतीची केव्हांही अपेक्षा करीत नाही व होत नाहीं. भांडणतंट्याचा प्रसग बहुधा येतच नाहीं, त्याचा अत्यत तिटकारा. स्वभाव—बोलावयास फारच कमी. एकलकोंडेपणाची आवड, सत्याची आवड, शत्रुमित्रांचा अभाव, विचारचांचल्य, केव्हां केव्हां ज्योतिष व वैद्यकी शिकण्याविषयीं विचार मनांत येतात; परतु थोडासा अभ्यास केल्यानतर विचार बदलून स्वस्थ बसावेसें वाटतें.

कुंडलीक्रमांक १४६

शके १८२६ भाद्रपद कृ. ९ सोमवार दिवसा १० वाजतां पुनर्वसु ३ चरण.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

ह्या व्यक्तीची वडिलोपार्जित इस्टेट १७।१८ हजाराची असून वडील हयात असतांना शेतांचे उत्पन्न सालीना चार हजार येत असे. यानां चार बंधू असून सर्व गोष्टी अनुकूल होत्या. यांचे मराठी शिक्षण पांच यत्ता झाले आहे. लहानपणी शरीरकष्ट फार झाले. शके १८४० ध्या आश्विन कृ. ५ स एक बंधू वारले. शके १८४१ आश्विन शु. १० स वडील वारले. वडिलांचे मृत्युनंतर एक जमीन खरेदी केली. शके १८४५ आषाढ कृ. ३० स वडील बंधूस आप्ताकडून विष प्रयोग झाला. पण अतिशय खर्च करून व उपचार करून त्या संकटातून माऊ बचावले. शके १८४६ आषाढ शु. १२ स भयंकर मारामारी झाली व त्यामुळें खर्च अतीशय होऊन कर्ज झाले. जमीन खरेदीचे वेळीच घरांत १५० रु. ची चोरी झाली. शके १८४८ फा. कृ. ३० स आई वारली. शके १८५२ का. शु. ४ एक बंधू वारले. [ता. ५।११।३०] या बंधूचे २ पुत्र व २ कन्या आहेत. या कुंडलीस प्रथम संतति पुत्र तो बारा दिवसात वारला. दुसरा मुलगा शके १८४८ चैत्र शु. ९ स दिवसा १० वाजतां झाला व शके १८५२ माघ मासी मृत झाला. तिसरा मुलगाही दहा दिवसात वारला. चौथी कन्या झाली व ती हयात आहे. पांचव्या संततीचे वेळी स्त्री गरोदर असतां शके १८५५ श्रा. कृ. ३० रविवारी दिवसा ३।४ च्या सुमारास (ता. २०।८।१९३३) स्त्री मयत झाली. नोकरी कांहीं दिवस एका संस्थानिक जाहागिरदाराकडे केली व पुढें एका दारु दुकानावर [तीनवार] नोकरी केली व सध्या एका खेड्यांत खाजगी मुले शिकविण्याचा व्यवसाय करित आहेत.

### कुंडलीक्रमांक १४७

### लॉर्ड कर्झन (हिंदुस्थानचे माजी व्हाईसराय.)

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

लॉर्ड साल्सबरीचा प्रायव्हेट सेक्रेटरी १८८५ पार्लमेंटचा सभासद १८८६, हिंदुस्थानाच्या अंडर सेक्रेटरीचे जागीं नेमणूक १८९१–१८९२. परराष्ट्रीय राजकारणाची माहिती व सेंट्रल आशिया, पर्शिया, अफगाणिस्थान, सयाम, इंडोचायना, कोरिया वगैरेंत प्रवास १८९५ ते १८९८, विवाह १८९५, हिंदुस्थानच्या गव्हर्नर-जनरलचे जागीं नेमणूक, जानेवारी १८९९ इंग्लंडला परत प्रयाण १९०४, पुनः व्हाईसरायच्या जागीं नेमणूक १९०४, व्हाईसरायच्या जागेचा राजीनामा १९०५, लंडनच्या युनिव्हर्सिटीकडून व सरकारी पदव्या १८९४, १९०७, १९११ राजकारणांत पुनः महत्वाचे स्थान १९१५, वारकॅबिनेटमध्यें प्रमुख सभासद, जुलै १९१६, परराष्ट्रमंत्री व राजाकडून पदवी १९२१.

लार्ड कर्झन यांचे विवाह दोन झाले पैकीं पहिल्या स्त्रीस ३ मुली होऊन ती सन१९०६ मध्यें मयत झाली व यांचा दुसरा विवाह १९१७ मधें झाला.

कुंडली क्रमांक १४८
शके १८०७ आश्विन शु. ११ सोमवार रात्रौ जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

इंग्रजी पांचसहा यत्तेपर्यंत शिक्षण पुढें दीडवर्ष वैद्यकविषयाचा अभ्यास. १९०७ सालीं रेल्वेत नोकरीस सुरवात पगार २५ रु. चार वर्षांनीं लग्न. नंतर बायकोची कोर्टांत केस तीत यश. पुढें एक मुलगा झाला. वडील वारल्यानें चुलत्याचे विरुद्ध पुनः कोर्टांत जाण्याचा प्रसंग दोन वर्षांनीं त्या केसमध्यें यश, त्याच संधींत पुनः एक पुत्र लाभ व प्रथम स्त्रीचा मृत्यु. पगार पन्नास रुपये पुन्हां लग्नाचा योग, हा विवाह झाल्यावर नोकरीत बढती. सख्याबंधूनें कोर्टांत फिर्याद करून वडिलार्जित सर्व इस्टेट गिळकृत करण्याचा बेत केला पण कोर्टानें थोडी जमीन व घराचा हिस्सा दिला. द्वितीय पत्नीस गर्भधारणा झाल्यावर सांपत्तिक दृष्ट्या मोठा फायदा झाला, नऊ महिने पुरे होईपर्यंत दोनशेच्या जागेवर नेमणूक, स्त्रीस मुलगा झाला तो मृत जन्मास आला. नंतर पुनः एक मुलगी झाली त्याचवेळीं एका पाचसहा हजार रुपयाच्या जागेची खरेदी. ही मुलगी ५।६ वर्षांची झाल्यावर पुनः स्त्रीस गर्भधारणा होऊन मुलगी झाली व ती सात दिवसांनीं मृत, पुढें बाळंतपणांत अतिशय हाल व कष्ट झाले, पुष्कळ उपचारानंतर प्रकृती थोडी सुधारली पण डोळ्यांत फुले-मस्तकशूल अजूनपर्यंत चालू आहे. सन १९२८ सालीं नोकरी सोडली. याच

संधीत सर्व मुलाबाळासह सर्व तीर्थयात्रा घडल्या. भावानें घरामध्यें भिंती घातल्यानें घरदुरुस्तींत द्रव्याचा व्यय बराच करावा लागला. त्याच संधीत पुन्हां वैद्यकीचा धंदा चालू व एका चुलत्याचा मृत्यु व त्याचे घर ताब्यांत मिळाले. यात्रेच्यावेळीं एका सत्पुरुषाचे दर्शन घडून त्यानें फार मोठा द्रव्यलाभ होईल असे सांगितले पण अद्याप झाला नाहीं. १९२८ सालापासून वैद्यकीचा धंदा निरनिराळ्या गांवीं प्रत्येक वर्षी चालू आहे. १९३१ सालीं कलकत्याचे परिक्षेस बसून अचानक डॉ. ची परिक्षा पास व एल. सी. पी. एस. पदवी मिळाली. पूर्वी घेतलेल्या जागेवर इमारत बांधण्याकरितां लाकडाची खरेदी पण लाकडाचे पैसे तीच जागा गहाण ठेवून दिले ते अद्याप फिटले नाहींत. वार्षिक उत्पन्न ४००।५०० च्या आत. आई हयात असून आजपर्यंत सर्व नुकसानीस तीच कारण झाली आहे.

कुंडली क्रमांक १४९

शके १८२४ आश्विन कृ. ५ मंगळवार पहाटे ५ वाजतां. २१।१०।१९०२

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

आई वयाची ५ वर्षे झाल्यावर सातव्या महिन्यांत वारली. ( चै. शु. ३ ) त्यावेळीं आज— हयात असलेला भाऊ नऊ दिवसाचा होता. आम्हां दोघामधील भाऊ लहानपणींच वारला. मीच ज्येष्ट पुत्र; आतां आम्ही दोघे बंधूच हयात आहो. आई वारल्यावर वडिलांनीं दुसरे लग्न केले. त्या सापत्न भगिनी २ आहेत. एक १९२१ च्या आगष्टमध्यें जन्मास आली व दुसरी १९२५ च्या मार्चमध्यें. सापत्नमाता १९२६ च्या मे महिन्यांत वारली. ( चै. कृ. ११ ) वडील ता. ९।१। १९२७ रोजीं वारले. ( पौ. शु. ६ ) ता. २४।११।१९३१ ( कार्तिक शु. १५ ) रोजीं वडिलांची बहीण वारली. ही आमची आत्या ८।९ वर्षापासून वैधव्य आल्यानें अंतकालपर्यंत आमचे घरींच होती व तिनेंच आमचा सर्वांचा संभाळ केला. वडील ल्यांडरिकार्डस् डि. इ. होते. त्यांची बहुतेक नोकरी विजापूर जिल्ह्यांत झाली. मध्यंतरी २ वर्षे कुलाबा जिल्ह्यांत बदली झाली होती, बागलकोटास १।१॥ वर्ष वडिलांनीं सर्वेमामलेदार म्हणून काम केले. १९२१ मध्यें फर्लोवरजेवर आले व १९२३ मे च्या सुमारास पेन्शन घेतले. माझे शिक्षणास सुरवात विजापूर येथें झाली. तेथें ४ थी पर्यंत कानडी शिक्षण घेऊन पुढें इंग्लीश शिक्षणास कुलाबा येथें सुरवात केली. मला १९१३ मध्यें दम्याचा विकार सुरू झाला. वडिलानांही दम्याचा विकार होता. १९१५ सालीं मुंबईत माझे मोटऑपरेशन करून घेण्यांत आले. १९१५।१६ मोठी शिक्षणास सुरवात झाली.

१९१६ डिसेंबरमध्यें मी भाऊ व आया धारवाडास आलो व वडील व सापत्न मातोश्री विजापुरास गेले. वडिलांनीं धारवाड येथें एक घर विकत घेतलें होतें. व पुढें शेतीही खरेदी केली. १९२२ मध्यें मी म्याट्रिक पास झालो. १९२३ मार्चमध्यें प्रिव्हियस झालो याच सुमारास वडिलांनीं पेन्शन घेतलें व मला त्यांच्याच डिपार्टमेंटमध्यें नोकरी मिळून बेळगांवास मी गेलो पण बी. ए. होण्याची इच्छा असल्यानें नोकरी सोडली. १९२८ पर्यंत नोकरी नाहीं व शिक्षणांतही अपयश आलें. १९२८ नव्हेंबरमध्यें उमेदवार म्हणून राहिलो ४।५ महिन्यानीं ता. ८।४।२९ पासून २५ रु. पगारावर त्याच बँकेंत नोकरीस सुरवात. १९२९ मार्च इंटरचे परिक्षेत अपयश. २·१॥ वर्षे नोकरी टिकली पण पुढें दुसऱ्याचे सांगण्यावरून १७ जुलै १९३३ रोजीं नोकरीचा राजिनामा दिला. १९२९ ते १९३३ सालपर्यंत तीन बुककिपिंग आणि अकांउटस् सर्टिफिकेटस् मिळविले आहेत. विवाह १९३० च्या मार्च महिन्याच्या २४ तारखेस झाले. संतति अद्याप झाली नाहीं. मी स्वतःअशक्त असून बायकोची प्रकृतीही अशक्तच आहे.

कुंडलीक्रमांक १५०

श्रीशके १७९४ ज्येष्ठमासे कृष्णपक्षे एकादश्यांतिथौ सोमवासरे श्रीसूर्योदयात्गत घ. ३० प ५० समये जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शरीरवर्णन—सडपातळ, वर्ण काळसर, उंच. व्यंग—कमी ऐकू येणें. अत्यंत आजारी असलेली वर्षे—वयाच्या चवथ्या वर्षी तापानें. तीसएकतीसाव्या वर्षी तापानें. ४१ व्या वर्षी तापानें. आईचा मृत्यु—शके १८४३ माघ शु. १२ वडील मृत्यू—शके १८२९ कार्तिक शु. १० पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—फक्त जमीन व घर, जंगम जिंदगी थोडी. सध्यांची सांपत्तिक स्थिति—बरी, खर्च फार. कुटुंबास तिचे वडीलाची जमीन वारसनात्यानें मिळाली पण उत्पन्न येत नाहीं. भावंडें—दोन बंधु मोठे होऊन मयत, बाकीचे लहान असतांना मयत, हल्लीं दोन बहिणी आहेत. विवाह—शकें १८११. सतती—सहा मुलगे व दोन मुली आहेत. विद्या—यू. एस्. एफ. होऊन डिस्ट्रीक्ट प्लीडर. धंदा—वकीली. आप्तवर्ग—मामाचे मुलगे, मावशी मयत, चुलते सर्व मयत. आत्या मयत, व सासरा सासू मयत, बायकोस बहीण, एक पुतण्या आहे. संकटकाल—वयाचे छत्तीसावे वर्षी फौजदारी खटला Discharged पण त्रास फार, खटला खोटा होता. इतर

गोष्टी—शके १८२० सालीं थोडी द्रव्यप्राप्ती. शके १८३५ सालीं चुलता मयत. त्यांचे मृत्यु-पत्रावरून साधारण इस्टेट प्राप्ती, शके १८४६ सालापासून वकीलीचा धंदा कमी होत आहे.

### कुंडलीक्रमांक १५१

श्रीशके १८०४ भाद्रपदेमासे कृष्णपक्षे नवम्यांतिथौ गुरुवासरे श्रीसूर्योदयातगत घ. ९ प. ३० समये जन्म.

### आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शरीरवर्णन—कृश, डोळे अधु, वर्ण निमगोरा. अत्यंत आजारी असलेली वर्षे—वयाच्या २२ वर्षी डोळ्याची पीडा. २८ व्या वर्षी ताप. आईचा मृत्यु—शके १८३६ जलोदर. वडील मृत्यू—शके १८२९ प्लेग. पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—अगदीं साधारण. सध्यांची सांपत्तिक स्थिति—निकृष्ट. सर्व स्वपराक्रमानें उपजीविका करीत आहेत. भावंडें—एकंदर ८ हयात ४. बहीण एक, भाऊ २, विवाह—सन १९०३ जून, गौरवर्ण, मुलगा होऊन मयत झाली. दुसरा विवाह—सन १९११ गौरवर्ण, सासरा कारकून. संतती—एक मुलगा पहिलीचा. दुसरीचे दोन मुलगे व दोन मुली. विद्या—इंग्रजी ४ यत्ता, वयाच्या १८ व्या वर्षी नोकरी लागली व १९१७ सालीं सुटली. धंदा—रेल्वे नोकरी. आप्तवर्ग—मेव्हणे खाजगी नोकर. संकटकाल—१९०२ सालीं सापापासून बचाव, १९०० सालीं रेल्वेअपघातापासून बचाव.

### कुंडलीक्रमांक १५२

शके १७९१ ज्येष्ठमासे शुक्लपक्षे दशम्यांतिथी मंदवासरे श्रीसूर्योदयातगत घ. २० प. १० समये जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शरीरवर्णन—कृश नाहीं पण विशेष स्थूल नाहीं, डोळे मामुली, लांबट नाहीं, दांत मोठे, कपाळ मोठे एकंदरींत मध्यम, व्यंग—शरीर व्यंग नाहीं, दांतदुखी. अत्यंत आजारी असलेली वर्षे—त्यांतल्यात्यांत १२-१३-१८-२० वर्षेपर्यंत ज्वरपीडा असे, आतां क्वचित. आईचा मृत्यु—सन १९०९ वडीलमृत्यू—१९०२ पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—अगदीं साधारण, जमीन घर आहे. सध्यांची सांपत्तिक स्थिति—मध्यम, सर्व भावंडें स्वपराक्रमानें उपजीविका करीत आहेत. भावंडें—एकंदर ८ त्यांत आज ह्यात माझेसह पांच, पाठीवरील भाऊ लहानपणींच वारला. वडील भाऊ ह्यात २ लहान भाऊ व बहीण १, विवाह—१८९२ चा फाल्गुन महिना. स्त्री साधारण काळसर, स्त्रीचा मृत्यु–माघ व॥ १०–१९१८ बाळंतपणांत वारली. संतती—पहिला मुलगा जन्म ता. १३ मार्च १८९९ दुसरी मुलगी जन्म २७ जुलै १९०२, वारली ज्येष्ट १९१९. तिसऱ्या मुलाचा जन्म २६ डिसेंबर १९०४ मृत्यु ८-५-०६, चौथा मुलगा जन्म ता. ६-६-०६ ह्यात, कालेजांत असून बी. ए. झाला आहे. पांचवी मुलगी जन्म शके १८३० पौष शु. १ गुरुवार ह्यात, सहावी मुलगी जन्म ८-८११ मृत्यु, १६-६-१२. सातवा मुलगा जन्म १०-१०-१३ ह्यात नंतर १९१८ त बाळंतीण होऊन कुटुंबाचा मृत्यू विद्या—मिडलस्कूलपर्यंत. धंदा—व्यापारी कंपनींत नोकरी पगार १८५, खर्च फार. थोडी जमीन व घर अशीं दोन्हीं खरेदी केली आहेत पण लहान भाऊ वहिवाट करतो. आप्तवर्ग—चुलते पांच, ह्यात कोणी नाहीं. वडील दोन भाऊ, लहान एक भाऊ व लहान बहीण ह्यात आहेत. चुलतभाऊ ३ ह्यात आहेत, एक चुलतभाऊ हायस्कूलमध्यें मास्तर, दुसरा डॉक्टर, तिसरा पेनशनर. संकटकाल—कांहीं कांहीं वेळीं नेहमी विरोध, यशाचा हिस्सा कमी. इतर गोष्टी—दाताचे दुःख लहानपणापासून फार म्हणून सरासरी ५।६ वर्षांपूर्वी सर्व काढून टाकिले व कृत्रीम बसविले आहेत. स्वतःचे लग्नापासून सर्व स्वतःच्या मिळकतीवर करून इतर भावास वगैरे शक्य ती मदत अद्याप चालूं.

कुंडलीक्रमांक १५३

श्रीशके १७९९ कार्तिकमासे शुक्लपक्षे अष्टम्यांतिथौ भौमवासरे श्रीसूर्योदयालगत घ. ८ जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

शरीरवर्णन—साधारण बळकट, ठेंगणा बांधा, चेहरा गोलसांवळा, दांत साधारण कपाळ मोठे व्यंग नाहीं. अत्यंत आजारी असलेली वर्षे—४४ पासून आठेचाळीस म्हणजे सरासरी ४

वर्षे लागोपाठ. आईचा मृत्यु—सन १८९६, वडील मृत्यु—सन १९०६, पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—अगदीं साधारण थोडे उत्पन्न आहे. सध्यांची सांपत्तिक स्थिति—जवळ जवळ चांगली नाहीं. उभयता भाऊ स्वपराक्रमानें उपजीविका करतात. भावंडें—लहान भाऊ एक वय सरासरी छत्तीस वर्षे, पाठच्या भावंडाचा १।२ वेळा गर्भपात, एक बहीण २५ वर्षांची होऊन वारली, दुसरी बहीण लहान असतां वारली. विवाह—सन १९०२ सालीं. स्त्रीचा वर्ण साधारण गौर, संतती—फक्त एकच मुलगा सरासरी २७ वर्षांचा ग्रॅज्युएट झालेला आहे. विद्या—म्याट्रिक पास. धंदा—नोकरी पूर्वी सरकारी नोकरी मिलीटरींत ती सोडून नंतर खाजगी दवाखाना, नंतर एका कंपनींत. आप्तवर्ग—पांच चुलते, कोणी हयात नाहींत, एक लहान बंधू, पांच चुलत बंधू व एक चुलत बहीण, एक मेव्हणा वकील आहे. इतर गोष्टी—जमीन विकत घेतली आहे परंतु उत्पन्न पदरांत पडत नाहीं.

### कुंडलीक्रमांक १५४

श्रीशके १८२९ आश्विनेमासे शुक्लपक्षे एकादश्यातिथौ गुरुवासरे श्रीसूर्योदयात्गत घ. १२ प. ३० समये जन्म. जन्मतारीख १७ माहे आक्टोबर १९०७.

जन्मकुंडली

स्पष्ट ग्रह

| | र. | च. | म. | बु. | गु. | शु. | श. | रा. | ल. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| रा. | ५ | १० | ९ | ६ | ३ | ६ | १० | २ | ८ |
| अं. | २९ | ११ | १४ | ४ | १९ | ९ | २६ | २५ | ९ |
| क. | ५० | १५ | १८ | ३२ | ४९ | ४५ | ३ | ३४ | ४ |
| वि. | १४ | ० | १३ | ४६ | ३७ | ३९ | ३९ | ५७ | ३ |
| क. | ५९ | ७९.९ | ३० | ५४ | ७ | ७४ | २ | ३ | |
| वि. | ४९ | ४५ | ५० | २० | ३६ | ५३ | ४५ | ११ | |

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शरीरवर्णन—साधारण, विशेषतः अशक्त, चेहरा गोल, दांत पुढील दोन साधारण मोठें, बाकीचे उत्तम. वण वगैरे बिलकूल नाहीं. वर्ण गौर तांबडी झाक विशेष, किंचित काळी छटा, कपाळ मोठें, ( गजमस्तकी ) उंच काठी, उंची ५॥ फूट, छाती ३४ इंच, अव्यंग. प्रकृति एवढ्या ३।४ वर्षांत अशक्त होत चालली आहे, स्वभाव महत्वाकांक्षी फार, देशपर्यटनाची व विशेषेंकरून इंग्लंडला जाण्याची तीव्र महत्त्वाकांक्षा. गंडांतरें वगैरे—वय महिने २॥ पासून ३॥ पर्यंत ( पौषमासी ) मोठें गंडांतर, घात झाला, एका विभूतीच्या प्रसादानें पुनर्जन्म, मग पुढें किरकोळ आजार ७, १२ वगैरे वर्षी व इतर वेळेस पुष्कळ मेले आई व वडिलांचे सौख्य—वडील बी. ए. झाले होते व एल्. एल्. बी. चा अभ्यास घरीं चालू होता, दोन वर्षे १९०६।१९०७ ( सिंध ) हैद्राबादमध्यें शिक्षक ( कॉलेजात ) पगार २५० रु. दरमहा. पण प्लेगनें मुठा येवले येथें रानांत मि. भाद्रपद व. ६ रोज शुक्रवार सकाळीं ३ वाजता वारले. आईस माझे वयाचे २॥ महिन्याचे वेळेस आजार झाला, आईची आई वय वर्षे ११वे लागतांच वारली. वडिलांची सांपत्तिक स्थिति—अगदीं साधारण. त्यांची पूर्वार्जित इस्टेट फक्त एक घर ( आज अदमासे ५००० रुपयाचे ) आहे. वडिलाचा धंदा—नोकरी शिक्षक. ( कॉलेजात ) दरमहा २५० रु. वकीलीचा अभ्यास झाला होता, परीक्षेला बसणार होते पण वारले. स्वतः अजून कांहीं उद्योग अगर नोकरी करीत नाहीं. भावंडें—भावंडें वगैरे कांहीं नाहीं. अगोदर एक सावत्र बहीण होती. आईस कसलाच विकार वगैरे नाहीं. ( कुटुंबांत माणसे फक्त दोनच आई व मी ) आईची तब्येत १ वर्षापासून मानसिक हृद्रोगानें फार बिघडली आहे. ( ऋण झाल्यामुळें.) विद्या—प्रिव्हियस पास १९२५ मध्यें, आजपर्यंत कधीं विद्येंत अपयश नाहीं, पण विद्यायोग भंग झाला आहे. आईचे वडील व वडिलांचे वडील नामांकित वकील येवले येथें होते. आईस भाऊ वगैरे कोणी नव्हते. अगोदर वडील व मग आजोबा वारले ( आईचे.) म्हणून अदमासे ५००० रुपयाची स्थावर आईचे चुलत चुलत्यास मिळाली. आजीस ( आईचे आईस ) १००० रुपयेच मिळाले, तेही युक्तीप्रयुक्तीनें गुप्त रीतीनें मिळविले. आजीनें येवले येथें एक घर बांधले आहे ( आज किंमत ५००० रु.) ते माझे नावावर आहे. आजीस कोणी नव्हते म्हणून सर्व इस्टेट मला जन्मतःच मिळाली. पण बहुतेक इस्टेट गेली व शिवाय ऋणयोग झाला. पुणें येथील घर मलाच मिळाले. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काळ—जन्मापासून वय वर्षे ६ पर्यंत उत्कृष्ट पुढें साधारण. दिवाणींत दावा १९२२ आक्टोबरपासून १९२३ पर्यंत, आम्ही प्रतिवादी होतो. येथील घराचा पूर्वीचा मालक ( बाई ) घर परत मिळण्याबद्दल मांडली, त्यात आमचा ५०० रुपयेपर्यंत खर्च झाला. निकाल आमचे बाजूनें झाला. आजीचा वारस या नात्यानें दहा हजाराची व बापाचा वारस म्हणून पाच हजाराची अशी १५००० हजाराची इस्टेट वारसा या नात्यानें जन्मतः मिळाली. पण आतां फक्त दोन घरें शिल्लक आहेत व कर्ज आहे. घरांची किंमत अदमासे दहा हजार आहे. पण घर विकावयास बिलकूल मन होत नाहीं. मामा—( आईचा मावसभाऊ ) घरंदाज ( × × येथें ) व्यापारी आहेत. त्यांची सहानुभूति आमच्याबद्दल बरीचशी आहे. सचेचे दोन घरें पूर्वार्जित आहेत.

### कुंडलीक्रमांक १५५

श्रीशके १८०२ चैत्र शु. १४ युक्त १५ शनिवारीं सूर्योदयात्गत घ. ३६ प. ३४ समयें जन्म.

जन्मकुंडली

स्पष्ट ग्रह.

| ग्रह | र | च | मं | बु | गु | शु | श | रा | के | ल |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| राशि | ० | ६ | २ | ११ | ११ | ११ | ११ | ८ | २ | ७ |
| अंश | १२ | ८ | १४ | १७ | १३ | २२ | २७ | १७ | १७ | १० |
| कला | ४९ | ३८ | ५४ | ३२ | ३४ | ६ | ३३ | ४९ | ४९ | ४१ |
| विकला | ५० | १६ | ४५ | ४८ | ८ | २३ | २१ | २२ | २२ | १३ |

### आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शरीरवर्णन—शरीराचा रंग श्यामवर्ण, किंचित् स्थूल, अल्प रोगट. भावंडें—एकंदर ७, बंधु ३ व भगिनी ४, पैकीं ३ भगिनी हयात, बंधु लहानें वयांत मयत. पितृसुख २५ वर्षे, मातेचें सुख ४८ वर्षे. विवाहयोग २२ वर्षांचे सुमारास. विद्या—मराठी, गुजराथी लिहिणें. नोकरी धंदा—व्यापारी पेढीवर. आजपर्यंत संतति ५ होऊन मेली. पुत्र ३, कन्या २. इस्टेट राहण्याचें फक्त घर, फार गरीब स्थिति.

### कुंडलीक्रमांक १५६

श्रीशके १७९८ कार्तिक शु. ९ गुरुवासरे श्रीसूर्यास्तात्गत घ. २४ प. २८.

जन्मकुंडली

स्पष्टग्रह.

| ग्रह | र. | च. | म. | बु | गु. | शु | श | रा | के |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| राशि | ६ | १० | ५ | ५ | ७ | ५ | १० | १० | ४ |
| अंश | १० | १ | १४ | २१ | १४ | ० | ६ | २५ | १५ |
| कला | ३९ | ९ | ५ | १३ | १९ | ० | २४ | १० | १० |
| विकला | १५ | १५ | १३ | ८ | ५४ | १८ | १३ | १ | १ |

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

५९ वर्षांचें आज वय आहे, आईबाप ह्यात आहेत. वयाचे १२ ते १८ पर्यंत स्मरण-शक्ति फार होती परंतु विद्येचा योग झाला नाहीं. २३ व्या वर्षापर्यंत ऋणयोग नाहीं नंतर ऋणयोग सुरू झाला. हा योग काळ शनिमहादशेपासून सुरू, मुली ३, पुत्र २, पैकीं १ मयत, १ पुत्र व ३ मुली ह्यात, बायको ह्यात आहे.

हे गृहस्थ २४ वर्षांपासून विभक्त आहेत. वडिलोपार्जित उत्पन्नावर निर्वाह. स्वतःचा कांहीं धंदा नाहीं.

कुंडलीक्रमांक १५७

श्रीशके १७९५ वैशाख शु. १० बुधवारीं पहाटेस जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शरीरवर्णन—काळा तांबडा मिश्र वर्ण, स्थूल, २० वर्षांपर्यंत फार दैन्ययोग होता. भावंडें—९, बधु ५, भगिनी ४, पैकीं भावंडें ह्यात सध्या ३, दोन भगिनी व आपण, ३ बधु, २ बहिणी मयत. मातेचे सुख—१२ वे वर्षी ज्येष्ठ वृषांत मयत. पिता १४ वे वर्षी मयत. कार्तिक-वद्य १४ ज्वर विकार बधु २४ वे वर्षापर्यंत नतर मयत प्लेगनें, शके १८१९ ज्येष्ठ वद्य ४. वयाचे १३।१४ ह्या वर्षी फार ज्वरपीडा त्यापासून कानास इजा झाली, (ऐका-

वयास फार कमी येतें.) विद्या—१५ ते २३ वर्षांपर्यंत फार अल्प मराठी व अल्प फलज्योतिष-संबंधीं, धंदा—ज्योतिषीपणाचा, वयाचे २६ वे वर्षांपासून स्वकष्टानें अल्प धनसंपादनाचा योग सुरू आहे. विवाह झाला नाहीं. प्रकृति रोगट. स्वकष्टानें अल्प स्थावर भूमि संपादन वय वर्षें ३८।३९. पूर्वार्जित उत्पन्न स्थावर भूमि संबंधीं होतें ते वयाचे ५ वर्षांपासून नष्ट झालें.

कुंडली क्रमांक १५८

श्रीशके १८१२ मार्गशीर्षमासे कृष्णपक्षे अमवास्यातिथौ शनिवार, पहाटे ५.वा. ३० मि. जन्मतारीख १० माहे जानेवारी सन १८९१.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति—साधारण तापट, गौर मध्यम. गंडांतरें व मोठाले आजार—अज्ञान असतां लहानपणीं एकदीड वर्षांत. (२) मोठेपणीं एक वेळ, त्या वेळीं अति त्रास. (३) एन्फ्ल्युएंझा २८ वे वर्षी, (४) ज्वराचा आजार ३४ व्या वर्षी. आई व वडिलाचे सौख्य—वडिलांचा मृत्यु माहे सप्टेंबर सन १९२४ मध्यें वृद्धापकाळामुळें झाला, आई हयात आहे. आई व वडिलास मोठाले आजार—माझ्यासमक्ष वडिलास एक वेळ आजार झाला, आईस सन १९१६ मध्यें व सन १९१८ मध्यें शैत्याचा झाला होता. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—गरीबीची होती, मी जन्मल्यापासूनचा काल बरा गेला. वडिलाचा धंदा—मजूरीचा. महिन्याचें उत्पन्न ५।८ रुपये. भावंडें एकंदर—४, त्यात हयात २, पाठीवर भाऊ आधीं बहिणी, जास्त भावंडें त्याची संख्या—३, हयात थोरली बहीण माझ्यापेक्षां नऊ वर्षांनीं वडील आहे. विवाह—शके १८३२ मध्यें वैशाख महिन्यात, दुसरा गंधर्व विवाह शके १८३६ माघमासीं, तिसरा गंधर्व-विवाह शके १८४० मार्गशीर्षमासीं. स्त्रीचा मृत्यु—शके १८३६ चैत्रमासी प्लेग होऊन मरण पावली. वर्ण गोरा, दोन मुली, शके १८३८।१८३९ सालीं, शके १८४० वैशाख महिन्यांत मुलगा झाला. भाद्रपदमासी बायको एन्फ्ल्यूएंझा होऊन मृत्यु. मुलगा शके १८४१ ज्येष्ठमासी वारला. वर्ण साधारण काळा, दिव्या सतती झाली नाहीं. हयात स्त्री एक. संतति—दोन मुली शके १८३८।३९ होऊन मृत्यु (प्रथमच झाल्या) नंतर शके १८४० वैशाखमध्यें मुलगा झाला, वेडा होऊन मृत्यु पावला, १८४१ मध्यें. विद्या—व्ह. फा. प. पास सन १९१२ सालीं, सन १९१० व १९११ सालीं अपयश आले होते. भाग्योदय—२२ वर्षांपासून भरभराट, × × व × × × तालुका × × जिल्हा कायम नोकरी सन १९१४ पासून वर्ष २३ पर्यंत ठीक,

वर्षे गेली परतु पैसा राहत नाहीं, सन १९२१ ते १९२५ ह्या पाच वर्षांत कांहीं पैसा शिल्लक राहिला आहे. स्वत वर व्यावहारिक जबाबदारी—नोकरी लागल्यापासूनची जबाबदारी माझ्यावर आहे, दरमहा ३७ रुपये उत्पन्न आहे. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल—शके १८४७ ज्येष्ठ महिन्यापासून पोष्टाचा ९ रुपये फायदा मिळू लागला परतु तो सव्वा महिना मिळाला नतर तेथून बदली होऊन आषाढमासी, सात रुपायावर आहे.

कुंडलीक्रमांक १५९

श्रीशके १८०६ मार्गशीर्षमासे कृष्णपक्षे २ सह ३ तिथौ गुरुवासरे जन्मतारीख ५ माहे डिसेंबर सन १८८४

आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—अशक्त, निरोगी मधून मधून रक्तविकार मूळव्याध वर्ण काळा, दांत पुढें, नाक बसके, शांत स्वभाव. गडांतरें, व मोठाले आजार—सन १९२१ पासून दम, खोकला, रक्तविकार, १९२२ श्रावण न्यूमोनियाचा विकार, १९२२ डिसेंबर कफश्वास दमा. आई व वडिलांचे सौख्य—वडील साहावे वर्षाचे सुमारास मृत. आई १९३० च्या सुमारास मृत. आई व वडिलांस मोठाले आजार—१९०७ जानेवारी आईस आजार वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—गरिबी, वैद्यकी ज्ञान बऱ्याच दर्जाचे वडिलांचा धदा—रेल्वेतारमास्तर, महिन्याचें उत्पन्न—२० मावंडें—एकदर २ त्यांत हयात १ पाठीवर भाऊ आधीं बहीण विवाह—११-१२-१९०६, स्त्रीची प्रकृती—निकोप, मध्यम १९१० बाळंतपणात आजारी ताप सतति—प्रथम पुत्र हयात ४ व मृत ३ जास्त पुत्र ५ मुलगे २ मुली, हयात ४ मुलगे. विद्या—विद्येंत अडथळे नोकरी समाळून विद्या १९०२ पब्लिकसर्व्हिस १९०५ स्कूलफायनल १९०६ मॅट्रिक १९११ वकील. भाग्योदय—१७-११-०३ सुरवात घरसोड १९१० नापास १९०६ ते १९०८।०९ वरी वर्षे १० ते १५ वाईट १९१४ मे ते १९१८ उत्तम पैसा सार्वजनिक कामें किर्ति उत्तम १९१८ मार्च कोर्टांत भांडण. स्वत वर व्यावहारिक जबाबदारी—१९०२, १९१२, १९१६, १९१७, १९१८, १९१९ काशीयात्रा प्रवास अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल—१९१९ आक्टोबरपासून. पैसा, अब्रु, शरीर, या बाबतींत त्रास, शत्रू प्रबळ झाले १९२२ पर्यंत. पुढें हळूहळू बदल १९२५ मार्च इलेक्शनमध्यें यश, अडचण फार, १९२४ बँकेत निवडणूक शत्रूचा

पाडाव. सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत वाईट काल—१९११ ते १९१५ अत्यंत वाईट काल. १९२१ ते १९२४ वाईट. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल—१९१५ मे ते १९२० मे उत्तम काल. १९२१ सप्टेंबर २ रोजीं घराचा व्यवहार ठरला. ११-१२-२३ खरेदीखत. कोणत्याही कार्यांत यश-अपयश कसें काय येतें—खर्चाची अडचण. सरकार अगर लोकाकडून मान—१९२५ मार्च इलेक्शन १५-५-२२ मुलाची मुंज अत्यत अडचणींत झाली. संकटें—सन १९२० जून ते जुलै फौजदारी खटल्याचा त्रास. अखेर सुटका. ९-८-२२ दमा, श्वास व कफ, ताप यांचा आजार गंडांतर, पैसा खर्च फार सांपत्तिक व लौकिक आपत्ती. नोकरी अगर दुसरा व्यवसाय—१९०५ स्कूलफायनल, १९०६ मॅट्रिक १९०३ नोव्हेंबरपासून नोकरी, कोर्टांत १९०६-७-८ सिव्हील सर्जन मुंबई ऑफीस नंतर १९१२ पासून वकील.

कुंडलीक्रमांक ६६०

श्रीशके १८१७ आश्विनेमासे कृष्णपक्षे १४ तिथौ गुरुवासरे हस्तनक्षत्रे घ. ३५ प. ४६ अत्रदिने सूर्योदयीं जन्म. जन्मतारीख १७ माहे १० सन १८९६

जन्मकुंडली.

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति—शारीरिक स्थिती चांगली, ठेंगणा बांधा, किंचित् काळा अगर निमगोरा ल्हानपणीं देवी निघाल्याचे वण, उजव्या मांडीवर, दंडावर व जंघेत तीळ इंद्रीयावर तीळ आहेत. गंडांतरें, व मोठाले आजार—सन १९१८ सालांत इन्फ्लुएंझानें आजारी झालो होतो ह्या नंतर सन १९२४ सालांत थंडीतापानें आजारी होतो. आई व वडिलांचें सौख्य—वडील सन १९१६ ता. १२-१२-१६ ला वारले. तो पावेतो सौख्य चांगले व सन १९१६ जुलैत शाळा सुटली. वडीलांची मूळ सांपत्तिक स्थिति—मूळ सांपत्तिक स्थीति साधारण बरी वडिलांचा धंदा—शेतीचा. महिन्याचें उत्पन्न—वार्षीक उत्पन्न २४०० भावंडें—एकंदर ९, त्यात हयात ५ पाठीवर भाऊ नाहीं. जास्त भाऊ त्यांची संख्या—६ भावंडें मृत पैकीं भाऊ २ व वहिणी २ वारल्या त्या ल्हानपणीं त्यामुळें मला बरोबर आठवत नाहीं. भाऊ हयात ४ व वहिण हयात १ विवाह—सन १९०९ मध्यें झाला. स्त्रीची प्रकृति—कृश, अंगानें सडपातळ रंग काळा सन १९१८ त इन्फ्लुएंझानें अतीशय आजारी त्या नंतर सन १९२२ सालांत बाळंतरोगानें आजारी होती. संतति—३ त्यापैकीं पहिला मुलगा दुसरी मुलगी व तिसरी मुलगी पैकीं तिसरी मुलगी २३-४-२५ रोजीं तापानें वारली. हयात २

मुलगा व मुलगी. विद्या—इंग्रजी ६-७ नागपुरास शिकत होतो ती वडील वारण्याच्या पूर्वी तीन चार महिने आगाऊ संपली. भाग्योदय—नोकरीला सुरवात सन १९२३ सात केली, परंतु फायदा झाला नाहीं. सन १९२४ मध्यें अडतदलालीचा धंदा केला त्यात सहाशें रुपये मिळाले. सन १९२५ मध्यें अडतदलाली केली परंतु पात्र आण्याची पैदास झाली नाहीं स्वत वर व्याव. हारिक जबाबदारी—स्वत.चे शरीरावर सन १९१६ सालापासून जबाबदारी पडली. सालाचे उत्पन्न दोन-सवादोनहजार. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल—सन १९१६ १७ सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत वाईट काळ—सन १९१७ १८ द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल—१९१८-१९ संकटें—सन १९२४ चे एप्रीलपासून दिवाणी कोर्टांत जावे लागले अद्याप केस चालू आहे निकाल झाला नाहीं भावाच्या मुलानें दावा केला. नोकरी—नोकरी रुई खात्यांत केली व धंदाही ह्याच खात्यात चालू आहे. सन १९२३ त नोकरी, १९२४ स्वतंत्र अडतदलाली व सन १९२५ अडतदलालीचा. सासरची सांपत्तिक स्थिति-चांगली नाहीं व लाभही झाला नाहीं. चुलत्यांची परिस्थिति—चुलते २. मयत १ व ह्यात १ सालाचे उत्पन्न तीनचार हजार मामा १ मयत सन १९१८ ता. २८-२-१८ मावशी १ मयत आत्या १ जिवंत. सत्तेचें घर, वाड्गें—वडीलोपार्जीत थोडी इस्टेट व घर आहे ह्यावर प्रपंच चालू आहे.

कुंडली **) ग्रहयोगांचें अनुभव (** क्र. १६१

शके १८२९ अश्विन शु. १२ इ घ. १५ ४५ तारीख १८।१०।१९०७ दुपारी १२।५०

निरयन भावचलित

| र. | च. | म. | बु | गुरु | शु | श. | रा. | के. | ह. | नेप | लग्न |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ६ | १० | ९ | ६ | ३ | ६ | १० | २ | ८ | ८ | २ | ८ |
| १ | २२ | १५ | २४ | २२ | १० | २६ | २५ | २५ | २०।३९ | २६।१९ | २७।३४ |

चंद्र नेप–राहु त्रिकोण–बुध–चंद्र त्रिकोण. नेप–बुध त्रिकोण शनि–नेप. बुध त्रिकोण. गुरु—मंगळ—राहू उच्च. शुक्र—शनि स्वगृही. ( धनयोग—दारिद्र्ययोग पान ४८ )

## विशेष योग.

( १ ) दशमेश—दशमांत—चतुर्थेश—लग्नात सप्तमेश द्वितीयांत.

( २ ) नवमेश—दशमेश—दशमात, पचमेश नवमेश दशमांत.

( ३ ) गुरु उच्च सप्तमात, शुक्र दशमात. लाभेश लग्नांत ( ध. दा. पान ५१ )

( ४ ) शनि स्वगृही व राशीच्या अंती.

( ५ ) रवि निच राशीत, पण त्या राशीचा स्वामी शुक्र दशमांत.

( ६ ) दशमेश दशमात, चंद्रापासून दशमस्थान म्हणजे एकादश स्थान त्याचा अधिपती लग्नांत उच्च राशींत, तो उच्च मंगळ गुरुशीं प्रतियुतींत.

( ७ ) मंगळ उच्च रुचकयोग, गुरु उच्च हंस योग, शनि स्वगृही शश योग, शुक्र स्वगृही मालव्य योग. राहू उच्च राशीस.

चंद्र नेपच्युन—बुध नेपच्युन, बुध चंद्र यांचा त्रिकोण योग, हर्शल बुध–हर्शल चंद्र—त्रिरेकादश योग.

जन्मतः गुरु महादशा भोग्य १३ व ४ महिने नतर १९ वर्षे शनि महादशाः म्हणजे ३२ व ४ महिनेपर्यंत व त्यानंतर १७ वर्षें बुध महादशा. ( विंशोत्तरी )

सदर कुंडलींत वर दर्शविल्याप्रमाणें तीन ग्रह, उच्च व दोन स्वक्षेत्री असून, अत्यंत बलवान असें आठ त्रिकोण योग होत आहेत. भाव चलित कुंडलीत दशम बिंदू तूळ ७ अंशांत असून शुक्र तेथेच दहा अंशांत आहे, व खालील सर्व गोष्टी भावचलित कुंडलीवरून दिलेल्या असल्यामुळें अंशात्मक योग लक्षात घेणें जरूर आहे.

जन्म सन्मान्य घराण्यांत, जन्मकालीन परिस्थिति बऱ्यापैकीं, एकंदर भावंडें ११ पैकी हयात वडील दोन बंधू व एक बहीण आणि कनिष्ट दोन भगिनीं.

जन्मानंतर सुमारे १४ वर्षांचा काळ एकंदर घराण्यास श्रेष्ट, वय वर्षे १३ पासून शिक्षणासाठीं पर ठिकाणीं वास्तव्य वय वर्षे १३ ते १८ वडिलास अत्यंत नुकसानीचा हजारो रुपये तोटा ( नुकसान ) होऊन त्याचे परिणाम पुढें सदर कुंडलीचे गृहस्थाना सुमारे सहा वर्षे भोगावे लागले.

वय वर्षे १९, जन्मस्थ शुक्राशी ( पंचमेश ) गुरुचा त्रिकोण योग व पंचमस्थानाशी तोच योग—मॅट्रिक परिक्षेत यश. याच वर्षी विशेष योग घडून आले व ते अत्यंत महत्वाचे आहेत.

जन्म कुंडलींत चंद्र नेपच्युन—बुध नेपच्युन व बुध चद्र यांचा त्रिकोण योग आहे. चंद्र नेपच्युन त्रिकोण स्फूर्ति—कल्पना वगैरे गोष्टीचा कारक असून सन १९२६ मध्ये गुरु—जन्म नेपच्युनशी प्रतियुतीत—नेपच्युन—जन्म चद्राशी प्रतियुतीत गुरु जन्म चद्राशी व नेप—जन्म नेपच्युनशीं त्रिरेकादश योगांत बुधाशी गुरुचा व नेपच्युनचा त्रिरेकादश योग, या वेळीं अकल्पिक रीतिनें अध्यात्म विषयावर पुस्तक लिहिले गेले व फलज्योतिष शास्त्राकडे मनाचा कल वळून, त्यानंतर सुमारे दहा वर्षे या शास्त्राप्रित्यर्थ अविश्रांत श्रम होत आहेत.

हर्शल चंद्र त्रिरेका दश, रवि बुध गुरु तूळ राशीत या सर्व ग्रहयोगामुळें व त्यातच चंद्र कुंभ राशीत असल्यामुळें अपूर्व कल्पना शक्ति, फलज्योतिष शास्त्राकरिता अविश्रांत श्रम, चिकाटी वगैरे दिसून येते. तूळ राशीतील रवि बुधाला अत्यंत महत्व देण्यात येते वेदांतादि गूढ तत्वाकडे मनाचा कल, त्यात प्रगती विविध विषयांची चिकित्सक ज्ञानाची व तत्वज्ञान अध्यात्म विद्या वगैरे ज्ञान प्राप्ती होणे ह्या सर्व गोष्टी ह्या कुंडलीत व मूळचे ग्रह बळवान असल्या कारणानें ह्या कुंडलीचे गृहस्थांचे आयुष्यांत लहान वयापासून दिसून येतात.

पंचमेश नवमेश व दशमेश दशमांत असून गुरु-मंगळ उच्च हे योग अत्यंत बळवान आहेत.

एकंदरीत वय वर्षे १९ मध्यें गोचर ग्रहांचे योगांत महत्वाचे लेखन हातून घडून प्रसिद्धी व किर्तीकारक गोष्टींची सुरुवात झाली, याच वर्षी नोकरी मिळून ती आठ नऊ वर्षे व्यवस्थित चालल्याचे दिसून येते.

मात्र शनिचे परिणाम विशेष जाणवू लागले—एके ठिकाणीं असें म्हटले आहे कीं शनिचे चंद्रावरून भ्रमण अगर युतीपेक्षा, शनि रवीयुती अगर रवि चंद्राचे मध्य बिंदू वरून, शनीचा भ्रमण काळ जास्त त्रासाचा व बिकट परिस्थीति उत्पन्न करणारा दिसतो व त्याप्रमाणें ह्या कुंडलीवरून बरोबर अनुभव मिळाले आहेत. शनीचे रविवरून—दशम बिंदु सन्निध भ्रमण सुरु होताच सदर कुंडलीवाल्यांचे वडील प्रकृतीनें खालावले—सुमारे पंधरा वीस हजार रुपये नुकसान—करून सुमारे पांच सहा वर्षे अत्यंत बिकट परिस्थिती ( वडिलांना ) उत्पन्न केली व शनि रवि चंद्राचे मध्य बिंदूवर येताच वडिलांचे निधन झाले; एवढेच नव्हे तर ह्या कुंडलीत हा मध्य बिंदु व्ययात असल्यामुळें या शनीनें फार मोठी जबाबदारी सदर कुंडलीवाल्यांचे अंगावर टाकली; तथापि मनावर मात्र ( मूळचे ग्रह बळवान असल्यामुळें ) फारसा आघात झाला नाहीं. वय वर्षे २४ पासून पुन्हा कांहीं गोष्टी शुभ परिणामकारक घडून आल्या—व त्या कुंडलीतील अंशपूर्ण योगांशी बरोबर जमल्या आहेत. शनि रवि युतीनें उत्पन्न झालेली अटोक्या बाहेरची परिस्थिती, गुरु जन्म गुरुवर व रवीशी त्रिरेकादश योगांत येताच, अत्यंत विलक्षण शुभ योगानीं ती अटोक्यात आली. अशक्य व कल्पनातीत गोष्टी घडून अत्यंत महत्वाच्या जबाबदारीतून चांगल्या रीतिनें पार पडता आले.

नंतर दशमाशी गुरुचे शुभ योगानें लेखन व्यवसाय त्यात प्रसिद्धी, मोठमोठ्या अधिकारारुढ व्यक्तिशी संबंध त्यांचेकडून मानसन्मान, ऐहिक व त्याच बरोबर पारमार्थिक प्रगती-प्रवास वगैरे योग घडून आलेले आहेत.

कुंडलीतील स्थानांचे जे चार त्रिकोण योग होतात त्यांत दशम द्वितीय व षष्ठ ह्या स्थानांचा त्रिकोण योग ऐहिक श्रेष्ठत्व देणारा दिसून येतो मात्र ह्या कुंडलीत द्वितीय स्थानातील शनि चंद्र युतीनें द्रव्य दृष्ट्या कमीपणा असून दशमाशी होणारे शुभ ग्रहांचे योग, विशेष मानसन्मान दर्शक व प्रसिद्धी करणारे होतात ते द्रव्य दृष्ट्या वरील योगामुळें फारसे परिणामकारक होत नाहींत. बुधचंद्र त्रिकोण हा विशेष महत्वाचा दिसून येतो.

सप्तमेश चंद्र कुंभ २२ अंशांत त्याच्याशी गोचर गुरुचा त्रिकोण होताच वय वर्षे २८मध्यें विवाह या वेळीं दिनवर्ष पद्धतीची कुंडली पाहिल्यास त्यात सप्तमेश रवि तूळ २७ अंशांत

व त्याच्याशी गोचर गुरु अंशात्मक युति योगात येताच विवाह घडून आला. वय वर्षे १९ पासून विवाह योग येत होते परंतु त्यातील एकही जमविला नाहीं व अखेरचा अकल्पिक रीतिनें एकदम जमून येऊन विवाह झाला. वरील कुंडलीतील एकंदर ग्रहयोगावरून खाली दिल्याप्रमाणें अनुभव दिसून येतात.

मागें दिलेल्या वृत्तांतावरून चंद्र नेप-बुध-नेप-बुध चंद्र, त्रिकोण, पंचमेश, नवमेश, दशमेश दशमांत, रवीच्या एकादशांत गुरु व द्वितीयांत बुध, शुक्र, एकादशाचा अधिपती मंगळ तो उच्च असून गुरु उच्च राशीस आहे व त्याचा समसप्तक योग, हा योग मोठमोठ्या, आधिकारारुढ गृहस्थांशीं स्नेहसंबंध, मानमान्यता देणारा दिसून येत आहे. हर्शलबुध व हर्शलचंद्र त्रिरेकादश योग विशेष असून नेपच्युन चंद्र त्रिकोण गुढ शास्त्र, अध्यात्म विषय, स्फूर्ति, फलज्योतिशशास्त्र वगैरे गोष्टींत चांगली बुद्धी देतो. हर्शल हा अद्भुत विद्या, गूढ शास्त्रें, फलज्योतिष, उच्च प्रकारच्या यंत्र-शास्त्राची माहिती तसेंच हा ग्रह अपूर्व कल्पनाशक्ति उत्पन्न करून अध्यात्म विद्येची आवड करतो. बुध-चंद्र त्रिकोण योग, गायन, वादन, कवित्व वगैरेचा दर्शक असून ह्या गृहस्थांचे आयुष्यांत त्या दृष्टीनें पूर्ण अनुभव दिसून येतात.

नेप-बुध त्रिकोण योगानें मनुष्य चागल्या प्रकारे लेखक बनून नांवलौकिक मिळवितो हा योग ह्या कुंडलींत वयाचे १८-१९ पासून अनुभवास ( गोचर ग्रहांचे अनुकूल भ्रमणामुळें ) येत आहे.

बुधाचा शनीशीं त्रिकोण योग हा विद्या संपादन करण्याचे दृष्टीनें फार महत्वाचा आहे. बुध बुद्धीचा कारक तो शनि लग्नेश व त्याचा धर्म चिकाटी ह्यामुळें अविश्रांत बौद्धिक श्रम करून कोणतीही गोष्ट पूर्ण होईपर्यंत स्वस्थता न देणें हा अनुभव दिसून येतो. चंद्र-नेप त्रिकोण जनतेची मनें आकर्षण करून घेण्यास समर्थ करून, आत्मविश्वास, कल्पनाशक्ति वगैरे गोष्टींचा दर्शक आहे.

शनि-नेप. हा अध्यात्मिक योग व अतिशय चिकाटी दर्शवितो, वय वर्षे १९ ( दिनवर्ष पद्धतीनें सप्तम स्थानाचे त्यांत जन्मस्थ गुरु कर्केचा ) या वेळींच सुमारे चाळीस दिवस अविश्रांत लेखन झाले. सारांश शनि नेपच्युन त्रिकोण योगानें. एखादी गोष्ट करावयाची म्हटल्यास एकाग्रता होऊन शेवटपर्यंत चिकाटी धरणें. अशा प्रकारचे अनुभव दिसून येतात.

दशमांतील गुरुचे बुध-शुक्रावरून—जन्मस्थ चंद्राशीं त्रिकोणांत भ्रमण होऊं लागतांच विशेष प्रसिद्धी वगैरे दृष्टीनें योग अनुभवास आले आहेत.

तूळ राशींतील रवीस महत्व देण्यांत येते. तूळ म्हणजे तौलिक तराजू, तराजूस ज्याप्रमाणें थोडेंसुद्धा कमी जास्त खपत नाहीं त्याप्रमाणें रवी तूळेंत असतांना अत्यंत न्यायी बुद्धी, दिसून येते. नवम व तृतीय ही प्रिटिंग छापखान्याची व प्रसिद्धीची द्योतक, त्यांत शुक्र अनुकूल व त्यामुळें २२ वे वर्षापासून ( सेकडरीनें दशम स्थानचे ) लेखनद्वारा प्रसिद्धीचे योग.

कोणत्याही विषयाचे मर्म जाणण्याची योग्यता गुरुची आहे, त्यांत वरील त्रिकोण योगानीं जास्त भर टाकल्याकारणानें, ज्योतिषशास्त्राकडे कल, प्राविण्य, तर्क बुद्धी व विचार स्पष्ट दिसून येतात.

दशमस्थान शुद्ध असून वय वर्षे २१ पासून नोकरीची सुरुवात ( दिनवर्ष नवमस्थानचे त्यांत रवी त्यावर गोचर रवि युती झाली त्याच दिवसापासून होऊन, अधिकारी वर्गाची सहानुभूती विशेष दिसून येते.

दशमांतील बुध बलवान असल्यामुळें वाङ्मयातील प्रसिद्धीस मदत होते, गुरु-मंगळ प्रतियुती गणितज्ञान दर्शविते. उदित अंशासन्निध असलेला कोणताही ग्रह अत्यंत बलवान असतो. ह्या कुंडलींत शुक्र हा स्वगृही दशमभावारंभी असून त्याचे परिणाम तो पंचमेश असल्यामुळें जास्त शुभ अनुभवास येतात. ह्या कुंडलींत शुभ योगाप्रमाणेंच अशुभ योगही झालेले आहे. बुध-शुक्र-मंगळ यांचा केंद्र योग, शनि-चंद्र युती हे पाप फले उत्पन्न करणारे आहेत व त्याच्याशीं गोचर ग्रहांचे अनिष्ट योगांत अत्यंत कटु अनुभव आलेले आहेत, परंतु शुभ योगानीं त्यांतून मुक्तता होण्यास लवकर मदत होते. मंगळाचे अनुभव भाजणे, पडणें वगैरेदृष्ट्या अतिशय झालेले आहेत. मानसिक स्वास्थ्याचा भंग करून उद्विग्नता उत्पन्न करणें पण शुभयोग होतांच ती नाहींशी करणें वगैरे अनुभव बरोबर आलेले आहेत. कुंडलींतील वेगवेगळ्या अनुभवाचे वेळी असलेली ग्रहस्थिति खालीलप्रमाणें आहे व त्यावरून सूक्ष्म निरीक्षणानें अनुभव कसे पटतात ते दिसून येण्यास मदत होईल सबब ते योग देत आहे.

(ता. २१।१०।१९२६ लेखनकाल)
(जन्म चंद्र—गोचर चद्रयुति.
,, पंचमारी ,, गुरुत्रिकोण
,, चंद्र ,, नेप-समसप्तक
,, ,, शनित्रिकोण
,, ,, ,, शुक्र-समसप्तक

लेखनप्रसिद्धि—अकल्पिक रीतीनें ३।२।१९२९
जन्म चंद्र गुरु=त्रिरेकादश गोचर—गुरु—
शनित्रिकोण करून पुढे सरकलेला.
मात्र ह्या योग पुढें विशेष फलदायक
झाला नाहीं.
चंद्र राहू—समसप्तक×

भयंकर जबाबदारीची सुरवात—पितृनिधन. ७।८।१९२९
शनि—जन्म रविचंद्राचे—
मध्य बिंदूवर मंगळ जन्म रवीचे व्ययांत.

अकल्पित रीतीनें जबाबदारींतून पुष्कळशी
सुटका. १५।६।३२

गुरु—जन्मगुरु संनिध जन्मरविच्या एकादशांत
रवि—शनीयुतीनें उत्पन्न केलेल्या प्रासादन
रोकडा ५० दिवसे मुक्तता.

ता. १३।८।१९३४.

विशेष प्रसिद्धीयोग—प्रवास, मानमान्यता वगैरे
गुरु—जन्मरविसन्निध नवमांत, शनि–गुरुचा अंशात्मक त्रिकोणयोग. लग्न नवम स्थानातून.

मे १९३५ लेखनप्रसिद्धी, विवाह, प्रवास वगैरे.

जन्मशुक्र—रविसन्निध गुरु
,, ,, व गोचर बु. शु. त्रिकोण
जन्मस्थ चंद्र ,, ,, ,, ,,
,, ,, ,, गुरु ,,
दिनवर्ष सप्तमेश रवि व गोचर गुरु यांची युती.

[ जन्मकुंडलीतील ग्रहयोग लक्षांत यावेत म्हणून त्या त्या दिवसाची मुद्दाम मकरलग्नाच्या वेळची कुंडली वर दिली आहे. ]

वरील कुंडल्यावरून त्या त्या वेळची ग्रहांची स्थिति लक्षांत येते व त्याप्रमाणें अनुभव कसे जगले आहेत तेंहि स्पष्ट होते.

कुंडलीत दशमाधिपती केंद्र अगर त्रिकोणांत असून सप्तमेश द्वितीय स्थानात हा एक श्रेष्ठ योग होतो. ( व. यो. पान ५२ )

मकर लग्न असता मंगळ गुरु व चंद्र अशुभ फल देतात, शुक्र व बुध शुभ फल देतात एकटा शुक्र राजयोगकारक होतो, चंद्र-शुक्रयोग असेल तर विशेष फलदायक होय.

शुक्र पंचमाधिपती व दशमाधिपति आणि बुध षष्ठाधिपति व भाग्याधिपति असतो म्हणून तो शुभ. चंद्र शुक्रयोग विशेष फलदायक सांगण्याचा हेतू, शुक्रपंचम दशमाधिपति व चंद्र सप्तमाधिपति हाच आहे. ( ध. यो. दा. यो. पान २६२ )

ह्यावरून मकर लग्नास शुक्राची अनुकूलता जास्त पाहिजे हे स्पष्ट दिसून येते. व वरील कुंडल्या पाहिल्यास ते अनुभव स्पष्ट दिसून येतात.

सारांश वरील एकंदर विवेचनावरून कोणत्याहि कुंडलींत ग्रहांचे अंशात्मक योग पहाणें किती जरूरीचे आहे हे स्पष्ट होते. व ह्यामुळेंच फल ज्योतिषशास्त्रांत अत्यंत सूक्ष्म निरीक्षणाची किती जरूरी आहे हे दिसून येते. ह्या कुंडलीवरून अत्यंत सूक्ष्म गोष्टींचेंहि कसकसे आले आहेत ते स्पष्ट करिता येतील परंतु स्थल संकोच्यास्तव वरील सर्व सारांशरुपानें दिले हे. कारण प्रत्येक वेळचे ग्रहयोग व त्यांचे स्पष्टीकरण करावयाचे झाल्यास एक वेगळे पुस्तक .... सबब एवढेच निवेदन केले आहे."

कुंडलीक्रमांक १६२

जन्मतारीख २७ माहे डिसेंबर १८९२ संध्याकाळीं जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

शरीरवर्णन—कृश, डोळे घारे, चेहरा लावट, दात मोठाले, तोंडावर देवीचे व्रण, वर्ण तांबूस, कपाळ लहान, एकदरींत शरीर मध्यम, देहीं व्यंग नाहीं; प्रकृति नेहमीं अशक्त, पण महत्वाकांक्षी. अत्यंत आजारी असलेली वर्षे—वयाच्या ६ व्या वर्षी देवी, ९-१० व्या वर्षी रक्तदोष, खरूज, १८ व्या वर्षी ज्वरपीडा, २४ व २८ व्या वर्षीही ज्वरपीडा फार. आईचा मृत्यु—सन १९१६ आक्टोबर, प्लेगनें. वडिलांचा मृत्यु—१८९९ डिसेंबर, प्लेगनें. पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—अगदीं साधारण, पूर्वार्जित उत्पन्न वगैरे कांहीं नाहीं, गरीबी. सध्यांची सांपत्तिक स्थिति—मध्यम असून भरभराट वाढत्या स्वरूपांत आहे. सर्व भावंडें स्वपराक्रमानें उपजीविका करीत आहेत. चुलता इंजिनीयर डिपार्टमेंटमध्यें होता. भावंडें—माझ्या पाठीवर भाऊ, तो हयात; माझ्या आधीं बहीण, ती मयत सन १९१० मध्यें; आज वहिणी थोरली १ व भाऊ १ व लहान भाऊ २ हयात. एकदर भावंडें ११ त्यांत आज हयात ४. विवाह—सन १९१४ जुलै, स्त्रीचें स्वरूप, पहिली स्त्री कृष्णवर्ण, १ मुलगी होऊन मयत १९२० आक्टोबर. दुसरा विवाह १९२२ दुसरी स्त्री गौरवर्ण. सासरची सांपत्तिक स्थिति सामान्य, सासरा क्लार्क व शाळामास्तर, दुसऱ्या स्त्रीला एक भाऊ, तिचा चुलता वरिष्ठ अधिकारी. संतति—सन १९१८ मध्यें पहिल्या स्त्रीस गर्भपात, सन १९१९ साली डिसेंबरांत मुलगी, सन १९२३ डिसेंबरांत दुसऱ्या स्त्रीस मुलगी, पहिली बायको सन १९२० आक्टोबरमध्यें मुलीसह जलोदरानें वारली. विद्या—एम्. ए. व एल्एल्. बी. वैद्यक व ज्योतिषशास्त्राची आवड, अपयशाची वर्षे सहसा गेलेली नाहींत, यश आलेली वर्षे वयाच्या १६ विशेषत २२ वर्षापासून उत्कर्ष सारखा होत आहे. धंदा—देवधेवीचा. वकील व स्वतंत्र व्यवहार, सांप्रत महिना उत्पन्न २०० ते ४००, पण खर्चही तितकाच. जमीन-जुमला, घर वगैरेचें सुख अद्याप नाहीं, आजपर्यंत २।३ धंदे झाले. आप्तवर्ग—हयात मामा २, पैकीं १ व्यापारी व १ नोकर, हयात मावशी १; चुलता १९१४ मध्यें मयत, चुलती व चुलत-भाऊ आहे. विशेष गोष्ट—शत्रु फार, पण अखेर अनुकूल होतात, दोनही भाऊ वकील, मेव्हणे सरकारी नोकर. संकटकाळ—नेहमी विरोध अति. १।२ वेळ फौजदारीच्या अरुया पण प्रयत्न

कांहीं नाहीं. लोकांत मान्यता व सन १९१७-१९२० पासून महत्कार्यांत यश. भाग्योदय—स्वपराक्रमानें; प्रत्येक कामांत शत्रु, विशेष मदत कोणाचीही नाहीं, फक्त बहीण व मेव्हणे यांजकडून लहानपणीं मदत. द्रव्ययोग—वयाच्या १४-१५ वर्षांपर्यंत सुमारें ३०० रु. वार्षिक प्राप्ति वयाच्या १६ वर्षांपासून २० वर्षांपर्यंत वार्षिक ५०० रु. प्राप्ति; वयाच्या २२ वर्षापासून भरभराटीला विशेष प्रारंभ; वयाच्या २५ व्या वर्षी एका अलौकिक आणि अधिकारी पुरुषाशीं स्नेह व महत्वाच्या कार्यास आरंभ. वय वर्षे २६ ते २९ वार्षिक उत्पन्न सुमारें २००० ते ३५००; वयाचे २९ ते ३२—आहे तीच स्थिति कायम. आज उत्पन्न सुमारें ( महिना ) १०० ते २०० रु. पण त्याच्याहींपेक्षां जास्त खर्च, फक्त व्यवहार व उलाढाल फार. वयाच्या ३३ व्या वर्षी सुमारें ४००० रु. मंगलकार्यार्थ खर्च, वयाच्या ३० व्या वर्षी मंगलकार्यार्थ १५०० रु. खर्च. नेहमीं प्रापंचिक खर्च विशेष. वय वर्षे २८ ते ३२ पर्यंत सार्वजनिक कार्यार्थ सुमारें १५०० रु. खर्च. आप्तवर्गाकडून मदत नाहीं, उलट त्यांच्याकरितांच व भावाकरितां खर्चाचे प्रसंग जास्त. सर्वांत जास्त साह्य आईचें.

### कुंडली क्रमांक १६३

श्रीशके १७९९ मार्गशीर्षमासे कृष्णपक्षे पंचम्यांतिथौ भोमेवासरे घटी ४।१२ सह ६ मघा नक्षत्रे घ. ११।२६ सह पूर्वा अत्रदिने श्रीसूर्योदयातगत घ.१२ प. १५ समये जन्म जन्मतारीख २५ माहे १२ सन १८७७.

जन्मकुंडली

स्पष्ट ग्रह

| | र. | चं. | म. | बु. | गु. | शु. | श | रा. | के. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| रा | ८ | ४ | ११ | ८ | ८ | ९ | १० | १० | ४ |
| अं. | ११ | १३ | १७ | २८ | २१ | २६ | २० | २ | २ |
| क. | २७ | २१ | ५८ | ५० | ३८ | २५ | १६ | ५७ | ५७ |
| वि. | ४६ | १४ | १ | ३४ | १ | ३२ | ७ | २ | २ |
| | ६१<br>१६ | ७९०<br>३५ | ३९<br>५० | ५७<br>८ | १२<br>१६ | ५७<br>२ | ३<br>१५ | ३<br>११ | ३<br>११ |

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—कृश शरीर, रागीट स्वभाव सत्याची आवड, निमगोरा, उजव्या बाहूवर तीन चिन्हें, अंडवृद्धी नळाश्रीतवातामुळें. गंडांतरें व मोठाले आजार—लहानपणी ५।६ वर्षांचा असतांना महामारी उपद्रव व सन १९०१।२ सुमारास प्लेग व हल्लीं ४ वर्षांपासून अर्धांगवायुची बिमारी धातुक्षीणतेमुळें चक्कर, मध्यंतरी बिमाऱ्या झाल्या पण तात्पुरत्या झाल्या. आई व वडिलांचे सौख्य—दोघेही हयात नाहींत. वडिलांचे सौख्य मुळींच नाहीं मात्र आईचे होते तीही ५ वर्षापूर्वी वारली. आई व वडिलास मोठाले आजार—वडील प्लेगनें वारले व आई न्यूमोनीयानें वारली. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—वडिलांची सांपत्तीक स्थिति ठीक नव्हती. जन्मभर नोकरी करून पोट भरले. वडिलांचा धंदा—शाळामास्तर. महिन्याचें उत्पन्न—२५ रुपये. विवाह—वयाचे २१।२२ वे वर्षी. स्त्रीची प्रकृति—साधारण, वर्ण काळसर, हल्लीं हयात नाहीं, इन्फ्लुएंझाचे सालांत वारली कफ विकारानें. संतति—प्रथम संतति पुत्र, हयात नाहीं, हल्लीं तीन पुत्र व एक कन्या असे चार हयात आहेत, दोन पुत्र व एक कन्या वारली व एक गर्भपात झाला होता. स्वतःस, स्त्रीला अगर मातापित्यांस कायमचा विकार—स्वतःस अर्धांगवायुचा विकार आहे स्त्री तर वारलीच आहे, पुन्हां लग्नसंबंध केला नाहीं. विद्या कोठपर्यंत व यश-अपयश केव्हां? विद्या पूर्ण कधीं झाली—वयाचे २२वे वर्षपर्यंत विद्या शिकण्यांत गेली. भाग्योदय—सी. पी. ×× व ××× जिल्हा, वयाचे बावीसावे वर्षी नोकरीला सुरुवात. नोकरींत साधारण काळ गेला. मोठा वढतीचा गेला नाहीं. स्वतःवर व्यावहारीक जबाबदारी केव्हां पडली? आज महिना उत्पन्न किती—१९११ सालीं अनपेक्षित स्थितीमुळें कामाचा राजीनामा देणें भाग पडले. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल—तेव्हांपासून मालगुजारी शेतीवर उदरनिर्वाह होत आहे. पण सांपत्तिक स्थिति ठीक नाहीं. नेहमीं ऋणग्रस्त स्थिति असते. पैसे जवळ मिळाले तरी राहत नाहींत. सांपत्तिकदृष्ट्या अत्यंत वाईट काल—हमेपाचाच काल मोठा समाधानकारक काल नाहीं परंतु साडेसातीचे दरम्यान काळ फारच नुकसानीचा गेला. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल—तसा कांहीं एक नाहीं. मालगुजारी कामानें मध्यंतरीं पैसे मिळतात, परंतु जवळ राहत नाहीं, खर्चही तसाच होतो. कोणत्याही कार्यांत यश-अपयश—अपयश कमी प्रमाणानें संकटें—संकटें भाऊबंदाकडूनच आली व कांहीं गांवलोकांकडून मालगुजारीचे पैशामुळें माझे कडक वर्तनामुळें मात्र फौजदारी वगैरेंचे प्रसंग आले नाहींत. दिवाणीचे दावे हल्लींही येतच आहेत. नोकरी—नोकरी सरकारी कंट्रोलर पोस्टखात्यांत केली १९०१ ते ११ पर्यंत दरमहा रुपये ५० राजीनामा देईपर्यंत होता. दत्तक वारसा—एक वारसा या नात्यानें सुमारें ५००।६०० सालीना उत्पन्नाची इस्टेट चुलत आज्याची सन १९३४ सालापासून कब्जांत आली. मोठ्या मुलाची बौद्धिक स्थिति—चांगली. सासरची सांपत्तिक स्थिति व त्यांजकडून लाभ—कांहीं नाहीं. स्वतःचें घर, वाहनें—पूर्वार्जित इस्टेट कबज्यांत सन १९०१ पासून कबज्यांत आहे, स्वतःचे घर आहे, जमीनजुमला आहे, मालगुजारी आहे, स्वकष्टार्जित नाहीं.

### कुंडली क्रमांक १६४

श्रीशके १७८८ माघेमासे कृष्णपक्षे ३० तिथौ बुधवासरे पूर्वाभाद्रपदानक्षत्रे अत्रदिने श्रीसूर्योदयातगत घ. ४ प. ५ समये जन्म.

जन्मकुंडली

स्पष्टग्रह.

| | र. | च. | म. | बु | गु. | शु | श | रा | ल |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| राशि | १० | ११ | २ | ११ | १० | ९ | ७ | ५ | ११ |
| अंश | २३ | ३ | २० | ९ | ० | ७ | २ | २ | २३ |
| कला | १९ | १७ | २४ | १० | ५० | २८ | ५६ | ८ | ७ |
| विकला | ५ | ० | १० | २० | ५५ | ३० | ० | १० | ३० |
| | ६० ८ | ७७७ १९ | २ २ | ७६ ४४ | १२ ३८ | ६६ २३ | ० ८ वक्री | ३ ११ | |

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति–शरीराचा रग तांबूस, अल्प गोर, स्वभाव तापट, महत्वाकांक्षी ७ वे वर्षी ( आजास दत्तक ) गडातरें व मोठाले आजार–९वे वर्षी जलात बुडाला होता. आई व वडिलांचें सौख्य–बाप २५ वर्षापर्यंत २६ वे वर्षी मयत, आई ४१ वे वर्षी ( जनक आई ) भावंडें–एकदर ५ त्यात हयात ३ पाठीवर २ आधी बधु १. विवाह–लग्न १४ वे वर्षी झालें. स्त्रीची प्रकृति–साधारण रूपवान् सतति—प्रथम पुत्र सतति वयाचे २३ वे वर्षी झाली. कन्या-सतति जास्त ४ नतर पुत्र २. स्वत स, स्त्रीला अगर मातापित्यास कायमचा—खोस श्वासाचा विकार आज १४ वर्षे विद्या—विद्या मुळींच नाहीं, शेती व बागायती उत्पन्न व त्यात यश. भाग्योदय—भाग्योदय २८ वर्षापासून वडिलार्जित इस्टेट परत खरेदी घेतली सन १८९४।९६। ९९ मालवण येथेंच भाग्योदय झाला. स्वत वर जबाबदारी—उत्पन्न स्थावर १५०० रु. व्यवहारिक जबाबदारी २७ वर्षापासून अनपेक्षित रीतीनें बदल—सन १९१७ पासून शत्रुपीडा

सुरू झाली इस्टेटीचे वाद सुरू झाले, सन १९२३ पासून धनव्यय फार होऊन सन १९२४ चे जानेवारीपासून ऋणयोग सुरु झाला. सांपत्तिकदृष्ट्या अत्यंत वाईट काळ—वय ४५ पासून सुरु. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काळ—वय १५ ते ४५ पर्यंत. कोणत्याही कार्यांत यश-अपयश—वादविवादांत यश व शेती बागाइतांत यश, सन १९१७ पासून दिवाणी कोर्टांत जाण्याचा प्रसंग आला व त्यास कारण भाऊ झाले, स्वतःची कल्पनाशक्ति विलक्षण आहे. नोकरी व्यापार अगर दुसरा व्यवसाय—स्थावर इस्टेट घेणें व त्यांत बागायती उत्पन्न (माड, सुपारी, कलमाचें बागायत शेती). दत्तक-वारसा—वयाचे ७ वर्षी दत्तक झाले. मोठ्या मुलांची बौद्धिक स्थिति—विद्या नाहीं, शेती धंद्यांत सामान्य कुशल. सत्तेचें घर, वाहनें, नोकरचाकर—वडिलार्जित व स्वकष्टार्चे जमीनीचें उत्पन्न—वयाचे २७ पर्यंत वडिलार्जित इस्टेटीचें सुख नंतर स्वकष्टार्चें, घर उत्तम मोठें, चाकर, गाड्या वगैरे आहेत.

कुंडलीक्रमांक १६५

श्रीशके १८०८ आषाढमासे शुद्धपक्षे पंचम्यांतिथौ पूर्वानक्षत्रे रात्रीं सुमारें १२ वाजतां जन्म.

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति—शरीर सुदृढ, स्वभाव अति चंचल, शीघ्रकोपी पण निष्कपटी, धर्मश्रद्धा वरवरती पण प्रत्यक्ष आचरण कमी, तोंडावर देवीचे वण, स्वभाव दिलदार व उदार. गंडांतरें व मोठाले आजार—जन्मानंतर २।३ वर्षे देवी आल्यानें अति क्लेश नंतर नाहीं. आई व वडिलांचें सौख्य—वडील व मातुश्री अजून हयात. आई व वडिलांस मोठाले आजार—विशेष नाहीं परंतु मातुश्रीस प्लेग झाला होता त्यांतून ती वाचली सन अदमासें १८९६।९७. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—मूळ स्थिति साधारण. वडिलांचा धंदा—खाजगी नोकरी महिन्याचें उत्पन्न ८ ते १५ रु. धंद्यांत अगर नोकरींत काळजीचे व असह्य प्रसंग—ता. २१।१०।१९२४ नोकरी गेली व फौजदारी खटला झाला निकाल माझ्यातर्फे २०।७।२५ रोजी पुणें येथें झाला. भावंडें—एकंदर ५ त्यांत हयात एक, पाठीवर बहीण, आधी भाऊ, एक धाकटा भाऊ हयात. विवाह—एक विवाह झाला सुमारें ३५ वर्षे झाली. संतति—पहिल्या दोन मुली, एक हयात धाकटी बाळंतरोगानें वारली. कार्तिक वद्य २ शके १८२३, दोन मुलीनंतर संतति नाहीं. विद्या—

मॅट्रिकपर्यंत. अपयश नाहीं. विद्येस पूर्ण पैसा व उत्तेजन मिळालें नाहीं. १९०३ सालीं विद्या पूर्ण भाग्योदय—पूर्व खानदेश १९०३ मार्च १ पासून नोकरीस सुरवात त्यांत कांहीं वर्षें बरी गेली जास्त जोराची वर्षें १९२०।२२. स्वत वर व्यावहारिक जबाबदारी—१९०३ मार्च–महिना उत्पन्न ५०।६०. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल—१९१९ ते १९२२ घर स्वत चें बांधलें गेलें व शेती खरेदी केली गेली. सांपत्तिकदृष्ट्या अत्यत वाईट काल—१९२४ ते १९२५ द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काळ—१९१९ ते १९२३. कोणत्याही कार्यांत यश–अपयश—साधारण. सरकार अगर लोकांकडून मान—१९१९ ते १९२३. सकटें—१९२७ सालीं फौजदारी झाली, साह्य आप्तइष्ट वगैरेनीं केलें. नोकरी—रेल्वेकडे चुलत्यांची परिस्थिति—चुलता १ आत्या २ चुलते व मी एकत्र सत्तेचें घर, वाहनें, नोकरचाकर, जमीनजुमला—स्वकष्टार्जित १९१९ पासून.

कुंडलीक्रमांक १६६

श्रीशके १८०५ श्रावणेमासे कृष्णपक्षे द्वितीयांतिथौ सोमवासरे पूर्वाभाद्रपदानक्षत्रे घ. २१ प. ४२ अत्रदिनेश्रीसूर्योदयातगत घ. ३७ प. ३७ समये जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—मध्यम, मनमिळाऊ, निमगोरा, रग साधारण, रुप, डाव्या डोळ्यावर कोंच पडलेली, व्यग नाहीं. गडांतरें व मोठाले आजार—वयाचे सुमारें ९ ते १० वे वर्षी विषमज्वर. आई व वडिलाचें सौख्य—आईचे सौख्य वयाचे ९वर्षे, वडिलांचे सौख्य वयाचे १२वर्षेपावेतो आजारपण दोन्ही हयात नाहींत आई व वडिलास मोठाले आजार केव्हा व ते कोणत्या विकारानें ! शके १८१२ श्रा, व शके १८१७ मार्ग वडिलाची मूळ सापत्तिक स्थिति-मध्यम-वाईट फेरफार झाले त्यावेळीं केवळ शेतीवर निर्वाह झाल्यानें. वडिलाचा धदा—शेतकी महिन्याचें उत्पन्न सुमारें १०० रु. धधांत अगर नोकरींत काळजीचे प्रसग—नोकरीत सन १९२२ पासून काळजी, तेव्हांपासून नोकरी नाहीं भावडें—एकदर ७ त्यांत हयात ० पाठीवर बहीण, आधीं भाऊ. विवाह—सन १९०५ सालीं विवाह एकच. स्त्रीची प्रकृति—उष्णवात विकार, स्वरूप साधारण, मोठा आजार वातापासून. सतति—सख्या ५ प्रथम दोन कन्या होऊन गेल्यानतर पुत्र त्याचेमागे कन्या व हल्लीं पुत्र असे तीन हयात. प्रथमच्या मुली सुमारे १०।११

महिन्याच्या होऊन गेल्या, प्रथम मुलगी झाली ती १९१० इ. दुसरी १९१२ तिसरी १९१९ इ. १९२१ कन्या १९२४ पुत्र अशी झाली. स्वतःस अगर स्त्रीला विकार—कांहीं नाहीं. विद्या व यश अपयश—मेकॅनिकल इंजिनीअर १९०६ पर्यंत अपयश नंतर १९११ साली विद्या पूर्ण झाली. भाग्योदय—नोकरीला १९१२ पासून सुरवात तेव्हांपासून १९२२ पावेतो काल बरा म्हणजे नफा नाहीं व नुकसानही नाहीं. स्वतःवर व्यावहारिक जबाबदारी—सन १९१५ पासून जबाबदारी पडली, हल्लीं दोन वर्षे नोकरी नसल्यानें फक्त शेतीचें उत्पन्न सुमारे ५०० रुपये. सांपत्तिकदृष्ट्या अत्यंत वाईट काल—सन १९२२ पासून. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल—सन १९२२ चे पूर्वी साधारण रीतीनें बरा काळ गेला. कोणत्याही कार्यांत यश—फार प्रयासानें. नोकरी—खाजगी कारखान्यांत इंजिनीअर. सन १९२२ पर्यंत साधारण रीतीनें बरे पुढे हल्ली काळ बरा नाहीं. सासरची सांपत्तिक स्थिति—साधारण चांगली परंतु लाभ नाहीं. सावत्र भाई अगर भावंडें व त्यांची स्थिति, चुलत्यांची परिस्थिति—सावत्र आया दोन, सावत्र बहीण १ परंतु हयात नाहीं, चुलते एकंदर तीन पैकीं दोघाना संतति नाहीं. एकास दोन मुले त्यांची स्थिति उत्तम. सत्तेचें घर, वाहनें, नोकरचाकर, जमीनजुमला—सत्तेचे घर व जमीनजुमला पूर्वार्जित आहे परंतु कालपरिस्थितीमुळें त्यापासून व्हावे तसे सुख नाहीं.

कुंडलीक्रमांक १६७

श्रीशके १८२२ फाल्गुनेमासे शुक्लपक्षे प्रतिपत्तिथौ इंदुवासरे श्रीसूर्योदयात्गत घ. ६ प. ० समये जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शरीरवर्णन—कृश, वर्ण साधारण गौर, शरिरास नेहमीं आजार, व्यंग नाहीं, स्वभाव प्रेमळ पण तापट, देहबांधा उंच. आईचा मृत्यु—शके १८४० भाद्रपद वद्य १२ सन १९१८ सकाळीं, ताप, वात, या आजारानें झाला. मातेचे प्रेम माझ्यावर फार होते पण मातृसौख्य अल्पवयात संपलें. वडील भावाचा मृत्यु—शके १८४० आश्विन शु. १ सन १९१८ सकाळीं ताप, वात, या आजारानें झाला. आईचा मृत्यु होताच त्याच दिवशीं यांना आजार उत्पन्न झाला व अंत झाला. हल्लीं हयात भाऊ २ आहेत. वडील भावावर प्रेम फार आहे पण भावाशी म्हणावे तितके जमत नाहीं. शके १८४० सालीं एक बहिण होती तिचा पण चैत्र शु. १२ रोजीं मृत्यु झाला. आणि शके १८४० सालीं भाद्रपद मासीं मधील बंधूस आजार पण त्यांतून सुटका, एकदर पाहतां हें वर्ष फारच वाईट गेले. वयोवर्ष ७ इतके भयंकर दुःख झाले कीं घराला उतरती कळा लागली. वयोवर्ष ८ ते १२ हा काल शिक्षणांत गेला व शरिरसुख बरे होते म्हणजे साधारण. आई वारली तरी वडिलानीं सांभाळ चांगल्या प्रकारे केला. वयोवर्ष—१३ शके १८४६ भाद्रपद शु. १ सन १९२४ रोजीं सकाळीं वडिलाचा मृत्यु. वात, ताप, या आजारानें. वडिलांचा धंदा—शिक्षकाचा वडिल वारल्यामुळें अतिदुःख झालें. वयोवर्ष—१४ शिक्षणांत गेले. वयोवर्ष १५ शके १८४७ आषाढमासीं स्वत.स संधिवातानें भयंकर आजार पुन्हां जन्म झाला. वयोवर्ष १५ व्ह. फा. परीक्षा नापास. वयोवर्ष १६ सन १९२७ एप्रिल, व्ह. फा. परीक्षा पास. विवाह—सन १९२६ वैशाखमासीं झाला म्हणजे वयाच्या १५ व्या वर्षी झाला. पत्नी स्वरूपवान नाहीं, अशिक्षित अशी. वयोवर्ष १६ ता. ७-१२-१९२७ शिक्षकांची नोकरी लागली. वयोवर्ष १७ ता. १५-७-१९२८ बदली सोयींस्कर ठिकाणीं या ठिकाणीं १ वर्ष काढिले. वयोवर्ष १८ तारीख १-८-१९२९ सदर ठिकाणाहून बदली झाली. जे गाव मिळालें तेथें ब्राम्हण म्हणून फार त्रास झाला तक्रारी झाल्या. वयोवर्ष १९ ता. १-६-१९३० हा ठिकाणाहून तक्रारीमुळें बदली ती गैरसोयींचे ठिकाणीं लांब तेथें फार हाल. त्याठिकाणीं ४महिने सतत आजारी नोकरी सोडणेपर्यंत पाळी. वयोवर्ष१९ त्या त्रासदायक गांवातून बदली कांहीं सोयींस्कर म्हणावी तशी सोय नाहीं पण काल बरा. वयोवर्ष१९मधल्या भावाच्या बायकोचा व मुलाचा वैशाख शके १८५२ बाळंतपणानें नाश. वयोवर्ष२० मधल्या भावाचें पुन्हां लग्न केले. द्रव्यदृष्ट्या नेहमीं टंचाई ज्योतिषशास्त्रांत प्रगती व्हावी ही इच्छा फार व वैद्यक शिक्षण मिळावे अशी इच्छा, वडिलार्जित स्थावर—घर वगैरे उत्तम आहे. द्रव्यटंचाई फार अद्याप सतत नाहीं.

कुंडलीक्रमांक १६८

शके १८२५ वैशाखेमासे शुक्लपक्षे नवम्यांतिथौ श्रीसूर्योदयातगत घ. ५५ प. ५८जन्म.

जन्मकुंडली.

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

आईबाप दोघेही हयात. मातोश्रींचे नेत्रास १२-१३ वर्षांपासून विकार. ऑपरेशन् वगैरे करूनही उपयोग नाही. स्वत:पेक्षां एक वडील बंधु व धाकटे बंधु ३, स्वत:पेक्षां एक वहीण २ वर्षांनी वडील पण ती १४ वर्षांपासून विधवा, तिला एक मुलगा आहे. धाकट्या बहिणी ३, पैकीं एक विवाहीत व दोन लहान. स्वत:चें प्रकृतीला आतांपर्यंत जिवावरचें दुखणें वगैरे नाहीं. किरकोळ आजारपणा केव्हांतरी मधून मधून. आतांपर्यंत ३-४ जलापघात झाले. तथापि प्रकृतीस असावे तसें पूर्ण स्वास्थ्य नाहीं. वडील हे दत्तक दिलेले असून दत्तक घराकडील परिस्थिति सामान्यत: बरी. मुख्य धंदा व उपजीविका शेतीवर चालू आहे. आजोळची परिस्थीती सामान्य, मामा ३ आहेत. नोकरीवर अवलंबून. स्वत:चें शिक्षण मॅट्रिकपर्यंत झालें. शिक्षण सन १९२२ मध्यें सोडलें. व त्याचवर्षी विवाह झाला. सन १९२३ मध्यें आगष्ट महिन्यांत जी. आय. पी. रेल्वेंत तारमास्तरची नोकरी धरली. प्रथम २ वर्षे ठीक गेली पण सन १९२६ सालांत प्रथमच रिव्हर्शनमध्ये घडून येऊन मनस्वी त्रास व कष्टदायक परिस्थीति कायम होती. शेवटीं १९२८ च्या आगष्ट एक तारखेस नोकरीस राजीनामा देऊन बी. बी. सी. आय. रेल्वेमध्यें नोकरी तारमास्तरची मिळाली. तेव्हांपासून परिस्थिती सुधारली आहे. तथापि सांपत्तिक स्थिति अगदीं सामान्य आहे. हल्लीं दरमहा ५५ रु. पगार असून रहावयास जागा फुकट आहे. आतांपर्यंत पैसे शिल्लक रहात नाहींत परंतु थोडेवहुत कर्जच आहे. नोकरीशिवाय अन्यमार्गानें पैसे कधीं मिळाले नाहींत व त्याबाबतींत हातून कधीं प्रयत्नही केला नाहीं. लॉटरी, रेसेस, कॉटन बिझिनेस या बाबतींत अद्याप पडलो नाहीं. त्याबाबतींत पडलेले स्नेही भेटतात व त्यांचेमुळें मनाची प्रवृत्ति निकडे होते पण अद्याप हातून तशा प्रकारचा प्रयत्न केल्याचे झाला नाहीं. सांप्रत घरची परिस्थितिसुद्धां हलाखीचीच आहे. वडील बंधुची परिस्थीति मात्र स्वातन्त्र्यांत पुष्कळ बरी आहे. राष्ट्रीय चळवळी-बद्दल मनामध्यें पूर्वीपासूनच प्रेम व ओढा आहे. तथापि त्यामध्यें प्रत्यक्ष भाग घेतला नाहीं. सन १९२२ सालीं एकदां × × येथें पिकेटिंगमध्यें भाग घेतल्यानें दहा रु. दंड झाला होता. राजकीय चळवळींत आमच्या धाकटे बंधूनें भाग घेतल्यानें त्यास ४ महिने तुरुंगवास भोगावा लागला.

ह्याखेरीज ह्या चळवळीबद्दल जरी आमचे घराण्यांत प्रेम आहे तरी प्रत्यक्ष भाग कोणी घेतला नाहीं. स्वतःस पहिली मुलगी आश्वीन शु. ७—१८४८ यावर्षी झाली व दुसरी मुलगी शके १८५१ भाद्रपद या वर्षी झाली. मध्यंतरी १८४९ साली बाळंतपणाचेवेळीं भयंकर प्राणांतिक अवस्था होऊन मयत मुलगी झाली. हल्लीं दोन मुली हयात आहेत. एकंदरींत कौटुंबिक सौख्य यथातथाच आहे. आयुष्यामध्यें जिकीरीचें प्रसंग मधून मधून आले. पण त्यांतल्यात्यांत १९२४ मे, जून, जुलै व आगष्ट हे फार वाईट गेले. त्याप्रमाणेंच जानेवारी व फेब्रुवारी १९२२ हेही मानहानीचे व कष्टप्रद गेले. १९२३ आगष्टपासून परिस्थितींत फरक पडूं लागला व पुन्हां दोन वर्षांनीं म्हणजे १९२५ आगष्टपासून कष्टदायक मनःस्थितीस सुरवात झाली ती १९२८ आगष्टपर्यंत परिस्थिति तशीच राहून तेव्हांपासून पालट होऊन आतां परिस्थिति पूर्वीपेक्षां ठीक आहे. तथापि नोकरी फारशी समाधानकारक नाही. आतांपर्यंत उघड शत्रुत्व कोणाशींही नाहीं. स्वतःचा स्वभाव कांहींसा तापट असल्यानें, पुष्कळांशीं विरोध येतो पण तो तात्पुरताच होय. मित्रत्व पुष्कळांशीं आहे पण विशेष दाट मैत्री कोणाशींही नाहीं. मैत्रीपासून फायद्यापेक्षां त्रासाचाच अनुभव अधिक येतो. स्वतःची शरीरयष्टी उंच असून साधारणतः स्थूल आहे. गौरवर्ण आहे. शॉर्टसाइट असल्यानें चष्मा वापरावा लागतो. स्वतःचे हातून कांहीं देवतार्चन धर्माचरण घडावे अशी मनांतून नेहमीं इच्छा होते पण त्याप्रमाणें हातून कृती फारच थोडी घडून येते. सदर बाबतींत कोणी मार्गदर्शक भेटला नाहीं तसा मार्गदर्शक भेटल्यास फार चांगलें होईल. मनामध्यें एकाद्या अज्ञात गोष्टीबद्दलचा ध्यास असतो. केव्हां केव्हां मनाची शांती नाहींशी होऊन एक प्रकारची हुरहुर वाटते. आमचे घराण्याचा आल्यागेल्याचें आदरातिथ्य करण्याबद्दल लौकिक आहे व तसें करण्यांत मलाही आनंद वाटतो. श्वशुरगृहाकडची स्थिती अत्यंत निराशाजनक असून अपमानास्पद आहे. सन १९२४ अखेर सहकुटुंब काशीयात्रा केली. त्यानंतर सन १९२६ मध्यें हरीद्वारच्या यात्रेस जाऊन आलो. कोणत्या देवाबद्दल भक्ति बाळगावी हे निश्चित होत नाहीं पूर्वी राम त्यानंतर कृष्ण ह्याबद्दल प्रेम वाटत असे आतां शंकर, मारुती, अगर देवी ह्यांचेविषयीं भक्ति वाटते वस्तुतः सर्व देव एकाच स्वरुपाचे आहेत.

कुंडलीक्रमांक १६९

श्रीशके १८२० कार्तिक शु. १४ रविवार स्टैं. टा. ६॥ वाजतां सायंकाळीं जन्म. ता. २७ नोव्हेंबर १८९८.

जन्मकुंडली

ही एका श्रेष्ठ व उच्च गणितज्ञाची कुंडली असून मुख्य म्हणून हे काम करीत आहेत.

कुंडली क्रमांक १७०

श्रीशके १८२९ माघ कृ० ३० ता. २ मार्च १९०८ सोमवार सकाळीं ६॥ वा. स्टॅं.टा.

जन्मकुंडली

वरील विद्वान गृहस्थांच्या पत्नीची ही कुंडली आहे.

विवाह शके १८४८ फा. कृ० ३ सोमवार सकाळी ८ वा. ४० मि.

कुंडलीक्रमांक १७१

श्रीशके १८०१ चैत्र शु० १ रविवार इ. घ. ४ प. १०

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

हे गृहस्थ शाळा मास्तर असून यांना ५१ रुपये पगार मिळत आहे. एकंदर संतति १० पैकीं ५ मुलगे व ५ मुली आहेत. शिक्षण ट्रेनिंग कॉलेजचे झालेले आहे. जन्मकाळी सांपत्तिक स्थिति अगदीं वाईट होती पण यांचे जन्मानंतर वडील बंधू नोकरीस लागल्यामुळें तेथपासून स्थिती बरीच सुधारली. स्वतःचे नोकरीचे वेळीं सन १९१७ मध्यें फेब्रुवारी ते जून हा काळ फार संकटाचा गेला. वयोवर्ष ३९ या वर्षी आजारी होते त्यांत पुनर्जन्म झाला. विवाह वयाच्या १४व्या वर्षी झाला. प्रथम पुत्र वयाच्या २४ साव्या वर्षी झाला. पहिली परिक्षा पास सन १८९७ मध्यें झाली. नोकरीची सुरवात ता. २५।७।१८९८ पासून झाली.

कुंडलीक्रमांक १७२

१८२९ कार्तिक शु॥ १२ जन्म रात्रौ १०॥

जन्मकुंडली

वरील क्रमांक १७२ च्या गृहस्थाच्या पत्नीची ही कुंडली आहे.

कुंडलीक्रमांक १७३

श्रीशके १८०८ कार्तिक शु॥ ८ पहाटे ४॥ नव्हेंबर १८८६.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

जन्म × × × येथें जाहला. मुलगा फार नवसाचा त्यामुळें जन्मल्यापासून प्रकृती झुरुमुरु. आज जगतो उद्या मरतो अशी धास्ती, मुलगा ५ वर्षेपर्यंत चालत नव्हता, वडील सातारा येथें नोकरीनंतर वीरवाडी येथें नोकरी रु. ६० दरमहा. × × × × येथें सुमारें २००० रु. व्याजानें जमीनीवर दिले पुढें वडिलाची बदली कराची येथें दरमहा १०० रुपयावर जाहली. यांची मुंज व्यंकटेश गिरीवर सुमारें ७००।८०० रुपये खर्चून वडिलांनीं केली. मातोश्री अत्यंत रुपवान, मातृसुख यानां नाहीं. मुंज झाल्यावर सन १८९६ साली कराची येथें आई प्लेगला बळी पडली. नंतर पेनशन घेऊन वडील महाबळेश्वरी घर होते तेथें राहिले. हे सातारा येथें शिकत होते. ४ थे यत्तेंत असताना स्नेह्यानें घर फोडून ६००।८०० रु. ची चोरी केली त्यावेळीं यांचें वय १३ वर्षांचें होतें परंतु बुद्धी तरतरीत त्यामुळें चोराचा पाठलाग करून चोरी × × × स्टेशनवर मुद्देमालासकट पकडली. वडील महाबळेश्वरीच होते.

एकुलता एक मुलगा असल्यामुळें लग्न १५ वे वर्षी झालें शिक्षण मॅट्रीकपर्यंत. पुढें १ वर्ष सासून हास्पीलमध्यें मेडिकलचा कोर्स घेतला. परंतु पूर्वीच्या नियमाला धरून स्पर्श-अस्पर्शाच्या विटाळामुळें सोडून घरी नोकरी महाबळेश्वर येथें करून दरमहा २५ रुपये मिळवू लागले. मनापासून नोकरी करणेचा आळस, स्वतंत्र व्यापाराची जबर महत्वाकांक्षा पण एकही शेवटास गेली

नाहीं. अशा स्थितींत प्रकृती अशक्त त्यामुळें चिडून जाऊन व्यायाम करूं लागले. तालीम करून शरीर बळवान केलें. पुढें फार प्रयासानें सासुसासऱ्यांनीं उपदेश करून संसारांत मन गुतविलें. प्रथम मुलगा शके १८३१ सालीं जाहला, मुलगा जाहला परंतु आजोबाचे भेटीबरोबर आजोबा आई येथें अर्धांगवायुनें आजारी पडले. महाबळेश्वरी हे गेले परतु बोलणें जाहले नाहीं बेशुद्ध स्थितींत होते. वडील १९१० चे मे महिन्यांत वारले। आकस्मिक मरणामुळें त्यांचा उपदेश यानां मिळाला नाहीं. पत्नीस घेऊन महाबळेश्वरी आले. वडील देवघेवीचा व्यवहार करीत होते तो चालू ठेविला. त्यावेळीं दोन घरें किं. ७००० चीं व रोख २००० अशी माया जवळ होती.

महत्वाकांक्षा फार पण कोणतीच शेरटास गेली नाहीं. त्यावेळीं १ तांगा सुमारे ७०० रुपयांचा कर्जाचे फेडीत आला तो धंदा नोकरी करून चालू केला. जनावरापासून सुख मुळींच न लाभता त्रास जाहला. प्रथम रुपये मिळाले परतु नोकरांनीं साफ बुडविले व प्राणांत जखम जाहली (१९१२) त्यामुळें सर्व गाडीघोडा विकला. सन १९१४ सालीं मुंबईच्या सासऱ्यांनीं सर्व सोडून इकडे या म्हणून आर्जविले त्याचेकडे ३।४ वर्षांत आपल्या बुद्धीच्या जोरावर धंदा केला त्यांचे कर्ज ८००० फेडून मला प्राप्ती ८००० रु. ४ वर्षांत मिळाली. धंदा तर वडसालीचा कमिशन एजंट, पैसा मिळाला मागील नुकसान धंद्याचे २००० भरून निघाले. घरें महाबळेश्वर येथील १९१५ सालांत ७००० रुपयास विकली. व एकंदर माया १५००० ची जवळ रोकड जाहली. ( व्यसन नाहीं. ) अशा वेळीं पत्नी वारली. २ मुलगे होते, लग्न न करण्याचा तात्पर्यांचे सवयानें निश्चय केला. पुढे सासऱ्यानें पुष्कळ बोध केला, मुली बऱ्याच आल्या, बायको वयाचे २७वे वर्षी वारली. ७ वर्षें विवाह करण्याचा योग असून केला नाहीं. रुपये त्यावेळीं सर्व व्यक्तित व कांहीं जमीनी खरेदीत गुतविले. व्योंका बुडू लागल्या त्यामुळें सर्व रकम काढिली व सासऱ्याचा संबध सोडून x x येथें १९१८ सालांत येऊन राहू लागलो. जवळ पैसा बराच व लोकांत श्रम मोठा त्यामुळें व्यापारात जम बसू लागला. इतक्यात थोरला मुलगा आजारी पडून त्याचा मृत्यु घडला. एका मित्रानें जमीनीपासून बराच फायदा होईल म्हणून सांगितल्यावरून १०००० रुपये जमीनीकडे, प्रामिसरी नोटा व गहाणाच्या हुड्याचा व्यवहार सुरू केला वरलान बरेच यादले. १ नोकर वसुलीकरितां ठेविला. भविष्यज्ञानी विवाह होणारच म्हणून सांगितले. अखेर त्यांचे भविष्याप्रमाणें ३४ वे वर्षी विवाह घडून आला. पत्नी गुणवान मिळाली. पैसा दरमहा १०० रुपये मिळू लागले. लोकांच्या ठेवी १०००० च्या घरी चालून आल्या. व्यापार वाढविला तो इतका कीं, जवळचे सोने गहाण ठेवून हलक्या व्याजानें रकमा काढून आणून त्यावर कमाई करू लागलो अशी स्थिति १९२५ सालापर्यंत बरी चालली. परंतु पुढें दुष्काळ ६ वर्षें पडल्यामुळें विहिरी खणणें वगैरे कामांत ४००० रुपये खर्ची पडले, उपयोग मात्र कांहीं नाहीं. १९२६ सालीं मुलगा जाहला. प्रसूतीची सर्व तयारी परतु प्रसूतिसमयीं आडल्यामुळें स्पेशल मोटारीनें पुण्यास आलो. व्यवस्थित बाळंतपण सुमारें १५० रुपये खर्चून जाहले परतु स्त्रीच्या प्रकृतींत अशक्तपणा फारच आला. दैवयोगानें सासू जवळ राहिल्यानें बरें चालले संसारसुख मात्र कमीच. शत्रु फार, आज जे मित्र ते उद्या शत्रु असा प्रकार घडू लागला, व्यापार कमी पडू लागला, दुष्काळामुळें वसूल होईनासा जाहला. नोकर

कमी केले मात्र लोकांत भ्रम मोठा कीं, हा कोणी लक्षाधीश आहे कां काय अशी दाट वदंता जाहली. बायको सुस्वभावी मात्र तिच्या अशक्तपणामुळें मला सुख नाहीं. लोकांनीं ठेवी परत मागितल्या त्या शक्य तितक्या परत केल्या. सोसायटीतून कर्ज काढून पुढे सोसायटीचे कर्ज फिटेना त्यांनीं जमीन लिलावास १९३१ साली आगष्ट महिन्यांत काढिली. लिलाव होऊ देणार नाहीं अशा समजुतीनें एका व्यापाऱ्यानें ६ एकर जमीन सोसायटीचे कर्ज वारण्यास लिलाव घेतला, मला बरे वाटले परंतु त्यावेळीं × × × भाग घेतल्यामुळें कीं काय कोणास ठाऊक! अधिकाऱ्यांकडून यानीं तो लिलाव परत फिरविला त्यावर अपील केले. त्रास फार. घेणेकऱ्यांचा पैसा द्या असा सतत तगादा आहे. आज येणें १०००० रु. आहे. परंतु फिर्याद वगैरे करणें जमत नाहीं. आपसात बरेच पैसे कमी करून रकमा सोडून पैसे परत घेत आहे त्यामुळें नुकसान होऊन प्रपंच मात्र वाढला आहे. मनाची व्यग्रता फार, झोप १ ताससुद्धां येत नाहीं. लोकांचे देणें ५००० रु. अशा स्थितींत भांबावून जात आहे. काम करणेची पुष्कळ हौस परंतु कुळाकडे जाणेयेणेंत व्यर्थ वेळ जातो. पैसा वसूल होत नाहीं. जमीनीचें उत्पन्न सर्वत्र परिस्थिती बिघडल्यामुळें कमीच पडले. जमीनींत विक्रीचे कामी ३००० चा आकस्मिक लाभ १० वर्षापूर्वी तेजी होती तेव्हां घडल्यामुळें जमीनींत पैसे गुंतविले पण ते आज कसे परत येतील ही काळजी. यात व्याजाची आशा १ रुपया शेंकड्यापेक्षां कधींच जास्त केली नाहीं परंतु स्वजन शत्रु व × × × शीं विरोध या गोष्टींमुळें दावे फार करावे लागले.

कांहीं ४००।५०० रुपयांचे दावे खरे असूनही बुडाले! सासुची पोटगी २०० रुपये आहे त्यावर व वसूल जो येतो त्यावर चालू प्रपंचाचा गाडा ढकलित आहे.

मुलाची शार्ट साइट यामुळें त्यास घरी वसुलाचे काम पहावे लागते. तरी पण कोर्ट कचेरीचे कामांत बराच वेळ व पैसा जात आहे. दुसरा धंदा पुष्कळ करावासा वाटतो परंतु पैशाचे अभावी स्वस्थ बसणें भाग. आतां इस्टेट ठेवूनसुद्धां कोणी पैसा देत नाहीं. १० वर्षापूर्वी बळेबळे पैसे घरी आणून ओतीत पण आज त्याच्या उलट आहे! जमीनीकडे पहिल्याप्रमाणें लक्ष लागावे तसे लागत नाहीं कोठे तरी बाहेर जावून काम नोकरी वगैरे व्यवसाय करावा असे मनांत वाटते. प्रत्यक्ष कृती करणेंत अडचणी फार. देवघेवींचे रुपये वसुलीस प्रत्यक्ष माझा हितसंबंध असल्यामुळें सोडून कसे फिरावे अशी विवंचना.

हास्पिटलमधें जन्मलेला मुलगा हुशार असल्यामुळें त्याचे शिक्षण वाटेल ते करून पुरे करावे व वेळेनुसार मदत मागून त्याला शिक्षणांत तरबेज करावा अशी जबर महत्वाकांक्षा. दुसरा मुलगाही बरा आहे त्यास व्यापारात घालावे असा विचार. तिसरा मुलगा मात्र अशक्त अद्याप ४ वर्षांचा असून बरोबर बोलता येत नाहीं.

४ था मुलगा १॥। वर्षांचा आहे पण हालांत ख्याल याप्रमाणें त्याची चर्या आहे. तो कांहीं तरी नाव काढील असा भरंवसा वाटत आहे. मुलगा १॥। वर्षांचा पण सर्व समजत आहे बोलत आहे व हा कोणी तरी प्रसिद्ध होईल असा मनाचा कल वाटतो.

माझा स्वतःचा स्वभाव मात्र दिलदार, लोकांवर उपकार करण्याची बुद्धि फार, लोकांची संकटें दूर करण्यांत बराच प्रयत्न, पैसा खर्ची घातला. मला मात्र कोणाचा आधार नाहीं

कुंडलीक्रमांक १७४

श्रीशके १८१२ श्रावण शु॥ ९ सूर्योदय. तारीख २६।७।१८९०

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

याप्रमाणें जन्म-लग्न कुंडली आहे. मी देशस्थ ब्राह्मण आहे. गोत्र भारद्वाज, वास्तव्य ××× येथें पांच वर्षें झाले आहे. सन १९२९ ते १९३१ पर्यंतचा काल नोकरीपेशा सुटून स्वतंत्र सराफी दुकान भागीदारीमध्यें घातलें गेले व व्यापारही फारच उत्कृष्ट रीतीनें झाला. परंतु सन १९३२ म्हणजे शके १८५४ सुरू झाल्याबरोबर चैत्र शु॥ ३–१८५४ रोजींच भागीदारानें दुकानास कुलूप लावून फौजदारी सुरू केली परंतु त्यानंतर दिवाणी वगैरे २।३ कोर्टें हिंडवून अखेर आम्हांस जय मिळाला. परंतु त्याची भागीदारी तुटली. पैशाचा आधार बंद झाला व हल्लीं दुकान आतां नुसते उघडे ठेऊन बसत असतो. परंतु कांहीं व्यवस्था ही जुळून येत नाहीं. व पैशाचे अडचणींत आहे. व याप्रमाणें मागील सबंध वर्ष म्हणजे शके १८५४ भांडणांत गेले. व पैशाचाही चुराडा झाला. म्हणजे सन १९३२ हे फारच पैशाचे व शरीराचे दृष्टीनें कष्टांतच गेले.

## पाहिल्या मुलाची कुंडली

कुंडलीक्रमांक १७५

जन्म कार्तिक व॥ १२ इष्ट घ. ३५ पळे ६ ता. ३०-११-१९१८, स्वाती नक्षत्र तुळरास

जन्मकुंडली

४ | २के | ५श | ३गु | १ | ६ | १२ | ७चं | बु९म | ११ | २ रा८शु | १०

## दुसऱ्या मुलाची कुंडली

कुंडलीक्रमांक १७६

जन्म—मार्ग. शु. ९ शके १८५३ ता. १८-१२-३१ इष्ट वृश्चिक लग्न, मीन रास.

जन्मकुंडली

कुंडली क्रमांक १७७

श्रीशके १८१४ कार्तिक कृष्ण ३० शनिवार विशाखा जन्म श्रीसूर्योदयातगत घ. १० प. ४७ समये जन्म. ता. १९-११-१८९२.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

१९१३ सालापासून नोकरी करावयास लागलों, त्या वेळीं पगार रु. १५ सन १९१९ मध्यें रु. ३० पगार झाला, १९२० मध्यें रु. ५० मिळूं लागले व १९२२ मध्यें ८० मिळूं लागले व १९२३ मध्यें ८ महिने मी नोकरीवरून खालीं होतो व त्या वर्षी मला २॥ ते ३ हजाराचा तोटा आला. नंतर १९२४ मध्यें रु. ५० वर नोकरी धरली व १९२५ पासून रु. ६० आजतागाईत. मी आजपावेतों रु. ७००० गमावून बसलों आहे. माझे वडील आज हयात आहेत, त्यांचे वय सुमारें ८५ आहे, मातोश्री १९२४ सालीं स्वर्गवासी झाली. एकंदर माझी २ लग्नें. पहिले कुटुंब गरोदरपणींच मयत झाले. दुसरे लग्न १९२२ मध्यें झाले व पहिले १९११ मध्यें झालें. द्वितीय कुटुंबापासून मला २ मुली आहेत. मी भाड्यानेंच राहत आहे. मला भाऊ, बहीण कोणी नाहीं. १९२५-२६-२७ ही वर्षे उत्पन्नाचे दृष्टीनें बरी गेली तरी पण त्या वेळीं जिकीरीचा हा वेळ होताच. १९२९ च्या दरम्यान मला जुने ऑफिस सोडून नवें ऑफिस धरावे लागले, प्रत्येक महिन्याच्या आमावास्येपासून पौर्णिमेपर्यंत द्रव्यदृष्ट्या मान बरे असते व कृष्णपक्षाचा पंधरवडा फार जिकीरीचा जातो. मी नेहमीं शिवाची पूजा करीत असतो व कुलदेवता देवी आहे. राहात्या घराचे तोंड उत्तरेकडे आहे. शत्रूध्याबद्दल माझा बालमित्र पुरुषोत्तम पण त्याचे माझे वैरभाव १९२३ पासून सुरू झाले तों पुन्हां १९२६-२७ सालीं बरें होते, पण १९२८ पासून ते आज पावेतो पुन्हां भांडणें वगैरे होतात.

शके १८०९ माघ शु॥ २ पहाटेस ४ वाजण्याचे सुमारास जन्म. १५ जानेवारी १८८८.

जन्मकुंडली ( क्रमांक १७८ )

१९१० मिलिटरी खात्यामध्यें डॉक्टरची नोकरी. १९१४ ईस्ट ऑफ्रिका प्रवास, लढाईमुळें मेजरच्या रांगेपर्यंत बढती. १९१९ लढाईहून परत, नोकरीचा राजीनामा, डोकें भ्रमीष्टासारखें. पेन्शन मिळाले नाहीं. १९२० साधूचा उपदेश घेतला, साधूची सेवा. १९३१ कडक तपश्चर्या, तीर्थयात्रा, प्रवास वगैरे. आप्तवर्ग—पाच मुलगे, एक मुलगी, व कुटुंब हयात आहेत. सध्यां गोविंद देव म्हणून प्रसिद्ध आहेत, बुवाबाजी नाहीं, समक्ष येऊन पाहणें, प्रपंच आहे. मोठमोठे राजे, सरदार व इतर लोक अनुभव घेत आहेत व कांहींना अनुभव आला आहे. शिष्यशाखा बिलकूल नाहीं ज्ञानेश्वरी, दासबोध व कोणत्याही पारमार्थिक विषयावर उत्तम इंग्लिश व मराठीमध्यें चर्चा व प्रवचन, हें सर्व प्रकार त्यांच्या लहरीवर अवलंबून आहेत.

( बायकोची इस्टेट मिळाली आहे. असें म्हणतात कीं, बायकोची इस्टेट मिळाल्यानें कोणी करणी केली आहे किंवा भुतानें पछाडलें आहे.)

कुंडलीक्रमांक १७९

शके १८१३ चैत्र व॥ ११।१२ पहाटे ३ वाजतां जन्म. ५ मे सन १८९१ पहाटें ३ वाजतां.

'१९११ गव्हर्नमेंट स्कॉलरशिप २ वर्षें १९१५ ते १९२० नोकरी नाहीं. १९१६ पहिले लग्न फेब्रुवारींत. १९१८ पहिलें कुटुंब मृत्यु सप्टेंबर ता. २२. १९२० दुसरें लग्न, ता. २२ मे- जून पहिलीपासून नोकरी. १९२१ प्रथम पुत्र. १९२२ दुप्पट प्रमोशन. १९२३ कन्या, ऑगस्ट ५. १९२६ दुसरीकडे नोकरी. १९२६ चवथा पुत्र दिसेंबर ता.४.

१९३० जानेवारी ता. २८ रोजीं द्वितीय भार्या मृत्यु. १९३१।३२ दुसरीकडे नोकरी. १९३३ नोकरी चालू आहे. आई व वडिलांचे सौख्य—आई लहानपणीं वारली, वडील पहिले लग्न झाल्यानंतर वारले, बंधुसौख्य उत्तम. सांपत्तिक स्थिति—स्वतःचें घरदार, शेत वगैरे कांहीं नाहीं; पैसा बिलकुल शिल्लक नाहीं. पुढें कसें होईल ही विवंचना, प्रवास बराच केला पण जलप्रवास नाहीं, नोकरी सरकारी व कायमची लागलेली नाहीं, घरांत जमत नाहीं, पुस्तकें प्रसिद्ध केली आहेत.

कुंडली क्रमांक १८०

जन्म तारीख १८-९-१९१० शके १८३२ भाद्रपद शु॥ १४ इ. घ. ५२-२० शततारका नक्षत्र द्वितीयचरण.

जन्मानंतर स्थिति चांगली. वयाच्या सुमारें १८।१९ व्या वर्षी लग्न. २१ व्या वर्षी वडिलांचा मृत्यु. २२ व्या वर्षी आईचा मृत्यु व धननाश. २५ व्या वर्षी कुटुंबाचा मृत्यु. संतती न होता बायको क्षयानें वारली.

कुंडलीक्रमांक १८१

शके १८०५ सुभानु संवत्सर पौष शु॥ ७ शनिवार रात्रौ २६ घटीका जन्म.

हल्लीं यांचें तिसरें लग्न झालें आहे वैशाख व॥ ९ रोजीं. जन्म माळवण तालुका वादळगांव येथें. वडील वयाचे १ वर्षाचें आंत मरण पावले, वयाचे ६ वे वर्षी मुंज. लगेच मातोश्री ८ व्या दिवशीं मरण पावली व निराश्रितपणा आला. वय वर्ष १४ चे सुमारास पहिले लग्न झालें. वयाचे ३५ चे सुमारास दुसरें लग्न झालें. तिसरें लग्नही झालें आहे. वयाचे १६।१७ सुमारास दोघे मामा कैलासवासी झाले. पुढें पेढीचे काम तेंच करीत आले पण १७ ते ३१ सुमारास पेढीस फार नुकसानी येऊन वयाचे ३६ नंतर कर्ज. लोकांचे आपसांत निकाल करून पुनः सदर पेढीचे नांव श्रीचे कृपेनें आज ७ वे वर्ष उत्तम स्थानांत

चालत आहे. पण ४ वर्षांचें पहिलें याचेंच मागीचें दुकान होऊन त्यांत अकस्मात १८४५-४६ मध्यें ज्येष्ठ ते आषाढ महिन्यांत अकस्मात रु. ७००० चा मोठा धक्का बसला, आता त्या रकमेबद्दल गतसाली फिर्याद केली आहे. ११ वर्षे झाले. त्याचे ३१ सुमारास १ मुलगी झाली पुढें ३४ पर्यंत मुलगा झाला नाहीं, ४१ चे सुमारास दुसऱ्या बायकोस मुलगा होऊन लगेच दोघेही वारली.

### कुंडलीक्रमांक १८२

श्रीशके १८२३ वैशाख कृष्ण ३० मंदवासरे श्रीसूर्योदयातगत घ. २५ समये जन्म' जन्म वेळ ४-५ च्या सुमारास.

सन १९२९ ते १९३१ या दरम्यान नुकसान फार झाले ते थोडक्यांत खाली देतो.

ता. १ एप्रील १९२९ ला नोकरी सुटली व त्याच सुमारास बायकोची तब्येत दोन महिने बरीच आजारी होती. नोकरी सोडण्याच्या महिना दीड महिना अगोदरपासून वरिष्ठ अधिकाऱ्याशीं ( ते दक्षिणी ब्राह्मण व नातलगच होते ) खटके उडत राहिले. मार्च १९२९ अखेरपावेतो दरमहा १२५ मिळत राहिले.

ता १६ एप्रील १९३१ रोजीं मुलगा ( १३ महिन्याचा होऊन ) मरण पावला.

जूनच्या शेवटल्या आठवड्यांत एल्एल् बी.च्या परीक्षेंत नापास झाल्याची बातमी कळली.

त्यानंतरचे सहा महिने म्हणजे सन १९३१ चे शेवटचे सहा महिने फारच त्रासाचे गेले. शरीरपीडा फार राहिली व मानसिक शांतता नव्हती.

सन १९३१ च्या शेवटच्या महिन्यांत वडिलांची नोकरी सुटली.

या दोन्ही वर्षांत पैशाचा योग सन १९२९ चे ३ महिने गेरीज करून मुळींच आला नाही. आतां यापुढील म्हणजे सन १९३२ ची हकीगत.

या वर्षी शरीरस्वास्थ्य साधारण बरें राहिले. जून १९३२ मध्यें परीक्षेंत पास झाल्याचे कळले. या वर्षाच्या म्हणजे सन १९३२ च्या शेवटच्या दीड महिन्यांत ( नोव्हेंबरमध्यें व अर्धा व डिसेंबर सगळा ) उत्तर हिंदुस्थानची व थेट जगन्नाथपुरीपावेतोची यात्रा घडोन व मातोश्रीबरोबर फार आरामांत घडली. पैशाचा योग जवळ जवळ आलाच नाहीं.

अडचणीच्या वेळी पैसा-अडक्याची मदत माझे कुटुंबाकडून होते माझे चुलते ११९६साली मयत झाले व त्या साली मीही फार आजारी होतो. माझा चुलत भाऊ संकटांत व चिंतेंत आहे. सांप्रतचे संकट लोकांचे देणें भरपूर असून पैशाच्या अतिशय अडचणींत आहे.

कुंडलीक्रमांक १८३

श्रीशके १८१९ भाद्रपदेमासे शुक्लपक्षे सप्तम्यांतिथौ श्रीसूर्योदयातगत घ. ३२ प ५१ समये जन्म

सन १९०७ पर्यंत मराठी शिक्षण पुढें इंग्रजी शिकण्यास आरंभ, परंतु लडाणटप्पु मुलांच्या संगतीत राहून शिक्षण संपून याज्ञिकी अभ्यासाला सुरवात, याज्ञिकी वृत्ती, पुन्हां १९१४ साली घरदार सोडून इंग्रजी शिक्षणाला सुरवात, तो १९२२ ला ऍन्ट्रन्सची परीक्षा पास, कालेजांत शिकावे पण जमले नाहीं, १९२४ मध्यें खासगी तऱ्हेनें एम्. ए.च्या परिक्षेची तयारी केली पण बसलो नाहीं, सन १९२४ त लग्न व सरकारी नोकरीला सुरवात श्री मनासारखी मिळाली नाहीं, १९२९ त प्रथम संतती. व स्त्रीला कष्टकारक त्रास, मुलगी १५ दिवसांत वारली, १९३० मध्यें दुसरी संतती पुत्र तो सध्यां हयात, द्रव्यदृष्ट्या आतांपर्यंत केव्हांही अडचण गेली नाहीं, स्वतःचे प्रयत्नावर शिक्षण व लग्न झालें, वडिलांची पूर्वस्थिती गरीबीची, वडील १९३० मध्यें वारले, मातोश्री हयात, जबर महत्वाकांक्षा आहे, पूर्ण करणार प्रभु समर्थ आहे, वैद्यकी व ज्योतिषाचा नाद, सन १९२२ पासून अभ्यास सुरु, सन १९३० मध्यें पैसा बरा मिळाला, आतांपर्यंतच्या आयुष्यांत कष्टकारक स्थिति बरेच वेळां आली व बरीच स्थित्यंतरें झालीं, हयात दोन बंधु, १ वडील बंधु, १ धाकटा, ३ भगिनी, सध्यां स्थिति बरी, नोकरी कॉलेज, परंतु याहिपेक्षां जरा चांगली स्थिति यावी याकरितां धडपड, सरकारी नोकरी सोडून स्वतंत्र धंदा करण्याकडे प्रवृत्ती.

कुंडलीक्रमांक १८४

श्रीशके १८४१ भाद्रपदेमासे कृष्णपक्षे त्रयोदश्यांतिथौ सोमवासरे मघा नक्षत्रे घ. १७ प ३६ अत्रदिने सूर्योदयातगत घ. ४२ प. ० समये जन्म जन्मतारीख २२ माहे सप्टेंबर १९१९

शरीरवर्णन—चेहरा गोल, वर्ण साधारण गौर, प्रकृती अशक्त पण बरी आपत आजारी-नाहीं. आईचा मृत्यु—सन १९२२ न्यूमोनिया, वडील आहेत. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—

साधारण, वडिलांचा धंदा विणकाम, दरमहा उत्पन्न सुमारे १० रु. सध्यांची सांपत्तिक स्थिति—बरी आहे. भावंडें—नाहींत. विवाह—नाहीं. संतती—नाहीं. विद्या—बालवर्ग राष्ट्रीय शाळा. धंदा—नाहीं. आप्तवर्ग—सावत्र आई, चुलते ४ स्वतंत्र धंदेवाईक, मामा नाहीं, मावशी नाहीं, चुलत्या ७ हयात ५, चुलत भाऊ २, चुलत बहीण १ स्थिति उत्तम. संकटकाल, भाग्योदय, द्रव्ययोग—नाहीं. मदत आप्त व चुलते यांचेकडून आहे.

## कुंडली क्रमांक १८५

श्रीशके १८४१ भाद्रपदेमासे कृष्णपक्षे १ तिथौ गुरुवार उत्तराभाद्रपदा नक्षत्र घ. ४४ प. ५७ अत्रदिने श्रीसूर्योदयात्गत घ. ४२ प. ० समये जन्म. जन्मतारीख ११ माहे सप्टेंबर सन १९१९.

शरीरवर्णन—चेहरा गोल, वर्ण तांबुस कृष्ण, शरीर मध्यम बरे. देही व्यंग नाहीं. अत्यंत आजारी काल—नाहीं. आई—हयात आहे (आई बाप). पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—बरी आहे, वडिलांचा विणकरी, कापड दुकान, महिना उत्पन्न ५० रु. सध्यांची सांपत्तिक स्थिति—चांगली आहे. भावंडें—पाठीवर बहिणी दोन, हयात आहेत आधी भाऊ तो मयत, सन १९१६ जन्म. मृत्यु १९१७ भावाचा, एकदर भावंडे ४ हयात विवाह—नाहीं. विद्या—बालवर्ग राष्ट्रीयशाळा. धंदा—नाहीं. आप्तवर्ग—चुलते ४ व्यापारी व स्वतंत्र धंदेवाईक वगैरे निरनिराळे धंदे, मामा २ पैकीं १ विणकर, स्वतंत्र. धंदा २ रा, मावशी १ चुलत्या ७ हयात ५ चुलत भाऊ २ व चुलत बहिण १ स्थिति उत्तम. संकटकाळ, भाग्योदय, द्रव्ययोग—नाहीं. मदत वडील व चुलते यांची.

## कुंडली क्रमांक १८६

श्रीशके १८१९ कार्तिकमासे कृष्णपक्षे चतुर्थ्यांतिथौ श्रीसूर्योदयात्गत घ. २९ प. ४० समये जन्म.

शरीरवर्णन—एकंदरीत शरीर मध्यम, सडपातळ, चेहरा वाटोळा, वर्ण मध्यम गौरवर्ण, कपाळ मध्यम मोठे. व्यंग—जन्मापासून बहिरा व मुका. अत्यंत आजारी असलेली वर्षे—वयाचे ११ वे वर्षी हत्तीचे सोंडेत सापडल्यामुळें आलेलें दुखणें, १५ वे वर्षी भयंकर खरुज सर्वांगावर. वडील मृत्यु—१९२५ फेब्रुवारी विषमज्वर. पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—पूर्वार्जित उत्पन्न वगैरे कांहीं नाहीं. सध्यांची सांपत्तिक स्थिति—मध्यम असून घरांतील अवलंबून असलेल्या मंडळीची उपजिविका होत आहे. भावंडें—एकंदर ११ त्यांत आज हयात ९, आधी भाऊ सन १९११ मध्यें मयत व नंतर बहिणी १९१९. विवाह—नाहीं. विद्या—चित्रकला. धंदा—आर्टिस्ट. आप्तवर्ग—मामा ३ पैकीं १ मयत, राहिल्यापैकीं एक डॉक्टर व एक वेडा, मावशा कोणतीहि हयात नाहीं, चुलते ३ पैकीं एक हयात, चुलती व चुलत भाऊ आहेत, मेव्हणे सरकारी पेन्शनर, शत्रु वगैरे नाहींत. संकटकाल—वयाचें ११ वे वर्षी हत्तीचे सोंडेत सांपडून जिवावरचें दुखणें गेलें.

## कुंडली क्रमांक १८७

श्रीशके १७९५ भाद्रपदेमासे कृष्णपक्षे सप्तम्यांतिथौ शनिवासरे श्रीसूर्योदयातगत घ. ४० प. २६ समये जन्म.

शरीरवर्णन—तोंडावर देवीचे वण, स्थूल. व्यंग—नाहीं. पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—उत्तम. सध्यांची सांपत्तिक स्थिति—चांगली, पैशाची ओढ फार. भावंडें—नाहींत. संतती—नाहीं. धंदा—सावकारी, व्यापार. इतर गोष्टी—सन १९१९ मध्यें प्रेसिडेंट, लोकांत मान्यता उत्तम

## कुंडली क्रमांक १८८

शके १८१८ भाद्रपद शु. ८ सोमवार इ. घ. ३८ प. ० ता. १४।९।१८९६.

१. माझें जन्मगांव × × येथें झाला. जन्म शके १८१८ भाद्रपद शुक्र ८ सोमवार रात्री घ. ३८, ९–२० व ९–३० दरम्यान झाला. ता. १४-९-१८९६. माझी निरयन

कुंडली पुढीलप्रमाणें आहे. लग्न ०–२६–४२–०. र. ४–२९–३४. चं. ८–६–५. मं. १–२२, बु. ५–२६, गु. ४–१३, शु. ५–१९, श. ६–२२, रा. १०–०–२९, ह. ६–२७, ने. १–२४, अशी आहे. नक्षत्र मूळा प्रथम चरण आहे, पित्याला प्रथम चरण वाईट असें ज्योतिषद्दष्या म्हणतात. पण माझ्या जन्मानंतर मातेला गंडमाळा झाल्या. १. जन्मानंतर मातेला गंडमाळा व त्यामुळें मातेचें सुख मिळाले नाहीं. २. ५–६ वर्षी देवी आल्या व मजबरोबर माझ्या पाठच्या बहिणीलाही देवी आल्या त्यांत बहीण वारली. माझ्या तोंडावर देवीचे वण उठून चेहरा थोडा कुरूप झाला. ३. ८व्या वर्षी मुंजीनंतर २–३ महिन्यांत विषमज्वर आला मजबरोबर माझा चुलतभाऊ, चुलते व आजोबा विषमानें आजारी पडले त्यांत आजोबा वारले व आम्ही तिघे बरें झालो. ४. १४ व्या वर्षी अमावास्येच्या दिवशीं सदरदत्तीस यल्लमाच्या विहीरीत रात्री अकस्मात पडलो पण जगलो. ५. १९१४ आक्टोंबर मध्यें मॅट्रिक नापास, १९१५ मार्चमध्यें पास झालो. १९१६ प्रीव्हीयस नापास. १९१६ आक्टोंबर किंवा नक्की आश्विन शु. प्रतिपदा नवरात्र घटस्थापनेदिवशीं मातोश्री वारल्या. त्या दुपारी गदगास १२ वाजता वारल्या, मी सायंकाळी ५–३० पोहोचलो. दर्शन घडले नाहीं. १९१७ जून प्रीव्हीयस पास. १९१८ इंटर सेकंड क्लास पास. १९२० सालीं अत्यंत परिश्रम करूनही ऑनर्स मिळाले नाहींत. फक्त साधा बी. ए. परीक्षा पास झालो. १९२० डिसेंबरपर्यंत मुंबईस एल्. एल्. बी. च्या वर्गात होतो. नागपूर कांग्रेसमध्यें वकीलीचा वर्ग सोडला. १९२४ मध्यें + + + + स्वदेशाचे दुकान घातले त्यांत रु. ३५०० गेले. १९२५ मध्यें हायकोर्ट वकीलीचा अभ्यास केला व १९२६ आगस्टमध्यें नापास झालो, पण १९२७ फेब्रुवारीला बसलो व पास झालो. ऋण ७००–८०० काढून अनेक ठिकाणीं वेगवेगळ्या सनदा घेतल्या व +++ही सनद घेतली कारण इष्ट अशीं संस्थानी कोर्टें सोईस्कर गांवाजवळ आहेत. १९२७-२८, २८–२९, २९–३०, तीन वर्षं वकीली केली व साधारण बरी चालली होती. शिक्षकाचा योग, १९२० जून ते डिसेंबरपर्यंत +++स हायस्कूल व मुंबईच्या सर्व्हंट ऑफ इंडिया सोसायटीच्या शाळेचा सुपरवायझर होतो. १९२१ जानेवारी १९२४ पर्यंत +++च्या राष्ट्रीय शाळेंत अध्यापक होतो. १९२७ मे १९३० एप्रीलपर्यंत ++++च्या वकीलीच्या क्लासात अध्यापक व मुख्याध्यापक होतो. १९२१ साली १३ जानेवारी जुन्या मकर संक्रांती रोजीं प्रथम जाहीर व्याख्यान दिले व उत्तम मराठी व अन्यभाषीय वक्ता म्हणून जिकडे तिकडे ख्याती झाली त्याचा परिणाम १९२२ जानेवारी ११ तारखेला १ वर्ष सक्तमजुरीची शिक्षा झाली. पुन्हा १९३० एप्रील १३ गिरफदार होऊन १४ तारखेस १॥ वर्षाची शिक्षा झाली व आगस्ट ११ तारखेस पुन्हा १ वर्ष सक्तमजुरीची शिक्षा होऊन आपल्या भविष्याप्रमाणें ८–३–३१ रोजीं राजबंदी मुक्ततेमध्यें सुटका झाली. ४–५ वर्षी देवी. ८ वर्षी विषम. १४–१५ वर्षीं पाण्यांत अपमृत्यू. १९१६ आक्टोंबरमध्यें मातृवियोग व त्यानंतर आईचे क्रीयाकर्मांतर करून बरोबर १४ दिवसांनीं ९० दिवस तापानें आजारी. लग्न आई वारल्यावर ६ महिन्यानीं म्हणजे १९१७ फेब्रुवारीमध्यें झाले. १९२२ मार्च चैत्र शुद्ध द्वितीयेला मी कारागृहांत गेलो, त्यावेळीं सौ. ८ महिन्याची गरोदर होती. ११ जानेवारीला

मी तुरुंगांत गेलो व २ महिन्यांत सौ. प्रसूत होऊन कन्या झाली. त्यानंतर १९२६ रंगपंचमी दिवशीं मुलगा झाला. फक्त दोनच मुले झाली व दोन्ही ईशकृपेनें सुखरूप आहेत. मला दोन बहिणी व तीन भाऊ आहेत. एक भाऊ व एक बहीण वारली. सर्वांत वडील मीच आहे. माझे वडील बी. ए. असून सामान्य स्थितिपासून चढत चढत आज फार मोठ्या हुद्यावर आहेत. १९२० सालीं ५–६ जून रोजीं मी बी. ए. झालो व त्याच दिवशीं ऑनर्स न मिळाल्यामुळें मन खिन्न झालें व वडीलांच्या मनात मी +++च्या हायस्कूलात सरकारी नोकरी करावी असे होते म्हणून त्यांचा व माझा आयुष्यात प्रथम विरोध झाला व एकंदर घरची मनस्थिती बिघडून मला कौटुंबिक त्रास होण्यास सुरवात झाली व मी लोकमान्यांच्या खांद्या देऊन देशसेवेचें व्रत घेतल्यामुळें व तीनदा तुरुंगात गेल्यामुळें वडीलाबरोबर माझा विरोध फार झाला. अशा रीतीनें १९२० डिसेंबर पासून १९३१ मार्च १९ तारखेपर्यंचा काल अचानक व अनपेक्षीत घडामोडीचा गेला व वकीलाना शिव्या दिल्या तीच वकीली ३ वर्षे केली व पुढें करावी लागणार. सांपत्तिक दृष्ट्या व्यापारात बुड, घरीं अत्यंत क्लेश व तीनदा कारागृहवास व पुन्हा सुटून आल्यावर पुढील विवंचना. पक्षकाराकरता अत्यंत परिश्रम करून ही पैसे मिळत नाहींत. विद्यार्थ्यांकरतां पदराला खार लावून २–४ मुलाकरतां रोज दोन तास वकीलाचा वर्ग घेतला तरी त्यात पैसे मिळत नाहींत सौ. स तर मजकडून कोणच्याही तऱ्हेचे सुख नाहीं. देशी खादी, व भाषाविषयक वादात मुलाला अन्यभाषा शिकविली वगैरेमुळें घरीं सौ. शीं प्रत्येक बाबतींत तीव्र मतभेद त्यामुळें स्वत.ला सुख नाहीं, सौ.चे जिवाला चैन नाहीं. व मुलांची कोणचीही हौस फिटत नाहीं अशा परिस्थितीत आज मी सापडलो आहे. जवळ पैसा नाहीं. अशा अज्ञानांध:कारात आपण राजबंदीबद्दलचे केलेले भविष्य बरोबर आले व पुढें तडजोड होऊन शांतता होणार. असें आपले भविष्य असल्यामुळें शांततेच्या काळांत पुन्हा वकीली व वकीलीचा वर्ग काढून ४ पैसे मिळवावे व पुढील युद्धांत लोकावर बायकापोरांचा भार न घालता तयारी करावी असे मनांत योजले आहे. मलाही थोडे ज्योतिष व हस्त सामुद्रीक कळते.

एकदा नापास होणें, पुढें पास होणे, जाहीर सभेत बोलण्याच्या विरुद्ध वर्तन होणें, भावनाप्रधान व प्रथम जे वाटेल तेच करणे, केव्हाही सार्वजनीक किंवा खासगी आयुष्यात प्रथम दर्जा नाहीं. दुय्यम दर्जा मिळणे, बाप, दोन चुलते, आजी, सासू, सासरा सर्व असून माझ्या राष्ट्रीय मनोवृत्तीमुळें व एकंदर स्वभावामुळें त्यांचा उपयोग मनाप्रमाणें न होणें, आयुष्यात मास्तर नाटकात ( शाळेत काम केले ) स्त्री व पुरुष पार्ट दोन्ही, शाळा मास्तर, सुपरवाईझर, वकीली क्लासात अध्यापक, मुख्याध्यापक, वर्तमानपत्राचा ५ वर्ष बातमीदार, व कारागृहवास संबंध प्रांतात दोन भाषेंत व्याख्याने देणें, गया कांग्रेसच्या वेळीं हरीद्वारपासून उत्तर हिंदुस्थानात दौरा व मद्रास कांग्रेसच्या वेळीं धनुष्कोटी रामेश्वरपर्यंत दक्षिण हिंदुस्थानात दौरा पण तोही सौ. मनांत त्या वेळीं जाण्याचे नसताना, पत्नीबरोबर तत्वत: प्रत्येक लहान बाबीपासून मोठ्यापर्यंत मतभेद, मानसीक अत्यंतीक क्लेश, पित्याशीं विरोध, देवी, विषम, मातेचे दूध नाहीं, वासनातिरेकानें प्रकृती उष्ण व अशक्त, १९२० जूनमध्यें व १९२६ जूनमध्यें आत्महत्येचेही विचार आले होते. सार्वजनिक कामांत यश पण द्रव्यदृष्ट्या फार हलाखी कर्ज.

# कुंडली संग्रह

लेखकः---पंडित रघुनाथशास्त्री पटवर्धन, पुणें.

## ( भाग २ रा )

### कुंडली क्रमांक १

श्रीशके १८११ आषाढ मासे कृष्ण पक्षे द्वितियों तिथौ भानुवासरे श्रवण नक्षत्रे घ. ३८ प. ५० अत्रदिने श्रीसूर्योदयात्गत घ. ४५ प ५० समये जन्म. जन्मस्थळ--नागपूर जन्म-तारिख १४ माहे जुलई सन १८८९.

जन्मकुंडली

### आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति ---शरीर रोडकें, स्वभाव आनंदी नसून नेहमी विचारी व गंभीर, तोंड लांबोळें, रंग निमगोरा, प्रवासाची आवड, मन चंचल.

गडातरें व मोठाले आजार ---लहानपणापासून शरीर रोगट. १९१२ पासून मधुमेहाची बिमारी व तोच त्रास चालू.

आई व वडिलांचें सौख्य ---आईचा मृत्यु शके १८१७ ( हार्ट डिसीज ). वडील ह्यात आहेत. वय ७०, वडीलांस हल्लीं हृद्रोग, वडीलांची मूळ सांपत्तिक स्थिति अगदीं गरीबीची, दरमहा पगार रु. २० पुढें ४५ वे वर्षी दुकान काढल्यामुळें हल्लीं सांपत्तिक स्थिति उत्तम.

वडिलांचा धंदा दुकानदारी, महिन्याचें उत्पन्न २०० रुपये.

धंद्यांत अगर नोकरींत भयंकर काळजीचे व असह्य प्रसंग ---नोकरींत काळजीचे प्रसंग फार. धंद्यात काळजीचे प्रसंग १९२१ सालीं फक्त.

भावंडें एकंदर २ त्यांत हयात १, पाठीवर भावंड नाहीं, हेच पहिलें, भावाचा मृत्यु १९१७ जून महिन्यांत तळ्यांत जीव देऊन.

विवाह--:१४ डिसेंबर १९१३. विवाह एकच, स्त्री जिवंत आहे, स्त्रीचा स्वभाव फार तापट, स्वतंत्र बाणा, ठेंगणी, रंग निमगोरा, तोंडावर अस्पष्ट देवीचे व्रण, आपलेंच मत शेवटास नेणारा स्वभाव, यामुळें स्वतःस स्त्रीसौख्य नाहीं. नेहमीं तंटे. संतति प्रथम मुलगी जन्म १०।१।२०, दुसरी मुलगी जन्म २६।१०।१९२२ दोन्ही हयात आहेत. स्वतःस, स्त्रीला व पित्यास कायमचा विकार-स्वतःस कायमचा विकार मधुमेह, स्त्रीस विकार नाहीं, वडीलास हृद्रोग, विद्या बी.ए.पर्यंत, १९१० पर्यंत सारखें यश. पुढें १९१७ पर्यंत सारखें अपयश. भाग्योदय नागपूर शहरी मध्य-प्रांतांत. नोकरीस सुरुवात ता. १।११।१९१७ त्यांत पहिली तीन वर्षे कष्टदायक, पुढें सुरळीत. स्वतःवर व्यावहारिक जबाबदारी-वडील हयात असल्यामुळें व एकत्र कुटुंब असल्यामुळें स्वतःवर व्यावहारीक जबाबदारी नाहीं. आज दरमहा उत्पन्न ६८ रुपये, अनपेक्षित रीतीनें परिस्थि-तींत बदल-लहानपणचे दिवस फार गरीबींत व कष्टांत गेले. नोकरीपासून स्वतःचें उत्पन्नामुळें थोडें सुख होऊ लागलें. सांपत्तिक दृष्टया अत्यंत वाईट काल वयाचे २० वर्षेपर्यंत म्हणजे १९१० पर्यंत अत्यंत वाईट काल, द्रव्यदृष्टया चांगला काल. साधारणतः १९२१ पासून कोणत्याही कार्यांत यश-अपयश-कोणत्याही कार्यांत अतिशय कष्टानें यश येतें, अपयश सहज येतें. संकटें आलीं नाहींत व साह्यही घेण्याचा प्रसंग आला नाहीं. साधारण साह्य मिळालें ते ओळ-खीचे गृहस्थाकडून १९१७ व १९१९ सालीं. नोकरी शिक्षण खात्यांत मास्तरची. त्यांत १९१७ ते १९२१ वर्षें फार काळजीची गेली. संतती-मुलगा नाहीं. सासरची सांपत्तिक स्थिति-सासरचे वार्षिक उत्पन्न १००० रुपये व वार्षिक खर्च ४०० रुपये. त्याजकडून लाभ यत्किंचित् देखील नाहीं. सावत्र आई आणि भावंडें व त्यांची स्थिति-सावत्र आईचा मृत्यु आगष्ट १९२०, सावत्र भावंडें ५ सावत्र भावांची स्थिति उत्तम. बहिणी सुस्थळी चांगले श्रीमंत जहा-गिरदार याचेकडे, चुलत्याचें उत्पन्न सालीना २०००, चुलता एकच, मावशी एक हयात. आत्या एक हयात. सत्तेचें घर, वाहनें, नोकरचाकर, जमीनजुमला या बाबतींत स्वतःचें सत्तेचें घर आहे. नोकर चाकर, वाहनें नाहींत. वडीलाचे सत्तेचीं तीन घरें आहेत.

### कुंडली क्रमांक २

श्रीशके १८३७ जेष्ठमासे शुक्लपक्षे दशम्यां तिथौ इंदुवासरे हस्तनक्षत्रे घ. ४० प. २० अत्रदिने श्रीसूर्योदयात्गत घ.४५ प.५० समये जन्म. जन्मस्थळ सरंद (आजोळी) जन्मवेळ पहाटे.

जन्मकुंडली.

| स्थान | ग्रह |
|---|---|
| १ | मं. |
| २ | शु |
| ३ | ५ |
| ४ | के. |
| ५ | |
| ६ | चं |
| ७ | |
| ८ | |
| ९ | |
| १० | रा. |
| ११ | |
| १२ | गु |

स्पष्टग्रह

| | र. | च. | म. | बु. | गु. | शु. | श. | रा. | ल. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| रा. | २ | ५ | ० | २ | ११ | १ | २ | ९ | ० |
| अं. | ६ | २५ | २७ | ३ | ५ | १५ | १३ | २६ | २१ |
| क. | ३९ | १४ | १० | १८ | ३२ | ५६ | ३२ | ४७ | १६ |
| वि. | ३७ | ४३ | ३२ | ३४ | २६ | ५३ | ७ | १५ | ४३ |
| | ५९<br>५७ | | ४४<br>३८ | ३९ व.<br>३३ | ३<br>२६ | ७२<br>८ | ८<br>१५ | ३<br>११ | |
| जन्मर्क्ष चित्रा | | | | सर्वर्क्ष ८०० | | | भोग्यर्क्ष ८६ क. | | |

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थितिः—अशक्त, किरकोळ आजाराची नेहमी कुरकूर, स्वत. भित्रा, वाचनाची आवड, रूप मध्यम, रंग सांवळा, पोपटी, शरीर अव्यंग,

गंडांतरें व मोठाले आजारः—पहिली ४।५ वर्षे त्रासाची गेलीं. दुसऱ्या वर्षी डोक्यांत विषाराचे फोड फार, आगपेण.

आई व वडिलांचें सौख्यः—वडील हयात, आईचा मृत्यु चैत्र शुद्ध १३ शके १८४६

आई व वडिलांस मोठाले आजारः—वडील निरोगी, आई नेहमी अशक्त, शके १८४६. माघ फाल्गुन जलोदरानें आजारी व त्यांतच मयत.

वडीलांची मूळ सांपत्तिक स्थितिः—मूळ स्थिति अगदीं गरीबीची. स्वतःचे प्रयत्नानें सन १९१९ पासून स्थिति मध्यम.

वडिलांचा धंदा शिक्षक. महिन्याचें उत्पन्न साठ रु.

भावंडें एकंदर ५ त्यांत हयात ५ पाठीवर भाऊ, आणी बहीण, जास्त बहिणी व त्यांची संख्या ३, वडील बहीण जन्म १९१४ मार्च,पाठचा भाऊ नोवेंबर १९१८, नंतर बहीण श्रावण शके १८४२, धाकटी बहीण शके१८४४ श्रावण, स्वतःस पित्ताचा एकसारखा त्रास वारंवार होतो.

आप्तवर्गः—चुलता नाहीं, मामा दोन, मावशी एक मयत, दोन हयात. आत नाहीं.

### कुंडलीक्रमांक ३

श्रीशके १७८५ भाद्रपदमासे शुक्लपक्षे पंचम्यांतिथौ घ. ५ प. २० भृगवासरे विशाखानक्षत्रे घ. ९ प. १९ अत्रदिने श्रीसूर्यास्तात् गत घ. ७ प. ० समये जन्म. जन्मस्थळ कासें जि. रत्नागिरी जन्म वेळ आवशीस. जन्मतारिख १८ माहे ९ सन १८६३ ७ घटका रात्रीं.

जन्मकुंडली

षष्ठस्थानांत रवि, मंगळ, बुध, शुक्र, शनि असे पांच ग्रह आहेत.

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थितिः—शरीर कृश, डोळे घारे, चेहेरा लांबट, वर्ण काळा, कपाळ लहान, उंची फू. ५ इंच, ६ प्रकृती साधारण अशक्त, स्वभाव महत्वाकांक्षी नाहीं. शरीर अव्यंग. परंतु आंगावर श्वेतकुष्ठाचे डाग वयाच्या १९ व्या वर्षी दिसून आले.

गंडांतरेः—१६ व्या वर्षी रक्तदोष व खरूज, अत्यंत पीडा तीन महिने. २९ व्या वर्षी ज्वर एक महिना, ३४ व्या वर्षी हगवण २ महिने. ३७ व्या वर्षी पुन्हां ज्वर दोन महिने. ४३ ते ४९ ह्या वर्षांत मूत्रपिंडांत खडा. आपरेशन करून काढला. ६० व्या वर्षी ज्वर व माथेशूळ. ५९ व फिरून बासष्टाव्या वर्षी हार्टट्रबल, हृदयाचा विकार.

आई व वडिलांचें सौख्यः—वडिलांचा मृत्यु मार्च १८८८ मातोश्रींचा मृत्यु जानेवारी १९१०.

आई व वडिलांस मोठाले आजारः—वडिलांस डोळ्यांचा विकार सन १८६३ सालीं. शीतज्वर १८७७ सालीं २ महिने व शेवटचा विषमज्वर १८८८. मातोश्रीस डोळ्याचा विकार-सन १८६० सालीं, त्यानें डोळ्यांवर साऱ्या जन्मभर सारा व अखेर अंधत्व. सन १८७६ सालीं विषमज्वर.

वडीलांची मूळ सांपत्तिक स्थितिः—सन १८५८ पासून सन १८७४ पर्यंत खाऊनपिऊन बरी. पुढें अगदीं निकृष्ट. वडिलांचा धंदा कारकुनीचा. महिन्याचें उत्पन्न २५।३० रुपये १८७४ पर्यंत. धंद्यांत अगर नोकरींत भयंकर काळजीचे व असह्य प्रसंग १८७४ व त्यांचा परिणाम कामावरून दूर करून पेनशन देणें.

भावंडें एकंदर १० त्यांत हयात ६, पाठीवर मुलगी, आधीं हेंच पहिलें. दुसरी मुलगी ज. १८६५ मृ. १८६६ यांच्या पाठीवर तिसरी बहीण ज. १८६७ हयात. ४ था भाऊ ज. १८७० मृ. १८७२, पांचवा भाऊ जन्म १८७३ हयात, ६ वी बहीण जन्म १८७५ हयात, ७ वी बहीण जन्म १८७७ मृ. १९०१, आठवी बहिण ज. १८८० हयात, नववा भाऊ ज. १८८३ मृ. १९१८, दहावा भाऊ जन्म स. १८८५ हयात.

**विवाह दोनः**—पहिला १८७८. वयाचे १५व्या वर्षी. स्त्री बाळंत होऊन (१८८७) मुलगी झाली. व नंतर ३ महिन्यानंतर क्षयानें वारली. व दुसरा विवाहः—१८८८ मार्च. प्रकृती उत्तम. सुस्वरूप. बाळंत रोग १९०९ त्यानंतर संतती बंद सासरा महालकरी नंतर पेनशनर, सांपत्तिक स्थिति बरी. तिला भाऊ एक. संतति—पहिल्या कुटुं-

चाला मुलगी एक जन्म १८८७ मृत्यु १९१५ हृदयाचें विकारानें. दुसऱ्या कुटुंबाला पहिली मुलगी ज. १८९१ मृ. १८९३, दुसरा मुलगा जन्मानंतर लगेच मयत, १८९३. तिसरी मुलगी ज. १८९५ मृ. १८९६, चवथा मुलगा ज. १८९७ मृ. १९००, पांचवा मुलगा ज. १९०१ मृ. १९०१, सहावी मुलगी ज. १९०३ हयात, सातवा मुलगा ज. १९०४ हयात. आठवा मुलगा ज. १९०७ हयात. नववा मुलगा ज. १९०९ हयात, स्त्रीस अगर मातापित्यास कायमचा विकार कांहीं नाहीं. स्वतःस मात्र श्वेतकुष्ठाचा विकार आहे. विद्या L.C.E. पर्यंत जहाली. विद्या पूर्ण वयाच्या २५ व्या वर्षी म्हणजे १८८७ अखेर पूर्ण जहाली. भाग्योदय नोकरीला सुरुवात-धंदा नोकरीचा. सुरुवात १८८८ तेव्हांपासून उत्तरोत्तर वृद्धिंगत १९२२ पर्यंत, तेथून स्थिर. स्वतःवर जबाबदारी वयाच्या २५ व्या वर्षी पडली (१८८८) महिना उत्पन्न ५५० रु. सरासरीनें. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल १९०७ म्हणजे वयाचे ४४ व्या वर्षी पडला. तेव्हां कनिष्ठ नोकरींतून वरिष्ठ नोकरींत बढती जहाली. हा कदाचित् अनपेक्षित म्हणतां येणार नाहीं. परंतु बदल जहाला खास. सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत वाईट काल—अत्यत वाईट जरी नाहीं तरी सुरुवातीची पहिली १० वर्षे हातघाईची गेली. (१८८८ ते १८९८) द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल शेवटची १२ वर्षे म्हणजे १९१६ ते १९२७. कोणत्याही कार्यांत अपेश माहीत नाहीं. सरकार अगर लोकांकडून मान—सरकाराकडून १९१६ म्हणजे वयाच्या ५३ व्या वर्षी विशेष प्रकारचा मान मिळाला. संकटें एका उपद्यापी व्यवसायबंधूकडून व सहाय्यही इतर व्यवसायबंधूकडून. त्रासाचे दिवस २ वर्षे म्हणजे १९१० व १९११ एका व्यक्तीखेरीज सर्वत्र सहानुभूति. नोकरी इंजिनियर खातें. चढती स्थिति १९२७ पर्यंत. त्यापुढें स्थिर जहाली आहे.

मोठ्या मुलाची बौद्धिक स्थिति साधारण. सासरची सांपत्तिक स्थिति—माहुरवाडची स्थिती खाऊनपिऊन बरी. त्याजकडून लाभ कांहीं नाहीं. चुलता एक होता तो अगदीं विपन्न स्थितींत सन १८७६ त वारला. त्याचा एक मुलगा वकील असून परिस्थिती बरी आहे. मामा, मावशा, आत्या हल्लीं कोणी नाहींत व होते त्या वेळीं त्यांची परिस्थितीही बरी नव्हती. एक मामा मात्र याज्ञिकींत व वैदिकींत नामांकित होता. वाहनें व नोकर १९२२ पूर्वी होते ते स्वकष्टार्जित होते. १८८८ पासून १९२७ पर्यंत त्यांचे सौख्य मिळालें.

ह्या गृहस्थांची सन १९२२ पर्यंतची हकीकत दिली आहे. त्याच्या पुढील हकीकत अशी आहे कीं, हे गृहस्थ पेनशनर होते. पेन्शन घेण्याचे वेळीं यांना ६०० रु. पगार व वरिष्ठ अधिकार होता. सरकारकडून पदवी मिळालेली होती. सन १९२५ पासून हे गृहस्थ एका मोठ्या संस्थानांत कायमचे रहाण्यास गेले व तेथें त्यांनी एक मोठा वाडा खरेदी घेतला. मुलांची शिक्षणाची सोयही तेथेंच केली परंतु खडतर काळ असा आला कीं वाडा घेतल्यानंतर दोनच वर्षांनीं तेथें मोठा जलप्रलय होऊन वाड्याच्या दुसऱ्या मजल्यावर पाणी चढले व त्यांत चीजवस्तु सर्व वाहून गेली. सुदैवानें हे गृहस्थ सहकुटुंब रात्री ९ वाजतां पोहणाऱ्यांच्या पाठुंगळीं बसून तेथून दुसरीकडे गेले व बचावले. त्यानंतर त्यांनी घर विकून टाकलें ! आणि सन १९३३ मध्यें हार्ट फेल्युअर होऊन यांचा अंत झाला ! संतती व पत्नी हयात आहे. संततीही बरीच.

कुंडली क्रमांक ४

श्रीशके १८०७ ज्येष्ठमासे कृष्णपक्षे १४ तिथौ मंदवासरे घ. १८ प. ५३ परे ३० अत्रदिने श्रीसूर्योदयात् गत घ. १२ प. ३३ समये जन्म. जन्मस्थळ मुंबई, जन्मवेळ सूर्योदयीं

जन्मकुंडली.

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थितिः—रंग सावळा, तब्येत मध्यम. गंडांतरें, व मोठाले आजारः—झाड्यापासून त्रास १९१८नोव्हेंबर डिसेंबर. आई व वडिलांचें सौख्यः—आई जीवंत, वडील कॉलऱ्यानें वारले मे १८९६ सन. आई व वडिलांस मोठाले आजारः—१९१८ मध्यें आजार ताप.

वडीलांची मूळ सांपत्तिक स्थिति—नोकर, रुपये ५० पासून ६० रुपये पगार, वडिलांचा धंदा कारकुन, महिन्याचें उत्पन्न ६० रुपये (साठ) धंद्यांत अगर नोकरींत काळजीचे प्रसंगः— १९१० पासून १९१४, १९२० पासून १९२३.

भावंडें:—एकंदर ७ सात, त्यांत हयात दोन, पाठीवर भाऊ, आधीं भाऊ, भावंडें चार भाऊ व दोन बहिणी, बहिणी १९०० मध्यें, एक भाऊ १९११, दुसरा भाऊ पाठीवरील १९१९ असे जन्म, विवाह एक १९१९ मे महिना, स्त्रीची प्रकृति, साधारण.

संततिः—प्रथम दोन मुली, पहिली मोठी मुलगी जिवंत, दुसऱ्या वेळेस पात, तिसरी मुलगी सहा महिन्याची वारली. चौथी मुलगी हयात, विद्या, मॅट्रीक पर्यंत.

भाग्योदय, नोकरीस सुरवात १९१०. स्वतःवर जबाबदारी १९१० पासून, दरमहा उत्पन्न रुपये ४०० पासून ५००.

कुंडली क्रमांक ५

श्रीशके १८०४ चैत्र मासे कृष्णपक्षे तिथौ ११ शततारका नक्षत्रे घ. ३८ प. ४२ अत्रदिने श्रीसूर्योदयात्गत घ. २ प. २५ समये जन्म. जन्मस्थळ जयपूर जन्मवेळ सकाळीं.

जन्म कुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थितिः—गौरवर्ण, सात्विक आवड, अंगावर देवीचे वण. गंडांतरें, व मोठाले आजारः—लहानपणी घाण्याचे काम सुरू असतां दांड्यावर पडलों. आई व वडिलांचें सौख्यः—वडील हयात, मातोश्री माझे वयाच्या ८व्या वर्षी मरण पावली. आई व वडिलांस मोठाले आजारः—आई कॉलऱ्यानें मरण पावली. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थितिः—गरीबी वडिलांचा धंदा गुमास्तेगिरी, महिन्याचें उत्पन्न १५ रु. भावंडें २ भाऊ, २ बहिणी हयात, पाठीवर बहीण आधीं स्वतःचा जन्म. विवाह एकच जाहला सन १९०२, फाल्गुन व॥.५. संततिः—प्रथम पुत्र. २ दोन मुलें ज्वरामुळें वारली. एकच पुत्र ४ वर्षांचा व मुलगी ६ वर्षांची. विद्या इंग्रजी ४ थी.

नौकरी सुरू १५।११।०५ वाढत्या प्रमाणावर स्वतःवर व्यावहारिक जबाबदारी लग्न जाहल्यापासून (सन १९०३) पगार ३० रुपये. अनपेक्षीत रीतीनें परिस्थतींत बदलः—सन १९१८ सालापासून फेर पडला. परंतु संततीचा नाश, इनफ्ल्युएनझा-मध्यें सर्व संतती नष्ट होऊन पुढें मुलगी व मुलगा जाहला हल्लीं दोन्ही हयात. सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत वाईट काळ जन्मल्यापासून तो नौकरीवर रुजु होईपर्यंत. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काळः—सन १९१८ चें पुढें १९२५ पर्यंत, परंतु हल्लीं चिंता कर्जबाजारीपणमुळें जास्त आहे. नोकरी, व्यापार अगर दुसरा व्यवसायः—शाळाखाते, देवघेवीचा धंदा त्यांत मध्यंतरी साधारण परंतु त्या देवघेवीचा परिणाम वाईट असून चिंता जास्त उत्पन्न झाली व कर्ज देणें राहिले. सासरची सांपत्तिक स्थिति चांगली, लाभ कांहीं नाहीं. फक्त एक मामा व १ मावशी असून सत्तेचें घर आहे, जमीनजुमला यांचें सौख्य नाहीं.

### कुंडली क्रमांक ६

श्रीशके १८०२ चैत्रमासे शुक्लपक्षे, पंचम्यां तिथौ, बुधवासरे, रोहिणी नक्षत्रे, घ. ५ प. ४३ अस्मिन्दिने श्रीसूर्योदयात्गत घ. ३ प. १५ समये जन्म. जन्मस्थळ एरंडोळ (मामाचे घरीं)

जन्मकुंडली

### आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

१ शारीरिक स्थितिः—हाडें मजबूत, शरीर मध्यम, ताटमोचा शोक, तोंड साधारण गोल कपाळ रुंद, पित्त प्रकृति. महत्त्वकांक्षी, रंग सांवळा, गोड पदार्थ प्रिय, कपाळावर, डोक्यावर, कपाळ व डोकें यांच्या सांध्यावर (नाकाचे रेषेंत), डाव्या नाकपुडीजवळ, छातीस, उजव्या हातावर, पोटावर, पोट व पाठ यांचेमध्यें, इतक्या ठिकाणीं तीळ आहेत.

स्पष्टग्रह

| | र. | चं. | मं. | बु. | गु. | शु. | श. | रा. | के. | ल. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| रा. | ० | १ | २ | ११ | ११ | ११ | ११ | ८ | २ | ० |
| अं | २ | २२ | ६ | १० | ११ | ८ | २४ | १८ | १८ | २५ |
| क | ३४ | ४५ | ५५ | ३४ | १२ | ५२ | १८ | २३ | २३ | २५ |
| वि. | ३ | ४४ | ४६ | ५७ | ३ | २२ | ५७ | १६ | १६ | २२ |
| | ५८ ३९ | ७२२ २७ | ३३ ५० | १३ ५६ | १२ ४६ | ७४ ८ | ८ १३ | ३ ११ | ३ ११ | |
| जन्मर्क्ष रोहिणी | | | सर्वर्क्ष ८०० | | | | भोग्यर्क्ष ३४ क. | | | |

२. गंडांतरें, व मोठाले आजारः—सन १८९२ मध्यें भयंकर ज्वर; १८९७ ते ९९ हिंवताप; १९०१ डोळेदुखी, १९०३ हिंवताप; १९०६ डोळे; १९१८ हिंवताप; १९२२ हिंवताप प्रत्येकीं १५ दिवसाचे आंतील मुदतीचे, याप्रमाणें त्रास.

३. आई व वडिलांचें सौख्यः—आई ह्यात आहे. वडील सन १९०९मध्यें मयत झाले. दम्याची व्यथा होती. ४. आई व वडिलास मोठाले आजारः—१९०४ मध्यें आई डोळ्यांनीं फार अजारी होती. वडिलांस १८९८ डिसेंबर २६, २७ तारखेंपासून खोकला, दमा यांस सुरवात.

५. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थितिः—पूर्वार्जित उत्पन्न वगैरे कांहीं नाहीं. शेती नाहीं, भिक्षुकी (यजमानकृत्याची) नाहीं. सन १९०४ मध्यें घर सावकारी देण्यांत गेलें आता आम्हांस स्थाईक घर नाहीं. ६. वडिलांचा धंदा—रोखें अर्ज वगैरे लिहिण्याचा, महिन्याचें उत्पन्न सुमारें दरमहा रुपये १० ते २० चे आंत.

७. धंद्यांत अगर नोकरीत काळजीचे व असह्य प्रसंग'—सन १९०२ व १९१७मध्यें नोकरींत याचेवर अर्ज झाले. प्रसंग भयंकर काळजीचे व असह्य होते. पण याच्यावर अनिष्ट परिणाम झाला नाहीं. अर्ज करणारावर १९१७ मध्यें झाला.

८. भावंडें —९. त्यात ह्यात यांचेसुद्धां ३, पाठीवर बहीण, आधीं हेच, ५बहिणी मृत. अनुक्रमें—सन १९०५, १९१० व १९२० मध्यें लेंकुरवाळया ३ बहिणी मेल्या. (यांना धाकटे २ भाऊ आहेत. पैकीं त्यांत मोठा शके १८१९ मध्यें जन्मला व धाकटा शके १८२३ मध्यें जन्मला. याचे पुढें भावंड झालें नाहीं.

९. विवाहः—एकच झाला. तो सन १९०२ मध्यें चैत्र शुद्ध दशमीस झाला. १०. स्त्रीची प्रकृतिः—उष्णविकार, आळशी, सुस्त, मांडखोर, हेवेखोर, अक्कलहीन, वर्ण सांवळा ठेंगणी, (जन्म शके १८१३ श्रा. व ३०) सासरा स्वयंपाकी होता. सासरची संपत्ति नाहीं फक्त लहानसे घर. मेव्हणा, मेहुणी नाहींत. हल्लीं फक्त सासू आहे.

११. संततिः—प्रथम मुलगी १९०६ मध्यें झाली, ती १९०८ मध्यें (हगवणीनें) मेली. एकंदर ५ अपत्यें झालीं. चार मुली व एक मुलगा. १ मुलगी ८ वर्षांची आहे. हिच्या पाटीवरच ४ धुपाय झाले. १२. स्वतःस, स्त्रीला अगर मातापित्यास कायमचा विकार, स्वतःला पित्ताचा, स्त्रीस उष्णतेचा, आईस पोटदुखीचा विकार आहे.

१३. यांची धुळे ट्रेनिंग कॉलेजची दुसऱ्या वर्षाची परीक्षा १८९८ मध्यें पास झाली, तिसरे वर्षाचे परीक्षेत ( १९०४ व १९०६ ) २ वेळां नापास झाले. १४. धंद्याला अगर नोकरीला सुरुवात–पूर्वखानदेश ता. २३।१२।१८९८ नोकरीस सुरवात. प्रथम पगार रु. ११. १९०२ मध्यें रु. १२, १९०४ मध्यें १५; १९०८ मध्यें १८; १९१२ मध्यें २०; १९१४ मध्यें २२; १९१६ मध्यें २५; १९१८ मध्यें २७; १९१९ मध्यें ३५; १९२० मध्यें ३६, १९२१ मध्यें ३७; १९२२ मार्च पासून ५५ रु. ५५; वॉरचे वेळीं अलॉवन्स रु. १३॥ ( मध्यंतरी १९०९, १० मध्यें पोष्टाचा पगार ५ रु. १९१८ ते २० पोष्टाचा पगार ३+२ अ.

१५. स्वतःवर व्यावहारिक जबाबदारी–नोकरीला लागल्यापासून व्यावहारिक जबाबदारी आली. कारण वडिलांस प्रथम दम्याची व्यथा जडली, नंतर ते गत झाले आज महिना उत्पन्न ६८॥ रु. आहे. १६. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल, द्रव्यदृष्ट्या १९२२ पासून बदल झाला. व १९२० च्या मे जून महिन्यांत धाकट्या भावाचें लग्न केलें, व १९२४ च्या मार्चांत सर्वांत धाकट्याचें लग्न केलें. यांत खर्च फार झाला. ( राहण्यास स्थाईक घर नाहीं. आजे सासू गेल्या श्रावणात वारल्यामुळें व सासूस आधार नसल्यामुळें गेल्या आश्विनपासून सासूच्या घराची देखरेख व रिपेर करावी लागते. सासूस दरमहा ५ रु. पाठवावे लागतात. सासूचें घर मिळेल अशी बोलवा आहे, पण त्या घरांत आम्हां तिन्ही भावांचा समावेश होणें अशक्य. म्हणून निराळें आयतें घर विकत घेण्याचा विचार आहे. शिवाय मुलीची काळजी आहेच. पुढें काय होईल तें सांगवत नाहीं. )

१७. सांपत्तिक दृष्टया वाईट काल, सन १९१६ व १९१७ आणि त्या पूर्वीचे सर्व सन. १८. द्रव्यदृष्टया उत्कृष्ट काल १९१९ व १९२२. १९. कोणत्याही कार्यांत यशः—अपयश, लेखी कामांत अपयश येतें. २०. सरकार अगर लोकांकडून मान, सन १९२१ च्या खाने-सुमारींत एकच सुपरवॉयझर होतों. त्याबद्दल सर्टिफिकेट मिळालें आहे. त्याशिवाय मान नाहीं.

२१. संकटें ग्रामस्थ व असि. मास्तर यांजकडून संकटें आलीं होतीं, तीं चांगले अधिकाऱ्यांनीं निवारण केलीं. व्यवहारांत मामा व मेहुणे यांनी मदत केली. २२. नोकरी, नोकरींत फक्त पोष्टाचें काम कांहीं दिवस होतें, तें कलम १४ मध्यें लिहिलें आहे. त्या वेळेस व्हि. पोष्टमन् यांच्या त्रासामुळें व एक माझी मुलगी दोन्ही डोळ्यांनीं अपंग झाल्यामुळें पोष्टाचें काम मी सोडलें.

नातेवाईक व त्यांची स्थितिः—सावत्र आई नव्हतीच. १ चुलता बापातून विभक्त होता. २ मामा होते. पैकीं धाकटे मामा त्याच्या वयाच्या १८ व्या वर्षी पाण्यांत मेले. मोठे मामा ८ वर्षें झालीं वारले, मामांनीं आमचीं लग्नें व बहिणींचीं लग्नें करून दिलीं. २ आत्या होत्या. दोन्हीहि मेल्या. एकीचा वंश खुंटला. दुसरीचा आहे.

## कुंडली क्रमांक ६

श्रीशके १८०३ जेष्ठमासे शुक्ल. ३ पक्षे ७ तिथौ घ. २६ प. २२ मदवासरे मघानक्षत्रे घ. १३ प. ४६ पर पूर्वा फा. न. अत्रदिने श्रीसूर्योदयात् गत घ. ५४ प. २५ समये जन्म. जन्मस्थळ ता. दिंडोरी वरखेडे,

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति —सुदृढ, चेहरा लांबट, दांत मोठें, तोंडावर देवीचे वण, वर्ण सर्वसामान्य, कपाळ मोठें, शरीर उच, व्यग नाहीं, प्रकृती निरोगी पण उत्साह त्या मानाने कमी. गडांतरें व मोठाले आजार—अगदीं लहानपणी देवी गोवर वगैरे १३ ते १६ वर्षेपावेतो. मुळव्याधीचा विशेष जोर २० वर्षी, नवगुदाचा आजार मोठा २८ वे वर्षी, मुळव्याधीचा जोर आता कांही नाहीं. आई व वडिलांचें सौख्य —शके १८१२अधिक मा. शु॥ ६ रोजी वडीलांचा मृत्यु वरखेडे येथें तापह्गवर्णीने. माझे १० वर्षी. आई व वडिलांस मोठाले आजार —आईचा मृत्यु शके १८२१ चैत्र शु. ७ रोजीं नासिक येथें प्लेगनें माझे १९ वें वर्षी झाला. पूर्वार्जित स्थिति ( आजोबाचे लहानपणीं अत्यंत गरिबी त्यांतून थोरले चुलते व तीर्थरुप कर्ते झाल्यानतर चागल्या स्थितीत आलेले ) वडीलांची मूळ सापत्तिक स्थिति चांगली, सपन्न, धनधान्य, जमीनी, सावकारी दिढी व्यापार धान्य खरेदी विक्री, भिक्षुकीचा गांव, लाकडाचा व्यापार, इमारती वगैरे सर्व बाजूनी समाधानकारक सतती सपत्ती वगैरे, शके १८१२ माझे ९ वर्षी वडीलांचे पश्चात् धाकटे चुलते याचे ताब्यात इस्टेट जाऊन कमी कमी झाली वडिलाचा धंदा ग्रामजोशीपणा उपाध्ये. महिन्याचे उत्पन्न नक्की नाहीं. सध्याची स्थिति हातावर जपजाप्य पाठ अभीषेक भोजन वगैरे कोणी यात्रस्त आल्यास तिसऱ्या भागातील वाटणी महिन्यातून एखादे वेळीं भावडें एकदर ९।१० झाली त्यात ह्यात नाहीं. पाठीवर भाऊ, आधीं बहिण, ३ बहिणी भावडें मृत, वडीलांचे ९।१० अपत्यातील मुले मुली ४ पहिलेच बाळपणी वारली त्यानतर बहिण अपस्मार रोगाने शके १८४० माघ शु. १५ माझे ३८ वर्षी वारली तिचे पाठीवरील बहिण शके १८४१ फाल्गुन मासी ३९ वे वर्षी वारली यांचें एकदर अपत्यांतील ह्यात हे एकटेच.

विवाह—शके १८१६. याचें १३ वे वर्षी कुटुबाचे ९ वे वर्षी विवाह झाला, कुटुंबाचा जन्म शके १८०७ ज्येष्ठ शु. १० घ ११।२० गत घ. ३ पळे ५० दिवसा कर्क लग्नीं झाला.

कुटुंबाची जन्मकुंडली

स्त्रीची प्रकृति —स्त्री गौरवर्ण पित्तप्रकृती, प्रथम संतती १८२३ मुलाचा ६ महिन्याचा गर्भपात, पुनर्जन्म—२ मुलगे २२ वें वर्षी १८२४ पौष मासी जन्म. शके १८२६ दीड वर्षांनी मृत्यु पोटातील रोगानें तिसरा मुलगा याचें २५ वर्षी १८२७ मार्ग शु. १४ जन्म मृत्यु श. १८२९ वै. शु. ११ गळ्याजवळील फोडानें, १८३० चैत्र वा। ३० गर्भ आठ महिन्याचा. चवथा मुलगा याचें २८ वर्षी १८३० चैत्र व. ३ जन्म पाचवा मुलगा यांचें ३० वे वर्षी शके १८३२ पौ. शु. १० जन्म, मृत्यु १८३६ ज्ये. शु ४ यकृतोदरानें. साहावा मुलगा याचें ३३ वें वर्षी १८३५ श्रावण वा। ८ जन्म, मृत्यु भाद्रपद वा। ७-१८३८, ७ वा मुलगा ३५वे वर्षी १८३७ फाल्गुन शु। ४ जन्म, मृत्यु जेष्ठ शु। १४ श. १८४०, ८ वा मुलगा ३९ वें वर्षी १८४१ ज्ये. वा। ७ शुक्र. जन्म, मृत्यु फाल्गुन वा। ७ शके १८४२. ९ वा मुलगा ४१ वें वर्षी १८४३ कार्तिक शु। १२ शनी घ. ५५ जन्म मृत्यु माघ वा। ४, १८४३ स्वत स आजार मूळव्याधीचा होता, आता नाहीं. स्त्रीला आजार पित्तप्रकृती कायम डोके दुखण्याचा, विद्या मराठी, संस्कृत, वेदज्योतिष यांत केला पण एकहि परिस्थितीमुळें, पुरा झाला नाहीं. स्वत वर व्यावहारिक जबाबदारी वयाचे २४ वर्षापासून, द्रव्ययोग कामाचे अडचणीप्रमाणें कर्जानें, कष्टानें, पत्नीनें, वेळ निभाविणारा व त्याच थोडीतून पुन्हा मुक्त होऊन पूर्ववत उदासीनतेने मिळेल त्यात समाधानपणें पार पडणारा द्रव्य योग आहे, संग्राहक नाहीं. महिन्याचे उत्पन्नाचा नियम नाहीं, अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल २४ वे वर्षी वरखेडे येथून नाशिकास राहण्यास आलो तेव्हांपासून, नाशिक येथील बहुतेक एकत्रित असलेला प्रापंचिक खर्च ईश्वरीकृपेनें कसातसा पार पडला आहे. कर्ज होते कठिन असे शके १८४२-४३ साल शके १८३२ यांचें ३० वें वर्षी, शके १८३३ पौष शु। १५ पावेतो विशेष संकट चालू असते. वर ९ मुलाचा जन्म मृत्युचा पाठ लिहिला आहे. त्यानतर संतती नाहीं, सासरची सांपत्तिक स्थिति पूर्वीची उत्तम आता अत्यत गरीबी.

सत्तेचे घर, न वाहनें—सत्तेचे घर वरखेडे येथें आहे, नाशिकला वरील परिस्थितींत घेतलेलें एक वाडिलार्जित वाटून आलेले आहे जमीन वरखेडे येथें ७५ रु उत्पन्नाची धाटणीत आली आहे,

### कुंडली क्रमांक ७

श्रीशके १८१५ आषाढमासे शुक्लपक्षे एकादश्यांतिथौ रविवासरे विशाखादिवस नक्षत्रे घ. ३ प. १५ अत्रादिने सूर्यास्तात् मानेगत घ.१३ प. ९ समये जन्म. जन्मस्थळ वीरवाडी जन्मवेळ रात्री सुमारे १२ वा. ३७ मि. ( मद्रास ) जन्मतारीख २३ माहे जुलै सन १८९३

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थितिः—कुडी बारीक, शारीरिक स्थिति असमाधानकारक, स्वभाव तापट, रूप साधारण, रंग काळासावळा, व्यंग नाहीं, गोड पदार्थांची आवड नाहीं, स्वच्छता व टापटीपेची आवड फार. गंडांतरें, सुमारें वयाचे ८ वे वर्षी अती ज्वर, त्याशिवाय मोठा अजार नाहीं. आई व वडिलांचें सौख्यः—वडील सन १९०४ मध्यें वारले व मातोश्री १९१५ मध्यें वारल्या. आई व वडिलांस मोठाले आजारः—वडील पोटांतील रोगानें व मातोश्री वर्ष दीडवर्ष क्षयानें आजारी होऊन वारल्या. वडीलांची मूळ सांपत्तिक स्थितिः—वडिलांची सांपत्तिक स्थिति वाईट, विशेष चांगले फेरफार नाहींत. वडिलांचा धंदा शेती महिन्याचें उत्पन्न रु. २५ सुमारें, धंद्यांत अगर नोकरींत भयंकर काळजीचे व असह्य प्रसंग सन १९१९ चे जुलै महिन्यांत व १९२५ चे ऑगष्टमध्यें. दोन्ही वेळा नोकऱ्या सोडाव्याच लागल्या. भावंडें एकंदर १० त्यांत हयात २ विवाह दोन, पहिला सन १९१५ मध्यें, व दुसरा सन १९२२ मध्यें. स्त्रीची प्रकृति, सुदृढ नसून शरीरयष्टी अगदीं बारीक स्वरूप साधारण, १९२३ मध्यें बाळंतपणांत ताप व तेव्हांपासून प्रकृति खराब. संतति प्रथम कन्या, एकंदर कन्या २ व दोन्ही हयात, पुत्र नाहीं. विद्या मॅट्रिक १९१३ सालीं नापास, १९१४ मध्यें पास. सॅनिटरी सर्वेची १९१६ मध्यें नापास १९१७ मध्यें पास. विद्या १९१७ ला पूर्ण. भाग्योदय—भाग्योदय नाशीक जिल्ह्यांत नोकरीस सुरवात सन १९१८ मध्यें पहिलें वर्ष चांगले नाहीं. पण पुढें ५ वर्षे उत्तम गेली त्यांत नफाच झाला. अलीकडे ११५ महिने वाईट गेले व नुकसान झाले. उत्पन्न रु. ९० दर महिना, व्यावहारिक जबाबदारी वयाचें १५ वर्षापासून. सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत वाईट काळ बालपणापासून तो सन १९२० पर्यंत. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काळ साधारण १९२० पासून पुढें त्यांतल्यात्यांत बरा काल. कोणत्याही कार्यांत यश अपयशः—कार्यांत यश नाहीं. सरकार अगर लोकांकडून मानः—साधारण मान गेली ५ वर्षापासून लोकप्रिती आहे अधिकारी वर्ग खूष आहे. संकटें कोणाकडून.—तसा प्रसंग नाहीं, पण जी नोकरीमध्यें संकटे आली तीं मी ज्याना मित्र समजत होतो त्यांचेंकडूनच आली. नोकरी म्युनिसिपॅलिटीमध्यें सॅनिटरी खातें व अधिकाराची जागा. सासरची सांपत्तिक स्थिति बरी. सत्तेचें घर, वाहनें, नोकरचाकर, यांचें सौख्य नाहीं !

कुंडली क्रमांक ८

श्रीशके १८०९ फाल्गुनमासे शुक्रपक्षे तृतीयायां तिथौ भौमवासरे पूर्वाभाद्रपदा नक्षत्रे

घ. ३१ प. १८ अत्रदिने श्रीसूर्योदयात्गत .९ प. ५७ समये जन्म. जन्मस्थळ कोन्दाळ जन्मवेळ मुंबई टाईम १० वा. मि. ०

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति:—फार स्थूल नाहीं व फार कृशही नाहीं, वर्ण निमगोरा, दांत बारीक, कपाळ उंच, व्यंग, नाहीं, प्रकृती सशक्त, स्वभाव शांत व महत्त्वाकांक्षी. गंडांतरें, व मोठाले आजार:—वयाचे दहावे वर्षी ज्वर, सतरा ते आठरा खरूज मग साधारण किरकोळ ज्वर वगैरे. आई व वडिलांचें सौख्य:—( वडीलांचा मृत्यु सन १९०० साली शके १८२१ च्या फाल्गुनांत कालज्यानें.) आई अद्याप हयात. आई-व वडिलांस मोठाले आजार:—वडिलास मोठा आजार म्हणण्यासारखा नाहीं. आईची तबेत नेहमीं. आजार वडीलांची मूळ सांपत्तिक स्थिति, अगदीं साधारण, पूर्वार्जित उत्पन्न म्हणण्यासारखे नाहीं. वडिलांचा धंदा नोकरी, महिन्याचें उत्पन्न पन्नास रुपये. धंद्यांत अगर नोकरींत भयंकर काळजीचे व असह्य प्रसंग सन १८९९ साली संपात नोकरी निघाली भावंडें एकंदर दोन, त्यांत हयात नाहीं. पाठीवर बहिण, आधीं मीच, भावंडें दोन्ही मयत. विवाह:—विवाह यांचें वयाचे चौदावे वर्षी. विवाह एकच. स्त्रीची प्रकृति, स्त्रीची प्रकृती बरी, स्वरूप साधारण, मोठाले आजार म्हणण्यासारखे नाहींत. संतति प्रथम कन्या, हयात चार व मृत एक दहा दिवसामध्यें. पुत्र जास्त तीन मुलगे व एक मुलगी असे चार हयात. विद्या मराठी व्हर्नाक्यूलर पास व इंग्रजी चार यत्ता, विद्येला वेळोवेळीं अडथळे त्यामुळें विद्या पूर्ण झाली नाहीं. भाग्योदय धंद्याला सुरवात वयाचे आठरा वर्षापासून सर्वसाधारण स्वतःची मिळकत वेतावृत्ती. वैद्यकी, शेती वगैरे धंदे बरेच केले त्यांत शेतींत जय. स्वतःवर व्यवहारिक जबाबदारी वयाचे चौदावे वर्षी. आज सव्वाशे रुपये महिन्याचे उत्पन्न, त्यांत मातुलपक्षाकडील पांचशें रुपये सालीचे उत्पन्न ते केव्हां कमी होईल याचा नेम नाहीं. आजी आईची आई ती हयात आहे तोंपर्यंत. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल म्हणण्यासारखा बदल अद्याप कांहीं नाहीं. बाग वगैरे लाविला आहे तेव्हां पुढें परिस्थितीमध्यें बदल होण्याचा संभव.अद्याप बागेचे उत्पन्न भरपूर सुरू नाहीं त्यामुळें या सालाचे मागील पांचसहा वर्षे भयंकर त्रासांत काढावी लागली. दुष्काळामुळें फार त्रास झाला. येथून परिस्थितीमध्यें फरक पडण्याला सुरवात. उत्पन्न दिवसेंदिवस वाढण्याचा संभव. सांपत्तिक दृष्टया अत्यंत वाईट काल:—सन १९२०ते १९२५ सालापर्यंत अत्यंत खडतर काल. द्रव्यदृष्टया उत्कृष्ट काल:—अद्याप उत्कृष्ट काल म्हणण्यासारखा नाहीं. शके १८२६ अत्यचित लाभ

द्रव्याचा. शके १८४१ भूमीचा व घराचा पुन्हा लाभ. साधारण उत्पन्न व तितका खर्च. जे उत्पन्न आहे ते मात्र कायम टिकाऊ, कोणत्याही कार्यांत यश. यश कसोटीनें येते. धंदा करीत असताना दुष्काळामुळें संकटाचा, काल मित्राकडून साह्य. नोकरी व्यापार साधारण दोनचार झाले, त्यात टिकाऊ वैद्यकी व जास्त शेतीकडे लक्ष बाग वगैरे लाविला आहे, त्यामुळें सुरवातीला चारपाच वर्षे त्यात जास्त पैसा खर्च झाला आता त्याचे उत्पन्नाला सुरवात झाली आहे उत्पन्न दिवसेंदिवस वाढतें. वारसा, बक्षीस, वुईल. अकस्मात् द्रव्यलाभ शके १८२२ सालीं आईचे बापाकडील सर्व इस्टेटीचे वुईलपत्र मिळाले. मोठ्या मुलाची बौद्धिक स्थिति. वडील मुलाची बुद्धी चांगली, सासरची सांपत्तिक स्थिति साधारण त्याचेकडून म्हणण्यासारखा मोठा लाभ नाहीं. आप्तवर्गभावडें हल्लीं हयात कोणी नाहीं, चुलता नाहीं, मामा नाहीं, मावशा नाहीं, आत्या तीन होत्या त्याही वारल्या. घर आहे, वाहने आहे, नोकरचाकर आहेत व जमीनजुमलाही आहे, पूर्वार्जित नाहीं, आईचे बापाकडील मिळालेली इस्टेट वयाचे चौदावे वर्षी शके १८२२ सालापासून याचेकडे आहे.

### कुंडली क्रमांक ९

श्रीशके १७९९ फाल्गुनेमासे कृष्णपक्षे तृतीयायांतिथौ गुरुवासरे स्वाती नक्षत्रे घ. ५५ प. ८ अत्रदिने श्रीसूर्योदयात्गत घ ६ प. ५३ समये जन्म जन्मस्थळ जयपूर

जन्मकुंडली

स्पष्टग्रह

| ा | र | च. | म | बु | गु | शु | श | रा | ल |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| रा. | ११ | ६ | १ | ११ | ९ | १० | १० | ९ | ० |
| अ. | ८ | ८ | ९ | १२ | ९ | २ | २९ | २८ | २९ |
| क | ४६ | ३५ | ५९ | १८ | ५९ | ९ | २७ | २३ | १२ |
| वि | ५१ | २१ | १६ | ५३ | ३६ | ४१ | ४६ | ४४ | १३ |
| | ५९<br>३० | ८४२<br>१४ | ३६<br>२६ | १०४<br>२० | ९<br>१६ | ३०<br>१७ | ८<br>४ | ३<br>११ | |

| जन्मर्क्ष | सर्वर्क्ष | भोग्यार्क्ष |
|---|---|---|

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति, चांगली वर्ण गोरा, ठेंगणा बांधा, डोक्यावर दगड लागल्याची खूण, व्यंग नाहीं. गंडांतरें व मोठाले आजार:—शके १८१५ पासून शके १८२० पावेतो ऊष्ण विकारापासून आजार याशिवाय कांहीं नाहीं. आई व वडिलांचें सौख्य:—शके १८३७ चे कार्तीक शु॥ १२ रोजी आईचा मृत्यू. व शके १८१४ चे आश्वीन शु॥ ६ वडीलांचा मृत्यु. वडीलांची मूळ सांपत्तिक स्थिति:—पूर्वार्जीत सांपत्तिक स्थीति चांगली होती. परंतु शके १८१४ पासून यांच्या हातानीं इस्टेट जाण्यास सुरवात होऊन पांच वर्षांत जंगम जीनगी सर्व गमाविली. वडीलांची शेती व जागा असून ती कायम आहे. वडिलांचा धंदा सावकारी व शेती, महिन्याचें उत्पन्न १५०. भावंडें एकंदर ५ त्यांत हयात २, पाठीवर भाऊ, आधीं वहीण, बहीणी ज्यास्त, व त्यांची संख्या ३. यापैकीं एक भाऊ व एक बहीण हयात आहे. विवाह विवाह १ झाला. शके १८११, स्त्रीची प्रकृति, साधारण सशक्त, गौरवर्ण, आजार कांहींवर्षांपूर्वी वाळंत वाताचा झाला होता. संतति:— संतति पुत्र ६ कन्या ७ एकंदर संततीं १३ त्यांत हयात ६ पैकीं मुली ३ व मुलगे ३जास्त संतंती मुलीची. मुली ७ व मुलगे ६. स्वत:स, स्त्रीला अगर मातापित्यांस कायमचा विकार:—स्त्रीला वातविकार आहे, वडीलांना उष्ण विकार कायमचा होता. विद्या फक्त मराठी. भाग्योदय याच प्रांतात घयाला सुरवात शके १८२२ पासून त्यांत प्रत्येकवर्षी खर्चापुरते उत्पन्न. स्वत:वर व्यावहारिक जबाबदारी शके १८१४ पासून पडली. महीना उत्पन्न दिडशें रुपये. सांपत्तिक दृष्टया अत्यंत वाईट काल पाचवर्षांपासून कर्ज वाढते असल्यामुळें स्थीती चिंताजनक आहे. शके १८३३ पासून सांपत्तिक काळ पांच वर्षेपर्यंत फार वाईट गेला. संकटें:—एकवेळ फौजदारी होण्याची आफत्त होती. त्रास सरासरी सहा महीने. व्यापार सराफीचा. व्यापाराला सुरवात झाल्यापासून खर्चापुरते उत्पन्न म्हणजे स्थिति सारखीच. वडील मुलगा हल्ली इंग्रजी शिकत आहे. सासरची सांपत्तिक स्थिति अगदीं गरीबीची. आप्तवर्ग:—चुलता नाहीं, मामा २, मावशा २, सचेचें घर, वाहनें, पूर्वार्जीत जमीन जुमला आहे.

### कुंडलीक्रमांक १०

श्रीशके १८१३ खरनामसंवत्सरे फाल्गुने मासे शुक्लपक्षे १५ तिथौ भानुवासरे पूर्वाफाल्गुनी नक्षत्रे घ. ५ प. ५६ अत्रदिनेश्रीसूर्योदयात् गत घ. ६ प. ५९ समयें जन्म. जन्मस्थळ सातारा.

जन्मकुंडली

२
१२ बु र ल
३
१ शु रा
११
४
१०
५ चं
७ के
९ म
६ श
८

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति:—स्थूल शरीर, चेहेरा गोल, दांत रुंद, व किंचित् पुढें, वर्ण तांबूस, कपाळ रुंद, विशाळ भाली, कपाळास आठी नाहीं, कपाळावर मध्यभागी खोक, डाव्या टाचेत भोरी प्रकृती सशक्त, किंचित् दम्याचा व मूळव्याधीचा विकार, व्यवहारी, चाणाक्ष, स्वार्थी परंतु दुसऱ्याचे न लुबाडता साधेल तो स्वार्थ, निष्काळजी, गंडांतरें—१९११ सप्टेंबरमध्यें स्वत:ची अत्यवस्थ स्थिती ( कांजण्यामुळें ) पुढें मूळव्याध १९२१ सालीं मुंबईच्या पारशी हिंदू मारामारीत डोकें फुटून पुनर्जन्म. १९२२ मुळशी सत्याग्रहात तुरुंगवास. आई व वडिलांचें सौख्य:—१८९८ सालीं वडिलांचा प्लेगनें मृत्यु आई आहे. आई व वडिलांस मोठाले आजार मातोश्रीस मूळव्याधीचा उपद्रव, वडील ते आपल्या लहानपणी विहीरींत बुडून मरता मरता वाचले होते वडीलांची मूळ सांपत्तिक स्थिति, प्रथम, भिक्षुकी १८८४ ते ८६ पर्यंत नाटकमंडळींत भागीदारीचा योग पण पुन्हा भिक्षुकी व शेतीव.डिलांचा धंदा भिक्षुकीचा महिन्याचें उत्पन्न ४ मनुष्याच्या गरीबीच्या प्रपंचापुरते, धंद्यांत अगर नोकरीत भयंकर काळजीचे व असह्य प्रसंग १९०७ सालीं. मराठी सातवी पास झाल्यानंतर १ वर्ष शाळामास्तरची नोकरी नंतर कांहीं दिवस मामलेदार कचेरीत उमेदवारी. १९०९ सालीं. शिवण-काम शिकण्यास सुरवात. १९१०, नाटक कंपनीत ॲक्टरचे काम १९११ पासून फिरून शिवण-कामांत कष्टाने प्रगती करून गेली १५ वर्षे मुख्य कटरच्या हुद्यावर आहे. भावंडें एकंदर ३ त्यात हयात २, पाठीवर भाऊ, आधीं भाऊ, जास्त संख्या भाऊ ३, पाठीवरचा भाऊ १८९६ सालीं जन्मून १९१४ मध्यें वारला, वडील भाऊ हयात, १८८८ सालीं त्याचा जन्म झालेला आहे, वडील बंधूचा स्वभाव अती चंचल पण सत्यनिष्ठ, विद्वान दशग्रंथी आहेत. १९१८ सालीं मार्चमध्यें विवाह झाला आहे. स्त्रीची प्रकृति, निरोगी. रूप, मध्यम, १९२० सालीं अपुरे दिवस जाऊन दुहेतली, १९२२ सालीं फिरून दुहेतली. संतति, प्रथम अपुरी मुलगी १९२०, १९२१ मध्यें मुलगा, १९२२ अपुरे दुहेतणे, १९२३ मध्यें मुलगा, १९२५ मध्यें मुलगी, ज्यास्त पुत्र, सर्व हयात. स्वत.स अगर मातेस कायमचा विकार, मूळव्याध. भाग्योदय:—भाग्योदय मुंबईस १९११ सालीं धंद्यास ( कायमच्या ) सुरवात, प्रगती त्यानंतर दिवसे दिवस होत आहे एकदरीत फायदाच आहे. १९१८ सालीं स्वत:वर जबाबदारी पडली आज पगार सुमारें १५०. सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत वाईट काल पाहतां १९११ पर्यंतचा काळ कष्टाचा गेला.

कोणत्याही कार्यांत यश—यश अखेर येते परंतु तोपर्यंत त्रास फार पडतो. सरकार अगर लोकांकडून मान.—१९२२ सालीं मुळशी सत्याग्रहांत तुरुंगवास भोगल्यानंतर लोकांकडून किंचित् मानमिळाला. शिवण कामाच्या धंदात नोकरी.

१९१९ सालीं, अमृतसर कांग्रेसला मित्राच्या अचानक सहाय्यानें जाऊन येणें झाले. सासरची सांपत्तिक स्थिति:—सासरे शाळामास्तर, स्थिति गरीबी.

आप्तवर्ग—.सावत्रआई किंवा चुलता नाहीं, एक मामा व एक मावशी होती, आत्याबाई ३ होत्या. सत्तेचें घर, वाहनें—वडिलोपार्जित घर व थोडी शेती आहे.

कुंडलीक्रमांक ११

श्रीशके १८११ मार्गशीर्षमासे शुक्लपक्षे ३ तिथौ मूळ नंतर पूर्वाषाढानक्षत्रे अत्रदिने श्रीसूर्योदयात् गत घ. ५८ प. १५ समये जन्म. जन्मस्थळ मगरूर दस्तगीर.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति—सशक्त, बांधा उत्तम व देखणा, डोळे पाणीदार, चेहरा गोल व मांसल, व्रण वगैरे नाहीं, वर्ण साधारण गोरा, कपाळ उंच व मोठें, देही व्यंग नाहीं. इंद्रियावर तीळ, दोन्ही भिवयांचे मध्यें तीळ, प्रकृती सशक्त पण ऊष्ण विकार, स्वभाव शांत, स्वावलंबी, प्रसंगविरोधी तापटपणा, विद्येची अभिरुची, वाचनाचा फार नाद, परमेश्वरावर निष्ठा. गंडांतरें व मोठाले आजार—म्हणण्यासारखा आजार कधीं झाला नाहीं. मामुली ताप कधीं कधीं येत असे फक्त एक वेळ तापानें फार आजारी होऊन अशक्त झालो होतो. आई व वडिलांचें सौख्य—आई अजून हयात आहे, बदरीनारायणाची यात्रा घडली. वडिलांचा मृत्यु भाद्रपद शु॥ २ गुरुवार ता. २४।८।१९२२. आई व वडिलांस मोठाले आजार—वडीलांस हा शेवटचाच आजार असून निमोनिया झाला होता, यांतच अंत झाला. वडीलांची मूळ सांपत्तिक स्थिति फार गरीबीची होती. पण वडीलांनीं स्वतःच्या कर्तबगारीवर चांगली सांपत्तिक स्थिती सुधारली. पचेचाळीस वर्षापासून पुष्कळ भरभराट झाली. वडिलांचा धंदा गांवची पाटीलकी होती. मिळकतीचें उत्पन्न नक्की नाहीं. भावंडें एकंदर ४ सर्वांत धाकटे हेच. बाकी सर्व थोरले होते. एकंदर ४ भावंडें होतीं. त्यांपैकीं मी एकटाच हयात आहे. दोन बहिणी होत्या व एक भाऊ होता त्यांपैकीं कोणीच हयात नाहींत. माझ्यापेक्षा वडील बहिणीचा जन्म १८८७ साल व मृत्यु १९०४, विवाह—विवाह दोन झाले पैकीं एक पत्नी मरण पावली. पहिलें लग्न झालेली पत्नी मयत आहे. स्त्रीची प्रकृति—स्त्रीची प्रकृति साधारण आहे, सुस्वरूप व गौरवर्ण आहे. संतति—एकंदर संख्या ५, प्रथम पुत्र, नंतर कन्या, तीन पुत्र व दोन कन्या आहेत. सर्वांत वडील मुलगा, १८ वर्षांचा आहे, विद्या साधारण, ज्ञान ज्योतिष भाग्योदय—जन्म जिल्ह्यांत स्वत वर व्यावहारिक जबाबदारी—स्वत वर जबाबदारी भाद्रपद शु॥ २ ता. १५।८।२२ पासून पडली. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल आषाढ व॥ १२ ता. २१।७।१९२२ रोजी मी व वडील या दोघांनाही जेलमध्यें जावें लागलें व पुन्हां तीन दिवसांनंतर म्हणजे २५।७।२२ ला सुटका झाली. केस वगैरे कांहीं एक नव्हते विनाकारण खोट्या आरोपामुळें हें घडलें. पण स्पष्ट निर्दोष. केस वगैरे

६

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थितिः—स्थूल शरीर, चेहेरा गोल, दांत रुंद, व किंचित् पुढें, वर्ण ताम्रस, कपाळ रुंद, विशाल भाळी, कपाळास आठी नाहीं, कपाळावर मध्यभागी खोक, डाव्या टाचेत भोरी प्रकृती सशक्त, किंचित् दम्याचा व मूळव्याधीचा विकार, व्यवहारी, चाणाक्ष, स्वार्थी परंतु दुसऱ्याचे न लुबाडता साधेल तो स्वार्थ, निष्काळजी, गंडांतरें:—१९११ सप्टेंबरमध्यें स्वत.ची अत्यवस्थ स्थिती ( कांजण्यामुळें ) पुढें मूळव्याध १९२१ सालीं मुंबईच्या पारशी हिंदू मारामारीत डोके फुटून पुनर्जन्म. १९२२ मुळशी सत्याग्रहांत तुरुंगवास. आई व वडिलांचें सौख्यः—१८९८ सालीं वडिलांचा प्लेगनें मृत्यु आई आहे. आई व वडिलांस मोठाले आजार मातोश्रीस मूळव्याधीचा उपद्रव, वडील ते आपल्या ल्हानपणी विहीरींत बुडुन मरता मरता वाचले होते वडीलांची मूळ सांपत्तिक स्थिति, प्रथम, भिक्षुकी १८८४ ते ८६ पर्यंत नाटकमडळींत भागीदारीचा योग पण पुन्हा भिक्षुकी व शेतीव.डिलांचा धंदा भिक्षुकीचा महिन्याचें उत्पन्न ४ मनुष्याच्या गरीबीच्या प्रपंचापुरतें, धंद्यांत अगर नोकरीत भयंकर काळजीचे व असह्य प्रसंग १९०७ सालीं. मराठी सातवी पास झाल्यानंतर १ वर्ष शाळामास्तरची नोकरी नंतर कांहीं दिवस मामलेदार कचेरीत उमेदवारी. १९०९ सालीं. शिवण-काम शिकण्यास सुरवात. १९१०, नाटक कंपनीत ॲक्टरचे काम १९११ पासून फिरून शिवण-कामांत कष्टाने प्रगती करून गेली १५ वर्षे मुख्य कटरच्या हुद्यावर आहे. भावंडें एकंदर ३ त्यांत हयात २, पाठीवर भाऊ, आर्धी भाऊ, जास्त संख्या भाऊ ३, पाठीवरचा भाऊ १८९६ सालीं जन्मून १९१४ मध्यें वारला, वडील भाऊ हयात, १८८८ सालीं त्याचा जन्म झालेला आहे, वडील बंधूचा स्वभाव अती चंचल पण सत्यनिष्ठ, विद्वान दशग्रंथी आहेत. १९१८ साली मार्चमध्यें विवाह झाला आहे. स्त्रीची प्रकृति, निरोगी. रूप, मध्यम, १९२० सालीं अपुरे दिवस जाऊन दुहेतली, १९२२ सालीं फिरून दुहेतली. संतति, प्रथम अपुरी मुलगी १९२०, १९२१ मध्यें मुलगा, १९२२ अपुरे दुहेतणे, १९२३ मध्यें मुलगा, १९२५ मध्यें मुलगी, ज्यास्त पुत्र, सर्व हयात. स्वतःस अगर मातेस कायमचा विकार, मूळव्याध. भाग्योदयः—भाग्योदय मुंबईस १९११ सालीं धंद्यास ( कायमच्या ) सुरवात, प्रगती त्यानंतर दिवसे दिवस होत आहे एकदरीत फायदाच आहे. १९१८ सालीं स्वतःवर जबाबदारी पडली आज पगार सुमारें १५०. सांपत्तिक दृष्टया अत्यंत वाईट काल पाहतां १९११ पर्यंतचा काळ कष्टाचा गेला.

कोणत्याही कार्यांत यश—यश अखेर येते परंतु तोपर्यंत त्रास फार पडतो. सरकार अगर लोकांकडून मानः—१९२२ सालीं मुळशी सत्याग्रहांत तुरुंगवास भोगल्यानंतर लोकाकडून किंचित् मानमिळाला. शिवण कामाच्या धंद्यात नोकरी.

१९१९ सालीं, अमृतसर काँग्रेसला मित्राच्या अचानक सहाय्यानें जाऊन येणें झालें. सासरची सांपत्तिक स्थिति.—सासरे शाळामास्तर, स्थिति गरीबी.

आप्तवर्ग—.सावत्रआई किंवा चुलता नाहीं, एक मामा व एक मावशी होती, आत्याबाई ३ होत्या. सत्तेचें घर, वाहनें—वडिलोपार्जित घर व थोडी शेती आहे.

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति—कृश नव्हे व स्थूलही नव्हे. थोडासा चंचल, गायनप्रेमी, डोळे मोठे, दांत जरा पुढें, रंग तांबूस निमगोरा, डाव्या कुशीस तीळ, व्यंग नाहीं. तोंडावर कांहीं कांहीं देवीचे व्रण, गंडांतरें व मोठाले आजार—जन्मापासून १० व्यामहिन्यात देवी येऊन अपमृत्यु टळला. फेंपरें ३ ऱ्या महिन्यास, गोवर त्याच वर्षांत, दमा त्या वेळेंपासून सुरू झाला तो अद्याप केव्हां केव्हां आहेच. आई व वडिलांचें सौख्य—वडील मयत जन्मापूर्वी ५ महिने शके १८१५ आषाढ शु. १. विकार उदर. आई हयात. आई व वडिलांस मोठाले आजार—माझ्या दहाव्या वर्षी आईस ताप व पिशाच्च बाधा. अपमृत्यू टळला, हल्ली प्रकृती वातबद्ध विशेष. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—वडिलांची सांपत्तीक स्थिति फार गरिबीची, विशेष फेरफार केव्हांच नाहीं. वडिलांचा धंदा मराठी मास्तर महिन्याचें उत्पन्न १५ रु. होतें, धंद्यांत अगर नोकरींत भयंकर काळजीचे व असह्य प्रसंग—वडिलांना अखेर आलेलाच प्रसंग भयंकर होता. मला स्वतःला भयंकर काळजीचा प्रसंग केव्हांच आलेला नाहीं. भावंडें एकंदर २ त्यांत हयात मीच, पाठीवर नाहीं आधीं बहीण. बहीण माझ्या जन्मानंतर ६ महिन्यांनीं मयत. बहीण माझ्यापेक्षां दोन वर्षांनीं मोठी होती. विवाह शके १८३१ माघ शु. १५ दिवशीं झाला. स्त्रीची प्रकृति—स्त्री प्रकृतीनें फारच अशक्त, देखणेपणा विशेष नाहीं. स्त्रियांचा विकार फार दिवस होता. शरीरयष्टि किडकिडीत आहे. संतति—प्रथम पुत्र ज. ता. २६।१२।१६ मयत शके १८४० भाद्रपद कृष्ण १३. दुसरा मुलगा जन्म ता. २२।२।२१, तिसरी मुलगी ता. ३।८।२४, पुढें अद्याप योग नाहीं. दुसऱ्या मुलाच्यापूर्वी असा योग आला होता. स्वतःस कायमचा विकार—स्वतःस दम्याचा विकार आहे. वर्षांतून १२ वेळां त्रास होतो. विद्या—मराठी ५ इयत्तेपर्यंत. वैदिक, याज्ञीक, ज्योतिष, व्युत्पत्ती वगैरे बेतावातचें. भाग्योदय—भाग्योदय कुठेंच नाहीं, धंदा ग्रामोपाध्ये, भिक्षुकी वगैरे. स्वतःवर व्यवहारिक जबाबदारी—वडील नसले तरी चुलते हयात आहेत, विशेष जबाबदारी नाहीं, महिना उत्पन्न ३० रु., सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत वाईट काळ कोणताच नाहीं. विद्यार्थी दशेंत सांपत्तिक स्थिति अनुकूल नसल्यामुळें इंग्लिश वगैरे शिक्षण नाहीं. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काळ वयाच्या १६ वर्षापासून मीच स्वतः मिळविता झालों त्यांत खर्च भागून कांहीं शिल्लक पडूं लागली, हल्ली शिल्लक ५०००. कोणत्याही कार्यांत यश-अपयश—बहुतेक अपयश नाहीं. सरकार अगर लोकांकडून मान व यश—मान मिळाला नाहीं. दिवाणींत १।२ दावे वगैरे चालविले त्यांत अपयश नाहीं. व्यापार केवळ सावकारी व त्यांत थोडी दुकानदारी १९१८ सालीं समारक भांडवलावर केली त्यांत निम्मी रकम बूड नंतर एका इसमाजवळ ५०० रु. बूड. बाकी चारदोन इसमाकडे २०० रु. बुडाले. वारसा, बक्षीस, वुईल या प्रकारानें अकस्मात् द्रव्यलाभ अद्याप कांहीं नाहीं. चुलत्यांची कांहीं इस्टेट आहे व ते हयात, त्यांना अपत्य नाहीं. मुलांची बौद्धिक स्थिति—मुलें हयात व बुद्धीमान, दुसरा मुलगा मध्यम बुद्धिमान, मुलांस गाण्याची विशेष आवड. सासरची सांपत्तिक स्थिति—त्यांजकडून लाभ नाहीं, त्यांची सांपत्तिक स्थिति माझ्यापेक्षां बरी. आप्तवर्ग—चुलते २ हयात, २ मयत, मामा ५, हयात ३, मावस्या ५ हयात २. स्वतःचें घर, मीच स्वतः बांधिलें आहे, जमीनजुमला बराच कमी केवळ वार्षिक खर्चाच्या ⅔ उत्पन्न.

न होतांच सुटका झाली. सांपत्तिक दृष्टया अत्यंत वाईट काल—वडीलांचे मरणापासून खर्चाचें प्रमाण वाढत गेलें त्यामुळें पैशाची अडचण वेळोवेळी, ती आतांपर्यंत आहेच. कोणत्याही कार्यांत यश-अपयश—बहुतेक प्रत्येक गोष्टींत यशच येते, अपयश अजून नाहीं, सरकार अगर लोकांकडून मान—वडीलाचे मरणापासून सरकार दरबारांत व बहुतेक लोकांकडून मान मिळतो. वजनही बहुजन समाजांत आहे, संकटें—शत्रूकडून संकटें आली पण त्यांत जयच झाला, अधिकारी वर्गच साह्य होता, दिवाणींत जाण्याचा प्रसंग आला व सध्याही दिवाणींत केसेस आहेत, फौजदारी माझेकडून दुसऱ्यावर झाली होती व त्यांत मळाच यश आलें सन १९२३. व्यवसाय—धंदा शेती व साधारण देवघेव, अझूनपर्यंत वाईट स्थिति नाहीं. मोठा मुलगा १८ वर्षांचा असून इंग्रजी शिकत आहे, बुद्धि बरी, सासरची सांपत्तिक स्थिति फार गरिबीची आहे. आप्तवर्ग—सावत्र कोणीच नाहीं, चुलत्याची परिस्थिति साधारण, मामाची परिस्थिती बरी, चुलता एकच आहे. सत्तेचें घर, वाहनें, नोकरचाकर, जमीनजुमला—सत्तेचें घर व वाहनांचें सुख चांगलें आहे, घोडा १०००चा असून जमीनजुमल्याचें सौख्य चांगलें आहे, थोडी स्वकष्टार्जित जमीन सन १९२३ मध्यें.

## कुंडलीक्रमांक १२

श्रीशके १८१५ मार्गशीर्षमासे शुक्लपक्षे सप्तम्यांतिथौ भृगुवासरे पूर्वाभाद्रपदानक्षत्रे अत्रदिने श्रीसूर्योदयात् गत घ. २१ प. ० समये जन्म. जन्मस्थळ वालावल जन्म वेळ मुंबई टाइम ३ वा. ४० मि. जन्मतारिख १५ माहे १२ सन १८९३.

जन्मकुंडली

| २ गु | | १२ रा |
|---|---|---|
| ३ | १ | ११ चं |
| ४ | | १० शु |
| ५ | ७ श म | ९ र |
| ६ के | | ८ बु |

स्पष्टग्रह

| | र. | च. | मं. | बु. | गु. | शु. | श. | रा. | ल. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| रा. | ८ | १० | ६ | ७ | १ | ९ | ६ | ११ | ० |
| अं. | १ | २१ | २४ | १० | १ | १६ | ३ | २३ | २१ |
| क. | १३ | ४२ | ४२ | ३ | ३४ | ३१ | १९ | ४४ | ५ |
| वि. | ४३ | ५५ | ३७ | ८ | ४९ | १७ | ५ | ५९ | ५५ |
| | ६१ ६ | ७५० ३२ | ४१ २ | ५० ५० | ४ ३५ व. | ५७ २ | ५ २६ | ३ ११ | |
| जन्मर्क्ष पूर्वाभाद्रपदा | | | | सर्वर्क्ष ६१।२० | | | भोग्यर्क्ष ५२।४२ | | |

दशमभाव ९।५।५०।५७ जन्मतः शुक्र.
विंशोत्तरीमान शुक्र २ व १ मं. ५ दि. भोग्य
१३।१०।२५

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति—कृश नव्हे व स्थूलही नव्हे. थोडासा चंचल, गायनप्रेमी, डोळे मोठे, दांत जरा पुढें, रंग तांबूस निमगोरा, डाव्या कुशीस तीळ, व्यंग नाहीं. तोंडावर कांहीं कांहीं देवीचे व्रण, गंडांतरें व मोठाले आजार—जन्मापासून १० व्यामहिन्यात देवी येऊन अपमृत्यु टळला. फेंपरें ३ ऱ्या महिन्यास, गोवर त्याच वर्षांत, दमा त्या वेळेपासून सुरू झाला तो अद्याप केव्हां केव्हां आहेच. आई व वडिलांचें सौख्य—वडील मयत जन्मापूर्वी ५ महिने शके १८१५ आषाढ शु. १. विकार उदर. आई हयात. आई व वडिलांस मोठाले आजार—माझ्या दहाव्या वर्षी आईस ताप व पिशाच्च बाधा. अपमृत्यू टळला, हल्लीं प्रकृती वातबद्ध विशेष. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—वडिलांची सांपत्तीक स्थिति फार गरिबीची, विशेष फेरफार केव्हांच नाहीं. वडिलांचा धंदा मराठी मास्तर महिन्याचें उत्पन्न १५ रु. होतें, धंद्यांत अगर नोकरींत भयंकर काळजीचे व असह्य प्रसंग—वडिलांना अखेर आलेलाच प्रसंग भयंकर होता. मला स्वतःला भयंकर काळजीचा प्रसंग केव्हांच आलेला नाहीं. भावंडें एकंदर २ त्यांत हयात मीच, पाठीवर नाहीं आधीं बहीण. बहीण माझ्या जन्मानंतर ६ महिन्यानीं मयत. बहीण माझ्यापेक्षां दोन वर्षांनीं मोठी होती. विवाह शके १८३१ माघ शु. १५ दिवशीं झाला. स्त्रीची प्रकृति—स्त्री प्रकृतीनें फारच अशक्त, देखणेपणा विशेष नाहीं. स्त्रियांचा विकार फार दिवस होता. शरीरयष्टि किडकिडीत आहे. संतति—प्रथम पुत्र ज. ता. २६।१२।१६ मयत शके १८४० माद्रपद कृष्ण १३. दुसरा मुलगा जन्म ता. २२।२।२१, तिसरी मुलगी ता. ३।८।२४, पुढें अद्याप योग नाहीं. दुसऱ्या मुलाच्यापूर्वी असा योग आला होता. स्वतःस कायमचा विकार—स्वतःस दम्याचा विकार आहे. वर्षांतून ११२ वेळां त्रास होतो. विद्या—मराठी ५ इयेत्तेपर्यंत. वैदिक, याज्ञीक, ज्योतिष, व्युत्पत्ती वगैरे वेताबाताचें. भाग्योदय—भाग्योदय कुठेंच नाहीं, धंदा ग्रामोपाध्ये, भिक्षुकी वगैरे. स्वतःवर व्यवहारिक जबाबदारी—वडील नसले तरी चुलते हयात आहेत, विशेष जबाबदारी नाहीं, महिना उत्पन्न ३० रु., सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत वाईट काल कोणताच नाहीं. विद्यार्थी दशेंत सांपत्तिक स्थिति अनुकूल नसल्यामुळें इंग्लिश वगैरे शिक्षण नाहीं. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल वयाच्या १६ वर्षापासून मीच स्वतः मिळविता झालों त्यांत खर्च भागून कांहीं शिल्लक पडूं लागली, हल्लीं शिल्लक ५०००. कोणत्याही कार्यांत यश-अपयश—बहुतेक अपयश नाहीं. सरकार अगर लोकांकडून मान व यश—मान मिळाला नाहीं. दिवाणींत ११२ दावे वगैरे चालविलें त्यांत अपयश नाहीं. व्यापार केवळ सावकारी व त्यांत थोडी दुकानदारी १९१८ सालीं समाइक मांडवलावर केली त्यांत निम्मी रक्कम बूड नंतर एका इसमाजवळ ५००रु. बूड. बाकी चारदोन इसमाकडे २००रु. बुडाले. वारसा, बक्षीस, दुईल या प्रकारानें अकस्मात् द्रव्यलाभ अद्याप कांहीं नाहीं. चुलत्यांची कांहीं इस्टेट आहे व ते हयात, त्यांना अपत्य नाहीं. मुलांची बौद्धिक स्थिति—मुलें हयात व बुद्धीमान, दुसरा मुलगा मध्यम बुद्धिमान, मुलांस गाण्याची विशेष आवड. सासरची सांपत्तिक स्थिति—त्यांजकडून लाभ नाहीं, त्यांची सांपत्तिक स्थिति माझ्यापेक्षां बरी. आप्तवर्ग—चुलते २ हयात, २ मयत, मामा ५, हयात ३, मावश्या ५ हयात २. सत्तेचें घर, मीच स्वतः बांधिलें आहे, जमीनजुमला बराच कमी केवळ वार्षिक खर्चाच्या ½ उत्पन्न.

### कुंडलीक्रमांक १३

श्रीशके १८२१ आषाढमासे शुक्लपक्षे १५ तिथौ मदवासरे श्रीसूर्योदयात् इष्ट घ. ४६ प. ८ समये जन्म. जन्मस्थळ शिनोर जि. बडोदे.

जन्मकुंडली

### आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

७ वर्षाच्या उमरीपर्यंत आजारपण भोगलें. ११वर्षाच्या उमरीला घसरपट्टीवरून पडलो.१७ व्या वर्षी पैशाच्या अभावी इग्रजी शिक्षण सोडावे लागले. त्या नतर लगेच टेकनीकलस्कूलमध्यें दाखल होऊन तीन वर्षाचा मेक्यानिकल इजीनीअरींगचा कोर्स घेतला. २० व्या वर्षी ३ वर्षाचा कोर्स पुरा करून थर्डक्लास एंजीनीअरची परीक्षा पास झालो व त्याच महिन्यात फील्ड सर्वीसचे २ वर्षाचे ॲग्रीमेंट लिहून देवून फ्रँटीअर प्रॉव्हिन्समध्यें गेलों. तेथून १॥ वर्षानीं परत आलो.नतर १९२१ जुलै मध्यें मुंबईस बँकवे रीक्लेमेशन स्कीमसध्यें नोकरी लागली. दरम्यान २३ वे वर्षी पहिले लग्न जहाले. १९२४ जुलै अखेर नोकरी सुटली. १९२३ एप्रीलमध्यें सेकडक्लास इजीनीअरची परीक्षा पास झालो. १९२४ नोवेंबरमधें नवसरी मुक्कामी टेकनीकलस्कूलमधें नोकरी लागली. दरम्यान २६ वे वर्षी पहिली पत्नी वारली. ६ महिन्यानें द्वितीय संबंध जहाला. २९ वे वर्षी पुत्र रत्न झालें.

### कुंडलीक्रमांक १४

श्रीशके १८१८ दुर्मुखनाम आश्विनमासे शुक्लपक्षे तिथौ पौर्णिमा श्रीसूर्योदयातगत घ. २८ प. २८ समये जन्म. जन्मस्थळ पुणें.

जन्मकुंडली

### आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

१ शरीरवर्णन—मध्यम, वाटोळा चेहरा, मध्यम दात, गौर, रुंद कपाळ, शरीर मध्यमदेही.

व्यंग नाहीं. (२) अत्यंत आजारी असलेली वर्षे–१९२४ आक्टोबर ज्वरानें. (Malaria) (३) आई हयात, वडील मयत. १८९९ प्लेग. (४) पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—अगदीं साधारण (५) सध्यांची सांपत्तिक स्थिति—अगदी मध्यम, सर्वसाधारण भरभराट. (६) भावंडें—नाहींत. (७) विवाह—१९१५ मे सासऱ्याची सांपत्तिक स्थिती साधारण आहे. (८) संतती—१९१८ एक मुलगा, १९२३ साली एक मुलगा हयात आहेत, शिवाय मुलगी मधली वारली. (९) विद्या–एल्. सी. पी. एस्. परीक्षा पास १९२३. १९१७, १९२०, अपयशाची वर्षे. (१०) धंदा–डॉक्टरकी १९२४ डिसेंबरपासून उत्पन्न ५० खर्च तितकाच किंबहुना जास्त घरचे सुख मध्यम. (११) आप्तवर्ग–मामा १ हयात, पेनशनर, मावशी १, चुलत चुलता, भाऊ २, बहिणी २, चुलत चुलती १. (१२) संकटकाल—१९२४ भाऊबंदी तंटा व नुकसान.

### कुंडलीक्रमांक १५

श्रीशके १८१० ज्येष्ठमासे वद्यपक्षे चतुर्थ्यां तिथौ जन्मस्थळ सोलापूर.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

१ शरीरवर्णन—सडपातळ निमगोरा. व्यंग–अशक्तपणा. २ अत्यंत आजारी असलेली वर्षे—इन्फ्ल्युएन्झाचे सालांत. ३ आई हयात. वडील हयात. ४ पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति साधारण. ५ सध्यांची सांपत्तिक स्थिति—साधारण ठीक. ६ भावंडें—पांच भावंडें. पैकीं नं. २ दत्तक गेला व नं. ५ या विभक्त झाला, नं. ३ व ४ एकत्रांत ते स्वतंत्र धंद्यांत आहेत. ७ विवाह–सन १९०५ साली, दुसरा विवाह–सन १९०८ साली. ८ संतती–एक मुलगा पांच वर्षांचा आहे. ९ विद्या–साधारण. १० धंदा–नोकरी. ११ आप्तवर्ग–मामा, बहीण, आत्या, सासुसासरा, मेव्हणा, मेव्हणी वगैरे. १२ संकटकाल–सन १९१२ पर्यंत साधारण गेले तेथून चांगले.

### कुंडलीक्रमांक १६

श्रीशके १८०५ वैशाखमासे कृष्णपक्षे पंचम्यांतिथौ भानुवासरे श्रीसूर्योदयादगत घ. १० प. ४२ समये जन्म. जन्मस्थळ भडगांव जि. पूर्व खानदेश.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

१ शरीरवर्णन—विशेष कृश नाहीं, चेहरा वाटोळा, डोळे काळे, कपाळ मोठें, शरीर मध्यम. व्यंग, अंगावर कोड आहे. २ अत्यंत आजारी असलेली वर्षे–१९१३।१४ सालीं टेनिस खेळतांना डाव्या हाताच्या कोंपराचा सांधा निखळून दुसरीकडे बसला. ३ आई जिवंत आहे. वडील मयत वयाच्या नवव्या वर्षी. ४ पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति–साधारण शेतीवाडी आहे. ५ सध्यांची सांपत्तिक स्थिति–बरी आहे. ६ भावंडें, अकरा त्यांत भाऊ दहा व बहिण एक. पाठीवर एकच भाऊ होता तो व बाकींचे सात लहाणपणीं वारले. दोन वडील भावांपैकीं एक १९१५ व दुसरा १९२१ सालीं वारला, बहिण १९०५ साली वारली. ७ विवाह–पहिला विवाह सन १९०० सालीं मार्च महिन्यांत झाला. दुसरा विवाह–सन १९१८ सालीं जाहला; स्त्री गौरवर्ण, पहिली स्त्री कृष्णवर्ण, पहिले स्त्रीला मुलगे तीन सर्व मयत, मुली दोन एक हयात; ८ संतती–दुसरीला दोन मुलगे व दोन मुली सर्व मयत; दुसरा सासरा पेंनशनर क्लार्क; सासऱ्याची सांपत्तिक स्थिति साधारण. पहिली बायको बाळंत रोगानें वारली; हयात असलेली मुलगी १९०९ चे आगष्टांत जन्मली; ९ विद्या–म्यॅट्रिक व स्कूलफायनल व वकिली १९०८ साली पास जाहली; १९०२ चे फेब्रुवारीपासून सन १९०८ पर्यंत कोर्टांत कारकून पुढें वकील; १० धंदा—उत्कर्ष, १९०९ सालापासून, धंदा वकील, उत्पन्न व खर्च बरोबर, स्वत: घर व खेतीवाडी अजून घेतली नाहीं. ११ आप्तवर्ग—चुलता एक, शेतीचा धंदा १९०४ सालीं मयत, मावश्या दोन, चुलती हयात, मामा तीन असून तीन्हीं मयत, एक फॉरेस्ट रेंजर, बाकी नोकर होते. १२ संकटकाल—पैशाची अडचण.

## कुंडलीक्रमांक १७

श्रीशके १८१७ मन्मथनाम संवत्सरे पौषमासे शुक्लपक्षे ८ तिथौ भौमवासरे श्रीसूर्योदयात् गत घ. ३७ प. ५० समये जन्म. जन्मस्थळ आखली ता. वेंगुर्ले जि. रत्नागिरी.

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

१ शरीरवर्णन--निमगोरा. व्यंग--नाहीं. २ अत्यंत आजारी असलेलीं वर्षें---१९२४ जानेवारी. तापानें. ३ आईचा मृत्यु---१८९७, वडीलमृत्यु--१९१२ डिसेंबर. ४ पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति--मध्यम. ५ सध्यांची सांपत्तिक स्थिति--अगदीं वाईट. ६ भावंडें---दोन भाऊ एक बहीण सर्व हयात. ७ विवाह--सन १९१४ जून. ८ संतती--मुली ४ मुलगा १ पैकीं पहिली मुलगी वयाचे सहावे महिन्यानंतर तापानें वारली. ९ विद्या--मराठी ४ ईयत्ता व इंग्रजी ४. १० धंदा--स्टँपवेंडर, हल्लीं १ वर्ष कोणताही धंदा नाहीं. ११ आप्तवर्ग---मामा, मामाचीं मुलें. १२ संकटकाल---सन १९१३ पासून नेहमींच संकटें.

### कुंडलीक्रमांक १८

श्रीशके १८२४ ज्येष्ठमासे शुक्लपक्षे तिथौ ९ मंदवासरे श्रीसूर्योदयात्गत घ. ५५ प. १४ समये जन्म. जन्मस्थळ पुणें.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

१शरीरवर्णन---कृश, डोळे काळे, चेहरा पाटोळा, दांत मध्यम, वर्ण तांबूस, कपाळ मध्यम, एकंदर शरिर मध्यम, शरिराची एक बाजू मोठी. व्यंग--मुनड आलेलें. २ अत्यंत आजारी असलेली वर्षें---जन्मतांक्षणीच २।३ दिवसांत, १२ व्या वर्षी सरूज, १७ व्या वर्षी ज्वरपीडा. ३ आईचा मृत्यु---सन १९१२ जानेवारी नवज्वरानें. वडीलमृत्यू---१९१९ जानेवारी ७ ज्वर. ४ पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति---वन्यापैकीं, पूर्वार्जीत उत्पन्न आहे. ५ सध्यांची सांपत्तिक स्थिति---साधारण म्हणण्यासारखी भरभराट नाहीं, भावडें स्वपराक्रमानें उपजिवीका करणारी. चुलता शेती करणारा. ६ भावंडें---एकंदर १० हयात ६, पाठीवर भाऊ हयात, आधी बहीण हयात, वडील बहीण १ भाऊ १ लहान भाऊ १ हयात ७ विवाह---झाला नाहीं. ८ संतती---नाहीं. ९ विद्या---मराठी सातवीयत्तेपर्यंत. १० धंदा---नोकरी महिना उत्पन्न ३० जमिनजुमला, घर, वगैरे नाहीं. ११ आप्तवर्ग---मामा २ एक व्यापारी, १ शेतकी करणारा मावस्या ३, चुलता १९१८ मध्यें मयत. चुलती आहे. दोन भाऊ, एक नोकरी व एक शिकणारा, शत्रू नाहीं. मेव्हणे सरकारी नोकर.

### कुंडलीक्रमांक १९

श्रीशके १८०४ ज्येष्टमासे शुक्लपक्षे ४ सह ५ तिथी इंदुवासरे श्रीसूर्योदयात गत घ. ५६ प १२ समये जन्म. पाहाटे ४ वाजता. जन्मस्थळ मालवण

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

१ शरीरवर्णन—कृश, डोळे काळसर, चेहरा लांबट, दांत मध्यम मोठे, वर्ण तांबूस काळसर, कपाळ लहान, शरीर मध्यमदेही, व्यंग नाहीं. २ अत्यंत आजारी असलेली वर्षे —जन्माच्या २।३।४ महिने खोकल्यानें १९०७।८ वर्षांत रक्तदोष, खरूज, केव्हां किरकोळ शिकपणा. आगष्ट १९२४ ते २५ आज तारखेपर्यंत किरकोळ आजारपणा. आई हयात आहे. वडीलमयत—तारीख १६ माहे मे सन १९२३. ४ पूर्वार्जित सापत्तिक स्थिति —अगदीं साधारण पूर्वार्जित उत्पन्न थोडी जमिन व घर. ५ सध्याची सापत्तिक स्थिति —अगदीं साधारण सर्व भावंडें स्वपराक्रमानें उपजीविका करीत आहेत. सर्वांत मोठे भाऊ कस्टम खात्यात क्लार्क. ६ भावंडें —एकदर ६ त्यांत आज हयात ५ वडील भाऊ २ वडिलाच्या मागचा मयत, बहिणी वडील २ त्यांच्या मागचा मी माझ्या मागची बहिण. ७ विवाह —सन १९०४ स्त्रीचे स्वरूप साधारण तांबूस गौर वर्ण सासरची सांपत्तिक स्थिति सामान्य, सासरा मयत देवघेवीचा व्यवहार. ८ संतती —सन १९०८ फेब्रुवारी मुलगा, सन १९११ नोवेंबर मुलगी, सन १९१४ मार्च मुलगा, सन १९१७ मुलगी मयत, सन १९१९ फेब्रुवारी मुलगी, सन १९२२ मे मुलगा, सन १९२४ आगष्ट मुलगी. ९ विद्या —इंग्रजी ५ इयत्ता पुरी ( शास्त्रें व मांत्रिक विद्या ). धंदा —१९०६।१९०७ पर्यंत कष्टम व कंपनीत क्लार्क नतर व्यापार व ज्योतिष वर्त ४।६ वर्षांत ज्योतिष व मांत्रिक–सांप्रत महिना २०।६० प खर्च ज्यास्त जमिन वगैरेचे सुख ११ आप्तवर्ग —मामा ४ नौकर, मावश्या ३ चुलता चुलती नाहीं. विशेष गोष्ट शत्रू थोडे पण अखेर अनुकूल होतात भाऊ क्लार्क सरकारी, दुसरा व्यापारी, मेव्हणे एक इंजिनीयर व एक प्रेसमध्यें इंजिनीयर मयत १२ संकटकाल —विरोधपणा साधारण ता २३।४।२० फौजदारीच्या अफरा पण प्रत्यक्ष काहीं नाहीं सन १९१७ पासून १९२४ पर्यंत महत्कार्यांत यश, त्यांत विशेषें करून मांत्रिक विद्येंत यश, ज्योतिष मध्यम १३ इतर गोष्टी —कोणत्याही कामांत अपयश नाहीं लॉटरी सोडत यांत मात्र अपयश.

कुंडली क्रमांक २०

श्रीशके १८२० फाल्गुनेमासे कृष्णपक्षे नवम्यांतिथौ भौमवासरे श्रीसूर्योदयात्गत घ. ८ प. १० समये जन्म. इंग्रजी ता. ४-४-१८९९ जन्मस्थळ मलकापूर ( वऱ्हाड )

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

१ शरीरवर्णन:—कृश, डोळे काळे, चेहरा चौपट, दांत मोठाले, वर्ण तांबूस, कपाळ व डोके मोठे, समोरचे ४ दात १९२३ मध्यें पडले. एकंदर शरीर मध्यमदेही. व्यंग:—कांहीं नाहीं. २ अत्यंत आजारी असलेलीं वर्षे:—वयाच्या ११ व्या वर्षी ज्वरानें आजारी १९-२० व्या वर्षी निमोनिया २६-२७व्या वर्षी ज्वरानें. ३ आईचा मृत्यु:—सन १९१८ इंन्फुएंझा. वडीलमयत.— सन १९१२ प्लेग. ४ पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—साधारण २-३ शेते व घर. ५ सध्यांची सांपत्तिक स्थिति—नेहमीं बदलणारी, २।३ महिने सांपत्तिक स्थिति बरी असते तर बाकीचा काळ पैशाच्या काळजींत जातो, घरचा खर्च स्वत:ला करावा लागतो. ६ भावंडें—एकंदर ७ त्यांत हयात ४ सर्वांत वडील मी. धाकट्या बहीणी २ व एक भाऊ धाकटा सध्या शिकत आहे. परंतु त्यांचे माझे नेहमीं पटत नसते. ७ विवाह:—सन १९१६ फेब्रुवारी. स्त्री गौरवर्ण. ८ संतती:—कांहीं नाहीं. स्त्रीची प्रकृती नेहमी आजारी व्यथा पोट दुखणें. ९ विद्या:—मॅट्रिकपर्यंत. शिक्षणमध्येंच सोडावें लागलें कारण वडील वारल्यावर घराचा खर्च स्वत: वर येऊन पडला. १० धंदा:—सध्या रिकामा आहे मागील २-३ वर्षांपासून नौकरीचा योग येत नाहीं व आल्यास मालकांशीं पटत नाहीं. ११ आप्तवर्ग:—मामा १ नोकर, चुलता १ नौकर. शत्रु फार, चुलत सासरा ऑफीसर पगार ८००. मेहुणा वकील, ( बापकोचा सख्खा भाऊ ) आप्तवर्गांशीं माझें पटत नाहीं, सासू मयत व सासरा नाहीं. १२ संकटकाल—नेहमी विरोध १९१७ डिसेंबरमध्यें फौजदारीमध्यें २ वर्षे सजा परंतु मध्येंच लढाईवर जाण्याचा प्रसंग, व त्यामुळें जेलमधून सुटका. १३ इतर गोष्टी:—सन १९१९ ते १९२१ पर्यंतचा काळ उत्तम. पुढें स्थितींत नेहमीं बदल, सांपत्तिक स्थिती सध्या चांगली नाहीं, प्रत्येक गोष्ट प्रतिकूल होते, धाकट्या भावाशी पटत नाहीं.

कुंडलीक्रमांक २१

श्रीशके १८२४ भाद्रपदमासे कृष्णपक्षे अमावास्यांतिथौ सौम्यवासरे, श्रीसूर्योदयात्गत घ. ३१ प. ५६ समये जन्म. जन्मस्थळ नाशिक.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

१ शरीरवर्णन'—कृश, वर्ण थोडसर गोरा. चेहरा वाटोळा, शरीरावर विशेष खूण नाहीं उजवा डोळा जरासा तिरवा तेंच व्यंग उच यष्टी २ अत्यंत आजारी असलेली वर्षे —वयाच्या आठव्या वर्षी ११ महिन्याचा विषम. त्यानंतर अद्याप कांहीं नाहीं ३ आईचा मृत्यु —सन १९११ डिसेंबर बाळतपण प्लेगांत वडील हयात आहेत. ४ पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति —साधारण बरी. शहरांत घर आहे ( नाशिक ). ५ सध्यांची सांपत्तिक स्थिति —अडचणीची वडील खासगी कारकून आहेत. दुसरें कोणी नसल्यामुळें उत्पन्नाची इतर साधनें नाहींत. ६ भावंडें —एकंदर आठ पैकीं भाऊ ४ व बहिणी तीन, सध्यां हयात कोणी नाहींत, पूर्णगर्भाचा नाश ७ विवाह —अद्याप अविवाहित आहेत. ८ विद्या —प्रीव्हियस पास असून इंटरच्या वर्गांत आहे, लहानपणापासून सर्व विषयांत पहिल्या प्रतीचे गुण मिळत आहेत. ९ धंदा —अद्याप कांहीं नाहीं. १० आप्तवर्ग.—मामा ३ पैकीं सख्खा मामा १ कारकून व दोन सावत्र शिकत आहेत, मावशी १ चुलते २ दोघेही मयत, चुलती १ मयत, १ हयात, चुलत बहिणी २ लहान. ११ संकटकाळ —संकटांचा अनुभव अद्याप कांहीं नाहीं, अपयशाचें अद्याप नांव नाहीं १२ इतर गोष्टी —काव्य व संगीत यांची आवड, प्रत्येक गोष्टीची कांहीं तरी माहिती असण्याची उत्कट इच्छा, स्वभाव साधारणपणें मिळतें घेण्याचा, वाचनाची आवड जास्त

### कुंडलीक्रमांक २२

श्रीशके १८१७ भाद्रपदेमासे शुक्लपक्षे चतुर्थ्यांतिथौ भृगुवासरे हस्तनक्षत्रे, चरण ३ जन्मस्थळ खंडकाळाट

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

१ शरीरवर्णनः—उंच, निमगोरा, केशाच्छादित. २ अत्यंत आजारी असलेली वर्षेः—किरकोळ ताप वगैरे १९२० मध्यें. ३ वडील मयतः—१९२३ जून ५. ४ पूर्वार्जित सांपत्तिक स्थितिः—पिढीजाद कर्ज असलेली. ५ सध्यांची सांपत्तिक स्थितिः—वरीलप्रमाणें. ६ भावंडेंः—बंधू पांच, वहिणी ५. विवाहः—१९१९ मार्च १९. संततीः—एक मुलगी चार महिन्याची. ९ विद्याः—जरूर तितकी. शिकणेची आवड. पण प्रयत्न नाहीं. हायकोर्ट वकीलीच्या परिक्षेचा प्रयत्न. १० धंदाः—कांहीं नाहीं. ११ आप्तवर्गः—एक मामा उत्पन्नदार आहेत. चार मेव्हणे आहेत. सासरे वकील असून तपःश्चर्या करतात. एक मेव्हणे नेहमीं दुसऱ्यावर टीका करणारे लेखक. १२ संकटकालः—सार्वजनिक व विशेषतः ××× कुलकर्णी असोशिएशनच्या उपद्व्यापामुळें अभ्यासाची नुकसान होऊन ××× सरकारची अवकृपा, संस्थान हद्दींत जाणेस बंदी, कुटुंबावर राजकीय रोष. १३ इतर गोष्टीः—श्वशुरासह १९१९मध्यें राजवाड्यावर पर्यायानें १३ दिवस अटक. ( १९१५ दत्तक १९२० हायकोर्टनें दत्तक इस्टेट मिळूं नये असा निकाल दिला. फिरून १९२५ मध्यें दावा चालू होता.

कुंडलीक्रमांक २३

श्रीशके १८०३ ज्येष्ठमासे शुक्लपक्षे तिथौ ६ भृगुवासरे श्रीसूर्योदयातगत घ. ५५ प. ५ समये जन्म. ता. ३-६-१८८१.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

१ शरीरवर्णन—तांबूस गौर वर्ण, डोळे काळे, चेहरा वाटोळा मध्यम, कपाळ मध्यम, एकंदरीत शरीर मध्यम उंची ५–३. व्यंग नाहीं. २ अत्यंत आजारी असलेली वर्षेः—लहानपणीं २-३ वर्षांचे वेळीं कुलेमांड, सन१९१३ जानेवारीफेब्रुवारी हिवतापानें आजारी, बाकी साधारण. नेहमीं पित्ताचा विकार. ३ वडील मयत—सन १९०७ ( चैत्र महिना चतुर्थी ) ताप येऊन. ४ पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—गरीबीची, थोडें उत्पन्न. ५सध्यांची सांपत्तिकस्थितिः—सुधारलेली, परीस्थितीत जोराचा फरक होत आहे ( चांगल्या मार्गाकडे ) सर्व बंधु स्वपराक्रमानें मिळवतात. ६ भावंडेंः—५ बंधु, ३ वहिणी पैकीं ४ बंधु व १ वहिण हयात. प्रथम वहिण व तीचे नंतरचा बंधु मयत. व मधील वहिण मयत. ७ विवाहः—वयाचे १३ अगर १४ वे वर्षी,

स्त्री गौर वर्ण. सासरची स्थिती बरी. ८ सतती ३ मुलगे आहेत व ३ मुले मेली ( २ मुली १ मुलगा ). पहिली मुलगी. दुसरा मुलगा वडिलांचे मृत्युनंतर १ महिन्यानी १९०७ वैशाखात झाला. शेवटचा मुलगा हयात आहे. तो १९१८ फेब्रुवारीत ९ विद्या—मॅट्रीक. सब् ओव्हरसीयर परीक्षा (इंजीनीयर) धदा नोकरी १९२४ सुरू. एप्रिल १९०७, १९१०, १९१३ ते १९१४ चांगली १९१८ आगष्ट परदेश गमन (लढाई) १९२१ आगष्ट मोठी बढती १९२१ आक्टोबर माघारी १९२२ मोठी बढती. १० धदा —इंजीनियर-खाते. हल्ली कायम असिस्टट इंजीनियर, पगार ३९० रु. ११ आप्तवर्ग —पुष्कळ आहेत. जवळचे नात्यांत कारण वडील दत्तक. बहुतेक गरीब घराणे. १२ सकटकाल —विशेष नाहीं. परतु वरिष्ठाशी बरोबरीचे नात्याने राहावे ही इच्छा. वरिष्ठांशी नेहमी कामे उत्तम व्हावी अशा-बद्दल वाद, व त्यात यश. मात्र झगडावे लागते. हाताखालील लोक नाखुश कारण स्वभाव तापट व करारी. स्नेही नेहमी स्वतत्र विचाराचे व प्रामाणीक हेतुचे यांच्याशी मैत्री. स्वभाव तापट वाईट खपत नाहीं. १३ इतर गोष्टी —वरिष्ठ सागतील तेच बरोबर व नमून राहाणे हे मनास पसंत नाहीं. लोकांत मान १९१८ पासोन जोराची प्रगती. नेहमी दगदगीचे कामावर नेमणूक व उत्तम काम झाले कीं फळ घेण्यास दुसरे. व लगेच बदली होते अशी नेहमीची स्थिति मात्र यश नेहमी येते.

## कुंडलीक्रमांक २४

श्रीशके १७९१ आषाढमासे कृष्णपक्षे तिथौ १२ गुरुवासरे श्रीसूर्योदयात्गत घ. ४३ प. ११ समये जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

१ उच, चेहरा मध्यम, वर्ण गोरा, डोळे काळे पाणीदार, नाक सरळ, बांधा मध्यम. व्यग नाहीं. २ अत्यत आजारी असलेली वर्षे —दुखणें नाहीं. १९२३ सालीं पाय लचकला इतकेंच ३ आईचा मृत्यु —१९२५ जानेवारी वडील मयत —१८९५ सालीं. ४ पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति पूर्वीचे काहीं नाहीं. ५ सध्यांची सांपत्तिक स्थिति भरभराटींत आहे. भाऊबद साधारण बरें. ६ एकदर भाऊ आम्ही तीन. धाकटा देशी उद्योगधदा. जपान अमेरिका इकडे प्रवास. बहीण हल्लीं १ हयात ७ विवाह —सन १८९३ ९४ सालीं. स्त्री गोरी, मुलगे ३ मुली २ दुसरा विवाह सन १९१६ १९१७, स्त्री काळीसावळी मुलगे २, सासुर-वाडी गरिबी ८ सतती.—एकदर मुले १०, हयात मुलगे ५, मुली २. ९ विद्या —बी.ए.,

एल्एल्.बी. अपयश नाहीं, वय वर्षे २८ पासून भरभराट. १० धंदाः—फर्स्टक्लास सबजज्ज पगार रु. १०००, जमीनः—घर वगैरे, ११ आप्तवर्गः—चुलतभाऊ. १२ संकटकालः—नाहीं, सन १८९२ व १८९४ या दोन साली बी.ए. व एल्एल्.बी.मध्ये नापास झाले होते.

कुंडलीक्रमांक २५

श्रीशके १८२१ कार्तिकेमासे शुक्लपक्षे द्वितियायांतिथौ २ जन्मस्थळ आंबेगाव ( मोर ).

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

१ शरीरवर्णनः—शरीरयष्टि सडपातळ, डोळे काळसर पिंगट, चेहरा स्थूलमानानें उभंटा, वर्ण तांबूस, बोटें सडपातळ, नखें तांबूस. २ अत्यंत आजारी असलेली वर्षे ९।१२।२२ अदमासें. ३ आई आहे. वडील मयत. सन १९१८ इन्फ्लुएंझानें. ४ पूर्वार्जित सांपत्तिक स्थितिः—मध्यम, जागा, घर, जमीन आहे. ५ सध्यांची सांपत्तिक स्थितिः—मध्यम ६ भावंडें—:भाऊ ४ बहिणी ४ मिळोन आम्हीं ८ जणें. ७ विवाह झाला नाहीं. ९ विद्याः—मराठी शिक्षण पुरें. फर्स्ट इअर ट्रेन्डर पुढें इच्छा असूनही शिक्षण झालें नाहीं. १० धंदा शिक्षक. १ धाकटा भाऊही शिक्षक, दुसरा विद्यार्थी व थोरले बंधु कुलकर्णी. ११ आप्तवर्गः—मामा २ पैकी १ हयात पेन्शनर पोलिस इन्स्पेक्टर मामेभाऊ ३ व ३ चुलते मयत १९१२. चुलती हयात ( मूल नाहीं ). आत्या २ हयात, आतेभाऊ १ आ. बहिणी ५ मावशा ३, १ हयात मा.भा. २ ब. १. संकटकालः—अपमृत्यु १ वयाचें १२ वें वर्षी जलांत व दुसरा २१ वें वर्षीही जलांतील टळला. २० वें वर्षी झाडावरून पडणें, दुखापत नाहीं. २६ वें वर्षी कर्ते मेव्हणे वारल्यामुळें मनावर व शरीरावर परिणाम, २४ वें वर्षी मारामारी व केसेस उभयपक्षीं तडजोड. १३ इतर गोष्टीः—अध्यात्मिक मार्गांत थोडा. आतांपर्यंत ५।६ सत्पुरुष दर्शनें, लहानपणापासून बहिणींकडे शिक्षण ( मातपिता सौख्य नाहीं ). उतावळा स्वभाव, चंचल वृत्ति, मित्र लोकांत प्रिय, स्वभाव उथळ्या, साधेपणाची आवड, क्षणिक वैराग्य व तितकीच विषयासक्ती.

कुंडलीक्रमांक २६

श्रीशके १८२८ जेष्टमासे शुक्लपक्षे चतुर्दश्यांतिथौ भौमवासरे ३॥। वाजतां पहाटे जन्म. इंग्रजी तारीख ६।६।०६.

जन्मकुंडली

२ गु बु र
१२
११ रा
३ शु म
१
१० के
४ श
९
५
७
८ च
६

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शरीरवर्णन —साधारण काळसर, चेहरा साधारण गोल, दांत व कपाळ साधारण लहान, शरीर मध्यम, डोळ्यांत व्यग चष्मा लागतो. २ अत्यत आजारी असलेली वर्षे—१९०८ मध्ये कांहीं दिवस व १९१४ सालांत कांहीं दिवस. ३ आईचा मृत्यु—१९१८ वडील हयात आहेत. ४पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—थोडीशी बरी आहे. ५सध्यांची सांपत्तिक स्थिति—अद्यापि शिकत आहे. ६ भावंडें—वडील भाऊ हयात, वडील बहीण मयत, लहान बहीण व लहान भाऊ हयात. ७विवाह—अद्याप झाला नाहीं. ८ विद्या—टिळक विद्यालयाचा मॅट्रिक, अलाहाबाद युनिव्हर्सिटीचा मॅट्रिक व कॉलेज शिक्षण. ९ धंदा—शिक्षण घेत आहे. १० आप्तवर्ग—वडील, वडील बंधू, लहान बहीण, लहान भाऊ एक, तीन चुलते वगैरे हयात आहेत. ११ इतर गोष्टी—अपयशाची वर्षे अद्यापर्यंत मुळींच गेली नाहींत. आजपर्यंत सारखा उत्कर्ष होत आहे, १९२१ च्या जानेवारींत सरकारी हायस्कूल व सरकारी १० रुपये स्कॉलरशिपही सोडली.

कुंडलीक्रमांक २७

श्रीशके १८२० फाल्गुनमासे शुक्लपक्षे द्वितीयांतिथौ इंदुवासरे जन्म सकाळीं २५ मिनिटांनी. ता. १३ मार्च १८९९.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

१ शरीरवर्णन—साधारण डोळे मामुली, दांत मोठे व थोडें शरीरव्यंग मुळींच नाहीं. २ अत्यंत आजारी असलेली वर्षे—१ १९२१ वें दोन महिने व कधीं कधीं मधून मधून थोडा अजारी. वडील हयात आहेत. ४ पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—थोडीशी बरी

स्थिति—अगदीं साधारण, संसार खर्चास वडीलांकडून मदत घ्यावी लागते. ६ भावंडें—पाठची बहीण १७।१८ वर्षांची होऊन वारली, आता दोन लहान भाऊ व एक लहान बहीण हयात, १ भाऊ व तीन बहीणी मृत. ७ विवाह—१८१९ वैशाख कृष्णपक्ष स्त्रीचा वर्ण साधारण काळसर, एक मुलगी होऊन मयत, ८ संतती —१९२४ घ्या मार्च मध्यें मुलगी होऊन मयत जाहली. ९ विद्या—म्याट्रीक पास. १० धंदा—नोकरी, युरोपियन कंपनींत, हल्लीं पगार ४०. ११ *आप्तवर्ग:—वडील व तीन चुलते हयात, दोन लहान बंधू व एक बहीण हयात.* १२ संकटकाळ—भरभराटीचा काळ आयापर्यंत नाहीं. इतर गोष्टी—प्रकृती निकोप अशी विशेषशीं नसतें, मधून मधून ताप, खोकला, पडसें वगैरे आजार सुरू असतात.

कुंडलीक्रमांक २८

श्रीशके १८११ चैत्रेमासे शुक्लपक्षे अष्टम्यां तिथौ, एप्रील ता. ८.

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

१ शरीरवर्णन—कृश, डोळे मामुली, चेहरा साधारण, दात बारीक, वर्ण साधारण काळसर, व्यंग नाहीं. २ अत्यंत आजारी असलेली वर्षे शके १८१६. ३ आईचा मृत्यु—१८९६. वडीलमृत्यु—१९०६. ४ पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—अगदीं साधारण, थोडे उत्पन्न आहे. ५ सध्यांची सांपत्तिक स्थिति—साधारण बरी. ६ भावडें—एक वडील भाऊ हयात, एक बहीण मोठी होऊन वारली, पाठची बहीण ९।१० वर्षांची होऊन वारली. ७ विवाह—१९०८ स्त्रीचा वर्ण साधारण गौर नाहीं व काळीही नाही अशी. ८ संतती—एक मुलगी १० वर्षांची, एक मुलगा ८ वर्षांचा दुसरा सरासरी ६ वर्षांचा व एक मुलगी १॥ वर्षांची. ९ विद्या—बी. ए. व प्रिव्हियस एम. ए. १९ धंदा—नोकरी शाळामास्तर पगार १३५ रुपये ११ आप्तवर्ग—पांच चुलत्यापैकीं कोणीही हयात नाहींत. वडील भाऊ डॉक्टर, पांच चुलत बंधु व एक चुलत बहीण. मेव्हणे तीन आहेत, सासरा सरकारी पेनशनर. १२ संकटकाळ—विशेष नाहीं. १३ इतर गोष्टी—घर वडीलांनी घेतलें होते ते स्वतः बांधले.

कुंडलीक्रमांक २९

श्रीशके १८०४ आश्विनेमासे कृष्णपक्षे तृतीयातिथौ भानुवासरे सूर्यास्तानंतर जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

१ शरीरवर्णन—डोळे काळेभोर, जन्मत हनुवटीवर खोक, चेहरा वाटोळा २ अत्यंत आजारी असलेली वर्षे—१ वर्षांत देवी, १७व्या वर्षी विषम, २४व्या वर्षी दमा, २७व्या नव-ज्वर, १९१८सनांत एन्फ्लुएन्झा. ३ आईचा मृत्यु—२३-११-१९२१. अतिसार. वडील मृत्यु—२३ जुलै १९१९ उदर. ४ पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—मध्यम पण आजोबांचे वेळीं उत्तम. ५ सध्यांची सांपत्तिक स्थिति—मध्यम, पूर्वार्जित घर आहे. ६ भावंडें—पहिला मीच, पाठीवरील बरींच मृत सध्या १ वहीण हयात ७ विवाह—सन१९०४मार्च, स्त्री गौरवर्ण ठेंगणी. ८ संतती—प्रथम कमी दिवसाची नतर मुलगा, आज मुलगे ४ मुलगी एक. एकदर १० झाली त्यात ५ मयत. ९ विद्या—मॅट्रिकपर्यंत. १० धंदा—नौकरी खाजगी. ११ आप्तवर्ग—चुलता सावत्र १ तो मृत १९००, मामा २ मयत पैकीं १ बैरागी झाला असा समज. १२संकटकाल—सामान्यत. नेहमीं काळजी द्रव्याची, ऋणयोग आजपर्यंत नाहीं. १३इतर गोष्टी—पैशाचे बाबतींत लोकांकडून व मदतगारांकडून फसवणूक व द्रव्यनाश १९०३-१९०४.

## कुंडलीक्रमांक ३०

श्रीशके १८०० वैशाखेमासे शुक्लपक्षे तिथौ ५ भौमवासरे श्रीसूर्योदयाद्गत घ. ० प. ३० समये जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

१ शरीरवर्णन—मजबूत, डोळे मोठे व काळे, चेहरा लांबट, दांत मोठे, वर्ण तांबूस, निमगोरा, कपाळ मध्यम, उंची मध्यम, व्यंग नाहीं, चेहरा उग्र. प्रकृती उष्ण, पित्तकारक २ अत्यत आजारी असलेली वर्षे—विद्यार्थी दशेपासून आतांपर्यंत साल्होसाल शैत्य पित्तज्वर पीडा दोषिक तापाची लक्षणे, किरकोर, याशिवाय रोग नाहीं. हिवाळ्यांत नेहमीं त्रास. डोळ्यास चक्कर

येणें. ३ आईचा मृत्यु:—दीपिक तापानें १९०७श्रावण. वडील मृत्यु:—१८९६आषाढ क्षयानें. ४ पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति:—मुळींच नाहीं, घरीं खोती होती पण वयाचे ५ वें वर्षीं गेली, गरिबी. ५ सध्यांची सांपत्तिक स्थिति:—पैशाचा संचय नाहीं, जरूर तितका मिळतो, अडचण भागते, २३ वर्षांपासून प्राप्तीला सुरुवात व भरभराट तरी ती जरूरीपुरती, २२ वर्षें कष्टांत, दुसऱ्यावर अवलंबून. ६ भावंडें:—मार्शेसुद्धां एकंदर ६ पैकीं मयत ४, पाठीवरील बहीण हयात व नवऱ्याचे घरीं, शेवटचा भाऊ १८९७ व बहीण १९००मध्यें मेली, आश्रय मातुलगृहाचा. ७ विवाह:—१९०२ मे, स्त्री पहिली, चेहरा माटोळा, निमगोरी, सासरा वकील, पुढारी. ८ संतती:—एकंदर मुलें ८ ( मुलगे ५ मुली ३ ) पैकीं नं० ३ चा मुलगा हयात, जन्म १९०९, प्रथम अपत्य १९०५ सालीं, बाकी मुलें १॥ वर्षांपर्यंत वांचून पुढें मयत, रडून रडून कृश होऊन. ९ विद्या:—मॅट्रिकपर्यंत, मराठी ४ यत्ता झाल्यावर याज्ञिक शिक्षण ३ वर्षें, पुन्हां स्फूर्ति होऊन शाळेंतील अभ्यासक्रम चालू, मॅट्रिक झाल्यावर कॉलेजचा प्रयत्न पण योग नाहीं, फारेष्ट शिक्षण, त्यांत एकवर्ष खंड पुन्हा परीक्षा होऊन जंगलखात्यांत प्रवेश अपयश नाहीं, १९०० सालीं १० महिने नोकरी, धंदा:—नोकरी सरकारी अधिकाऱ्याची १९ वर्षें नोकरींत नांव कमावणें, उत्कृष्ट कामगिरी, सरकारकडून प्रशंसा, असाधारण कामगिरी, सांप्रत प्राप्ती रु. ८०, खर्च तितकाच , जमीन घर अद्याप नाहीं, १९२० पगार रु. १५० पण त्याच-सालीं खात्यांतून कमी होणें, ३॥ वर्षानंतर पुन्हां नोकरी फारेष्टांत तीही अधिकाऱ्याची. ११ आप्तवर्ग:—वडील दत्तक यामुळें चुलता नाहीं, मामा २ होते ते मयत पैकीं एक अधिकारी दुसरा कारकून, मावशी १ हयात, शत्रू फार, स्नेही कमी, आप्तवर्ग शत्रूप्रमाणें, शत्रूपासून कांहीं काळ त्रास व फिकीर, पण पूर्वस्थिति प्राप्त. मेव्हणा वकील, हयात, पुढारी, आंतून शत्रू वरून स्नेही फार. १२ संकटकाल:—१९०८ सालचा पहिला संकटकाल त्यावेळीं शत्रूचा पराभव, त्यास त्रास, अपयश, त्यामुळें स्वत:ला थोडा त्रास व मानहानी, अधिकाऱ्यांशीं विरोध पण गांठ पडतांच प्रेम, फौजदारी झाली, मुद्दाम केली. पण शत्रूला यश आलें नाहीं खटला अपुरा ठरला, नोकरी गेली लोकांत मान्यता. सन १९२० सालीं नोकरीची उत्कृष्ट स्थिति पण त्याचवर्षीं नोकरींतून काढून टाकणें. १३ इतर गोष्टी:—मनास नेहमीं अस्वस्थता, फिकीर, दूरदर्शीपणा, झोंप कमी.

### कुंडलीक्रमांक ३१

श्रीशके १७९८ चैत्रमासे शुक्लपक्षे ९ तिथौ इंदुवासरे श्रीसूर्योदयातगत घ. १ प. ३० समये जन्म.

जन्मकुंडली

### आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

१ शरीरवर्णन:—गौरवर्ण, कृश, डोळे काळे, चेहरा मध्यम. २ अत्यंत आजारी असलेली वर्षे १० वर्षाच्या आंत. ३ आईचा मृत्यु:—३ऱ्या वर्षी. वडीलमृत्यु—पहिल्यावर्षी. ४पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति:—चांगली, घरदार, सावकारी, जमीन इ. ५ सध्यांची सांपत्तिक स्थिति:—अति वाईट, पूर्वीची स्थिति ४० वर्षापर्यंत उत्तम टिकली. ४० ते ४५ अत्यंत नुकसान व ४५ ते ५९ त्याचा परिणाम भोगीत आहे. ६ भावंडें:—आधी भाऊ, पाठीवर भाऊ, एकंदर भावंडें ३. पाठीवरचा भाऊ ३ऱ्या वर्षी व आधींचे जन्मापूर्वीच मयत. ७ विवाह:—१७-१८व्या वर्षी व १ महिन्यानें बायको मयत देवी पोसर. दुसरा विवाह:—१९व्या वर्षी, तिला २ मुली होऊन ती मुलीसुद्धां २६ व्या वर्षी मयत, तिसरे लग्न २९ व्या वर्षी होऊन ४२ व्या वर्षी बायको मृत आमवात. ८ संतती:—तिसऱ्या बायकोस ३ मुले त्यांत पहिला मुलगा, दुसरी मुलगी मृत उपजली, तिसरा मुलगा हयात. ९ विद्या:—मॅट्रिकपर्यंत. १० धंदा:—वयाच्या ३५पर्यंत धंदा केला नाहीं, भजनी वेदांताचा नाद. ३५व्या वर्षी शेअरचा धंदा सुरू त्यांत वयाच्या ४०व्या वर्षी नुकसानी-मुळें सुटला. ११ आप्तवर्ग:—एकच चुलता होता, तो १७व्या वर्षी वारला. आजी होती ती ४२ व्या वर्षी वारली, मामा नाहींत, आत्या ३२ व्या वर्षी वारली. १२ संकटकाल ४० पासून आजपर्यंत घर शेती वगैरे विक्री. वयाच्या ३५ व्या वर्षी सन १९१० मे, जून. व्यापारांत एकंदर नुकसान १५०००. १३ इतर गोष्टी २४ व्या वर्षी स्त्रीसह काशीयात्रा व पुन: त्याचवर्षी आजीसह काशीयात्रा. साम्प्रतची स्थिति अत्यत हलाखीची. व भिक्षान्नावर निर्वाह.

### कुंडलीक्रमांक ३२

श्रीशके १८०६ पौषेमासे शुक्लपक्षे प्रतिपदा तिथौ गुरुवासरे श्रीसूर्योदयातगत घ. १९ प. २ समये जन्म. जन्मस्थळ केळशी जि. रत्नागिरी; ता. १८-१२-८४

जन्मकुंडली

२ श   १२
३   १   ११
४   १०   च
७   म
८ शु

### आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

१ शरीरवर्णन:—मध्यम स्थूल वजन १४८ पौंड. वर्ण तांबूस, तोंडावर देवीचे वण; व्यंग नाहीं; २ अत्यंत आजारी असलेली वर्षे:—वयाच्या ५व्या वर्षी देवी, ३०व्या वर्षी टाइफाईडनें अतिशय आजारी; ३ आई हयात आहे; वडील मृत्यू—सन १८८८; ४ पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति.—साधारण चांगल्यापैकीं; ५ सध्यांची सांपत्तिक स्थिति:—मध्यम, चरितार्थापुरतें कसें तरी मिळतें, पैसे फार बुडाले आहेत; ६ भावंडें:—एक भाऊ; विवाह:—सन १९०८मार्च; पहिली स्त्री कृष्णवर्ण मृत्यु:—१९१८ जानेवारी; दुसरा विवाह:—सन१९१८मे दुसरी स्त्री गोरी; सासरा नोकर; ८ संतती:—सन १९१५ डिसेंबर मुलगा; १९१८ जानेवारी मुलगा होऊन गेला; सन

१९२२ मार्च, १९२३ आगष्ट, १९२५ जानेवारी मुलगे; एकूण ह्यात मुलगे ४; ९ विद्या:—विद्या स्कूलफायनल पास सन १९०२; १० धंदा—सन १९०४ ते १९०६ नोकरी प्रथम ६ महिने मास्तर; नंतर व्यापारी नोकरी व १९०६ नंतर स्वतंत्र व्यापार कमिशन एजंट; ११ आप्तवर्ग:—मामा १ पेन्शनर, चुलते ३ होते ते मयत, चुलत भाऊ ६ मयत; फक्त एक ह्यात; १२ संकटकाल:—विशेष म्हणण्यासारखा नाहीं; सन १९१५ पासून सार्वजनिक कामांत भाग घ्यावयास लागलो सन १९२१ मध्यें प्रां; कां; क; चा चिटणीस झालों; १३ इतर गोष्टी:—लोकांत मान्यता वाढली; सन १९२२ सालापासून पैसे बुडावयास सुरवात झाली; वर्त वसुलाची आशा नाहीं; दुसरी स्त्री १९३४ मध्यें वारली.

कुंडलीक्रमांक ३३

श्रीशके १८०८ मार्गशीर्षमासे शुक्लपक्षे अष्टम्यांतिथौ भृगुवासरे श्रीसूर्योदयातगत घ. २४ प. ९ समये जन्म; जन्मस्थळ केळशी;

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

१ शरीरवर्णन:—मध्यम स्थूल; तोंडावर देवीचे व्रण; व्यंग नाहीं; २ अत्यंत आजारी असलेली वर्षे:—नाहींत; ३ आई ह्यात, वडील मृत्यु:—सन १८८८. ४ पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति:—साधारण चांगल्यापैकीं; ५ स्वतःची सांपत्तिक स्थिति:—मध्यम; ६ भावंडें—एक भाऊ ७ विवाह:—सन १९११ मे; ८ संतती:—दोन मुलगे; ९ विद्या:—मॅट्रिकपर्यंत; १० धंदा:—नोकरी पगार दरमहा रु; १२५; ११ आप्तवर्ग:—मामा; चुलते ३ होते ते मयत.

कुंडलीक्रमांक ३४

श्रीशके १८०४ जेष्टमासे शुक्लपक्षे ११ तिथौ रविवासरे श्रीसूर्यास्तात रात्रौ गत घ. २४ प. ० समये जन्म. जन्म स्थळ विश्रोळी. ता. २८।५।८२.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

१ शरीरवर्णन—मध्यम स्थूल, नेत्र काळे, चेहरा लांबोळा पुढचे दांत मोठे, वर्ण तांबूस, कपाळ मध्यम, शरीर मध्यमदेही, व्यंग नाहीं. २ अत्यंत आजारी असलेली वर्षे वयाचे ७ व्या वर्षी ज्वर, ११ व्या चातुर्थिक ज्वर, १४ व्या ज्वर, १५ वें पायाला टीनची जखम, १६।२४।३० ३७ ज्वर २३ पिस्तूलची गोळी लागणें. ३ आईचा मृत्यु—एप्रील १९२२ सन्निपात, वडील मृत्यु—मार्च १८९२ अतिसारानें. ४ पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—वडिलोपार्जित जमीनजुमला असून उत्पन्न बरें आहे. ५ सध्यांची सांपत्तिक स्थिति—साधारण बरी असून भरभराट वाढत्या प्रमाणांत आहे, धाकटा बंधू १९०३ सालीं आपली वाटणी घेऊन विभक्त झाला आहे. (६) भावंडें—एकंदर ११ पैकीं आज हयात ४, मागचे व पाठचे भावंड नाहीं, थोरल्या वहिणी दोन, व धाकटा बंधु एक, हे हयात आहेत. बंधू विभक्त असून त्याला ३ मुलें व ३ मुली आहेत. ७ विवाह—सन १८९४ मार्च, स्त्रीचे स्वरूप-मध्यम गौरवर्ण, कृश, ठेंगू, हयात आहे. दुसरा विवाह १८९८ मे. स्वरूप मध्यम गौरवर्ण, मध्यम स्थूल, हयात आहे. प्रथम सासरची सांपत्तिक स्थिति चांगली आहे, दुसरी गरीबीची आहे. ८ संतती—पहिलीस १० पैकीं २ मुली, १ मुलगा हयात. दुसरीस पहिला मुलगा १९१२ फेब्रुवारीं, दुसरी मुलगी १९१५, तिसरा मुलगा १९१७, चौथी मुलगी १९२० व मुलगा १९२४. ९ विद्या मराठी पांचवीपासून शाळा सोडली. १० धंदा—शेती, सावकारी असून देशमूख, देशपांडे, पाटील, पटवारीपणा ह्या वतनवृत्या आहेत. सांप्रत सालिना उत्पन्न ७ ते ९ हजारापर्यंत असून खर्चही तितकाच. ११ आप्तवर्ग—मामा, मावशा, चुलता वगैरे कोणी हयात नाहींत. एक धाकटा बंधू व दोन वडील वहिणी ( हल्लीं विधवा ) आहेत पैकीं मोठीला २ मुलगे व २ मुली असून स्थिती श्रीमंतीची आहे व धाकटीला २ मुलगे १ मुलगी असून गरीबी आहे. १२ संकटकाल—नेहमीं विरोध असतों, पश्चात् शत्रू फार सन्मुख अनुकूल. नेहमीं संकटें उत्पन्न होतात पण अखेर निवारण, विशेषतः १९१०।११ ही दोन वर्षे फार त्रासाची गेली. १९१८ सालीं शेती संपादनाचे कामीं यश मिळाले. १३ इतर गोष्टी—शरीर नेहमीं रोगी. मन सदैव चिंताग्रस्त. लोकांत मान्यता; पहिली स्त्री व बंधू यांचे स्वभाव विरोधी म्हणून त्यांकडून सुखाचा अभाव. जन्मकालीं मातेला रोगामुळें कष्ट. जून १९०८ मध्यें सरकारकडून ऑ. मॅ.चे जागी नेमणूक होऊन सन १९१० जुलै ते १९१२ आगस्ट पावेतों दरम्यान १।२ विरुद्ध प्रकरणें उत्पन्न झाल्यामुळें सरकारी अधिकाऱ्यांचा रोष होऊन, अखेर सर्व ठीक झाले. पुढें १९२२ आगष्टमध्यें सेकंड क्लास पावर मिळाली ती अद्याप चालू आहे. सन १९१७ सालापर्यंत बगीचा, प्रवास वगैरे चैनीचे खर्च फार सबब सांपत्तिक स्थिति फार अडचणीची व ऋणग्रस्त. १९१८ पासून सुधारणा; १९२१ सालीं ऋणमुक्त, हल्लीं स्थिति बरी आहे.

### कुंडलीक्रमांक ३५

जन्म तिथी व तारीख—मार्गशीर्ष शु॥ ४ शनिवार शके १८१३ ता. ५ डिसेंबर सन १८९१ दिवसा ४ वाजतां घटी २२ उत्तराषाढा—चतुर्थचरण, मेषलग्न.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

माता व पिता—उभयतां हयात आहेत. व सर्व साधारण सुखी आहेत.

वडील भावंडे—थोरले एक बंधू आहेत.

कनिष्ट भावंडे—एकंदर तीन व्हान बंधु आहेत, पैकीं दोन चांगल्या स्थितींत आहेत. व एक अद्याप शिकत आहेत.

भगिनी—दोन भगिनी आहेत. व त्या आपल्या घरीं सुखी आहेत.

विद्या—विद्या अगदींच थोडी झाली. वयाच्या १५।१६ च्या वर्षींच माझ्या स्वतःचे दोषा-मुळें म्हणजे, चोरी, चहाडी, उनाडक्या अशा वाईट वर्तनामुळें विद्येला खो बसला. जर विद्या शिकलो असतो तर विलायत पर्यंतसुद्धां जाण्यास घरची सांपत्तिक स्थिती बरी होती. परंतु वाईट बुद्धीमुळें मीं स्वतः संधी दवडली व जन्माचें मातेरें करून घेतलें आतां नेहमीं त्याबद्दल अत्यंत दुःख होते.

वयाचे १४ ते २१ पर्यंतचा काळ—वयाच्या १५ वर्षापासून म्हणजे सन १९०४ पासून सन १९१२ पर्यंत म्हणजे वयाच्या २१ साव्या वर्षापर्यंत काळ अत्यंत वाईट म्हणजे परस्वाधीन, अपमानास्पदच व चिंताजनक असाच गेला.

नोकरी—सन १९१२ सालीं ता. ( १ आगष्ट १९१२ ) पासून नोकरी लागली. व ती नोकरी ता. ३१ जुलै १९२० पर्यंत म्हणजे बरोबर आठवर्षेंपर्यंत होती. परंतु ते कामच बंद झाल्यामुळें मालकानीं दुसरे जागीं बदली केली. परंतु मीं तेथें न जातां ती सोडून दिली. वरील काळ सर्व साधारण सुखाचा व स्वतंत्रतेचा असाच गेला.

सन १९१९ पासून साधारण घरची ( वडिलार्जित ) शेतीवाडी व साधारण देवघेव वगैरे कारभार बऱ्याच स्वतंत्रतेनें पाहूं लागलो.

पुन्हां नोकरी—ता. २७-२-१९२३ पासून पूर्वीच्याच ठिकाणीं पुन्हा पूर्ववत काम सुरू होऊन नोकरी लागली व अद्याप ती सतत चालूं आहे. नोकरी फारच उत्तम आहे व मालकाची विशेष मर्जी आहे. मीं त्याबद्दल ईश्वराचा अत्यंत आभारी आहे. इतर लोक हेवा करतात. पगार वार्षिक ६०० रु. आहे. वाढण्याचा विशेष संभव नाही, तरी नोकरी फारच उत्तम आहे शत्रु वाईटावर आहेत. व ते हेवा करतात.

शरीरप्रकृती—शरीराची उंच व दिसण्यांत सदृढ परंतु ऊष्ण व धातुविकार असल्यामुळें

शरीरास स्वास्थ्य रहात नाहीं. व मानसीक चिंता राहते. वय १५-१६ पासून हे विकार आहेत व फारच त्रास होतो.

मन—मनांत नेहमीं नानातऱ्हेचे चांगलें व वाईट विचार व नेहमीं साशंकता व उदासीनता राहते. बरीचशी कामें करावीत असें विचार मोठेमोठे येतात परंतु कार्य हातून घडत नाहीं.

आचरण—शक्य तितके धर्माचरण करावे, गोरगरिबास मदत करावी, पुण्यकर्म करावें. असें विचार फार येतात. पाप करूं नये, पापकर्माबद्दल मनास भीति वाटते परंतु धर्मबाह्य अशाच पुष्कळ गोष्टी घडतात. व कधीं कधीं तर त्याबद्दल मागाहून अत्यंत पश्चात्ताप होतो.

ईश्वर उपासना—ईश्वर उपासना करावी असें नेहमीं वाटते परंतु कांहींच घडत नाहीं. तथापि शक्य तितके नमन वगैरे करण्याचा प्रयत्न करीत असतो.

तीर्थयात्रा—सुमारें सन १९१५।१९१६ सालात एका मित्राचे साह्यानें काशी व प्रयागची यात्रा घडली. व सन १९२० सालीं श्रीरामेश्वरची यात्रा घडली. व पुन्हा सन १९२९ सालीं काशीस गेलो होतो. देश पर्यटन करण्याची आवड आहे व बरेंच घडले आहे, व नेहमी घडत असतें.

लग्न—लग्न फार उशिरा म्हणजे वयाच्या ३६ साव्या वर्षी म्हणजे ता. १३ जून १९२७ रोजीं ज्येष्ठ शु॥ १३ सोमवार शके १८४९ रोजीं झालें.

संतती—प्रथम संतती ( पुत्र ) जन्म ता. १४ जुलै १९२८ शनिवार आषाढ व॥. १२ शके १८५० दिवसां ४ वाजतां झाला.

द्वितीय संतती—दुसरी संतती ( कन्या जन्म ता. १२ जून १९३० गुरुवार ज्येष्ठ व॥. १ शके १८५२ दिवसां पावणेबाराचे सुमारास जन्म झाला.

रोग व आजार—उष्ण विकार तर आहेच पण सन १९२६ व १९२७ हीं दोन तीन वर्षें पोटांत फारच दुखत असें व सर्व बाजूनें शरिरास व मनास फारच त्रास झाला.

शस्त्रक्रिया—वयाचे ३७ साव्या वर्षी म्हणजे ता. ३ जून सन १९२८ साली रविवार सकाळीं ११ चें पुढें ऑपेन्डीसायटिसचे ऑपरेशन झाले. त्या दिवशीं ग्रहण होतें. ऑपरेशन झाल्यापासून म्हणजे गेली ७ वर्षें प्रकृती बरी आहे. पुन्हा ४ वर्षापासून उष्णाविकार, मूत्रविकार वगैरे विशेष त्रास होत आहे. पण सर्व साधारण प्रकृती बरी आहे. नेत्रविकार, मस्तकशूळ व धातुविकार वगैरेचा त्रास नेहमींच असतो.

अचानक योग—सन १९२३ सालीं म्हणजे वयाच्या ३२ साव्या वर्षी मीलमध्यें यांत्रिक कारखान्याचे डॉयरेक्टरचे जागीं निवडणूक व्हावी अशी सूचना माझे मित्रामार्फत ( अचानक ) अनायासे रविवार रोजीं करण्यात आली. परंतु मीं स्वतःच माझे वडलांचें नांव सुचवलें व ते सर्वानुमतें डॉयरेक्टर निवडले गेले.

ठेका घेतला—सन १९२४।१९२५ सालीं एका भागिदारासवें एका १५।१६ हजार किंमतीचें इमारतीचें कॅन्ट्रॅक्ट घेतले होते. त्यात नफा न होतां तोटाच झाला.

**डॉयरेक्टर निवडला गेलो**—सन १९२६ सालीं, वयाच्या ३५ साव्या वर्षी माझी पूर्व तयारी व खटपट नसतांना अगदीं अचानक रविवार तारीख १८ एप्रिल १९२६ रोजीं मर-

लेल्या सभेंत डॉयरेक्टर होण्यास माझें नांव सुचवलें गेलें व १५।२० लाख किंमतीच्या यांत्रिक कारखान्याचा डॉयरेक्टर (चालक) निवडला गेलों.

पुन्हा डॉयरेक्टर निवडला गेलों व म्यॉनेजिंग म्हणजे व्यवस्थापक डॉयरेक्टर झालों— सन १९२७ रोजीं म्हणजे १ वर्षानंतर वयाचे ३६ सावें वर्षी माझी डायरेक्टरचे जागीं फेर-निवड झाली व त्या सभेंत बिन विरोध पुन्हां निवडून आलों. व सन १९२७ रोजीं बोर्डाची म्हणजे ९ डॉयरेक्टरची सभा झाली व त्या सभेंत मीं व इतर २ इसम मिळून तिघांची एक व्यवस्थापक कमेटी नेमली गेली व सर्व अधिकार मिळाले. व त्यांत प्रामुख्यानें मींच विशेष काम पहात होतो. अधिकार पुष्कळ होते. परंतु मेहनतांना अथवा वेतन मुळींच मिळाले नाहीं. काम ऑनररी म्हणजे फुकट पहावें असेंच ठरलें. हा सर्व अधिकार ता. १ जुलै १९२७ पासून तारीख १ जुलै १९३० पर्यंत सतत ३ वर्षेपर्यंत पूर्ण अधिकारासह व्यवस्थापक मंडळांत होतो व विशेषत: प्रामुख्यानें, व माझे मर्जीप्रमाणेंच व अधिकारांत सर्वच कारभार होत असे.

वेतन केव्हां व किती दिवस—सन १९२९ बोर्डाची सभा झाली व ता. १ आक्टोबर १९२९ पासून ता. ३० जून १९३० पर्यंत म्हणजे फक्त ९ महिने दरमहा १५० रुपयेप्रमाणें वेतन मिळालें. मध्यंतरी रविवार सन १९३० रोजीं सर्व भागिदारांची सभा झाली त्या सभेंत हितशत्रुनें आमचें वेतन बंद केलें जावें असा प्रयत्न केला परंतु तो फेटाळला जाऊन पुढें २ महिनेपर्यंत वेतन मिळालें परंतु नंतर सर्व अधिकार गेला व वेतन बंद झालें. ता. ३० जून १९३०.

अपघात—सरासरी सन १९१५ किंवा १९१६ ह्या वर्षाच्या दरम्यान घरांत एका पेटींत साप (नाग) बसला होता व त्यावर माझा हात पडत होता परंतु अगदीं थोडक्यात वाचलो व तो नाग मोठ्या चिमट्यानें धरून मारला. व त्याप्रमाणेंच सन १९२७ व १९२८ सालीं घरांत आंगणांतच दाराजवळ मोठा साप होता, पहाटे ४ चे सुमारास बाहेर पडत. होतो त्याचेवर हात पडत होता परंतु तो दिसला म्हणून वचावलो. वरील दोन्ही अपघात टळले, सरासरी वरील सालांत ही गोष्ट घडली आहे.

संकट—सन १९२८ च्या मार्च महिन्यांत माझे व माझे मित्राचे हितशत्रूनें एक खटला आमच्यावर अर्धा अर्धी कांहीं एक संबंध नसतांना आम्हींच आरोपी आहोत असा आरोप धरून केला. त्यापासून आमची अब्रू जावी व भयंकर दंड व्हावा असा यत्न करून परस्पर सरकार दर-बारांत आमचें वाईट व्हावें असा अटोकाट प्रयत्न केला, परंतु आम्ही त्याबद्दल कांहींच चिंता व खटपटही केली नाहीं व आम्हांस त्यात कांहींच झाले नाहीं. परस्पर आमचें वाईट व्हावें ह्या हेतुनें शत्रूनें सर्व कारस्थान रचले होते.

ज्या घरांत राहतो तें स्वत:चें नाहीं, नोकरीमुळें फुकट ह्या घरांत रहात आहे. सरासरी १० वर्षांपासून ह्या घरांत राहतो. घराचें मुख पश्चिमेस आहे. त्या घराचे डावे बाजूस खोली आहे त्या खोलींत नेहमीं माझें वास्तव्य, उठणें, बसणें, निजणें वगैरे असतें.

—सन १९२८ आक्टोबर नव्हेंबरपासून एका मोठ्या वजनदार गृहस्थाचें शिफारस-पत्राच्या सहाय्यानें व अल्प खटपटीमुळें सरकारतर्फे (Nominated नॉमिनेटेड) म्युनसीपाल-टीचा मेंबर झालो. व आजपर्यंत मेंबर होतो.

कुंडलीक्रमांक ३६

शके १८२३ भाद्रपद शुद्ध १२ बुधवार सूर्यास्तानंतर ४ घटी ५९ पळें म्ह. सूर्योदयानंतर घटी ३४ पळे ५५ जन्म. त्या दिवशी तारीख २५।९।१९०१ होती.

जन्मकुंडली

| | रा. | अं. | क. | वि. | | रा. | अं. | क. | वि. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| लग्न | ० | १५ | १५ | ० | दशम | ९ | ६ | १९ | १० |
| रवि | ५ | ९ | ० | ४५ | गुरु | ८ | १३ | ४७ | १२ |
| चंद्र | १० | ५ | १३ | ५८ | शुक्र | ६ | १७ | १८ | २७ |
| मंगळ | ६ | २४ | ४५ | २४ | शनि | ८ | १६ | २२ | १८ |
| बुध | ६ | ० | १९ | ५७ | राहू | ६ | २३ | १४ | ५ |
| ने. | २ | १२ | ५७ | ५८ | केतू | ० | २३ | १४ | ५ |
| ह. | ७ | २४ | ५४ | १६ | | | | | |

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

( अ ) माझी सांपत्तिक स्थिती असावी तशी बरी नाहीं. माझें दरसालं उत्पन्न ५००–६०० रुपयांचे आहे व पगारही महीना १०० रु. प्रमाणें मिळतो. तथापि कर्ज १५००–२००० आहे ते फिटलें नाहीं. जमाखर्चाचा कसा तरी मेळ बसतो. सांपत्तिक परिस्थिती अनुकूल नसलेंछे ज्या इच्छा आहेत त्या पुन्या होत नाहींत व घरीं मंडळी ही उदास व नाखुप असतात. एकंदरींत सांपत्तिक स्थिति सुधारावी अशी इच्छा आहे. ( ब ) हल्लीं आमचे चुलत बंधु यांचे व माझे दरम्यान नायवाला खातेदार याचे संबंधीं वाद मुलकीखातेंत सुरू आहे. त्यात आमची बाजू खरी व बळकट आहे त्यात अखेर अनुकूल निकाल होऊन मी खातेदार नायबाळा करावा अशी इच्छा आहे. ( क ) माझें लग्न सन १९२४ जूनमध्यें झालें. हल्लीं कुटुंबाचे वय १९ वर्षांचे आहे. अद्याप संतती झाली नाहीं. स्त्रीचा प्रकृति असावी तशी सुदृढ नाहीं.

| अनुकूल गोष्टी. | प्रतिकूल गोष्टी. |
|---|---|
| १९१२ मराठी चौथी पास शिक्षणासाठीं स्थलांतर. | १९०४–५ वडील वारले. |
| १९२० मार्च–जून मॅट्रीक पास स्कॉ. आली. | १८१८ नो. तेजाने. इन्फ्लुएंझानें आजारी. |
| १९२१ „ प्रिव्हीयस पास स्का. आली. | १९१९ मार्च, जून मॅ. एकवार नापास. |

१९२२ ,, इंटर पास स्का. आले.
१९२४ ,, बी. ए. पास.
१९२४ जून लग्न झाले.
१९२५ ,, फर्स्ट एल. एल बी. पास.
१९२६ आक्टो. सेकंड ,, पास.
१९२७ डि. १ मुनसीफची नोकरी लागली.
१९२८ एप्रील २४ दत्तविधान झाले. दत्तक गेलो.
१९२८ जून नोकरीत कायम व प्रमोशन.
१९२८ ते १९३१ एकंदरींत काळ बरा गेला.
१९३१ डि. प्रमोशन मिळाले.

१९२० एप्रिल बंधु वारले.
१९२४ ते २८ म्हणजे लग्नासंबंधीं बोलणे सुरू होऊन दत्तक होईपर्यंत मानसिक अस्वस्थता अत्यंत होती.
१९२५--२६ बहीण वारली.
१९३२ जाने. पगारांत कपात १५ झाली. तेव्हांपासून सांपत्तिक ऋणयोगाचा त्रास

याप्रमाणें अनुकूल प्रतिकूल गोष्टी घडल्या आहेत. १९२७ पासून स्वतंत्रपणें राहू लागलो तेव्हांपासून सांपत्तिक स्थिति साधारण बरी आहे. जमेची व खर्चाची तोंडमिळवणी होते. १९२४ पासून १९२७ पर्यंत सांपत्तिक काळ फार वाईट गेला. लग्नासंबंधी व दत्तकासंबंधीं घाटाघाट होऊन अपेक्षे बाहेर खर्च करावा लागला. कर्जही झालें. हल्लीं स्थावर उत्पन्न दरसाल ५००।६०० चे येते. शिवाय दरमहा १५० रु. प्रमाणें पगार येतो.

( १ ) हल्लीं जे राहतें घर दक्षिणाभिमुख आहे त्यास दक्षिणाभिमुख दोन दारे आहेत. घर तीन रस्त्याचे तिठ्यावर कोपऱ्यावर आहे. पूर्वेस व दक्षिणेस रस्ते आहेत. पूर्वी पूर्वेकडे दार होते त्यानें वहिवाट सुरू होती, अलिकडे ते दार बंद करून तेथें खिडकी ठेवली आहे. घर माझ्यानें घेतलें आहे. ( २ ) विशेषतः प्रत्यक्षपणें मदत करणारे लोक कोणीही नाहींत. आमचे सख्खे बंधु हे आमच्या व दुसऱ्या कोणाच्याही व्यवहारामध्यें आमचेशीं सहानुभूतीनें वागतात पण स्वतः त्यांचेशीच कोणताही व्यवहार व्हावयाचा असला म्हणजे तितकीशी सहानुभूती त्यांचेकडून आम्हास मिळत नाहीं. शत्रुत्व करणारा इसम मुख्यतः आमचा चुलत बंधु आहे. त्याचे व आमचे दरम्यान वाद सुरू आहे व त्याचे आम्ही कर्जही देणें आहे. ( ३ ) सांप्रत घर दिलेली संकटें १३।१४ वर्षांपासूनची आहेत.

कुंडली क्रमांक ३७

जन्मतिथि श्रावणवद्य चतुर्थी, शके १८२७ जन्मवेळ रात्रौ ८॥ ते ९ च्या दरम्यान. रेवती नक्षत्र तिसरा चरण.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

वयाचे आठ वर्षेपर्यंत आईबापाजवळ × × मुक्कामी राहिलो. पुढची तीन वर्षे स्वतःचे गांवीं म्हणजे × × × आजोबाजवळ (रानांत) शिकण्याकरितां राहिलो. इंग्रजी तीन इयत्ता रानांतच खाजगी मास्तरनीं शिकवल्या. पुढें शिक्षणाकरितां ×××× आलो. तेथें आल्यावर १॥ वर्षांनीं एन्फुएंझाचे साथींत आई व सर्वांत लहान भाऊ वारला. त्या वर्षी नापास झालों. पुढें मॅट्रिकच्या परिक्षेंत पहिल्या खेपेस नापास व दुसऱ्या खेपेस पास झालो. त्यानतर १९२४ सालीं पुण्याला कॉलेजमध्यें होतो. १९२४ सालच्या डिसेंबर महिन्यांत लग्न झाले. न्यू पूना कॉलेजमधून फर्स्ट इयर पास झालो. उन्हाळ्याचें सुटींत घरीं आल्यावर वडिलांकडून निष्कारण अतिशय त्रास झाला. पुढें पुन्हां फर्ग्यूसनमध्यें इंटर आर्टसला गेलो, त्या वर्षी नापास झालो. १९२६ च्या उन्हाळ्यापासून घरींच राहिलो. वकिलीचा अभ्यास चालू ठेवला. १९२७ च्या ऑगस्टच्या २९ तारखेस पहिला मुलगा जन्मला. १९२८ च्या फेब्रुवारींमध्यें मुंबईस परिक्षेकरितां गेलो, पण नापास झालो. पुढें वडिलानीं नोकरी करण्यास बजावल्यामुळें १९२८ च्या मार्च २० तारखेस ×××× येथील ×××× टाइम कीपरच्या नौकरीवर लागलो. ऑगस्ट महिन्यांत पुन्हां परिक्षेस गेलो व नापास झालो. अभ्यास व नौकरी दोन्ही चालू ठेवली. डिसेंबर महिन्यांत ×××× काम करणाऱ्या एका कारकूनानें × ×. कला दाखवली व त्याच महिन्यांत दोघांनी मिळून सगनमतें केलें पुढें हें प्रमाण, आम्ही जोरानें वाढवले व प्रत्येक महिन्यांत संगनमताने राहूं लागलो. हा प्रयोग १९३१ डिसेंबर अखेरपर्यंत पूर्णपणें यशस्वी झाला. अशा तऱ्हेचे संगनमत असून हातांत दमडीसुद्धां शिल्लक राहात नव्हती. व ही गोष्ट घरांतसुद्धां कोणास कळली नाहीं. पगार ४५ रु. होता. त्यानंतर खालीं लिहिलेला आजार होऊन आज हलाखीची परिस्थिति झाली आहे. १९३२ च्या जानेवारी महिन्यांत आजारी असतांना विशिष्ट लक्षणाची बाब बाहेर पडली. माझ्या पश्चात् चौकशी झाली. एका सायीदाराला कामावरून काढले. मी बरा झाल्यावर कामावर गेलो, माझी चौकशी होऊन मी मात्र निर्दोषी ठरलो. सध्यां दोन मुले व एक मुलगी आहे.

विशेष गोष्ट तारीख १ जानेवारी १९३२ रोजीं मी प्रकृतीच्या संबंधीं घरांतील मंडळीजवळ कांहीं तक्रारी सांगितल्या. ७ जानेवारीला नेहमींप्रमाणें नोकरीच्या कामावर गेलों पण ताप भरल्यामुळें रजा घेऊन घरीं परत आलों. पुढें कांहीं दिवसांनीं बद (जांघाडांत गांठ) उत्पन्न झाली व प्रकृती फार दासंळली. ता. २४ रोजीं डॉक्टरनीं ऑपरेशन केले. प्रकृती बरी होत आली पण जवळपास जें कांहीं होते ते सर्व जाण्याची वेळ आली. तेव्हांपासून आतांपर्यंत माझी स्वतःची जी थोडीबहुत कमाई होती ती जाऊन वडिलानीं जें कांहीं घरांतील कुटुंबाजवळ दागिनें वगैरे ठेविले त्यांतून थोडेबहुत विकण्याची पाळी आली. आनमित्तीस तितकें जाऊन पुन्हां अदाजे ५०० रुपये देणें झाले आहे. माझ्या ह्या कृष्णकृत्याचा वडिलांना अद्याप मी थांग लागू दिला नाहीं.

### कुंडलीक्रमांक ३८

ता. २०।५।१८९६ रात्री बारानंतर पहाटे चार वाजून १५ मिनिटें म्हणजे ता. २१ चे पहाटे. जन्म—पुरंदराजवळ.

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

अनुकूल गोष्टी—१९१४ सालीं दत्तक ( सुमारें २० हजार इस्टेट ) १९१६ सालीं मॅट्रिक. १९१८ प्रिव्हियस. १९१९ इंटर. १९२१ बी. ए., १२ जून १९२४ एल्. एल्. बी. द्रव्यासंबधीं सतत अडचण. विवाह—सन १९१६ सासरची स्थिति साधारण. संततीं—प्रथम मुलगा बी. ए.च्या रिझल्टच्या दिवशींच झाला. आजपर्यंत संतती ३ मुलगे.

प्रतिकूल—सांपत्तिक अनुकूलता फारशी नाहीं.

### कुंडलीक्रमांक ३९

जन्मवेळ—संवत १९६२ विश्वावसुनामसंवत्सरे शालीवाहनशके १८२७ दक्षिणायने हेमतऋतौ पौषेमासे शुक्लपक्षे १४ भौमवासरे घटि ३६।१० मृगनक्षत्र घटि २।१० ब्रह्मयोग घटि ७।२१, गरकरणे घटि ५ सूर्योदयात्इष्टघटि। १७।५ मेषलग्ने॥ जन्म तारीख ९ जानुआरी १९०६.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

माझा जन्म × × गांवीं जि. वर्धा मध्यप्रांत या ठिकाणीं माझ्या वडिलांच्या घरीं झाला. माझें बाल्पण अगदी रोगी अवस्थेंतच गेलें. ६ व्या वर्षी घरांतील पिशाच्चबाधा झाली. व आजोबानें डाग केला सबब सुधारलो. ११ व्या वर्षी पाण्याचें गडांतर टळलें. १६ ते २३–२४ वर्षांपर्यंत नागपूरला शिक्षण. एम् ए. जी. ह्यास इसमांना नागपूरला हिंदुमुसलमान यांच्या दंग्यांत मार बसण्यापासून सुटका. १९३० च्या एप्रिल महिन्यांत बी. ए. जी.ची कृषिविशारद (B. A.) ची परीक्षा पास झालो व त्याचमन्में सरकारी फार्मवर रु. ७० प्रमाणें दरमहा नोकरी व पुढें ७० ते २५० पर्यंत दरमहा वाढण्याची आशा.

१८ मार्च १९३२ ला सरकारकडून नौकरी सोडण्याची नोटिस व ता. २५।४।३२ पासून नौकरीवरून बंद. ता. २५।४।३२ पासून येथेंच म्हणजे ××× वर ( ज्यांनीं मक्त्यांनीं घेतलें आहे त्यांनीं ) खाजगी ४० रु. दरमहाची नौकरी. त्यांत पगारवाढीची आशा नाहीं व नौकरीची शाश्वती नाहीं. शिक्षण होईपर्यंत काल मजेंत गेला. परंतु माझे लग्न ता. २४।१।३१ रोजीं झालें. व ११०० रु. हुंडा मिळाला पण तेव्हांपासून सांपत्तिक ओहटीच दिसून येत आहे. मार्च ३।१९३२ सांत मुलगी झाली व ती ता. ५ एप्रिलला वारली. आजचे जास्तीत जास्ती वार्षिक उत्पन्न ६०० रु. आहे.

कुंडलीक्रमांक ४०

जन्म ता. ३० माहे सप्टेंबर १९०२ रोजीं रात्रौ ९ वाजतां ( स्टं. टा. )

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

२ वयाच्या पांचव्या किंवा सहाव्या वर्षी धाकटा भाऊ देवीनें वारला. सातव्या किंवा आठव्या वर्षी आजारीपणा गेला. त्यानंतर शाळेंत जाऊं लागलों. १९१९ मार्च ता. १२ रोजीं वडील न्युमोनियाच्या आजारानें वारले, त्याच वर्षी शाळा सोडणें भाग पडलें. १९१९ ते १९२० च्या दरम्यान लग्नाचा योग जुळला होता; परंतु पत्रिका न जुळल्यामुळें राहून गेलें. १९२० आक्टोबर ता. २० रोजीं " × × × × कंपनींत " नोकरीस लागलों, तों अद्यापि तेथेंच आहे. १९२१ च्या सुरवातीस जातीपंचाबरोबर कोर्टापर्यंत भानगडी गेल्या होत्या. परंतु आईच्या व कांहीं नातेवाईकांच्या मध्यस्तीमुळें तडजोड करणें भाग पडलें. १९२२–२३ च्या सुमारास एका मित्राच्या मैत्रीमुळें मारवाड्याकडे त्यास जामीन राहिलो. १९२४ मध्यें त्याच्याच नादी लागून एका धान्य दळण्याच्या गिरणीच्या भानगडींत पडून बरेंच पैसे घालवावे लागले. १९२५ जानेवारी ता. १३ रोजीं आमची वडिलोपार्जित जमीन म्युनिसिपालटीनें खरेदी केली, त्याच महिन्यांत × × तालुक्यांत [ जि. ठाणें ] तारापूर शहरीं वरील मित्राच्या सांगण्यावरून एक शेत जमीन खरेदी केली. तेव्हांपासून मला भयंकर उतरतीकळा लागली. त्याच जमिनीकरितां कोर्टांत बराचसा भानगडी कराव्या लागल्या, व पुष्कळसे पैसे निरनिराळ्या भानगडींत त्याच मित्राकरवी घालवावे लागले. १९२६ ते १९२७ मध्यें दुसऱ्या एका मित्राच्या नादीं लागून सॉफ्टवूडच्या व्यापारांत पडलों व त्या दरम्यान ३ ते ४ हजार रुपयांचा नाश झाला. १९२७ एप्रीलमध्यें १९२५ सांत खरेदी केलेली शेतजमीन पैशांच्या अभावामुळें गहाण ठेवून, बहिणीचें लग्न करावें लागलें, तें लग्न ता. १९ मे १९२७ मध्यें झालें. अशा भानगडीनें पैसे काढूनही

ता. २० मार्च १९२८ रोजीं लग्न झालेली वहीण टायफॉईडनें आजारी पडून वारली. १९२८।२९ च्या दरम्यान दोनतीन महिनें आजारी होतो. १९३० च्या सुरवातीस आई आजारी पडून ता.१९ जून १९३० रोजीं रविवारीं जलोदराच्या विकारानें वारली. आतांपर्यंत वरील दोन मित्रांच्या नादीं लागून उपस्थीत केलेल्या भानगडीमुळें होतें नव्हतें तेवढें सर्व अन्नकरितां घालवावें लागूनहि भानगडी पूर्णपणें मिटल्या नाहींतच व त्यामुळें मनाला स्वस्थता नसून संबंध दिवस चिंतेंत जातो. हल्लीं उत्पन्न म्हणजे फक्त पगार ६० रुपये महिना आहे.

[ ३ ] जवळचा पैसा जाऊन कांहींएक न राहिल्यामुळें पुनः कोणत्या उपायानें पैसा मिळवावा व धाकट्या दोन बहिणींचीं व माझें अशी लग्नकार्यें कशीं होतील ही चिंता.[५] पूर्वींपासून १९२८ पर्यंत ज्या घरांत रहात होतो, त्या घराचें तोंड पूर्वेकडे होतें. त्या संबंध घरांत आम्हींच राहात होतो, म्हणून कोणत्या दिशेस हें सांगतां येत नाहीं. नंतर १९२८ मे नंतर दुसऱ्या ठिकाणीं राहावयास गेलों, त्या घराचेही तोंड पूर्वेकडे होतें. त्या घराच्या दक्षिण दिशेस रहात होतों. नंतर नव्हेंबर १९३० मध्यें तें घर मोडणें होतें म्हणून दुसरीकडे शेजारीच राहावयास गेलों. ती चाळ आहे. तिचें तोंड दक्षिणेकडे आहे, व त्या चाळीच्या मधल्याच खोलींत आम्ही राहातों. [ ७ ] ह्यात भावंडें दोन धाकट्या बहिणी.

### कुंडलीक्रमांक ४१

श्रीशके १८१५ चैत्रेमासे कृष्णपक्षे १ तिथौ रविवासरे श्रीसूर्योदयात्गतघटी १ पळें ५० समयेजन्म. जन्मवेळ ६ वा. ४५ मि. ( पहाटे ) जन्मस्थळ विजापूर. जन्मतारीख २ माहे एप्रिल सन १८९३

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

शारीरिक व्यंग—तोतरेपणा. आईचा मृत्युकाल सन १९१६ ( श्रावण व॥. ७ शके १८३८ ) वडील मृत्युकाल ता. २ मा. ११ सन १९२५ ( कार्तिक व॥. २ १८४७ )पालनपोषण आईबापांनीं केलें. आधीचें भावंड—१ पाठीवरचीं भावंडें—८ एकंदर भावंडें—९ पैकीं भाऊ ४ बहिणी ४ त्यांत ह्यात ७ मृत २ जन्मकालीं सांपत्तिक स्थिति—मध्यम. आजची सांपत्तिक स्थिति—मध्यम. आज महिना उत्पन्न—वकीलीपासून १००-२००, शेतकी उत्पन्न एकूण ४ बंधुमध्यें ७०००-८००० सांप्रतचा धंदा—वकीली. विद्या—( ऑनर्स ) एल्. एल्. बी. बी.ए. विद्येंत यश देणारीं वर्षें—१९१४, १९१५,व १९१८ सोडून बाकीचीं वर्षें. पास झालेले वर्ष—बी. ए., १९१६ मार्च, १९१९ मार्च, एल्.एल्. बी. अनपेक्षित दोन मुलास दत्तक

दिले, विवाहाची तारीख—४ मास ७ सन १९१५ वैशाख. प्रथम सतती शके १८३९ मार्गशीर्ष शु॥. ११. आतापर्यंत सतती ५ मुलें, त्यात हयात—५. नुकसानीचा काळ—१९१४ नव्हेंबरांत व १९१५ मार्चांत बी. ए. एल्. एल्. बीत नापास झालो. त्याचे अगोदर कधींच नापास झालो नव्हतो. तसेंच १९१८ मध्यें नापास झालो. फायद्याचा काल—परीक्षेशिवाय फायदा. नुकसान सांगण्यासारखें काहीं नाहीं. 25th September. 1925-adoption 5-3-1926 adoption.

### कुंडलीक्रमांक ४२

श्रीशके १८२७ ज्येष्ठमासे शुद्धपक्षे २ तिथौ सोमवासरे श्रीसूर्योदयात्‌गतें घ. ५४ प. ३६ समयेजन्म. जन्म तारीख ५ माहे जून सन १९०५

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शारिरिक व्यंग—अंगावर देवीचे व्रण, पालनपोषण वडिलांनीं. आधींचें भावंड १ पाठीपरचीं भावंडें ६ एकदर भावंडें ८ पैकीं भाऊ ३ बहिणी ५ त्यांत हयात ६ मृत २ जन्मकालीं सांपत्तिक स्थिति—कुटुंबाच्या निर्वाहापुरती. आजची सांपत्तिक स्थिति—चांगली आहे. दर महिना उत्पन्न—महिन्यात उत्पन्न नाहीं वर्षाचें एकच उत्पन्न सुमारें १००० केव्हां जास्तही होते सांप्रतचा धंदा—शेती वडील करितात. विद्या—बी. ए विद्येंत यश देणारीं वर्षें—एकदा नापास बाकी चांगली अत्यंत संकटाचा काळ—देवी निघाल्या होत्या तेव्हां. विवाहाची तारीख—१८ मास फेब्रुवारी सन १९२३ लग्नसमारंभास सुमारें १० हजार माणसे होती.

### कुंडलीक्रमांक ४३

श्रीशके १८०७ ज्येष्ठमासे कृष्णपक्षे तिथौ १४ शनिवासरे रात्रौ जन्म ता. १४जुलै १८८५.

जन्मकुंडली

### आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शारिरिक व्यंग—स्त्रीयांचा शोक व थोडे व्यसन ( मादक ) आई ह्यात आहे. वडील मृत्युकाळ मे सन १८९६, पालनपोषण काकानें केलें १९००पर्यंत. आधीची भावंडे दोन, पाठीवरचीं भावंडे ५ एकंदर भावंडें ७ पैकीं भाऊ ५ वहिणी २ त्यांत ह्यात २ मृत ५ जन्मकालीं सांपत्तिक स्थिति—साधारण, आजची सांपत्तिक स्थिति—कर्ज रुपये ४००० चे, आज महिना उत्पन्न—कांहीं नाहीं. सांप्रतचा धंदा बंद, नोकरी नाहीं ( १ लीही १९२६ संपामध्यें लागली पण मार्चमध्यें गेली ) १९२७ विद्या मॅट्रीकपर्यंत मॅट्रीक नापास. अत्यंत संकटांचा काल—१९२६ मार्चपासून आजपर्यंत. विवाहाचा महिना मे सन १९१९; प्रथम संतती आक्टोबर सन १९२० आतापर्यंत संतती ८ त्यांत ह्यात दोन, नुकसानीचा काल—१९२६. फायद्याचा काल १९१५ पासून १९२०

#### कुंडलीक्रमांक ४४

जन्म—ता. २४-९-१८९५ (आश्विन शुद्ध ६, मंगळवार) रोजीं सायंकाळीं ७-४५ मिनिटांनीं झाला.

जन्मकुंडली

२
१२
३
१
११रा
४ गु
१०
५
७श बु
९
६मं
च८

### आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

| अनुकूल गोष्टी. | प्रतिकूल गोष्टी. |
| --- | --- |
| १९१३ मॅट्रिक पास झालों. | १९१५ इंटर नापास. |
| १९१६ इंटर ,, | १९१६–२१ हा काल सर्व तऱ्हेनें वाईट गेला. |
| १९२२–५–५ विवाह झाला. | १९१६–१७ कालेज सोडावें लागलें. |
| १९२२ बी. ए. पास झालों. | १९१७–१९ कालेजमध्यें गेलो, परंतु , |
| १९२२ डिसेंबर, चांगली नोकरी लागली. | १९१९ पुन्हां कालेज सोडावें लागलें. |
| १९२६ ता. ७ फेब्रुवारी पुत्र जन्म. | १९२१ बी. ए. नापास. |
| १९२८ ता. १०–१ जन्म. ता. २९-५ मृत्यु. | या सर्व कालांत घरच्या मंडळीशींहि |
| १९२९ ता. २२–१ कन्या जन्म. | चांगलें नव्हतें. |
| १९३० ता. २४-९ पुत्रजन्म. ८-५-३२ मृत्यु. | १९१९ मध्यें बराच आजारी होतों. |
| १९२२ पासून सांपत्तिक चांगला काल | १९२३ सप्टेंबर नोकरी सोडली, |
| १९२३ सप्टेंबरपर्यंत व नंतर१९२६-२८पर्यंत. | १९२३ सप्टेंबर पासून दोन वर्षे अत्यंत वाईट |

गेलीं. या काळांत १९२३, १९२४ व १९२५ तीन वेळां स्त्री धुपवली.
१९२५ च्या अखेरीस फारच आजारी होतो.
१९२३–२५ व १९२८
पासून आज तागायत. सांपत्तिक वाईट काळ वार्षिक उत्पन्न सध्यां ज्यास्तींत
घरांत मुलें नेहमीं आजारी असतात. जास्त रु. ६०० कर्जामुळें अतिशय मानसिक कष्ट व इतर व्यावहारिक अडचणी सदैव असेशी. सांपत्तिक व उत्पन्नाची अत्यंत हलाखीची परिस्थिती. सध्यां राहतों त्या घराचें तोंड पश्चिमेकडे आहे.

माता—सौ. जानकी, पिता—राजाराम, भावंडें—१ मोरेश्वर, २ माधव, ३ श्रीकृष्ण ( हा सात वर्षांपासून पागल असून पागलखान्यात आहे ). ४ बहीण उमा, मामा—गोपाळ मेव्हणा—( स्त्रीचा भाऊ ) यशवंत, सासू—जानकीबाई, स्त्री—सौ. पार्वतीबाई.

विशेष मदत व सहाय्य करणारे लोक—दत्तात्रय मित्र, केशव मित्र, नारायण मित्र मोरेश्वर बंधू.

कुंडलीक्रमांक ४५

श्रीशके १८१८ दुर्मुखनाम, श्रावणेमासे, कृष्णपक्षे, त्रयोदश्यां तिथौ, शनिवासरे, आश्लेषा नक्षत्रे श्रीसूर्यास्तानतर घटी ९ पळे ५ समये जन्म. जन्मतारीख ५-९-१८९६.

जन्मकुंडली

| स्प. च. | स्प. सू. | स्प. ल. |
|---|---|---|
| ३ | ४ | ० |
| २० | २० | ७ |
| ४३ | ५१ | २२ |
| २४ | २६ | ७ |

कुंडली: २ मं, १२, १, रा ११, ३, च ४, १०, ७ श, ९, के ५, शु ६ बु, ८

आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

रंग गोरा, स्वभाव दयाळू, राग लवकर येतो, व्यंग काहीं नाहीं. अज्ञानपणामध्यें कांहीं विशेष आजार नाहीं. सन १९११ मध्यें विषमज्वरानें पुनर्जन्म. आईवडिलांचें सौख्य वर्षे २५ पर्यंत. ता. ३१-७-२१ रोजीं वडील कालज्यानें वारले. जन्मल्यापासून भरभराट, पुढें कर्ते झाल्यापासून विशेष भरभराट, वडिलांचें वय वर्ष ५६ पासून भावडांत कलह. वडिलांचा धंदा—शेती व सावकारी, वर्षांचे उत्पन्न सुमारें १२ ते १४ हजार. भावंडें—एकंदर ४. हयात २, पाठीवर कोणी नाहीं. विवाह—संवत् १९६९ मध्यें झाला. स्त्री गौर वर्ण, खोस बाळतरोग एक वेळ व इन्फ्लुएंझा एक वेळ झाला. संतति—२ पुत्र व दोन्ही हयात आहेत. विद्या—इंग्रजी ५ वी पर्यंत पूर्ण. प्रथमपासूनच गर्भश्रीमंत. सन १९२१ माहे आगष्टपासून व्यावहारिक

जबाबदारी, व घरगुती तंटा सुरू. सांपत्तिक दृष्ट्या वाईट काळ सन १९१८ पासून चालू आहे. घोड्यावर बसणें, गायन, वादन, वैद्यकग्रंथ, ज्योतिष वगैरेविषयीं आवड फार, मानसिक स्थिति चंचळ. कोर्टांत वगैरे जाण्याचा प्रसंग नाहीं. ता. ३१-७-२१ ते ता ३१-१०-२१ पर्यंत (वडील वारल्यामुळें) अत्यंत वाईट काळ गेला. स्थिति—उत्तम असून घरचीं सावकारी आहे. तीर्थयात्रा १९१५ मध्यें केली. वांटणीसंबंधानें नेहमी व्यग्रता, व्यसन कोणतेंही नाहीं, शारीरिक व्यंग नाहीं. भाऊबंदांकडून नेहमीं त्रास, आप्त व मित्र यांचें साह्य. साधारण ज्योतिष, धर्मग्रंथ व गायन यांचा नाद व विशेष आवड. वडील वहीण वडील वहिणीचे घरची सावकारी व धंदा सराफीचा. सासरची स्थिति मध्यम आहे. चुलत चुलते ३, सख्खा चुलता अगर आत्या वगैरे कोणी नाहीं. घर, जमीन व वाहनें यांचें सौख्य पूर्वार्जित आहे. मामा एक, मावशा दोन, यांचें सौख्य आहे. आई, वडील व भावंडें यांच्याशीं विरोध नाहीं. चुलत-आप्तांकडून पीडा फार होते.

कुंडलीक्रमांक ४६

१७९५ भाद्रपद शु॥ ११ बुधे ता. ३ सप्टें. १८७३ स्प. रवि. ४।१८।४५।७ स्प. ल. १२।४।४२.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

१ वय वर्षे ३ वडील परगांवीं काळज्यानें वारले. २ त्यानंतर सहा महिन्यांत वडिलोपार्जित सर्व इस्टेट भाऊबंदांनी काढून घेतली. ३ मातुलगृहीं राहून अभ्यास झाला. ४ सन १८९३ जानेवारी परिक्षा पास. ५ १८९४ जून महिन्यांत नोकरीत प्रवेश. ६ १८९५ पहिला विवाह. [७] १९०५ दुसरा विवाह. [८] १९१६ तिसरा विवाह. १९०८-१९०९ नोकरींत फार वाईट गेले. १९१० मे, ते १९११ मे, नोकरीत चांगले गेले. १९१३ मे दुसरी बायको मयत. १९१० आक्टोबर मातोश्री मयत. १९१४-१५ नोकरीत फार वाईट गेले. १९१४ फेब्रुवारी पहिली बायको मयत. १९२० नोकरीत सुख.

भगिनी एक ती १९१५ साली मयत. संतती ३ पुत्र मयत, चवथा ह्यात त्याचा जन्म आक्टोबर १९००, मुली ४ ह्यात. १ मयत, शरीर प्रकृती निकोप, साधारण विकार—१ मूळव्याध, २ हातास मुंग्या येणें, ३ बद्धकोष्ट.

### कुंडलीक्रमांक ४७

शके १७७९ ( सन १८५७ ता. ११ आक्टोबर.) आश्विन कृ. ९ रविवार संध्याकाळीं स्प. र.५।२६।७।८

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

वयाच्या दुसऱ्या वर्षी १७८० पौष कृ. ११. वडील वारले. शके १८१८ साली आई वारली. बायको सन १८९३ जुलैत १२ तारखेस वारली. १८९५ मध्यें ता. १५ जानेवारीपासून ३ महिने आई व वडील बंधूसह काशीयात्रा. दुसरें लग्न सन १८९६ वैशाख व. ६–एकंदर ८ मुलें झाली त्यांतील फक्त १ मुलगा व १ मुलगी हयात आहे. भाऊ, पुतणे वगैरे पुष्कळ आहेत. सांपत्तिक स्थिति उत्तम आहे. भावापासून विभक्त शके १७९८. × × येथें शके १८१८ सन १८९६ मध्यें मे महिन्यांत आले. नंतर १२ वर्षे संस्थानची हेडमास्तरची नौकरी केली, पेनशन १९०८ मध्यें घेतलें. आज इस्टेट एकंदर ३०।४० हजाराची आहे. सन १८८९ मध्यें विषमज्वर झाला होता. सन १९३२-३३ पासून सर्व इस्टेट व व्यवहार मुलाच्या ताब्यांत गेला व ह्यांना एकटें रहावें लागलें. ( ह्या गृहस्थाची स्थिति मोठी चमत्कृतिपूर्ण आहे. × × येथें येतांना फक्त १ पंचा व भांडें घेऊन आले होते त्याच ठिकाणीं त्यांनीं सुमारें ३०।४० हजाराची इस्टेट कमावली हा यातील विशेष योग आहे. वैद्यकीची चागली माहिती व वनस्पतीची औषधें देण्यांत प्राविण्यामुळेंही यांची प्रसिद्धी आहे. एकूण आयुष्याचा काल द्रव्य संपादनांत व संरक्षणांत गेला आणि शेवटीं एकटें रहावें लागलें !)

### कुंडलीक्रमांक ४८

शके १८१५ कार्तिक व॥ १४ गुरुवार सूर्योदयातगत् घ. २२ प. ७.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

स्वभाव सरळ व महत्वाकांक्षी असा आहे. वर्तन योग्य आहे परंतु कुटुंबामध्यें (भाऊबंद) वगैरे मंडळीचें प्रेम असावें तसें नाहीं तथापि विरुद्धही नाहींत. सप्तमांत शनि, मंगळाचा योग पत्नीसौख्यास चांगला नाहीं. व त्याप्रमाणें सुमारें बारा वर्षापूर्वी प्रथम संबंधाचें कुटुंब परलोकवासी जाहलें. द्वितीय संबंध नंतर माघ मासीं जाहला. हा योग शनि मंगळामुळें घडला. प्रथम संबंधाचे दोन मुलगे आहेत. तथापि पंचमाधिपती रवी अष्टमांत आहे व गुरु केंद्रीं (पंचमापासून) दशमांत आहे. यास्तव संततीसौख्य मिळावें तसें मिळालें नाहीं. पितृसौख्य वयाचे बारातेरा वर्षेपर्यंतच मिळालें. पितृस्थानावर मंगळाची पूर्ण दृष्टि आहे या योगामुळें अल्पवयांत पितृसौख्याचा नाश जाहला. हे गृहस्थ इलेक्ट्रीक इंजिनियर आहेत. स्वभावानें फार चांगले आहेत. व्ययस्थानीं राहू असल्याकारणानें खर्च फार होतो. परंतु सद्व्य.

कुंडलीक्रमांक ४९.

शके १८३५ कार्तिक शुद्ध ९ शुक्रवार सूर्योदयात्गत घ. २७ प. १२.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

लग्न पुरुष राशीचें असून लग्न स्वामी केंद्रीं नीचीचा ( चतुर्थ स्थानीं ) असल्यामुळें मातृपितृ सौख्य मध्यम वयाचे १८।१९ वर्षेपर्यंतच प्रकृति ऊष्ण व तापट स्वभाव आहे. बंधुसौख्य चांगलें नाहीं. रवि हा आत्माकारक ग्रह नीचीचा असल्यामुळें व तो शुक्र व बुध यांच्यामध्यें असल्यामुळें आयुर्दायाला चांगला नाहीं. पंचमावर गुरूची दृष्टि आहे परंतु तेथें केतु असल्यामुळें विद्यायोगाला कमीपणा. रवि-मंगळाचा केंद्र योग चांगला नाहीं. द्विभार्यायोग संतती समसमान. संतति प्रमाण साधारणतः बरें आहे. भाग्यस्थानीं स्वगृहींचा गुरु असल्यामुळें उदरनिर्वाह चांगल्या तऱ्हेचा आहे.

कुंडलीक्रमांक ५०

संवत १९४५ शके १८१० फाल्गुन शु. ६ मुगो इ. घ. ७ प. ५१ ता. ८।३।१८८९ स्प. छ. ०।२६ स्प. र. १०।२३ स्प. च. ११६

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

आईचा मृत्यु—संवत् १९७४ आश्विनमास. विवाह—संवत १९६६ माघ कृ. ९. स्त्रीचा मृत्यु—संवत १९८३ मार्ग० शु. २, दुसरा विवाह—संवत १९८३ माघ शु. ९, सावत्र आया २ व सावत्र भावंडे ३ आहेत. मामाची स्थिति उत्तम, मामाचा मृत्यु संवत् १९७५।७६, सन १९२९ मध्यें पश्चिमाभिमुख घर घेतल्यानंतर पांच महिन्यांत तीन लाख रुपये नुकसान झालें. पण त्यापूर्वी २॥ लाख रु. फायदा झाला होता.

## विशेष गोष्टींचें विवेचन

ह्या व्यक्तीच्या कुंडलीचा दैवयोग असा कांहीं उलथापालथ करणारा आणि क्षणेवृद्धिः क्षणेक्षयः अशा चंचल वृत्तीचा दिसून आला आहे कीं, त्याची इतरांस कल्पनाच करतां येणार नाहीं. जन्मतः मध्यम परंतु पूर्वार्जित जमीन, घरदार, वाहनें वगैरे स्थावर सुखकारक गोष्टींनी युक्त अशा ह्या व्यक्तीचा जन्म काठेवाडमध्यें होऊन वयाच्या १७।१८ वर्षांपर्यंतचा काल फार मजेदार आणि निष्काळजीपणाच्या स्थितींत गेला. शिक्षणाच्या दृष्टीनें विचार केला तर इंग्रजी बोलतां व लिहितां वाचतां येत असून व्यापारविषयक माहिती चांगली, यापेक्षां अधिक असें शिक्षण झालेलें नाहीं. यांना सख्खी भावंडें १।२ झाली पण ती अल्पायु होऊन यांच्या बालपणांतच त्यांचा अंत झाला. यामुळें सख्ख्या भावंडांचें सौख्य असें यांना मुळींच नाहीं. ह्या गृहस्थानीं प्रथम मुंबईस किरकोळ किरकोळ व्यापार केला, कांहीं काल मुंबईच्या कॉटन ब्रोकर-कडे व क्रायमचँट म्हणून धंदा केला परंतु त्यात याचें मन म्हणण्यासारखें गुंगलें नाहीं. पुढें पुढें यांनीं शेअर मार्केटाच्या व्यापारांतील महत्वाची माहिती व गुरुकिल्ली उपलब्ध होऊन त्यांनीं त्या मार्केटांत बेताबेतानें धंदा सुरू केला व त्यांत त्यांना यशही चांगलेंच मिळालें. शेअर मार्केटांतील ह्या धंदा पुढें इतका वाढला कीं ह्यानीं स्वतः शेअर ब्रोकरचा बिझिनेस चालू केला व त्यांत मदतही पुष्कळ लोकांची झाली.

शेअरच्या धंद्यांत यांनीं लाखों रुपये मिळविले व लाखो रुपये घालविले. यांचा चालता काळ आणि द्रव्यासंबंधीं यत्किंचितही फिकीर नाहीं असा काळ म्हणजे सन १९१८ ते १९२५. ह्या काळांत सर्व प्रकारचें सौख्य व सुखोपभोग यांनीं भोगले. एकच गोष्ट सांगावयाची म्हणजे वर दिलेल्या सुखोपभोगाच्या काळांत शेअर्समध्यें यांना एक लाख रु. एका महिन्यांतच मिळालें! पण दुर्दैवाची करणी अशी कीं तेवढ्या फायद्यांत यांना समाधान न वाटून यानीं मागचापुढचा कांहींएक विचार न करतां हावरेपणानें "खोटा" व "सट्टेबाजी"चा धंदा मलत्याच जोखमीचा

केला आणि त्यांत भयानक नुकसान होऊन सर्वस्व लयाला जाऊनही काहीं घरची इस्टेट विकावी लागली ! ! !

ज्योतिषशास्त्रदृष्ट्या ह्या कुंडलीचा थोडासा विचार करू—

ह्या कुंडलींत अगदीं प्रथम जे योग लक्षांत येतात ते असें कीं, लग्नाधिपती मंगळ गुरूच्या घरामध्ये व्ययस्थानात गेला असून आत्माकारक रवीपासून तो द्वितीयस्थानीं आहे ह्या मंगळाची दृष्टि मारकाचे जे तृतीयस्थान त्याच्यावर असून, सप्तमस्थान म्हणजे पत्नी सुखाचे स्थान यावरही त्याची पूर्ण दृष्टि आहे शिवाय अष्टस्थानाशीं त्याचा प्रतियोग आहे द्वादशस्थान हे पापग्रहांस—विशेषत मंगळासारख्या नाशकारक ग्रहास—चांगलें नसल्यामुळें ह्या कुंडलीच्या व्यक्तीस मंगळाची फलें अत्यंत प्रतिकूल मिळाली पाहिजेत हें अगदीं उघड दिसते

ह्या मंगळाचे जे गुणधर्म किंवा आचार, विचार, वृत्ति, वागणूक त्या सर्व गोष्टी ह्या व्यक्तीच्या आचारविचारांत व वागणुकींत असल्या पाहिजेत उतावीळपणा, उच्छृंखल व बेदरकार वृत्ती, आगापीछा नसणें, बेजबाबदारी, अहमन्यता आणि कोणाचीही पर्वा न बाळगतां मनमानेल तसें वागणें, अनाठाई व उधळ्या वृत्तीचा प्रचंड खर्च, द्रव्याचा तमा नसणें इत्यादि मंगळाचे सर्व गुणधर्म यांच्यांत पूर्णपणें वसत होते व आहेत ह्याच्या वृत्तीची गमत ही कीं उतावीळपणाच्या व तापट वृत्तीच्या उसळीसरशी करू नयेत अशीही कामें करून जावयाचे आणि नतर मागाहून त्याबद्दल हळहळावयाचे असे प्रकार कित्येक वेळां घडले आहेत ह्या प्रकार गुरूच्या राशींत मंगळ असण्याचा होय पण ह्या पश्चात् सुबुद्धीचा कांहींएक उपयोग झाला नाहीं जे नुकसान व्हावयाचे तें झालेंच

मंगळाचे तृतीय, षष्ठ, सप्तमस्थानांतील दृष्टीचे अनिष्ट परिणाम व्हावयाचे तेंही झाले आहेत भावडे लहानपणींच वारली सावत्र भावडे आहेत पण त्याचे व यांचे यथायथाच जमतें अर्थात् त्यांचेही सौख्य नाहीं षष्ठस्थानांतील दृष्टीचें फल याना नोकरचाकरानीं व मित्र म्हणविणारानींही फार फसविले किंवा यांच्या उतावीळ व अविचारी उत्साहातिरेकाचा पुरा फायदा करून घेतला तो काळ म्हणजे वय वर्षे ३२ ते ३७ ह्या वेळीं शनीचें परिभ्रमण सिंह, कन्या राशींतून चाललें असून तो अनुक्रमें रवि मंगळाशी प्रतियोग करीत होता शनीचे परिभ्रमण अष्टमांतून म्हणजे वृश्चिक राशींत चालू असतां त्यानें पुरी हलाखी आणली

सप्तमस्थानीं म्हणजे पत्नी सौख्याचे स्थानावरील मंगळाच्या दृष्टीचा परिणामही अनिष्ट असाच झाला आहे पहिली पत्नी यांच्या वयाच्या ३८ व्या वर्षी वारली, तिची प्रकृती साधारणच होती वारवार उष्ण विकारानें आजार उत्पन्न होतां होतां अखेर बाळंतपणाच्या विकारांत वारली सप्तमस्थान हे पोटाखालचा शरीराचा भाग व त्याची स्थिति दर्शविते ह्या व्यक्तीस कटीशूलाची व्यथा फार जबर होती आणि त्या प्रकारच्या वृत्तीचे, विचाराचे आणि आचरणाचे लोकांशी यांची मैत्री घडून त्यांत याना बरेंच शारीरकष्ट व आजार याचा उपभोग घ्यावा लागला व त्यानंतर त्यांची संगत सुटली ह्या प्रकार घडविणारा काळ म्हणजे सप्तम, अष्टम आणि नवमांतून आणि पूर्वी मेष–वृषभ राशींतून शनीच्या झालेल्या परिभ्रमणाचा काळ होय! याप्रमाणें

मंगळाच्या दृष्टीचीं फलें घडली. खुद्द मंगळ व्ययस्थानीं आहे त्यानें सर्व संपत्तीचा नाश केला, लाखों रुपये घालविले आणि शेवटीं अगदीं सामान्य स्थितींत आणून सोडलें!

ह्या कुंडलींत शुभयोग म्हटले म्हणजे धनाधिपति व सप्तमाधिपति शुक्र लग्नीं, भाग्याधिपति भाग्यस्थानीं पण केतुयुक्त, आणि दशमाधिपति. चतुर्थ केंद्रांत येवढेंच दिसतात. सुखस्थानचा स्वामी चंद्र तो उच्च राशीचा धनस्थानीं आणि त्याची अष्टमस्थानावर दृष्टी, तशीच गुरूची पंचमस्थान आणि तनुस्थान यांवर दृष्टी आणि शुक्राची सप्तमस्थानावर दृष्टी हे योग ह्या कुंडलींत चांगले आहेत तेव्हां त्यांच्या फलपरिणामाचे दिग्दर्शन करूं.

लग्नीं असलेल्या शुक्रानें, धनस्थानच्या चंद्रानें आणि जन्मलग्नावरील गुरूच्या दृष्टीमुळें ह्या व्यक्तीस शरीरसौख्य, ऐषआराम आणि कौटुंबिक सौख्य समाधानकारक मिळालें आणि आयुष्यांतील बाळपणाचा काळ सोडला तर आयुष्याच्या मध्यभागांत यांनीं चांगलेंच ऐश्वर्य भोगलें. ज्योतिष ग्रंथांतील ग्रहांच्या उदयकालाचा ठोकताळा लक्षांत घेतला तर यांच्या जन्मलग्नीं असलेल्या शुक्राचा उदयकाल वय वर्षे २५ पासून होतो आणि खरोखरीच यांच्या वयाच्या २५ वर्षांपासून कल्पनातीत भरभराट झाली व द्रव्याचा प्रचंड ओघ यांच्या घरीं वाहूं लागला. ऐश्वर्य व द्रव्ययोग देणारा शुक्र गुरु आणि त्यास व्यत्यय आणून नाश करणारा मंगळ व शनिदृष्टी यामुळें ह्या गृहस्थांच्या आयुष्याचा मध्यकाल द्रव्यदृष्ट्या जोराचा म्हणजे ४–२ लाख रु. फायदा देऊनही तो न टिकवितां त्यापेक्षां जास्त नुकसान करून पुनः फकीर बनविणाराच गेला. संपत्ति आली पण ती मंगळानें टिकूं दिली नाहीं.

ह्यांचा सर्व उत्कर्ष साडेसातींत झाला आणि त्या नंतरच त्यांना १०–५ वर्षांचा हितकर काळ गेला. मेष राशींतल्या शनीच्या परिभ्रमणापासून कन्येंतल्या शनिपरिभ्रमणापर्यंत १०–१२ वर्षें इतका उत्तमोत्तम काल अद्याप गेलेला नाहीं. शनीच्या भ्रमणाचीं फलें यांना फार स्पष्ट व निश्चित मिळालेली आहेत.

कुंडलीक्रमांक ५१

शके १८०९ फाल्गुन शु. ८ इंदु. सकाळीं १० वा. स्प. र. १०-१२ स्प. ल. ०-९

जन्मकुंडली.

१
२ चं
३
श४रा
५
६
७ मं
८ गु
९
१० शु के
११ र
१२ ह

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

सन १९०१ वडिलांचा मृत्यु, १९०८ विद्या संपली, १९०८ पासून स्वतः द्रव्यसंपादनास सुरवात केली, १९११ विवाह झाला, १९१६ ते २० पर्यंत द्रव्यदृष्ट्या त्रासदायक काळ गेला. १९२० मार्च नोकरीकरतां परदेशांत जलपर्यटनाचा योग, १९२९–३० गुप्त

शत्रुत्वामुळें अतीशय त्रास झाला, १९०८–१० लाभ. आरंभ दरसाल ३०० रु., १९११–१५ साधारण वाढ. ४०० रु., १९१५–२० साधारण वाढ ७०० रु., १९२०–२५ चांगली वाढ २५०० रु., १९२५–२८ उत्तम ३००० रु., १९२८–३० अखेर उतरत २५०० रु. १९३१ पेन्शन दरसाल ६०० रु. बसले.

कुंडलीक्रमांक ५२

शके १८१२ श्रावण शु. ११ सोमवार इ. घ. ४२ प. २५ ता. २८।७।१८९० स्प. र. ३।१७ स्प. ल. ०।१

आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

आईचा मृत्यु—वयाच्या ५ व्या वर्षी, आधीचे भावंड भाऊ, पाठीवर भावंड नाहीं, आज हयात भावंडे २ पैकीं एक बहीण, एकंदर भावंडे ७, वयाच्या १५ व्या वर्षी भयंकर आजारी, धंद्याला आरंभ वयाच्या २५ व्या वर्षी, अत्यंत फायद्याची वर्षें वयोवर्ष ३०-३१-३२ नुकसानीची वर्षें वयोवर्ष ३२ ते ३८ पर्यंत एकापेक्षां एक वरचढ पण त्यांत वयाचे ३५ वे संबंध वर्ष व ३६ वे वर्षाचे तीन महिने चांगले गेले.

कुंडलीक्रमांक ५३

शके १८२५ मार्ग. कृ. ८ भृगौ. इ. घ. २१ प. २० उत्तरा१ चरण ता. ११।१२।०३

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

वयाच्या ९ व्या वर्षी हर्णियाचे आपरेशन वयाच्या ६ व्या वर्षी तापानें आजारी, जन्मापासून ५ व्या महिन्यांत वडिलांचा मृत्यु, आधी भावंड नाहीं, हाच पहिला, नंतर कांहीं नाहीं,

वयाच्या १४-१५ वर्षापर्यंत आजाआजीनें सांभाळलें आईजवळ राहणे मुळींच नाहीं. विद्या– म्याट्रिक १९२० प्रिव्हियस १९२१ इंटर १९२२-२४ च्या परिक्षेचे वेळीं (डिसेंबर) एकदम आजारी पडून परिक्षेस बसतां आले नाहीं, १९२२ पासून मुंबईस, १९२५ एप्रील ते १९२९ अखेरपर्यंत केव्हांही यश आलें नाहीं. १।२ मार्कांनी नापास. १९१७ पर्यंत सांपत्तिक स्थिति उत्तम, १९१७ ते २५ पर्यंत वाईट, १९२५ पासून पुनः ठीक.

कुंडलीक्रमांक ५४

शके १८२१ चैत्र शु. ६ रविवार आर्द्रा नक्षत्र.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

वरील कुंडलीस शिक्षणाचे बाबतींत चांगले यश मिळाले असून या कुंडलीचा विवाह शके १८५२ मध्यें एका मोठ्या प्रसिद्ध व श्रीमान् अशा व्यक्तीच्या कन्येशी झाला व त्यांत यांचा सांपत्तिकदृष्ट्या अतीशय मोठा फायदा झाला. विवाहानंतर हे गृहस्थ परदेशांत जाऊन उच्च शिक्षण व डिग्री मिळवून परत स्वदेशी आले असून सध्या हे एका मोठ्या शहरांत स्वतंत्र धंदा करीत आहेत. व नोकरीची खटपट चालू आहे.

कुंडलीक्रमांक ५५

शके १८१६ चैत्र कृ. ५ बुधे सूर्योदयीं जन्म. ता. २५।४।१८९४ स्प. र. ०–१२ –२६–३७

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

वरील व्यक्ती सामान्य स्थितींत जन्मास येऊन या कुंडलीस विद्याभ्यासांत चांगले यश संपादन करतां आले. निरनिराळ्या शिक्षण-संस्थेत या कुंडलीस उच्च व मानसन्मानाचे योग

आले असून सध्या या कुंडलीचे गृहस्थ एका मोठ्या राजमान्य व प्रसिद्ध अशा संस्थेत वडिल अधिकारी म्हणून काम करीत आहेत. संतती आणि संपत्ती या दोन्हींचा उपभोग या कुंडलीस स्वतःचे हयातीत घेतां आला ही विशेष गोष्ट या कुंडलीत लक्षात ठेवण्यासारखी आहे. कुटुंबात पुष्कळ मंडळी असून कौटुंबिक सौख्यही या कुंडलीस चांगले मिळत आहे.

कुंडलीक्रमांक ५६

शके १८३१ पौष शु. ३ शुक्रवार दुपारी १ ते १॥ च्या दरम्यान जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

जन्मतः सांपत्तिक स्थिति मध्यम, वडिलांचा मृत्यु १९१९, आई हयात, विवाह अद्याप नाहीं. भावंडे ५ पैकीं हयात एक भाऊ, एक बहिण, वयाच्या ५।६ व्या वर्षी सावत्र आईचा योग, सावत्र बहिणी २ वडिलोपार्जित जमीन २००० एकर, एका प्रसिद्ध शहरांत दोन घरे आहेत, त्यांची किंमत सुमारे २५००० रु. सन १९२२ सालीं मयत वडिलांच्या देण्याबद्दल २२०० ची डिक्री झाली त्याविरुद्ध काम १९२९ पर्यंत चालू पण त्यांत अखेर दोन घरांचे लिलाव होऊन ती ४००० ला सावकारानें घेतली, चुलता विरुद्ध आहे, आई मामा वगैरे उलट, सन १९२७ जूनमध्यें याचा हिस्सा ९ आणे व चुलत्याचा ७ आणे अशी कोर्टडिक्री झाली, त्यावेळी हे अज्ञान होते.

कुंडलीक्रमांक ५७

शके १८१४ आषाढ शु ९ रविवार रात्री जन्म. ता. ३ जुलै सन १८९२

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

आधी बहीण, पाठीवर बहीण, सन १८९८–९९ आजोबांचा मृत्यु, १८९९ वडिलांचे

दुसरे लग्न, १९०१ डिसेंबर वडिलांचा मृत्यु, १९०३ बंधुचा मृत्यु, व लग्न झालेल्या वहिणीचा मृत्यु, १९०४ ते ८ हलाखीची स्थिति, १९०८ कनिष्ठ भगिनीचा मृत्यु, १९०९ ते १२ सर्वसाधारण शिक्षणाचा शेवट, १९१३ १४ खाजगी नोकरी, १९१५ अक्टोबर रेल्वेत नोकरीस सुरवात, १९१६ फेब्रुवारीत कोर्टातून घराचा ताबा मिळाला. १९१७ आजारी, १९१८ जानेवारीत विवाह झाला, १९२० पुत्रप्राप्ति, १९२१ ते १९२३ मध्यम स्थिति, सावत्र आई हयात आहे, तिला संतति नाहीं, १९२३-२४ पुत्रवियोग, घराचे कांपेन्सेशन मिळाले, १९२५ मे बदली झाली व आजारी, १९२७ सापत्न मातोश्रीच्या पोटगीच्या दाव्यास सुरवात, १९२८-२९-३० दाव्याकरतां व घरदुरुस्तीकरितां पैशाची व्यग्रता. १९२९-३० मुंबईस बिल्डिंग खरेदीच्या कामास सुरवात, १९२९ मध्यें १७०० रु. व्याज दिले, १९३० आगष्ट पुनः बदलीचा योग, १९३१ जून पुनः आजारी व त्यानंतर नोकरी गेली. १९३२च्या नव्हेंबरपासून १९३१ जुलै ते अक्टोबर सापत्न मातोश्रीकडून घरावर जप्ती १३०० रु करितां.

कुंडलीक्रमांक ५८

शके १८०९ चैत्र कृष्ण एकादशी इंदुवासरे, श्रीसूर्योदयातगत घ. ० प. १५ समये.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शरीरवर्णनः—काळा नाहीं व फार गोरा नाहीं, तांवूस, कृश, कपाळ मोठें, डावे गालावर डोळ्याचे खालीं, मांजरानें ओरखडलेली जखम आहे. उजवे पायाचे घवडपाचे वरचे बाजूस भाजलेली जागा आहे. (पैशाएवढी) ५।६ वर्षांचे सुमारास लहानपणी पोटांत रोग झाला होता तेव्हां उजवे बरगडीखालीं डाग आहे. व डावे बाजूस चट्टा आहे. नखावर नेहमीं पांढरे ठिपके उगवतात व मावळतात. उजवे हाताचे तळव्यावर बुधाचे उंचवट्यावर तीळ आहे. उजवे हाताचे कोंपराचे खालीं तीळ आहे. डावे कानशिलावर तीळ आहे. चेहरा लांबट. नजर, कान तीक्ष्ण, व्यंग नाहीं. अत्यंत आजारी वर्षे—वयाच्या ३ ऱ्या वर्षी पोटांत रोग, १३।१४ वर्षांपासून १६।१७ पर्यंत बध्द कोष्ठ, कपाळदुखी, बारीक ताप, ३०।३१ वे वर्षी आमांश व ताप. एकंदरीत कफकोपाचा विकार फार. आईचा मृत्यु—शके १८३२ आषाढ वद्य १० अतिसार, उष्णवात. वडील मृत्यु—शके १८४० माघ वद्य (अंगारकी) चतुर्थी. रक्तदोष, लहानपणी विहिरीत पडले होते तेव्हां पाय घेचले होते त्याच ठिकाणीं रक्तदोष झाला. ४।५ वर्षे आजारी होते. पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—खोत व शेती, २००।४०० रुपयांचे जमीनीचें उत्पन्न. सध्याची

सांपत्तिक स्थिति—आमचा चुलता निपुत्रिक होता, तो शके १८४३ वैशाख वद्य ४ रोजीं मयत. त्याची ५००।६०० रुपये उत्पन्नाचे जमीनीचा मी ट्रस्टी आहे त्या इष्टेटींतून वडिलार्जित दानधर्म कृत्यें करावयाची आहेत. आल्यागेल्यास जेवण घालणें, गणपतीचा उत्साह, दत्तजयंती वगैरे धार्मिक कृत्यें करणें, व्यापार विशेष नाहीं. चालु खर्चास तोटा नाहीं व शिल्लक नाहीं. भावंडें—एकंदर ६, पांच बहिणी व मी एक भाऊ. पहिली वहीण (विधवा) आमचे येथें असते मूल नाहीं. तिचे पाठच्या दोन बहिणी सुवासिनी मयत. एकीला मुली २, दुसरीला कांहीं नाहीं एक बाळंतरोगानें व दुसरी विषमानें मेली. ४ था मी. पांचवी बहीण चांगले स्थितींत आहे. सहावी लग्न होऊन १९२५ वर्षी कार्तीकांत मेली, नवरा आहे, एक मुलगी आहे मुलगा मेला, क्षयानें मेली. विवाह—शके १८२७ मार्गशीर्ष वद्य १ दिसेंबर १२ सन १९०५ स्त्री कृश, निमगोरी, दांत वर आलेले, डोक्यास केंस पातळ, सासरा वकील वकीली करीत नाहीं देशमुखीचें खोतीचें उत्पन्न आहे, वेदांत वाचन. संतती—पहिली मुलगी जन्म शके १८३६ भाद्रपद शु. ८ तिचे पाठीवर दोन दोन वर्षांचे फरकानें तीन मुली झाल्या, दोन हयात, शेवटची उपजत मयत. विद्या—मराठी पांच यत्ता व इंग्रजी सात, परिक्षेला बसलों नाहीं. गणितांत विशेष प्रगति व वाचन हे विषय उत्तम. ( बीजगणित चांगलें नाहीं ) गूढ विद्येची आवड, १२।१५ वर्षे वेदांत ( अद्वैत ) वाचन. कादंबरीवाचन मुळींच नाहीं. संगीतची आवड. वेदांताचीं पुस्तकें व वाद्यें ६०० रुपयांची आहेत. वाद्य वाजविणें सम्मत नाहीं फक्त हौस आहे. धंदा—शेती व खोती. थोडा व्यापार, जमीनजुमला घर वगैरे आनंद आहे. आप्तवर्ग—मामा ३ मयत. एक नोकर होता, मावशा ३ हयात, पैकीं २ मावशा चांगले स्थितींत आहेत. दोन मामांना एकेक मुलगा आहे स्थिती साधारण. चुलते ४ होते सर्व मयत. एक नोकर होता, बाकी खोत. सर्व चुलत्या मयत. चुलत भाऊ आहेत ते नोकर आहेत, आत्या दोन मयत भिक्षुक घराणीं होती. वयाचे सातवे वर्षी घरापासून १२ कोसांवर मामाकडे विद्येसाठीं गेलों. २०।२१ पर्यंत शिक्षण झालें. मामा अतिशय सात्विक वृत्तीचा होता, आचार शुद्ध. तो ठसा माझेवर अजून आहे. वाडी व औदुंबर येथें भिक्षा मागून सेवा करीत असे दोन तीन वेळ २।२ महिने राहिलो होतो. वडीलांचे व माझें पटत नसे तेव्हां अखेर १०।१२ वर्षे आमचे संभाषण होत नसे. परन्ही प्रेम होतें. सन १९१२ पासून १९१६ पर्यंत मुंबईस रेल्वेमध्यें नोकरी केली, त्या अवधींत काशी, रामेश्वर, द्वारका, जगन्नाथ वगैरे हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व यात्रा केल्या. शेवट श्रीबदरीनारायणची यात्रा केली व घरीं आलों. यात्रा एकटाच करीत असे. श्रीगोकर्ण येथें दोन महिने राहिलों होतो. यात्रा स्वतः पैसे मिळवून केल्या. वृत्ती धार्मिक, मनाचा कोमळ परंतु शब्द कडक, कर्माचा कंटाळा, संध्यासुद्धां करणेंची बुद्धि नाहीं. भक्तिमार्गाची आवड. बहुतेक दररोज भजन करितो. देवाविषयीं आस्तिक बुद्धी. उत्तम पवित्रता असेल तर पूजा वगैरे करितों. मस्तकास विचार करणें फार. आवाज मोठा. मित्र कोणी नाहीं. आप्तवर्गसुद्धां चांगला नाहीं. म्हणजे त्याचे व माझें विशेष प्रेम नाहीं. गांजा ओढणेचें व्यसन वयाचे २० वर्षांपासून लागलें तें अजून थोडयाफार फरकानें आहे. संसारांत मन रमत नाहीं. लहानपणी तालिम करीत असे. मन पराकाष्टेचें चंचल, वृत्ती संशयी, खाणें सत्वगुणी, पोहे थालिपीठ वगैरे स्पर्श नाहीं, कपडा-

ळत्ता भपकेबाज, दागिन्यांची हौस, स्वच्छता फार, शुद्र स्पर्श नाहीं, चोरी, चहाडी, शिंदळकी, अभक्ष्य भक्षण वगैरे स्पर्श नाहीं, २४ कलाक वाचन वाचम असलें तरी चालतें. जुनें चांगलें या मताचा. शत्रू फार. परंतु मी सामोपचारानें वागून कांहीं कमी केले आहेत. स्वभावाचा एक विशेष म्हणजे जें करावयाचें त्याची परमावधी नाहीं तर काहीं नाहीं. तापटपणा फार. तोंडांतून अश्लील शब्द येऊं लागले म्हणजे त्याला सीमा नाहीं. नाहीं तर एकही शब्द येत नाहीं. विचारामुळें डोक्याला त्रास फार होतो. यात्रा करितांना फार प्रसंग आले परंतु अखेर यश ठेवलेलें. पैशांचा तोटा बहुतकरून येत नाहीं. कर्ममार्गाला सुरवात केली तर २।३ दिवस चालतें. अलिकडे नाटक, तमाशा, कपडालत्ता वगैरेंचा कंटाळा आला आहे. परंतु अजून घडी बसत नाहीं. शेंकडों रुपयांचें नुकसान झालें तरी फिकीर नाहीं. नाहीं तर पैसाठीं जपतों. आळस भयंकर आहे. केलें तर ८।८ दिवस सारखें काम, नाहीं तर ८ दिवसांत खोलीचा केरसुद्धां काढणार नाहीं.

कुंडलीक्रमांक ५९

श्रीशके १८२४ फाल्गुनेमासे कृष्णपक्षे पंचम्यां तिथौ बुधवासरे श्रीसूर्योदयातगत घ. ६ प. ५ समये जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शरीरवर्णन—साधारण कृश, डोळे काळे, चेहरा लांबट, दांत मोठे, वर्ण साधारण गोरा, कपाळ साधारण, शरीर गिड्डे व्यंग नाहीं. आजारी असलेली वर्षे—लहानपणीं एकदां विस्तवानें डावा पाय गुडघ्याजवळ भाजून त्याचे हल्लीं वण आहेत व ज्वरानें एक दोन वेळ आजारी होतो. आई हयात आहे. व वडील मृत्यु शके १८४६ अश्विनमध्यें ज्वरानें. पूर्वार्जित सां. स्थिति—साधारण उत्पन्न शेतांचें थोडें आहे व कर्जही आहे. सध्यांची स्थिति—मध्यम असून वाढत्या स्वरूपांत आहे. भावंडें—एकंदर अदमासे ७ त्यांत हयात ३ त्यांत दत्तक एक दिला. लहान भाऊ व एक बहीण इतके बाकी तीन लहान भाऊ व एक बहीण असे ४ मयत. विवाह—नाहीं. विद्या—साधारण वेदविद्या. धंदा—नोकरी पूजेची पगार दरमहा १० व भिक्षुकी, वडिलार्जित कांहीं शेती व घर आहे. आप्तवर्ग—मामा १ व दोन मावशा हयात. चुलते २ मयत शके १८२१ व १८३९ मध्यें एक दत्तक दिलेला हयात चुलता, चुलती व चुलत भाऊ आहे.

कुंडली क्रमांक ६०

शके १८२३ श्रावण शु. ७ बुधवार ता. २१।८।१९०१.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

जन्म श्रीमंत घराण्यांत, स्थावर इस्टेट चांगली आहे, एक कनिष्ट व एक वडील बंधु, वडील बंधु बहुतेक वेळ परमार्थ साधनांत घालवितात.

वय वर्षे ११ चे सुमारास दत्तक जाण्याचा योग येऊन चांगली इस्टेट मिळाली. त्यानंतर स्वकर्तबगारीवर व्यापारांत ह्या गृहस्थानीं बराच वरचा नंबर मिळविला असून दिवसेंदिवस प्रगती दिसून येत आहे. कन्येच्या वक्री मंगळांत (चंद्राचे व्ययस्थांतून भ्रमण काळांत) अस्वस्थता (मानसिक जास्त) दिसून आली. संतती ४ कन्या व एक पुत्र.

शरीरयष्टी मध्यम असून, वर्ण निमगोरा आहे.

कुंडली क्रमांक ६१

जन्म शके १८२० कार्तिक कृष्ण १४, सोमवार दुपारीं ४, ता. ११।१२।१८९८.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

ह्या गृहस्थांचा जन्म गरीब घराण्यांत झाला, पितृसौख्य फार अल्पकाळ, बंधु नाहीं फक्त एक भगिनी, मातृसौख्य चांगले. स्वकर्तबगारीनें शिक्षण करून नोकरी व ती सुमारे ८ वर्षे उत्तम रीतीनें पार पाडली.

प्रकृती सुदृढ, निरोगी, पण वय वर्षे २९ अखेर इतके विलक्षण ग्रहयोग सुरू झाले की, द्रव्यहानी, प्रकृतीचा ऱ्हास होऊन १९३३ चे सुरवातीस अंत झाला.

१९३० सप्टेंबरमध्यें रवि शनि युति अष्टमांत सुरू झाली यावेळीं दुखण्यास सुरवात होऊन शेवटीं ऑपरेशन करावें लागले पण त्याचा उपयोग न होता पुन्हा १९३१ मध्यें दुसरें ऑपरेशन करावे लागले. पुढें बुध राहूवरून शनि जाताना मनःस्वास्थ्य बिघडून, कल्पनेबाहेर मानसिक त्रास सुरू झाला व शेवटीं अंत झाला. त्यावेळीं लग्नेश मगळाशी शनीचे ऑपोझिशन.

कुंडली क्रमांक ६२

शके १८०९ वैशाख शु. १३ गुरुवार ता. ५।५।१८८७ सकाळीं ६ वाजता.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

जन्म मध्यम स्थितींत, एक वडील बंधु, पण प्रकृतीचे बाबतींत भयंकर हालअपेष्टा. एक भगिनी. मातृपितृसौख्य अगदीं कमी.

सुमारे तीस वर्षे व्यवस्थित रीतीनें पोटापुरती नोकरी करून पेन्शन घेतले.

अत्यंत स्थिर आयुष्यक्रमाची ही एक कुंडली आहे.

विशेष म्हणजे ह्या गृहस्थांचा विवाह झाला नाहीं.

बोलणें अगदीं कमी, बोलण्यात शान्त वृत्ति. प्रवासयोग नेहमीं येतात.

कुंडली क्रमांक ६३

जन्म ता. १३।१।१९२२ दुपारीं १२ वाजतां.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

जन्म मध्यम स्थितींत, एक वडील बंधु व दोन लहान पैकीं एक मयत, बहीण नाहीं वर्ण मध्यम, गौर, बांधा उच, प्रकृती अशक्त.

पितृसौख्य चार वर्षेपर्यंत. नंतर गरीबींत दिवस हल्लीं शिक्षणाचे दृष्टीनें प्रगती दिसून येत आहे. गेल्या गुरु ( गोचर ) जन्मचंद्र त्रिकोणार्चे परिणाम बरोबर दिसून आले.

कुंडलीक्रमांक ६४

जन्म ता. ६ माहे १०।१९३२ पहांटे ३।१७ वाजतां.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

जन्मानंतर मातेस कष्ट, जिवावरचे दुखणें, नंतर स्वतःचे प्रकृतीवर अनिष्ट परिणाम होऊं लागला. बऱ्याच उपचारांचा कांहीं उपयोग न होतां अखेर ५ वे महिन्यांत मृत्यु. अल्पायु.

कुंडलीक्रमांक ६५

जन्म शके १८२६ वैशाख कृष्ण १४ शनिवार रात्रौ २ ते ४ चे दरम्यान

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

आई वयाचे पांचवे वर्षी मयत झाली; पुढें दोन वर्षांनी दुसरें लग्न केलें; त्यावेळी आम्ही आपले आईची चार भावंडें होतों पुढें सावत्र आईचे व आमचे पटेनासें झालें व तेव्हांपासून आमचे हाल होण्यास सुरवात झाली व पुढें जवळ जवळ ११ वे वर्षापासून आम्हांस वडिलांनी घरांतून हाकून लावले व तेव्हांपासून वडिलांची आमचेवर वक्रदृष्टी झाली व आमचा योगक्षेम कारच त्रासाचा गेला. असा त्रास बरेच दिवस काढून शेवटी सन १९२५ सालीं वडिलांवर हिश्शाचा दावा चालू केला. हा दावा चालू असतां वडील जानेवारी तारीख ३० रविवार पौष कृ. १२ शके १८४८ रोजीं रात्रौ मयत झाले व सावत्र आई व मी यांचा दावा चालू राहून शेवटी

त्या दाव्यांत मला अपयश आले व माझी पूर्ण तेढ झाली. वडिलाचे निधनानंतर अकस्मात लग्नाचा योग येऊन लग्न मे तारीख ९ सोमवार शके १८४९ वैशाख शु. ८ गोरज मुहुर्ती झालें. लग्नानंतर कांहीं दिवसानीं मिळकत चागली झाली, पुढें शके १८५१ आगष्ट तारीख २७ मगळवार श्रावण व॥ ७--८॥ वाजतां रात्रौ बायको बाळतीण होऊन मुलगी झाली व पुढें भाद्रपद शु. १२ रोजीं बायको सकाळीं एकाएकी भयकर सीक झाली व आजिबात बोलेनाशी होऊन बरेच दिवस आजारी होती व ती पौष शु १३ सोमवार जानेवारी तारीख १३ या दिवसापासून बोलू लागली. पुढें तिची प्रकृती १ वर्ष सुधारली नाहीं, झालेली मुलगी याच महिन्यांत वारली. आमचे वार्षिक उत्पन्न ३०० रु. चे आहे, धदा भिक्षुकी आहे. आमचे घर जुने एक असून त्यात अर्ध्या भागांत दक्षीणेस आम्ही राहतो व उत्तरेस आमचा चुलत चुलता हा रहात असतो. राहते घराचे तोंड पूर्वेस आहे, सांप्रत शत्रू चुलत चुलता. देवतेचे कांहीं दिवस पूजन करतो परतु कांहीं दिवसानें मन सशयी व अस्थिर होतें त्यामुळें एकाग्रता नष्ट होऊन मनांत कुतर्क येऊन मन मलीन व भ्रष्ट होतें, स्वप्नें वाईट पडतात. सावत्र माता कार्तिक व॥ ५ रविवारी रात्री १०॥ वाजतां वारली, शके १८५१ माघ महिन्यापासून एकदर दोन्ही बिन्हाडातील लहान दोन व मोठी तीन अशी पांच मनुष्यें मयत झाली.

कुडलीक्रमाक ६६

शके १८१५ माघ वद्य ७ सोमवार विशाखानक्षत्र चतुर्थचरण दोन प्रहरी १० वाजतां ता. २६ फेब्रुवारी सन १८९४ मेषलग्न वृश्चिकराशि जन्म.

जन्मकुंडली

२ गु, १२ रा, ३, १, ११ र बु, ४, १० शु, ५, ७ श, ९ म, के ६, च ८

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

१८९४ ते १८९५ माकड खोकला. १८९५ ते १८९६ अग्नीभय, १९०४ ते १९०५ मुज व त्याच सुमारास वडिलांचा मृत्यु १९०५ ते १९०९ आत्याबाईचे घरीं राहणे व विद्याभ्यास १९०९ कोल्हापूर स्टेट कुलकर्णी परीक्षा पास. १९११ मुलकी परीक्षा पास. १९११ ते १९१३ मुलकी खात्यात उमेदवारी काळ चागला गेला. १९१४ ते १९२३ कोल्हापूर पोलीस खात्यांत नोकर, कालसाधारण गेला १९१३ ते १९१४ दरम्यान अतीशय आजारी मूळव्याधीपासून, दुसरा रोग होऊन आप्रेशन करावे लागलें त्यावेळीं मामाकडून सहाय्य झालें १९११ ते १९१३ दरम्यान सर्वांत वडील बहीण मयत, तिला हल्लीं दोन मुलगे एक मुलगी आहे आणखी सहा बहिणी लहानथोर होऊन वारल्या. माझा जन्म शेवटचा आहे त्यावर मावढ नाहीं. १९२३चे

सुमारास लग्न झालें, पहिले दोन मुलगे सात महिन्यांनीं प्रसूत होऊन वारले. हल्लीं एक मुलगी दोन वर्षांची आहे ती सदा आजारी असते. शके १८५४ भाद्रपद शु. १४ आईचा मृत्यु. १९२४ ते १९३० हंगामी शाळाखात्यांत दस्तुरीवर हिरडे डेपोवर नोकरी केली व त्यांत हिरडे डेपोवर नुकसान रुपये १०० झालें. तीन वर्षांपूर्वी १९३० ते १९३३ निरुद्योगी, हल्लीं मामांचे आश्रयास आहे, कर्ज रुपये १०००. १९२० ते १९२१ दरम्यान उष्णतेचें विकारानें आजारी व आप्रेशन केलें.

कुंडलीक्रमांक ६७

## दशमांतील शनीचे परिणाम.

जन्म ता. २६।९।१८७३

जन्मकुंडली

दशमांतील शनिबद्दल मि. ॲलनलिओ यांनीं म्हटले आहे कीं, Saturn in the tenth house denotes a precarious condition at some period of life——if well aspected the native will rise by his own perseverance and industry far above the sphere into which he was born——if afflicted he will rise only to fall again etc.

ह्या सद्गृहस्थांचा आयुष्यक्रम अत्यंत महत्वदर्शक, पवित्रता, मानसन्मान, द्रव्यविषयक घडामोडी वगैरे दृष्टीनें पण तितकाच चमत्कारिक परिस्थिती उत्पन्न करणारा असा गेला आहे.

ह्या कुंडलीत मेष लग्न उदित असून खालील गोष्टी भाव चलित कुंडलीवरून दिलेल्या आहेत अर्थात त्या पहाताना अंशात्मक योग पहाणें जरूर आहे.

जन्म सन्मान्य घराण्यांत, वय वर्षे १९ मॅट्रिक नंतर वकिलीचा अभ्यास. विवाह वय वर्षे १७ ( गोचर गुरु लग्नात ) वय वर्षे २२ स्थलांतर पर ठिकाणी नोकरी. वय वर्षे २४ वकिली सुरू, गुरु-चंद्र शुभ योग वय वर्षे २१ पुत्र संतती-गोचर गुरु-पंचमातून.

बंधु तीन कनिष्ट, एक वडील भगिनी व एक सर्वांत लहान.

वय वर्षे २८त फलज्योतिषशास्त्राकडे मनाचा कल व त्यात लक्ष घालून पुढें सुमारे २८ वर्षे व्यासंग, घेतल्यावरून भविष्य सांगणें व ते शेंकडा ८०।९० हिस्से बरोबर पडून अनुभवास आल्याची पुष्कळ उदाहरणें आहेत. लग्नांत असलेल्या नेपच्युनसारख्या ग्रहाचे परिणाम अत्यंत महत्वदर्शक व शुभ असे पाहण्यास मिळाले. साक्षात्कारादि अनुभव, वाणीस उत्तम वश वगैरे भाग्य लाभले आहे.

लग्नेशीच शुभास अत्यंत महत्व देण्यांत येते, वेदांतादि गूढतत्वाकडे मनाचा कल, त्यांत कल्पनेबाहेर प्रगती, विविध विषयांची चिकित्सक ज्ञानाची व तत्वज्ञान, अध्यात्म विद्या यांची

आवड उत्पन्न होणें व त्यातून पंचमातील गुरु–शुक्र योगांचे शुभ परिणाम. या गृहस्थांचे आयुष्य-क्रमांत पारमार्थिक उन्नती दृष्टया बरेच महत्वदर्शक असें पहावयास मिळाले आहेत.

पचमात शुक्र, दशमेश दशमांत, लग्नी नेपच्युन व गुरु–नेपच्युन त्रिकोण वगैरे योग झाले असून त्याचे अनुभव पूर्ण प्रमाणात घडले आहेत.

शनिच्या अनुकूलतेने कायद्याचे परिक्षेत यश देऊन वकिलीचा धंदा सुरु झाला व गोचर ग्रहांचे अनुकूल भ्रमणात कल्पनेबाहेर यश व मानसन्मान मिळून उत्तम नावलौकिक मिळाला.

पंचमातील शुक्र--गुरुने उपासनेची पराकाष्ठा, अत्यंत बिकट अवस्थेतही शुद्धता व श्रद्धा कायम ठेवून जीवनक्रम कंठणें खरोखर विकट असताना ह्या गृहस्थांची एक दिवसही स्नान किंवा पूजाअर्चा ( चौदा वर्षाच्या सतत दुखण्यानहि ) अंतरली नाहीं. व ह्या दृष्टीनें कुंडलीतील ग्रहयोगांचा विशेष अनुभव पटून येतो.

कोणत्याहि कुंडलीत एकंदर चार त्रिकोण होतात त्यात जो त्रिकोण महत्वाचा असेल त्याप्रमाणें जन्मणाऱ्याचे आयुष्यक्रमांत विशेष तऱ्हेनें अनुभव घडून आल्याचे दिसून येतें. त्याचा थोडक्यांत विचार केल्यास पहिल्या त्रिकोणांत लग्न, पंचम, व नवमस्थानें येतात, व त्यावरून जन्मणाऱ्याची नैसर्गिक इच्छा, वंशविस्तार, पारमार्थिक उन्नती वगैरे गोष्टींचा विचार होतो.

दुसरा त्रिकोण ( द्वितीय, षष्ठ, दशम स्थानाचा ) हा ऐहिक श्रेष्ठत्व देणारा.

तिसरा त्रिकोण, सप्तम एकादश व त्रितीय स्थानांचा व चवथा चतुर्थ, अष्टम व द्वादश या स्थानाचा होतो.

या कुंडलीत प्रथम, द्वितीय व चतुर्थ त्रिकोण जास्त महत्वाचे झाले आहेत व त्या दृष्टीनें आयुष्य क्रमांत अनुभव आले आहेत.

वय वर्षे २८ पितृनिधन, प्रापंचिक जबाबदारीस सुरुवात, रविशनि केंद्रयोग, शनि दशम बिंदू सन्निध, पण पुढें जन्म शनिवरुन शनीचे भ्रमण सुरु होतांच वकिलीचे धंद्याचा जम बसून श्रीमान लोकाशी स्नेह, अधिकारी वर्गाचे प्रेम वगैरे गोष्टींस सुरुवात होऊन आयुष्यांतील महत्व-दर्शक काळाचा आरंभ झाला. गुरु ( गोचर ) दशम--एकादशांतून.

वय वर्षे २५ पुत्र संतती, २७ कन्या संतती, वय वर्षे ३१ पुत्र संतती, पंचमेशाशी त्रिरेकादशयोग. ही संतती मानासिक समाधान देणारी, आनंदात भर टाकणारी, व अल्प वयांत प्रसिद्धीस आलेली अशी झाली.

वय वर्षे ३४।३५।३६ ही गुरुचे भ्रमणाची वर्षे, प्रसिद्धी, मोठमोठ्या लोकाशी स्नेह, अध्यात्मिक प्रगती, आराधना वगैरे दृष्टीनें महत्वदर्शक फळ देणारी अशी गेलेली आहेत.

वय वर्षे ३६ मध्यें चतुर्थेश चंद्राशी शनीची प्रतियुति, ह्या वेळीं मातृनिधन झालें. गुरु नवम भावारंभी येऊन बराच धार्मिक खर्च झाला.

वय वर्षे ३९ मध्यें स्थावराची खरेदी व या वेळेपासून आयुष्यांतील अप्रत्यक्ष अडचणींच्या, व कष्टकारक काळास सुरुवात झाली. स्थावरापायी नुकसान होणार हे समजत असून जमीन खरेदी करणें व त्यात अखेर १५।२० हजार रुपये नुकसान येऊन अतिशय त्रास झाला. ४३ पासून शनि चतुर्थ भावारंभी येऊन अत्यंत चमत्कारिक परिस्थिति उत्पन्न झाली.

वय वर्षे ४२ इन्फ्लुएन्झा, अन्नद्वेष वगैरे गोष्टी घडून त्याचा परिणाम पुढे सुमारे चौदा वर्षपर्यंत शारिरीक दृष्ट्या त्रासदायक झाला.

प्रकृतीमुळे उत्पन्नावर आघात व बागाइतापायी भयंकर खर्च वगैरे परिणाम फारच चमत्कारिक अनुभवास आले. ह्या वेळी चतुर्थातील मूळच्या हर्शलवरून शनीचे भ्रमण चालू होते. प्रकृती खालावत जाऊन धंद्याचे दृष्टीने ( मूळ दशमस्थान बलवान असल्यामुळे एकदम झाल नाहींत तरी धंद्याचे दृष्टीने ) आघात होऊ लागेल.

वय वर्षे ४३ ला शनीचे व गुरुचे परिणाम विशेष चमत्कारिक झाले. एका कंपनीस दिलेले हजारो रुपये बुडण्याची वेळ आली दावा मिळाला पण त्या करिता ती सर्व रक्कम खर्ची पडली. गुरुचे नवमावरील दृष्टीने पांचशे मैल प्रवास सुमारे वीस एकवीस वेळा घडला.

वय वर्षे ४५।४६।४७ ही तीन वर्षे ऐहिक व त्याच बरोबर पारमार्थिक दृष्ट्या महत्वाची गेली. मात्र शनीचे भ्रमण शारिरीक दृष्ट्या जास्त कष्टदायक झाले व त्यामुळे प्रकृतीवर जास्त आघात घडले.

वय वर्षे ४८ शनी महाराज षष्ठाचे अखेर येताच धंद्याचे दृष्टीने व प्रकृतीचे बाबतीत अशुभ परिणाम होऊन ( फक्त मूळच्या शनीशी त्रिकोण योगामुळे अधिकारारूढ व्यक्तिच्या अनुकूलतेखेरीज ) विकट परिस्थिती उत्पन्न झाली. चतुर्थातील हर्शलशी गोचर शनीचा केंद्र हा भयंकर नुकसानीस कारण होऊन सुमारे वीस हजार रुपयास ठोकर बसली.

वय वर्षे ५३।५४।५५ प्रकृतीवर जास्त आघात होऊन अंथरुणास खिळून पडावे लागेल. शनीचे अष्टमातून चंद्रासन्निध भ्रमण अत्यंत त्रासदायक होऊ लागेल, रवीवरून शनी जाताना जास्त कष्ट अनुभव आलेच पण ते कमी न होता जास्त वाढून वय वर्षे ५६ मध्ये शनि-गोचर शनि केंद्रयोगाने ( अष्टम भावारंभापासून ) शारीरिक दृष्ट्या अत्यंत चमत्कारिक परिस्थिती उत्पन्न केली. भयंकर नुकसान, शारीरिक असमाधान, वगैरे गोष्टी घडून आल्याः—एकंदरीत ह्या कुंडलीत आरंभी म्हटल्याप्रमाणे शनि, हर्शलचे परिणाम व गोचर ग्रहांचे अशुभ योग होताच अशुभ फलांची तीव्रता दिसून आली. व त्यावरून २८ ते ४२ हा काल श्रेष्ठ ऐश्वर्य, मानसन्मान, द्रव्यविषयक घडामोडी, प्रापंचिक सौख्य, पारमार्थिक प्रगती, अखंड उपासना या सर्व दृष्टीने अत्यंत श्रेष्ठ फल उत्पन्न करणारा गेला, पण ४३ पासून ते ५६ पावेतो ( शनीचा चतुर्थातील हर्शल बरोबर युतियोग ) चौदा वर्षेपर्यंत इतकी उलट परिस्थिती उत्पन्न झाली की, त्या त्या वेळचे कुंडलीवरून अनुभवात्मक विवेचन केल्यास एक निराळे पुस्तक तयार होईल, या काळांत हजारो रुपये नुकसान, प्रकृतीचा अधःपात, शारीरिक कष्टाची भयंकर जाणीव वगैरे दृष्ट्या अत्यंत चमत्कारिक अनुभव आले. मात्र यांत एक गोष्ट विशेष नमूद करण्यासारखी अशी की, ह्या गृहस्थांच्या अखंड उपासनेत एक दिवसही अंतर न पडता, परमेश्वर चिंतनांत हे गृहस्थ निजधामास गेले. ह्या कुंडलीवरून सत्यनिष्ठा, श्रद्धा, फरारी स्वभाव वगैरे सर्व दृष्टीने सूक्ष्म निरीक्षण केल्यास ग्रहयोगांचे परिणाम पूर्ण अनुभवास आल्याची साक्ष पटते व त्यावरून आरंभी म्हटलेल्या वाक्याची स्मृति होते, व हर्शलच्या परिणामाची खात्री पटते.

कुंडलीक्रमांक ६८

श्रीशके १८२१ ज्येष्ठमासे कृष्णपक्षे १ तिथौ शनिवासरे श्रीसूर्योदयात्गत घ. ५५ प. ९ समये जन्म. जन्मतारीख २४ माहे ६ सन १८९९

जन्मकुंडली.

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारिरीक स्थिती—शरीर कृश, डोळे काळेभोर चांगले, तोंडावर देवीचे व्रण, वर्ण सांवळा, डोके २२ इंच, कपाळ मध्यम, मागील भाग किंचित् मोठा. एकंदरींत शरीर साधारण कृश, देही व्यंग नाहीं. प्रकृति नेहमीं अशक्त पण महत्वाकांक्षा, मध्येंमध्यें अपचनामुळें पोटदुखी, एरवी प्रकृति निरोगी. गंडांतरें, व मोठाले आजार—अदमासें १० व्या वर्षी देवी. १९१३–१४ सालीं मधुरानें बिमारी सरासरी दोन महिनें. १९१७ डिसेंबर रक्तदोष १-१॥ महिना १९२० सालीं इंफ्लुएंझा दोन महिने. आई व वडिलांचें सौख्य—१ वर्षाचा असतांना वडिलांचा मृत्यु. १९१५ सालीं आई व वडीलभाऊ वारले. मातृ व भातृ सुख १९१५ पर्यंत. नंतर पुन्हां १९१९ जूनपर्यंत दुसऱ्या वडील बंधूचें सौख्य. वडिलांची स्थिति—साधारण गरीबी होती. वडिलांचा धंदा—शिल्पकार, मिस्त्री. महिन्याचें उत्पन्न—३०–४५ रुपये. भावंडें—एकंदर ४ त्यांत ह्यात १ फक्त पाठीवर बहीण मींच सर्वांत लहान, आधीं सर्व भाऊ ३, बहीण १ माझ्यापेक्षां वडील भाऊ माझ्या वयाच्या १२ व्या वर्षी अंदाजे, त्याच्यापेक्षां वडीलबंधू सन १९२० एप्रीलमध्यें वारले. त्याच्यापेक्षां वडील व आई एकाचवेळीं एकाच घटकेंत एकाएकी सन १९१५ मार्चला वारली. रोग वगैरे कांहीं नव्हता. वडीलबंधूचे वय मरणकाळीं २७, दुसऱ्याचें २९ तिसऱ्याचें १४ ( सर्वांत वडील बंधु ) ह्यात आहे. विद्या—इंटर, कामर्सपर्यंत शिक्षण. अपयश मॅट्रिकमध्यें १९१८–१९२१ पर्यंत नंतर १९२२ ला मॅट्रिक पास. प्रीव्हीयस १९२३ ला नापास. १९२४ ला पास. इंटर १९२५ नापास. १९२६ ला बसलों. भाग्योदय—भावाच्या वेळेस सुखी, फक्त दोन महिने नोकरी सुटींत १९१९ वर्धा सि. पी. येथें, नंतर अहमदाबादेस ५ महिने नोकरी १९२१ मध्यें, त्या नंतर अजूनपर्यंत दिवस साधारण. १९१९ जून ते १९२२ जूनपर्यंत अत्यंत क्लेश, द्रव्याची टंचाई. शिक्षणास अडथळे. अनपेक्षित रीतीनें परिस्थितीत बदल—मुंबई बी. कॉम. करितां आलों तेव्हांपासून आपल्या आंध्रसमाजांत मन घातलें आहे. समाजकार्य १९२२ वर्षापासून हातीं एक संस्था चिटणीस या नात्यानें चालवित आहे. दुसरींत व तिसरींत प्रामुख्यभाग. आंध्र-सेवक मासिक माझ्या मित्राच्या नांवानें मीच चालवीत आहे. पैसे त्याचें, लेखणी

माझी. नांव त्याचें. सांपत्तिक दृष्टया अत्यंत वाईट काळ—सन १९१९ जून ते १९२१ जुलै-पर्यंत फक्त पांचसहा रुपयांत उदर निर्वाह. शाळेचें शिक्षण फंडाच्या मदतीवर. द्रव्यदृष्टया उत्कृष्ट काळ—१९२२ पासून अजूनपर्यंत काळ बरा आहे. फक्त ह्या वर्षी पैशाची अडचण भासूं लागली. कोणत्याही कार्यांत यश-अपयश कसें काय—आरंभीं व्यत्यय. दीर्घकालानें यश. संकटें—वडील बंधू यांच्या मृत्यूनें, व पुण्यास शिक्षणाकरितां वर्धेहून ( मध्यप्रांत, मूळगांव ) निघून एका गृहस्थाच्या विश्वासावर आलों. पण फसलो, मदत दुसऱ्या जातीच्या गृहस्थाची. सिडनहॅम कॉलेजमध्यें इंटर कामर्सच्या वर्गांत होतों. परिक्षेंत पास. इंग्रजी ७ व्या इयत्तेपर्यंत हुषी व हुशार नंतर दुःखी व मंद बुद्धी. सावत्र आई अगर भावंडें वगैरे—मला चुलत भाऊ दोघे, एक वारला. मोठा अजून आहे. पण तो एका डोळ्यानें आंधळा व लंगडा आहे. चुलतभाऊ कॉंट्रॅक्टर होते. सांपत्तिक स्थिति बरी होती. माझी आई एकटी, भाऊ वगैरे नव्हते, तिला चुलत भाऊ तीन होते. सत्तेचें घर, वाहनें, वगैरे—घरदार वडिलांचें कर्जांत गेलें. सध्यां एक कपर्दिकही नाहीं. शिक्षण फंडाच्यामदतीनें व कांहीं शिकवणीच्या साह्यानें.

कुंडलीक्रमांक ६९

श्रीशके १८२४ श्रावणेमासे शुक्लपक्षे तृतीयांतिथौ बुधवासरे जन्मवेळ रात्री १ वाजून १९ मि. स्टॅन्डर्ड. जन्म ता. ६ माहे आगष्ट सन १९०२ इसवी.

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—सशक्त डोळे बारीक, काळे, चेहरा गोल, दात मोठे वर्ण गौर, कपाळ लहान, एकंदरींत शरीर मध्यम, देही व्यंग नाहीं, प्रकृती नेहमी सशक्त पण महत्वाकांक्षी. गंडांतरें व मोठाले आजार—वयाच्या आठव्या वर्षी विषमज्वर २० दिवस व २२ साव्या वर्षी आगीत भाजणें १५ दिवस पहिल्याचा महीना चैत्र, दुसऱ्याचा महिना कार्तिक. आई व वडिलांचें सौख्य—आई हयात वडिलांचें सौख्य तीन वर्षेपर्यंत ( शके १८२७ साली वडील मयत, प्लेग ) आई व वडिलांस मोठाले आजार—आईस सोळाव्या वर्षी भयंकर ताप, शके १८२२, वडीलास आजार नाहीं. वडीलांची मूळ सांपत्तिक स्थिति—वडीलांची स्थिती साधारण पूर्वार्जित उत्पन्न साधारण सर्व साधारण स्थीति. वडिलांचा धंदा—देवीडॉक्टरचा होता. महिन्याचें उत्पन्न—पन्नास रुपये. धंद्यांत अगर नोकरींत भयंकर काळजीचे व असह्य प्रसंग—वयाच्या बावीसाव्या वर्षी नोकरींत असतां सर्व आंग भाजले. वयाच्या आठराव्या वर्षी एक धंदा केला त्यांत भयंकर नुकसान झालें व त्रास झाला. भावंडें एकंदर—चार, त्यांत हयात एक. पाठीवर बहीण, आधी बहीण. भाऊ

दोन व बहिणी दोघी माझ्या जन्माआधी बहीण जन्मली व वारली शके १८२३. माझ्या पहिल्या वर्षानंतर दुसरी बहीण जन्मली व वारली शके १८२५. विवाह—वयाच्या विसाव्या वर्षी पहिला विवाह व दुसरा विवाह १८४३ साली, स्त्रीची प्रकृती सशक्त, गौरवर्ण आजार व विकार कांहींनाहीं. प्रथम पुत्र एक, मृत, हयात नाहीं, मुडदुसच्या विकारानें वयाच्या तेवीसाव्या वर्षी. विद्या—मराठी ७ इयत्ता ज्योतिष शिकण्याची इच्छा, इंग्रजी दोन इयत्ता, वयाच्या सोळाव्या वर्षी. बहुतेक गोष्टीत अपयश. भाग्योदय—सातारा. स्वपराक्रमानें प्रत्येक कामांत, शत्रू विशेष, मदत कोणाचीही नाहीं. फक्त चुलते मावशी यांचेकडून लहानपणी मदत वयाच्या १८ व्या वर्षी, धंद्यांत नुकसान वयाच्या २०।२१ वे वर्षी नोकरींत नुकसान. स्वतःवर व्यावहारिक जबाबदारी—वयाच्या १६ वर्षापासून दरमहाचें उत्पन्न पन्नास रुपये. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल—परिस्थितींत बदल झाला नाहीं पूर्वीची स्थिती कायम आहे. सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत वाईट काल—वयाच्या १८ व्या वर्षापासून तेवीस वर्षापर्यंत शके १८४२ पासून १८४७ पर्यंत. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल—वयाच्या १ वर्षापासून १५ वर्षापर्यंत म्हणजे शके १८२४ पासून १८३९ पर्यंत. कोणत्याही कार्यांत यश-अपयश—बहुतेक कामांत अपयश एखाद्या कामांत यश. संकटें—स्वतःचा धंदा करताना बाहेरच्या लोकांकडून संकटें आली व साहाय्य मित्रांनीं केले, दिवाणी कोर्टांत वरचेवर जाण्याचा प्रसंग वयाच्या २१ वे वर्षी शके १८४४, धंदा—मुख्य व्यवसाय शेती ,आहे, त्यांत बहुतेक ठिकाणीं नुकसान. मध्यंतरी कांहीं दिवस नोकरी परंतु त्यांत नुकसान. शके १८४३ ते शके १८४०. वारसा—वयाच्या दुसरे वर्षी आईची वारसहक्कानें जमीन आली. सासरची सांपत्तिक स्थिति—सांपत्तिक स्थिती साधारण, लाभ कांहीं नाहीं. चुलत्यांची परिस्थिति, सावत्र आई नाही चुलते २, परिस्थिती साधारण, मामा नाहीं, मावशी एक मयत, आत्या २ मयत. जमीन साधारण. आहे सौख्य साधारण बरे आहे पूर्वार्जित व स्वकष्टार्जित.

कुंडलीक्रमांक ७०

श्रीशके १८०० पौषमासे शुक्लपक्षे एकादश्यांतिथौ शनिवासरे श्रीसूर्योदयात् गत घ. १९ प. २० समये जन्म. जन्मवेळ* दुपारी २-२०. जन्मतारिख ४ माहे सन १८७९.

जन्मकुंडली

शारीरिक स्थिति—ठेंगणा, प्रकृती निरोगी शांत, ज्या स्थितींत असेल त्यांत समाधान, वर्ण गोरा, वेदांत विषयाची आवड, धार्मिक प्रवृत्ती, सर्व शास्त्रांची थोडीबहुत माहिती, थोडीशी वक्तृत्वशक्ती, शत्रु कोणीच निदान बुद्धीपुरःसर शत्रुत्व संपादन केले नाहीं. सर्व ठिकाणीं

चांगला मानसन्मान, ज्योतिष, वैद्यक, वेदांत यांचा विशेष नाद, श्रीगुरुचा अनुग्रह १९३४ साली घेतला, देवगुरु व संताचे ठिकाणीं श्रद्धा, उपासना श्रीरामचंद्राची. गंडांतरें व मोठाले आजार—वयाच्या ५ व्या वर्षी पिशाचबाधा २ वर्षे त्रास झाला, त्यानंतर कांहीं नाहीं, आगपेण २ ऱ्या वर्षी झाली त्याच्या खुणा अंगावर आहेत, मोठा आजार कधींच नाहीं, फक्त मातोश्रीचे मरणानंतर मलेरियाने २।३ महिने आजारी व त्यानंतर पुन: द्वितीय कुटुंब वारल्यानंतर एक महिना, १८९७ साली व १९१५ सं. १९२२ साली रक्तदोषानें आजारी. आई व वडिलांचे सौख्य—आई ता. ८।८।२८ श्रावण शु. ४ रोजीं वारली, वडील सन १८८९ सालीं आषाढ ८ रोजीं वारले. आई व वाडिलांस मोठाले आजार—आईला मृत्यूचे अगोदर ४।५ महिने पंडुरोगानें मृत्यु, त्याचे अगोदर आजार नाहीं. वडील काशी येथें कॉलऱ्याचे विकारानें वारले, त्याचे अगोदर आजार नाहीं. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—वडिलांची सांपत्तिक स्थिति चांगली नव्हती, वयाच्या सोळा सतरापासून घर सोडले ते पुन: दार पाहिले नाहीं. त्यांची वृत्ती उदासीन व वैराग्यसंपन्न. २।३ वेळ जंगलांत जाऊन साधु होऊन राहिले, मातोश्रीनें पुत्रप्राप्तीकरितां अत्यंत ईश्वराराधना केली. सत्पुषाचे प्रासादानें पुत्रप्राप्ती. वडिलांचा धंदा—जवळ जवळ कांहीं नाहीं. महिन्याचे उत्पन्न—नाहीं, कधीं कधीं नोकरी केल्यास बारा रु. दरमहा. भावंडें एकंदर—२ त्यांत हयात नाहीं, पाठीवर तीन, आधीं नाहीं, जास्त व त्यांची संख्या २, एक भाऊ जन्मानंतर दहाबारा दिवसांत मेला, एक भाऊ मार्च १९०५ मध्यें क्षयानें वारला, बहीण १९२२ चे मार्गशीर्ष किंवा पौष पंडुरोगानें ( अनीमिया ) वारली. विवाह—विवाह ३ झाले, पहिला १८९९ चे फाल्गुनांत, दुसरा ता. १९१० फाल्गुनांत व तिसरा १९२१ जून महिन्यांत झाला. स्त्रीची प्रकृति—पहिले कुटुंब जिवंत आहे, शरीरप्रकृती साधारण बरी, अनुवंशीक रोग असल्याची खात्री झाल्यानंतर दुसरा विवाह, द्वितीय कुटुंब १९२० सालीं आश्विन वा॥ ४ ला क्षयाचे विकारानें वारले, तृतीय कुटुंब हयात आहे व तिचेबरोबर संसार आहे, पहिले स्त्रीशी पटत नसल्यामुळें व रोग भयानें आटंग ठेवले आहे. तृतीय विवाह १४ जून १९२१ रोजीं, तृतीय कुटुंब गौरवर्ण व सुस्वभावी, तिच्या सहवासांत काळ फार सुखानें गेला, तृतीय कुटुंब ठेंगणें, वर्ण सावळा, स्वभाव भोळा. प्रथम कुटुंब स्वभाव तापट, रागीट, द्वेषी. संतति—प्रथम स्त्रीचा पहिला मुलगा ८।९ महिन्यांनीं वारला व तीन मुली त्यापैकीं एक हयात, तृतीय कुटुंबास फक्त एकच कन्या, माझी मातोश्री वारली त्याच दिवशीं सदा तासानंतर जन्मली व ती हयात आहे, तृतीय कुटुंबास पहिला मुलगा भाद्रपद शु. १४ शके १८४५ रोजीं झाला, हयात आहे. स्वतःस, स्त्रीस अगर मातापित्यांस कायमचा विकार—प्रथम स्त्रीचे वडिलांस रक्तपितीचा आजार, इतर स्त्रिया निरोगी,. स्वत:ची प्रकृती निकोप असून कायमचा विकार कांहीं नाहीं. विद्या—म्याट्रिकपर्यंत. व एक वर्ष कॉलेजांत. द्रव्याभावी सोडणें भाग पडले. पुढें २५ रुपयावर शिक्षण खात्यांत नोकरी, डिसेंबर १-१९०४ पर्यंत. १९०४ साली डिस्ट्रिक्ट कोर्ट प्लीडरची परिक्षा पास होऊन आजपर्यंत वकीलीचा धंदा सुरू आहे. भाग्योदय—बन्हाड × × × जिल्हा, नोकरी मास्तर १ डिसेंबर १८९७ पासुन १ डिसेंबर १९०४ पर्यंत. वकीली धरून आजच्यापासून ४०० ते ५०० पर्यंत

सरासरीनें मासिक उत्पन्न सन १९१८।१९१९ व १९२० सांपत्तिक दृष्टीनें व कौटुंबिक दृष्टीनें वाईट. स्वतःवर व्यावहारिक जबाबदारी—१ डिसेंबर १८९७ पासून आज ४०० ते ५०० पर्यंत मासिक उत्पन्न, खर्च जास्त, फक्त स्थावर इस्टेट एक घर व २ एकर जमीन, शिल्लक कांहीं नाहीं, ३ ते ४ हजार कर्ज, परंतु लोकसमज पैसा राखून आहे असा आहे. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल—१।१२।१९०४ रोजीं वकीलीचा धंदा सुरू केला. सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत वाईट काल—१९१८-१९१९ व १९२० साल. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ठ काल—१९०५ सप्टेंबरपासून × × × हून × × × येथें आलों तेव्हांपासून धंदा चांगला. कोणत्याही कार्यांत यश-अपयश—कार्यारंभ फार नाहीं, परंतु यश येते, रेसीसचा व कापसाचे सट्याचा नाद, ज्योतिषशास्त्राचे दृष्टीनें विचार सुरू आहे परंतु आजपर्यंत १९१८ पासून ३००-४०० नुकसान, फायदा नाहीं. देवळें बांधावी, यात्रा करावी व शक्य असेल ती राजकीय किंवा सामाजिक बाबींत लोकसेवा करावी अशी उत्कट इच्छा परंतु होत नाहीं. संकटें—संकटे कोणाकडून आली नाहींत, दिवाणींत शेतें खेरदीचा करार मोडल्यामुळें नुकसानीची फिर्याद होऊन प्रतिवादी होण्याचा प्रसंग आला. व्यवसाय—याबद्दल वर लिहिलें आहे. वकीलीशिवाय दुसरा धंदा केला नाहीं. करावा अशी इच्छा फार परंतु द्रव्य नाहीं म्हणून नाइलाज, चालू धंद्याचा कंटाळा, मनोवृत्तीशी जुळत नाहीं म्हणून एकदम द्रव्य मिळून धंदा सोडावा अशी उत्कट इच्छा. स्वदेशी बाजारांत १९१८ सालीं पंधरा दिवस धंदा केला, फायदा नाहीं व नुकसान नाहीं, म्हणून रेसीस व सट्याचा नाद, परंतु संधी नाहीं, व द्रव्य नाहीं म्हणून नाईलाज. सासरची सांपत्तिक स्थिति—तिन्ही कुटुंबाचे सासरची गरीबी. चुलत्यांची परिस्थिति—मामा एक, मावशी एक, आत्या व चुलत्याची संख्या दोन, मामा मृत, मावशी मृत, चुलते दोन हयात व एक मृत, परंतु माझे व त्यांचे दर्शन नाहीं व कोणीही विचारपूस करीत नाहीं. सत्तेचें, घर, वाहनें, नोकर-चाकर, जमीनजुमला—सत्तेचे घर उत्तराभिमुख आहे. १९०८ चे वैशाख शु. ७ ला वास्तु-घरीं रेंगीं बैल आहे, नोकर, चाकर आहेत, जमीन पंधरा एकर आहे, नोकरचाकरापासून सुख, स्वकष्टार्जित इस्टेट आहे ती १९०५ पासून.

### कुंडलीक्रमांक ७१

श्रीशके १८१८ भाद्रपदमासे कृष्णपक्षे तृतीया तिथौ भृगुवासरे श्रीसूर्योदयातगत घ. ३६ प. २० समये जन्म. ता. २५।९।९६.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति---कृश चेहरा लांबट, दांत मोठाले, तोंडावर देवीचे व्रण, वर्ण साधारण कपाळ अरुंद, देही व्यंग नाही प्रकृती अशक्त गंडांतरें व मोठाले आजार—सन १९२१चे जानेवारी-अखेर नागपूर मुक्कामीं न्युमोनियाने भयंकर आजारी १५ दिवस. आई व वडिलांचें सौख्य—आई फाल्गुन शु.१५ संवत १९६०मधे वारली क्षयरोगानें. वडील हयात आहेत पण सुख कमी.वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—साधारण अर्धा गांव १०००रु. सालीना प्राप्तीचा होता त्यानंतर चुलत्याचा अर्धा गांव मिळाला. काकू हयात आहे व इतर जमीनजुमला व गांवही मिळविला पण कर्ज अतोनात आहे. वडिलांचा धंदा---मालगुजरी व शेती. उत्पन्न सालीना२००० आहे पण कर्ज फार ७५६. रु. आज वागाईत आहे पण२००००कर्ज आहे त्यामुळें वडिलांची स्थिती खराब. धंद्यांत भयंकर काळजीचे व असह्य प्रसंग---स्वतः सध्या स्थिती फार खराब आहे. काळजींत दिवस जातात. भावंडें एकंदर २ त्यांत हयात १ पाठीवर बहीण, आधीं स्वतः, जास्त बहिणी. पहिला मुलगा मीच आहे. पाठीवर बहीण झाली. ती हयात आहे नंतर एक बहीणच झाली, ती व आई वारली, सावत्र आई आहे. सावत्र बहिणी ६ आहेत, भाऊ नाही एक सावत्र बहीण वारली. विवाह---१ मार्च सन १९१३ रोजीं. स्त्रीची प्रकृति---गौरवर्ण, सासरची स्थिती साधारण, सासरा लग्न होण्यापूर्वीच वारल्यामुळें हलाखीची. सासरा क्लार्क होता. कांहीं जमीनजुमला आहे. ४-६ हजार नगदी सासरा ठेऊन गेला आहे. ३ भाऊ आहेत. स्त्री बाळंत रोगानें आजारी असते. संतति-प्रथम१९१६ मध्यें पुत्र झाला हयात आहे. नंतर कन्या झाली ती मृत. नंतर २ कन्या हयात आहेत. नंतर सन १९२४ मध्यें पुत्र झाला तो मृत. एकंदरीत कन्या जास्त. हयात १ पुत्र २ कन्या. स्वतःस, स्त्रीला अगर मातापित्यास कायमचा विकार---स्वतःला कफविकार, स्त्रीला बाळंतरोग व कफविकार, आईला कफविकार. विद्या—मॅट्रिक नापास. सन १९११ पासून परिक्षेंत सारखें यश व सन १९१७ पासून अगदी अपयश. पुष्कळ विद्या जसें ड्रॉइंग, सायन्स, ज्योतिष, वगैरे माहिती आहे पण पूर्ण विद्या कोणतीही नाहीं, सन १९१८ पासून शिकणें सोडून शेतीचें काम पाहतो त्यांत यश नाहीं. व वडिलांचे कर्जामुळें त्रास. सांपत्तिकदृष्ट्या अत्यंत वाईट काळ—सन १९२५ तें २८ कोणत्याही कार्यांत यश-अपयश कोणत्याही कार्यांत लोकांवर छाप बसते. पण यश-अपयशाचे प्रसंग अजून नाहीं. सन १९१३ मधें शाळेंत उत्तम मान राहिला नंतर कमी कमी होत गेला. संकटें—स्वतः वर दिवाणी अगर फौजदारी मुकदमा पडला नाहीं पण एकदां एका नोकरास सोडविण्याकरितां साक्ष दिली त्यांत चांगलेंच यश आलें, सर्वांत कीर्ती झाली. व्यवसाय—सन१९२३ मधे वडिलांची शेती व गांव आहे तेंच काम पाहतो. १९१८ कांही घरे राहिले नंतर स्वतंत्र. मोठ्या मुलाची बौद्धिक व सांपत्तिक स्थिति व विद्या—मोठ्या मुलाचें वय २८ वर्षांचे आहे, बुद्धि साधारण बरी आहे. सासरची सांपत्तिक स्थिति—साधारण. सावत्र आई अगर भावंडें व त्यांची स्थिति, सावत्र आई आहे, २ मामा, १ मावशी पण यांचे सुख विशेष नाहीं, आजी नाहीं, व चुलती नाही, एक वडिलांची चुलती म्हणजे माझी आजी आहे तिचें सुख विशेष आहे, व तिचेमुळें आईची उणीव भासत नाहीं, आजीन सध्या सर्वांत जास्त सुख दिलेच आहे. मालकीचे घर, वाहनें, नोकर-चाकर, जमीनजुमला यांचे सौख्य—पूर्वार्जित व जन्मापासून यांचे सुख साधारण आहे.

### कुंडलीक्रमांक ७२

श्रीशके १७७२ चैत्रेमासे कृष्णपक्षे ४ तिथौ भानुवासरे श्रीसूर्योदयात्‌गत घ. ७ प. १५ समये जन्म. जन्मतारीख ३१ माहे मार्च सन १८५०

जन्मकुंडली

४ रा
३ मं
२
१
१२ बु शु शु
गु ५
११
६
८
१० के
७ च
९

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति—मध्यम, उंची ५॥ फूट, निमगोरा, निरोगी, तोंड वाटोळे. गंडांतरें, व मोठाले आजार—३ वर्षाचा असतांना हात भाजला होता, पंधरावे वर्षी पाण्यांत बुडत होतो. आई व वडिलांचें सौख्य—मातोश्री व वडिलांचें सुख उत्तम. वडील २५ वे वर्षी वारले. मातोश्री ५४ वे वर्षी वारली. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—सांपत्तिक स्थिति मध्यम, स्वतःचें घर व जमीन आहे. वडिलांचा धंदा—लाकडाचा व्यापार. महिन्याचें उत्पन्न—१००रु. भावंडें—दोन भाऊ चार बहिणी, हल्लीं हयात मी व एक बहिण. आधी व पाठीवर बहिण. विवाह केव्हां झाला व किती झाले व कोणत्या वर्षी झाले—प्रथम लग्न ९ वे वर्षी, दुसरे लग्न २१ वे वर्षी, तिसरे लग्न ३३ वे वर्षी. स्त्रीचे स्वरूप, मोठाले आजार—स्वरूप बरें आहे, विसावे वर्षी पाण्यांत अपघात झाला होता. संतति प्रथम पुत्र कीं कन्या ? हयात व मृत किती कोणत्या विकारानें व कोणत्या वर्षी ? जास्त पुत्र कीं कन्या ? एकंदर संख्या-८ प्रथम पांच पुत्र, मागून ३ कन्या. एक मुलगा व दोन मुली प्लेगनें मयत आणि एक मुलगा क्षयानें मयत, आतां ३ मुलगे आणि एक मुलगी हयात आहेत. विद्या कोठपर्यंत व यश अपयश केव्हां ? विद्या पूर्ण कधीं झाली—साहावी यत्ता पास मुलकी, हिशेबी व माजिस्ट्रेटी परीक्षा पास, विद्या पूर्ण २८ वे वर्षी जाहली. भाग्योदय कोणत्या प्रांतांत व जिल्ह्यांत ? धंद्याला अगर नोकरीला सुरुवात केव्हां—भाग्योदय सांगली संस्थानांत, नोकरीस सुरुवात २० वे वर्षी पुढें उत्तरोत्तर बढती होत गेली, २८ वे वर्षी कलेक्टरचा शिरस्तेदार जाहलों, ४७।४८वे वर्षी मामलेदार व माजिस्ट्रेट वर्ग १ जाहलो, ५८ वे वर्षी पेनशन घेतले ते मामलेदारांचे जागेवर घेतले. स्वतःवर व्यावहारिक जबाबदारी केव्हां पडली ? आज महिना उत्पन्न किती—पंचवीस वर्षापासून, आज महिना उत्पन्न अजमासे १०० रुपयांचे आहे. कोणत्याही कार्यांत यश—बहुतेक यश येत गेले. सरकार अगर लोकांकडून मान—वयवर्षे वीस, अठ्ठावीस, अठेचाळीस. नोकरी करीत असल्यास खातें—प्रथम शाळाखात्यांत मास्तर ८ वर्षे नंतर मुलकी खात्यांत नोकरी ३० वर्षे. मुलांची विद्या—विद्या मॅट्रिकपर्यंत नोकरी ३० रुपयाची आहे. त्याचे मागूनचे दोन मुलगे बी. ए. एल् एल् बी. जाहले आहेत, दोघेही वकील

आहेत. सासरची सांपत्तिक स्थिति व त्याजकडून लाभ—कांहीं नाहीं. सावत्र आई अगर भावंडें व त्यांची स्थिति, चुलत्याची परिस्थिति, मामा, मावशा, आत्या व चुलत्यांची संख्या—सावत्र आई होती व तिला एक मुलगा व एक मुलगी होती ती मयत आहेत, चुलत्याची परिस्थिती मध्यम चुलत चुलते, सख्खा चुलता नाहीं, मामा ३, मावशी एक, आत्या एक. सत्तेचे घर, नोकर-चाकर, यांचें सौख्याबाबत—स्वकष्टार्जित सत्तेचें घर आहे, जमीन आहे, नोकर-चाकर जुजबी आहेत, सौख्य आहे.

### कुंडलीक्रमांक ७३

श्रीशके १८०९ अश्विनेमासे कृष्णपक्षे ७ तिथौ भानुवासरे जन्मवेळ मुंबई टाईम. ८ वा. ३० मि. रात्रौ जन्मतारीख ९ माहे आक्टोबर सन १८८७.

जन्मकुंडली

### आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति, रंग, शरीरावरील खुणा, चिन्हें अगर व्यंग—साधारण कृश, डोळे काळे, दांत विरळ, चेहरा वाटोळा, वर्ण काळासांवळा, कपाळ मोठें, शरीर उघाड सरळ, अव्यंग, महत्वाकांक्षी पण अशक्त, उजव्या दंडावर, कपाळावर, डोक्यांत, पोटावर स्पष्ट काळे तीळ. गंडांतरें, व मोठाले आजार—लहानपणीं गोंवर, कांजिण्या व ज्वर दोन तीन वेळ. वयवर्ष १९।२० चे सुमारास विषमज्वर झाला होता. वयवर्ष ३२ पासून मूळव्याध व अपचन, क्वचित् पोटदुखीनें प्रकृती असावी तितकी उत्तम नाहीं. आई व वडिलांचें सौख्य—सौ. मातोश्रीचा मृत्यु सन १९१०; मे महिना कै तीर्थरूपांचा मृत्युकाल सन १९१४ जानेवारी ता २३. आई व वडिलांस मोठाले आजार—मातोश्री शेवटच्या चौदावर्षें क्षयानें आजारी. वडिलांस आम्लपित्त व मस्तक व पोटशूळाची व्यथा केव्हां केव्हां होत असे. वडिलांचा धंदा—शेतकी, थोडा व्यापार. महिन्याचें उत्पन्न—सुमारें एकदर २५ रु पडत असावें जास्त केव्हांच नाहीं. नोकरींत भयकर काळजीचे व असह्य प्रसंग—सन १९१७ त पूर्वीची नोकरी सोडल्यामुळें ऑगष्ट महिन्यापासून २।३ महिने अती त्रास झाला. नोकऱ्या सोडण्याची सवय असल्यामुळें नेहमींच स्थिती अस्थीर पण अद्याप-पर्यंत नुकसानकारक परिणाम झालेला नाहीं. केव्हां केव्हां फायदाच झाला भावंडें एकदर—२ त्यांत ह्यात एक, पाठीवर बहीण आधीं कोणी नाहीं. विवाह—दोन झाले. प्रथम लहानपणींच झालेला आहे तो बहुधा माझ्या वयाच्या चवदा पधराव्या वर्षी असावा. महिना फाल्गुन. द्वितीय विवाह ता. ३०-५-१९१५ रविवारीं झाला. द्वितीय स्त्रीची प्रकृति, स्वरूप, मोठाले आजार

व विकार—मध्यम, उष्णता श्वास विकार, स्वरूप काळीसांवळी वर्ण मध्यम प्रतीचें. संतति—प्रथम पुत्र, प्रथम संबधापासून एक पुत्र व दोन कन्या तीनही मयत. तापाचे विकारानें मृत्यु झाला. सन १९१४।१५. द्वितीय संबधापासून चार पुत्र सर्व हयात. त्यांच्या कुंडल्यांतील योग ठीक आहेत. एकंदर सातपैकीं ४ पुत्र हयात. स्वतःस, स्त्रीला अगर मातापित्यांस कायमचा विकार—स्वतःला उष्णवात, द्वितीय स्त्रीस पिनस व थोडाश्वास. मातोश्रींस क्षय व वडिलांस आम्लपित्त. विद्या—इंग्रजी सातवेपर्यंत, यशापयशाची परिक्षा झाली नाहीं. इ. सन १९०५ मध्यें शाळा सोडली. भाग्योदय—मुंबई शहरांत सन १९०६ मध्यें नोकरीस सुरवात ती आज तागायत पर्यंत. सन १९२०।१९२१ चा काळ भरभराटींत होता. बाकी सामान्य नफ्यापेक्षा एकंदरींत नुकसानीचीच कमान वर. स्वत वर व्यावहारिक जबाबदारी—सन १९१० पासून माझा प्रपंच मला पहावा लागला तो आज तागायतपर्यंत. वडिलांच्या वेळची अशी एक कवडीही राहिली नव्हती. या महिन्याचें अखेरपर्यंत म्हणजे जानेवारी १९२६ पर्यंत पगाराचें उत्पन्न दरमहा १५० नोकरी सोडल्यामुळें फेब्रुवारीपासून तरतूद कांहींच नाहीं. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल—सन १९२० मध्यें अनपेक्षित रीतीनें एका मोठ्या कंपनीचे हेडक्लार्कची जागा मिळाली, ती डिसेंबर १९२१ अखेरपर्यंत टिकली या वेळचें उत्पन्न दरमहा सुमारें तीनशें रुपये. कंपनी लिक्विडेशनमध्यें जाऊन नोकरी सुटली. सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत वाईट काल—सन १९१० पासून १९१६ पर्यंतचा. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल—१९२०–१९२१ सन १९२१ सबंध वर्ष उत्तम गेलें. कोणत्याही कार्यांत यश-अपयश—लौकिक बरा पण पदराला खार. संकटें कोणाकडून आलीं? व साह्य कोणीं केलें—स्वतःच्या अभिमानामुळें संकटें, साह्य देव किंवा दैव यांचेंच. नोकरी—सामान्यतः सरकारी व खाजगी बहुतेक खात्यात थोडी थोडी नोकरी झाली. हल्लींचें खातें व्यापारीकंपनी. सावत्र चुलत्यांची स्थिती सामान्य—एकंदर सावत्र चुलते पांच पैकीं हयात एक, मामा एक हयात, आत्या एक व मावशी एक, हयात नाहींत. सावत्र आत्या होती तीही वारली. सत्तेचें घर, वाहनें, वगैरे १९१० पूर्वी शेतवाडी घर वगैरे थोडे होतें, आतां कांहींच नाहीं.

### कुंडलीक्रमांक ७८

शके १८१४ चैत्रेमासे शुक्लपक्षे १३ तिथौ रवीवार श्रीसूर्योदयात्गत घ. ४ प. २० समये जन्म, जन्मतारीख १० मार्च ४ सन १८९२

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति, धष्टपुष्ट—डोळे काळे, चेहरा गोल, दांत साधारण कांहीं तोंडावर कांहीं व्रण, गौर वर्ण, कपाळ साधारण, शरीर मध्यम, देशींचे व्रण नाहींत. सशक्त, उजव्या छातीवर तीळ व उजव्या तळ हातावरील मधल्या बोटावर तीळ व डाव्या पायाच्या आंगठ्यावर तीळ उजव्या जांवेवर प्लेगाचे गांठीचे व्रण. गंडांतरें, व मोठाले आजार—लहानपणी ६ वर्षपर्यंत पुष्कळ गंडांतरे १९०१ कार्तिक महीन्यांत प्लेगाने मरता मरता वाचणें. आई व वडिलांचें सौख्य—वडिलांचा मृत्यु शके १८३७ आश्विन शु. १५ रोज शुक्रवारी ९ वाजतां सकाळीं प्लेगने, आई जिवंत आहे. वडीलांची मूळ सांपत्तिक स्थिति—वडीलांची पूर्वीची स्थिती चांगली पण वयाचे ३५ वर्षापासून वाईट फेरफार आणखी द्वेषद्रोह व साधारण स्थिती मृत्यु वेळपर्यंत. अर्जिनवीस हस्ताक्षर पहिल्या प्रतीचे. वडिलांचा धंदा दुकानदारी, प्रसिद्ध वैद्य महिन्याचें उत्पन्न १००,रु. धंदांत अगर नोकरींत भयंकर काळजीचे प्रसंग. वयाचे ५० पासून ६४ पर्यंत व ४५ वर्षी मुकदमाबाजी अखेरीस पूर्वार्जित इस्टेटींतून स्थलांतर घरदार सोडून वारासीवनीला येऊन मृत्यु होणे. भावंडें एकंदर ६ त्यांत ह्यात २, पाठीवर २, आधीं २, ४ बहिणी, २ बहिणी जन्माच्या पूर्वी व जन्माच्या नंतर ३–६ बहिणी मृत. २ बहीणी जिवंत. विवाह—प्रथम विवाह सन १९१८ फेब्रुवारी तारीख १८ रोज मंगळवारीं रात्री १२–२० मिनटांनीं झाला. स्त्रीची प्रकृति—जीर्णज्वरानें ग्रस्त, गौर वर्ण, गोल तोंड, मस्तक ऊंच, बांधा ठेंगणा १९१८त इन्फ्लुएंझांत वाचणें, व ता. १४–४–१९२२ इ. स. अष्टमासी गर्भासह प्लेगने मृत्यु. संतति—प्रथम संतति पुत्र शके १८४१ भाद्रपद वद्य १ सह २ रा जन्म, व २ पैकीं १ तीन मासी व २ रा अष्टमासी गर्भांत मृत्यु. विद्या—विद्या इंग्लिश ५ वी पास व यांशिवाय मराठी गुजराथी, हिंदी, बंगाली भाषा जाणणें व लिहिणें. इ. स. ४–११–९. भाग्योदय—भाग्योदय धंदामध्यें १९२० पासून सुरू होऊन अद्यापि चांगले आहे. स्वतःवर व्यावहारिक जबाबदारी—स्वतःवर जबाबदारी शके १८४१ मध्ये कार्तिक शु. १ पासून १९२० इ. पासून जबाबदारी चालू आहे व आज ३५० रुपये महिना त्या धंदाचे उत्पन्न आहे. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल—इ. स. १९१९ मध्यें विवाह कार्य अकस्मात होणें. सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत वाईट काल—लहानपणापासून वयाचे २५ वर्षापर्यंत १९१५ पर्यंत. द्रव्यादृष्ट्या उत्कृष्ट काल—मध्यम काळ वयाचे २५ पासून अद्यापपर्यंत साधारण व इ. स. १९२१ साली नवीन घरास जागा विकत घेणें. कोणत्याही कार्यांत यश—अपयश—सर्व कार्यांत साधारण यश. पण द्वितीय विवाह कार्यास फार विघ्न व अपयश येऊन कार्य होत नाहीं. सरकार अगर लोकांकडून मान—इ. स. १९१७त फेब्रुवारी महिन्यांत ओरछा स्टेटमध्यें लोकांकडून मान मिळाला होता. संकटें कोणाकडून—द्रव्यादृष्ट्या संकट हिरालाल, गंगाराम, गणेश यांजकडून दिवाणी मुकदम्यांत १५ वर्षपर्यंत येणें व वडीलांचे मृत्यूपर्यंत येणें व अखेरीस घरदार सोडून वारासीवनी येथे येणें झाले. नोकरी—साधारण चांगली. मोठ्या मुलाची बौद्धिक स्थिति—वडील मुलाची बौद्धिक शक्ति व स्मरण शक्ति फारच तेज आहे. सासरची सांपत्तिक स्थिति—चांगली आहे, रुजगार धान्याचे दुकान चांगले चालते व ५०००० हजाराची इस्टेट आहे साधारण छाम.

भावंडें व त्यांची स्थिति—वहीणीची स्थिती–१ वहीणीची स्थिती ३,००,००० तीन लाखाची इस्टेट आहे व किराणा, लोखंडी, कापडा, अन्नाज, सोने, चांदीचे दुकान आहे. व दुसऱ्या वहीणीची स्थिती तीन गांवची पाटील ( मालगुजर ) आहे, व बाकीच्या नातेवाईकांची स्थिती साधारण आहे. सत्तेचें घर, वाहनें—सत्तेची नवीन जागा विकत घेऊन घर बांधण्याचे काम सुरू केलें व तें पूर्ण झालें आहे.

कुंडली क्रमांक ७५

श्रीशके १८२२ चैत्रेमासे शुद्धपक्षे प्रतिपद्यांतिथौ मंदवासरे श्रीसूर्योदयात्गत घ. १० प. १३ समये जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति—शारीरिक स्थिति मध्यम, गाण्यावाजवण्याची व चैनीची आवड, उजव्या बाजूस डोक्यावर खूण दगड लागल्याची व पायावर गाडीचे चाकाचा वण. गंडांतरें, व मोठाले आजार—१९१३ मध्यें चार दिवसाचा मुदतीचा ताप, १९२५ दोन्ही जांघेंत गोळे येऊन २ महिने आजारी. आई व वडिलांचें सौख्य—वडील वयाच्या दुसऱ्या वर्षी वारले, आई ह्यात आहे. आई व वडिलांस मोठाले आजार—आईस १९२४–२५ मध्यें दम्याची बीमारी झाली होती. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—प्रथम साधारण व पुढें वडिलांचे शिक्षण झाल्यावर सुखकर स्थिति होती. वडिलांचा धंदा—नोकरी. भावंडें—एकंदर चार, त्यांत ह्यात दोन पाठीवर कोणी नाहीं. आधीं ३, आम्ही चौघे भाऊ पैकीं दोन ह्यात, माझ्यापेक्षां वडील एक ह्यात व दोन मृत्यु पावले. विवाह—प्रथम विवाह वयाचे १९२० एप्रिलमध्यें झाला. स्त्रीची प्रकृति—प्रकृती कृश, स्वरूप साधारण, ३ वर्षापूर्वी गर्भस्राव झाला. संतति—प्रथम संतती अर्धवट दुसरी मुलगी. स्त्रीला कायमचा विकार—कोणताही नाहीं, फक्त स्त्रीस कफ विकार. विद्या—इंग्रजी चवथीपर्यंत, विद्या पूर्ण १९१७ मध्यें झाली. भाग्योदय—भाग्योदय अजून म्हणावा असा नाहीं, फक्त १९१९ पासून दिवस बरे, नौकरीस सुरवात १९१८ पासून. स्वतःवर व्यावहारीक जबाबदारी—आज महिना उत्पन्न १०५ रु. वयाच्या २२ व्या पासून. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल—बदल झाला तो फक्त काकांची इस्टेट मिळाली पण त्यांतच कर्जबाजारी झालों. कन्यारसा, बक्षीस—१९१९ मध्यें काकाची इस्टेट मिळाली. सासरची सांपत्तिक स्थिति—साधारण झाला, स्थिति उत्तम. सत्तेचें घर—पूर्वार्जित घरदार आहे, कुळकर्णीपणाचे वतन आहे.

कुंडलीक्रमांक ७६

श्रीशके १७९९ आश्विनेमासे शुक्लपक्षे एकादश्यांतिथौ बुधवासरे श्रीसूर्योदयात्गत घ. ३६ प. ० जन्म तारीख १७ माहे १० आक्टोबर.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—स्थूल देह, वर्ण निमगोरा, डोळे मोठाले काळेभोर, डाव्या डोळ्यानजीक तीळ, इंद्रियावर २ तीळ, ६ फूट उंच, दांत मोठाले, छाती विशाल, देहास व्यंग नाहीं, सशक्त प्रकृती, गर्विष्ठ स्वभाव. गंडांतरें व मोठाले आजार—वयाच्या १७ व्या वर्षी संग्रहणी विकार ४ महिने, ३२ व्या वर्षी रेल्वेखालीं गंडांतर, ३७ वे वर्षी एन्फ्लुएंझा. आई व वडिलांचे सौख्य—सुख बिलकूल नाहीं, सातव्या वर्षापासून मामाचे घरीं, पुढें नोकरी, वयाचे ३८ वे वर्षी पगार ४०. आई व वडिलांस मोठाले आजार—वडिलांस वयाचे ६५ वे वर्षी आईस ५८ वे वर्षी इन्फ्लुएंझा. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—मध्यम, १००० रु. जमीन उत्पन्न साळीना. वडिलांचा धंदा—शाळी. धंद्यांत अगर नोकरींत भयंकर काळजीचे व असह्य प्रसंग—१९१२ नोकरींत अफरातफर, रिडकशन्, दिल्ली डिस्ट्रिक्टला बदली. भावंडें एकंदर—दहा, त्यांत हयात ५, पाठीवर बहीण, आधीं भाऊ, भाऊ ८ बहिणी २, माझ्यापेक्षां एक वडील भाऊ हयात, माझ्या पाठीवर एक बहीण मयत, नंतर एक भाऊ मयत, नंतर एक हयात, त्यानंतर एक बहीण हयात त्यावर एक भाऊ, वर्त ४ भाऊ, एक बहीण हयात आहे. विवाह—वयाचे १७ वे वर्षी विवाह झाला. स्त्रीची प्रकृति—स्त्रीची प्रकृति अशक्त, स्वरूप मध्यम, कुरळे केस, किंचित तिरका डोळा, माझे वयाचे ४० वे वर्षी मयत झाली, १९१८ इन्फ्लुएंझा व संग्रहणी. संतति—संतति नाहीं. स्वतःस व स्त्रीस कायमचा विकार—पत्नीस स्त्रियांचा विकार, स्वतःची प्रकृति उत्तम. विद्या—संस्कृत २ वर्षे, नंतर कानडी ६ इयत्ता, त्यानंतर इंग्रजी ६ इयत्ता. भाग्योदय—१९०१ नोकरी, १९०४ पासून १९११ अत्यंत अनुकूल काल, या वेळीं स्नेही व आप्तेष्टांस प्रिय होतो, १९१२ सस्पेंड, १९१३-१४-१५ तीन साल कामास हजर राहिलो, १५ रु. पगारापासून ७५ रु. स्टेशनमास्तर जी. आय. पी. मुंबई, सोलापूर, मन्माड, इटारसी, उज्जयनि, मथुरा, दिल्ली, जबलपूर. स्वतःघर व्यावहारिक जबाबदारी—आतां वार्षीक जमीन उत्पन्न साळीना ३०० रु. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल—१९१५ साली भांडण दुर्व्यसन, १९१४ जून नोकरीवरून परत घरीं, तंटा होऊन सर्वांस अप्रिय, १९१७ वडील मयत, १९१८ माता

व भार्या याचे मृत्यु, एकव्या भावापासून अलिप्त, धार्मिक ग्रंथ वाचणें, खाऊनपिऊन सुखी, थोडाबहुत व्याजबट्याचा व्यवहार, वैद्यकी थोडी. सांपत्तिकदृष्ट्या अत्यंत वाईट काल—१९०४ पासून १९१२ पर्यंत सांपत्तिक स्थिति उत्तम, १९१३-१४-१५ हानि नुकसान. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल—१९०४ ते १९१२. सरकार अगर लोकांकडून मान—१९०६ पासून अ. स्टे. पासून, व्यापारी लोकात मान. चुलत्याची व मामांची परिस्थिति—मामा दोन मयत, चुलते ३ मयत. सत्तेचें घर, वाहनें, जमीनजुमला यांचें सौख्य—घर, घोडा, जमीन ५० एकर, ३०० रु. लावणी स्वकष्टार्जित खर्च, वरील सर्व पित्रार्जित.

कुंडलीक्रमांक ७७

श्रीशके १८०५ श्रावणेमासे वद्यपक्षे १० तिथौ.

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शरीरवर्णन—किंचित् स्थूल, काळसर म्हटले असतां चालेल. व्यंग—डाव्या हातात न दिसण्याजोगें. आई—हयात. वडील मृत—शके १८३९ साली वडील अर्धांगाने व डायबेटीसनें बरेच दिवस आजारी होते. पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—उत्तम. सध्यांची सांपत्तिक स्थिति—चांगली. भावंडें—बंधू ५ पैकीं एक दत्तक, बहिणी तीन पैकीं १ घरीं आलेली, एक मृत, व १ सासरी सुखानें आहे. विवाह—माघवद्य ८ शके १८२१. संतती—मुली ४ व मुलगा १ ही सर्व हयात आहेत, व चार मुलें मृत लहानपणींच. विद्या—इंग्रजी पांच यत्तेपर्यंत. धंदा—सराफी दुकान. आप्तवर्ग—मामा २ पैकीं हयात १, व मृत १ मावशी १ चुलता वगैरे कोणी नाहीं. इतर गोष्टी—हल्लीं मानसिक चिंता फार.

कुंडलीक्रमांक ७८

श्रीशके १८१४ मार्गशीर्षमासे शुक्लपक्षे पष्ठ्यांतिथौ भृगुवासरे श्रीसूर्योदयातगत घ. ३० प. २० समये जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शरीरवर्णन—वर्ण गोरा, चेहरा उभट, शरीर साधारण कृश, प्रकृती बरी, निरोगी. अत्यंत आजारी असलेली वर्षे—वयाचे दुसरे वर्षी संग्रहणीनें फार आजारी पुनर्जन्म. आईचा मृत्यु—१९०७ साली भाद्रपद महिन्यांत. वडील—हयात वय वर्षे ६४. पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—साधारण, घर, शेत वगैरे कांहीं नाहीं. सध्यांची सांपत्तिक स्थिति—साधारण, नोकरीवर चरितार्थ. भावंडें—धाकटा १ भाऊ व १ बहीण दोन्हीं हयात, भायाचे कापड दुकान एक दोन भावंडें अगदीं लहानपणींच वारली. विवाह—मार्च १९१० स्त्री—मध्यम वर्ण. संतती—पहिली मुलगी १९१४ हयात, दुसरा मुलगा १९१७ जन्म. १९१८ नवंबर मृत्यु. १९२१ व १९२३ मध्यें दोन मुली. ३ मुली हयात. विद्या—बी.ए. परीक्षा पास, सन १९१९ मध्यें मध्यंतरी २।३ वेळा अपयश. धंदा—संस्थानांत शिक्षकाची नोकरी पगार रु. ६० वर जमीनजुमला, घर अगर वडिलार्जित संपत्तीचें सुख नाहीं. आप्तवर्ग—चुलते अगर चुलत भाऊ कोणी हयात नाहींत, एक आत्या हयात, मामा मृत, दोन मामे भाऊ हयात, मावशी नाहीं. संकटकाल—परीक्षेंत अपयश व मुलाचा मृत्यु हींच साधारण संकटें विशेष नाहीं, विरोध कोणाचा नाहीं, स्वभाव प्रेमळ असल्यानें सर्वत्र अनुकुलता चांगली, स्वभाव एकांतप्रिय. इतर गोष्टी—ज्योतिष व सामुद्रिक या विषयांची आवड विशेष, सामुद्रिक विषयाचा अभ्यास जास्त, गायन, चित्रकला या विषयासंबंधी फार आवड पण अभ्यास झाला नाहीं.

### कुंडलीक्रमांक ७९

श्रीशके १८१२ आषाढमासे शुक्लपक्षे सप्तम्यांतिथौ श्रीसूर्योदयागत घ. ५६ प. १०

जन्मकुंडली

| स्थान | ग्रह |
|---|---|
| ३ | रा |
| २ | बु |
| १ | |
| १२ | |
| ४ | गु |
| ५ | श |
| ११ | |
| ६ | च |
| ८ | मं |
| १० | शु |
| ७ | |
| ९ | के |

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शरीरवर्णन—शरीर मध्यम. आजारी असलेली वर्षे १९१३-१४ वातरोगानें. आईचा मृत्यु—सन १९००. वडील मृत्यु—सन १९०१. पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—गरीबी. सध्यांची सांपत्तिक स्थिति—आहे तीच कायम. भावंडें—२. वडील बहिणी, एक लहान भाऊ व एक लहान बहीण पैकीं हल्लीं कोणी नाहीं. विवाह—सन १९१८ मे. पहिली स्त्री. १९२५ जानेवारीत गरीदरपणांत वारली. सासरची स्थिति वाईट. संतती—९जून १९१९ मध्यें पहिला मुलगा ९ महिन्यांनीं वारला, दुसरी मुलगी ता. २३ सप्टेंबर १९२० जन्म, हयात आहे,

तिसरा मुलगा जन्म २१ डिसेंबर १९२२ तो लवकरच वारला. धंदा—प्लॅन करणेचा, सांप्रत महिना उत्पन्न १०० पण कर्ज १५०० रुपये जमीनजुमला वगैरे कांहीं नाहीं. आप्तवर्ग—मामा हयात आहे, चुलते ४ पैकीं सर्व मयत. शत्रुपासून भिती, सन १९२२ नवंबरपासून १९२४ पर्यंत मरणप्राय भिती, संकटकाल—१९२२ नवंबर ते १९२३ डिसेंबर.

कुंडलीक्रमांक ८०

श्रीशके १७९० चैत्रमासे कृष्णपक्षे ५ तिथौ रविवार श्रीसूर्योदयातगत घ. ५ प. १५

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शरीरवर्णन—कृप नाहीं लठ्ठ नाहीं, चेहरा लांबट, देवांचे वण नाहींत, वर्ण सावळा, कपाळ मध्यम, एकंदरीत शरीर मध्यमदेही. आजारी असलेली वर्षे—वयाच्या ५।६ वर्षी देवी, रक्तदोष उपदंश २०।२१ वर्षी ज्वरपीडा फार ५०।५१ वर्षी. आईचा मृत्यु—शके १७८७. वडील मृत्यु—सन १८८९. पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—अगदीं साधारण. सध्यांची सांपत्तिक स्थिति—मध्यम. विवाह सन १९८७।८८ साली स्त्री एक कृष्णवर्ण. संतती—पहिल्या तीन मुली होऊन ५।६ महिन्याचे आंत मेल्या नंतर चौथी मुलगी शके १८२१ नंतर शके १८२४ मुलगा नंतर १८२७ मुलगा नं. १८२९ मुलगी नंतर एक मुलगा तो १।२ दिवसात वारला नंतर एक गर्भपात झाला नंतर मुलगी झाली नंतर गर्भ राहुन कांहीं दिवसानीं पडला नंतर मुलगी होऊन बाळंतरोगानें स्त्री ८।१० महिन्याने मेली. विद्या—सात यत्ता. धंदा—वयाचे ४५।४७ वर्षपावेतो पटवारीपण केले साधारण शेतीचें उत्पन्न हल्लीं दरसाल ३६५ रु. साल शेती हें उत्पन्न खर्च जास्त व कर्ज २२।२३ वर्षापासून उत्कर्ष. आप्तवर्ग—मामा ३ मयत, मावशा ४ मयत, चुलते ३मयत, चुलती एक मयत, चुलतभाऊ ५पैकीं एक हयात, शत्रु फार आखेर अनुकुल भाऊ नाहींत, मेहुणे २ दोन्ही सरकारी नोकर पैकीं एक पटवारी व एक मास्तर. संकटकाल—नेहमी विरोध अंती लोकांत म्हणजे आप्तवर्गात व स्वजातीत विशेष मान्यता नाहीं, इतर जातीत आहे, सन १९०१ ते सन १९१० पावेतो यश पुढें बऱ्याच अडचणी. इतर गोष्टी—सन १९१२ नंतर कांहीं मुलांमुलींची लग्ने झालीत कर्ज झालें नाहीं पुढे सन १९२०।२१ साली फार मानगी होऊन येरेच शत्रु उत्पन्न होऊन इस्टेटींत ढवळाढवळ करू लागले अखेर त्यांना अपयश मानगीत कर्ज, शेतींत उत्पन्न नाहीं ढागढागीन्याची अफरातफर पुढेंही शेतींत फायदा नाहीं, लग्न मुलामुलींचीं केली त्यांत कर्ज.

कुंडलीक्रमांक ८१

श्रीशके १७७२ फाल्गुनेमासे कृष्णपक्षे पचम्यांतिथौ श्रीसूर्योदयात्गत घ. ७ प. ४५

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शरीरवर्णन—गौरवर्ण रूपवान ठेंगणा बांधा मध्यम. पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—पाटीलकी-वतन, सध्यांची सांपत्तिक स्थिति–चांगली आहे, भावंडें–वडील भाऊ वारला बहीण एक अता आहे. विवाह—एक दुसरा विवाह पाट ( पुनर्विवाह ) संतति—पुत्र संतान नाहीं, एक मुलगी आहे ( प्रथम विवाहाची ) ३-४ मुले २ मुली आहेत, नातवालाच दत्तक घेतला आहे. विद्या—म्यादिक मात्र कुशल टापटीप वर्णनीय आहे. धंदा—महिना ३ रु. पासून ८०० रु. नोकरी. आप्तवर्ग—बहिण, पाटाची वध्या बायको, जावई मुलगी. इतर गोष्टी—ब्राम्हणद्वेषी अधिकारी म्हणून प्रसिद्ध लिंगायत समाजासाठीं ४ लाख रुपये मिळविलेल्या दोघापैकीं एक गृहस्थ, अजून हयात आहेत.

कुंडलीक्रमांक ८२

श्रीशके १८०३ वैशाखमासे कृष्णपक्षे ९. म्यांतिथौ भानुवासरे श्रीसूर्योदयीं जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

शरीरवर्णन—गौरवर्ण, बांधा चागला, मध्यम उंची. अत्यंत आजारी असलेली वर्षे–१९२१। २२।२३ आईचा मृत्यु—बाळपणीं, वडीलमृत्यू १९०६ पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—बरी होती. सध्यांची सांपत्तिक स्थिति–मध्यम. विवाह–शके १८२३ चे सुमारास. संतति–१ मुलगा १७वर्षांचा २ मुली ८।५ वयाच्या. विद्या—इंग्लिश, कानडी, मराठी. धंदा—जमीनी वहिवाट, वकीली, वर्तमानपत्राचे एडिटर कांहीं दिवस होते. आप्तवर्ग—दूरचे भाऊबंद आहेत. घरी आमरण सासू व

मेव्हणी होती. सकटकाल—१९२४ डिसेंबर २० तारखेचे सुमारास गाणगापुरास वारले. जवळ मुलगा मात्र होता. इतर गोष्टी—बायको खुळी आहे. नानकोआपरेशन करून वर्तमानपत्र काढीत होते. खटला झाला होता शिक्षा झाली नाहीं.

### कुंडलीक्रमांक ८३

श्रीशके १८२४ कार्तिक कृष्ण ९ म्या तिथौ भानुवासरे श्रीसूर्योदयात् गत घ. २५ प. ५७ समये जन्म.

जन्मकुंडली



| स्प. सू | स्प. च. |
|---|---|
| ७ | ४ |
| ७ | १८ |
| ५६ | ४६ |
| ४ | ११ |

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

शारीरिक स्थिति व स्वभाव—शारीरिक स्थिती मध्यम, स्वभाव मनमिळाऊ, रूप निमगोरा, गर्डांतरें व मोठाले आजार—नारूपासून उपद्रव. आई व वडिलाचें सौख्य कोठपर्यंत—वडील ह्यात, आई जन्माच्या ६ व्या वर्षी परलोकवास. वडीलाची सांपत्तिक स्थिति—वडीलाची मूळ सांपत्तिक स्थिति मध्यम, हल्लीं साधारण बरी. वडिलाचा धंदा—किराणा व्यापार. महिन्याचें उत्पन्न—२५ रु. भावडें एकदर ४ त्यांत ह्यात मी एकटा पाठीवर सर्व. विवाह—शके १८४१ सालीं लग्न झाले. विद्या मराठी ४ यत्ता पर्यंत. भाग्योदय—कुलाबा जिल्ह्यात, लहानपणापासून व्यापार, माझ्या अनुभवात मध्यमवर्षे, नुकसान नाहीं. स्वत वर अजून जबाबदारी नाहीं उत्पन्न पूर्वीप्रमाणें. कोणत्याही कार्यांत नेहमी यश. अत्यत आवडत्या गोष्टी—परमेश्वर सेवा, देशाविषयीं आवड, मानसिक स्थिती समाधीना. किरकोळ कापड व किराण्याचा व्यापार, स्थिती मध्यम, अपघात—जळापासून अपघात जन्मापासून वर्ष १२-१८ धार्मिक प्रवृत्ति—वैष्णव धर्मांत प्रवृत्ति, मन स्थिति उत्तम, वाङ्मयाची जास्त आवड व प्रावीण्य. सासरची सांपत्तिक स्थिति मध्यम, त्याजकडून लाभ फारसा नाहीं. आणि चुलत्यांची—चुलत्याची परिथती मध्यम आहे, चुलत्यांची संख्या ७ त्यांत एक ह्यात बाकी ६ मृत्यु, आत्या एक पण मृत्यु. सत्तेचें घर आहे पूर्वार्जित, सुखदु ख मामापासून दु ख नाहीं, आई वडील व भावडें यांच्याशीं प्रेम.

### कुंडलीक्रमांक ८४

श्रीशके १८१४ चैत्रमासे शुक्ल तिथौ १३ भानुवासरे श्रीसूर्योदयातगत घ ४ प. २०.

जन्मकुंडली

आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शरीरवर्णन—साधारण पुष्ट, डोळे तपकीरीसारखे काळे, दात साधारण, तोंडावर तापाचे कांहीं ठिकाणीं व्रण, गौरवर्ण, एकदरींत शरीर मध्यम. व्यंग—वयाचे तेरावे वर्षापासून केंस पांढरे होत आहेत व हल्लीं सर्व केंस पांढरे झाले आहेत. अत्यंत आजारी असलेली वर्षें—वयाचे तिसरे वर्षीं मरणप्राय आजार, ९ व्या वर्षीं प्लेगनें आजारी व गंडांतर. आई—आई हयात आहे. वडिलांचा मृत्यु—वयाचे २४॥ वर्षीं. पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—साधारण, दुकानदारीची स्थापना वयाचे २४ वे वर्षीं. सध्याची सांपत्तिक स्थिति—घाराशिवणीमध्यें किराणा मनीहारी स्टेशनरी सामान व कटगीमध्यें मनीहारी व स्टेशनरी दुकान. भावंडें—एकंदर ५, त्यांत २ बहिणी हयात व २ धाकट्या मयत. विवाह—शके १८३९ माघ शुद्ध ९ मंगळवार. स्त्री गौरवर्ण, सासऱ्याचे घरची स्थिति चांगली, १४।४।२२ ला मयत. संतति—एक मुलगा हयात व दोन मयत, वडील मुलगा भाग्यवान व मामाचे घरीं ४ वर्षांपासून आहे व त्याला ५००० रु. आजीचे मिळाले. विद्या—इंग्लिश ५ वी फोर्थ याशिवाय हिंदी, मराठी, गुजराथी, बंगाली व संस्कृत इत्यादि भाषा बोलणें व समजणें. धंदा—दुकानदारी, सांप्रत उत्पन्न २०० ते ४०० पर्यंत पण खर्चही तितकाच, जमीनजुमला घर वगैरेचें सुख अद्याप नाहीं. आप्तवर्ग—मामा ३, पैकीं एक हयात, मावशा ३ पैकीं २ हयात, मेव्हणे २ हयात सर्व दुकानदार, विशेष गोष्ट शत्रु फार असून सर्व प्रकारें नुकसान करतात. संकटकाळ—नेहमीं आईच्या स्वभावावरून शत्रु फार नुकसान करतात. सन १९१० परदेशगमन व वयाचे २४ व्या वर्षी, पूर्वोपार्जित वडिलांची सर्व इस्टेट व घरेदारें जाऊन स्थानभ्रष्ट. इतर गोष्टी—दोनतीन वर्षांपासून व्यापारामध्यें साधारण फायदा व शके १८४६ या वर्षीं माघ वद्य १२ ला घर बांधण्यास सुरवात व सर्व कार्यास सरळता व दुसरा विवाह कार्यास मोठे विघ्न, होऊन तुटून जाणें व वैशाख १३ अद्यापि चालू आहे.

कुंडलीक्रमांक ८५

श्रीशके १७९९ वैशाख कृष्ण अष्टम्यांतिथौ मंदवासरे श्रीसूर्योदयात्गत घ. २ प. ३७.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शरीरवर्णन—शरीर मध्यम, डोळे काळे, चेहरा लांबट, दांत साधारण, तोंडावर देवीचे तीन वण, वर्ण तांबूस, मध्यम देही. अत्यंत आजारी असलेली वर्षे—सन १८८९ झाडावरून पडल्यानें डोक्यास दोन इंच खोक पडली, शेंडीमध्यें अजून वण आहे. आईचा मृत्यु—सन १९२१ एप्रिल. वडिलांचा मृत्यु—सन १९११ मे प्लेगनें. पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—साधारण. सध्यांची सांपत्तिक स्थिति—मध्यम, सर्व भाऊ स्वपराक्रमानें उपजीविका करीत आहेत. भावंडें—एकंदर बारा, त्यांत आज हयात ४, पाठीवर गर्भ स्रावत तदनंतर बहीण मयत, आधीं बहिण ती माझे जन्मापूर्वी मयत. विवाह—सन १८९५ फेब्रुवारी पहिली स्त्री सुस्वरुप, गोरी, मुल झालें नाहीं. दुसरा विवाह—सन १९१८ जानेवारी दुसरी स्त्री कृष्णवर्ण, अजून गर्भधारणा नाहीं. सासरची स्थिति सामान्य, स्टेशनमास्तर, शेतकी. संतती—बिलकूल नाहीं. विद्या—मॅट्रीकचे क्लासपर्यंत, कौमुदी-शुक्ल-यजुर्वेद व सामवेद संहिता. परीक्षेचे वेळीं कधीं अपयश नाहीं. धंदा—भिक्षुकी, सांप्रत मासीक उत्पन्न ६०-७५ पण खर्च विशेष, वडिलोपार्जित घर, शेती वगैरे आहे. आप्तवर्ग—मावश्या ३ दोन मयत व एक हयात, आत्या ४ मयत, काका, मामा नाहीं, एका मावशीची स्थावर इस्टेट मिळाली, चारही धाकटे भाऊ नोकर २ संस्थानी नोकर, २ व्यापारी नोकर. संकटकाल—म्हणण्यासारखा कधींच नाहीं, एका भावापासून थोडा आर्थीक त्रास आहे, शत्रु नाहीं लोकांत मध्यम मान आहे, सरकारी अंमलदारापासूनही कधीं अपमान झाला नाहीं. इतर गोष्टी—वयाचे १९-२० वे वर्षी म्हणजे सन १८९८ सालीं एका मित्राचे नादानें परस्त्रीगमन झाले, सुमारे ३०-३५ स्त्रियांशी संग झाला परंतु त्यांत आर्थिक नुकसान बिलकूल झाले नाहीं, ही स्थिति दहा महिने होती, त्यानंतर दोन वर्षापूर्वी एका स्त्रीशी अकस्मात संग झाला.

कुंडली क्रमांक ८६

शके १८०९ भाद्रपद कृ. ६ गुरुवार घ. ५० प. २७ भरणी नक्षत्र घ. ८ प. ४५ श्रीसूर्यास्तात्गत घ. १२ प. ५ ता. ८।९।१८८७.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शरीर कृश, डोळे काळे, चेहरा वाटोळा, कपाळ रुंद, कपाळाच्या मध्यभागी व डाव्या भिवईवर उजव्या टोकापासून अर्धा इंच अंतरावर तिळाएवढा व्रण, नाक किंचित् मोठे, उंची५फूट ४ इंच, प्रकृति नेहेमी निरोगी व महत्वाकांक्षी. गंडांतरे व आजार—वयाच्या पहिल्या वर्षी प्रथम पासून दहा महिनेपर्यंत थंडीचा आजार, वयाच्या १५ व्या वर्षी १५-२० दिवस अतिसार, वयाच्या १६ व्या वर्षी १५ दिवस ज्वरपीडा, वयाच्या २५ साव्या वर्षी डिसेंबरमध्यें मलेरियाने आजारी. आई व वडिलांचे सौख्य—आई ह्यात आहे, वडिलांचा मृत्यु शके १८२० माघ व. ११ रोजीं प्लेगने. वडिलास मोठा आजार—सन १८९५ चे सुमारास पोटशुळाने ३-४ महिने आजारी होते. वडिलार्जित सांपत्तिक स्थिति—तीनशे रुपये सरकारी साऱ्याची जमीन व हजारपंधराशे व्याजी उत्पन्न. वडिलांचा धंदा—जमिनीवर देखरेख व व्याजबट्याचा व्यवहार. महिन्याचे उत्पन्न—अंदाजे दोनशे रुपये. धंद्यात काळजीचे प्रसंग ! व त्यांचा परिणाम—सन १९०९ अखेरीस घराण्याच्या व्यापाराकरतां रकमेची तूट त्यामुळें कर्ज काढावे लागले त्याची फेड १९२४ साली झाली. स्वत.च्या वकिली धंद्यात महिना २०० रु. उत्पन्न पण खर्च तितकाच. सन १९२१, २२, २३ साली वकिली धंदा तहकुब ठेवल्यामुळें पैशाची अडचण सन १९२३ जूनपासून पुन: धंदा वकिली सुरू केला. भावंडे—एकंदर ७ त्यांत एक वडील भाऊ ह्यात माझ्या पाठीवर २ बहिणी व एक भाऊ, माझ्या आधी २ बहिणी व २ भाऊ एकंदर ४ बहिणी व ३ तीन भाऊ सर्वांत वडील बहिण ती मयत. ता. ३-३-१९१३ नंतर भाऊ तो ह्यात, नंतर बहिण ती मयत, ता. १४-२-१८८३ नंतर भाऊ तो मयत ता. २४-१०-१९१८ नंतर मी स्वत: माझ्या पाठीवर बहिण ती मयत, ता. १३-१-१९१० नंतरचा भाऊ तो मयत. ता. १२-९-१९११ नंतर शेवटची बहिण ती मयत ता. ८-३-१८९८ आज ह्यात जो भाऊ आहे त्याचा जन्म शके १८०२ ज्ये. शु. ७ मंगळवारचा आहे. विवाह—सन १९०४ वैशाखमासी झाला. स्त्रीचीं प्रकृति—किंचित रागीट व कंजुष स्वभावाची, देवधर्मावर श्रद्धा गौरवर्णाची सासरची सांपत्तिक स्थिति उत्तम, सासरा लग्नापूर्वींच मयत, सासू ता. २०-१०-१९१८ या तारखेस मयत. स्त्रीला एक वडील बहीण व एक लहान भाऊ ह्यात, सन १८९६मध्यें नाकाचा आजार सन १९२५ आगष्टपासून ३ महिने अतिसाराने आजारी होती. संतति—प्रथम कन्या जन्म ता. २-३-१९०८ ह्यात, दुसरी कन्या जन्म ता. १०-२-१९११ ह्यात, तिसरी कन्या

जन्म शके १८३५ श्रा. कृ. ४ बुधवार रात्रौ ११ वा. ही दीड महिन्यानें थंडीच्या विकारानें मयत, चौथा मुलगा जन्म शके १८३६ का. कृ. ४ शनी सकाळी १०॥ वाजतां हा शके १८३७ च्या वैशाख महिन्यांत थंडीच्या विकाराने मयत. पांचवी कन्या जन्म शके १८३८ का. शु. २ ही तीन महिन्यानीं तापाने मयत. सहावा मुलगा जन्म ता. २५-१२-१९१७ मंगळवार हा हयात आहे. सातवा मुलगा शके १८४१ श्रावणांत झाला व शके १८४२ भाद्र. कृ. ३ स थंडीगोवरानें मयत. आठवी कन्या जन्म शके १८४२च्या पौषांत ही हयात आहे. नववा मुलगा शके १८४५ माघ कृ. ८स जन्मास आला तो हयात आहे. दहावी कन्या जन्म शके १८४७ श्रा. शु. २ बुधवार पहाटे ३ वाजतां. विद्या—सन १९०६ सालीं मॅट्रिक परीक्षेत नापास. सन १९०७ साली पास. सन १९०८ मध्यें कलकत्यांत न्याशनल मेडिकल कॉलेजमध्यें एक वर्ष राहून तो कोर्स सोडला व सन १९०९मध्यें एक वर्ष घरी व्यापारांत घालविलें. सन १९१०-११ वकिलीच्या अभ्यासाकरितां मुंबईस होतो पण परीक्षेपूर्वी ३। महिने आजारी पडल्यामुळें वकिलीच्या परिक्षेत सन १९१२ साली नापास झालो. १९१२ अखेर एका संस्थानांतील कोर्टांत वकिलीची सनद मिळवून १९१३ पासून वकिली करीत आहे. १९१४ मध्यें एका संस्थानांतील सर्व कोर्टांत वकिली करण्याकरतां सनद मिळविली. भाग्योदय—१९१३पासून १९२० हा काल चांगला गेला. सन १९२१-२२ वकिली तहकूब १९२२पासून पुनः सुरवात परंतु पूर्वीपेक्षां फायदा कमी. घराण्याचा व्यवहार वडील भाऊ पहातो तथापि सन१९१३ जून महिन्यापासून स्वतःवर जबाबदारी आहे आज महिना उत्पन्न दोनशे रुपये. सांपत्तिक वाईट काल—सन १९२१—२२—२३ सन १९२५ जानेवारी ते जून अखेर. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल—सन १९१५ ते १९२० जुलैपर्यंत व सन १९२४ चे वर्ष. कोणत्याही कार्यात यशापयश—नेहमी सार्वजनिक कार्यांत आरंभीं विरोध फार त्यामुळे खर्च फार व स्वतःस बराच त्रास होतो पण शेवटी यश. घराण्याच्या व्यापारांत खर्च जास्त व फायदा नाहीं. सरकार अगर लोकांकडून मान—सन १९०८चे मे महिन्यांत कांहीं संस्थानांत विद्यार्थी सहाय्यक फंडाकरतां वर्गणीदार मिळवून दिले. सन १९१३ जानेवारीत सार्वजनिक पुस्तकालय व वाचनालय स्थापन केलें. सन १९१६ सालीं तालुका सभा स्थापन केली तेव्हांपासून त्याचा प्रेसिडेंट आहे. सन १९१९ सालीं एका म्युनिसिपालिटींत निवडणुकीस आरंभीं अतिशय विरोध पण सर्व उमेदवारांत पहिला नंबर लागला. म्यानेजिंग कमेटीचा चेअरमन सतत तीन वर्षे सन १९१९ ते १९२१ अखेर. सन १९२० कारवार जिल्ह्यातर्फे गव्हर्नरकडे जाणाऱ्या डेप्युटेशनमध्यें समासद. सन १९२० महात्मा गांधीना हलियाळ येथें आणून थैली अर्पण केली १९२१ साली कारवार जिल्हा कांग्रेस कमिटीचा उपाध्यक्ष व आल इंडिया कांग्रेस कमेटीचा मेंबर. सन १९२२ एका म्युनिसिपालिटींत स्वतः पार्टी उभारून निवडणुकींत सबंध पार्टी निवडून आली. स्वतः सर्वानुमते म्युनिसिपालटीचा अध्यक्ष पुन्हा १९२५ साली म्युनिसिपल निवडणुकीत अत्यंत विरोध असतां निवडून आलो. सन १९२५ एप्रील ते १९२८ मार्च अखेर अध्यक्ष सन १९२५ एप्रील एका म्युनिसिपालटींत गव्हर्नरास पानसुपारी. संकटे कोणाकडून आली—सन १९२५ साली राजद्रोही खटल्याची

अफवा व तयारी झाली होती पण प्रत्यक्ष खटला झाला नाहीं. सन १९०७।८ मध्यें परसातील झाडावरून पडल्यानें ३-४ दिवस त्रास झाला. व्यवसायाची स्थिति—सन १९१३ पासून कुंदगोळ येथें वकिली करीत आहे. सन १९१४ ते १९२० हीं ६ वर्षें व १९२४ हें वर्ष सांपत्तिकदृष्ट्या चांगले गेले. सन १९२१—२२—२३ व सन १९२५ जानेवारी ते जून हा काळ वाईट गेला. मोठ्या मुलाची बौद्धिक स्थिति व विद्या—मोठा मुलगा ८ वर्षांचा असून हुशार बुद्धीचा आहे. सासरची स्थिति व लाभ—विवाहाचे वेळीं हुंड्याबद्दल १३०० रु. मिळाले. स्थिति चांगली आहे. त्यानंतर फायदा नाहीं. चुलते, मामा व मावशी यांची स्थिति—एकंदर ६ मामा व एक मावशी होती हे सर्व माझे जन्मापूर्वी मयत. दोन चुलते हे दोघेही मयत पहिला ता. १८-१-१८८९ दुसरा १८-६-१८९४ चुलत्या दोन पैकीं एक ता. ७।११।१९१८ रोजी मयत व दुसरी सन १९२० मध्यें मयत. चुलत भाऊ एकंदर तीन पैकीं एक हयात व दोघे मयत. एक ता. १२।६।१८९५ व दुसरा ता. ११।८।१८९९ भावजया दोन मयत. पहिली सन १८९९ मध्यें व दुसरी ता. ९-१२-१९१८ मध्यें. सासू २०-१०-१९१८ रोजी मयत. मेव्हणा एक हयात आहे व तो चांगल्या स्थितींत आहे. सत्तेचे घर व वाहने वगैरे—वडिलार्जित घरें व जमीन जुमला आहे नोकरचाकर आहेत पूर्वार्जित व स्वकष्टार्जित.

### कुंडलीक्रमांक ८७

श्रीशके १८२५ कार्तिकमासे शुक्लपक्षे ३ परं ४ तिथौ भृगुवासरे श्रीसूर्योदयातगत घ. ३५ प. ५५ समये जन्म. जन्मतारीख २३ माहे १० सन १९०३

### जन्मकुंडली

३
१
१२ के
५ शु
गु ११
बु ६ रा
८ च
श १०
७ र
९ मं

### आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—साधारण चेष्टेखोर, जरा तिरसट, थोडा आळशी, कमीजास्त न ऐकणारा, स्वच्छतेची टापटीप, निमगोरा, इंद्रियावर तीळ, व भाजल्याचा चट्टा, उजव्या छातीवर तीळ २, वेळ जाणून काम करणारा. गंडांतरें—२ वर्षांचा असतांना अन्नांत पालीचे विष जाऊन कांहीं दिवस हगवण निदान ७।८ दिवस सारखी त्याच वर्षाच्या दरम्यान वाज पेटून मरण्याची भिती. १९२१ सालीं ३ महिने हिंवतापानें आजारी व त्याचवेळेस पानथरीची व्यथा ७।८ दिवस दिवाळीपासून सुरू १९१८—१९१९—१९२० अर्धशिशी ह्या तीन वर्षांत दहा ते अकरा दिवस पर्यंत प्रत्येक वर्षांत. आई व वडिलांचें सौख्य कोठपर्यंत—अजून आहे. वडिलांची सांपत्तिक

स्थिति—साधारण वयाचे २३-२५ चे सुमारास नोकरी (सरकारी) मावस भावानें नोकरीस लावले. वडिलाचा धदा—सरकारी कचेरींत नोकर. महिन्याचें उत्पन्न—४० नोकरींत-राहिले त्यावेळेस व नतर ५-६ वर्षे काळजीचे व असह्य प्रसग. भावडें—११ हयात ८ पाठीवर भाऊ आधीं भाऊ (भाऊ) ६ १९०८ या वर्षी वधू झाला होता तो देवीनें वारला. (लगेच ७ ८ महिन्यानीं) १८९७ सालीं बहीण झाली व ती सर्वांत वडील होती व १९२४ सालीं वारली. १९१४ चे सुमारास भाऊ होता परतु तो ७ महिन्याचा असतांनाच झाला व तो मेलेला (करणी केल्यामुळें) विवाह अजून झाला नाहीं. २ स्थळें आलीं होती पण वडील वधू लग्नाचा असल्यामुळें झालें नाहीं व टीपणही जुळलें नाहीं स्वत स, मातापित्यांस कायमचा विकार असल्यास तो कोणता—डोळ्यास जरासा ३-४ वर्षापासून त्रास होतो आहे व डोक्यास जास्त टक्कल पडत आहे मातापित्याचा विकार माहीत नाहीं. विद्या—इंग्रजी ५ यत्ता पूर्ण, इंग्रजी ४ त व मराठी ४ तींत नापास. सन १९२० अखेर विद्या पूर्ण. भाग्योदय—व्यापारी नोकरी सन १९२१ पासून सुरू व ती हगामी (कायमची नाहीं.) स्वत वर व्यावहारिक जबाबदारी—१९२१ पासून व्यापारी लोकांच्या हाताखालीं हगामी नोकरी केली सध्यां भावाच्या दुकानांत आहे हगाम सपल्यावर शेतांतील काम काज पाहणें सांपत्तिक काल—कायमची नोकरी किंवा धदा नसल्यामुळें १९२१ पासूनचा काल साधारण गेला. कोणत्याही कार्यांत यश कसें काय येतें—नोकरीस राहिल्यावर यश येते लोकांकडून मान—फक्त व्यापारी लोकांकडे नोकरीस राहिल्यानतर मिळतो व नतर भरवसाही बसतो (लोकांकडून) सकटें—एका श्रीमंत माणसाकडून (तेल्हारा येथील) स्वत च्या हिंमतीवर जबाब दिला 'दिवाणींत साक्षीदार ह्या नात्यानें गेलो होतो नोकरी'—आजपर्यंत कापसाच्या कपन्या (जपान, भुसावळ) वगैरे व व्यापारी यांच्या हाताखालीं हगामी नोकऱ्या केल्या आतां कापसाच्या धधातील व फॅक्टरी मधील बरीच माहीती झाल्यामुळें व्यापारीलोक बिनदिक्त नोकरीस ठेवतात व पैसे वगैरेची जबाबदारीची कामें सागतात. आत्या—एक आहे. जमीनजुमला फक्त १॥ तिफन जमीन वडिलांनीं कमावलेली आहे स्वत चे अजून कांहीं नाहीं

कुंडलीक्रमांक ८८

श्रीशके १८२७ फाल्गुनमासे कृष्णपक्षे ४ तिथौ सौम्यवासरे श्रीसूर्योदयात्गत घ. ९ प. १० समये जन्म. जन्मतारीख १४ माहे मार्च सन १९०६

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति, शरीरावरील खुणा, चिन्हें अगर व्यंग—मध्यम निमगोरा, उजव्या मांडीवर, व डावे बाजूचे गालावर जखमेच्या खुणा, उजव्या खांद्यावर, तीळें, डाव्या डोळ्यास लासूर. गंडांतरें—लहानपणीं ३ वर्षपर्यंत नेहमी आजारी आई व वडिलांचें सौख्य—चांगलें. वडिलांचा धंदा—नोकरी. महिन्याचें उत्पन्न—३५. भावंडें—१० हयात ३ पाठीवर भाऊ आधी भाऊ जास्त भाऊ, सध्या ६. स्वत स, कायमचा विकार असल्यास तो कोणता—डावे डोळ्याचे कोनांत लासूर आहे. विद्या—इंग्लिश ५ वी मराठी ७ वी. भाग्योदय—महाराष्ट्र, नाशिक, मध्यम, अनपेक्षित बदल झाला—१९१९ मिडलस्कूल स्कॉलरशिप मिळाली. सरकारकडून १९१९ सालीं सरकारकडून स्कॉलरशिप मिळाली. आवडत्या गोष्टी—गाणें व यंत्रशास्त्र. मोठ्यां मुलाची बौद्धिक व सांपत्तिक स्थिति व विद्या—नाहीं. भावंडांचा व्यवसाय—शिकत आहे. एक भाऊ नोकरीला. आत्या—आत्या ३ हयात एक सत्तेचें घर—२ घरें जमीनजुमला पूर्वार्जित. सावत्र आई—होती. मामा व मावश्या—दोन मामा, तीन मावश्या मामा हयात. मावश्या मृत.

### कुंडलीक्रमांक ८९

श्रीशके १८२९ पौषमासे शुक्लपक्षे तृतीयांतिथौ इंदुवासरे श्रीसूर्योदयात् गत घ. प. ५० समये जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

जन्मास येण्यापूर्वीं कांहीं महिने आजी वारली. अगदीं लहान असतांना फार रडत असें. सुमारें ५ वर्षांचा असतांना घरांत बाप, वडील बंधु, चुलत बहीण व मी इतकी मंडळी (बहुतेक) तापानेंच शीक. सुमारें ६।७ वर्षांचा असतांना वडील व चुलते यांत विभक्तपणा आला पण तत्पूर्वी आजोबा वारले होते. ९ व्या वर्षी मुंज झाली. १४ व्या वर्षाच्या अखेरीस शीकपणा, आमांश व तापानें. १५ व्या वर्षी बैलगाडीचा आजगांवहून बेळगांवास प्रवास, वाटेंत अपघात. डाव्या पायाच्या ढोंपरावरून चाक गेलें पण पाय धुळींत रुतला व विशेष इजा झाली नाहीं आणि पाय साफ बरा झाला. १६ व्या वर्षी लग्न इकडील परिस्थितीचा विचार करतां फारच थाटांत झालें. लग्न आकस्मिक आपोआप जुळलें. आम्ही मुळींच प्रयत्न केला नव्हता. १७ व्या वर्षी शिक्षणासाठीं वेंगुर्ल्यास गेलों. इंग्रजी ५ व्या इयत्तेंत शिकत असतांना परत शीक पडलों आमांशानें. ६ दिवसानीं बरा झालों. सहामाही परीक्षेस बसतां आलें नाहीं. १८ व्या वर्षी पांचवी

इयत्ता पास झालों. इंग्रजी ६ व्या सहामाही परीक्षेपर्यंत शिकत होतों नतर परिस्थिति अशी उत्पन्न झाली कीं शाळा सोडणें भाग पडलें व घरीं आलो. जवळच्या आप्तानें वार्षिक एक हजार रुपये उत्पन्नाचा चालू धंदा देतों म्हणून सांगितलें होते, पण तें त्यानें पुरें केलें नाहीं. नतर ८ महिने घरकाम करीत राहिलों. नतर त्या आप्तानें मला नेले त्या ठिकाणी ५ महिने होतो. पण त्याच्या विक्षिप्त स्वभावामुळें पटेनासें झालें परतु मी येणार नव्हतों पण दत्तगुरूंचा त्या ठिकाणीं न राहण्याबद्दल दृष्टांत झाल्यामुळें मी नरसोबाच्या वाडीस जाऊन पधरा दिवस राहिलों, व त्या ठिकाणीं दत्तमहाराजांचा दृष्टांत घरीं जाण्याबद्दल झाल्यामुळें घरीं आलों. व घरकाम करीत राहिलों. २० व्या वर्षी २-२॥ महिन्यांत मराठी सातवीचा अभ्यास करून परीक्षेस बसलों, व १६८ मुलांत १० व्या नबरास पास झालों व लगेच सावतवाडी सस्थानात शाळामास्तरची घराकडेच नोकरी धरली ती अजून कायम आहे. या वर्षी वडील बधु शीक पडले होते पण बरे झाले. २१ व्या वर्षी शाळा व ब्रँच पोस्टमास्तर दुसऱ्या ठिकाणीं झालों. सदर वर्षी आमांशानें ४ दिवस शीक पडलों. २२ व्या वर्षी परत घराकडे नोकरी मिळाली पण सदर वर्षी नोकरींत अत्यत त्रास झाला. २३ व्या वर्षी परत लांब बदली झाली. पहिलें मूल (मुलगा) झाला पण तो मेलेलाच झाला. एका तपस्वी पुरुषाची गांठ पडली. २४ व्या वर्षी मृत्युजय मत्र सिद्धि एकांतवासाच्या कृपाप्रसादानें मिळाली आहे. वडील वारले. त्यांच्या अस्थि घेऊन नरसोबाच्या वाडीस चालत आलों. विशेष टीक. लहानपणापासून गुरुचरित्र वाचण्याची आवड व देवदेवतांशीं सभाषणें. वैदिक शिक्षण अगदीं कमी. तात्विक विषयाची आवड, वैद्यकीची आवड, लोकाना गुण येतो. वैद्यकी शिकलेलों नाहीं पण पुस्तकें वाचून थोडी माहिती घेतली आहे, ज्योतिषाचा अभ्यास लहानपणापासून नाहीं, घरीं वडील प्रश्न चांगले सांगत, साधीं जन्मटिपणें करीत मी वय १७ पासून थोडथोडी ज्योतिषाची माहिती करून घेऊ लागलो. २१ व्या वर्षापासून जास्त लक्ष घातलें व आतां इकडील सर्व भागात माझें नाव सुप्रसिद्ध झालें आहे. कामें मिळतात पण मी जास्त घेत नाहीं त्रास होतो, वर्षास सुमारें १०० रुपये मिळतात, आमचा चॉर्जही कमीच असतो व फुकट कामें फारच करतों कारण ज्योतिष विद्येपासून पैसाच मिळवावा असें ध्येय नाहीं ज्योतिषाच्या बाबतींत मान चांगला मिळतो व लोकांना गुणही येतो माझ्यावर आज-पर्यंत जवळच्या आप्ताकडून मांत्रिक प्रयोग माझ्या नाशासाठीं बरेच झालेले आहेत, पण मला त्यांच्यापासून फारसा त्रास पोंचत नाहीं व मी कांहीं न करतांही ते त्यांचे प्रयोग निरुपयोगी होतात. त्याशिवाय घरचा समंधिक बाधा आहे पण त्याचा परिणाम होत नाहीं. सदैव गुरुभक्ति असल्याकारणानें मी तरून जातों. स्वप्नात निरनिराळ्या देव व देवींची दर्शनें घडून आशीर्वाद मिळतात कोणाला देवाचें नांव घेऊन विभूत दिली म्हणजे त्याला गुण येतो. मी स्वतःच्या बाबतींत मितव्ययी आहे विडी, चहाचेंसुद्धा व्यसन नाहीं दत्तक जाण्याचा योग वर्तं येत आहे पण अजून ठाम ठरलें नाहीं. मला अन्यायाचा वागणूक मुळींच खपत नाहीं, त्यांत माझें नुकसान झालें तरी चालतें. मला चालू वर्षी एका तपस्व्याची भेट घडली असून त्यांनीं मृत्युजय शकराची मुख्य उपासना ठेवण्यास सांगितली आहे. व मी ती ठेविली आहे माझ्या हातावर दोन्ही २ चौकोन गुरूच्या उचवट्यावर उठले आहेत.

कुंडलीक्रमांक ९०

श्रीशके १८११ श्रावणमासे शुक्लपक्षे अष्टम्यांतिथौ रविवासरे श्रीसूर्योदयात् गत घ. १६ प. ५ समये जन्म.

जन्मकुडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

जन्म इ. स. १८८९ मध्यें आगष्ट महिन्यांत झाला, लहानपणीं पोटांतल्या विकारानें आजारी असल्यानें ८ वर्षांपर्यंत जगेन किंवा नाहीं याची वडील व मातोश्रीस काळजीच होती, म्हणून शिक्षण व्हावें तसें झालें नाहीं व ८ वर्षांपासून ते १६ वर्षांपर्यंत म्हणजे इ. स १९०६ शिक्षण इंग्रजी ५ इयत्तेपर्यंत झालें परंतु पुष्कळ त्रासानें व हालांत दिवस काढावे लागले. वडील इ. स. १९०६ मध्यें मे महिन्यांत पटकीच्या विकारानें वैशाख शु॥ पचमीस वारले, त्याचे बारावे दिवशीं थोरली बहीण वारली त्यावेळीं आम्ही सहाजण भाऊ एक बहीण व एक आई अशी माणसें म्हणून शिक्षण सोडून नोकरी धरावी लागली. कोणाचीही मदत मिळाली नाहीं, नोकरी रेल्वेंत नोव्हेंबर १९०७ मध्यें लागली, आईचा मृत्यु—१९०८ एप्रिल चैत्र शु॥ १० जूनमध्यें लग्न झालें, पुढें ६ महिन्यातच बायकोस फेपरें येऊं लागले म्हणून कांहीं उपयोग नसून पुन्हां हाल काढावे लागले, आगष्ट १९०८ मध्यें एक भाऊ वारला, १९१० मे महिन्यांत तारेचें काम शिकण्यास गेलों, १९११ डिसेंबरमध्यें दुसऱ्या भावाचा मृत्यु, १९१२ आगष्टमध्यें अ. मास्तर याची परीक्षा पास झालों, १९१२ डिसेंबरमध्यें बायको वारली, १९१३ फेब्रुवारीमध्यें दुसरें लग्न झालें, १९१४ मार्चमध्यें बहिणीचें लग्न केलें, ऑगष्ट १९१४ मध्यें जिवावरचें संकट टळलें मोटार अपघातांतील, ता. २ नोव्हेंबर १९१५ पहिलें अपत्य, मुलगा झाला ता. ११।४ १९१८ रोजीं मुलगी झाली. ऑक्टोबरमध्यें बहिणीचा मृत्यु, १९२० मार्चमध्यें धाकटया बंधूचें लग्न, ऑक्टोबर १९२१ मध्यें बायको मुलें अतिशय आजारी व स्वत आजारी, कामाची फारच दगदग झाली व बरीच संकटें आलीं. १९२३ मध्यें सर्व घरांतील मुलें व मी स्वत. डेंग्यु तापानें आजारी. १९२४ एप्रिलमध्यें स्टेशनमास्तर झालों. १९२८ मध्यें पोष्टांत नोकर असलेल्या बंधूचें डोकें बिघडलें व ते हल्लीं वेड्याच्या दवाखान्यांत आहेत. १९२९ ऑक्टोबरमध्यें बायको अतिशय आजारी. १९३० फेब्रुवारीमध्यें धाकटे तिसरें बंधु वकील यांचा मृत्यु व ऑगष्ट १९३० मध्यें बदली झाली येथें, हें स्टेशन अगदीं वाईट हवेंत आहे व कामाचा बराच त्रास आहे, आज-मितीस ४ मुलगे २ मुली आहेत, एकीचें लग्न झालें आहे. वडिलार्जित घरदार वगैरे इस्टेट नाहीं

व नोकरीमध्यें वधूचें शिक्षण, लग्नें वगैरे झाल्यानें अद्याप घरदार करण्याचा योग आला नाहीं, याप्रमाणें त्रोटक माहिती आहे.

हा सर्व त्रास तृतीयस्थानीं मंगळ असल्याचा व चतुर्थ स्थानीं शनि आहे त्यामुळें झाला व होत आहे, गुरु स्वगृहीचा आहे व रवी, बुध तृतीयस्थानीं असल्यानें ह्या स्थितीस आलों, द्वितीयस्थानीं राहु व सप्तमस्थानीचा स्वामी मंगळ असल्यानें द्विभार्यायोग आला असे वाटते, द्वितीयस्थानीं राहु असल्यानें कोणतीही विद्या पूर्ण होत नाहीं अडथळे येतात व तृतीयस्थानीं रवी, मंगळ असल्यानें वधूचें सुख मिळत नाहीं.

कुंडलीक्रमांक ९१

श्रीशके १७९६ मार्गशीर्षमासे कृष्णपक्षे पंचमी तिथौ रविवासरे श्रीसूर्योदयातगत घ. २६ प. ५५ समये जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

शरीरवर्णन—कृश निमगोरा. डोळे मध्यम घारे चेहरा लांबट दांत मोठे. वर्ण तांबूस कपाळ मोठे, शरीर मध्यम व्यंग नाहीं. अत्यंत आजारी असलेली वर्षें—लहानपणीं १॥ वर्षांचा असताच नाळगुद, सन १८९९ साली ताप, अंगात कडकी. आई—हयात आहे. वडील मृत्यू—१। वर्षांचा असताना झाला पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—अत्यंत गरीबीची. सध्यांची सांपत्तिक स्थिति—वकील असून साधारण मध्यम. पूर्वार्जित अगर स्वसंपादित स्थावर इष्टेट नाहीं. भावंडें—एक बहीण १८९९ सालीं वारली भाऊ थोरला १९०० सालीं वारला. एक थोरला भाऊ हयात. विवाह—विसावे वर्षी १८९३ सालीं. स्त्री गौरवर्ण, ९ मुलें होऊन मयत. सन १९२३ सालीं वारली, एप्रिलमध्यें वाळंत होऊन बाराव्या दिवशीं. दुसरा विवाह—सन १९२३ चे डिसेंबर महिन्यांत, स्त्री गौरवर्ण, पहिला सासरा श्रीमंत, दुसरा भिक्षुक, दोन्ही हयात. संतती—१९०२ मध्यें पहिली मुलगी, १९०६ मुलगा हयात, दुसरा मुलगा १९०८ मयत, पहिली, दुसरी, तिसरी व पांचवी हयात. तीन मुली लहान वारल्या. विद्या—स्कूलफायनल व वकीलीची परीक्षा धंदा—कचेरी कोर्ट जेल डिपार्टमेंटमध्यें, नोकरी २१ ते ३२ वर्षापर्यंत पुढें वकील. जमीन घर नाहीं यशापयश विशेष नाहीं. आप्तवर्ग—मामा एक हयात सुखवस्तु, मावशा दोन मयत, बहीण एक मयत, चुलत भाऊ चार पैकीं तीन हयात एक वकील, एक नोकर व एक एक्झीक्युटिव्ह इंजिनियर पेन्शनर शालक × × × ॲडमिनिस्ट्रेटर. संकटकाल—

नहमींच परतु त्यांतून निभाऊन जातों. इतर गोष्टी—वडील दोन भाऊ आवळेजावळे, माझी दोन्ही लग्नें माझे जन्मदिवशीं ( डिसेंबरांत ) मार्गशीर्षांत झाली.

कुंडली क्रमांक ९२

श्रीशके १८१७ श्रावणेमासे कृष्णपक्षे तिथौ८ भौमवासरे श्रीसूर्योदयातगत घ. ५३प. २० समये जन्म ता. १४ आगष्ट.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शरीरवर्णन—मध्यम बांधा, वर्ण सावळा, ७ वर्षांचा होईपावेतो चांगला गुटगुटीत पुढे रोड, १९०८ पासून ते १९१२ पर्यंत रोड व अशक्त व्यग—दाताला पायोरीया १९१६ पासून आहे. अत्यत आजारी असलेली वर्षे—सुमारे ४ वर्षांचा असतांना रॉकेल प्याल्यामुळें झालो होतो, परतु वरा झालो, जानेवारी १९१७ पासून एप्रील १९१८ पर्यंत प्रकृती क्षीण. आईचा मृत्यु—पौष वा॥ ७ शके १८२१. वडील हयात आहेत. पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—वडिलोपार्जित इस्टेट मुळींच नाहीं. सध्यांची सांपत्तिक स्थिति—बरी आहे. भावडें—सखी एक वडील व धाकटी बहीण होती पण त्या दोघीहि मयत, सावत्र चार भाऊ व दोन बहिणी आहेत, सावत्र आई आहे. विवाह—१९ मे १९२० रोजीं मु. देवास येथें. संतती—आतापर्यंत ३ झाली विद्या—बी. ए. एल. एल. बी. ( १९११ मध्यें पहिल्यांदा मॅट्रिक नापास १९१२ जूनमध्यें सेकंड क्लासमध्यें पास, १९१४ जूनमध्यें इटर व १९१६ मध्यें बी. ए. १९१७ मध्ये अशक्तपणामुळें फर्स्ट बी. एला बसलो नाहीं, १९१८ मध्यें फर्स्ट बी. एमध्यें पास, सेकंड बी. ए १९१९जूनमध्यें पास. धदा—वकिली आगस्ट १९१९ पासून, सध्या उत्पन्न मासिक सुमारे ३५० ते ४००. आप्तवर्ग—४ मामा व १ मावशी, एक डेप्युटी कलेक्टर होते, १ वकील आहेत व एक क्षयानें वारले, मावशी १९०३ मध्ये वारल्या, मावसभाऊ आहे. सकटकाल—१५ जून १९२० पासून ते आक्टोबर १९२१ पर्यंत मानसिक व आर्थिकदृष्ट्या फार वाईट गेला. इतर गोष्टी—१९२० व १९२१ मध्ये डेप्युटी कलेक्टरच्या व मुन्सफीच्या जागेबद्दल खटपट केली पण यश आले नाहीं, स्वतत्र धदा डिसेंबर १९२१ पासून.

वरील गृहस्थांच्या पत्नीची कुंडली

श्रीशके १८२७ श्रावण वा॥ १३.

जन्मकुंडली

कुंडली क्रमांक ९३

श्रीशके १८२० आश्विनेमासे शुद्धपक्षे १० तिथौ इंदुवासरे श्रीसूर्योदयातगत घ. ४१ प. २१ समये जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शरीरवर्णन—उंची पांच फूट, काळे डोळे, चष्मा लावतो, अलिकडे शार्ट साईट चेहरा घाटोळा. व्यंग—अपचन. अत्यंत आजारी असलेली वर्षे—इ. स. १९१२ जानेवारी मुदतीचा ताप, १९१८ सप्टेंबर इन्फ्लुएंझा. आई—हयात. वडील मृत्यु—३० सप्टेंबर १९१८ इन्फ्लुएंझा पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—अगदीं साधारण. सध्यांची सांपत्तिक स्थिति—बरी. वयाच्या २२व्या वर्षापासून उत्पन्न सालीना सुमारें ८००–१०००. भावंडे—दोन बहिणी हयात माझ्या आधीं बहिण व पाठीवर भाऊ. एकंदर ८ पैकीं भाऊ ४ मृत. बहिणी ४ पैकीं मृत २. विवाह—२ मार्च १९२० बुधवार गोरज मुहूर्तें मुं डाकोर. संतती—मुलगा सन १९२१ आक्टोबर मुलगी सन १९२३ डिसेंबर. विद्या—मॅट्रीक १९१४ इंटर सायन्स नापास, १९१७ बी. ए. १९२०

एम. ए. १९२४, सेकड क्लास एस्टांसी १९२३. धंदा—शिक्षक, लेखक आप्तवर्ग—त्यांच्यापासून विशेष मदत झाली, आप्ताकडून मदत झाली नाहीं, चुलते असून झाली नाहीं, मामा नाहीं, चुलता मयत १९२२ त्याचे ७५० रु. मिळाले. संकटकाल—१९१८ सप्टेंबर व १९२० मे मानसिक स्थिति अत्यंत त्रासदायक.

कुंडलीक्रमांक ९४

श्रीशके १८२० आश्विनमासे शुक्लपक्षे एकादश्यांतिथौ भौमवासरे रात्रौ घ. १० प. ३७ समये जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

शरीरवर्णन—वर्ण निमगोरा, चेहरा वाटोळा, प्रकृती चांगली निरोगी अत्यंत आजारी असलेली वर्षे—त्याच्या पाचवे वर्षी फार आजारी, १९१४ साली बाल्यतपणांत आजारी, फिट्स थोडे दिवसपर्यंत. आई हयात वडील मृत्यु—वयाचे साहवे वर्षी. पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—साधारण, घर आहे. सध्याची सांपत्तिक स्थिति—मध्यम भावंडें—एक बहीण होती ती १९१३ साली उदरानें मृत्यु पावली, दुसरे काहीं सख्ये अगर चुलत भावंड नाहीं. विवाह—१९१० मार्च महिन्यांत. संतती—३ मुली हयात एकंदर ४ एक मुलगा १९१८ साली इन्फ्लुएंझानें वारला विद्या—मराठी ५ इयत्ता. आप्तवर्ग—चुलता व चुलती, २ मामा हयात, चुलत्याचे प्रेम फार व हरएक बाबतींत मदत संकटकाल—वडिलांचा मृत्यु व स्वतःचा लहानपणीचा आजार.

कुंडलीक्रमांक ९५

श्रीशके १८१६ भाद्रपदमासे शुक्लपक्षे तिथौ ४ इंदुवासरे घ २४ प. २४ नक्षत्र चित्रा घ. ३५ प. ५५ नंतर स्वाती, योग, शुक्र घ १४ प. ४२ नंतर ब्रह्मा, करण वाणिज घ. ५ श्रीमन्मार्तंड मंडलोदयात् इष्टकाळ घ. ४८ प. ३ समये जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति:—शरीरबांधा ठेंगणा, स्थूल, रंग साधारण काळा, नेत्र पिंगट, केंस अल्प व कुरळे, वातविकार, मेदोवृद्धी. वडिलांचे सौख्य—वडील शके १८३४ भाद्रपद व॥३० कॉलऱ्यानें वारले. आईहि त्याच वेळीं कॉलऱ्यानें अतिशय बिमार परंतु हयात आहे. आजा हयात आहे. मामा एकच हयात आहे. आजी वारली शके १८१९. मावशी नाहीं. चुलता नाहीं. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति गरीबीची धंदा सरकारी नोकरी शाळा मास्तर पगार महिना २५ रु. कीर्ति व मानपान चांगला. भावंडें एकंदर १० त्यांत हयात हल्लीं २ भाऊ २ बहिणी पूर्वी २ भाऊ वारले.

३ रा कुंडलीवाला जन्म शके १८१६ भाद्रपद शु॥ ४. ४ था भाऊ जन्म शके १८१९ वारला १० महिन्यांनीं. ५ वी बहिण जन्म शके १८२० माघ शु॥ ११ हयात सासरची सांपत्तिक स्थिति ठीक संततीयुक्त १ पुत्र. ६ वी बहिण जन्म शके १८२३ पौष व॥ १० हयात सासरची स्थिति साधारण ठीक संततीयुक्त २ मुली १ मुलगा. ७ वी बहिण वारली. ८ वी बहिण वारली. ९ वा भाऊ जन्म शके १८३० आषाढ व॥ ३ हयात शिक्षण मराठी ४ इ. १० वा भाऊ जन्म शके १८३३ भाद्रपद व॥ १३ हयात शिक्षण मराठी ३ री.

प्रथम विवाह—शके १८३० वैशाख शु॥ १५ संतती शके १८४० आश्विन शु॥ ११ मुलगा झाला तो चार दिवसांनीं मरण पावला व कुटुंबहि शके १८४० आश्विन व॥ २ ला बाळंतपणांतच इन्फ्लुएंझानें वारले. स्त्रीसुख उत्तम सासरची स्थिति चांगली, स्वभाव शांत. नंतर दुसरा विवाह शके १८४१ फाल्गुन व॥ ५ सासरची स्थिति गरीबीची स्त्रीचा स्वभाव क्रोधी अतिशय तापट प्रकृती अशक्त, वर्ण गौर, मोळसर आज वय १८ ची. संतती—शके १८४५ जेष्ट व॥ १४ कन्या हयात सुदर सशक्त. विद्यासुख—मराठी व इंग्रजी मॅट्रिकपर्यंत ड्राइंग थर्ड ग्रेड पास. आवडत्या गोष्टी—गारुडी विद्या, पोहणें, वैद्यकी. अतिशय आवडत्या गोष्टी—वाचन वर्तमानपत्रें. व्यसन—तपकिरीचें व विडीचें. कोर्टांत जाण्याचा प्रसंग—फौजदारींत हिंदु-मुसलमानांचे झगड्यांत आरोपी या नात्यानें ६ महिनेपर्यंत त्रास परंतु अखेर निर्दोष सुटका शके १८४४ जेष्ट शु॥ १४ ला सुटका करून घेण्यास द्रव्यखर्च अतिशय. दिवाणींत—शेताचे तंट्यासंबंधी प्रतिवादी म्हणून जाणे भाग पडले. लोकांकडून मान—तालुका कांग्रेस कमेटींत कार्यकारी मंडळाचा सभासद, अध्यक्ष स्कूल कमेटी सेक्रेटरी देवस्थान बालाजी. सरकारकडून अद्याप कांहीं नाहीं. सत्तेचे घर नौकर-चाकर, जमीनजुमला यांचे सौख्य साधारण ठीक आहे. स्वसंपादीत व वडिलोपार्जित ५२ एकर ३० एकर अशी जमीन आहे. मुख्य धंदा शेतीचा आहे. शिवाय थोडकेसें गहाण गृहा सावकारी वगैरे करीत असतो सालीना वार्षिक उत्पन्न २००० दोन हजार पर्यंत आहे त्यांत खर्चहि अतिशय आहे मात्र उत्पन्नाचे बाहेर नाहीं कर्ज वगैरे कांहीं नाहीं. भाग्योदय—वयाचे २५ वे वर्षापासून शके १८४१ पासून शेतीपासून द्रव्यद्दष्ट्या फायदा. तीर्थयात्रा— विशेष नाहीं फक्त १० वे वर्षी व १७ वे वर्षी दोनदा पंढरपूरची यात्रा. शत्रूपीडा व विरोध—चुलत चुलत्याकडून बक्षिस ता. २४।५।१९ संबंधीं.

ग्रहयोगदृष्ट्या विवेचन—

मिथुन लग्नास—बुध, गुरु, शुक्र, शुभ शनि मध्यम मगळ, रवि, अशुभ लग्नेश बुध, सहजस्थानीं पचमेश शुक्र, धनस्थानीं दशमेश गुरु, तनुस्थानीं, नवमेश शनि, सुतस्थानीं

दशमस्थान पितृसौख्याचे आहे परतु तेथें राहु आहे व राहुमहर्दशेंत जन्म झाला म्हणून वडील वारले त्या वेळची ग्रहदशा शु. म. मूळच्या शनिचद्राशीं युति करतो व केतुशीं रवि, चद्र, बुध–युति करतात शनि व्ययस्थानीं येतो गुरु पष्ठात त्याच वेळीं आईचें स्थान चतुर्थ हेंहि पापग्रहानें मूळ केतूनें व्याप्त आहे व तेथें अशुभ ग्रहांची युति होते म्हणून आईहि मरतामरतां वाचली कुटुंब वारले त्या वेळीं शनि, रवि बुधाशीं युति व रवि-चद्र शनिशीं युति करतो मगळ राहु षष्ठात आले पचम स्थानांत सुतस्थानात रवि चद्र शनिशीं युति करतो .शके १८४० आश्विन शु॥ ११ ला म्हणून मुलगा वारला आतां या वर्षीं गोचरीचा गुरु जन्मराशीपासून दुसरा आला आहे त्यामुळें २१।५।२४ रोजीं एक घर विकत घेण्यांत आले ता १४।९।२४ रोजीं तालुका कांग्रेस कमेटींत कार्यकारी मडळावर सभासद निवडून आलो व ता २८।१२।२३ रोजीं एक शेत विकत घेऊन त्याला ९०० रु ईसार दिला व इसारचिठ्ठी लिहुन घेतला परतु त्या वेळची ग्रहदशा अनुकूल नव्हती म्हणून अजूनपर्यंत त्यासबधी विक्री पूर्ण झाली नाहीं शिवाय विकणारी मेली पुढें काय होईल तें असो कारण या वेळीं साडेसातींत आहों आजपर्यंत अनुकूल काळ गेला अजूनपर्यंत कोणतीच अडचण पडली नाहीं केंद्रस्थानीं गुरु म्हणजे लग्नीं आहे त्यामुळें तो बलवान ग्रह दिसतो व म्हणूनच शरीरास कोणतेहि प्रकारचा आजार भयकर झाला नाहीं. शिवाय शुक्र धनस्थानीं असल्यामुळें पैशाचीहि बहुधा आजपर्यंत अडचण पडली नाहीं सुतस्थानीं शनिचद्र वाईट दिसतो परतु त्यावर गुरुची पूर्ण दृष्टी असल्यामुळें सततीवर त्याचा विशेष अनिष्ट परिणाम होईल असें वाटत नाहीं. पचमस्थानांत शनि असल्यामुळें विद्येला अडथळा मॅट्रिकमध्यें आलाच सार्वजनिक कामाची दगदग मागें फार आहे

कुडलीक्रमांक ९६

श्रीशके १८२० श्रावणेमासे कृष्णपक्षे ११ तिथौ शनौ ता १३-८ १८९८ जन्मेष्ट घटी ५४ ३१

जन्मकुंडली

**आयुष्यातील महत्त्वाच्या गोष्टी.**

शरीरवर्णन—शरीर उंच सहा फुट रंग ( गोरा नाहीं व फार काळा नाहीं ) प्रकृती सदृढ व शरीर बारीक, डोळ्यानें कमी दिसते ( ऐनक उलटे वाटवीची लागते अगदीं जवळून पाहावे

लागतें ) कपाळ अगदीं लहान कपाळाची उंची दोन तीन बोटें. अत्यंत बिमारीचीं वर्षें—जन्म झाल्यावर सहा किंवा आठ महिन्यांचा असताना आईचें स्तनास मोठे फोड होऊन आई बिमार झाली व मला दूध न मिळाल्यामुळें मला संकट, व एका दाईचे दुधावर जगलो. वयाचे तिसरे वर्षी छटांचे रोगानें अती बीमार झालो. अगदीं मरणोन्मुख बिमारी झाली, वयाचे, ११ वें वर्षी फार बिमार झालो, विषमज्वर वयाचे सोळावे वर्षी म्हणजे सं.१९७० चे फाल्गु. शु. मधें सन १९१४ माहे मार्च मधें बीमार ( वयाचे १५॥ वर्षी ) बीमार झालों व शेवटीं संवत १९७९ चे आश्विन शु. ४ पासून ता. १४-११-२३ महिन्यांत मुदतीचा ज्वरानें बीमार झालों ( वयाचे २५ वे वर्षी ) आईचा मृत्यु—सं. १९७७ चे श्रावण व॥ ५ रोजीं म्हणजे (१९२१ चे आगष्ट ता. ३) आई प्रथम ( १९७६ चे कार्तीकमध्यें फार बीमार होऊन त्यांतून साधारण बरी होऊन पुढें खंगत जावून वरील मित्तीस मरण पावली. आईस मरण्याचें पूर्वी चारपांच महिनेपर्यंत फार बीमारी वाढली होती. बाप—ह्यात आहे. आजा ह्यात आहे. पूर्वार्जीत सांपत्तिक स्थीती—माझे जन्माचे चार पांच वर्षापूर्वी नोकरीहून घरीं बसले, व पुढें धंदा केला त्यावेळेपासून तर १९२० चे एप्रीलपर्यंत परीस्थीति बरी व एकदम रुई घटून दुकान कची झाली व कुलत्यांनीं मुंबईला दुकान घातली. त्यातही ३ लाख घाटा येऊन ती व्याद आमचेवर येवू पहात आहे. व आजपर्यंत ऋणग्रस्तस्थीती आहे, कोर्टांत झगडे. सध्यां सांपत्तिक स्थीती—ऋणग्रस्त, कचेरी कोर्ट सुरु आहेत. भावंडें—मी व मला एक धाकटा भाऊ आहे, माझे भावानंतर १० अपत्यें झाली परंतु सर्व मरण पावली. वाचली नाहीं. विवाह—संवत १९७० चे वैशाख शु. ९ संध्याकाळीं लग्न झालें, स्त्रीचा रंग माझे सारखा, नेहमी उष्णवात व मलपीत्तानें बीमार असते, सासरा वगैरे नाहीं. संतति—सन १९१७ चे मार्चमध्यें म्हणजे चैत्र सं. १९७३ मध्यें एक मुलगा झाला, व १० वें दिवशीं मरण पावला. सन १९१८-८ ता. २५ म्हणजे सं. १९७४ चे श्रावण व. ४ रोजीं गौरवर्णावर मुलगी झाली. ( × × ) सन १९२०-१० ता. २ म्हणजे भाद्रपद वद्य ५ रात्री जन्म. ( × × ) सन १९२२-११ ता. ४ म्हणजे सं. १९७९ चे कार्तिक शु. १५ रोज शनवार रात्री १० वाजून १०-१२ मिनिटांनीं मुलगा. ( × × कुमार ) सन १९२४ चे ११ ता. २४ कार्तिक व. १ रोज बुधवार दुपारी ३॥ ला ५ मिनिटे कमी असताना मुलगा झाला. ( × × ) विद्या—नाहीं. सन १९१४ चे मार्च एप्रीलपासून शाळेंत गेलो नाहीं. इंग्रजी २ इयत्तेमधून शाळा सोडली. ( सं. १९७० चे चैत्र वैशाखपासून ) धंदा—आजाचे दुकानचे वाण्याची सावकारी व रुईचा व्यापार ( यात मी काम कर्ता ) हल्लीं परिस्थिती खालावलेली. नेहमीं कोर्ट करावें लागते. आप्तवर्ग—मामा ४ पैकीं १ वेडा असलेला कायम बाकी मरण पावले. मावशी मरण पावली, १६ वर्षे झाली आहे. भाऊ फक्त एक आहे. पण दात, कान रोगानीं पीडलेला आहे, सासू आहे, दोन मेव्हण्या आहेत. संकटकाल—सन १९२० चे मे पासून आजपर्यंत संकटें आहेत. स्वभाव—उतावळा, बडबड्या, विरोधी, हिंमती, हल्लीं कोर्टांत दावे चालू सर्व कुटुंबाचे माणसांवर कोर्टांत सावकाराचा जॉइंट फ्यामिली म्हणून दावा चालु आहे. दाव्याचा आपसांत निकाल दाव्याचे निम्मे रुपये देऊन केला, परंतु रुपये घेऊन सावकार बदलून गेला आहे. प्रकरण नादारीन सुरु

आहे.ता. १९-६-२२ दा. दाखल दाव्याचा आवसांत निकाल ता. १८-१२-२३ रोजीं केला परंतु पैसे घेऊन सावकार पैसे पावले नाहीं असें कोर्टांत म्हणतो.

कुंडलीक्रमांक ९७

ता. ५।११।१८९२ श्रीसूर्योदयातगत घ. ३१ पळें ३३ तत्समये जन्म.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

आतां ह्या कुंडलीविषयीं विचार करूं. या कुंडलींतील महत्पदर्शक योग दशम केंद्री गुरु हा होय. दशमस्थ गुरू राजमान, मोठेपणा वगैरे देतो. परंतु गुरू हा ग्रह समुच्चय वाचक असून, दशमस्थान हें कर्मस्थान आहे. यामुळें दशमस्थ गुरू कर्मक्षेत्राचा समुच्चय संबंध दाखवितो. ( या कुंडलीवाल्यांनीं बहुजनसमाजविषयक कार्य करण्यांत बराच काल घालविला ) गुरु-बुध त्रिकोण व बुध शुक्र लाभ, हे बुद्धियोग व शनि नेपच्यून त्रिकोण हा अध्यात्मिक पण व्यवहारांत चिकाटी स्वरूपानें दिसणारा योग, ह्या योगामुळें दशमस्थ गुरूनें येणारा नामधारी मोठेपणाच दिसत नसून, मोठेपणानें लोकांवर छाप बसविण्याची, महत्वाचीं कृत्यें करण्याचीही शक्ति व्यक्त होत आहे. राहू हा एकादशस्थ असल्यामुळें ( या कुंडलीवाल्यास राजकारणांत पाडण्यास कारणीभूत झाला.) तेंच पंचमेश शुक्राच्या पंचमांतील वास्तव्याविषयीं म्हणतां येतें. या कुंडलींतील राजकारणाचे विशिष्ट योग म्हणजे मूळ तारका पुंजांतील बुध, व लग्नेश ( बुध ) दशमेश ( गुरु ) यांचा शुभकारक त्रिकोण योग हे होत. प्रस्तुत कुंडलींत अधिकाराचे योग फार चांगलें दिसतात. गुरु दशमांत व स्वतः तोच दशमेश असून रवीशीं अत्यंत शुभ योग घडून आणला आहे. ज्यांचा दशमेश गुरु असतो त्यांचा शिक्षणविषयक संस्थांशीं संबंध असतो. वरील कुंडलींत धनेश चंद्र शनीशीं व गुरूशीं शुभ संबंधांत आहे. ( यांना पैशाची विवंचना कधींच पडली नाहीं ) ( हें सध्यां युनिव्हर्सिटी कोर्टाचे सभासद आहेत ) रवि, नेपच्यून व शनी, गुरु हे दोन कुयोग वरील कुंडलींत दिसतात. (यांना अतिशय अडथळे आणि पदोपदीं संकटें आलीं ) नेपच्यून व्ययांतून व शनी चतुर्थांतून प्रतियोग करीत आहेत. म्हणून हे योग विशेषतः ( आयुष्याचे शेवटीं त्रास देतील ) नवमांत धर्मस्थानीं मंगळ आहे. पंचमांत शुक्र आहे. व या दोन ग्रहांचा त्रिकोणही झाला आहे. यावरून कोणत्या तरी देवतेची उपासना व्यक्त होत आहे. ( हे देवपूजादि कृत्यें नियमानें करीत असतात.) नवमस्थान लांबच्या प्रवासाचें आहे व त्यांत मंगळ हा चरस्वभावी

ग्रहही आहे 'चंद्र नेपच्यूनही सख्य ठेवीत आहे (हे विलायतेस शिक्षणाकरितां गेले होते.) दशमस्थ गुरु, धनेचा बुध, पंचमेश शुक्र, हे योग व त्यामध्यें सर्वश्रेष्ठ असा उपजिविकेश गुरूचा कायदेपंडित धनस्थ बुधाशीं झालेला योग, हे या कुंडलींत चांगले योग असून त्यांना विद्येंत चांगलें यश आणणारे आहेत (हे एक कायदेपंडित आहेत) नवमेश व शेतीशीं संबंध दाखविणारा स्थावर वाचक शनि चतुर्थांत असून त्याचा धनेशाशीं शुभसंबंध झालेला आहे (यांचेंजवळ शेतावाडी बरीच आहे) चंद्र हर्षलनपीडित आहे सप्तमेशाचा प्रतियोग झाला आहे. हे योग विवाह उशिरा दर्शवीत आहेत गुरु शुक्राचा प्रतियोग दूरचा असल्यामुळें तो लग्न लवकर घडून आणण्यास समर्थ नव्हता (त्यांचें लग्न वर्याच्या ३० व्या वर्षी झालें.) सप्तमेश दशमांत बलवान असून तो लग्नेशाशीं शुभ संबंधीत आहे (पत्नी राजकुलोत्पन्न मिळाली) पंचमांत केतू व शुक्र आहेत, हे दोन्ही प्रथम कन्या संतति दर्शवितात (त्यांना १९२३ जुलै-मध्यें कन्या रत्न झालें.)

कुंडलीक्रमांक ९८

श्रीशके १८१४ पौष शु ८ सूर्योदयातगत घ २७ प. २४ समये जन्म.

जन्मकुंडली

स्पष्टग्रह

| र. | च. | म | बु. | गु. | शु | श. | रा. | ल. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ८ | ११ | ११ | ७ | ११ | ७ | ५ | ० | २ |
| १७ | २६ | ११ | २४ | २७ | १७ | २३ | १६ | १७ |
| ५२ | ७ | १४ | ५० | ३ | २६ | ४४ | २२ | ५२ |
| २६ | ० | ० | ९ | ० | ० | ० | ० | २६ |

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

आतां या कुंडलीमधील महयोग पाहू कुंडलींत बुध व शुक्र यांचा शनीशीं त्रिरेकादश-योग होत आहे शनी २३ अंशांत असून बुध २४ व शुक्र १७ अंशांत आहे. म्हणजे शनीशीं बुधाचा योग होऊन गेला असून शुक्राचा मात्र जन्मानंतर कांहीं दिवसांनीं होईल येथें लग्नेश बुध, पंचमेश शुक्र आणि भाग्येश शनि, यांचा हा त्रिरेकादश योग महत्वाचा आहे. चंद्र, मंगळ, गुरु, यांच्याशीं दशमस्थानांतून होणारा त्रिकोण योगही महत्त्वाचाच आहे. पण तो झालेला नसून

जन्मानतर बऱ्याच दिवसानीं होणारा आहे. जन्मकाळीं गुरु-चद्राचा युतियोग होत आहे, तद्वतच शनि, गुरु, चद्र, मंगळ यांचा प्रतियोग दिसतो. पण अशात्मक पाहिलें असतां कोणाचाच योग पूर्ण नाहीं. शनीशीं रवि, व चद्र मगळ गुरूशीं रवि, केंद्रयोग करीत आहेत असें वाटतें. पण अशात्मक पहातां मगळाशीं केंद्रयोग जन्मापूर्वींच होऊन गेला असून चद्र गुरूशीं अशात्मक योग नाहीं. फक्त शनीशीं मात्र केंद्रयोग होण्याचा काल जवळ आलेला आहे. याप्रमाणें योग होत असल्यानें बुद्धि, विद्या, सपत्ति, मानसन्मान वगैरे गोष्टींची अनुकूलता या मनुष्यास स्वपराक्रमानें मिळेल. भावी केंद्रयोग रवीशीं व शनीशीं प्रतियोग दशमांतील मगळाशीं व गुरूशीं, यामुळें वडील वारले. रवी-गुरूचा शनीशीं केंद्रयोग असता त्या मनुष्यावर जबाबदारी फार लवकर पडते. सन १९१४ पासून शनि मिथुनेस येऊन दशमस्थानीं व त्यांतील ग्रहांशीं केंद्रयोग करू लागला. त्या वेळेपासून परिस्थितीमध्यें एकदम फरक पडून अतिशय त्रास द्रव्यचिंता वगैरे घडली. त्यानतर पुन शनीनें १९१६ सालीं चद्र मगळ गुरूशीं केंद्रयोग केला, तेव्हा पुन्हा स्थिति पालटली. पुढें १९१८ ते १९१९ याच्यांत शनीचा पूर्ण त्रिकोण होता त्या वेळीं उत्कर्षानुकूल काल आला. याप्रमाणें ग्रहयोग व त्यांचें परिणाम स्पष्ट केलें आहेत.

### कुंडलीक्रमांक ९९

श्रीशके १८१५ कार्तिकेमासे वद्यपक्षे चतुर्दश्यां तिथौ गुरुवासरे घ. ३१ प ३८ समये जन्म. मु टा. ७ वा ३० मि. जन्म तारीख ७ माहे डिसेंबर १८९३

जन्मकुंडली

### आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—सडपातळ आणि उच. स्वभाव रागीट आवड निवड सर्वसाधारण, रूप साधारण रग काळासावळा चिन्हें डाव्या गालावर वरचे बाजूस एक चामखीळ. गडांतरें. व मोठाले आजार—वयाच्या ६ व्या वर्षापर्यंत एकदर चार भयकर अपमृत्यु गेले नक्की तारीख माहीत नाहीं १ प्लेग २ कदत दुधांत पडून कमरेखालील अर्धे अग भाजून गेले. उश्वास वद झाला होता. आई व वडिलांचें सौख्य—वडील ६ व्या वर्षी मृत्यू वैशाख महिना. मातोश्री मृत्यू जून १९१९ ( ज्येष्ठ पौर्णिमा ) आई व वडिलांस मोठाले आजार—वडिलांचा मृत्यु पुण्यास अपघातानें मातोश्रीचा मृत्यू पुण्यास कॉलऱ्यानें. वडिलांचा धदा—कॉन्ट्राक्टर महिन्याचें उत्पन्न २५०–३००. भावडें एकदर—६ त्यांत हयात ३ पाठीवर बहीण, आधीं

बहीण, ३ भाऊ आणि ३ बहिणी व मी स्वत ७ वा. सर्वांत वडील भाऊ व २ वडील बहिणी मृत. विवाह—एकच १९११ मध्यें झाला व सौभाग्यवती हयात आहे. स्त्रीची प्रकृति—वात. ठेंगणी व काळीसावळी, तोंड वाटोळे सतति—प्रथम पुत्र सप्टेंबर १९१९ मृत्यू मे १९२०. द्वितीय कन्या जन्म ता. १४ जून १९२२ हयात. तृतीय मृत मुलगी जन्मलों ता. २४ नोव्हेंबर १९२४ आजपर्यंत एकदर सतती ३ पैकीं हयात १ मुलगी. स्वत स कायमचा विकार स्वत स कायमचा विकार पोटात दुखणें व पित्त विकारामुळें शरीरांत उष्णता विद्या कोठपर्यंत—विद्या मराठी ६ इयता व इंग्रजी ४ इयत्ता शाळा सोडली १९१०. भाग्योदय नोकरीला सुरुवात १९१० पासून. भाग्योदय अद्याप झालेला नाहीं. नोकरी एके ठिकाणी टिकत नाहीं मात्र एक सुटली कीं दुसरी ताबडतोब मिळते. नोकरीमध्यें नफा नाहीं व नुकसानही नाहीं. स्वत वर व्यावहारिक जबाबदारी—१९११ पासून. आज महिना उत्पन्न फक्त रु. ५०. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल–मुळींच झाला नाहीं. सांपत्तिक दृष्ट्या अत्यत वाईट काल—सांपत्तिक दृष्ट्या वाईट काल नेहमीचाच आहे फक्त दोन वेळजेऊन खाऊन सुखी व डोक्यावर १००-१५० रु. चे कर्ज नेहमी असते. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल—मुळींच नाहीं. कोणत्याही कार्यांत यश-अपयश—नेहमी अपयश येतें. सरकार अगर लोकांकडून मान—खालच्या दर्ज्याच्या लोकांकडून मान नेहमी मिळतो. कोर्टांत जाण्याचा प्रसग आला—नाहीं. नोकरी—नोकरी सुरुवातीपासून आजपर्यंत इंजिनियरिंग खात्यांत. नातेवाईकांची स्थिति—नातेवाईकांपैकीं मामा व चुलत चुलत्यांची परिस्थिति चांगली परतु त्यांनीं आमची वास्तपुस्त मुळींच घेतली नाहीं ३ मामा सर्व मृत. ३ मावशा सर्व मृत. सत्तेचें घर, वाहनें—सत्तेचें घर, वाहनें व जमनिजुमला मुळीच नाहीं. नोकरचाकर नोकरीमध्यें स्वकष्टार्जित आहेत.

### कुंडलीक्रमांक १००

श्रीशके १८०१ कार्तिकेमासे शु पक्षे चतुर्थ्यांतिथौ इंदुवासरे श्रीसूर्योदयात् इष्ट घ. ३४ प. १४ समये जन्म

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—शारीक स्थिति पूर्वी चांगली होती. हल्लीं साधारण. स्वभाव शांत. आनद सत्याची रुप गौरवर्ण आई व वडिलांचें सौख्य—लहानपणींच दत्तक योग चुलत्यास दिला होता. दत्तकवडिल माझे वयाचे ३३ वे वर्षी मयत. आजार अर्धांगी, दत्तक आईस १९२०

साली मयत. आई व वडिलांस मोठाले आजार—जनक वडील सन १९२५ जानेवारींत वारले. जनक आई ह्यात आहे. वडीलांची मूळ सांपत्तिक स्थिति—दत्तक वडिलांची सांपत्तिक स्थिति साधारण चांगली होती, त्याचे मृत्युवेळीं घराशिवाय रोकड पैसा जास्त नव्हता-वडिलांचा धंदा—व्यापार. धंद्यांत अगर नोकरींत भयंकर काळजीचे व असह्य प्रसंग—माझे धंद्यांत काळजीचा प्रसंग सन १९२३ जुलैपासून सुरु झाला आहे तो अद्याप काळजींतच दिवस काढावे लागत आहेत आहेत, दुसऱ्याचे भागीनें व्यापार मोठ्या प्रमाणानें आहे पण काळजी कमी होण्याजोगी स्थिति नाहीं. औरस भावंडें एकंदर—६ त्यांत हयात ६, पाठीवर भाऊ, आधीं नाहीं ६ भावंडें मृत. विवाह—शके १८१५ फाल्गुन मासीं विवाह झाला. स्त्रीची प्रकृति—बायको माझे वयाचे ३७ वे वर्षी बाळंत होऊन मयत झाली. शके १८३८ माघ व. १४ रोजीं मयत. संतति—प्रथम पुत्र दीड वर्षाचा होऊन वारला नंतर पुत्र शके १८२१ सालीं झाला. एकंदर पुत्र ५, कन्या ४, कन्या १ प्लेगनें मयत, बाकी मुलें ह्यात आहेत. विद्या—विद्या १३–१४ वर्षी मराठी ५ व इंग्लिश पहिली इयत्ता असतानाच शाळा सोडून व्यापारांत शिरलों. भाग्योदय—पंधरावे वर्षापासून व्यापारांत दिवस गेले, साधारण गेले पण आतां शके १८४५ पासून फार त्रासदायक दिवस आहेत व कर्ज बरेंच वाढलेलें आहे. स्वत:वर व्यावहारिक जबाबदारी—शके १८३४ पासून. सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत वाईट काल—शके १८३४ पासून साधारण व्यापार कमी होत जाऊन खर्च वाढत गेला व आतां तूर्त तर फार काळजींत आहे. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल—शके १८३३ पूर्वी म्हणजे दत्तक वडिलांचे ह्यातीपर्यंत. कोणत्याही कार्यांत यश-अपयश—व्यापारांत मोठ्या प्रमाणानें व्यापार केले पण यश येत नाहीं. सरकार अगर लोकाकडून मान—लोकांत मानमान्यता साधारण आहे पण पैशाशिवाय तो मान खोटा ठरतो. संकटें—लोकांचे बरेंचसें देणें असलेमुळें रोज निकडी लागत असतात पण आजचें उद्यां करून भागवून नेत असतों. कोणाकडून दिवाणी वगैरे कोर्टाचे त्रास अजून झालेले नाहींत, कोर्टाचा प्रसंग आज मितीपर्यंत तरी आलेला नाहीं, उद्यां देव जाणे. नोकरी व्यवसाय—पंधरावे वर्षापासून व्यापार. वडील ३३ वे वर्षी वारले, नंतर स्वत:वर जबाबदारी पडली नंतर पासूनचे व्यापारांत दलालीसारखा धंदा होता व स्वत: व्यापारही होता हल्ली ३ वर्षे दुसऱ्याचे भागीनें मोठ्या प्रमाणानें व्यापार येथेंच आहे पण फायदा नसून उलट भागीदाराचें देणें झालें. दत्तक—दत्तक योग माझे लहानपणींच झाला. लग्नाचे वेळीं विधानपूर्वक झाला. मोठ्या मुलांची बौद्धिक व सांपत्तिक स्थिति व विद्या—मोठा मुलगा माझेबरोबरच व्यापारांत असतो. विद्या मराठी ७ वी इयत्ता व इंग्लिश ५ वी झाली आहे. सत्तेचें घर—घर गहाण आहे. शिवाय जमीन वगैरे नाहीं.

## कुंडलीक्रमांक १०१

श्रीशके १८२६ वैशाखेमासे शुक्लपक्षे ११ तिथौ भौमवासरे ( या दिवशीं सकाळीं स्टँडर्ड ११ वाजण्याचे सुमारास जन्म. )

कुं. उ. भा. ४ फा...१२

जन्मकुंडली

४ | २बु | चं५ | ३ | मं१२ | ६रा | शु १२गु | ७ | १ | ११ | ८ | श१०

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शरीरवर्णन—सडपातळ, निरोगी, तीक्ष्ण नेत्रदृष्टी, उष्ण प्रकृती, शारीरिक व्यंग नाहीं. वर्ण [ सध्या आजारामुळें फिकट गोरा ] काळसर, राजस पदार्थाची आवड, वाचण्याचा विलक्षण नाद, बुद्धि तीव्र, मेंदूला त्रास होईल, अशांचा उदाहरणार्थ [ गणित, आकडेमोडीचे काम ] तिटकारा, विद्या अभिरुची परंतु ती पुरी न होणें. साधुसंताविषयीं आदर, चिकित्सक बुद्धि, स्वभाव शांत, व दयाशील. आजारी वर्षे—लहानपणीं विशेष मोठ्या स्वरूपाचा असा आजार नाहीं. मधून केव्हां केव्हां काविळीचा विकार असे. १९१८ मधील इन्फ्लुएंझाचे सार्थीत १ महिनाभर फार आजारी. शके १८४५ पासून आजारास थोड्या थोड्या प्रमाणांत सुरवात झाली. सुरवातीला प्रथम अग्निमांद्य, पोटांत वात धरणें, मज्जातंतूची अशक्तता, हृदयकंप इ. तदनंतर शके १८४५ मार्गशीर्ष व. मध्यें प्रकृती डॉ.स दाखविण्यासाठीं मुंबईला गेलो. तेथें तब्येत साधारण सुधारली, परंतु इकडे परत येतेवेळीं मलेरिया ताप लागला तो शके १८४६ कार्तीक अखेरपर्यंत म्हणजे जवळ जवळ १ वर्ष मधून मधून येत होता. शके १८४६ आषाढ, श्रावण, भाद्रपद हे तीन महिने ज्वराचा क्षोभ होऊन फा॥ भयंकर गेले. अंथरुणावरून उठवतही नसे अशी स्थिती होती आत्तां १ महिन्यापासून प्रकृतीला थोडाथोडा आराम पडत गेला परंतु प्रकृती पूर्ण सुधारली नाहीं. व अशक्तता कायम राहिली. प्रकृतींत वरचेवर बदल होतो. मिळून शके १८४५ पासून सारखा आजारी आहे. केव्हां कमी अगर जास्ती इतकेंच. सध्यां विकार, अपचन, अशक्तता, धातुक्षीणता इ. स्वप्नावस्थेचा विकार वयाचे १६ वे वर्षापासून आहे. आईबापाचें सौख्य—वडील शके १८४० चैत्र शु. ८ ला वारले, वडिलांपासून सुख नाहीं. मातृसुख उत्तम, माता हयात आहे. पूर्वार्जीत सांपत्तिक स्थिती— मध्यम. चालू सांपत्तिक स्थिती—उत्तम. वार्षिक उत्पन्न अदमासे २५०० रु. भावंडें—एकंदर माझेसुद्धां १२ भावंडें. त्यांत ७ बहिणी व ५ भाऊ, पैकीं सध्यां हयात आम्हीं ३ भाऊ व २ बहिणी, एक बहीण उपजतच वारली. विवाह—शके १८४४ फाल्गुन शु. ४ रोजीं झाला. भार्या शांत स्वभावाची, निरोगी, स्वरूप मध्यम, वर्ण काळा, सासरची सांपत्तिक स्थिती बरी. विद्या—इंग्लिश ६ यत्ता. विद्येची अभिरुची परंतु मध्यें वरचेवर अडथळे येणें. वडिलांचे मृत्युमुळें शाळा बंद. खाजगी रितीनें शिकलों. लहानपणीं शाळेमध्यें पहिला नंबर असणें, गणित विषयाचा तिटकारा, इंग्लिश उत्तम. अद्याप स्वतःवर व्यावहारिक जबाबदारी नाहीं. वडील बंधु सर्व कारभार पहातात. स्वतः आजारामुळें शके १८४५ पासून कोणतेंही काम पहात नाहीं. कारण ताकदच नाहीं. आप्तवर्ग—मामा १, मावश्या ७, पैकीं हयात १.

आत्या ७, पैकीं हयात ३, चुलते २, दोनही मयत. आम्हीं तिघे बंधू असून एकत्र आहोंत वडील बंधूचे वय अदमासें ४२. स्वतःचे वय ३२ वें चालूं व कनिष्ट बंधूचे ३० वें चालूं. धंदा, व्यापार, शेती व देवघेव. अंदाज वार्षीक उत्पन्न वर दिलेंच आहे. वयाचे १२ वे वर्षी विहिरींत पडणेचा अपघात झाला. विशेष इजा झाली नाहीं, पडण्याच्या अशा २ खुणा कपाळावर आहेत. रक्तस्राव बराच झाला, परंतु तब्येत अगदीं लवकर सुधारली. वयाचीं १६-१७-१८ हीं वर्षें मुंबईस नोकरी सरकारी करणेंत गेलीं. वडील बंधूबरोबर त्यांनीं दाखविलेल्या तिरसट वृत्तीमुळें भांडण करून मुंबईला गेलों तेथें सरकारी नोकरी करणेचा प्रसंग आला. तेथें खाजगी रितीनें इंग्लिश भाषा शिकविली. नंतर कांहीं आकस्मीक कारणानें ता. १२-४-२२ रोजीं राजिनामा देऊन घरीं आलों. मुंबईस सर्व खर्च नोकरी करूनच भागत असे व सदर मुदतींत घराकडून एक पैची मदत मिळाली नाहीं. कारण नसतां नोकरीचा हा योगायोग. सर्व जन्म सुखांत गेलें कारणानें नोकरीचे त्रासानें प्रकृतीवर फार वाईट परिणाम झाला. मेंदूचे अशक्तता-व अपचन यांचा विकार जडला. स्वप्नावस्थाही वरचेवर होत असे मात्र तिचा उगम मुंबईस जाणेंपूर्वीच झाला. एकंदरींत प्रकृतीमान १५ वर्षें पर्यंत अगदीं उत्तम गेलें. त्यानंतर १६-१७-१८-१९ हीं मध्यम व २०-२१-२२ पासून बहुतेक घरांत पडून आहे. शके १८४५ मध्यें मीं आजारी पडले नंतर माझे पाठीमागून माझे दोघेही बंधु आजारी पडले कारणानें शके १८४५ हें वर्ष फार वाईट गेले, घरचा व्यवहार पहाणेस आम्हां तिघां बंधूतून एकासही प्रकृतीचे अस्वास्थ्यामुळें शक्य नव्हतें. त्यामुळें शके १८४५ हें साल फार त्रासाचें व काळजीचें गेलें. स्वतःची तब्येत मात्र अद्याप नादुरुस्तच आहे. प्रकृतीचे अस्वास्थ्यामुळें बेचैनपणा असणें जिवित कंटाळवाणें वाटणें असें वरचेवर होतें.

श्रीशके १८२१ चैत्र कृष्ण १२ शनिवार रोजीं सूर्योदयातगत घ. ४९ प. ४२ जन्म.

जन्मकुंडली

प्रथम पुत्र—व्यापारांत आहे.

श्रीशके १८२७ माघमासे शुक्लपक्षे सप्तम्यांतिथौ.

जन्मकुंडली

द्वितीय पुत्र—तूर्त × × × नोकरी आहे, ऑफिसमध्यें ४५ रुपये पगार आहे, विद्या—इंग्लिश ६ इयत्ता पास झाल्या आहेत.

श्रीशके १८३३ मार्गशीर्ष कृष्ण ७ मंगळवार रोजीं जन्म, सूर्योदयातगत इष्ट घ १० ४०

जन्मकुंडली

तृतीय पुत्र.

श्रीशके १८३५ चैत्रमासे कृष्णपक्षे पष्ठयातिथौ श्रीमन्मार्तंडमंडलोदयादिष्ट घ. ४५ पळे१२.

जन्मकुंडली

चतुर्थ पुत्र.

कुंडलीक्रमांक १०२

श्रीशके १७७७ फाल्गुन कृ. ६ जन्म दिवसा ११ ते ११। जन्म

जन्मकुंडली

आयुष्यातील महत्त्वाच्या गोष्टी.

शरीरवर्णन—सडपातळ, डोळे काळे, चेहरा गोल, दांत मध्यम मोठें, वर्ण कृष्ण, कपाळ उंच, स्वभाव तापट, महत्वाकांक्षी, उजव्या मनगटावर व उजव्या तळपायावर तीळ. व्यंग नाहीं.

प्रकृती—मध्यम सशक्त. खरेपणाची व परमार्थाची आवड, त्यांतही परमेश्वर चिंतनाची आवड फार. स्वतःस आजार—वयाचे ३।४ वर्षेपावेतों आजार फार, वाचण्याची आशा नव्हती, त्यावर आजपावेतों ४।५ वेळां हिंवतापाचा आजार, आठआठ पंधरापंधरा दिवस. ५०-५२ वर्षाचे दरम्यान ४ महिने खोकला फार होता परंतु निजून नव्हतो. आई व वडिलांचे सौख्य—वडील वयाचे ८ अगर ९ वे वर्षी चैत्र व॥ ९ रोजीं कालज्यानें वारले व आई वयाचे ३९ अगर ४० वे वर्षी म्हातारपणाचे तापाचे आजारानें श्रावण व॥ ११ रोजीं वारली. सांपत्तिक स्थिति–द्या दिवसाचे मानानें खाऊनपिऊन सुखी. धंदा—गुमास्तेगिरीनें कुळकर्णीपणाचा व थोडी सावकारी व घरची शेती, त्या वेळचे मानानें महिना उत्पन्न रु. ५०. भावंडें—माझेसुद्धां ७, आज हयात नाहींत. पाठीवर १ भाऊ १ बहीण, आधी ३ बहिणी १ भाऊ. विवाह—१६ अगर १७ वे वर्षी फाल्गुनांत झाला, तेंच कुटुंब आजपावेतों हयात आहे. स्त्रीची प्रकृती—सशक्त, ठेंगणी, वर्ण सांवळा, तोंडावर फक्त देवीचे थोडें वण, सबंध आयुष्यांत ३।४ वेळां हिंवताप आठआठ पंधरा-पंधरा दिवस, थोडी मुळव्याधीची व्यथा आहे परंतु त्यामुळें कधीं निजून नाहीं. संतति—प्रथम २ कन्या, त्यावर २ मुलगे, व १ मुलगा, पैकीं हयात कोणी नाहीं. ४ लहानपणीं वारले. ( २ मुली व २ मुलगे ) एक मुलगा संवत १९३९ माघ शुद्ध १२ ला होऊन, संवत १९७२ आषाढ शु. ३ला वारला जलोदरानें. *१ मुलगी सन १९०४ आश्विन शु. ५ रोजीं प्लेगनें.* २ मुली होऊन वारल्या त्यांना संतती नव्हती. १ मुलगी संवत १९७९ मार्गशीर्ष शु. १५ रोजीं *बाळंत होऊन वातानें वारली, तिला २ मुली २ मुलगे आहेत. मुलगा वारला त्याचीही २ मुले आहेत.* विद्या—त्या वेळची मराठी व इंग्रजी चवथी इयत्ता, नापास कधींही झालों नाहीं, शाळेंत हमेशा पहिला अगर दुसरा नंबर, १४ वे वर्षी शाळा सोडली. भाग्योदय—खानदेशात, सोळावे वर्षी कोर्टात कारकून, २७ वे वर्षी नोकरी सोडली व त्याच वर्षी कंपनी मिळून भागीदारींत कापडाचे दुकान काढले, व स्वतः आणखी २ भागीदारीची व देवघेवीची दुकानें काढली व त्यांत मला दरसाल हजार रुपये मिळत होते, ती २० वर्षे चालली. आज महिना उत्पन्न—सावकाराचे येथें फक्त कोर्टाचे काम करण्याबद्दल ५० रु. सन १९०३ सालांत एका सावकारा-पासून त्याचे काम केल्याबद्दल त्या कामांत त्यास मिळालेल्या २०० बिघे जमीन त्याजपासून ७००० रुपयास विकत घेण्याचे ठरवून ॥≈ व्याजासुद्धां रुपये दिल्यावर खरेदी करून *घेण्याचे ठरले, जमीन ताब्यांत घेऊन १० वर्षे वाहिली पुढें जमीनीची किंमत* २०००० झाली त्याचे मनांत कपट आल्यामुळें त्याजवर हिशोबाचा दावा मांडला. सन १९१५ मध्ये केला. त्यानें मजकडे दुसरे प्रकारचे घेण्याबद्दल सन १९१५ मध्यें फिर्याद केली. नंतर त्या फिर्यादींत शेतीचा निकाल होईल म्हणून आम्ही पूर्वीची फिर्याद कोर्टाचे परवानगीनें नवीन फिर्याद करण्यास काढून घेतली व त्यानें केलेल्या फिर्यादींत कैफियत दिली, तिचा उलट जबाब त्यानें दिला नाहीं, सबब त्याचा दावा रद्द झाला ता. २६।११।१७ त्यामुळें आमचे शेताचे काम तसेंच राहिले वरून आम्ही त्याजवर शेताबद्दल स्पेसिफीकचा दावा मांडला. पुरावा चांगला उत्तम परंतु कमनशीबानें म्हणा अगर प्रतिवादी श्रीमंत व न्यायाधीश म्हातारे जुने चालीचे आमचा दावा ता. ६-६-२१ रोजीं रद्द झाला. पुढें ता. १६-७-२१ रोजीं हायकोर्टांत अपील

केले. त्यानेंही खालचे कोर्टाचाच ठराव कायम केला व ठरावही लिहिला नाहीं. ता. १३-११ २२ त्यावर रीवीजन स्टँप पुरा भरल्यास पाहिजे तेव्हां करतां येते व ते करण्याचा विचार होता. उत्तम काल—वयाचे १६ ते ४० उत्पन्न दरसाल १५०० व ४० तें ५० मध्यम ५०-६३ कनिष्ट त्यांतही ६१-६२-६३ अती वाईट ६३-७० साधारण. वरील दाव्याशिवाय यश-अपयश—कधीं नाहीं. धंदा—दोन तीन वेळां खानेसुमारींत सुपरवाझर होतो. लोकांकडून मान—साधारण. हुशार व मुत्सद्दी व प्रामाणीकपणाबद्दल आप्ताशीं विरोध. संकटें—परममित्राकडून. साहाय—आळंदीचे "श्रीमंत ज्ञानोबामहाराज" याशिवाय कोणाचे नाहीं. जमिनदारी—मीं एका मित्रास ५००० रुपये माझे एका पारशी मित्राकडून देवविले, ते बुडविण्यास मी त्यास साहाय न होता पारशी मित्राचे पैसे फिर्याद करून वसूल करून देवविले, त्याचा वचपा काढण्याकरितां माझ्या जाणूनबुजून झालेल्या चुकीचा फायदा घेऊन संवत १९५३ मध्यें माझ्यावर रु. ८०० ची दिवाणींत ठगबाजीची फौजदारीत फिर्याद केली, त्यांत माझ्यावर नुसता चॉर्जही बसला नसून दिवाणींत त्यानें राजीनामा दिला व माझे उलट त्यांजकडे असलेले ६०० रुपये सोडून देण्याबद्दल विनंतीपत्र पाठविले व मी ते त्यास सोडले. अपघात—झाला नाहीं. वयाचे ३०-४५ पावेतों २ वेळां एकदां जिनफॅक्टरीचा सौदा करून दिला त्यांत रु. पांचशें व कपाशी व ज्वारीच्या सट्यांत रु. पंधराशे मिळाले व वयाचे ६६ वे वर्षी एका कंपनीस प्रेसकरितां × × गांवीं जागा माझ्यानें मिळवून देण्याची खटपट केली त्यांत एक हजार रु. मिळाले. सासरची स्थिति—साधारण, तिकडून लाभ नाहीं. आप्तवर्ग—मामा, मावशी, आत, चुलते वगैरे कोणी जिवंत नाहीं व त्यांचा वंशही ह्यात नाहीं. वडिलोपार्जित इस्टेट—घर आहे, तीन शेतें होती ती ६० वर्षांपूर्वी त्यास किंमत नसल्याकारणानें अंगावर सबब त्यांचा त्याच वेळेस राजीनामा दिला. मंगल कार्यांत खर्च—१२००.शके १८१० मुलीचे लग्न, ३०० संवत १९४७-४८ मुलाची मुंज,८०० संवत १९५१ मुलीचे लग्न २२०० संवत १९५२ मुलाचे लग्न ३०० संवत १९७५ नातवाची मुंज ३०० संवत १९८१ नातवाची मुंज. ७०० ज्ञानोबारायाचे कार्तिकीच्या उत्सवाबद्दल. घरणगांवी आमचे गुरु घरीं वा। १३ चे पंक्तीबाबत सन १८९६-१९१० दरसाल रु. ५०. धंदा—कापडाचें दुकान भागीदारी काढून बंद केली त्यांत उधारी फार बुडाली. २-४ हजार देणें राहिले पण ते माझा मोठा दाया बुडाल्यामुळें कोणी मागत नाहीं. हातांत पैसा राहात नाहीं, मात्र कर्मजास्ती विशेष लग्न-मुंजीचा खर्च आल्यास निभून जातो, काम आडून राहत नाहीं. ज्या शेताचा दावा मी हारलो त्यांतील प्रतिवादीचा व माझा ४० वर्षे स्नेह आहे. आधापही त्याचे व माझे बोलणें-चालणें, हास्यविनोद आहे. हायकोर्टांत माझे विरुद्ध निकाल झाल्यावर त्याला त्याचे खोटेपणाचा पश्चात्ताप झाला व म्हणाला, 'मी तुला विनाकारण लोकांच्या सांगण्यावरून बुडविले; परंतु घरीं गेल्यावर तुझ्या नातवाचे नांवावर ५०९ रुपये दरसाल मिळतील अशी जमीन व पहिल्याचे लग्न करून देईन. मी हारल्यामुळें प्रकृतीस कांहीं अपाय करीन म्हणून चार दिवस मुंबईस राहून मला घरीं घेऊन आला व नातवास आणण्यास सांगितलें. माझे म्हणणें मी योग्य व न्यायानें भांडलो तूं कपटानें मला बुडविले. त्याची व मी तुजवर जें उपकार केले त्याबद्दल तुला कांहीं वाटत असेल तर मुलांना पाठविणेचे कारण नाहीं, जें देणें असेल त्याबद्दल कागद त्यांचे नांवानें

करून पाठीव. कारण ज्यापेक्षां मी फिर्याद करून हारलो. त्यापेक्षां कांहीं मागणार नाहीं, अशी अट पडली. माझा नवमस्थानाचा ( नेपच्यून ) मला कमी पडूं देणार नाहीं अशी माझी खात्री वाटते.

कुंडलीक्रमांक १०२

संवत १९५२ शके १८१८ ता. २७ आक्टोबर १८९६ कार्तिक कृ. ६ भौमवासरे इ. घटी ३९।३०।३ पुनर्वसु प्रथमचरणे र. ६।१२।६।५ ल. २।१९।१।३४.

जन्मकुंडली

स्पष्टग्रह

| र. | चं. | मं. | बु. | गु. | शु. | श. | रा. | के. | ह. | ल. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ६ | २ | २ | ५ | ४ | ७ | ६ | ९ | ३ | ७ | २ |
| १२ | १९ | ६ | २५ | १३ | ११ | २७ | २८ | २८ | २ | १९ |

मिथुन लग्नाचे सर्व गुण यांत मिळतात. शरीरकृशता, उंची, हात व बाहू लांब, परंतु शरीर निकलता ही लग्नी मंगळामुळें व चंद्रामुळें असते.

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

मातृनिधन संवत १९६४ अधिक चैत्र शु. ११ म्हणजे मार्च ता. २६-१९०७ रात्रीं एक वाजतां. विवाह—प्रथम सन १९११ मध्यें झाला म्हणजे शके १८३२ फाल्गुन शु. ७ या वेळेस यांचे वय अदमासे चौदा वर्षांचे होते. गुरु गोचरीनें पंचमांतून . व राशीनेंही पंचम अशा दुहेरी बलानें भ्रमण करीत होता. अशा वेळेस सांपत्तिक सुख म्हणजे श्रीमंत सासुरवाडी लक्षाधिपतीसारखे मिळाले. तसेंच शनीही गोचरीनें एकादशांतून व राशीनें एकादश अशा दुहेरी बलानें भ्रमण करीत होता. जन्मकालीन ग्रहामध्यें सर्वांत अधिक अंश बली म्हणजे १२ ते १८चे दरम्यान कुंडलींत दोनच ग्रह आढळत आहेत. म्हणजे गुरु १३ अंशाचा आहे व तोच जायाधिपति आहे, व तो पराक्रमांत मित्रगृही पराक्रमांत पडला आहे. यामुळें इतके श्रीमंत सासुरवाड मिळणें हे योग्यच आहे. या वेळेस शुक्रही गोचरीनें दशमांतून मीन राशींतून म्हणजे आपले उच्च राशींतून भ्रमण करीत होता. म्हणजे तो स्त्रीस्थानाधिपतींचे राशींतही होता. तसेंच या सुमारास चंद्र किंवा मंगळाचे अंतरही गुरु-महादशेंत होते आणि नैसर्गिक स्त्रीकारक शुक्र महादशाही भुक्तीच सुरू झाली होती. अशा सुयोगांत अत्यंत श्रीमंत कुळांतील गुरुचे बलाप्रमाणें भार्या व सासुरवाड

बंधक शास्त्रास कारण होता. परंतु रवी तेथें नीचीचा असल्यानें या विद्येंत यश येणें दुरापास्त आहे व त्यामुळेंच असें झालें. व या वेळेस शनींत धनस्थानस्थित केतुचें अंतर होते हा योग देखील शिक्षणांत व्यत्यय आणून अनिष्ट परिस्थिती उत्पन्न करूं शकतो. तसेंच या वेळेस शनीचे गोचरी भ्रमणदेखील धनस्थानांतून होत होते. गुरुही राशीने १२ वा होता. तेव्हा विद्येचा कारक गुरु अनिष्ट असल्यास विघ्न होणें साहजिकच आहे.

सन १९२१ चे सुमारास क्षयासारखे विकाराचा प्रादुर्भाव व त्यामुळें परदेशगमन, धनहानि, कुटुंबातील मंडळींना चिंता, याला कारण म्हणजे अष्टमाधिपति शनीची दशा व त्यात केतुचे अंतर यामुळें असे जिवावरचे दुखण्याचा प्रादुर्भाव होणें साहजिकच आहे. यात केतुही अष्टमाचे अष्टमात आहे.

सन १९१२ मध्यें वय वर्षे १६ या सुमारास संग्रहणी रोग झाला याला कारण गुरुमध्यें राहूचे अंतर होते. राहू हा अष्टमात जल राशीत मकरेंत आहे. तेव्हा त्याचे अंतरात अष्टमस्थानचे अवयवाचे रोग व त्यात जुलाबासारखें रोग होणें संभव आहे. गुरुत राहू मृत्युसम पीडा देतो असा अनुभव आहे. या वेळेस शुक्राची नैसर्गिक दशा व्ययाधिपतिची व पंचमाधिपतिची असून शनी मेषेतून म्हणजे नीच राशीतून जन्मकालीन मंगळाचे समोरून भ्रमण करीत होता व तेथूनच जन्मकालीन अष्टम स्थित राहूचे भ्रमणही शनीसह होत होते. तरी पण गुरुबल पंचमातून भ्रमण व राशीने भ्रमण पाचवे हे बरे होते. यामुळें याला प्रतिबंधही झाला. अष्टमांत मंगळही होता.

प्रथम संतान यांना पुत्र झाला व तो संवत १९७३ मध्यें झाला. या वेळेस गुरु गोचरीनें एकादशातून पंचमस्थानाला पहात होता. गुरुचे कालाची अवधिही १६ ते २० असते तीही होतीच म्हणजे यांना २० वे वर्ष होते. परंतु साडेसातीचाही उत्तरकाल या वेळेस होता. शनी धनस्थानातून भ्रमण करीत होता. मिथुनेचा चंद्र लग्नीं असला म्हणजे तो धनस्थानाचा अधिपति असतो यामुळें कुटुंबातील माणसाना साडेसाती त्रासदायक व पैतृक संपत्तीचा नाशक असतोच यामुळें वडीलाना खर्चाचा फार होताच. व याच योगामुळें मुलगा झाला व कांहीं कालानंतर तो गेलाही.

संवत १९७६ या वर्षी पुनः एक पुत्र यांना झाला. म्हणजे पौष शु. १ परंतु तो थोडेच दिवसांत निवर्तलाही. म्हणजे या वेळेस याचे वय वर्षे २३ होतें. कुटुंबस्थान धनस्थानातून कर्केचा प्रसव राशीत व तो संतानकारक गुरुचे भ्रमण होते. कुटुंब वृद्धी करणे हा त्याचा धर्म आहे. तसेंच शनी पंचमाचे पंचम म्हणजे नवम स्थानाचा अधिपति असल्यानें संतान योग होणें परंतु त्यांत केतूचे अंतर हें वाईट फलाचे द्योतक आहेच.

शके १८४६ चे आषाढ, श्रावण, भाद्रपद या महिन्यांत श्वासरोग फार भयंकर झाला होता याला कारण शनीदशेत रवीची अंतर्दशा. रवी हा तृतीयस्थान म्हणजे फुफुसे व श्वासनलिका या ठिकाणचे अवयवाचा मालक व शनी व रवि शत्रु, पुन्हा गोचरीने शनीचे जन्मकालीन रवीवरून भ्रमण होत आहे. ही रवीची साडेसातीच होय.

लाभावें यांत नवल नाहीं. मुख्यतः याच महिन्यात लग्न होण्याचे कारण म्हणजे जाया स्थानाचे सुखस्थान म्हणजे सप्तमापासून चतुर्थ म्हणजे दशमस्थान येथून शुक्र मीनेंतून भ्रमण करीत होता. येथें आम्ही याचे पत्नीचीही कुंडली देत आहोंत. या कुंडलीचे देखील मिथुन लग्न असल्यानें

पत्नीची जन्मकुंडली

म४ २के
५ ३ १च
६शु १२
७ र ९श ११
गु८राबु १०

गुरुचे व शनीचे आणि शुक्राचे भ्रमण वरील पति कुंडलीप्रमाणेंच होते यामुळें लग्न समारंभ अत्यंत थाटाचा व्हावा हे अगदी साहजिक आहे.

### कुंडली क्रमांक १०४

शके १८२७ कार्तिक कृ. ९ स माऊ झाला. त्याची कुंडली खाली दिली आहे.

जन्मकुंडली

### आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

या वेळेस गुरुचे गोचरी भ्रमण भावंडकारक स्थान म्हणजे एकादशांतून होत होते. हेच या योगाला कारण होते. याचे वडिलांची कन्या राशी असून याचे कन्या लग्न आले आहे. त्यांचे यांचे वडिलांचे लग्नी शुक्र आहे तर यालाही शुक्र आहे. रवी-बुध देखील वडीलासारखेच धनस्थानांत आले आहेत. परंतु मातृनिधन थोड्याच वयात म्हणजे शके १८२९ अधिक चैत्र शु. ११ मार्च ता. २६ सन १९०७ ला झाले. जन्मकालीं मंगळ चतुर्थात आहे हे तर स्पष्टच आहे. परंतु मातृ-निधनकालींदेखील ग्रह ठीक नव्हते. गोचरीने मंगळाचे भ्रमण चतुर्थांतून होते. व तेही अग्नि राशीतून. शनी, राशीने आठवा, राहू जन्मस्थ, रवी देखील ९ वा होता. शुक्रबुध हे तर आठवेच होते. गुरुही राशीने बारावा होता.

सन १९१८ में इच्छा नसूनही शिक्षणात व्यत्यय व भंग झाला म्हणजे या वेळेस वयाचे २२ वे वर्ष होते. हे मेडिकलमध्यें होते. ही विद्या यांना प्रवेश होण्यास पंचमातील रवी

पूरक झालास कारण होता. परंतु रवी तेथें नीचीचा असल्यानें या विद्येत यश येणें दुरापास्त आहे व त्यामुळेंच असें झालें. व या वेळेस शनींत धनस्थानस्थित केतुचें अंतर होतें हा योग देखील शिक्षणांत व्यत्यय आणून अनिष्ट परिस्थिती उत्पन्न करूं शकतो. तसेंच या वेळेस शनीचें गोचरी भ्रमणदेखील धनस्थानांतून होत होतें. गुरुही राशीने १२ वा होता. तेव्हा विद्येचा कारक गुरु अनिष्ट असल्यास विघ्न होणें साहजिकच आहे.

सन १९२१ चे सुमारास क्षयासारखे विकाराचा प्रादुर्भाव व त्यामुळें परदेशगमन, धनहानि, कुंटुबातील मंडळींना चिंता, याला कारण म्हणजे अष्टमाधिपति शनीची दशा व त्यात केतुचे अंतर यामुळें असे जिवावरचे दुखण्याचा प्रादुर्भाव होणें साहजिकच आहे. यात केतुही अष्टमाचे अष्टमात आहे.

सन १९१२ मध्यें वय वर्षे १६ या सुमारास संग्रहणी रोग झाला याला कारण गुरुमध्यें राहूचे अंतर होतें. राहू हा अष्टमात जल राशीत मकरेंत आहे. तेव्हा त्याने अंतरात अष्टमस्थानचे अवयवाचे रोग व त्यात जुलाबासारखें रोग होणें संभव आहे. गुरुत राहू मृत्युसम पीडा देतो असा अनुभव आहे. या वेळेस शुक्राची नैसर्गिक दशा व्ययाधिपतिची व पंचमाधिपतिची असून शनी मेषेतून म्हणजे नीच राशीतून जन्मकालीन मंगळाचे समोरून भ्रमण करीत होता व तेथूनच जन्मकालीन अष्टम स्थित राहूचे भ्रमणही शनीसह होत होते. तरी पण गुरुचठ पंचमातून भ्रमण व राशीने भ्रमण पाचवे हे बरे होते. यामुळें याला प्रतिबंधही झाला. अष्टमांत मंगळही होता.

प्रथम संतान याना पुत्र झाला व तो संवत १९७३ मध्यें झाला. या वेळेस गुरु गोचरीनें एकादशातून पंचमस्थानाला पहात होता. गुरुचे फलाची अवधिही १६ ते २० असते तीही होतीच म्हणजे यांना २० वे वर्ष होते. परंतु साडेसातीचाही उत्तरकाळ या वेळेस होता. शनी धनस्थानातून भ्रमण करीत होता. मिथुनेचा चंद्र लग्नी असला म्हणजे तो धनस्थानाचा अधिपति असतो यामुळें कुंटुबातील माणसाना साडेसाती त्रासदायक व पैतृक संपत्तीचा नाशक असतोच यामुळें वडीलाना स्वर्गाचा फार होताच. व याच योगामुळें मुलगा झाला व काही कालानंतर तो गेलाही.

संवत १९७६ या वर्षी पुनः एक पुत्र याना झाला. म्हणजे पौष शु. १ परंतु तो थोडेच दिवसांत निवर्तलाही. म्हणजे या वेळेस याचे वय वर्षे २३ होते. कुंटुबस्थान धनस्थानातून कर्केचा प्रसर राशीत व तो संतानकारक गुरुचे भ्रमण होते. कुटुंब वृद्धी करणे हा त्याचा धर्म आहे. तसेंच शनी पंचमाचे पंचम म्हणजे नवम स्थानाचा अधिपति असल्यानें संतान योग होणें परंतु त्यांत केतुचे अंतर हे बाईट फलाचे द्योतक आहेच.

शके १८४६ चे आषाढ, श्रावण, भाद्रपद या महिन्यांत ज्वररोग फार भयंकर झाला होता याला कारण शनीदशेत रवीची अंतर्दशा. रवी हा सुखस्थानात म्हणजे पुप्फुसे व श्वासनलिका या ठिकाणचे अवयवाचा मालक व शनी व रवि शत्रु, पुन्हा गोचरीने शनीचे जन्मकालीन रवीवरून भ्रमण होत आहे. ही रवीची सामान्यतः होय.

द्वितीय विवाह संवत १९८१ म्हणजे शके १८४६ चैत्र व. ३ या दिवशीं झाला याला कारण गुरुचे जायास्थानातून भ्रमण व तो तेथला स्वामीच व शुक्राचे लग्नावून हे गुरु समोर या योगास कारण आहे. कारण शुक्र सप्तमाला पहात असून गुरु स्त्रीकारक शुक्राला पहात आहे. या सुमारास राशीने ७ वा गुरु होता. या दिवशी गुरुचंद्रयोग ( युति ) ही होती. चंद्रमंगळाचा द्विर्द्वादशयोगही होता. राहूही राशीनें ३ रा होता.

या कुंडलीत चंद्रमंगळयोग लग्नी द्रव्ययोगदर्शक असून लग्नाधिपति व सुखाधिपति बुध असून तो स्वग्रहीं व उच्चीचा सुखात आहे. हे सध्या वडीलांनीं स्थापन केलेल्या प्रेसचे कार्य सांभाळतात. याचे धंद्याविषयीं ठरविणें म्हणजे दशमात मीन राशी असल्यानें व त्याचा स्वामी गुरु असल्यानें ग्रंथ वगैरेवर त्याचा अधिकार आहे. इकडे लाभात अग्नी राशी मेष असून त्याचा स्वामी मंगळ हा लग्नी बुधाचे राशीत म्हणजे अक्षरे वगैरेचा कारक याचे राशीत असून ज्योतिषाचा कारक चंद्राशीं मिळून आहे, व सर्वांत बलवान म्हणजे उच्चीचा ग्रह शनी व बुध आहेत यामुळें शनी लोखंड Type Metal व बुध अक्षरें हे या धंद्याचे द्योतक आहे. पुन्हा भाग्याधिपति शनी आहे, तेव्हा भाग्य, कर्म, लाभ आणि सुख या चारी स्थानाचा विचार घेतला आहे. आमचे मते बुधाचे दशेत याचा प्रेस फार मोटा झाला पाहिजे, व शरीरसुख आणि वाहने वगैरे याचे सुखदेखील याना लाभले पाहिजे. बुधाचे दशेत Steam Press व्हावा, कारण लाभात अग्नि राशी आहे.

### कुंडलीक्रमांक १०५

शके १७७७ भाद्रपद कृ. २, नक्षत्र पूर्वा भाद्रपदा इष्ट घटी ५३।९

जन्मकुंडली

३ बु म२श   ४ र   २   ५   १रा   ६शु   १२   ७के   ९   च ११ गु   ८   १०

| र. | च. | म. | बु. | गु. | शु. | श. | रा. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ३ | १० | २ | २ | १० | ५ | २ | ० |
| १६ | २१ | १८ | २९ | ९ | २६ | ५ | १६ |

### आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

अत्यंत भाग्यवान कुंडल्यांपैकीं ही कुंडली आहे. मिथुन लग्न व तेथें बुध, शनी, मंगळ यामुळें वर्ण काळसर असणें साहजिक आहे. लग्नावर गुरुची पंचम पूर्ण दृष्टि असल्यानें शरीरही मोठे धिप्पाड होते. थोटेपणाला लग्नीं शनीही कारण होतो. शरीर जडता हे धर्म गुरु दृष्टि व शनीची मदता हे कारण होय.

या कुंडलींत हा योग मोठा चांगला आहे कीं, कोणचेही स्थानाचे स्वामी ६।८।१२ या स्थानात गेले नाहींत. यामुळें सर्व सुखे यांना होती.

फक्त धन स्थानांत रवि जरा ठीक नाहीं. कारण हे जरा बहिरे होते याचे कारण तृतीयाधिपति तृतीयाचे व्यय म्हणजे धनात गेला आहे.

याचे दोन विवाह झाले. द्विभार्यायोगदर्शक ही कुंडली लग्नी शनी मंगळ असल्यानें आहेच.

यांची मातोश्री १६ वे वर्षी वारली. तेव्हा शनी सप्तमातून मातृस्थानाधिपतिवर पूर्ण दृष्टीने पहात होता व तो मंगळाचे समोर होता. शनी महादशेत शनीचे अंतरही होते. गुरुही व्ययातून व राशीनें चतुर्थ होता.

१९ वर्षी याना एक जीवनरचे दुखणें गेले. याला कारण साडेसातीचा पूर्वकाळ, अष्टमातून रविचे समोरून शनीचे भ्रमण, शनीची महादशा या वेळेस असे होणे साहजिकच आहे. यानां वडिलांची १॥ लक्षाची संपत्ती मिळाली. याला कारण यांचा धनाधिपति भाग्यात व भाग्याधिपति सुखाधिपतिसह लग्नांत व पराक्रमाधिपति धनस्थानात गुरु चंद्रानी म्हणजे शुभ ग्रह दृष्ट, पुन्हा रवि पितृकारक व भाग्यांत स्थिर राशीत ( ११ ) गुरु चंद्र हा बलवान योग व एकादशात मेषेचा राहू आणि सुखांत शुभ ग्रह शुक्र यामुळें वाहनें, घरे, नोकर चाकर, धन, वगैरे सर्व प्रकारें उत्तम असून कर्माधिपति भाग्यात व दशमावर शुक्राची आपलें उच्च स्थानावर पूर्ण दृष्टि अशा बलवान योगाची ही कुंडली आहे.

पहिल्या कुटुंबापासून याना फक्त एकच मुलगी आहे. तुळेचा स्वामि शुक्र हा सुखात गेला असून तो कन्या राशीत आहे. व तेथें त्यावर मंगळाची दृष्टि आहे. संतानकारक गुरु हाही प्रसन्न राशीत नाहीं. आणि पंचमाधिपति कन्या म्हणजे वन्ध्या राशीत स्थित आहे. तसेच पंचमांत पापग्रह केतूही आहे. तेव्हा पुत्र सुखाची आशा करणें केव्हाही ठीक नव्हते. तसेच पंचमाधिपति स्त्री ग्रह आहे. त्या मानाने एक कन्या तरी दिली हे योग्यच आहे.

मावापासून वेगळे होते याला कारण तृतीयाधिपति तृतीयाचे व्ययांत आहे. आणि आयुष्य संपेपर्यंत तृतीयाधिपतिची महादशाही आली नाहीं तेव्हा मातृसुख एकत्र रहाण्याचे नव्हते. तरी पण भाऊ वेगळे असून प्रसंगाला एकमेकाशीं मदत करीत होतेच. तृतीयाधिपति गुरु चंद्राने दृष्ट आहे व पाप दृष्टि रहित आहे. व रवि हा मित्र गृही आहे.

हे व्यवहाराचे मोठे चोख होते. याला कारण यांचा रवि व चंद्र म्हणजे आत्मा व मन यांची परस्पर दृष्टि आणि नवम स्थानांत गुरुसह चंद्र आहे. तसेंच हाच योग धार्मिक बुद्धि फार आणि तीर्थ यात्रा पुष्कळ करणें याला कारण चलग्रह चंद्र ( प्रवास ) व गुरु धार्मिक यात्रा वगैरेला कारण असा योग होताच. यांची वाणी मोठी गोड असे याला कारण धन स्थानांत रविवर गुरु चंद्राची दृष्टि आणि तेथें चंद्राचे स्वग्रह. व वाणीचा कारक गुरु याची पूर्ण दृष्टि.

परंतु यांना भांगेचे फार व्यसन होते. याला कारण, लग्नी शनी होता आणि तोही मंगळासह. बुध चैनीचा दर्शक मिष्ट खाणारही फार होते.

यांना सुवर्णापेक्षां मोत्याचा नाद फार असे. फार मोती खरेदी करायचे आणि नानाप्रकारचे अलंकार करवून स्त्रियांना आपण स्वत: घालायचे याला कारण धनस्थान मोत्याचा

कारक चद्र याची राशी व त्यांवर चंद्राची पूर्ण दृष्टि आणि गुरुसह व चंद्र भाग्यांत गुरुसह जल राशींत स्थित तेव्हा जलाश्रयी वस्तु व मोत्याचे अलंकाराचे शोकीन असावे व ते लाभावे हा योग संभवनीय आहे.

पुन्हा या कुंडलीत पंचमाधिपति शुक्र हा कन्या म्हणजे नीच राशीत गेला आहे. संतान सुखाला हाच कुयोग ज्यास्त आहे.

शके १८२१ म्हणजे संवत १९५६ या वर्षांत सर्व संपत्तीचा नाश झाला. या वेळेस वयाचे ४४ वे वर्ष होते. बुधाचे दशेत राहूचे अंतर होते. शनी गोचरीने सप्तम ( व्यापार ) स्थानातून भ्रमण करीत होता. गुरुही षष्ठातून भ्रमण करीत होता. शनी लाभाधिपतिचे समोर म्हणजे मंगळाचे समोर होता हाही योग ठीक नव्हता. व पुढें तर म्हणजे संवत १९६० पर्यंत दिवस फारच त्रासदायक होते कारण व्याजानी रुपये आणून व्यापार करावा अशी स्थिती प्राप्त झाली याचे कारण पुढें बुधांत गुरुचे अंतर होते. यामुळें उद्योग, धंदा, व्यापार यात अतिशय दगदग होणें हे साहजिकच आहे. तसेंच साडेसातीचा काल व तो अष्टमाधिपति शनी व त्याचेच भ्रमण, केवल थोडे दिवस ११ वा गुरु व नैसर्गिक महादशा गुरुचीं असल्याने दिवाळे निघण्याची पाळी आली नाहीं. पुढें केतू महादशा होती यातला काळही संपन्न दशेचा नव्हता.

शके १८३४ चे माघ शुद्धांत दुसरे लग्न झाले या वेळचा ग्रह योग पहाता धनेचा गुरु व शुक्र मीनेचा सप्तम व दशमातून भ्रमण करीत होते. तेव्हा स्त्री लाभ व्हावा हे ठीकच आहे. या वेळेस शुक्र महादशेत शुक्राचेच अंतर तो पंचम व व्ययाधिपति एकादशापासून पुन्हा व्यापारही ठीक चालू झाला, व सुमारे २० लक्ष रुपये मिळविले.

यांचे निधन शके १८३८ मध्यें झाले या वेळेस शुक्र दशेंत शनीचे रवीवरून भ्रमण काल होता, गुरु व्ययांत होता व चवथा होता. रविची नैसर्गिक दशा ही होती. आणि रवी अष्टमाचे अष्टमात स्थित आहे.

### कुंडलीक्रमांक १०६

श्रीशके १७८८ क्षयनाम सं. मार्गशीर्षमासे शुक्लपक्षे १० तिथौ सौम्यवासरे घ. २६ प. ४५ समये जन्म. ता. १७ माहे १२ सन १८६६.

जन्मकुंडली

४म
२
५
३
१च
६रा
१२के
श ७
९र
११
शु८बु
१०गु

### आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—उंच फुट ५. इं. ४॥ डोळे काळे, चेहरा लांबट, नाक पोपटचोंच, दांत मध्यम होते ( हल्ली नाहींत ), तोंड निमोर, वर्ण गोरा, कपाळ उंच, शरीर मध्यम, व्यंग

नाहीं, अशक्त नाहीं, सशक्तही नाहीं, ( आवड ) गोड व तिखट, आहार जास्त, आंबट नको. गंडांतरें व मोठाले आजार—वयाचे १०।११ वर्षी देवी फार २ महिने आजारी, २१।२२ वर्षी पोटशूळ १५ दिवस, ४२ वर्षी नारूनें १ म. ५३ वर्षी वातविकार १ महिना, लहानपणी खरूज. आई व वडिलांचें सौख्य—सखी आई मृत्यु श्रा. वा। ६ शके १७९७ बाळंतरोग, सा. आई शके १८१३ ज्येष्ठ मास. आई व वडिलांस मोठाले आजार—प्रसुतिवायु, वडिलांच्या मृत्यु शके १८३१ का. वा। ३०. मी जन्मलो तेव्हां आई व बाप यांस नारू झाले होते. आईला शके १७९४ साली बाळंतरोग. बाप शके १८०२ साली क्षयासारख्या आजाराने फार आजारी होते. हीवताप राहून राहून येत असे. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—आजोबाची फार गरिबी तीर्थरूपानीं कर्ज फेडून वतन सोडविले, जमीन मिळविली. त्यांचे वयाचे २४।२५ वर्षांपासून भाग्योदय ते मरेपर्यंत चांगला. वडिलांचा धंदा—४ वतनी गांवचे कुलकर्ण व सावकारी सालीना उत्पन्न १२००।१५००. धंदांत अगर नोकरींत भयंकर काळजीचे व असह्य प्रसंग—वडिलांचे धंदांत प्रथम तेजी, उतार वयात शत्रु फार पण यश चांगले. शके १८०५ साली २।३ घरे व इस्टेट दग्ध झाली फार संकटें, भावंडें—एकंदर ३ त्यांत हयात २, पाठीवर भाऊ आधी मीच. जास्त बहिणी व त्याची संख्या २ मी वडील,माझे पाठीवर भाऊ जन्म शके १७९१ भा. वा।९(हयात). दुसरे बंधु जन्म शके १७९४ आषाढ वा। ४ (मयत शके १८४६ आश्विन शु। १४) सावत्र बहीण जन्म चैत्र वा। ११ सह १२ शके १८०६ हयात, एकूण भाऊ २ बहीण १. माझी मुंज शके १७९६ विवाह—वैशाख मास लग्न १ च शके १८०४ वैशाख शु. ४. स्त्रीची प्रकृति—निरोगी, वर्ण काळा, ठेंगणी फुट ४॥ देवीचे वण, डोळे मोठे, कपाळ उंच, शरीर मध्यम, चेहेरा लांबट, नाक सरळ, आजार ३ वर्षी देवी, शके १८२८ मार्गशीर्ष मस्तकशूळ वात, शके १८३४ श्रा. भा. हिंवताप गरोदरपणी. संतती—प्रथम कन्या शके १८१२ हयात, कन्या १८१४ हयात, कन्या शके १८१७ हयात, कन्या शके १८२० मयत वायुनें, कन्या शके १८२३ हयात, कन्या शके १८२५ मयत, पुत्र शके १८२६ मृत सुसीने, कन्या शके १८२८ हयात, पुत्र शके १८३१ मयत, पाचवे दि. कन्या १८३२ हयात,तिसरा पुत्र पौष शु ८ शके १८३४ हयात, एकूण हयात कन्या ६ पुत्र १. स्वत.स, स्त्रीला अगर मातापित्यास कायमचा विकार—स्वतःस शौचावरोधाचा विकार, मातापित्यास कांहीं नव्हते. विद्या—मराठी ६ इ. इंग्रजी २।३ यश फारच कमी, शके १८१० साली शाळा सोडली. भाग्योदय—विशेष भाग्योदय असा नाहीं वडिलांचे छत्राखालीं त्यांचे हयातीपर्यंत सुख, ते असतांनाच वतनी कुळकर्ण वगैरे पाहू लागलो, शके १८११ पासून कुळकर्णाचा चार्ज घेतला. स्वत.वर व्यावहारिक जबाबदारी—शके १८३१ ( वडील कैलासवासी झाल्यापासून ) सालीना उत्पन्न रुपये ४००।५०० वतनही कुळकर्ण, देशपांडे, सरदेशमुखी, सरपाटील, इनामइनसाफ जमीन वगैरेचें. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल—शके १८३९ पासून परिस्थिती बदलली, शत्रु उत्पन्न झाले, जातवाले व सख्ये बंधु उलट झाले, एक गांवची ४०।५० रुपये सान्याची जमीन ओस पडली आहे, संप आहे, दरसाल २००।३०० रु. नुकसान आजपर्यंत होत आहे, कामास मनुष्य मिळण्याची अडचण आहे त्यामुळें फार संकटांत आहे, दाद लागत नाहीं. सांपत्तिकदृष्ट्या अत्यंत वाईट काल—शके १८३९ पासून आज-

पर्यंतचा लम्नका. खर्च शके १८२४-१०००।११०० रु. शके १८२८ १६००।१७०० रु. शके १८३० १०००।१२०० रु शके १८३६-१०००।१३०० रु शके १८४२-१००० ते १२०० रु. शके १८४५-१६०० ते १७०० रु. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल—शके १८३९ पर्यंतचा. कोणत्याही कार्यांत यश–अपयश—यश अगदीं कमी सकटें—सकटें जातवाले शत्रु भाऊ याजकडून त्रास अपमान, मदत कोणाचीच नाहीं, दि. फौ. कोर्टांत प्रत्यक्ष नाहीं पण पर्यायानें जावें लागते, त्यांत खर्च नुकसान सोसावें लागतें. नोकरी व्यवसाय—वतनी गावकुळकर्णाची नोकरी, सावकारी थोडी, परिस्थितीचे वर्णन वर आहे मोठ्या मुलाची बौद्धिक व सापत्तिक स्थिति व विद्या—एकच मुलगा वय वर्षे २२।२३ मराठी ७, इंग्रजी ५ वी झाली आहे. सासरची सांपत्तिक स्थिति—सासरे वऱ्हाडात एक्स्ट्रा अ क चे हेड क्लार्क होते, पगार दोनशेपर्यंत असावा, त्याजकडून हुड्याशिवाय काही लाभ नाहीं सावत्र आई अगर भावंडें—सा. आई सुस्वभावी होती, मयत. चुलते २ मयत, मामा नाहीं, मावशा ३ पैकीं २ मयत, एक आहे, तिची फार गरीबी, चुलत्याचे कोणी नाहीं. सत्तेचें घर, वाहनें—स्वत:ची घरें तीन गावात आहेत. वाहनें, चाकर तूर्त नाहींत, मिरासी इनाम जमिनी ४ गावीं अजमासे पधराशे ते दोन हजार रु. धान्याच्या असून वतनी हक्कदारी, सरदेशमुखी, देशमुखी, देशपांडे, कुळकर्ण, इनामइसाफत गांव मिळून ७।८ गांवीं उत्पन्न मिळतें, ( सरकार खजिन्यावर ) सर्व वडिलार्जित आहे.

कुंडलीक्रमांक १०७

श्रीशके १७९७ चैत्रेमासे शुक्लपक्षे द्वितीयां तिथौ श्रीसूर्योदयातगत घ १४ प. ९ समये जन्म. जन्मतारीख ८ माहे ४ सन १८७५

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

गडांतरें, व मोठाले आजार—सन १९१२ जुलै ते सप्टेंबर, मलेरियातापानें. आई व वडिलांचे सौख्य—वडील मयत. ता. २७-६-१८९६ आई मयत, ३१ मे सन १९०७. आई व वडिलांस मोठाले आजार—आई व वडील दोघेही विषमज्वरानें वारले. वडीलांची मूळ सांपत्तिक स्थिति—वडिलांची मूळ सापत्तिक स्थिति वाईट, ते आपल्या आतेच्या आश्रयानें वकीलीचा अभ्यास करून वकील झाले. सुमारे १८७० सालांत. वडिलांचा धंदा—वकिलीचा. महिन्याचें उत्पन्न—२५० ते ३०० असावें, भावंडें—एकदर ८, त्यांत हयात ३, पाठीवर बहीण, आधीं कोणी नाहीं. जास्त बहिणी ४ व त्यांची संख्या—६ बहिणी. दोन बहिणी १८९८ सालीं मयत; एक

बहीण सन १९१२ साली मयत, दोन भाऊ अगदीं लहानपणीं म्हणजे प्रत्येकी सुमारे वर्षाचे होऊन वारले, १८८६, व १८८८ सालीं. विवाह—एकच विवाह सन १८९३ चे जून महिन्यांत. स्त्रीची प्रकृति—चांगली, दम्याचा विकार केव्हा केव्हा होतो. संतति—प्रथम कन्या, ६ पुत्र व एक कन्या, मृत ३ मुली अशक्तपणा, ताप व कफानें, अदमासें १९००, १९०४, १९११. स्वत स अगर स्त्रीला कायमचा विकार—स्वत स कायमचा विकार नाहीं; स्त्रीस दम्याचा विकार केव्हा केव्हा. विद्या—बी. ए एल् एल. बी. बी. ए. १८९८ सालीं, एल् एल्. बी. १९०० सालीं भाग्योदय—वकीलीस सुरुवात सन १९०१ चा एप्रील महिना. धंद्यास सुरुवात १९२० सालीं, दोन्ही बाबतींत साधारण ठीक. स्वत वर व्यावहारिक जबाबदारी—सन १९०१ सालीं सुमारे ४०० रुपये. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल—सन १९१४ सालीं. स्थावर मिळकतीचा खरेदी व्यवहार झाला, सन १९२० सालीं इमारती लाकडाचे व्यवहारास सुरुवात सांपत्तिक दृष्टया असत वाईट काल—सन १८९६ ते १९०१. द्रव्यदृष्टया उत्कृष्ट काल—सन १९१४ पासून पुढें सरकार अगर लोकांकडून मान—एका प्रतिनिधिक सस्थेचा अध्यक्ष सन १९१७ व १९२३ सालीं झालो. सकटें—दिवाणीचा प्रसंग आला. सन १९२० सालीं धंदा—वकिलीचा धंदा व इमारती लाकडाचा धंदा, आजपर्यंत साधारण बरी स्थिति आहे. अकस्मात द्रव्यलाभ सन १९१४ व १९२० सालीं. मोठ्या मुलाची बौद्धिक व सांपत्तिक स्थिति—वडील मुलगा बी ए. एल् एल्. बी. दुसरा मुलगा एम् बी. बी एस् बाकी शिकत आहेत. सासरची सांपत्तिक स्थिति व त्यांजकडून लाभ—स्थिति चांगली. सन १९१४ व १९२० सालीं लाभ झाला. सावत्र आई अगर भावंडें व त्यांची स्थिति—सावत्र आई नाहीं; तीन बहिणी आहेत स्थिति साधारण, चुलते हयात नाहींत, सावत्र मामा १ व मावशी १ आत्या नाहीं, चुलत्या हयात नाहींत. २ होत्या. स्वतःचें घर, वाहनें, नोकरचाकर, जमीनजुमला—स्वतःचें घर आहे, वाहनें मुळींच नाहींत, जमीन वडिलार्जित अगदी थोडी.

## कुंडलीक्रमांक १०८

श्रीशके १८११ भाद्रपद शुद्ध १३ तिथौ मदवासरे श्रीसूर्योदयातगत घ. ४६ प. ४२

जन्मकुंडली

## आयुष्यातील महत्वाच्या गोष्टी

शरीरवर्णन—गोरा व्यंग—कांहीं नाहीं. अत्यंत आजारी असलेली वर्षे—१९०४।०५. आईचा मृत्यु—जानेवारी १९१८. वडील मृत्यु—जानेवारी १९१७ पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति

वरी आहे. सध्यांची सांपत्तिक स्थिति—साधारण वाढत्याच प्रमाणात. भावंडें—पहिला वडील भाऊ, नंतर वडील बहिण, नंतर मी, नंतर २ बहिणी ही सर्व हयात, मागाहून ४ भावंडें झाली ही हयात नाहींत विवाह—१९११ मार्च. संतती—१९१३ पहिला मुलगा तो हयात नाहीं नंतर गर्भपात, १९१६ दुसरा मुलगा, नंतर १९१९।१९२२।१९२४ मुली. विद्या—इंग्लिश स्कूल फायनल. धंदा—सरकारी नोकरी. संकटकाल—नेहमी विरोध, बाकी कांहीं नाहीं.

## कुंडलीक्रमांक १०९

श्रीशके १८१६ आषाढेमासे कृष्णपक्षे पंचम्यांतिथौ इंदुवासरे उत्तराभाद्रपदानक्षत्रे घ ३९ प. ४८ अत्रदिने श्रीसूर्योदयातगत घ. ५५ प. २७ समये जन्म. जन्मतारिख २४ माहे ७ सन १८९४ इसवी.

जन्मकुंडली

स्पष्टग्रह.

| | र | चं. | मं. | बु | गु. | शु | श | रा | ल |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| राशि | ३ | ११ | ११ | ३ | २ | २ | ६ | ११ | २ |
| अंश | १२ | २० | २९ | ८ | ६ | १० | ० | १५ | २७ |
| कला | ३७ | ३० | ५३ | ४७ | ३५ | ५ | ५५ | ६ | ५ |
| विकला | ३० | ४५ | ५ | ४५ | २५ | ४२ | ३२ | ४ | १२ |

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शरीरवर्णन—शरीर रोडकें, इमानी व अत्यंत मायाळू, कपड्याची आवड, रंग गौर, शरीरावर खुणा नाहींत, फक्त डाव्या डोळ्यांत तीळ आहे, दृष्टी कमी, चष्मा १० वर्षांपासून लावित आहे. गंडांतरें व मोठाले आजार—जन्मानंतर पहिली ५ वर्षे आजारी, डोक्यावर वेंड, हातपाय लुळे होते, त्यानंतर म्हणण्यासारखा मोठा आजार झाला नाहीं आई व वडिलाचें सौख्य—वडील व मातोश्री हयात पण त्यांचेपासून सुख मुळींच नाहीं. आई व वडिलांस मोठाले आजार—सन १९०१ मध्यें, सन १९१२ मध्यें व सन १९१८ मध्यें आईस बाळंतरोग व श्वास

इन्फ्ल्युएन्झा हे मोठाले आजार झाले होते, वडिलांचे आजार माहित नाहीत. वडिलाची मूळ सांपत्तिक स्थिति—वडिलाची मूळ सांपत्तिक स्थिति गरीबीची, चांगले अगर वाईट फेरफार केव्हाच झाले नाहीत, तिच परिस्थिति कायम राहिली. वडिलांचा धंदा—सराफीचा, महिन्याचें उत्पन्न सरासरी ३०।४० रुपये. धंद्यांत अगर नोकरीत भयंकर काळजीचे व असह्य प्रसंग—वडिलावर धंद्यात सन १९१९ मध्यें फौजदारी आरोप, चोरीची रकम विकत घेतल्याचा आला होता, पण निर्दोष सुटले. भावंडें—एकंदर १० त्यांत हयात ५ पाठीवर ४, आधीं २ भाऊ मृत, तिसरा मी, चवथा व पांचवा भाऊ मृत, सहावी बहिण हयात, सातवा भाऊ हयात, आठवा भाऊ हयात, नववी व दहावी अशा दोन बहिणी हयात. विवाह—एकच झाला. सन १९१६ डिसेंबर ता. ३ रविवार सायंकाळीं. स्त्रीची प्रकृति—सशक्त, वर्ण सांवळी, तोंडावर देवीचे व्रण, लग्न झाल्यावर मोठा आजार मुळींच झाला नाहीं. संतती—प्रथम मुलगी सन १९२० डिसेंबर ता. १३ ला झाली ती हयात आहे, दुसऱ्या प्रसूतीचे वेळीं स्त्री एकदम मरण पावली, मूल पोटांतचें मेलें होतें, मुलगा असावा असें वाटतें, स्त्री मृत ता. २६।११।१९२३ शुक्रवार मध्यरात्रीचे सुमारास. विद्या—मराठी ५ इयत्ता व इंग्लिश प्रिव्हीअस नापास, फक्त मॅट्रिक ३ वेळां नापास, मग प्रत्येक वर्षी पास, सन १९१६ मार्चमध्यें कॉलेज कायमच सोडलें. भाग्योदय—भाग्योदय असा कधींच झाला नाहीं, इं. मास्तरच्या नोकरीला सुरुवात जून १९१६ पासून नोकरी, नंतर ६ वर्षें सुखासमाधानानें गेली, आतापर्यंत तीच नोकरी कायम आहे. स्वत वर व्यावहारिक जबाबदारी—जबाबदारी सन १९१६ पासून पडली; आज महिना उत्पन्न ४० रु. पगार व १०।१५ रुपये इतर असे सरासरी ५० रु. महिना मिळतो. अनपेक्षित रीतीनें परिस्थितींत बदल—सांपत्तिक परिस्थितीत फेरबदल झाला नाहीं. मानसिक परिस्थितींत स्त्री वारल्यापासून इतका भयंकर फेरबदल झाला कीं, माझ्यासारखा दुर्दैवी कोणीच नाहीं, असें वाटतें! कोणत्याहि रीतीनें उल्हास वाटत नाहीं, लग्नाची फार इच्छा आहे. सांपत्तिकदृष्ट्या अत्यंत वाईट काळ—प्रापंचिक खर्चास अडचण कधींच भासत नाहीं, महिनाअखेर उत्पन्न व खर्च समसमान होतात. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काळ—कोणताच गेला नाहीं. कोणत्याहि कार्यांत यश अपयश—कोणतेंही महत्वाचें कार्य करण्याचा प्रसंगच आला नाहीं. नोकरी अगर दुसरा व्यवसाय—इंग्रजी शाळेंत मास्तरची नोकरी, सन १९२३ पासून ज्योतिष विषयाचा फार नाद लागला आहे, ज्योतिषचें मिळणारें उत्पन्न धर्मार्थ खर्च करण्याचा संकल्प आहे. मोठ्या मुलाची बौद्धिक स्थिति—मुलगा एकही नाहीं, फक्त एक ४।४॥ वर्षांची कन्या आहे. सासरची सांपत्तिक स्थिति—प्रथम श्वशुराची सांपत्तिक स्थिति समाधानकारक आहे, त्यांचेकडून लाभ मुळींच झाला नाहीं. मावशा—फक्त २ मावशा आहेत. सत्तेचें घर, वाहनें—स्थावर इस्टेटीपैकी कांहींच नाहीं, फक्त एक लहानसें घर स्वत कर्ज काढून नोव्हेंबर १९२२ मध्यें विकत घेतलें.

## कुंडलीक्रमांक ११०

श्रीशके १८०७ वैशाख शुद्ध पंचम्यातिथौ रवीवासरे श्रीसूर्योदयातगत घ. ४७ प. २९

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शरीरवर्णन—चेहरा गोल, दांत मोठे, वर्ण तांबुस. अत्यंत आजारी असलेली वर्षे—वर्ष ५ वें. आई व वडील—हयात. पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—साधारण. सध्यांची सांपत्तिक स्थिति—चांगली. भावंडें—माऊ १ हयात बहिण १. विवाह—वयाचे १३ वे वर्षी झाला. संतती—मुलगा १ मुली ५ हयात. प्रथम मुलगी दुसरा मुलगा नंतर तीन मुली नंतर मुलगा नंतर मुलगी अशी एकंदर सात आपत्यें झाली. त्यांत एक मुलगा मृत्यु बाकी ६ हयात. विद्या—मध्यम. धंदा—कापडाचा. आप्तवर्ग—नाहीं. सासू आहे बाकी नाहीं; शत्रु फार पण अखेर अनुकूल होतात. संकटकाल—लोकांत मान्यता चांगली, नेहमीं द्रव्याची फारच टंचाई वयाचे ३२।३३ कपासीचे सव्यात मोठी नुकसान त्यापासून आज-पर्यंत फायदा नाहीं वरचेवर इतर नुकसान आजपर्यंत.

### कुंडलीक्रमांक १११

श्रीशके १८०१ वैशाख कृष्ण दशम्यांतिथौ गुरुवासरे श्रीसूर्योदयातगत घ. ८ प. ५६.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शरीरवर्णन—शरीर साधारण. व्यंग—नाहीं. अत्यंत आजारी असलेली वर्षे—७ ते १२ आजार १९१५ ज्वरपीडा. आईचा मृत्यु—१९१८ फेब्रुवारी. वडील मृत्यु—फाल्गुन वद्य प्रतीपदा सन १८९२. पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—साधारण. सध्यांची सांपत्तिक स्थिति—पूर्णावस्था दरिद्री घर वडलोपार्जित आहे घरांतील विहिर चांगली आहे. भावंडें—एकंदर ५, आज हयात १ बहिण वडील, आधी बहिण, विवाह—सन १८९४ फाल्गुन

वध सप्तमी. संतती—८ मुले पैकी आज हयात ६ पहिली मुलगी, दुसरा मुलगा मयत. ति. मुलगी, चवथा मुलगा, ५।६।७ मुलगा, ८ वी मुलगी. विद्या—वरी ओहर. सिअर. धंदा—नोकरीचा आरंभ १९०५ जानेवारी ते १९२० पर्यंत अतिउत्तमकाळ. १९१० ते १९१५. आप्तवर्ग—४ मामा चौघेहि मयत. मेव्हणे २ एक मयत व दुसरा हयात पेन्शनर. संकटकाळ—नेहमी विरोध १-२ वेळा फौजदाऱ्या झाल्या पण प्रत्यक्ष कांहीं नाहीं. सन १९१६ पासून पुढील काळ अत्यंत अनिष्ट येऊ लागला असून आज भयंकर हीनावस्था. इतर गोष्टी—कालव्यानजीक जमीन ४० एकर खरेदी १९२० जून ता. ११ व १९२२ एप्रील ता. १८ खरेदी. सन १९२२ पर्यंत कर्ज होतेंच पण आटोक्यांत त्यानंतर कर्ज अती वाढले. १९२४-२५ फार हाल. ६००० रु. गुळाच्या व्यापारांत नुकसान.

कुंडलीक्रमांक ११२

श्रीशके १८१५ श्रावणमासे शुक्लपक्षे चतुर्थ्यांतिथौ भौमवासरे पहाटेस जन्म.

जन्मकुंडली.

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शरीरवर्णन—साधारण गौरवर्ण, तोंडावर देवीचे व्रण. व्यंग—नाही. आईचा मृत्यु—१९०७. वडील मृत्यु—१९०१. पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—साधारण. सध्यांची स्थिति—साधारण. भावंडें—एक लहान भाऊ व दोन वडील. विवाह—१८३८. दुसरा विवाह—१८३९. संतती—नाहीं. विद्या—वैदिक. धंदा—भिक्षुकी. आप्तवर्ग—पहिला सासरा हयात.

कुंडलीक्रमांक ११३

श्रीशके १८२५ आश्विन शुक्ल चतुर्थ्यांतिथौ गुरुवासरे अत्रदिने श्रीसूर्योदयात्गत घ. ४४ प. १३ समयेजन्म जन्मतारिख २४ माहे डिसेंबर १९०३.

जन्मकुंडली

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—सशक्त, हेकेखोर, गौरवर्ण, डाव्या हातावर तीळ, कपोळ लहान, दात लहान, गंडांतरें व आजार—जन्मापासून गंडांतरें एकदा २-३ वर्षी आले व लहानपणी प्रकृति बहुतेक अशक्तच होती, डबा नांवाचा रोग एकदां झाला होता व दुसरे फिरकोळ ताप खोकला असा होता. आई व वडिलांचें सौख्य—माता पिता हयात आहेत. आई व वडिलांस मोठाले आजार व ताप वगैरे—आईस २-३ वर्षांचे अंतरानें वाताचे विकार मोठाले असे २-३ वेळा झाले व वडिलांस मोठाले आजार अन्तर्गळ किंवा अंडवृद्धि (हारनिया) हे विकार दोन तीन वेळा झाले. वडिलांची मूळ सांपत्तिक स्थिति—चांगली उत्तम प्रकारची आहे. फेरफार कांहीं नाहीं. वडिलांचा धंदा—देवघेव व्यापार महिन्याचें उत्पन्न ५०० रु. भावंडें एकंदर—५–६ त्यांत हयात २, पाठीवर भाऊ, आधीं मीच, भाऊ की बहिणी संख्या दोन्ही बरोबर भावंडें, माझे १८-१९ वर्षी २ वारली व १५–१६ वर्षी दोन झाली व ती दोन्ही वारली. विवाह—सन १९२३ ता. २९ मेला प्रथम विवाह झाला. स्त्रीची प्रकृति—स्त्रीची प्रकृति सध्या तर साधारण सुदृढ असून मोठाले आजार किंवा विकार असे कांहींच नाहीं, स्वरुप साधारण आहे. स्वतःस, स्त्रीला अगर मातापित्यांस कायमचा विकार—स्वतःस, स्त्रीस व माता यास कायमचा विकार असा कोणचाच नाहीं परंतु वडीलास मात्र अंडवृद्धीचा रोग साधारण १०।१२ वर्षांपासून आहे. विद्या—विद्या मॅट्रिक पावेतो झाली परंतु परिक्षेत यश आले नाहीं पुढें सन १९२० नंतर विद्या बंद. भाग्योदय—भाग्योदय असा अजून कोणचाच झाला नाहीं व अजून नोकरी किंवा धंद्याला अशी कांहींच सुरवात झाली नाहीं. साधारण थोडें थोडें घरचें काम पाहतो. स्वतःवर व्यावहारिक जबाबदारी—स्वतःवर अजून व्यवहारिक जबाबदारी अशी कोणचीच पडली नाहीं. सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत वाईट काल—कोणचेही प्रकारची व्यवहारिक जबाबदारी अंगावर अजून पावेतो न पडल्यामुळें सांपत्तिक दृष्ट्या असा कोणचाच वाईट काल गेला नाहीं. द्रव्यदृष्ट्या उत्कृष्ट काल कोणता गेला—वरील कारणामुळेंच असा उत्कृष्ट कोणचाच काळ अजून पावेतो गेला नाहीं. सत्तेचें घर, वाहनें, नोकरचाकर जमीनजुमला यांचें सौख्य—सत्तेचें घर नोकरचाकर व जमीनजुमला वगैरे पूर्वार्जित आहे. त्याचे सुख उत्तम प्रकारचें आहे.

### कुंडली क्रमांक ११४

श्रीशके १८२५ ज्येष्ठमासे शुक्लपक्षे द्वादशीतिथौ भानुवासरे श्रीसूर्योदयातगत घ. ० प. ३५

जन्मकुंडली

### आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शारीरिक स्थिति—अशक्त, स्वभाव रागीट, गौरवर्ण, सर्व शरीरावर शीरमीसारखे पांढरे डाग, गडातरें व मोठाले आजार—दोनतीनवेळा तापाचे आजार चांगले झाले. आई व वडिलांचें सौख्य—आई व वडील हयात. आई व वडिलांस मोठाले आजार—आईला बाळंतवाताचा विकार झाला होता. वडीलांची मूळ सांपत्तिक स्थिति—साधारण वडिलांचा धंदा—सराफी व शेती. महिन्याचें उत्पन्न—१५० ते २००. भावंडें—एकदर १२ त्यांत हयात ६, पाठीवर भाऊ आधीं बहीण भाऊ ३ वहिणी ३.

### कुंडलीक्रमांक ११५

श्रीशके १८०८ ज्येष्ठ शुक्ल १३ तिथौ इदुवासरे श्रीसूर्योदयातगत घ. ५९ प. ५०

जन्मकुंडली

| | | |
|---|---|---|
| ४ | ३ | |
| २।५म | १ बु२श | १३ु |
| ६गु | १२ | |
| ५ | १० | के ११ |
| ८चं | | १० |

### आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

वयाच्या ५ वर्षांपर्यंत, वडिलांची सांपत्तिक स्थीती चांगली, नतर १० वर्षे, सरकारी नोकरी सुटल्यामुळें कठीण गेली पुढें १६ व्यावर्षी ४००० रुपयाची व्यापार करण्याचें बाबतींत मदत होऊन ५ वर्षपर्यंत चांगली स्थिती पुढें १९ व्या वर्षी, मी मराठी ६ वी पास झालो पुढें २१ व्या वर्षी लग्नाचा योग. नतर २७ व्या वर्षी कन्या संतती, हयात आहे, ३२ व्या वर्षी आई आणि पुत्र निवर्तले. त्याचवर्षी दुसरें लग्न सन १९२३ मध्यें पुत्र सतती, हयात आहे, तदनंतर वडील वारले. धाकटा भाऊ ३० वर्षांचा आहे त्याच्याशीं मुळींच पटत नाहीं. वयाच्या २५ साव्या वर्षी एका व्यापाऱ्याकडे सालीना ५०० वर नोकरी ती ३५ वर्षांपर्यंत, पुढें ६ वर्षे, लक्षावधी रुपयांचे मुकदम्यात, प्रायव्हेटली मुखत्यारित १२ हजार रु. कमवले. त्यांतच साडा हजार रुपयाचे नवीन घर बांधले. वयाच्या ४२ वर्षांपासून आजपर्यंत सांपत्तिक स्थिती कठीण गेली आणि जात आहे तरी हल्लीं ३ इस्टेट तीन हजार पर्यंत कायम आहे. सन १९२७ मध्यें मुलीच्या लग्नांत २००० रु. खर्च केले. कायद्याची माहिती उत्तम. दि. फौ. मु. वगैरे कायद्याचीं सर्व पुस्तकें आहेत जमाखर्च गुजराथी भाषेत जमाखर्चाचे काम १२ वर्षे केलें.

### कुंडलीक्रमांक ११६

श्रीशके १८२५ फाल्गुनमासे कृष्णपक्षे त्रयोदशीतिथौ भौमवासरे शततारकानक्षत्रे घ. ६० प. ० अस्मिन् दिने श्रीसूर्योदयातगत घ. १७ प. १ समये जन्म.

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

शरीरवर्णन—साधारण काळसर, डोळे काळे, चेहरा गोल, कपाळ मध्यम, स्थूलदेही साधारण अंग जाडे, उंची बेताची व्यंग नाहीं, आई हयात. वडील मृत्यु. १८३२ चे सुमारास बरेच दिवस ताप, दमा खोकला यानें आजारी. सध्याची सांपत्तिक स्थिती—सरकारी नोकरी शाळाखातें. भावंडें—एकदर ८. मुलगे ३, मुली ५, मोठे भाऊ २ पैकीं १ हयात मोठ्या बहिणी ३ पैकीं १ हयात, पाठीवर बहिणी २ पैकीं हयात १, बहिणींचे सासरची स्थिती धाकटीची मध्यम मोठीची चांगली. सर्व भावंडें स्वपराक्रमानें उपजिविका करीत आहेत. विद्या—ट्रेनिंग वर्ष १ लें. धंदा—सरकारी शाळाखात्याची नोकरी. जमीन थोडीशी १॥ खंडी उत्पन्नाची. घर आहे. आप्तवर्ग—चुलते २ पैकीं १ हयात, १ मयत त्यांची सांपत्तिक स्थिती मध्यम स्थावर मिळकत आहे, मामा २ एक नापत्ता एक मयत मावशा २. हयात १, मयत १ सांपत्तिक स्थिती मध्यम. माऊ १ हयात धंदा घरची स्वकष्टार्जित स्थावर मिळकत पाहतो, आत्या २ हयात १ मयत. संकटकाल—नोकरी सुखावह नाहीं

कुंडलीक्रमांक ११८

श्रीशके १८०९ आश्विन वद्य ३० रात्रौ.

जन्मकुंडली

रा४श २ १ ३ १२ ५ ६ गु ७र ८ ९ १० ११

## आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी.

शरीरवर्णन—उंच, कृश चेहरा साधारण लांबट, वर्ण सांवळा, कपाळ मोठें एकंदरीत साधारण उंच व्यंग नाहीं. डोळ्यास इजा. आईचा मृत्यु कार्तिक शु. ८ शके १८४१ वडीलांचा मृत्यु—४ जून १९२२ मोठ्यांनी. पूर्वार्जित सांपत्तिक स्थावर इस्टेट २-३ खंडीमात सध्याची सांपत्तिक स्थिती—सरकारी नोकरी. भावंडें—२ भाऊ २ बहिणी एकदर ५ स्वत धरून. मोठी बहीण व भाऊ १, पाठीवर बहिण १ भाऊ १, मोठा भाऊ मृत्यू माघ शु. १४, १८३५ १ भाऊ १ बहीण मयत. विवाह—पहिला १८३३ वैशाख गौरवर्णाची डोळ्यास इजा असलेली पत्नी. संतती—१ मुलगी १८३९ साली. मयत १। मरणानंतर १८४०. दुसरी मुलगी तावडतोब मयत तिसरी १८४३ कार्तिक शु. ०. मुलगा दहिला चैत्र शु. ११ शके १८४६ विद्या—मराठी ७ यत्ता अभ्यास नाहीं. धंदा—सरकारी नोकरी शाळाखात्यांत. आप्तवर्ग—मामा १ घरधंदा करणारा सांपत्तिक स्थिती बरी मावशी १ विधवा सासरची स्थिती बरी नाहीं.

मावशा २ मयत. चुलते २ हयात, एकाची सांपत्तिक स्थिती बरी, एकाची वाईट. चुलत्या—१ मयत, १ हयात, आत्या २ मयत. सख्खा मेव्हणा नाहीं. सावत्र मेव्हणा १ हयात, सांपत्तिक स्थिती वाईट. सासरा नाहीं. १८४३ श्रावण उदयकाळ १९१३ पगार १२.

कुंडलीक्रमांक ११९.

श्री शके १८१७ कार्तिक शुद्ध एकादश्यां तिथी भौम वासरे श्रीसूर्योदयात् गत ४० प. ३७

जन्मकुंडली

४ गु, २, ५ के, ३, १, ६ शु, १२, ११ रा, ७ बु म, ८ सू, ९ चं, १०

## आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

शरीर वर्णन—साधारण कृश, डोळे काळे, चेहरा लांबट, दांत मोठे, वर्ण साधारण गोरा, कपाळ साधारण मोठे, शरीर उंच. व्यंग नाहीं. एकंदरीत शरीर उंच देही. अत्यंत आजारी असलेली वर्षे—लहानपणी नेहमीं खरूज, रक्तदोषानें ज्वरपीडा, वर्षे तीन तें पांच देवी, लहानपणी दोनी कान फुटले व नाकांतून उष्णतेनें रक्त जात होते. आई—जिवंत आहे. वडील मृत्यू—शके १८२१ श्रावण वद्य ७. पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—साधारण. पूर्वार्जित उत्पन्न थोडें आहे. कर्जही पण थोडें आहे. भावंडें—भाऊ व बहीण कोणी नाहींत. पाठीवरचा एक भाऊ झाला तो लहानपणीच मेला. चुलत भाऊ तीन व एक चुलत बहीण व एक चुलता आहे, पैकीं चुलता व चुलत भाऊ एक असे दत्तक आहे. विवाह—शके १८३५ वैशाख वद्य ४. स्त्रीचे स्वरूप—पहिली स्त्री साधारण गौर, एक मुलगा होऊन मयत. दुसरा विवाह—शके १८४५ ज्येष्ट शु. ५. दुसरी स्त्री पहिलीपेक्षां गौर वर्ण, सासरची स्थिति साधारण, कर्जानें गरिबी, दुसरे बायकोचे आई व बाप आहेत. संतती—शके १८४१ वैशाख १५ मुलगा झाला व पहिली बायको बाळंत होतांनीं कुचमुन पुढें १७ दिवसांनीं उदरानें मयत झाली व मुलगा शके १८४२ अधिक श्रावणांत मेला. दुसरी स्त्री हल्लीं गरोदर आहे. विद्या—वैदीक विद्या साधारण, वेद. धंदा—पूजेच्या नोकरीचा पगार वार्षिक १०० व भिक्षुकी धंदा. घर व कांहीं थोडीशी जमीन वडिलार्जित आहे. आप्तवर्ग—चुलती व दोन चुलत भाऊ घरें नमुद केलेलें. एक इंग्रजी शिकत आहे. शके १८२९ मध्यें एक चुलता मयत, व दुसरा शके १८४६ अश्विन मध्यें मयत व एक दत्तक आहे. एक मावसभाऊ आहे. संकटकाल—एकत्र कुटुंबात चुलता पहाणारा असल्यानें संकटकाल कोणताही नाहीं. लोकात मान्यता आहे, शत्रू वगैरे कोणी नाहींत असले तर ते वश होतात. इतर गोष्टी—लहानपणी कान फुटलेले हल्लीं एक दुहा वर्षापूर्वी बरा झाला व एक सुरू आहे. आईचे आईकडून थोडीशी जमीन मिळाली ती परत त्यांचे भाऊबंदाकडेच आहे.

## सर्व नाश करणारी कुंडली.

जन्मकुंडली क्रमांक १२०

### आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी

शरीर वर्णन—काळासावळा, मध्यम उंचीचा, नाक लांबट, किंचित् लहान व पुष्ट. पूर्वार्जित सांपत्तिक स्थिति—वडील स्कूल मास्तर होते. सध्यांची सांपत्तिक स्थिति—जमीन जंगलखात्यांत सामील झाली होती, वडिलानी पार्लमेंटपर्यंत दाद लावून धारवाड जिल्ह्यांत ४६१ एकर जमीन संपादन केली. विवाह—एकच, स्त्री वारली आहे. संतती—एक मुलगा व एक मुलगी. विद्या—म्याट्रिकपर्यंत झाली. धंदा—जमीन वहिवाट, वर्तमानपत्राचें नाममात्र एडिटर होते. संकटकाल—५।६ वर्षामागें ऋण वाढल्याने लफंग लोकांनी जमिनी लावून देवून हरवून घेतल्या. निर्व्यसनी होते. २१ वर्षाचा एकुलता एक मुलगा + + + २३ हजाराची अफरातफर करून शिक्षा भोगीत आहे. इतर गोष्टी—मुलगी विधवा झाली. आपण सन्याशासारखा गाणगापुराकडे गेला.

### कुंडलीक्रमांक १२१

श्री शके १७९० विभवनाम० वैशाख व. ७ सकाळी जन्म.

जन्मकुंडली

### आयुष्यांतील महत्वाच्या गोष्टी.

शरीरवर्णन—निमगोरा, शरीरकाठी टेंगणी, सशक्त, नेत्र घारे. व्यंग-दाढी. आपण आजारी असलेली वर्षे—नेहमी अजीर्णाचा त्रास यांस कारण मनाचा संताप. आईचा मृत्यू—४ वर्षे झाली. वडील मृत्यू—शिवरात्रीचे दिवशी, २९ व्या वर्षी. पूर्वार्जित सांपत्तिक

